कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

( श्रीमद्भागवत दशमस्कंधावरील टीका )

## खंड ३ रा

दयार्णवाची इतुकी विनति । सप्रेम श्रीकृष्णचरणीं रमती ।
रंगोनि श्रवणीं सादर होती । ते नाकळती कळिकाळा ॥
( पृ. ५५२, ओ. ३२४ ).

: संपादक :
डॉ. वसंत गजानन राहूरकर, एम्. ए., पीएच्. डी.
( उपसंपादक, संस्कृतकोश-विभाग, डेक्कन कॉलेज, पुणें ६. )

किंमत [illegible]३ रुपये

प्रकाशक :
दयार्णव रघुनाथ कोपर्डेकर,
५२९ सदाशिव पेठ,
पुणें २.



खंड १ ते ३ प्रत्येकीं रुपये सहा
तीन खंड एकत्र ( कापडी बांधणी ) रुपये एकोणीस

मुद्रक :
श्रीपाद जगन्नाथ गानू,
राजगुरु प्रेस,
४०५ नारायण पेठ,
पुणें २.

# प्रस्तावना

'साखर घालुनि पह्यावी तोंडीं। येरा पुसावी न लगे गोडी।'
(अ. १७, ओ. ३६)

## महाराष्ट्रानें ग्रंथाचें स्वागत केलें —

हरिवरदाच्या प्रथमखंडाप्रमाणेंच द्वितीयखंडाचेंहि मराठी चोखंदळ साहित्यिकांनीं व रसिकांनीं अतिशय उत्साहानें स्वागत केले आहे. 'हरिवरदा' ही महाराष्ट्र-शारदेची रत्नमाला आहे असें कांहींनीं म्हटलें आहे. कृष्णदयार्णवांची कल्पनाशक्ति आणि त्यांच्या अंतःकरणांतील भाव-भावनांच्या संयमित ऊर्मि मनाचा वेध घेतात, असा अभिप्राय कांहींनीं व्यक्त केला. कृष्णदयार्णवांचें सर्वंकष पांडित्य, प्रतिभासामर्थ्य, मराठी व संस्कृत वाङ्मयावरील अप्रतिम प्रभुत्व पाहून मराठींतील अग्रगण्य कविवर्यांच्या प्रभावळींत त्यांचें स्थान मोठें मानाचें आहे. ज्या ग्रंथांच्या अध्ययनांत बुद्धिवंतांनीं देखील आपलें आयुष्य व्यतीत करावें, असे मराठी भाषेंत जे कांहीं थोडेफार ग्रंथ आहेत त्यांमध्यें हरिवरदा-टीकेचें स्थान आहे. या शब्दांनीं कांहींनीं या ग्रंथाला आपली स्तुतिसुमनांजलि वाहिली. 'नवरसरत्नाचें सार' अशा या टीकेंतून कृष्णदयार्णवांनीं 'भक्तिप्रेम मनोहर' प्रकट केलें असून असें संतवाङ्मय हें एक अभ्यासाचें विद्यापीठच आहे, असें सुंदर वर्णन कांहीं सहृदयांनीं केलें. कांहींनीं कृष्णदयार्णवांची प्रतिभा पंडिती वळणाची असून तिला अभिजातपणाची देणगीहि लाभली आहे, असा अभिप्राय सोदाहरण पुढें मांडला आहे. याप्रमाणें मुंबई (लोकमान्य, लोकसत्ता), नागपूर (तरुण भारत), हैद्राबाद (प्रतिष्ठान), आणि पुणें (केसरी, प्रसाद, साधना, सकाळ) या महाराष्ट्राच्या चोखंदळ चतुःसीमांतून या ग्रंथाबद्दल गौरवोद्गाराचा प्रतिध्वनि उमटला आहे.

## संतसंस्कृतीचें महत्त्व

आणि यांत वावगें काय आहे ? भारतीय संस्कृतीची गंगोत्री म्हणजे वेदवाणी तर तिचें प्रयागतीर्थ म्हणजे संतवाणी होय. संस्कृत भाषेंतील काव्य व तत्त्वज्ञान आपल्या अनुभूतींत घुसळून संतांनीं लोकभाषांची समृद्धि केली आहे. "संतसंस्कृति हा भारताचा अभंग मूल्यवान् ठेवा आहे. भारताच्या धार्मिक, जातीय, भौगोलिक, भाषिक आदि विविधतेतील एकात्मतेचें तें अभेद्य सूत्र आहे. आजच्या संघर्षाच्या, कटुतेच्या, अपसमजाच्या आणि विद्वेषाच्या वातावरणांत सहयोगाची हांक घुमविणारें तें प्रेरणास्थान आहे." सर्व भारतीय संतांचा आध्यात्मिक अनुभव व भक्ति-प्रवणता हीं एकात्म आहेत. या संतांचा समतावाद हा आध्यात्मिक विकासासाठीं होता हें जरी खरें असलें तरी 'सर्वांभूतीं समभाव' पाहणारी त्यांची मनोवृत्ति भारतीय एकतेचें साधन म्हणून कोणत्याहि काळीं स्वीकार्यच वाटते. समाजाच्या ऐहिक सुखाचें अधिष्ठान म्हणून ही वृत्ति आवश्यकच आहे.

ज्या कृष्णाची उपासना अखिल भारतांत संतांनीं चालविली तो जगद्गुरु श्रीकृष्ण गाईवासरांत, बालगोपालांत वावरणारा, वनमाला धारण करणारा, गोपाळकाल्याची गोडी वाढविणारा व जुन्या निरुपयोगी रूढी बंद करून प्रचंड कार्याचा गोवर्धन उचलण्याचें सामर्थ्य समाजांत निर्माण करणारा होता. समाजांतील सर्व थरांतील लोकांना परम गतीचा अधिकार आहे, असें पुढें त्यानेंच उद्घोषित केलें. त्यानेंच कंस, जरासंध, शिशुपाल, दुर्योधन इत्यादि दुष्ट सम्राटांचीं सिंहासनें धुळीला मिळविलीं व धुळींत वावरणाऱ्या गोप-गोपींना प्रतिष्ठित केलें. संतांनीं धर्माचें गूढ रहस्य स्वतः समजावून घेतलें व तें मराठी पन्हळांतून समाजापर्यंत आणून पोहोंचविलें. 'संतांचं जें सहज बोलणें। तें महावाक्यासि करी ठेंगणें' अशी प्रतिष्ठा संतवाणीला प्राप्त झाली.

अशा या संतवाणीचा आत्मा एकच असला, तरी प्रत्येक संताचें व्यक्तिमत्त्व कांहीं वेगळें आहे. त्यांच्या अनुभूतींत व अभिव्यक्तींत प्रकटणारें प्रत्येक संताचें वैशिष्ट्य आपणांस नवनवीन आनंदाचा प्रत्यय आणून देतें. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम आणि रामदास या महाराष्ट्रीय संतपंचकाची वाणी पाहिली तर या विधानाची सत्यता आपणांस पटते. याच दृष्टीनें संतकवि कृष्णदयार्णव यांच्या 'हरिवरदाटीकेचा' हा तिसरा खंड प्रसिद्ध करतांना त्यांतील अभिव्यक्तींत आढळून येणारें त्यांचें वैशिष्ट्य कसें मनोवेधक आहे हें पाहणें अप्रस्तुत होणार नाहीं.

## वाचेनें काय वर्णन करावें !

कै. ह. भ. प. पांगारकर यांनीं 'मुमुक्षू'त लिहिलें होतें — "हरिवरदा ग्रंथाचें वर्णन वाचेनें काय करावें ! तो ग्रंथच इतका

प्रौढ, रसाळ व प्रासादिक झाला आहे कीं, प्रत्येक मुमुक्षूनें तो एकवार तरी वाचावा. ज्या महात्म्यानें पंधरा वर्षें हालअपेष्टेंत काढून वार्धक्यांत केवळ लोकहितार्थ एवढ्या अवाढव्य परंतु परमसुंदर ग्रंथाची उभारणी केली त्याच्या योग्यतेप्रमाणेंच या ग्रंथाची योग्यताहि अत्यद्भुत आहे. त्यांच्या वाणींत दिव्य प्रतिभा आहे. वर्णन साधें, सरळ पण प्रौढ व गंभीर भाषेंत आहे. तें सारें अध्यात्मतंतूनें ओवणें किती कठिण आहे हें ग्रंथ वाचणारासच कळणार आहे."

### उमरखेड व मुंगी येथील पोथ्या—

प्रस्तुत तिसऱ्या खंडाचें संपादन करतांना मुंगी व उमरखेड येथील हस्तलिखित पोथ्या पाहावयास मिळाल्या. छापील पोथीशीं त्यांची तुलना करून मुख्य पाठभेद तळटीपेंत दिले आहेत. वास्तविक या ठिकाणांच्या हस्तलिखित पोथ्या ७० वर्षांपूर्वी छापलेल्या छापील पोथीच्या मानानें बऱ्याच अशुद्ध वाटतात. तथापि क्वचित् या पोथ्यांतील पाठभेदहि बरे वाटतात. मुंगी येथील प्रत ही बहुतांशीं पैठण येथील प्रतीशीं जुळणारी आहे. उमरखेडप्रतींतील हस्ताक्षर सुबक आहे, परंतु तींत अशुद्धता फार आहे. हा लेखकाचा दोष असावा असें वाटतें. या खंडांत तळटीपेचे अर्थ बारकाईनें तपासले आहेत. व कांहीं अवघड शब्दांचे पूर्वी न दिलेले अर्थ दिले आहेत. तसेंच तो शब्द पूर्वकालीन संतवाङ्मयांत आला असल्यास तें अवतरणहि दिलें आहे. या कामीं महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध कोशकार श्री. चिं. ग. कर्वे यांच्या शब्दकोशाचा पुष्कळ उपयोग झाला.

### उपमा दयार्णवांची

कृष्णदयार्णवांच्या अभिव्यक्तीचें प्रमुख वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या सहजसुंदर व समर्पक उपमा आणि दृष्टांत. दुसऱ्या खंडाच्या प्रस्तावनेंत वानगीदाखल कांहीं उदाहरणें दिलीं होतीं. आतां या खंडांतील खालील ओव्या पहा—

(१) इतर साधनांच्या पाठीमागें लागून परमेश्वराच्या पदसेवेला अंतरणारे लोक करंटे आहेत हें सांगतांना कवि म्हणतात—

ते मज वाटती करंटवाणें । जेंवि खद्योतें स्वपुच्छगुणें ।
सूर्यप्रभे अंतरणें । तेंवि नाडणें पदसेवे ॥
(पृ. ४२६, ओ. १७)

(२) सद्गुरुसेवेवांचून बाकी अवडंबर व्यर्थ आहे.

अनेक प्रतिमा व्रतें हवनें । मुद्रा लक्ष्ये विविध ध्यानें ।
स्तनभावना चर्म चोखणें । सद्गुरुभजनेंविण तैशीं ॥
(पृ. ४२६, ओ. १८)

(३) कालियाच्या विळख्यांतून सुटलेला श्रीकृष्ण कसा दिसला तें सांगतांना दयार्णव म्हणतात—

जैसा सजळाभ्र लंघून । अमृतकिरण प्रकाशे ।
(पृ. ४३९, ओ. २८९)

(४) ज्यांना परमेश्वराचें पद प्राप्त झालें ते अपुनर्भवाची इच्छा करीत नाहींत, हें सांगतांना लहान मूल व बागुलबोवा यांची हृद्य उपमा दिली आहे.

बागुलाशीं पडेल ठाटी । म्हणोनि बाळा चिंता मोठी ।
मिथ्या बागुल कळल्या पोटीं । भयाची गोठी मग कैंची ॥
(पृ. ४४८ ओ. ४८५)

(५) विवेकरूपी सगरपुत्रांनीं आपली हृदयभूमि खणली तेव्हां शब्दौघरूपी गंगाप्रवाहानें दयार्णव भरून गेला असें सांगतांना कवि म्हणतात—

हृद्भू विवेकसगरात्मजीं । खणोनि पर्वत केले रजीं ।
गंगाओघे वर्णराजीं । भरला सहजीं दयार्णव ॥
(पृ. ४६४ ओ. ३०)

(६) नुकत्याच जन्मलेल्या, स्तनपानाची ओळख नसलेल्या मुलाला माता ज्याप्रमाणें स्तनपान शिकविते त्याप्रमाणें गुरु शिष्याला बोध करतात—

जैशी जातमात्र तोकीं । स्तनपानीं अनोळखी ।
माता बळेंचि घालूनि मुखीं । तर्पणतोखीं लांचवी ॥
(पृ. ४७६, ओ. १६).

(७) गरम व ताजें अन्न हे निवालेल्या अन्नापेक्षां रुचकर लागतें ही घरगुती उपमा वसंत ऋतु ग्रीष्माहून लोकांना अधिक आवडतो, असें सांगतांना कवींनीं दिली आहे.

जैसें पर्युषितभोजन । तेंही करी क्षुधाहरण ।
परंतु प्रियतम जैसें उष्ण । तैसें अनुष्ण नोहे कीं ॥
(पृ. ४७७, ओ. ४६).

(८) प्रलंबासुर गवळ्याचा वेश घेऊन इतर गोपाळांत मिसळला तेव्हां ओळखूं येणें कठिण पडलें हे सांगतांना दिलेला घरगुती दृष्टांत पहा—

धान्यजातींत विजातीय खडा । निसूनि टाकिती येकीकडां ।
तेथें षड्साकारक्ष्वेडा । होता निवाडा न करवे ॥
(पृ. ४८३, ओ. ५४).

(९) प्रलंबासुराच्या मस्तकाचा बलरामाच्या बुक्कीनें चेंदामेंदा कसा झाला हें सांगतांना दिलेली उपमा पहा—

उंबर जैसें घनाच्या प्रहारीं । विशीर्ण मस्तक तयापरी ।
(पृ. ४८७, ओ. २२२).

(१०) देवांच्या पुष्पवृष्टीला उत्तरानक्षत्रांतील वळीव पावसाच्या सरीची उपमा दिली आहे—

सुभरें जैशी वळीव सरी । वर्षे उत्तरानक्षत्रीं । पुष्पवृष्टि तयापरी । केली निर्जरीं आनंदे ॥
(पृ. ४८९, ओ. २६८).

(११) कृष्णागमनानें गोपींच्या अंतःकरणांना असा आनंद झाला—

भरतें भरे क्षीराब्धीसी । गोपीमानसीं त्याहूनी
(पृ. ४९७, ओ. १४०).

(१२) खालील उत्कृष्ट रूपक पहा—
प्रबोधशरदर्कींच्या किरणीं । ममताकर्दम जाय वाळूनी ।
ब्रह्माहमस्मि पक्कपर्णीं । ओपधि निवडोनि निडारती ॥
(पृ. ५१४, ओ. २७२).

(१३) गोपींचें अंतःकरण कृष्णानें आधींच जाणलें, हें सांगतांना दिलेली जाईच्या कळीची मनोहर उपमा पहा—
जेवीं जातीचे कोमळ कळिके । घ्राणदेवता सुगंध न चखे ।
हृदयीं जाणे कीं जेव्हां फाके । तें दे सुखें सौरभ्य ॥
(पृ. ५१७, ओ. ३२३).

(१४) सज्जन मनुष्य लघुत्व स्वीकारून मोठा होतो हें कापसाच्या उपमेनें व्यक्त केलें आहे—
पिंजूनि मोकळा केला तूळ । तो विशाळ भासे परंतु हलु ।
तैसाचि पुरुष क्षमादिसुशीळ । लघुत्वें केवळ गुरुतर ॥
(पृ. ५५३, ओ. २).

(१५) याज्ञिक ब्राह्मणींच्या श्रीकृष्णभक्तीचें वर्णन सहजसुंदर उपमांनीं केलें आहे.
मथनें निवडलें नवनीत । जरी ताकाचि माजि वसत ।
तरी तेणेंशीं अलिप्त । नोहे लिप्त कालवितां ॥
जळामाजूनि निघे कमळ । परि तें जळाहूनि वेगळ ।
धांवे दिगंतीं परिमळ । प्रिय अळिउळ अनुरागें ॥
(पृ. ५७३, ओ. २१०–२११).

(१६) पीतांबरधारी श्रीकृष्णाचें हें सुंदर वर्णन पहा—
कनकस्वेवर्णीं इंद्रनील । कीं चंपकप्रसूनीं अलिउळ ।
विद्युत्प्रभेमाजि सजल । मेघ सुनील ज्यापरी ॥
(पृ. ५६४, ओ. २२६).

(१७) इंद्रियरूपी बैल ताब्यांत नसल्यास काय होतें—
बैल वोढितां गाडा पुढें । आरूढा तैसेंचि जाणें पडे ।
करणनिर्दिष्टविपयचाडे । तेंवि अवघडे चैतन्य ॥
(पृ. ५८०, ओ. ३).

(१८) नाममात्र भक्ति म्हणजे कागदाची नाव—
जैशी कागदाची नाव । नामावरूनि धरितां भाव ।
सांडूनि सुदृढ तरणोपाव । मूर्ख अपाव पावती ॥
(पृ. ५९८, ओ. ४०).

(१९) सांधूंचें परित्राण व दुष्टांचे निर्मूलन—
तृणें खुरपूनि काढी माळी । जीवनें शिंपूनि धान्यें पाळी ।
तैसे दस्यु मारुनि समूळीं । साधु सांभाळी निजयोगें ॥
(पृ. ६२२, ओ. १८०).

(२०) इंद्राच्या पश्चात्तापाचें वर्णन—
कुंडामाजील दर्दुर । वरुणा होऊनि म्हणवी थोर ।
तेणें देखिलिया सागर । गर्व समग्र मग सांडी ॥
कीं उदुंबरगर्भींचे जंतु । उदुंबरगर्भींच शक्तिमन्तु ।
गरुडाहूनि ब्रह्मांडांत । आपण विख्यात मानिती ॥
(पृ. ६३१, ओ. ११४–११५).

(२१) गोपांची कृष्णपदप्राप्तीची इच्छा—
बैसल्या सुरतरुतळवटीं । कां पां परजावी नरोटी ।
परमसाम्राज्यैश्वर्यमुकुटीं । बैसोनि सृष्टी न असावें ॥
कीं परमामृताच्या सागरीं । कांजी पिऊनियां चूळ भरी ।
भोगिजे दैन्याची सामग्री । कां अमृतलहरी न पियावी ॥
(पृ. ६६०, ओ. १४४–४५).

**सुभाषितें**—

(१) दंड्य देखोनि दंड न करी । तरी तो कैसा दंडधारी ।
(पृ. ४४५, ओ. ४१०).

(२) कगवया उदकेंशीं सोयरिक । शीतळ हो पावे पावक ।
परी ते आंगींचें दाहक । टाकणें अटक तयातें ॥
(पृ. ४५७, ओ. ६६३).

(३) अथवा धर्मामाजीं परम । अहिंसाधर्म उत्तमोत्तम । सर्वभूतीं आत्माराम । जाणोनि सौम्य वर्तनें ॥
(पृ. ४४६, ओ. ४३०).
तरी येथींचें इतुकें वर्म । सांडूनि देहबुद्धीचा भ्रम । सर्वभूतीं आत्माराम । पाहतां सुगम अहिंसा ॥
(पृ. ४४६, ओ. ४३३).
देहीं भरोनि ज्याचें जिणें । सर्वभूतीं आत्मपणें । भगवत्प्रेमें जें वर्तणें । तो धर्म म्हणें अहिंसक ॥
(पृ. ४४६, ओ. ४३६).

(४) दयार्णवाची हे विनति । सप्रेम करितां भगवद्भक्ति । न वांछितां भक्तिमुक्ति । पाठीं लागती भक्तांचे ॥
(पृ. ४८९, ओ. २८१).

(५) तस्माद्योनिवर्णाश्रम । न म्हणोनियां अधमोत्तम । जेथें रंगला पुरुषोत्तम । तेथ प्रेम त्रिजगाचें ॥
(पृ. ५१७, ओ. ३३७).

(६) परंतु भक्तीची ऐसी जाति । सूर्यापुढें काडवाती ।
सागरास्तृप्यन्ताम् म्हणती । तज्जल हातीं अर्पूनी ॥
(पृ. ५२०, ओ. १९).

(७) ज्यांचे जैसे मनोरथ । ते पुरविती विसरूनि स्वार्थ । ऐसा जयांचा परमार्थ । धन्य परार्थे जे झाले ॥
(पृ. ५५०, ओ. २८६).

(८) भक्तियमुनेचें विशुद्ध जळ । सुमृष्ट सबाह्य निर्मळ । तापत्रयहर सुशीतळ । परम मंगळ शिवरूप ॥
(पृ. ५५०, ओ. २९७).

(९) वेळुवावरी चढणें उडणें। नग्नशस्त्रेंशीं झगटणें। सर्प-
जिह्वेसि डसवणें। भीक मागणें फळ त्याचें ॥
(पृ. ५५७, ओ. ८५).
(१०) मेरु खणोनि परता करणें। ते भू अमृतोदकें भिजविणें।
तेथें धत्तूर पिकवूनि खाणें। भुलीचें जिणें ते ऐसें।
(पृ. ५५७, ओ. ८७).
(११) तथापि निजकार्याकारणें। महत्त्वहानीहि न गणूनि मनें।
पुन्हां प्रवर्तती शाहाणे। विरक्तपणें नुबगति ॥
(पृ. ५६०, ओ. १४८).
(१२) भाजी अर्पोनि मागे केजे। तैशिया भजना देवन्हि लाजे।
देव मानी भजन वोझें। भेदें नुमजे देवत्व ॥
(पृ. ५६६, ओ. २५६).
(१३) समान करितां उच्चावच। वर्णाश्रमाचा विसंच।
होऊं नेदीजे इतुकाच। तंतु साच रक्षावा ॥
(पृ. ५९१, ओ. २१२).
(१४) आंगीं भरतां क्रोधवारें। सहसा विवेक तेव्हां न थरे।
गर्वें आंगींच्या हुंबरे। सत्त्वविचार सांडवला ॥
(पृ. ५९७, ओ. २६)
(१५) तो आर्यपथ म्हणसी कोण। जें कां अभेद तव पदभजन।
अखिल मंगल निर्भय पूर्ण। जाणोनि मुनिजन आश्रयिती ॥
(पृ. ६३२, ओ. ११९).
(१६) घनाचे घायही साहूनी। प्रवर्ते पुढिलांचे कल्याणीं।
ऐसी सुशांति सुवर्णी। म्हणोनि जनीं प्रिय झालें ॥
(पृ. ५४४, ओ. १८३).
(१७) तैसेंच दुर्जनीं करितां छलन। अथवा विपत्ति त्रितापजन्य।
सज्जन समत्वें करिती सहन। धन्य पावन हरितोषें ॥
(पृ. ५४५, ओ. १८८).
(१८) जें जें सकाम अनुष्ठान। तेथें अवश्य होय छलन।
(पृ. ५४५ ओ. १९५).
(१९) राया असार हा संसार। यामाजि नवविधभजन सार।
त्याही साराचें निजसार। कीर्तनश्रवण हरीचें ॥
(पृ. ६५१, ओ. ५६१).
(२०) जेथ मुक्ति वाहती पाणी। अपवर्गातें न पुसे कोण्ही।
अभेदभक्तीची शिराणी। सर्वांलागूनि हरिप्रेमें ॥
(पृ. ६६५, ओ. २५७).

**कृष्णदयार्णव म्हणजे विश्वकोश** —

कृष्णदयार्णवांच्या वर्णनांत विविध शास्त्रांची व विषयांची बारीकसारीक माहिती वाचून वाचक थक्क झाल्यावांचून राहणार नाहीं. **संगीतशास्त्रा**विषयींची शास्त्रीय माहिती ठिकठिकाणीं आली आहे. कालियाच्या मस्तकावर नाचतांना कृष्णानें शिवपार्वतीकडून जणुं नृत्याचें शिक्षण घेतले होते असें वाटतें असें कवीनें म्हटलें आहे (पृ. ४२६, ओ. ३१). विविध **संगीत-वाद्यांचे** उल्लेख (पृ. ४४२, ओ. ३३९-३४३) येथें व (पृ. ४७७, ओ. ३५), (पृ. ६१०, ओ. २८५) येथें आले आहेत. तांडवनृत्यांतील थरक, चाचरी, भवरी, तिरिप, खांडव, वोडव, गिरडी, झंप इत्यादींचा उल्लेख (पृ. ४४३, ओ. ३७२) त्यांची शास्त्रांतील तज्ज्ञता दाखवितात. अद्वैत तत्त्वज्ञान (अध्याय १८, श्लो. १–१०) व परमात्मस्वरूप (अध्याय १७, श्लो. ११–१७) हीं वर्णनें त्यांचा **वेदांता**वरील अधिकार सूचित करतात. **योगशास्त्राचें** वर्णन (अध्याय २८, ओ. १८१–२००) यांत आलें आहे. लहान मुलांच्या **विविध खेळांची** माहिती (अध्याय १८, श्लो. १२५–१३० व १८२) येथें आली आहे. विविध **पशुपक्ष्यांचीं नांवें** (अ. १९ श्लो. ६९-७४), विविध **व्यावसायिकांची माहिती** (अ. २५, श्लो. १७४–७८), **पूजाप्रकाराची** तपशीलवार माहिती (अ. २१, श्लो. ३६–५०), **त्रयोदशगुणी** विडा (अ. २१, श्लो. ४५-४६), भोजनांतील **विविध पक्वान्नांचें** वर्णन (अ. २३, ओ. ३७०–८३, ३८७, ३८९ आणि अ. २४, ओ. १९२–२०१), **कुलधर्म** (अ. २४, ओ. ७६–८३), **कुलदेवता** (अ. २४, ओ. १३४–३५). इ. विविध विषयांवरील बारीकसारीक माहिती वाचून 'हरिवरदा' टीका म्हणजे एक विश्वकोशच आहे असें वाटूं लागतें.

संस्कृतप्रचुरता (अ. १६, ओ. १८६-१९३, ७२१) येथें दिसते. संस्कृत शब्दांचे अर्थ व बारकावे यांचें स्पष्टीकरण (अध्याय १८, ओ. ६९, ११७–१८, २२५ व अ. १९, ओ. ८६; अ. २७, ओ. १७१, ३६१, ४९७) तसेंच (अ. २०, ओ. २८७, ३२०–२१) येथें आलें आहे. यावरून **संस्कृत व्याकरणाचें** त्यांचें ज्ञान प्रत्ययास येतें. भागवताच्या संस्कृत श्लोकांत कांहीं पाठभेद आहेत याची त्यांना कल्पना असावी. कारण (अ. १७, श्लो. २१) याचे दोन्ही पाठभेद ग्रहीत धरून त्यांनीं टीका लिहिली आहे. एखाद्या ठिकाणीं आपण मुळापेक्षां अधिक विस्तार कां केला याला इतर ग्रंथांचा आधार कृष्णदयार्णव देतात. पहा —

नोहे निराधार वैखरी। पहावें नारद पांचरात्रीं।
मानसपद्धतीमाझारीं। सविस्तारीं उत्सव हा ॥
(पृ. ६५१, ओ. ५५२).

**कांहीं बहारीचीं वर्णनें** — कृष्णदयार्णवांच्या शैलीच्या वैशिष्ट्याचा वर उल्लेख केला आहे त्यावरून त्यांच्या व्युत्पन्नतेची व अगाध शब्दभांडाराची चांगली कल्पना येईल. परंतु त्यांनीं मधून मधून पेरलेलीं विविध विषयांवरील बहारीचीं वर्णनें मुळां-

तूनच वाचणें आवश्यक आहे. उदा. गोपीशोक (अ. १६, ओ. २३७–२५३), श्रीकृष्णवर्णन (अ. १८, ओ. ९१–९७), पाखंडी भोंदूंचें वर्णन (अध्याय २०, ओ. १७९–१८५) वनांतील वृक्षांचें वर्णन (अ. २०, ओ. २०१–२०५), यज्वपत्नी व कृष्ण यांचा संवाद (अ. २३, ओ. ३४७–४८), गोपगोपींचा स्वाभाविक आनंद (अ. २५, ओ. २३६–२५७), वैकुंठवर्णन (अध्याय २८, ओ. २४७–२५०), याशिवाय कालिय-निर्यापण (अ. १७), कात्यायनीव्रत (अ. २२), यज्वपत्न्याख्यान (अ. २३), गोवर्धनोद्धरण (अ. २५) हे अध्याय मुळांतूनच वाचले पाहिजेत.

**श्रोतयांचीं हृदयकमळें । प्रेमकल्लोळें निववीत—**

आपली स्वतःची टीका कशी आहे हें सांगतांना कृष्ण दयार्णव म्हणतात—

तया सुकृताचेनि बळें । वरदव्याख्यान भाषामेळे ।
श्रोतयांची हृदयकमळें । प्रेमकल्लोळे विनवीत ॥
भरला केवळ दयार्णव । तो हा ग्रंथ सद्गुरुराव ।
(अ. १६, ओ. ७४५–४६)

हरिवरदेची गोडी कशी आहे हे कृष्णदयार्णवावीं मोठ्या स्वाभिमानानें व आत्मविश्वासानें सांगितलें आहे—

जैसा महावीराचा शर । फोडी कवचेंशीं शरीर ।
तेवि श्रवणीं वरदोत्तर । पडतां संहार संशया ॥
ते हे हरिवराची टीका । क्षणैक एकाग्र आइका ।
होतां श्लोकार्थ ठाउका । मोडे आवांका भेदाचा ॥
साखर घालूनि पहावी तोंडीं । येरा पुसावी न लगे गोडी ।
तैशी एथींची श्रवणावडी । अपरोक्ष जोडी आणील ॥
(अ. १७, ओ. ३३, ३५, ३६).

**गोविंदगुरूंचा समाधिदिन—**

चोविसाव्या अध्यायाच्या आरंभीं कृष्णदयार्णवांचें अंतःकरण गुरुसमाधीनें व्यथित झालेलें दिसतें. गोविंदगुरूंनीं आपल्या निर्याणकालीं कृष्णदयार्णवांना हें कार्य पुढें चालू ठेवण्याचा आदेश दिला असावा—

विनयभावें लोटांगणीं । संतां विनवि जोडूनि पाणि ।
मज गोविंदें तुमच्या चरणीं । निर्वाणकालीं निरविलें ॥
(पृ. ५८०, ओ. ११).

गोविंदगुरु पंढरपुरीं जात असतां वाटेंत त्यांनीं कात्यायनी-व्रतव्याख्यान केल्याचा उल्लेख (पृ. ५८१, ओ. १४) येथें आला आहे. पुढें सद्गुरूंनीं वंजऱ्याजवळील खळबिरें येथें कैवल्यधाम स्वीकारल्याचा उल्लेख आला आहे. ही घटना सौम्यसंवत्सरीं (४३ वें संवत्सर) घडल्याचा उल्लेख आहे.

तंव येरीकडे मार्गशिर । शुद्ध तृतीया बुधवार ।
शूळयोग मूळनक्षत्र । अरुणोदयीं शुभवेळे ॥
वंजरे समीप उत्तरे ग्राम । खळबिरें ऐसें जयासि नाम ।
तेव्हां तेथ कैवल्यधाम । सद्गुरुनाथें स्वीकेलें ॥
मास एक अनशनव्रत । केलें घेऊनि प्रायश्चित्त ।
अभ्यासमार्गें स्वानंदभरित । निजएकांत पावले ॥
तये समयीं माझें स्मरण । करूनि संतांसि निरविलें पूर्ण ।
समीप नसतां मज हे खूण । बोधिली दर्शन देऊनि ॥

आणि शेवटीं आपण पोरके झाल्याचें कृष्णदयार्णवांनीं सांगितलें—

गोविंदाचें सगुण ध्यान । आतां कोठूनि पाहती नयन ।
झालों पोरटा हीन दीन । न वचे शीण हृदयींचा ॥
विरहें प्रेमा भरला गहन । कोण चालवी व्याख्यान ।
तेव्हां गोविंदें येऊन । हरिला शीण अंतरींचा ॥

या प्रचंड कार्याचा गोवर्धन उचलण्यासाठीं अनेक व्यक्तींचा हातभार लागला आहे. उत्तम-श्लोकवाङ्मयमंडळाचे अध्यक्ष पं. दासंभट्ट आयाचित व सेक्रेटरी श्री. स. र. पांडे यांनीं उमरखेड मठांतील हरिवरदेची हस्तलिखित पोथी दिल्यामुळें; तसेंच मुंगी मठांतील श्री. रंगनाथ नरहर नाईक यांनीं पोथी तपासून पाठभेद कळविल्यामुळें या खंडांत तळटीपेंत महत्त्वाचे पाठभेद आम्ही देऊं शकलों. वरील सद्गृहस्थांच्या साहाय्याबद्दल आम्ही त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों.

या ग्रंथाच्या छपाईच्या कामावर वाचकवर्ग अत्यंत संतुष्ट आहे. याचें सर्व श्रेय राजगुरु प्रेसचे व्यवस्थापक श्री. श्री. ज. गानू यांनाच आहे. त्यांना हार्दिक धन्यवाद.

पुणें व मुंबई विद्यापीठांत ह्या ग्रंथाचा पहिला खंड एम्. ए. परीक्षेस मराठीच्या अभ्यासक्रमांत नेमला गेला ही अत्यंत आनंदाची गोष्ट आहे. अशा कार्यास सार्थ हातभार लागणें अत्यंत आवश्यक आहे. संबंधित विद्यापीठीय अधिकाऱ्यांचे आम्ही अत्यंत ऋणी आहोंत. चौथ्या खंडाचें काम सुरू झालें आहे. विद्यापीठें व भारत सरकार यांसारख्या संस्थांनीं सक्रिय सहानुभूति दाखविल्याखेरीज असें प्रचंड कार्य कसें पार पडणार? आमचे मित्र व नेकीचे प्रकाशक श्री. **द. र. कोपर्डेकर** यांनीं या कार्यासाठीं कंबर कसली आहे हें खरें; परंतु संतवाङ्मयप्रेमी व सांस्कृतिक कार्याचे अभिमानी अशा लोकांनीं त्यांना साहाय्य करणें आवश्यक आहे.

वैशाख शु॥ द्वितीया,
शिवजयंती,
शके १८७९.

**वसंत गजानन राहूरकर.**

# कृष्णदयार्णवकृत ‘ हरिवरदा ’ ( खंड ३ रा )

## अनुक्रमणिका







कृष्णदयार्णवकृत

# ह रि व र दा

## अध्याय १६ वा

श्रीकृष्णपरमात्मने नमः । गोविंद सद्गुरु सुखनिधाना । तव पदभजनें सुखें नाना ॥ लाहोनि वरिती नाना स्थाना । त्या संपूर्णा तुज नमो ॥ १ ॥ गोशब्दें बोलिजे मही । तवास्तिक्य तीच्या ठायीं । म्हणोनि आधार विश्वाधेयीं[1] ॥ झाली पाहीं पटुतर[2] ॥ २ ॥ " गांमाविश्य[3] च भूतानि । धरितो स्वतेजें करूनी " । ऐसें अर्जुनालागोनी ॥ तूं निजवचनीं बोधिसी ॥ ३ ॥ " पुण्यो[4] गंधः पृथिव्यां च " । ऐसें तुझेनि वदनें वाच्य । तेव्हां जगदाधार तूं हें साच । येर नटनाच आधेय ॥ ४ ॥ येऱ्हवीं पांसूची ढेपुळी । केंवि राहे अंतराळीं । गोलाध्यायीं हें प्रांजळी । दैवशाली जाणिती ॥ ५ ॥ जगदाधारत्वें संप्राप्त । म्हणोनि भूभर्ता गोविंद सत्य । जगद्रूप हा विवर्त । करीं भ्रांत नसतांही ॥ ६ ॥ विवर्ताचा करूनि बोध । सन्मात्र बोधिसी एवंविध । यालागीं सद्गुरु[5] स्वतःसिद्ध । म्हणती प्रबुद्ध श्रुतिशास्त्रें ॥ ७ ॥ जें कां सच्चित्सुखें[6] केवळ । अक्षय तत्प्राप्तीचें स्थळ । तें स्वामीचें चरणकमळ । भजनशीळ सेविती ॥ ८ ॥ देहाध्यासें[7] विषयाभास । भ्रमवी जीवचैतन्यास । ते ते ठायीं तुझे दास । सुख निर्दोष भोगिती ॥ ९ ॥ मरुदेशीं[8] ग्रीष्मकाळ । तृषे जाकळी प्राणी सकळ । तेथ चातकां सुख सकळ । स्वेच्छा शीतळ जलपानें ॥ १० ॥ फळाभिलाषें मीमांसकें । इहामुष्मिकें[9] विषयसुखें । कल्पनिकें पृथक् पृथकें । ती आंसिकीं[10] तव चरणीं ॥ ११ ॥ तुझेनि पादाब्जसेवनें । चित्सुख भोगिजे भोक्तेपणें । इये त्रिपुटीचेनि मरणें । सुखचि होणें तव कृपा ॥ १२ ॥ मानसपूजेचा सोहळा । दिव्योपचार देखिले डोळां । तरी द्वैताच्या विटाळा । पासूनि वेगळा स्वलाभें ॥ १३ ॥ तैसें भज्य

१ संपूर्ण पदार्थांस. २ अधिक समर्थ. ३ पृथ्वींत मी आपल्या शक्तिरूपानें शिरून स्थावर-जंगम पदार्थ धारण करितों. ४ पृथ्वीमध्यें शुद्ध गंध मीच आहें. ५ सन्मात्र म्ह० परब्रह्मस्वरूप त्याचा बोध करणारा. ६ सत्यज्ञान आणि आनंद एतत्स्वरूप ईश्वर. ७ देह हाच आत्मा असा मिथ्याभास. ८ मारवाड देश. ९ भूलोकींचीं व स्वर्गलोकींचीं. १० संपूर्ण.

भजता आणि भजन। केलें स्वामीनें अभिन्न। तथापि चरणीं पडकलें[1] मन। तें येऊं मुरडून द्वैतासी ॥ १४ ॥ श्रीपादकमलाच्या न्याहाळीं। लाभे सुखाची नव्हाळी। तेथ कैवल्यप्राप्ति न तुळे सगळी। मा कैंचीं आगळीं येर सुखें ॥ १५ ॥ साधक दृश्यांवरूनि दृष्टि। काढूनि मुरडिती उफराटी। त्रिकूटीं श्रीहटीं गोल्हाटीं। औटपीठीं थांबविती ॥ १६ ॥ ते मज वाटती करंटवाणें। जेंवि खद्योतें स्वपुच्छगुणें। सूर्यप्रभे अंतरणें। तेंवि नाडणें पदसेवे ॥ १७ ॥ अनेक प्रतिमा व्रतें हवनें। मुद्रा लक्ष्यें विविधें ध्यानें। स्तन[6]भावना चर्म चोखणें। सद्गुरुभजनें विण तैशीं ॥ १८ ॥ सहस्रदळादि सर्वांदेहीं। गुरुकृपेविण असोनि नाहीं। दास्य सोडूनि तें साधिलें जिहीं। ते नरदेहीं वंचले ॥ १९ ॥ यालागीं श्रीपादभजनप्रेमा। कृपावरें वोपिजे आम्हां। यदर्थ मम मना सकामा। कल्पद्रुमा गुरुवर्या ॥ २० ॥ ऐसें ऐकोनि आर्तवचन। सद्गुरु म्हणती सावधान। सगुण निर्गुण उभय भजन। हें अवतरणें प्रेमाचें ॥ २१ ॥ उद्यममिसें धनें धन। जेंवि पावे अभिवर्धन। तेंवि तुझें सप्रेम स्तवन। वरद होऊनि तोषवी ॥ २२ ॥ दशमस्कंधींचा सोळावा। अध्याय भाषा वाखाणावा। आज्ञापालन हेचि सेवा। ठाव नेदावा अहंते ॥ २३ ॥ योगयुक्तीमाजि जें सार। तें हें स्वामीचें वरदोत्तर। चंद्रामृतें तोषे चकोर। आज्ञाधर तन्न्यायें ॥ २४ ॥ पंचदशीं प्रलंबहनन*। करूनि सुसेव्य तालवन। विषोदकें गोगोपगण। मरतां श्रीकृष्णें जीवविले ॥ २५ ॥ षोडशाध्यायीं कालियदमन। तत्पत्नींचें ऐकोनि स्तवन। कालियाचे रक्षिले प्राण। अनुग्रहून श्रीकृष्णें ॥ २६ ॥ योगींपति कौरवपति। जे कां श्रीशुक परीक्षिति। श्रोते वक्ते विशालमति। ते आजि पंक्तीं श्रोतयां ॥ २७ ॥ जैसा गौतमीचा ओघ। गंगाद्वारीं गौतमायोग्य। तेणेंचि पाडें पातकभंग। करी अव्यंग सेवितां ॥ २८ ॥ तैशीच हेही श्रीकृष्णकथा। भावें ऐके सभाग्य श्रोता। परीक्षितीसमान तो परमार्था। पावे अनर्था खंडूनी ॥ २९ ॥

श्रीशुक उवाच :— त्रिलोक्य दूषितां कृष्णां कृष्णः कृष्णाहिना विभुः।
तस्या विशुद्धिमन्विच्छन् सर्पं तमुदवासयत् ॥ १ ॥

दैत्य मारूनि रासभजाति। तालफळें भक्षूनि तृप्ति। कळां[10]निधान जो श्रीपति। नाचे प्रीतीं अहिमाथां ॥ ३० ॥ कालियाचे विस्तीर्ण फणीं—। वरी नाचे चक्रपाणि। संगीतशिक्षेच्या साधनीं। शिवभवानीछात्रत्वें[11] ॥ ३१ ॥ कौरवचक्रचूडारत्ना। ऐकें परीक्षिते सज्ञाना। कालियविषें दूषित यमुना। देखोनि कृष्णा आवेश ॥ ३२ ॥ रक्षेमाजीं लोपला अग्नि। तरी औत्रेशे[12] शुष्केन्धनीं[13]। तैसा श्रीकृष्ण गोपपणीं। विभुं[14] म्हणोनि न झांके ॥ ३३ ॥ ईषन्मात्रें[15] वक्र भृकुटि। कृष्णें करितां ब्रह्मांडकोटि। होऊनि लपती मायेपोटीं। गोवळनटीं नटला तो ॥ ३४ ॥ ऐसा समर्थ स्वसामर्थ्यें।

---

**पाठभेद :—** * धेनुक-हनन ( पैठणप्रत ).

१ संवकले. २ अवलोकनाने. ३ प्राप्ति. ४ दृश्य वस्तूवरून. ५ इडा, पिंगला, सुषुम्ना अशा शरीरांतर्गत तीन नाड्या आहेत त्यांचा समूह. ६ स्तन असे समजून. ७ कृपा करून. ८ श्रेष्ठ तपस्वी. ९ गोदावरी नदी. १० चौसष्ट कलांचें स्थान. ११ शिष्यपणाने. १२ प्रज्वलित होतो. १३ सुकलेल्या लांकडांनीं. १४ सर्वव्यापी. १५ किंचित्.

तेणें विभुत्वें कृष्णनाथें । सर्प दवडूनि कालिंदीतें । निर्विष करूं भाविलें ॥ ३५ ॥ यमुना करावी निर्मळ । ऐसें इच्छूनि गोपाळ । कालियसर्पातें तत्काळ । दवडी केवळ विभुत्वें ॥ ३६ ॥ ऐसें वदला द्वैपायनि । ऐकोनि शंका नृपा मनीं । झाली तयेचे निरसनीं । करी विनवणी मुनिवर्या ॥ ३७ ॥

राजा उवाच :— कथमंतर्जलेऽगाधे न्यगृह्णाद्भगवानहिम् । स वै बहुयुगावासं यथाऽसीद्विप्र कथ्यताम् ॥ २ ॥

म्हणे अहो जी योगिराजा । इतुका संशय निरसा माझा । जळीं कालिय कवणें ओजा । युगें बहुतें स्थिरावला ॥ ३८ ॥ कालिय जलचर नव्हे कांहीं । तेणें वसति जलाचे ठायीं । बहुत युगें करावया पाहीं । कारण कांहीं मज सांगा ॥ ३९॥ स्थलचरेंही मनुष्यादिकें । जळीं क्रीडती यथासुखें । परंतु होऊनी स्थायिकें । युगें अनेक न वसती ॥ ४० ॥ तरी तें अगाध यमुनाजळ । तदंतरीं करूनि स्थळ । जलचर नसोनि बहुत काळ । कां पां व्याळ राहिला ॥ ४१ ॥ आणि दुसरी ऐका गोष्टी । बहुत युगें यमुनेपोटीं । वसत होता दुर्विषहैठी[3] । केंवि जगजेठी निग्रुही त्या ॥ ४२ ॥ अथवा प्रावृट्काळीं[5] यमुना । न वाहवी सर्पस्थाना । उभय तीरींचे ग्राम नाना । विषोल्वणा[6]* केंवि साहाति ॥ ४३ ॥ बालपणें म्यां केला प्रश्न । देवें करावें निरूपण । सहसा न म्हणावें आडरान । हे कथा संपूर्ण कृष्णाची ॥ ४४ ॥

ब्रह्मन् भगवतस्तस्य भूम्नः स्वच्छंदवर्तिनः । गोपालोदारचरितं कस्तृप्येतामृतं जुषन् ॥ ३ ॥

भूमान्† म्हणिजे अपरिच्छिन्न[7] । स्वजनच्छंदें ज्या वर्तन । भगवंताची लीला पूर्ण । गोपक्रीडन-नाट्याची ॥ ४५ ॥ सुमनमाळेमाजील दोरा । साठीं धरिती त्या आमोदसारा[8] । तेंवि भगवद्गुणचरिता उदारा । साठीं इतरा इतिहासा ॥ ४६ ॥ ब्रह्मनिष्ठां अग्रमणि । तो तूं सर्वत्र बादरायणि । हरिगुण-प्रेमा अंतःकरणीं । जाण सज्ञानी तूं माझा ॥ ४७ ॥ सेवितां हरिगुणकथामृत । विरिंचिसांबेंही[9] अतृप्त । तेथ अस्मदादि प्राकृत । केवीं संतृप्त होती पैं ॥ ४८ ॥ एकमेकांचे हृदयवासी । कीं जन्मले नाभिदेशीं । चरितामृत त्या न निगे कुसीं । मा येरां कायशी संतृप्ति ॥ ४९ ॥ म्हणोनि विस्तारेंशीं आम्हां । निरूपिजे जी द्विजोत्तमा । श्रवणीं देखोनि नृपाचा प्रेमा । शुकपरमात्मा तोषला ॥ ५० ॥

श्रीशुक उवाच— कालिंद्यां कालियस्यासीद् हृदः कश्चिद्विषाग्निना ।
श्रप्यमाणपयो यस्मिन् पतंत्युपरिगाः खगाः ॥ ४ ॥

शुक म्हणे गा परीक्षिति । यमुनेमाजीं एके प्रांतीं । अगाध डोहो ज्यामाजी वसति । करी दुर्मति कालिय ॥ ५१ ॥ महापुराचा येतां लोट । तैंचि कालवे एकवट । एरवीं एकला यमुनेनिकट ।

**पाठभेद :**— * विषोल्बणा. ( उमरखेड प्र. ) † भूमन्. ( उमरखेड प्र. ) हे दोन्ही पाठ शुद्ध वाटतात.

१ मनांत आणिलें. २ सामर्थ्यानें. ३ तीव्र विषाच्या योगानें हट्टी. ४ शिक्षा करी. ५ पावसाळ्यांत. ६ तीव्र विषाला. ७ अपरिमित. ८ सुगंधरूपी तत्त्वासाठीं. ९ भवानीसहित शंकर.

ह्रदें[१] दुर्घट विषयोगें ॥ ५२ ॥ पूरप्रवाह पात्रांतरीं । ह्रद तो कालिंदीमाझारीं[२] । सौम्यप्रवाहापासूनि दुरी । एके तीरीं ह्रद असे ॥ ५३ ॥ यालागीं यमुनेचा प्रवाह । वाहवूं न शके सर्पसमूह । अंतर्जळीं करूनि गृह । चिरकाल राहे या हेतु ॥ ५५ ॥ कालियतुल्य विषोल्वण* । दारापुत्रादि सर्पगण । सहस्रें सहस्र गणी कोण । तेणें दारुण विषवारि ॥ ५६ ॥ भाते लावूनि आटिती धातु । अष्टलोह[३] द्रवीभूत । शीतळवातें ज्वाळा निघत । त्या नभांत प्रसरती ॥ ५७ ॥ भोंवताला तिर्यक्पवन । विषाक्त झगटे ह्रदावरून । तेणें प्रलयहुताशन[४] । भूतें भरून उचंबळे ॥ ५८ ॥ जीवन सळसळां डोहीं कढे । भवंता वाफांचा वळसा पडे । तप्तअयःपिंडापाडें[५] । तापे चहूंकडे भूभाग ॥ ५९ ॥ जीवन भुवन दहन[६] पवन । विषोल्वणाचि झालें गगन । ऐसा पंचभूतांचा गण । विषें संपूर्ण कोंदला ॥ ६० ॥ खेचर[७] गगनीं जळोनि पडती । तीर्यक्पवनेंचि करपती । भूचर भूसंस्पर्शें मरती । मा जळें वांचती कैसेनी ॥ ६१ ॥ वळसा सामान्य विहंगमीं । क्रौंचादि विशेष ऊर्ध्वगामी । तेही विषें आहाळोनि व्योमीं । पडती भूमीं करपोनी ॥ ६२ ॥

विप्रुष्मता विषोदोर्मिमारुतेनाभिमार्शिताः । म्रियंते तीरगा यस्य प्राणिनः स्थिरजंगमाः ॥ ५ ॥

विषोदकाचे तरंग । स्पर्शोनि पसरे मारुतवेग[९] । त्याच्या स्पर्शें भवंते दांगं[१०] । पावे भंग आहळोनी ॥ ६३ ॥ वृक्ष वल्ली लता गुल्म । जंतु श्वापदें विविधनाम । पवनस्पर्शें होती भस्म । मही निर्लोम[११] या हेतु ॥ ६४ ॥ यमुने न वाहे कां कालिया । निरूपिलें या अभिप्राया । विष न जाळी तीरवासियां । हेंही राया निवेदिलें ॥ ६५ ॥ ह्रदासभोंवते जीव । स्थावर जंगम जंतु सर्व । जळोनि पडती हें अपूर्व । विषवैभवें[१२] तुज कथिलें ॥ ६६ ॥ त्यातें कैसा निग्रही कृष्ण । ऐसा केला जो त्वां प्रश्न । तेंचि आतां निरूपण । सावधान परियेसीं ॥ ६७ ॥

तं चंडवेगविषवीर्यमवेक्ष्य तेन दुष्टां नदीं च खलसंयमनावतारः ।
कृष्णः कदंबमधिरुह्य ततोऽतितुंगमास्फोट्य गाढरसनो न्यपतद्विषोदे ॥ ६ ॥

गाई वत्सें आणि गोप । पिऊनि ह्रदींचें सविष आप । प्रेतें पडलीं त्यां सकृप । पूतनागरप[१३] वांचवी ॥ ६८ ॥ सामान्य सर्प झोंबे चरणीं । दों चौं घटिका व्यापी मूर्ध्नि । तैसा नोहे कालियफणी । धांवे गगनीं विषवेग ॥ ६९ ॥ चंडकिरण रवीचें नांव । चंडधन्वा[१४] श्रीराघव । चंडविषवेग हा काद्रव[१५] । वीर्यगौरव हें ज्याचें ॥ ७० ॥ चंडवेग जो विषाचा । तोचि वीर्यप्रताप ज्याचा । तेणें सदोष कालिंदीचा । प्रवाह कृष्णें देखिला ॥ ७१ ॥ खळांचा करावया निग्रह । ज्याचा एथ प्रादुर्भाव[१६] । तो मी कृष्ण यदूद्वह[१७] । निःसंदेह अवतरलों ॥ ७२ ॥ कालियाचें निग्रहण । त्यासि ओपूनि अभयदान ।

---

**पाठभेद:**— * विषोल्बण ( उमरखेड प्र. ).

१ डोह. २ यमुनेमध्ये. ३ सुवर्ण रौप्यादि अष्टधातु. ४ प्रलयकाळचा अग्नि. ५ तापलेल्या लोखंडाच्या गोळ्यासारखे. ६ अग्नि. ७ पक्षी. ८ उडण्याचा वेग. ९ वायु. १० अरण्ये. ११ लोमरहित. १२ विषसामर्थ्य. १३ पूतनेचे विष पिणारा. १४ भयंकर धनुष्य ज्याचे तो. १५ कद्रुपुत्र सर्प. १६ अवतार. १७ यदुपति.

रमणकद्वीपा प्रति गमन । यमुनाजीवन सुसेव्य ॥ ७३ ॥ इतुकीं कार्यें वक्ष्यमाण[1] । लक्षूनियां श्रीभगवान । चंडावेश अवलंबून । वेंघे[2] आपण कदंबीं ॥ ७४ ॥ परम उच्च कदंबावरी । स्वयें वेंघोनि श्रीमुरारि । कटिमेखळा दृढ सांवरी । पीतांबरीं गोऊनी ॥ ७५ ॥ डावा बाहु उजव्या करें । ठोकूनि गर्जना केली निकरें । विषोदकीं आवेशें थोरें । उडी सत्वर टाकिली ॥ ७६ ॥

सर्पहृदः पुरुषसारनिपातवेगसंक्षोभितोरगविषोच्छ्वसितांबुराशिः ।
पर्यक्प्लुतो विषकषायबिभीषणोर्मिर्धावन्धनुःशतमनंतबलस्य किं तत् ॥ ७ ॥

अनंत ब्रह्मांडें रोमविवरीं । ज्याचे तो हा श्रीमुरारि । अखिल[3]गरिष्ठतेची सामग्री । गोपशरीरीं जयाचे ॥ ७७ ॥ तो पुरुष[4]सारात्मा श्रीकृष्ण । सर्पहृदीं पडतां जाण । निपात[5]वेगें आंदोळण । झालें संपूर्णहृदाचें ॥ ७८ ॥ डोहीं पडतां पुरुषश्रेष्ठ । शब्द उठिला कडकडाट । प्रलयमेघाचा बोभाट । तैसा अचाट भीकर[6] ॥ ७९ ॥ तेणें दणाणिलीं पर्वतशिखरें । दऱ्या दरकुटें गिरिकंदरें । वनें अटव्यें कांतारें । भूचरें खेचरें बुझालीं ॥ ८० ॥ गाधोदकीं[7] पाषाण पडे । तेणें तें डहुळे चहूंकडे । कालियहृद तेणेंचि पाडें । दुर्जरक्ष्वेडें[8] कालवला ॥ ८१ ॥ अगाध हृदींचें सगरें[9] वारि । माजी पडतां कैटभारि[10] । कढों लागलें तैला परी । तळींचें वरी कालवलें ॥ ८२ ॥ असंख्य सर्प होते जळीं । विषउल्बण जे महाबळी । ते क्षोभले तये काळीं । विषकल्लोळ वर्षती ॥ ८३ ॥ उडी पडतां हेलावले । सर्प संक्षोभें उचंबळले । गरळ तापें उतों आले । जळ पसरलें सभोंवतें ॥ ८४ ॥ काळे निळे हिरवे पिवळे । विचित्र विषोर्मि[11] उमाळे । भोंवते धांवती रानोमाळें । उचंबळे हृद तेव्हां ॥ ८५ ॥ शतधनुष्यें[12] भवंतें वारि । तीरीं धांविलें पडतां हरि । नवल नव्हे कीं हें भारी । विश्वशरीरि[13]पडिपाडें ॥ ८६ ॥ सुरनरांसि दुर्जर प्रबळ । परी श्रीकृष्ण तो अनंतबळ । तेथ कायसा कालिय खळ । केउतें गरळ त्यापुढें ॥ ८७ ॥ इतुकें करूनि निरूपण । श्रोतयांचें जाणोनि मन । सिंहावलोकनें शंकाहरण । करी सज्ञान शुकवक्ता ॥ ८८ ॥ हृदासभोंवतीं गरळें । स्थावरजंगमें जळालीं समूळें । कदंब केंवि हृदा जवळे । वांचला म्हणाल तरी ऐका ॥ ८९ ॥ महापुरीं लंघूनि पुलिन । हृदीं कालवे यमुनाजीवन । तैं गरळप्रवाहीं तीरींचे जन । काय म्हणोन वांचती ॥ ९० ॥ तरी सिंधुगर्भीं वडवानळ । विझवूं न शके समुद्रजळ । मारुति केवळ गोळांगुळें[14] । परी त्या काळ नाकळी ॥ ९१ ॥ नळें[15]हातेंचि तरल्या शिळा । ते काय वानरा आंगींची कळा । जें जें करणें विश्वपाळा । त्या त्या खेळा विस्तारी ॥ ९२ ॥ तैसा कालियमथनासाठीं । कृष्ण अवतरेल जगजेठी । यास्तव अमृतरूप यमुनेकांठीं । रची परमेष्ठी[16] कदंब ॥ ९३ ॥ दुष्ट सर्पांच्या विषापहरणीं । जैसे निर्मिले अमोघ[17] मणि । तमा नागवे[18] जैसा तरणि । प्रकटे किरणीं तम नाशे ॥ ९४ ॥ हृदासमीप कदंब तैसा । असोनि नागवे कालियविषा । प्रवाह-

---

१ पुढे वर्णावयाचीं. २ चढला. ३ सर्वांहून मोठेपणाची. ४ पुरुषश्रेष्ठ. ५ पतनाच्या जोरानें. ६ भयंकर. ७ उथळ पाण्यांत. ८ भयंकर विषानें. ९ विषयुक्त. १० कैटभ दैत्याचा शत्रु श्रीकृष्ण. ११ विषाच्या लाटा. १२ चार हात. १३ विश्वात्मक शरीर ज्याचें अशा कृष्णाच्या तुलनेनें. १४ मर्कट. १५ नळ नांवाचा वानर. १६ ब्रह्मदेव. १७ व्यर्थता न पावणारे. १८ सांपडत नाही.

मिश्रित विषदोषा । पवनस्पर्शें निवारी ॥ ९५ ॥ तप्ततैलीं मलयागर[1] । पडतां होय तें शीतलतर । तैसें प्रवाहमिश्रित गर । कदंबसमीरसंस्पर्शें[2] ॥ ९६ ॥ तेणें यमुनातीरींचे जन । निर्भय विषबाधेपासून । कां भावी कृष्णस्पर्शन । हें दृढ चिंतन कदंबा ॥ ९७ ॥ कृष्णचिंतन जागे हृदयीं । तरी विषबाधा ते बाधील कायी । कालसर्पाची बाधा नाहीं । तेथ कालिय कायी सामान्य ॥ ९८ ॥ आणिक इतिहासपुराणीं । गरुडें अमृत स्वर्गींहूनी । आणितां बैसला कदंबमूर्ध्नि । तें सुधा[3] द्रवोनि वरि पडिली ॥ ९९ ॥ आणि गरुडाचें सन्निधान । तेणें धर्में भिजला पूर्ण । यालागीं विषाग्नीपासून । निर्भय जाण कदंब ॥ १०० ॥ ऐशिया योगाची सामग्री । कदंबा आंगीं होती पुरी । त्यावरी कित्येक काळांतरीं । हृदाभीतरीं फणी आला ॥ १ ॥ प्रवाह निर्विष कदंबवातें । निर्विष न करी कां हृदातें । तरी नित्य नूतन गरल तेथें । उत्पन्न होत म्हणूं नोहे ॥ २ ॥ ऐसें शंकानिरसन केलें । पुढें व्याख्यान आदरिलें । कृष्णप्रतापें उचंबळलें । शतधनुष्यें जळ भंवतें ॥ ३ ॥

तस्मिन् हृदे विहरतो भुजदंडघूर्णवार्घोषमंगवरवारणविक्रमस्य ।
आश्रुत्य तत्स्वसदनाभिभवं निरीक्ष्य चक्षुःश्रवाः समसरत्तदमृष्यमाणः ॥ ८ ॥

जैसा क्षीराब्धीच्या मथनीं । मंदराचळाचे संघर्षणीं । ऐरावत डहुळी पाणी । चक्रपाणि तेवीं हृदीं ॥ ४ ॥ वरवारणविक्रम[4] हरि । तया महाहृदामाझारीं । स्वेच्छें विचरे बाहुप्रहारीं । क्षोभवी वारि प्रतापें ॥ १०५ ॥ प्रचंड बाहूचीं ताडणें । जळ आंदोळे हृदींच तेणें । शंखमथनीं[5] वेदोद्धरण* । सिंधु डहुळणें ज्यापरी ॥ ६ ॥ दधि शोधूनि भरिलें भांड । मथनीं कालवे भाण्डीं मंड[6] । तेवीं बाहुताडनें प्रचंड । हृद उदंड डहुळला ॥ ७ ॥ कुक्षीं[7] खर्बाडीं[8] सखोलें[9] चोंढें[10] । तेथ आदळती प्रचंड† । जेंवि मेरूचे खचती कडे । तेणें पाडें जळ आदळे ॥ ८ ॥ तळील रेंदा बहु जुनाट । डहुळोनि डोहीं झाला बरँट[11] । हेलावतां जळाचे लोट । हृदाचे कांठ ढांसळले ॥ ९ ॥ तेणें पाणी झालें समळ । माजीं सर्पाचें दुःसह गरळ । गगनगर्भीं उठती ज्वाळ । ग्रहमंडळपर्यंत ॥ ११० ॥ काळे निळे हिरवे पिंवळे । ज्वाळा भासती नभपोकळे । चंद्रमंडळ जाहलें काळें । संतापलें रविवलय ॥ ११ ॥ ऐसा श्रीकृष्ण महाबाहो । बाहुताडनें क्षोभवी डोहो । तेणें खवळला सर्पसमूह । आणि दुःसह कालिया ॥ १२ ॥ बाहुताडनें प्रचंड ध्वनि । चक्षुःश्रवा[12] ऐकोनि नयनीं । विघ्न उदेलें आपुले भुवनीं । ऐसें देखोनि क्षोभला ॥ १३ ॥ तामसयोनि सर्पयाति । विषोल्बण सक्रोधवृत्ति । केवळ असहिष्णुतेची मूर्ति । दुर्लभ शांति जयातें ॥ १४ ॥ दारुयंत्रीं अग्नि भेटे । भडका उठे कडकडाटें । परोत्कर्षासरिसा नेटें । तेंवि फुंपाटे स्वभावें ॥ ११५ ॥ कृष्णबाहूच्या प्रचंडप्रहारें । जल ताडितां घोषगजरें । तें न साहोनिया सत्वरें । क्षोभें थोरें खवळला ॥ १६ ॥ आपुला सांडुनियां ठाव । कृष्णावरी घातली कंव[13] । जैशी विद्युल्लतेची

पाठभेदः— * वेदोद्धरणें ( उमरखेड प्र. ). † लेंढे ( उमरखेड प्रत ).

१ मलय पर्वतावरील चंदन. २ कदंबावरील वाऱ्याच्या स्पर्शानें. ३ अमृत. ४ श्रेष्ठ हत्तीप्रमाणें पराक्रम ज्याचा तो. ५ शंखासुर. ६ मठ्ठा. ७ खांच. ८ डबकें. ९ गंभीर. १० खोल. ११ चिखल. १२ सर्प. १३ मठी.

धांव । सक्रोध जव[1] त्याहूनी ॥ १७॥ लवणार्णवाचें[2] शोषण । करावया श्रीरामबाण । तैसा क्रोधें प्रज्वळोन । आला धांवोन कालिया ॥ १८ ॥ ज्याचे वाफे ग्रहमंडळें । करपती ऐसे प्रदीप्त डोळे । फूत्काराच्या प्रळयानळें । गगनीं उसळे हृदवारि ॥ १९ ॥ प्रावृट्कुहू[3]माजि चपळा[4] । दाऊनि लपवी दिग्मंडळा । निमेषोन्मेष[5] तैसे डोळां । दावी काळा अहि डोहीं ॥ १२० ॥ विषकर्दमें समळ जळ । विशेष प्रचंड काळा व्याळ[6] । तथापि नेत्रांचे बंबाळ[7] । प्रळयानळ उजाळिती ॥ २१ ॥

तं प्रेक्षणीयसुकुमारघनावदातं श्रीवत्सपीतवसनं स्मितसुंदरास्यम् ।
क्रीडंतमप्रतिभयं कमलोदरांघ्रिं संदश्य मर्मसु रुषा भुजया चच्छाद ॥ ९ ॥

ऐसा कालियाचा यांवा । येऊनि कवळी वासुदेवा । तये मूर्तीच्या अवयवां । कुरुपुंगवा परियेसीं ॥ २२ ॥ कृष्ण प्रेक्षणीय म्हणाल कैसा । ज्याच्या दृष्टींत भरल्या ठसा । पुन्हा न देखे विश्वाभासा । पावे समरसा हरिरूपीं ॥ २३ ॥ चक्षुहूनि मृदुलपणें । विश्वनयनीं ज्या नांदणें । परंतु कोणा खुपों नेणे । सुकुमारपणें श्रीकृष्ण ॥ २४ ॥ व्योमगर्भींचें पोकळपण । त्यामाजीं नांदे ज़ो कां सघन । तेणें रंगे जो चिद्घन । सुखनिधान सन्मूर्ति ॥ १२५ ॥ ज्ञानशक्तीचें सोज्वळपण । तेंचि हृदयीं श्रीवत्सचिह्न । भूतदयेचें पीतवसन । शोभायमान सर्वत्र ॥ २६ ॥ आनंदाचें अधिष्ठान । श्रीकृष्णाचें स्मितानन । सर्वात्मकत्वें निर्भय पूर्ण । ज्याचें क्रीडन अभेदें ॥ २७ ॥ प्रेमळाचें हृदयकमळ । त्याच्या उदराहून कोमळ । श्रीकृष्णाचें चरणतळ । जेथ अळिउळ[9] सनकादिक ॥ २८ ॥ जेथींचा आमोद आस्वादितां । उडोनि जाती चौंरी[10] अवस्था । पुन्हा भेद नुंघवी[11] माथा । एकात्मता सहजेंची ॥ २९ ॥ ऐसा लावण्याचा राशि । पाहों आवडे डोळ्यांसी । मेघश्याम सुंदरवेशी । कोमलांगेंशीं सुकुमार ॥ १३० ॥ मेघश्याम राजीवनेत्र । वक्षीं श्रीवत्सचिह्न पवित्र । कांसे मिरवे पीतांबर । स्मितसुंदर मुखकमळ ॥ ३१ ॥ आजानुबाहु मृदुल चरण । कमलगर्भींचें सकुमारपण । कृष्णचरणांतें देखोन । तेंही लाजोन राहिलें ॥ ३२ ॥ सुरवारण[12] मंदाकिनी[13]–। माजीं क्रीडे पंकजवनीं[14] । डोहीं तैसा चक्रपाणि । निर्भयपणीं क्रीडतसे ॥ ३३ ॥ अप्रतिमल्ल[15] श्रीकृष्ण एक । तो कोणाचा वाहेल धाक । ऐशियातें कृष्णपन्नक[16] । वर्मीं सम्यक झोंबला ॥ ३४ ॥ कंठनाळीं हृदयकमळीं । अंगुष्ठसंधीं वाहुमूळीं । नाभिदेशीं पादयुगळीं । डंखी तत्काळीं सक्रोधें ॥ १३५ ॥ क्षोभे ऐसा शतशा वक्त्रीं । कृष्ण डंखिला सर्व गात्रीं । मथनीं मंथा गुंडिती सूत्रीं । कृष्ण त्यापरी अहिभोगें[17] ॥ ३६ ॥ उभयांगुष्ठापासूनि कंठ–। पर्यंत गुंडिला कंबुकंठ । कालियशरीर तें कर्कोट । तेणें उद्भट[18] कर्षिला ॥ ३७ ॥ तया अगाध हृदाकाशीं । विश्वाह्लादक कृष्णशशी । कालियराहु बळें ग्रासी । वदनकलेसि उरलासे ॥ ३८ ॥

---

१ वेग. २ समुद्र. ३ चंद्रकला जींत अदृश्य असते अशी पावसाळ्यांतील अमावास्या. ४ वीज. ५ डोळ्यांची उघडझांप. ६ सर्प. ७ समूह. ८ धैर्य, बळ. ९ भृंगसमूह ( अलिकुल ). १० जागृति, स्वप्न, सुषुप्ति, तुरीया. ११ वर न काढी. १२ ऐरावत. १३ भागीरथी. १४ कमलवनांत. १५ ज्यास कोणी प्रतिस्पर्धी नाहीं तो. १६ कालियसर्प. १७ सर्पशरीरानें. १८ शूर.

तं नागभोगपरिवीतमदृष्टचेष्टमालोक्य तत्प्रियसखाः पशुपा भृशार्ताः ।
कृष्णेऽर्पितात्मसुहृदर्थकलत्रकामा दुःखानुशोकभयमूढधियो निपेतुः ॥ १० ॥

नागभोगें वेष्टिलें गात्र । निश्चेष्टित दिसे वक्त्र । विवर्ण न हालती नेत्र । देखोनि मित्र गजबजिले ॥ ३९ ॥ देखोनि कृष्णातें अचेष्ट । प्राणप्रिय जे पशुप इष्ट । त्यांसि झाले परम कष्ट । ते न स्पष्ट बोलवती ॥ १४० ॥ तो श्रीकृष्ण करूनि सखा । जे विटले विषयसुखा । कृष्णविरहें त्यांचिया दुःखा । आकल्प लेखां न करवे ॥ ४१ ॥ कृष्णीं होऊनि आत्मार्पण । सुहृद्भावें भजले कृष्ण । कृष्णा वेगळा अर्थ कोण । अणुप्रमाण नेणती ॥ ४२ ॥ कृष्णीं मिनले कलत्रभावें । जें कां आत्मनिवेदन नववें । पात्र झाले ते ये सेवे । काम आघवे हरिरूपीं ॥ ४३ ॥ पशु म्हणिजे इंद्रियगण । जे रक्षिती सांवरून । कृष्णविरहें ते पशुप जाण । विगतप्राण जाहले ॥ ४४ ॥ आत्महानि येसणें दुःख । तदनुलक्षें करिती शोक । पोटीं भयाचा भरला धाक । धाकें विवेक हारपला ॥ १४५ ॥ अविवेकें ग्रासिली बुद्धि । नोहे आपुली आपणा शुद्धि । भुलोनि स्वविसरें उपाधि । गाढमूढ जाहले ॥ ४६ ॥ स्मृतिभ्रंशें गाढमूढ । अवघे होऊनि पडिले दगड । अग्नि कोळसोनि होय गूढ । तैसे रूढ शव जाले ॥ ४७ ॥ संवगड्यांची हे अवस्था । व्रजीं कथावी कोणें वार्ता । आतां गोधनाची कैशी कथा । ते नृपनाथा अवधारीं ॥ ४८ ॥

गावो वृषा वत्सतर्यः क्रंदमानाः सुदुःखिताः । कृष्णे न्यस्तेक्षणा भीता रुदत्य इव तस्थिरे ॥ ११ ॥

थानतुटे कां अँपेट गोऱ्हे । पाड्या काल्हवडी वासुरें । गाई वृषभ विविधें गुरें । लहानें थोरें टवकारलीं ॥ ४९ ॥ डोहीं पाहोनि कृष्णाकडां । उठिला एक हंबरडा । आक्रंदती चहूं कडां । घालूनि वेढा हृदासी ॥ १५० ॥ जेंवि एकुलतिया बाळा । देखोनि तरपंडी होतां काळा । तये मातेपरी कळवळा । धेनु सकळा दुःखिता ॥ ५१ ॥ कृष्णीं गुंतोनि गेलिया दृष्टि । चित्राकार अंगयष्टि । लोपली चेष्टांची रहाटी । अचेष्ट सृष्टीं तिष्ठती ॥ ५२ ॥ मनुष्यें रुदती स्नेहसुभरें । तैशीं कृष्णासाठीं गुरें । जळ सांडिती नेत्रद्वारें । लहानें थोरें क्रंदती ॥ ५३ ॥ ब्रह्मयाचे मोहनकाळीं । वत्सें होऊनि वनमाळी । पान्हा प्याला त्या धेनु सकळी । परम स्नेहाळी मातृत्वें ॥ ५४ ॥ ऐसें झालें हृदातीरीं । आतां व्रजींची ऐका परी । डोहीं बुडाला श्रीहरि । हें नेणती घरीं व्रजवासी ॥ १५५ ॥

अथ व्रजे महोत्पातास्त्रिविधा ह्यतिदारुणाः । उत्पेतुर्भुवि दिव्यात्मन्यासन्नभयशंसिनः ॥ १२ ॥

या नंतरें व्रजाआंत । त्रिविध उद्भवले उत्पात । शारीर भौम दैवगत । भय अद्भुत सूचक ॥ ५६ ॥ नरांचीं वामांगें वामनेत्र । दक्षिणभागींचें वनितागात्र । अशुभसूचक जें अपवित्र ।

१ गणना. २ मिळाले. ३ एवढें. ४ अंड न घडविलेला (सं. अ + पिष्ट). ५ मिटी, उडी. ६ भूमीवरील. ७ स्वर्गांतील.

सर्वी सर्वत्र स्फुरती पैं ॥ ५७ ॥ नेत्र बाहु स्तनमंडळ । पोटीं भडभडूनि उठती ज्वाळ । मानस वैरस्यें व्याकुळ । स्मृति शिथिल मूर्च्छित ॥ ५८ ॥ आंगीं कडकडी संताप । कार्यावांचूनि उपजे कोप । अशुभचिह्नें एवंरूप । भय समीप सूचिती ॥ ५९ ॥ भूमि कांपे थरथराटें । उगीच उधडे तडतडाटें । कारणें विण पडती गोठे । वृक्ष मोठे उन्मळती ॥ १६० ॥ दीपमाळा वृंदावनें । डोलती जैशीं सचेतनें । कित्येक प्रतिमा करिती रुदनें । हास्यवदनें कितिएकी ॥ ६१ ॥ वाहाटुळी फिरोनि गगनीं । त्यामाजी सैरा वर्षती वह्नि । भयाची प्राप्ति इत्यादि चिह्नीं । पार्थिवा विघ्नीं सूचिली ॥ ६२ ॥ दिवसा नक्षत्रांचिया ज्योति । गगनींहूनि उलंडती । रुधिरवर्षें भिजे क्षिति । अद्भुत होती दिग्दाह ॥ ६३ ॥ नसतां मेघांचें आभाळ । विद्युत्पात होती प्रबळ । दिवि उत्पात ऐसे बहळ । व्रजीं सकळ देखती ॥ ६४ ॥ श्वानें रासभें मार्जारें । आक्रंदती आर्तस्वरें । रडती आक्रोशें लेंकुरें । तान्हीं वांसुरें ओरडती ॥ १६५ ॥ भालुवा भुंकती गांवखरीं । वृकं जंबुकांघही दुपारीं । कोल्हाळ करितां पैं व्रजपुरीं । झालीं घाबिरीं गौळियें ॥ ६६ ॥ म्हणती उत्पात हे दारुण । उठावया काय कारण । परस्परें करिती कथन । विघ्नदर्शन शंकेचें ॥ ६७ ॥ सद्यंचि महाभय संप्राप्त । ऐसें सूचिती हो उत्पात । अवघे विचार करा त्वरित । महा अनर्थ उदेला ॥ ६८ ॥

तानालक्ष्य भयोद्विग्ना गोपा नंदपुरोगमाः । विना रामेण गाः कृष्णं ज्ञात्वा चारयितुं गतम् ॥ १३ ॥

शारीर भौम आणि दैव । उत्पात देखोनि बल्लव । भयें उद्विग्न झाले सर्व । श्रेष्ठसमुदाव नंदादि ॥ ६९ ॥ म्हणती आमुचा केवळ प्राण । सकळां जीवांचें जीवन । गाई चारावया तो कृष्ण । रामावांचून वना गेला ॥ १७० ॥

तैर्दुर्निमित्तैर्निधनं मत्वा प्राप्तमतद्विदः । तत्प्राणास्तन्मनस्कास्ते दुःखशोकभयातुराः ॥ १४ ॥

मग त्या दुर्निमित्तांवरून । हेंचि जाणावें अशुभ चिह्न । म्हणती कृष्ण पावला निधन । हरिमहिमान नेणोनी ॥ ७१ ॥ संगीं असतां संकर्षण । कदा बाधूं न शके विघ्न । आजि एकला गेला कृष्ण । वनीं मरण पावला ॥ ७२ ॥ ऐसा मनीं करूनि तर्क । बल्लव करिती दीर्घ शोक । कृष्णावेगळें जें आणिक । नेणती सुख संसारीं ॥ ७३ ॥ कृष्णीं गुंतले ज्यांचे प्राण । कृष्णमयचि ज्यांचें मन । ते नंदादि बल्लवगण । दुःख दारुण पावले ॥ ७४ ॥ कृष्णावेगळे आमुचे प्राण । न वांचती पैं दुःखेंकरून । अवघियांसि एक मरण । भय दारुण उदेलें ॥ १७५ ॥ हाहाकारें आक्रंदती । दीर्घशोकें मूर्च्छित पडती । हृदय मस्तकें ताडिती । शंख करिती निःशंक ॥ ७६ ॥ तेणें झाला चंड शब्द । गोपी गोपाळ मुग्धामुग्ध । मिळाला व्रजौकसांचा वृंद । पुसती विशद परस्परें ॥ ७७ ॥ कृष्णसंगें

१ विरसपणानें. २ फांटे. ३ अफाट. ४ राजांना. ५ स्वर्गांत. ६ गांवाचे आसपास. ७ लांडगे. ८ कोल्हे. ९ तत्काळ. १० दुश्चिह्नें.

आपुलालीं । म्हणती लेंकुरें अवघीं गेलीं । वनीं तितुकींही निमालीं[1] । कृष्णावेगळीं न वांचती ॥ ७८ ॥ ऐसे समदुःखी बल्लव । परी कृष्णाची अगाध भाव । मोह ममतेचें न घेती नांव । वेधले जीव श्रीकृष्णीं ॥ ७९ ॥

आबालवृद्धवनिताः सर्वेङ्ग पशुवृत्तयः । निर्जग्मुर्गोकुलाद्दीनाः कृष्णदर्शनलालसाः ॥ १५ ॥

नंदपुरोगम[2] बल्लव । आबालवृद्ध स्त्रियादि सर्व । गृहसंग्रह गांव ठाव । देहभाव विसरोनी ॥ १८० ॥ निघाले व्रजपुराबाहिर । सर्वही करिती हाहाकार । आंगीं स्नेहभुलीचा भर । तेणें विसर सर्वार्थी ॥ ८१ ॥ यास्तव म्हणिजे त्यां पशुवृत्ति । प्रजावात्सल्यीं[3] प्रवृत्ति । आणिक नुमजे कांहीं चित्तीं । शोकावर्ती निमग्न ॥ ८२ ॥ दीनप्राय लहान थोर । कृष्णदर्शनालागीं आतुर । सांडोनि निघाले व्रजपुर । सर्व कांतार हुडकिती ॥ ८३ ॥ कृष्णा म्हणोनि मारिती हांक । पाहती श्रीकृष्णाचें मुख । न देखतां मानूनि दुःख । करिती शोक सविलाप[4] ॥ ८४ ॥ कृष्णा माझिया पाडसा । मेघश्यामा ये डोळसा । नंदनंदना राजहंसा । जीव हा पिसा तुजलागीं ॥ १८५ ॥ नीलोत्पलदलविशालनेत्रा[5] । कोटिकंदर्पकमनीयगात्रा[6] । पदजलपूता[7] पुण्यचरित्रा । दुःखसन्मात्रा चिन्मया ॥ ८६ ॥ कलुषांतका कोमलनामा । कारुण्यपूर्णा कल्पद्रुमा । कमलाकांता निष्कामकामा । पुरुषोत्तमा परिपूर्णा ॥ ८७ ॥ पुण्यश्लोका पुराणपुरुषा । पूतनाशोषण पशुपाधीशा । पवित्रचरणा पयोनिधिवासा । पूज्यपरेशा परमात्मा ॥ ८८ ॥ कृष्ण भवभावभावना[8] । कृष्णा भवगजपंचानना । कृष्णा भवभावअभावना । भवभंजना श्रीकृष्णा ॥ ८९ ॥ ये रे कैवल्यदानी हरि । ये रे संसारगज-केसरी । कृष्णा तूं एक सचराचरीं । दैवीं आसुरीं एकत्वें ॥ १९० ॥ मानससारसराजहंसा[9] । मनसिजमथनालयनिवासा[10] । मादकमन्मथमोहनवेशा[11] । मुनिजनतोषा मधुपते ॥ ९१ ॥ विगतविषय प्रियकरचरणा । विमुखविद्वत्स्मयभंजना[12] । विपश्चिदात्मक[13] विशुद्धज्ञाना । विवर्तविहीना[14] विगतेच्छा ॥ ९२ ॥ शरणशरण्या[15] शर्मदा[16] । शर्वशर्वाणीसंभवहृदा[17] । शार्वरशर्वरीभेदच्छेदा[18] । आनंदकंदा अगोचरा ॥ ९३ ॥ अक्रिया अगुणा अगाधचरिता । अलक्ष्य अनंत सद्गुणभरिता । अरूपा अनामया[19] अच्युता । आद्या अद्वैता अविनाशा ॥ ९४ ॥ सत्त्वसंपन्न बल्लवगण । ऐसा स्मरोनियां श्रीकृष्ण । शोक करिती रानोरान । नंदनंदन गिंवसावया[20] ॥ १९५ ॥ राजस म्हणती सर्वांपरी । तुझा भरंवसा धरिला हरि । तो तूं कोठें गेलासि दुरी । दुःखसागरीं लोटूनी ॥ ९६ ॥ कृष्णा प्रौढत्वें वाढसी । अनेक संपदा जोडिसी । आम्हां वृद्धां गौरविसी । थोर मानसीं हे आशा ॥ ९७ ॥ ते आजि विफळ जाहली वाटे । कृष्णा टाकूनि गेलासि कोठें । झालों अवघेचि करंटे । दुःख अदृष्टें ओढवलें ॥ ९८ ॥

१ मरण पावलीं. २ नंदादि. ३ अपत्यप्रेमा. ४ रोदनपूर्वक भाषणासह. ५ नीलकमलपत्राप्रमाणें विशाल नेत्र ज्याचे तो. ६ सुंदर. ७ पवित्र. ८ संसारोत्पत्तीस हेतु. ९ कमल. १० मदनाचें मथन करणारा शंकर त्याचें स्थान कैलास तेथें राहणारा. ११ मोह पाडणाऱ्या मदनास मोह पाडणारा वेष ज्याचा तो. १२ प्रतिकूल विद्वानांचा गर्व हरणारा. १३ ज्ञानी लोक हेंच हृदय ज्याचें तो. १४ मिथ्याभासरहित. १५ शरणांगताचा आश्रय. १६ सुखदायक. १७ शंकरपार्वतीविषयीं प्रेमभाव हृदयांत ज्याच्या तो. १८ अंधकार व रात्र ह्यांमुळें होणाऱ्या भेदाचा नाश करणारा. १९ रोगरहित. २० शोधण्यास.

तामसदेहबुद्धीच्या भरीं । देहमात्रचि जाणोनि हरि । आंदोळती शोकलहरी । ते वैखरी वद्वेना ॥ ९९ ॥ कृष्णा तुझी मातापिता । पैल संकर्षण हा भ्राता । इष्टां मित्रां आम्हां समस्तां । सांडूनि कैंउतां गेलासी ॥ २०० ॥ आजि जेविला नाहींस घरीं । संगें नेली त्वां सिदोरी । कोठें गेलासि दुरिच्या दुरी । कैशी परी तुज झाली ॥ १ ॥ पादत्राणें न लेतां चरणीं । गाई नेल्या त्वां अनवाणी । कांटे खडे दर्भ रानीं । रुपती म्हणोनि जीव धाके ॥ २ ॥ कृष्णा तुझे अनंत गुण । हृदयीं आठवितां ये रुदन । कैसें आमुचें दैव हीन । हातींचें रत्न हारविलें ॥ ३ ॥ येक देवदेव्हारे करिती । आणि जोशी एक प्रार्थिती । श्रीकृष्णाची कैशी गति । मोहभ्रांति उमजेना ॥ ४ ॥

तांस्तथा कातरान् वीक्ष्य भगवान्माधवो बलः । प्रहस्य किंचिन्नोवाच प्रभावज्ञोऽनुजस्य सः ॥ १६ ॥

मधुवंशज संकर्षण । म्हणोनि माधव हें अभिधान । स्वस्थचित्तें हास्यवदन । जाणे महिमान अनुजाचें ॥ २०५ ॥ कृष्णविरहें दुःखाभिभूतें । राम देखोनि समस्तांतें । कृष्णप्रभाव जाणे चित्तें । परी कोणातें प्रकटीना ॥ ६ ॥ मनुजाकृति नटले पूर्ण । षड्गुणैश्वर्यें संपन्न । परस्परें ते प्रभावज्ञ । परी रहस्यकथन न करिती ॥ ७ ॥

तेऽन्वेषमाणा दयितं कृष्णं सूचितया पदैः । भगवल्लक्षणैर्जग्मुः पदव्या यमुनातटम् ॥ १७ ॥

जो कां जीवाचें जीवन । मनादिकरणांचा जो प्राण । सर्वां प्रियतम चैतन्यघन । तो आत्मा श्रीकृष्ण पढियंतां[2] ॥ ८ ॥ त्या प्राणप्रिया श्रीकृष्णातें । विरहें व्रजौकसें दुःखितें । सैरा काननीं हुडकित । मोहभ्रांतें चालिलीं ॥ ९ ॥ एथें कृष्णें चारिल्या गायी । कृष्ण बैसला इये सांयीं[3] । कृष्ण क्रीडला इये भोंयीं[4] । देहुंडा पायीं ठाकला ॥ २१० ॥ कृष्णें एथें वाहिला वेणु । त्याची अद्यापि पहा खूण । गोधनीं न सेविलें हें तृण । परी भूमीसि चरण उमटले ॥ ११ ॥ व्याघ्रवृकादि हिंस्र जाति । त्यांचे चरण उमटले क्षिती । वेणुवेधें त्यां बाणली शांति । निसर्ग[6]वृत्ति उपरमे ॥ १२ ॥ ऐसें पाहती स्थळोस्थळीं । स्नेहसशोक जाती विकळीं । भुली मोहाची आगळी । कीं वनमाळी आळविती ॥ १३ ॥ एथें पुष्पें तुरंबिलीं । एथें कृष्णें फळें वेचिलीं । एथें कृष्णें निद्रा केली । तृणें दडपलीं तँद्व्याजें ॥ १४ ॥ जें जें पुढें दृश्य दिसे । तें तें कृष्णचि त्यांतें भासे । कृष्णवेधें झाले पिसे । दीर्घघोषें आळविती ॥ २१५ ॥ कृष्ण पुसती तुरंगा[8]उरगां[9] । शशकां[10] मशका[11] नागां[12] नगां[13] । भृंगा कुरंगां[14] विहंगा । म्हणती श्रीरंगा देखिलें ॥ १६ ॥ गुल्म लता तृणें वल्ली । लागलीं कृष्णाच्या पाउलीं । तेणें रंगें सुरंग झालीं । कृष्णचालीप्रसंगें ॥ १७ ॥ भोंवता गोपाळांचा थवा । आणि पशूंचा मेळावा । माजीं कृष्णाचा मागोवा । देखोनि धांवा धांवती ॥ १८ ॥ षड्गुणैश्वर्यसंपन्न ।

१ कोठें. २ प्रिय. ३ छायेंत. ४ ठिकाणीं. ५ एका पायावर भार देऊन उभे राहून दुसऱ्या पायाचें पाऊल उचलून त्या पायावर टेकलें असतां वाकडा होणारा पाय. पहा – 'देहुडा चरण वाजवितो वेणू । गोपिकारमणू स्वामी माझा ॥' (प्रथम खंडांतील कृष्णदयार्णवांच्या नित्यपूजेंतील कृष्णमूर्तीचें चित्र पहा ). ६ मूलस्वभाव. ७ त्यामुळें. ८ घोडा. ९ सर्प. १० ससा. ११ डांस. १२ हत्ती. १३ पर्वत. १४ हरिण.

तो हा श्रीकृष्णभगवान । त्याच्या पदाचें जाणोनि चिह्न । गौळी सज्ञान धांवती ॥ १९ ॥ जिहीं चिह्नीं भगवत्पदें । ओळखोनि गोपवृंदें । धांवती तीं चिह्नें विशदें । मार्गीं मुग्धें लक्षिती ॥ २२० ॥ तिहीं चिह्नीं दाविली वाट । तेणें मार्गें घडघडाट । अवघे पातले यमुनातट । ह्रदानिकट मिळाले ॥२१॥ एथें म्हणसी कुरुमंडना । समानवयस्कां गोवळगणा । माजीं कृष्णाच्या चरणचिह्ना । कैशिया खुणा चोजविलें ॥ २२ ॥

ते तत्र तत्राब्जयवांकुशाशनिध्वजोपपन्नानि पदानि विश्पतेः ।
मार्गे गवामन्यपदांतरांतरे निरीक्षमाणा ययुरंग सत्वराः ॥ १८ ॥

तरी जैसे कां योगिजन । अप्रमत्तत्वें[1] सावधान । अतद्व्यावृत्ती[2] करून । ब्रह्म निर्गुण गिंवसिती ॥ २३ ॥ तैशीं मार्गीं धेनुपदें । त्यांमाजी गोपाळांचीं विशदें । त्या सर्वांच्या अतद्वादें[3] । श्रीकृष्णपदें गिंवसिती ॥ २४ ॥ कृष्णांघ्रीची ओळखण । ध्वजांकुशोर्ध्वरेखापूर्ण । पद्मयवादि चिह्नीं जाण । भगवच्चरण प्रकाशती ॥ २२५ ॥ धेनुमार्गें रानोरानीं । अन्यपदांच्या निराकरणीं । भगवत्पद विलोकूनी । आले धांवोनि सत्वरा ॥ २६ ॥ परीक्षितीतें अंगशब्दीं[4] । बादरायणि स्वसंवादीं । संबोधूनि विशाळबुद्धि । म्हणे त्रिशुद्धि अवधारीं ॥ २७ ॥

अंतर्ह्रदे भुजगभोगपरीतमारात्कृष्णं निरीहमुपलभ्य जलाशयांते ।
गोपांश्च मूढधिषणान् परितः पशूंश्च संक्रंदतः परमकश्मलमापुरार्ताः ॥ १९ ॥

येऊनि पाहती ह्रदाकडे । तंव कृष्णा आंगीं सर्पवेढे । निश्चेष्ट पडला जैसें मडें । तैसा निवाडें देखती ॥ २८ ॥ कृष्ण सांपडला म्हणती गजरीं । परंतु अगाध जलांतरीं । दुर्विषाच्या उडती लहरी । यालागीं करीं अप्राप्य ॥ २९ ॥ जावों न शकती कोणी आंत । कालियनाग गरळ वमित । अगाध डोहो विषें कढत । तीरीं तटस्थ जन झाले ॥ २३० ॥ मग पाहती ह्रदाभंवतें । तंव गोपाळ पडिले जैशीं प्रेतें । धेनु आक्रंदती तेथें । महादुःखातें पावले ॥ ३१ ॥ अंतःकरणें विकळ झालीं । हाहाकारें धैर्यें गेलीं । दीनें अनाथें होऊनि ठेलीं । मूर्छित पडलीं नावेक ॥ ३२ ॥ ऐशी व्रजौकसांची दशा । गोपी प्रेमळा मुग्धवयसा । कोटिमन्मथलावण्यठसा । साभिलाषा श्रीकृष्णीं ॥ ३३ ॥

गोप्योऽनुरक्तमनसो भगवत्यनंते तत्सौहृदस्मितविलोकगिरः स्मरंत्यः ।
ग्रस्तेऽहिना प्रियतमे भृशदुःखतप्ताः शून्यं प्रियव्यतिहृतं ददृशुस्त्रिलोकम् ॥ २० ॥

अनंतैश्वर्यप्रतापी । जो परमात्मा विश्वव्यापी । त्या कृष्णाचे लावण्यरूपीं । स्वमनें गोपी अनुरक्ता ॥ ३४ ॥ दृढनिश्चय त्यांचे मनीं । दुसरा समर्थ कृष्णाहूनी । नाहीं* ब्रह्मांडभुवनीं ।

**पाठभेद**— * 'नाहीं' (उमरखेड प्र.)

१ सावधपणानें. २ ईश्वरावांचून इतर वस्तु वर्ज करणें. ३ निराकरणानें. ४ हे परीक्षिते असा शब्द.

लावण्यगुणीं तुळी ऐसा ॥ २३५ ॥ कृष्ण विधिहरांचा शास्ता[1] । कृष्ण काळाचा नियंता । ऐसा दैवें लाभे भर्ता । तैं समर्था श्रीहूनी ॥ ३६ ॥ तें विपरीत झालें कैसें । कृष्ण कर्षिला काळपाशें । खोंन[2] घालूनि आमुचे आशे । दिलें संतोषें अंतर ॥ ३७ ॥ कृष्णा ऐसा सुहृद सृष्टीं । न मिळे पाहतां ब्रह्मांडकोटि । श्रीकृष्णाच्या स्मरोनि गोष्टी । पडती भूतटीं मूर्च्छितां ॥ ३८ ॥ श्रीकृष्णाचें हास्यवदन । स्निग्ध अपांगनिरीक्षण । पाहतां ब्रह्मानंद गौण । उपमा गौण त्या मुखा ॥ ३९ ॥ श्रीकृष्णाचे मधुर बोल । ऐकोनि येती स्वानंदडोल । कोटिब्रह्मपदांचें मोल । तुळितां अतुल पडिपाडें ॥ २४० ॥ प्रियतम सर्पें ग्रासिला बाई । आतां भूभार जिणें काई । दुःखें पेटली हृदयखाई । पडती ठायीं मूर्च्छिता ॥ ४१ ॥ पुन्हा होतां लब्धस्मृति । गोपी दुःखें आक्रंदती । श्रीकृष्णाची मन्मथमूर्ति । भरली चित्तीं तद्विरहें ॥ ४२ ॥ बालसूर्याचें आरक्तपण । रातोत्पलदल[3]मृदुलचरण । शयनीं घेऊनि पहुडों कृष्ण । तैं करूं मर्दन उरोजीं[4] ॥ ४३ ॥ काम शत्रु जो असाध्य । येणें साधनें करूं साध्य । म्हणतां आम्हीच झालों वंध्यें[5] । स्मर अवंध्य उरला कीं ॥ ४४ ॥ श्रीकृष्णाचें अधरामृत । प्राशूनि जिंकूं इच्छिला मृत्य । तें आजि विफळ झालें कृत्य । मृत्य त्वरित पातला ॥ २४५ ॥ श्रीकृष्णाच्या आलिंगना । लाहतां न बाधी काळकळना[6] । कृष्ण डंखूनि कालियाणा[7] । आमुच्या प्राणा घेतलें गे ॥ ४६ ॥ चंद्रकाश्मीरचंदनउटी[8] । देऊं कृष्णातें गोमटी । ऐशी इच्छा होती पोटीं । परी अदृष्टीं नाहीं कीं ॥ ४७ ॥ श्रीकृष्णाचे उभय चरण । कुरळ केशीं झाडूं पूर्ण । ऐसें इच्छित होतें मन । परी दैवहीन निवडलें ॥ ४८ ॥ होऊं कृष्णाच्या किंकरी । कृष्ण सेवूं निरंतरी । इच्छा होती हे अंतरीं । ते ईश्वरी[9] पुरवीना ॥ ४९ ॥ कृष्णवियोगें ऐशिया । गोपी विलपती अवघिया । म्हणती चांडाळ कालिया । आमुच्या प्रळया उदेला ॥ २५० ॥ भरलें असतांही त्रिभुवन । कृष्णविरहें देखती शून्य । कृष्णप्रेमें तनु मन प्राण । ठेलें वेधून तद्रूपीं ॥ ५१ ॥ त्या गोपींची विरहकथा । कथी ऐसा कैंचा वक्ता । तथापि भृशदुःखें[10] संतप्ता । त्या श्लोकार्था अनुसरलों ॥ ५२ ॥ विरहिणीं कां उपासकां । कीं अनन्यभावें सद्गुरुभजकां । एवं विरह हा ठाउका । येरां मायिका काहणी हे ॥ ५३ ॥ ऐशी गोपिकांची कथा । आतां जननीची अवस्था । शुक निवेदी अवनिनाथा । तेही श्रोतां परिसावी ॥ ५४ ॥ व्यथित कृष्णातें अनुलक्षून । यशोदेतें करितां रुदन । गोपिका तीतें अनुसरोन । कथिती हरिगुण समदुःखी ॥ २५५ ॥

ताः कृष्णमातरमपत्यमनुप्रविष्टां तुल्यव्यथां समनुगृह्य शुचः स्रवंत्यः ।
तास्ता व्रजप्रियकथाः कथयंत्य आसन् कृष्णाननेऽर्पितदृशो मृतकप्रतीकाः ॥ २१ ॥

जननिया कृष्णाच्या स्नेहाळा । वत्सप होऊनि जैं केली लीला । तैं जयांचें स्तन्य प्याला । त्या त्या सकळा समदुःखी ॥ ५६ ॥ आणि व्रजींच्या अवघ्या नारी । ज्यांचे कुमार पुलिनावरी ।

१ उपदेष्टा, गुरु. २ घरफोडी. पहा—‘ खहिता घातले खान ’ तुकारामगाथा. ३ रक्तकमलपत्राप्रमाणें कोमल चरण ज्याचे तो. ४ स्तनाचे ठायीं. ५ निष्फळ. ६ कालाचा अधिकार. ७ कालियानें. ८ चंद्राप्रमाणें शीतळ केशर व चंदन यांची उटी. ९ जगदंबा. १० अति दुःखानें.

मूर्च्छित पडिले प्रेतापरी । यशोदे सरी त्या रडती ॥ ५७॥ यशोदा कृष्णातें लक्षून । दुःखें करी आक्रंदन । गोपी तीतें अनुसरोन । करिती रुदन समदुःख ॥ ५८॥ माता पुत्रमोहें रडती । विरहें गोपी चरफडती । न हालतां नेत्रपातीं । मुख लक्षिती कृष्णाचें ॥ ५९॥ स्तन पाझरती मातृमोहें । शोकें नेत्रीं बाष्प वाहे । कृष्णवियोगें दुःखें देहे । फुटती लाहेसारिखे ॥ २६० ॥ जन्मापासूनि कृष्णलीला । ज्या ज्या प्रियकर गोपिकांला । त्या त्या स्मरोनि तिये वेळां । ऐकीमेकींला सांगती ॥ ६१ ॥ कृष्ण राहिला जैंहूनि पोटीं । तैंहूनि मी सभाग्य मोठी । झालें एकसरी करंटी । रेखा खोटी निवडली ॥ ६२ ॥ कृष्णासारिखें लेंकरूं । निर्मूं न शके ईश्वरू । कोंवळें कृष्णाचें अंतर । आजि निष्ठुर पैं झाला ॥ ६३ ॥ कृष्णासि आवडे मिष्टान्न । कृष्णासि आवडे पयःपान । कृष्णासि आवडे माखण[1] । हय्यंगवीन[2] स्वादिष्ट ॥ ६४ ॥ कृष्ण नाना आळी करी । मथन करितां पदरीं धरी । चंद्र देखोनि जळांतरीं । मागे करीं खेळावया ॥ २६५ ॥ कृष्णासि आवडे काहाणी । सांगतां ऐके मन ठेवूनी । चिमणीं मुलें मेळवूनी । बोबड्या वचनीं त्यां सांगे ॥ ६६ ॥ कृष्ण उमाणी[3] सर्व जाणे । कृष्ण मंजुळ गाय गाणें । सप्तस्वरीं तानमानें । लास्यनर्तनें संगीत ॥ ६७॥ कृष्ण सांवळा डोळस । कृष्ण नागर[4] गोपवेश । कृष्णेंवीण विश्व ओस । वाटे उदास भणभणा ॥ ६८ ॥ ऐसे अनेक विलाप करून । आठविती श्रीकृष्णगुण । कृष्णवदनीं जडले नयन । प्रेतासमान तटस्थ ॥ ६९ ॥ कृष्णाचि केवळ प्राण ज्यांतें । नंदादिकां त्यां गोपांतें । हृदीं प्रवेशतां रोहिणीसुतें । धरूनि वारिलें तें ऐका ॥ २७० ॥

कृष्णप्राणान्निर्विशतो नंदादीन्वीक्ष्य तं ह्रदम् । प्रत्यषेधत्स भगवान् रामः कृष्णानुभाववित् ॥ २२ ॥

तंव नंदादि गोपवृद्ध । कृष्ण देखोनि सर्पें बद्ध । मोहें अवघेचि झाले मुग्ध । म्हणती ह्रद प्रवेशों ॥ ७१ ॥ क्षणें कृष्ण सोडील प्राण । देखों न शकों हें निर्वाण । कृष्णाआधीं आमुचे प्राण । जातां सगुण त्यापरिस ॥ ७२ ॥ ऐसें दुःखें रिघती डोहीं । संकर्षण त्यां धरूनि बाहीं । मागें लोटी हातीं दोहीं । सांगे कांहीं हरिलीला ॥ ७३ ॥ म्हणे गर्गाचें ज्योतिष । कोठें तरी झालें फोस । तेणें कथिलें भविष्य । धरा विश्वास ते ठायीं ॥ ७४ ॥ षड्गुणैश्वर्याचा पति । तो बलराम ईश्वरमूर्ति । तेणें वारितां गोपांप्रति । तटस्थवृत्ति राहिले ॥ २७५ ॥ तंव परीक्षिति म्हणे मुनि । कालियविषाच्या पवनें वनीं । स्थावरजंगमां आहळणी । वांचले[5] कैसेनि व्रजवासी ॥ ७६ ॥ ऐकोनि हांसिला योगिराव । म्हणे शंकेसि नसोनि ठाव । कोमल श्रोत्यांचा जाणोनि भाव । प्रश्न अपूर्व तो केला ॥ ७७ ॥ तरी गाई गोपाळ ह्रदींचें पाणी । पिऊनि पावले प्राणहानि । ते कृपादृष्टीं अवलोकनीं । अमृत वर्षोनि जो जीववी ॥ ७८ ॥ आणि वत्सें वत्सप अघापोटीं । भस्म झाले ते कृपादृष्टीं । अवलोकूनियां जगजेठी । सजीव सृष्टीं जो काढी ॥ ७९ ॥ कदंबा भावी कृष्णाचिंतन ।

---

१ भाकरीस चोपडावयाचें तूप, लोणी इ० २ कालच्या दुधापासून निघालेलें तूप, लोणी. ३ कोडीं, उखाणे. पहा– 'आतां मी पुसेन तें सांगारे उमाणें' निळोबा गाथा. ( सं. उद् + मा = अनुमान करणें ). ४ नागरिक. ५ उत्तम.

यास्तव गरळें न जळे जाण । तो हृदीं असतां प्रत्यक्ष कृष्ण । केंवि व्रजजन जळतील ॥ २८० ॥ कृष्णविरहें रिघते डोहीं । तरी त्यां विषभय न बाधी कांहीं । कृष्णवियोगें मूर्च्छा देहीं । भरोनि पाहीं वश झाले ॥ ८१ ॥

इत्थं स्वगोकुलमनन्यगतिं निरीक्ष्य सस्त्रीकुमारमतिदुःखितमात्महेतोः ।
आज्ञाय मर्त्यपदवीमनुवर्तमानः स्थित्वा मुहूर्तमुदतिष्ठदुरंगबंधात् ॥ २३ ॥

व्रजौकसांची हे अवस्था । कळों सरली श्रीकृष्णनाथा । पाहोनि गोगोपां तटस्थां । हृदयीं व्यथा जाणवली ॥ ८२ ॥ ऐसें आपुलें गोकुळ । स्त्रिया पुरुष सहितबाळ । देखोनि आपणाविण व्याकुळ । हृदयीं गोपाळ कळवळिला ॥ ८३ ॥ मीच ज्यांसि परमगति । मजविण आन न जाणती । ग्रस्त देखोनियां मजप्रति । दुःखी होती मजसाठीं ॥ ८४ ॥ जेणें धरिली मर्त्यपदवी । तो मनुष्यापरी वर्तोनि दावी । एरव्हीं चराचरगोसांवी । गोष्टी ठावी अवघी त्या ॥ २८५ ॥ मनुष्यांपरी रडे पडे । मनुष्यापरी भेणें दडे । डोहीं सर्पें घालितां वेढे । निश्चेष्ट पडे नावेक ॥ ८६ ॥ तंव व्रजौकसें समस्तें । आपणा निमित्त झालीं प्रेतें । अत्यंत जाणोनि श्रीअनंतें । करुणावंतें कळवळूनी ॥ ८७ ॥ मुहूर्तमात्र संपादणी । संपादिली मनुष्यपणीं । आप्तांसाठीं अंतःकरणीं । चक्रपाणि कळवळिला ॥ ८८ ॥ मग त्या उरंगबंधांतून[1] । प्रतापें निघाला श्रीभगवान । जैसा सजळाभ्र[2] लंघून । अमृतकिरण[3] प्रकाशे ॥ ८९ ॥ काळियाचा उकलूनि फांसा । उभा ठाकला श्रीकृष्ण कैसा । त्या दोघांचा प्रताप जैसा । वर्तला तैसा परियेसीं ॥ २९० ॥

तत्प्रथ्यमानवपुषा व्यथितात्मभोगस्त्यक्त्वोन्नमय्य कुपितः स्वफणान् भुजंगः ।
तस्थौ श्वसन् श्वसनरंध्रविषांबरीषस्तब्धेक्षणोल्मुकमुखो हरिमीक्षमाणः ॥ २४ ॥

वज्रसारहरिशरीर[4] । कालियवपु रज्ज्वाकार । गुंडूनि कर्षिलें दृढतर । वैक्लव्यपर[5] होवया ॥ ९१ ॥ तंव तूष्णींभूत राहोनि कृष्ण । झाला तद्व्यथासहिष्णु । मूहूर्तमात्रें सर्पप्राण । पडिले क्षीण निश्चेष्ट ॥ ९२ ॥ अंगप्रौढी विशाळ तरु । लववी जैसा बलिष्ठ नरु । परी तैसाच चिरकाळ होतां स्थिर । भंगे धीर मुहूर्तें ॥ ९३ ॥ कीं मनुष्य जळामाजीं बुडी । देऊनि निग्रहें श्वास कोंडी । शक्तीहूनि अधिक घडी । भरतां सोडी प्राणांतें ॥ ९४ ॥ तेंवि कालियें अवघें बळ । वेंचूनि कर्षिला गोपाळ । मुहूर्तपर्यंत निश्चळ । मग व्याकुळ अहि झाला ॥ २९५ ॥ मग उकलूनि आंगींचे वेढे । शतशः उभारी विशाळ फडे । प्रचंड क्रोधें हृदयीं कढे । ज्वाळा तोंडें वमीतसे ॥ ९६ ॥ जितुक्या फणा तितुकीं वक्त्रें । तद्‍द्विगुणित नासारंध्रें । गरळाग्नीच्या प्रलयधूम्रें । संपूर्ण भरे स्थळ जळ ॥ ९७ ॥ कराल गरल सक्रोध कडके । नासारंध्रें निघती भडके । यमुनाकल्लोळ साहती खडके । तैसे धडके हरी

१ सर्पाच्या बंधनांतून. २ जलपरिपूर्ण मेघ. ३ चंद्र. ४ वज्रासारखें बल असणारें. ५ अत्यंत व्याकुल. ६ स्तब्ध.

सोसी ॥ ९८ ॥ मांडे करिती ज्या सुगरणी । उबेंडी[1] ठेविती त्या रांधणी । तैशा संतप्त नेत्रश्रेणी । पाहे क्षोभोनि सक्रोध ॥ ९९ ॥ मुखें प्रदीप्त उल्मुकाकार[3] । हिंस्र अशांत विखार । नेत्र सरोष एकाग्र । नंदकुमार अवलोकी ॥ ३०० ॥ परंतु कृष्णावरी तवकें[4] । झोंबोनि दंश करूं न शके । तटस्थ गरळा वमिती मुखें । नेत्रीं देखे प्रज्वलित ॥ १ ॥ जैसा स्वधर्मसंपन्न शूर । आधीं पराचे सोसी प्रहार । मग आपण परम धीर । करी प्रहार त्यावरी ॥ २ ॥ तैसा कालियाचा यांवा । कृष्णें साहिला आघवा । आतां दावी स्वा दुर्भावा । तो कौरव्या परियेसीं ॥ ३ ॥

तं जिह्वया द्विशिखया परिलेलिहानं द्वे सृक्किणी ह्यतिकरालविषाग्निदृष्टिम् ।
क्रीडन्नमुं परिससार यथा खगेंद्रो बभ्राम सोऽप्यवसरं प्रसमीक्षमाणः ॥ २५ ॥

अतिकराल भयंकर । विषाग्नीचे प्रलयांगार । तैसे प्रज्वलित ज्याचे नेत्र । तो विखार धुधुवत ॥ ४ ॥ लळलळा लाळी जिह्वा तिखा[5] । एकएकीतें दोन शिखा । जैशा सरळ शस्त्रांच्या झाडिती शिखा[6] । तैशा प्रतिमुखा माझारीं ॥ ३०५ ॥ कीं विद्युल्लता प्रलयघनीं । तैशिया जिह्वाद्वय सृक्किणी[7] । आवाळीं चाटिती चपळपणीं । फूत्कारोनि सरोख ॥ ६ ॥ त्या ऐशिया सर्पाप्रति । खगेंद्राचिये[8] विक्रमगति[9] । मूर्ध्नि वळघोनि श्रीपति । भ्रमराकृति क्रीडत ॥ ७ ॥ जये मूर्ध्नीसि हाणी चरण । तेथ शतशा धांवती वदनें । लघिमासिद्धि[10]चपळपणें । करी नर्तनें श्रीकृष्ण ॥ ८ ॥ सर्प पाहे प्रतीकारसंधि । तंव तो श्रीकृष्ण विशाळबुद्धि । क्रीडा करी नर्तनविधि । जो कलानिधि जगदात्मा ॥ ९ ॥ श्रीकृष्ण कालियाचे मूर्ध्नि । चढोनि प्रवर्ते जंव नर्तनीं । तेव्हां जयशब्द त्रिभुवनीं । केला सुरगणीं आनंदें ॥ ३१० ॥ शतशः मुखें डंखूं धांवे । गरला वमी सक्रोध हांवे । चपळांगेंशीं वेष्टूं पावे । परी नागवे श्रीचरण ॥ ११ ॥

एवं परिभ्रमहतौजसमुन्नतांसमानम्य तत्पृथुशिरः स्वधिरूढ आद्यः ।
तन्मूर्धरत्ननिकरस्पर्शातिताम्रपादांबुजोऽखिलकलादिगुरुर्ननर्त ॥ २६ ॥

ऐशियापरी कालियमाथां । नृत्य करितां श्रीकृष्णनाथा । चमत्कारें परिभ्रमतां । परम व्यथा फणी पावे ॥ १२ ॥ पदविन्यास तालबद्ध । तांडवमंडित[12] श्रीमुकुंद । भ्रमरी[13] देतां फणावृंद । दुःसह खेद पावला ॥ १३ ॥ ऐसा कालिय हतौजस[14] । जों जों उच्च उभारी अंस[15] । तों तों वळघोनि आदिपुरुष । लववूनि त्रास पाववी ॥ १४ ॥ विशाळ चंचळ फणापृष्ठ । लववी नाचोनि वैकुंठ । तेणें सर्पासि होती कष्ट । अतिगरिष्ठ[16]पदप्रहारें ॥ ३१५ ॥ त्रासें फणा लववी सर्प । अन्य उभारी

१ उपडी, पालथी. पहा—'जेणं परत्रा केलें उबडें' ज्ञानेश्वरी; 'विन्मुख पडती उबडीं' एकनाथ—रुक्मिणीस्वयंवर. २ मडकीं. ३ कोलितासारख्या. ४ क्रोधातिशयानें. ५ तिखट. ६ धारा. ७ ओष्ठप्रांत. ८ गरुड. ९ उडीचा वेग. १० ही ईश्वराच्या अष्टसिद्धीपैकीं एक सिद्धि आहे. हिच्या योगानें पाहिजे तितका हलकेपणा शरिरास आणितां येतो. ११ पाय ठेवणें. १२ शंकराचें एक प्रकारचें नृत्य आहे. त्यामुळे शोभमान. १३ गिरकी. १४ तेजोहीन. १५ खांदा. १६ फार जड.

जंव सदर्प । तेही वळघोनि कंदर्पबाप । दर्प अमूप लोपवी ॥ १६ ॥ म्हणाल कालिय महाव्याळ । कृष्ण सहा वर्षांचें बाळ । त्याचेनि भारें लववी मौळ । हें प्रांजळ न बोधे ॥ १७ ॥ वक्ता श्रीशुक याचिसाठीं । हेतु देऊनि सांगे गोठी । आद्य जो कां श्रीजगजेठी । सर्पा मुकुटीं वळघला ॥ १८ ॥ ब्रह्मांडकोटि रोमविवरीं । अखिलैश्वर्यकलाधारी । आद्यपुरुष तो मुरारि । नाचे शिरीं सर्पाचे ॥ १९ ॥ तेजःपुंज अमूल्यमणि –॥ मंडित कालियाचे फणी–॥ वरी नाचतां यदुकुलतरणि । जडला चरणीं मणिरंग ॥ ३२० ॥ फणिमणींची अरुणप्रभा । चरणीं जडली पंकजनाभा । बालार्काच्या अंतरगर्भा । तुळितां शोभा ते न पवे ॥ २१ ॥ म्हणाल फणिमणींचा स्पर्शरंग । श्रीकृष्णचरणींचा सुरंग । अरूप अमल तो अव्यंग । हा चरित्रभाग भक्तांचा ॥ २२ ॥ नामरूपक्रियागुण । भक्तीं लेवविले संपूर्ण । कालियमौळें रंगले चरण । हें कां गौण मानावें ॥ २३ ॥ पूतनास्तनींचें गरल प्याला । काळकूटें त्या काळा झाला । कीं तृणावर्तें गगना नेला । तैंहूनि झाला घनतनु[1] ॥ २४ ॥ क्षुधित मातेच्या वात्सल्यप्रेमें । विह्वळ गोपींच्या सकामकामें । तैशीं रंगविलीं पादपद्में । भुजगोत्तमें निजमौळीं ॥ ३२५ ॥ तालबद्ध फणारंगीं । कैसा नाचे तो शार्ङ्गी । तरळे[2] वदन गरळ[3]आगी । झगटे सर्वांगीं दुःसह ॥ २६ ॥ तेणें झाली तनु सांवळी । फणिमाणिक्यें पादतळीं । अरुणरंगी प्रभा झाली । भक्तीं धरिली जे हृदयीं ॥ २७ ॥ पूर्वीं कमलाकुचकुंकुमें । मर्दितां रंगलीं पादपद्में । एथ कालियाच्या भक्तिप्रेमें । मौळरत्नीं रंगलीं ॥ २८ ॥ म्हणाल फणीचा फणामेळ । क्रोधें विह्वळ अतिचंचळ । त्यावरी सहा वर्षांचा बाळ । केवी सुताल हरि नाचे ॥ २९ ॥ तरी तो अखिलकला-गुरु । ब्रह्मादिकां उपदेष्टारु । जेथूनि वक्तृत्वविचारु । भारतीचा[4] प्रवर्ते ॥ ३३० ॥ तयासि हें अवघड काय । फणिमणीवरी ठेऊनि पाय । करी नाचोनि आनंदमय । लोकत्रय निजसत्ता ॥ ३१ ॥ श्रीप्रभूच्या इच्छामात्रें । तया नृत्याचीं सर्व तंत्रें । वीणामुरंजादि[5] विचित्रें । *आलीं स्वतंत्रें तें ऐका ॥ ३२ ॥

तं नर्तुमुद्यतमवेक्ष्य तदा तदीयगंधर्वसिद्धसुरचारणदेववध्वः ।
प्रीत्या मृदंगपणवानकवाद्यगीतपुष्पोपहारनुतिभिः सहसोपसेदुः ॥ २७ ॥

नृत्याकारणें श्रीकृष्णातें । देखोनि उद्योगवंत तेथें । त्याचे किंकर बोळंगते[6] । आले तेथें तें ऐका ॥ ३३ ॥ जाणोनि रायाचें चेष्टित । घेऊनि उपकरणें तदुचित । उपचारसामग्री समवेत । येती धांवत अनुयायी ॥ ३४ ॥ तैसें जाणोनि हरिचें नटन । हरीचे जे किंकरगण । गंधर्वादि सिद्धचारण । आले धांवोन सवेग ॥ ३३५ ॥ सुरनरकिन्नरपन्नग । वसुसाध्यादित्यप्रमुख । लोकपाळांचें अष्टक । एकेंएक पातले ॥ ३६ ॥ देवांगना लास्यकुशला । सप्तस्वरीं रागमाला ।

पाठभेद :— *जाले ( मुंगी प्रत ).

१ मेघश्याम शरीर. २ चंचल. ३ विषाग्नि. ४ वाणीचा. ५ मृदंग. ६ सेवातत्पर.

गीत संगीतनाट्यकला । धरिती ताला सांवरूनि ॥ ३७ ॥ कृष्णप्रेमें आकर्षिलीं । आत्मप्रियत्वें सप्रेमभुली । कृष्णमोहरीं मोहरलीं । नाचों लागलीं तच्छंदें ॥ ३८ ॥ मृदंग होऊनि पुरंदर[1] । स्वयेंचि होय वादनपर । तालबद्ध घनगंभीर सप्तस्वर वाजवी ॥ ३९ ॥ वल्लकी[2] होऊनि मृडानी[3] । वाजवी स्वयें मधुरध्वनीं । अलौकिक कृष्णनर्तनीं । तालाभ्यसनीं प्रवर्ते ॥ ३४० ॥ डमरुढांकारे डमरेश्वर[4] । लोकपाल सुतालधर । सामस्वनें[5] ब्रह्मकुमार[6] । तार[7]मंद्र[8] विवळिती[9] ॥ ४१ ॥ षड्ज ऋषभ गांधार । मध्यम पंचम धैवत स्वर । निषादादिसारिगमपर । देवकिन्नर आळविती ॥ ४२ ॥ पणव आनक कांसोळें[10] घन । इत्यादि वाद्यें वाद्यप्रवीण । मूर्च्छनाकुशल सुपर्वाण[11] । संगीतज्ञ हरिरंगीं ॥ ४३ ॥ नंदनोद्भवें प्रसूनें भलीं । कुसुमाकरें[12] संसारिलीं[13] । अमरीं सप्रेम आणिलीं । कृष्णपाउलीं अर्पावया ॥ ४४ ॥ आपादमाळा सुमनहार । सुगंध द्रव्यांचे प्रकार । अमृतोमय फलोपाहर । पूजोपचार स्तुति नुति[14] ॥ ३४५ ॥ युक्त इत्यादि उपचारीं । सिद्धचारणगंधर्वसुरीं । येऊनि सेविला श्रीहरी । नाचतां शिरीं सर्पाचे ॥ ४६ ॥ जे कां अपूर्व नृत्यरीति । तेणें मिषें दुर्मदशांति । सर्प पावला उपहति[15] । ते तूं नृपति अवधारीं ॥ ४७ ॥

यद्यच्छिरो न नमतेऽग शतैकशीर्ष्णस्तत्तन्ममर्द खरदंडधरोंऽघ्रिपातैः ।
क्षीणायुषो भ्रमत उल्बणमास्यतोऽसृङ्नस्तो वमन् परमकश्मलमाप नागः ॥ २८ ॥

शतैक फणांचें जुंबाड । ऐसा कालिय मोठें धूड । हरिपदविन्यास पडतां दृढ । झालें अवघड त्यालागीं ॥ ४८ ॥ क्षीण झाली विक्रमशक्ति । प्राणप्रवाहीं विकळ गति । ऐसा क्षीणायु दुर्मति । पुढती पुढती उफाळे ॥ ४९ ॥ अद्यापिही सर्पजाति । मारूनि टाकिल्याही क्षितीं । वायु पिऊनि पुन्हां उठती । वैर चित्तीं स्मरोनी ॥ ३५० ॥ यालागीं मारितां भुजंगम । मौळकुट्टन[16] मुख्य वर्म । हें जाणोनि मेघश्याम । दावी संभ्रम नृत्याचा ॥ ५१ ॥ कालियफणांचें कुट्टन । संगीतसंमत नाट्यनटन । ऐसें अघटित ज्याचें घटन । यास्तव सुरगण ओळंघती[17] ॥ ५२ ॥ भक्त सद्भावें सेविती चरण । तेणें त्यांचें मदापहरण । विमुख दुर्मदें दुर्जन । ते श्रीचरण न भजती ॥ ५३ ॥ त्यांचे उद्धरणीं तत्पर । तो कृष्ण खळदंडधर । निजांघ्रिभजनीं करी तत्पर । पदव्यापारनर्तनें ॥ ५४ ॥ क्रोध दावूनि भीषण[18] । इच्छूनि शिशूचें कल्याण । औषध देतां करी ताडन । तैसें कुट्टन फणांचें ॥ ३५५ ॥ सात्त्विक क्षमस्वी प्रेमळ । राजस विरहें ध्यानशील । तामस द्वेषें पोटीं कुटिळ । तारी गोपाळ विरोधें ॥ ५६ ॥ क्षीणायुषही झालिया सर्प । तरी न सांडी स्वजातिदर्प । एवढा मांडल्या प्राणकल्प[19] । फणा अल्प न नमवी ॥ ५७ ॥ जो जो नम्र नव्हे माथा । त्यावरी नाचे मन्मथजनिता । पादप्रहाराच्या निघाता । वज्रपातासम ओपी ॥ ५८ ॥ नृत्यें[20]च्छळें भुलवी सुरां । पदीं लववी सर्पशिरां । तेव्हां सर्वांगीं भेदरा ।

१ इंद्र. २ वीणा. ३ पार्वती. ४ डमरु धरणारा श्रीशंकर. ५ सामवेदोक्त सूक्तें म्हणण्याच्या स्वरानें. ६ नारद. ७ उच्च. ८ गंभीर. ९ प्रकट करिती. १० कांशाची मोठी झांज. ११ देव. १२ वसंतानें. १३ विस्तारिलीं. १४ स्तुति. १५ दुःख. १६ मस्तक ठेंचणें. १७ सेविती. १८ भयंकर. १९ प्राणांत. २० नृत्याच्या मिषानें.

झाला घाबरा फणिवर्य ॥ ५९ ॥ फणावरी पडतां पादप्रहार । कालिय वदनें वमी रुधिर । नाकीं सुटले रक्तपाझर । दुःख दुर्धर पावला ॥ ३६० ॥ परम वैक्लव्य पावला नाग । अनावर क्रोधोर्मीचा वेग । तेणें पुन्हा उत्तमांग । उचली सवेग झोंबावया ॥ ६१ ॥

तस्याक्षिभिर्गरलमुद्वमतः शिरःसु यद्यत्समुन्नमति निश्वसतो रुषोच्चैः ।
नृत्यन्पदाऽनुनमयन् दमयांबभूव पुष्पैः प्रपूजित इवेह पुमान् पुराणः ॥ २९ ॥

उच्छ्वासोनि रोषावेशें । नेत्रद्वारें वमित विषें । भग्नपराक्रमाचेनि शोषें । ज्वाला मुखें सांडित ॥ ६२ ॥ जीं जीं ऊर्ध्व उभारी मौळें । त्यांच्या ठायीं नर्तनच्छळें । पादप्रहाराच्या सुताळें । वळें गोपाळें नमविलीं ॥ ६३ ॥ निर्ज[2]कारणीं संघ[3]टे मीठ । तेव्हां काठिन्याचा धरी वीट । तैसा विश्वकारण वैकुंठ । करी सपाट फणिदर्प ॥ ६४ ॥ पदीं ठेंचूनि सर्पमुखें । स्वेच्छा नाचतां आदिपुरुषें । तेव्हां सुरगणीं संतोषें । अर्चाविशेषें पूजिला ॥ ३६५ ॥ यमुना पयोब्धि[4]समान । कालियमाथां श्रीभगवान । आदिपुरुष शेषासम । जाणोनि सुरगण तोषले ॥ ६६ ॥ आदिपुरुष शेषावरी । तैसा यशोदातनय हरि । देवीं जाणोनि निजकैवारी । सर्वोपचारीं पूजिला ॥ ६७ ॥ कीं गंधर्वादि निर्जरवरीं । पूजिला पुष्पादि दिव्योपचारीं । वृद्ध पुराण गोपनिकरीं । पुरुषापरी लक्षिला ॥ ६८ ॥ गर्गवाक्याच्या संस्मरणें । आदिपुरुष अंतःकरणें । देखोनि स्वानंदभरित करणें । पूजोपकरणें अर्चिला ॥ ६९ ॥ नाना वाद्यांचे करूनि गजर । पुष्पें वर्षती सुरवर । आपादमाळा दिव्योपहार । सुरीं श्रीधर अर्चिला ॥ ३७० ॥ ऐसा अर्चिलियाचेच परी । प्रसन्न होत्साता श्रीहरि । सर्पदमनें सर्वा परी । होय हितकारी सर्वात्मा ॥ ७१ ॥

तच्चित्रतांडवविरुग्णफणातपत्रो रक्तं मुखैरुरु वमन्नृप भग्नगात्रः ।
स्मृत्वा चराचरगुरुं पुरुषं पुराणं नारायणं तमरणं मनसा जगाम ॥ ३० ॥

थरक चाचरी भँवरी तिरप । खांडवें वोडवें गिरंडी[11] झंपें[12] । विचित्र तांडवाचें रूप । मन्मथबाप दावितां ॥ ७२ ॥ तया चित्रतांडवेंकरून । फणातपत्रें[13] झालीं विशीर्ण[14] । मूर्च्छा पावे जैसें रुग्णें[15] । तैसा क्षीण फणी झाला ॥ ७३ ॥ भग्न झालीं सकळ गात्रें । रुधिरें वमिती अवघीं वक्त्रें । विसंज्ञ[16] पडतां सुकृततंत्रें । स्मरणसूत्रें योजिला ॥ ७४ ॥ योनिसंकटापासूनि सुटे । विसंज्ञ गाढ मूर्च्छा दाटे । सोऽहंस्मरण[18] पूर्वील आटे । कोऽहं[19] उमटे ज्यापरी ॥ ७५ ॥ तैशी हरीच्या पादप्रहारीं । तमोयोनीची दुर्दर्प लहरि । भंगोनि पडिला विकलगात्रीं । मूर्च्छा शरीरीं प्राणांत ॥ ७६ ॥ मूर्च्छेमाजींही

१ मस्तक. २ उत्पत्तिस्थान. ३ एकरूप होते. ४ क्षीरसमुद्र. ५ कंप. ६ पापण्या व बुबुळे हालवीत भुवयांमध्ये पाहणें. ७ गिरकी ( सं. भ्रमरी ) पहा–' एका पुढां भवरी दे ' एकनाथी भागवत. ८ वांकडे होणे, लचकणे. ९ अवरोह. १० एक नृत्यप्रकार. पहा–वोडव तांडवाची कुसरी । लावियली यंत्रकारीं । —कथाकल्पतरु. ११ वळसा. १२ संगीतांतील एक ताल. १३ फणा हींच छत्रें. १४ शक्तिहीन. १५ रोगी. १६ मूर्च्छित. १७ उत्पत्तिस्थानीं गर्भास होणारीं दुःखें. १८ तो मी, म्हणजे मी देहादिक नव्हें, ब्रह्मरूप आहें. १९ मी कोण ?

दैवागळा । म्हणोनि सुकृतें आलीं फळां । तेणें स्मरणाचा जिव्हाळा । उदया आला ते काळीं ॥ ७७ ॥ कीं हरीचा श्रीपादमहिमा । तेणें छेदून रजस्तमा । पात्र करूनि स्मरणधर्मा । पुरुषोत्तमा स्मरविलें ॥ ७८ ॥ जेथूनि जन्म स्थिरजंगमा । चराचरगुरु जो चिदात्मा । तो आठवला भुजंगमा । स्मरणधर्मामाजिवडा ॥ ७९ ॥ स्मरोनि आदिपुरुष पुराण । चराचरगुरु नारायण । कालिय जाता झाला शरण । मनेंकरून ते काळीं ॥ ३८० ॥ नेत्रीं मूर्च्छेची झांपडी । अनुघडी मुद्रा पडिली तोंडीं । वळली देहाची मुरकुंडी । विसंज्ञ तांडीं करणांचीं ॥ ८१ ॥ लिंगदेहीं श्रीभगवान । स्मरोनि जाता झाला शरण । देखोनि येसणें निर्वाण । नागिणीगण घाबिरला ॥ ८२ ॥

कृष्णस्य गर्भजगतोऽतिभरावसन्नं पार्ष्णिप्रहारपरिरुग्णफणातपत्रम् ।
दृष्ट्वाहिमाद्यमुपसेदुरमुष्य पत्न्य आर्ताः श्लथद्वसनभूषणकेशबंधाः ॥ ३१ ॥

ज्याचे उदरीं अवघें जग । त्याचे गैरिष्ठ[३] पार्ष्णिभाग[४] । लागतां सर्पाचें उत्तमांग । झालें सर्वांग विशीर्ण ॥ ८३ ॥ आतपत्रप्राय[५] फणी । वरी नाचतां चक्रपाणि । गुरुतर टांचांच्या कुट्टनीं । प्राण-हानि ओढवली ॥ ८४ ॥ ऐशिया मूर्च्छिता सर्पातें । देखोनि त्याचिया पत्न्या तेथें । आश्रयिती श्रीकृष्णातें । आर्तचित्तें विह्वळा ॥ ३८५ ॥ देखोनि पतीचें निर्वाण । मूर्च्छागत विकलप्राण । तेणें झाल्या कंपायमान । गेली उतरोन तनुपुष्टि[६] ॥ ८६ ॥ वस्त्रें भूषणें झालीं शिथिल । गळालें आंगींचें धैर्यबळ । पुष्पग्रथित होतें मौळ । तेंही केवळ विखुरलें ॥ ८७ ॥ देखोनि पतीची निर्वाण व्यथा । ऐशिया उद्विग्न नागवनिता । आदिपुरुषा श्रीकृष्णनाथा । शरण जात्या जाहल्या ॥ ८८ ॥

तास्तं सुविग्नमनसोऽथ पुरस्कृतार्भाः कायं निधाय भुवि भूतपतिं प्रणेमुः ।
साध्व्यः कृतांजलिपुटाः शमलस्य भर्तुर्मोक्षेप्सवः शरणदं शरणं प्रपन्नाः ॥ ३२ ॥

मग त्या कृष्णातें समस्ता । भर्तृदुःखें व्याकुळचित्ता । शरण रिघाल्या होत्सात्या । नमिती तत्त्वतां तें ऐका ॥ ८९ ॥ सौभाग्यमानससरोजिनी[७] । भर्तृवैक्लव्यवडवाग्नि[८] । तेणें पावतां अहाळणी[९] । विषण्णमानसा[१०] जालिया ॥ ३९० ॥ अकारपूर्वकपतिव्रता[११] । त्या नेणती ऐशी व्यथा । तैशा नव्हती नागवनिता । अतिसंतप्ता वरदुःखें ॥ ९१ ॥ धन्य साध्व्या नागपत्न्या । प्राप्तसंकटीं करिती यत्ना । पुढें करूनि पुत्रकन्या । पतिमोक्षणा प्रवर्तल्या ॥ ९२ ॥ भर्तृदुःखें ज्यां संकट । मुखम्लानता ग्लानि प्रकट । करूनि वंदिती वैकुंठ । अंजलिपुट जोडूनि ॥ ९३ ॥ मूर्च्छा दाटतां शरीरीं । प्रेता ऐसा उदकावरी । कालिय देखोनि सवेग तीरीं । सर्पसुंदरी पातल्या ॥ ९४ ॥ मग भूमीवरी दंडप्राय । नागिणी पसरूनि आपुले काय । नमस्कारिती भूतमय[१२] । भूताश्रय[१३] भूतात्मा ॥ ३९५ ॥ अनाश्रितां[१४]

१ प्रतिक्षणी. २ इतके. ३ अत्यंत जड. ४ टांचा. ५ छत्रांसारख्या. ६ शरीरावरचें तेज. ७ सौभाग्यरूपी मानससरोवरांतील कमलिनी. ८ पतीसंबंधीं दुःख हाच वडवाग्नि. ९ पोळणे, भाजणें. १० खिन्न मन ज्यांचें त्या. ११ अपतिव्रता—व्यभिचारिणी. १२ प्राणिमात्रस्वरूपी. १३ प्राणिमात्रास आश्रयप्रद. १४ निराश्रय.

जो आश्रयप्रद । वंदकां वंद्य शरणां सुखद । दंडप्राय नागिणीवृंद । तो गोविंद अभिवंदिती ॥ ९६ ॥ निसर्गदुर्मती[1]पासून । होआवया पतीचें मोक्षण । दुरात्मयाचें दुष्टाचरण । तें क्षमापन[2] करावया ॥ ९७ ॥ पापमतीस्तव जे जे सर्पें । अपराध केले जे जे दर्पें । ते ते क्षमूनि कंदर्पबापें । पति सुकृपें सोडावा ॥ ९८ ॥ ऐसें इच्छूनि अभ्यंतरीं । श्रीकृष्णातें सर्पनारी । नमित्या झाल्या दंडापरी । यमुनेबाहेरी येऊनी ॥ ९९ ॥ देखोनि सकोप श्रीपति । तत्तोषार्थ प्रथम स्तुति । कृतापराध आपुला पति । नागिणी म्हणती दंडार्ह[3] ॥ ४०० ॥

नागपत्न्य ऊचुः—न्याय्यो हि दंडः कृतकिल्बिषेऽस्मिंस्तवावतारः खलनिग्रहाय ।
रिपोः सुतानामपि तुल्यदृष्टेर्धत्से दमं खलमेवानुशंसन् ॥ ३३ ॥

पक्षिपन्नगादि कित्येक योनि । सहज नैसर्गिक ज्ञानी । पुण्यात्मका या नागिणी । सिद्धयोगिनी निष्पापा ॥ १ ॥ ब्रह्मादिदेवां दुर्लभ हरि । त्या तोषविती स्तवनोत्तरीं । साम पंचविधा कुसरी । सर्पसुंदरी सभाग्या ॥ २ ॥ हरीवरी न ठेवूनि शब्द । साहा श्लोकीं दंडानुमोद[4] । त्यामाजीं साम पंचविध । करूनि विशद बोलती ॥ ३ ॥ तयापुढें श्लोकदशकें । स्तवित्या झाल्या नमनात्मकें । त्यानंतर पांचां श्लोकें । करिती स्वमुखें प्रार्थना ॥ ४ ॥ एवं अवघे एकवीस श्लोक । वदल्या नागिणी सम्यक । तोषवूनि यदुनायक । तिहीं पन्नग सोडविला ॥ ४०५ ॥ दंडानुमोद तेथ प्रथम । पंचलक्षण जें कां साम । तत्पूर्वक पुरुषोत्तम । स्तविती सप्रेम पन्निनी ॥ ६ ॥ संबंधें लाभ आणि उपकृति । चौथी अभेद स्नेहाभिव्यक्ति । पांचवी बोलिजे गुणकीर्ति । साम म्हणती पंचधा ॥ ७ ॥ प्रथम त्यामाजि संबंध । म्हणती कालिय सापराध । दंडा योग्य हा प्रसिद्ध । सहसा विरुद्ध न मानूं ॥ ८ ॥ खलनिग्रहणाचि कारणें । स्वामी तुझें अवतार धरणें । खलक्रियानिसर्गाचरणें । दंडाकारणें योग्य हा ॥ ९ ॥ दंड्य देखोनि दंड न करी । तरी तो कैसा दंडधारी । नैसर्गिक खलाचारी । म्हणोनि श्रीहरि हा दंड्य ॥ ४१० ॥ न्याय्य संबंध दंड्यदंडक । परी तूं परम कारुणिक[6] । खलत्व झाडूनि निष्टंक । सर्वात्मक सुखदानी ॥ ११ ॥ शत्रु अथवा औरस प्रजा । खलत्व दंडूनि गरुडध्वजा । समान ओपिसी निजगुजा । ऐसा तुझा निजमहिमा ॥ १२ ॥ खलत्वाचेंचि प्रशंसन । करिसी करूनियां दंडन । तुल्यदृष्टि हें अभिधान । एरव्हीं जाण तुज साजे ॥ १३ ॥ शत्रुपुत्रां समान पाहणें । खलत्व पाहोनि दंड धरणें । माउलीहूनि स्नेहाळपणें । संरक्षणें कारुण्यें ॥ १४ ॥ तेथ विषम मानिती मूर्ख । खलत्व निरसूनि निःशेष । तुवां ओपिलें परम सुख । जें निर्दोष अक्षय्य ॥ ४१५ ॥

अनुग्रहोऽयं भवतः कृतो हि नो दंडोऽसतां ते खलु कल्मषापहः ।
यद्दंदशूकत्वममुष्य देहिनः क्रोधोऽपि तेऽनुग्रह एव संमतः ॥ ३४ ॥

१ स्वाभाविक दुष्टबुद्धि. २ रागें भरलेल्यास मृदुभाषणादि उपायांनीं क्षमाशील करणें. ३ शिक्षेस पात्र. ४ शिक्षा करण्यास अनुमत. ५ दंड्यदंडकसंबंध. ६ दयाळू.

दंडघ्रदंडकसंबंध कथिला । ना तो केवळ अनुग्रह केला । दैवें दुर्लभ लाभ झाला । क्रोध दाविला कृपेनें ॥ १६ ॥ आतां निग्रह नव्हे हा सहसा । पूर्णानुग्रह श्रीपरेशा । म्हणसी प्राणांत मांडल्या कैसा । निग्रह ऐसा न मनावा ॥ १७ ॥ तरी कां दंड न वटे आम्हां । तें तूं ऐकें मेघश्यामा । सर्पयोनि ते पापात्मा । परी पुण्यात्मा सर्प हा ॥ १८ ॥ दुष्टांलागीं कल्मषनाशा । तूं दंडिसी हृषीकेशा । वरिवरी वाटे क्रोध ऐसा । परी संतोषा प्रापक ॥ १९ ॥ तुवां सर्पासि केला दंड । तेणें झाला दुष्कृतखंड । दंदशूकत्व[1] दिसे उघड । जे जड मूढ तमोयोनि ॥ ४२० ॥ इतुकें मात्र कल्मषमूळ । चरणस्पर्शें तें निर्मळ । करूनि दिधला तोष बहळ । चरणकमलप्राप्तीचा ॥ २१ ॥ ऐसा दुर्लभ लाभ झाला । आम्हां तामसां सर्पकुळां । सुकृतसंग्रह काय याला । पूर्वीं घडला हें न कळे ॥ २२ ॥

तपः सुतप्तं किमनेन पूर्वं निरस्तमानेन च मानदेन ।
धर्मोऽथवा सर्वजनानुकंपया यतो भवांस्तुष्यति सर्वजीवः ॥ ३५ ॥

प्राप्त असतां सर्पदेह । तेथ हा महदनुग्रह । कोण पूर्वपुण्याचा समूह । जेणें पुण्याह[2] उगवला ॥ २३ ॥ तें कालियाचें पूर्वपुण्य । अभिनंदिती प्रशंसून । दुष्करतपोमय गहन । कीं दुजें जाण धर्ममय ॥ २४ ॥ पूर्वीं येणें निरभिमान । होऊनि केलें तपश्चरण । देऊनि सर्वांसि सन्मान । जगजीवन तोषविला ॥ ४२५ ॥ तपश्चरणीं अहंता उठे । तो तें करी मग उफराटें । सुकृत म्हणतां दुष्कृत भेटे । निःशेष आटे सुखलाभ ॥ २६ ॥ होऊनि निरभिमान चित्तीं । मान देऊनि सर्वभूतीं । ऐसी तपश्चर्या जे जे करिती । ते ते होती हरिप्रिय ॥ २७ ॥ तस्मात येणें निरभिमानें । सर्व भूतांच्या सन्मानें । संपादिलीं तपश्चरणें । हरितोषणें सुष्ठुत्वें[3] ॥ २८ ॥ तप्तकृच्छ्रें सांतपनें । विष्णुपंचकें चांद्रायणें । मासोपवासादि अनशनें[4] । जलशीतोष्ण साहोनी ॥ २९ ॥ अथवा धर्मामाजीं परम । अहिंसाधर्म उत्तमोत्तम । सर्वभूतीं आत्माराम । जाणोनि सौम्य वर्तनें ॥ ४३० ॥ भूतमात्रीं सदयपणें । केवीं आचरों शकिजे कोणें । एथें गुंतती शहाणे । विहिताचरणें भ्रमोनी ॥ ३१ ॥ गाईसाठीं कापितां तृण । ब्राह्मणासाठीं कांडितां कण । शुद्ध्यर्थ करितां संमार्जन[5] । सदयपण केविं राहे ॥ ३२ ॥ तरी येथींचें इतुकें वर्म । सांडूनि देहबुद्धीचा भ्रम । सर्वभूतीं आत्माराम । पाहतां सुगम अहिंसा ॥ ३३ ॥ देह नहोनि जें जें करणें । तें तें प्रारब्धें चेष्टणें । घडे केवळ निरभिमानें । सदयपणें सर्वत्र ॥ ३४ ॥ कृपा करूनि सर्वभूतीं । सोडिली तनूची अहंमति । जैसें प्रेपोच्चारीं यति । अभय ओपिती सर्वांतें ॥ ४३५ ॥ देहीं मरोनि ज्याचें जिणें । सर्वभूतीं आत्मपणें । भगवत्प्रेमें जें वर्तणें । तो धर्म म्हणे अहिंसक ॥ ३६ ॥ ऐसा मनोजयें श्रीहरि । तोषविला पैं जन्मांतरीं । तया पुण्याची सामग्री । होती पदरीं गमतसे ॥ ३७ ॥ असो ऐसें सुकृत काये । हें वितर्कें लक्षा नये । परंतु लाभला तुझे पाये । भाग्यें न माये ब्रह्मांडीं ॥ ३८ ॥ ऐशी लाभा करूनि व्यक्ति । यावरी तिसरी उपकृति[6] । नागपत्न्या निरूपिती । तेही श्रोतीं परिसावी ॥ ३९ ॥

१ वारंवार दंश करण्याचा स्वभाव. २ सुदिन. ३ उत्तम रीतीनें. ४ उपवास. ५ झाडसारवण. ६ उपकार.

कस्यानुभावोऽस्य न देव विद्महे तवांघ्रिरेणुस्पर्शाधिकारः ।
यद्वांछया श्रीर्ललनाचरत्तपो विहाय कामान्सुचिरं धृतव्रता ॥ ३६ ॥

नागिणी म्हणती अहो जी देवा । एवढा कवण सुकृतठेवा । आम्ही नेणों याचिया दैवा । कीं या अधिकार व्हावा पदरजीं ॥ ४४० ॥ याचिया कोण्या पुण्यप्रभावें । तवांघ्रिरेणूचें स्पर्शन व्हावें । एवढा अधिकार कोण्या दैवें । हें न चोजवे आम्हांसी ॥ ४१ ॥ तपोदानव्रताचरणीं । नानानियम तीर्थाटनीं । विविधयज्ञपुरश्चरणीं । इत्यादिगुणीं अलभ्य ॥ ४२ ॥ पदरजःस्पर्शाधिकार होय । एवढ्या सुकृताचा समुदाय । गांठीं नसतां भाग्योदय । कैसा काय ययाचा ॥ ४३ ॥ हें अचिंत्य कृपावैभव । तुवां वोपिलें करूनि कींव । तुझा हा उपकारचि अपूर्व । एरवीं देव न पवती ॥ ४४ ॥ हेचि तीं श्लोकीं व्युत्पत्ति । नागपत्न्या वाखाणिती । कीं ब्रह्मादिकां देवांप्रति । दुर्लभ हे प्राप्ति तपादिकीं ॥ ४४५ ॥ असो ब्रह्मादिकांची कथा । वामांगवासें[1] जे सनाथा[2] । ते लक्ष्मीस एवढ्या अर्था । नाहीं सर्वथा पात्रता ॥ ४६ ॥ जयेच्या प्रसादलेशासाठीं । इंद्रादिश्रिया कोट्यानुकोटि । भरती तपांचे संकटीं । परी दुर्लभ भेटी जयेची ॥ ४७ ॥ ते मुख्य लक्ष्मीस आपण । ललितलावण्यें संपन्न । उत्तमलक्षणीं परिपूर्ण । ललना अभिधान या हेतु ॥ ४८ ॥ तेही तवांघ्रिरेणुस्पर्शा । अधिकारसिद्धीची धरूनि आशा । तपादि साधना सक्लेशा । श्री परेशा आचरे ॥ ४९ ॥ सांडूनि सकळ विषयकाम । सुष्ठु वृत्तादि धरूनि नेम । चिरकाळ चिंती श्रीपादपद्म । होऊनि शमदमसंपन्न ॥ ४५० ॥ अद्यापि फलसिद्धीचा समय । ब्रह्मादि अमरांचा समुदाय । ऐसाचि इच्छिती भाग्योदय । परी त्यां न होय अपैतें[3] ॥ ५१ ॥ कमलाप्रमुखां दुर्लभ प्राप्ति । तो भाग्योदय सर्पाप्रति । कोण्या सुकृतें हें तर्कितां चित्तीं । कोणाप्रति न तर्के ॥ ५२ ॥ केवळ तुझा कृतोपकार । एथ न घडो आन विचार । म्हणसी ब्रह्मादि पदें याहूनि थोर । तरी तीं अवेर[4] याहुनी ॥ ५३ ॥

न नाकपृष्ठं न च सार्वभौमं न पारमेष्ठ्यं न रसाधिपत्यम् ।
न योगसिद्धीरपुनर्भवं वा वांछंति यत्पादरजःप्रपन्नाः ॥ ३७ ॥

कां पां ब्रह्मादि पदें गौण । ऐसें स्वामी ह्मणें म्हण । इतुकें ययाचें कारण । जे तव पदप्रपन्न नादरिती ॥ ५४ ॥ जे तव चरणा शरणागत । तव पदध्यानें नित्य तृप्त । ब्रह्मादिपदें ते तुच्छ करित । यां संप्राप्त कां रमती ॥ ४५५ ॥ नाकपृष्ठ म्हणिजे स्वर्ग । जो शतमखसुकृतें[5] पाविजे भोग । असुकृतियां नोहे लाग । येर अयोग्य सामान्य ॥ ५६ ॥ सुरतरसिकां[6] रंभाप्रमुखा । चितारलेया[7] भूमिका । चैत्रनंदनादि वाटिका[8] । जेथींच्या लोकां क्रीडार्थ ॥ ५७ ॥ अनर्घ्य रत्नांचे जेथ आकर[9] । कल्पद्रुमाचे आगर । मन्मथरंगप्रजागर । नाहीं संचार निद्रेचा ॥ ५८ ॥ लोकपाळ यूथपति । मंत्रींद्रष्टा[10] बृहस्पति । वसुरुद्रादित्यपंक्ति । सेनासंपत्ति जेथींची ॥५९॥ सौरभ्य उळिगी[11] कुसुमाकर । चिकित्से[12]

१ श्रीविष्णूच्या डाव्या अंगावर वसति. २ सौभाग्यसंपन्न. ३ आयता. ४ गौण. ५ शंभर यज्ञांच्या पुण्यानें. ६ विषयसुखाचे ज्ञाते. ७ चित्रविचित्र केलेल्या. ८ बागा. ९ खाणी. १० मसलत देणारा. ११ देणारा. १२ रोगाचा प्रतिकार.

अश्विनीकुमार । सामान्य सुरांमाजीं थोर । साध्य पितर विश्वप ॥ ४६० ॥ गंधर्वांचीं तानमानें । किन्नरांचीं मधुरगानें । अप्सरांचीं सुनर्तनें । लास्यरसिकां प्रिय मान्य ॥ ६१ ॥ जेथ सर्वां सुधापान । सर्वां सर्वदा नवयौवन । कोणा न शिवे जरामरण । सिद्धि अंगण झाडिती ॥ ६२ ॥ ऐरावत स्तंबेरम[1] । उच्चैःश्रवा अश्वोत्तम । घरोघरीं कल्पद्रुम । सर्वां साम्य जे लोकीं ॥ ६३ ॥ चंद्रा ऐसे अमृतकुंभ । सूर्यासारिखे सुप्रभ । सर्वां सर्वत्र सुखलाभ । नेणती क्षोभ विषमांचा[2] ॥ ६४ ॥ ऐसें जें कां नाकपृष्ठ । नापेक्षिती हरिपदनिष्ठ । म्हणती एथींचें जें जें इष्ट । तें तें दुष्ट अवघेंची ॥ ४६५ ॥ विपरीत ज्ञानाचा जैं भ्रम । चढतां मद्यरूप जो कां काम । जीवात्मबुद्धीचें धरूनि प्रेम । मानी विश्राम इत्यादि ॥ ६६ ॥ ते तव पदरजःप्रपन्न । जाणती मृगाम्भापरी शून्य । स्वप्नप्रतीति हेळसून । दृढ श्रीचरण आश्रयिती ॥ ६७ ॥ सार्वभौम तो मनुपुत्र । पार्थिवैश्वर्य ज्या स्वतंत्र । सप्तद्वीपांमाजि गोत्रें[3] । संततिमात्र जयाची ॥ ६८ ॥ पादप्रपन्नातें[4] तें न रुचे । आहळे काळाचेनि कांचें । म्हणऊनि प्रेम श्रीचरणाचें । केलें जीवाचें जीवन ॥ ६९ ॥ आतां पारमेष्ठ्याची[6] पदवी । चौदा भुवनां जे नांदवी । स्वजागृति अवघें दावी । ते मावळवी निद्रेतें ॥ ४७० ॥ भरतां युगें अष्ट सहस्र । जेथींचें लोटे अहोरात्र । परी तें अवघें कर्मतंत्र । नाहीं स्वतंत्र स्वानंदें ॥ ७१ ॥ जैशी नदीनदादिजळें । ओघीं धांवती अतिचपळें । त्यांसि स्वतंत्र कैंचें बळ । भरती घननीळ वर्षतां ॥ ७२ ॥ तैसें रजोगुणाचें ज्ञान । तेणें प्रकटे विश्वाभिमान । तें तूं अंतर्यामीं चिद्घन । प्रकाशघन उजळिसी ॥ ७३ ॥ बीजांतूनिच निघे मोड । भुसाकणांचा सरिसा जोड । परी त्या उभयत्र अंपाड । गोडागोड विवरितां ॥ ७४ ॥ तैसे तुझेनि ब्रह्मादिक । पारमेष्ठ्यादि अखिल लोक । जैसें जीवन आणि पंक । ऐक्यविवेक जाणावा ॥ ४७५ ॥ जळ तें सर्वांचें जीवन । चिखल पितां पाविजे मरण । जीवनेंचि आलें चिखलपण । परी तें भिन्न विजातीय ॥ ७६ ॥ यालागीं जें विपरीत ज्ञान । ज्यासि पारमेष्ठ्य हें अभिधान । जेथ ब्रह्मा विश्वाभिमान । विराज होऊन राहिला ॥ ७७ ॥ तव पदरजाचें विस्मरण । तंववरी वाटे हें मंडन । भाग्यें होतां पदप्रपन्न । तेव्हां शून्य अवघें हें ॥ ७८ ॥ ऐशी पारमेष्ठ्याची मात । भोगी भोग कायसे तेथ । ज्याची म्हणिजे रसाधिपत्य । ज्या प्राकृत वांछिती ॥ ७९ ॥ मुळीं स्वप्नचि जरी लटिकें । तेथ जोडलें धन कैं टिके । तरी श्लाघे जें मूर्ख ही ठके । तैशीं अल्पकें तोषती ॥ ४८० ॥ आतां योगसिद्धीचा महिमा । साधूनि योगाच्या संभ्रमा । अंतरोनि आत्मारामा । धरिजे प्रेमा सिद्धीचा ॥ ८१ ॥ सिद्धि प्रकटे योगबळें । त्यां मी अभिन्न हें तों न कळे । भेदें ऐश्वर्य पुंजाळे[9] । भोगी सोहळे संकल्पें ॥ ८२ ॥ लटिका मृगजळाचा पूर । त्यामाजीं जे जे पोहणार । निस्तरोनि पावले पार । तैसे साचार सिद्धादि ॥ ८३ ॥ आतां पुनरावृत्तिवर्जन । अपुनर्भव[10] ज्या म्हणती सुज्ञ । ते नेच्छिती पदप्रपन्न । अलीक[11] जाणोन अवघें हें ॥ ८४ ॥ बागुलाशीं पडेल ठाठी । म्हणोनि बाळा चिंता मोठी । मिथ्या बागुल कळल्या पोटीं । भयाची गोठी मग कैंची ॥ ४८५ ॥

---

१ हत्ती. २ संकटाचा. ३ वंश. ४ पदाला शरण आलेले. ५ भयानें. ६ ब्रह्मदेवत्व. ७ भिन्नता. ८ पृथ्वीपतित्व. ९ विस्तार पावे. १० पुनर्जन्माभाव. ११ मिथ्या.

भवभ्रमासी नाहीं ठाव । तरी कायसा अपुनर्भव । यालागीं प्रपन्नसमुदाव । त्या हे भाव रुचेना ॥ ८६ ॥ पादरजा जे प्रपन्न । ते काय वांछिती ऐसें हीन । ऐसें पदरजोमहिमान । लाहती धन्य सभाग्य ॥ ८७ ॥ ऐशिया नागपत्न्या चतुरा । सामें वर्णूनि हरिउपकारा । आतां श्रेष्ठत्व स्वभर्तारा । अभेदप्रकारा बोलती ॥ ८८ ॥ अभेदें सामींचें लक्षण चौथें । तेंचि यथार्थ वदती एथें । श्रेष्ठत्व आपुल्या नाथातें । पातिव्रत्यें प्रशंसिती ॥ ८९ ॥

तदेष नाथाप दुरापमन्यैस्तमोजनिः क्रोधवशोऽप्यहीशः ।
संसारचक्रे भ्रमतः शरीरिणो यदिच्छतः स्याद्विभवः समक्षः ॥ ३८ ॥

नागिणी म्हणती चक्रपाणि । आमुच्या नाथासमान कोणी । सभाग्य न देखों त्रिभुवनीं । तवांगेंनिवासिविधिसहित ॥ ४९० ॥ अनेक सुकृती देहधारी । भ्रमत होत्साते संसारीं । पदरजःप्राप्तीची सामग्री । अभ्यंतरीं वांछिती ॥ ९१ ॥ ब्रह्मादिकांचीं पदाभिमानें । होऊनि गेलीं मूल्यमानें । लक्ष्मी न लभे चंचलपणें । पदरजोनिधानें भ्रमतांही ॥ ९२ ॥ ऐशी दुर्लभ सर्वांप्रति । पदरजःप्राप्तीची संपत्ति । भाग्यें लाभेल आमुचे हातीं । म्हणोनि वांछिती सर्वदा ॥ ९३ ॥ ते हे एथ न प्रार्थितां । प्राप्त झाली आमुच्या कांता । लक्ष्मीशिवादि विधाता । असाम्य तुळितां येणेंशीं ॥ ९४ ॥ तमोयोनि सर्पशरीर । दीर्घद्वेषी अमर्षपर । विवेकासी कैंचा थार । न वसे विचार शांतीचा ॥ ४९५ ॥ ऐशिया आणि एवढी प्राप्ति । म्हणसी झाली कोणे रीती । तरी हे स्वामीची अपरमूर्ति । अभेदस्थिति उभयत्र ॥ ९६ ॥ डावे हातींचें उजवे हातीं । घेतां साधनें कोणाप्रति । तुमची एकात्मतेची स्थिति । तैशी चित्तीं जाणतसों ॥ ९७ ॥ मत्स्यकूर्मादि अवतार । जैसे अद्यापि असती स्थिर । तैसा हाही सर्पशरीर । परी साचार तव मूर्ति ॥ ९८ ॥ आमुचा भर्ता कालिय फणी । त्याचे मुकुटीं तूं इंद्रमणि । तरळसी तेणें समस्तमूर्ध्नि । अमूल्यभूषणभूषित ॥ ९९ ॥ अमूल्यभूषण ज्याचे मुकुटीं । त्याच्या भाग्या नोहे कीं ठी । ऐशीं रत्नें ज्याचे गांठीं । वरिष्ठ सृष्टीं तो धन्य ॥ ५०० ॥ लक्ष्मी विधाता विधुभर्ण । ज्या रत्नाचें सन्निधान । न पवती ते ज्या मौळाभरण । त्या ते धन्य म्हणती कीं ॥ १ ॥ प्रभूहूनिही आमुचा कांत । वरिष्ठ ऐसें जाणे चित्त । अशुक्रभूषण मौळिधृत । म्हणोनि सेवित सुरसिद्ध ॥ २ ॥ सभाग्य रत्न कीं रत्नवंत । ऐसें जाणती विपश्चित । याचे भूषणीं तूं अनंत । तरी हा समर्थ तुजहूनी ॥ ३ ॥ सामींचें अभेदलक्षण । प्रतिपादूनि नागिणीगण । पातिव्रत्यें वरिष्ठपण । वदल्या संपूर्ण निजनाथा ॥ ४ ॥ खुपों नेदितां अंतरा । श्रेष्ठत्व दाविलें भर्तारा । पतिव्रता नागिणी चतुरा । जाणोनि श्रीधरा संतोष ॥ ५०५ ॥ पतिव्रता कां उपासक । सद्गुरुभजनीं शिष्यतिलक । यांवीण उत्कर्षविवेक । येर मायिक नेणती ॥ ६ ॥ नागिणी म्हणती चक्रपाणि । तुझी मूर्ति हे लावण्यखाणी ।

१ ऐक्य. २ तुझ्या शरिरावर राहणाऱ्या ब्रह्मदेवासह. ३ पुण्यवान्. ४ ठेवा. ५ क्रोधाधीन. ६ दुसरी. ७ नृत्य करिसी. ८ चंद्रचूड शंकर. ९ नीलमणि. १० पंडित. ११ शिष्योत्तम.

षड्वार्षिकी मौळाभरणीं । नाथालागूनि आमुच्या ॥ ७ ॥ शतशः फणा विस्तीर्ण थोर । लंबायमान विशाळ गात्र । मौळ रत्न तूं कमलामित्र । शोभा विचित्र उरगाची ॥ ८ ॥ ऐसा मौळमणीशीं मंडित । जे जे ध्याती आमुचा कांत । त्यांसि न बाधी अकालमृत्यु । हा इत्यर्थ एथींचा ॥ ९ ॥ मौळमणि चक्रपाणि । नटनें तरळे फणारंगणीं । ऐसा ध्याती कालियफणी । त्यांलागूनि विधि वंदी ॥ ५१० ॥ आतां पांचवें सामलक्षण । तें वर्णिती गुणकीर्तन । स्वनाथेंशीं प्रभु अभिन्न । स्तवनीं भावून वंदिती ॥ ११ ॥

नमस्तुभ्यं भगवते पुरुषाय महात्मने । भूतावासाय भूताय पराय परमात्मने ॥ ३९ ॥

तुभ्यं नमः श्रीभगवते । भगवच्छब्दें ऐश्वर्यवंतातें । अचिंत्यगुणपरिपूर्णातें । हेतुसंकेतें वंदिती ॥ १२ ॥ नमो भगवंता तुजकारणें । भगवत्पदेंचीं विशेषणें । दाहा श्लोकीं वाखाणणें । निरूपण विशदार्थ ॥ १३ ॥ अचिंत्य अनंत ऐश्वर्यवंत । आदिपुरुष तोचि तूं एथ । तुजकारणें प्रणिपात । शरणागत करितसों ॥ १४ ॥ अंतर्यामिरूपेंकरून । पुर्यष्टकीं वर्तमान । तो तूं आदिपुरुष भगवान । तुजकारणें नमीतसों ॥ ५१५ ॥ पूर्यष्टकाअंतर्यामी । असोनि अपरिच्छिन्न तूं स्वामी । यालागीं महात्मने या नामीं । पादपद्मीं लागतसों ॥ १६ ॥ आकाशप्रमुख महाभूतें । संतत निवास तुजमाजीं यांतें । भूतावासाय म्हणोनि तूंतें । येणेंकारणें वंदितसों ॥ १७ ॥ जो तूं भूतां आश्रयस्थान । यास्तव भूतीं अपरिच्छिन्न । भूताय हें विशेषण । अर्थ गहन प्रतिपादी ॥ १८ ॥ भूतांपूर्वींच आहेसी । काय प्रमाण एथ म्हणसी । पराय विशेषणें हृषीकेशी । तूं विश्वासी कारण ॥ १९ ॥ म्हणसी कारण मूळप्रकृति । कारणातीत तूं विश्वपति । परमात्मने या विशेषणोक्ती । आम्ही तुजप्रति वंदितसों ॥ ५२० ॥ कारण आणि कारणातीत । दोहीं विशेषणांचा अर्थ । विशद वाखाणूनि नमित । गण समस्त नागिणींचा ॥ २१ ॥

ज्ञानविज्ञाननिधये ब्रह्मणेऽनंतशक्तये । अगुणायाविकाराय नमस्ते प्राकृताय च ॥ ४० ॥

ज्ञानविज्ञाननिधि तूं देवा । ब्रह्म अनंतशक्तिवास्तवा । अगुणा अविकारा वासुदेवा । प्रकृतिसद्भावा तुज नमो ॥ २२ ॥ ज्ञान म्हणजे ज्ञप्तिमात्र । विज्ञान चिच्छक्ति चिन्मात्र । या दोहिंकरूनि पूर्णतर । निधि स्वतंत्र तूं यांचा ॥ २३ ॥ दोहींची मी साठवण । दोंहूनि तिसरा म्हणसी भिन्न । तरी अनंतशक्ति ब्रह्म निर्गुण । तें अधिष्ठान तूं स्वामी ॥ २४ ॥ ब्रह्म म्हणिजे किंलक्षणीं । अगुणअविकारविशेषणीं । विशिष्ट तो तूं चक्रपाणि । जाणोनि मनीं नमीतसों ॥ ५२५ ॥ अनंतशक्ति तो तूं कैसा । प्रकृतिप्रवर्तका जी ईशा । अथवा नेणसी प्रकृतिलेशा । श्रीपरेशा अभिन्ना ॥ २६ ॥ अचिंत्यानंतशक्तिमंत । तूं अखंड अप्राकृत । अप्राकृतीं कें गुणांची मात । अगुण निश्चित याहेतू ॥ २७ ॥

---

१ लक्ष्मीवल्लभ. २ सर्पाची. ३ शिरोरत्न. ४ जीवात्मरूपेंकरून. ५ अष्टपुरींमध्यें. ६ बुद्धि व आत्मशक्ति यांनीं परिपूर्ण. ७ प्रकृति-ईश्वरी माया, तींत असणारा. ८ कोणत्या लक्षणाचे. ९ प्रकृतीस उद्युक्त करणारा. १० सर्वशक्तिसंपन्न. ११ मायेच्या ठिकाणीं न झालेला.

जेथ गुणांची वार्ता नाहीं । तेथ विकार कैंचे कांहीं । प्राणेंवीण नुमटे देहीं । जेंवि इंद्रियीं चळवळ ॥ २८ ॥ निद्रा स्वप्न ना जागणें । ना तूं वेंठसी साक्षीपणें । कर्तृचेष्टा ज्ञानकरणें । अवलंबणें तुज नाहीं ॥ २९ ॥ नसतां दृश्य विषयभुली । क्रियाकरणा कैंची चाली । यालागीं विकारांची बोली । मिथ्या समूळीं तुजमाजीं ॥ ५३० ॥ तस्माद्‌ब्रह्म ज्ञप्तिमात्र । कारणातीत जें स्वतंत्र । तें तूं अविनाश शुद्ध सन्मात्र । कारणप्रकार तो ऐक ॥ ३१ ॥ अनंतशक्तिप्रद्योतक । तो तूं प्रवृत्तिप्रवर्तक । ज्ञानविज्ञानप्रकाशक । तो तूं निष्टंक ईश्वर ॥ ३२ ॥ ब्रह्मत्वें तूं अकारण । ईश्वरत्वें जगत्कारण । उभयात्मका तुज नमन । अचिंत्यगुणपरिपूर्णा ॥ ३३ ॥ अनंत अचिंत्य गुणैकशक्ति । यालागीं काळशक्तिरूपें व्यक्ति । विशद करूनि अभिवंदिती । नागयुवती तें ऐका ॥ ३४ ॥

कालाय कालनाभाय कालावयवसाक्षिणे । विश्वाय तदुपद्रष्ट्रे तत्कर्त्रे विश्वहेतवे ॥ ४१ ॥

ऊर्णनाभितंतुप्रमाण[2] । सूर्यरथाचें होतां चलन । इतुकें सूक्ष्म कालमान । तें स्वरूप जाण काळाचें ॥ ५३५ ॥ ईश्वरादि प्रकृत्यंत । कालविस्तार हा समस्त । कालाय म्हणोनि दंडवत । करिती तेथ नागपत्न्या ॥ ३६ ॥ काळशक्तीसि तूं आश्रय । त्या तुज नमो कालनाभाय । विश्वोद्भवस्थिति-प्रलय[3] । हा अवयवसमुच्चय काळाचा ॥ ३७ ॥ त्या काळाचा अवयवसाक्षी । अंतर्बाह्य उभय पक्षीं । तुज लक्षूनि ज्ञानचक्षीं । विश्वाध्यक्षीं समरसों ॥ ३८ ॥ इतुके[4] काळाचे अवयव । चिदात्मक तूं वासुदेव । त्या तुजकारणें स्वयमेव । नमूं सद्भावपूर्वक ॥ ३९ ॥ कालावयवांचें जें रूप । तेंचि विश्वाचें स्वरूप । त्या तुजकारणें भेदलोप । करूनि सद्रूप नमीतसों ॥ ५४० ॥ म्हणसी जड हें विश्वपटल । त्याचा द्रष्टा तूं केवळ । तुझेनि भासें विश्व सकळ । तूं निर्मळ विश्वात्मा ॥ ४१ ॥ यास्तव विश्वाचा तूं कर्ता । तूंचि उपादान तत्त्वतां । कारकें[5]रूपें नागवनिता । नमिती अनंता तें ऐक ॥ ४२ ॥

भूतमात्रेंद्रियप्राणमनोबुद्ध्याशयात्मने । त्रिगुणेनाभिमानेन गूढस्वात्मानुभूतये ॥ ४२ ॥

दृश्य तितुकें कार्य जाण । भूतें दृश्याचें कारण । भूतयोनि तन्मात्रै[6]गण । तमोगुण हा अवघा ॥ ४३ ॥ तन्मात्रग्राहक इंद्रियें । तत्कारणें म्हणिजती इयें । तीं चळती प्राणसमुच्चयें । म्हणोनि कारण होय प्राणगण ॥ ४४ ॥ मन संकल्पीं प्रवर्तमान । तेणें प्राणांसि चळणवळण । यालागीं प्राणांचें कारण । म्हणती सर्वज्ञ मनासी ॥ ५४५ ॥ मन संकल्प विकल्प करी । तेणें पडे संशयपुरीं । निश्चयाचिये पैलपारीं । बुद्धि झडकरी काढी त्या ॥ ४६ ॥ यालागीं मनाचें कारण । बुद्धि म्हणती विचक्षण । आशयशब्दें अंतःकरण । चित्ताभिमानसमवेत ॥ ४७ ॥ कर्मज्ञानचेष्टाकरणें । अधिष्ठिलीं रजोगुणें । आशयरूपें कर्तृकरणें । सत्त्वगुणें अभियुक्त ॥ ४८ ॥ अभिमान म्हणिजे त्रिगुणात्मक । तामस राजस आणि सात्त्विक । प्रळयोत्पत्तिस्थिति देख । हे अवयव सम्यक् काळाचे ॥ ४९ ॥

---

१ व्यापिसी. २ कोळ्याच्या तंतूएवढें. ३ विश्वाची उत्पत्ति, स्थिति, प्रलय, ५४९ वी ओवी पहा. ४ प्रकारानें. ५ कर्तृरूप. ६ दृश्यगण.

यांहीं करूनि स्वात्मा[1]नुभूति । त्रिगुणाभिमानें गूढ म्हणती । स्वांशभू[2]तांची ज्ञानशक्ति । लोपी त्या तुजप्रति नमीतसों ॥ ५५० ॥ म्हणसी अहंकारा[3]वाच्छिन्न । होऊनि आवरीं निजात्मज्ञान । तैं मी झालों परिच्छिन्न[4] । ऐसें न म्हण जगदीशा ॥ ५१ ॥

नमोऽनंताय सूक्ष्माय कूटस्थाय विपश्चिते । नानावादानुरोधाय वाच्यवाचकशक्तये ॥ ४३ ॥

जितुकें अहंकारें आवरिलें । तें परिच्छिन्नत्व पावलें । व्यष्टिसमष्टिनामाथिलें । पिंडब्रह्मांड जीवशिव पैं ॥ ५२ ॥ तूं अपरिच्छिन्न अनंत । अहंप्रत्यय[5]विवर्जित । अदृश्यपणें सर्वगत । सर्वातीत सूक्ष्मत्वें ॥ ५३ ॥ म्हणोनि कूटस्थ[6]विशेषण । उपाधिकृतविकारविहीन । अतएव विपाश्चित[7] सर्वज्ञ । ब्रह्म निर्गुण स्वतःसिद्ध ॥ ५४ ॥ तुजकारणें नमो म्हणती । मौळें भूमीतें स्पर्शिती । ऐशी करूनि वास्तव स्तुति । यावरी स्तविती ऐश्वर्य ॥ ५५५ ॥ अचिंत्यमायाऐश्वर्यबळ । संपन्न तूंचि तो गोपाळ । म्हणोनि नागिणींचा मेळ । करी रोळ स्तवनाचा ॥ ५६ ॥ नानावादानुरोधक । तो तूं वादा[8]त्मा अभिन्न एक । अस्ति नास्ति एकानेक । प्रतिपादक सर्वांचा ॥ ५७ ॥ अल्पज्ञ सर्वज्ञ बद्ध मुक्त । गूढ मूढ व्यक्ताव्यक्त । सर्वां सर्वत्र संमत । शक्तिमंत ऐश्वर्यें ॥ ५८ ॥ आणि वाच्यवा[9]चकशक्ति । यांची ऐशी ऐका व्यक्ति । अभिधा[10] अभिधेय[11] पदार्थ होती । अभिन्नगति परस्परें ॥ ५९ ॥ शर्करा अभिधा वर्णत्रयें[12] । पदार्थ मिष्ट जिह्वाविषय । अनेकपदार्थसमुच्चय । अभिधा अभिधेय अभेदें ॥५६०॥ ऐसा वाच्यवाचकशब्दरूप । विश्वात्मक तूं प्रकाशदीप । जाणोनि आत्मत्वें समीप । नमूं सकृप सद्भावें ॥ ६१ ॥ अनेक हेतुविशेषणीं[13] । अनावृ[14]तत्व प्रतिपादुनी । स्तवनें संतुष्ट चक्रपाणि । करिती नागिणी अतिचतुरा ॥ ६२ ॥

नमः प्रमाणमूलाय कवये शास्त्रयोनये । प्रवृत्ताय निवृत्ताय निगमाय नमो नमः ॥ ४४ ॥

प्रमाशब्दें बोलिजे ज्ञान । प्रमाणें इंद्रियां अभिधान । प्रमेय तन्मात्रां[15]चा गण । त्रिपुटी जाण हे ऐशी ॥ ६३ ॥ प्रमातृशब्दें बोलिजे जीव । प्रमाणद्वारा प्रमेयीं धांव । प्रमा पसरूनि केली माव । उभारी भव जो ऐसा ॥ ६४ ॥ म्हणोनि प्रमाणांचें मूळ । वास्तव प्रमा तूं केवळ । तुझेनि बुद्ध्यादि प्रांजळ । होती कुशल प्रमातृकें ॥ ५६५ ॥ तरी बुद्ध्या मीचि म्हणिसी । ऐसें नव्हे जी हृषीकेशी । अभ्यस्तज्ञान बुद्ध्यादिकांसी । अनभ्यासीं मूढत्व ॥ ६६ ॥ कवि म्हणजे तूं सर्वज्ञ । कैंची कविता शास्त्राविण । जैं शास्त्रांचें कीजे पठन । तैं सर्वज्ञ कवि होय ॥ ६७ ॥ यालागीं शास्त्र[16]योनि तूं देवा । प्रसवोनि शास्त्रांचा मेळावा । ब्रह्मादिकांसि केला ठावा । तेथूनि आघवा विधिमा[17]र्ग ॥ ६८ ॥ अविद्याभ्रमें भ्रमले प्राणी । त्यांसि प्रवृ[18]त्तिप्रबोधनीं । प्रवर्तलासि चक्रपाणि । प्रवृत्त म्हणोनि तुज

१ आत्मज्ञान. २ जीवांची. ३ अहंकारानें मर्यादित. ४ परिमित. ५ अभिमानरहित. ६ विकाररहित व सर्वकालव्यापी असा. ७ पंडित. ८ आहे, नाहीं, एक, अनेक, अल्पज्ञाता, सर्वज्ञाता, बद्ध, मुक्त, गूढ, मूढ, व्यक्त, अव्यक्त, एतद्रूपवादांस अनुकूल. ९ वस्तु आणि तिचें नांव यांची शक्ति. १० नांव. ११ वस्तु. १२ तीन अक्षरें. १३ साभिप्राय विशेषणें. १४ आवरणरहित. १५ इंद्रियग्राह्य वस्तूंचा. १६ शास्त्रांचें उत्पत्तिस्थान. १७ कर्ममार्ग. १८ लोकव्यवहाराविषयीं उद्युक्तता.

नमो ॥ ६९ ॥ करूनि वैराग्यसंपन्न । प्रवृत्तीपासूनि सोडवून । निवृत्त करिसी स्वात्मशरण । त्या निवृत्ता तुज नमो ॥ ५७० ॥ पूर्वोत्तर ज्या मीमांसा । आल्या तयाच्या गर्भवासा । निगमरूपा[1] श्रीपरेशा । तुज कारणें नमीतसों ॥ ७१ ॥

नमः कृष्णाय रामाय वसुदेवसुताय च । प्रद्युम्नायानिरुद्धाय सात्वता पतये नमः ॥ ४५ ॥

ऐसें करूनियां स्तवन । ऐश्वर्योत्कर्षाचें कथन । अनावृतत्वें नागिणीगण । करिती वर्णन व्यूहरूपें ॥ ७२ ॥ संकर्षण वासुदेव । प्रद्युम्न अनिरुद्ध स्वयमेव । चारी मिळूनि एक व्यूह । हें जाणती तत्त्व उपासक ॥ ७३ ॥ चतुर्विध भजनरीति । यथाधिकारें उपासक भजती । पर व्यूह विभवार्चा म्हणती । ते व्युत्पत्ति अवधारा ॥ ७४ ॥ कृष्ण परब्रह्म जाणोन । पूर्णोत्कर्षें ज्याचें भजन । त्या नांव पर उपासन । कैवल्यनिर्वाणप्रापक ॥ ५७५ ॥ वासुदेव संकर्षण । प्रद्युम्न अनिरुद्ध चारी मिळून । चतुरात्मक श्रीकृष्णध्यान व्यूहोपासन या नांव ॥ ७६ ॥ मत्स्यकूर्मादि अवतारपंक्ति । जाणोनि श्रीकृष्णाची मूर्ति । जे उपासक उपासिती । विभव म्हणिजती ते उपासक ॥ ७७ ॥ स्वर्णादि मृत्पाषाण । विष्णुप्रतिमा करूनि जाण । जे जे करिती कृष्णभजन । अर्चोपासन[2] तें म्हणिजे ॥ ७८ ॥ पांचरात्र वैष्णवागमीं । गौतमी तंत्रादि विष्णु धर्मी । यांची व्याख्या पृथग्नियमीं । असे वाग्मिविस्तृत[3] ॥ ७९ ॥ कृष्ण केवळ परब्रह्म । नागिणी वानिती* जाणोनि वर्म । व्यूहरूपें पूर्णकाम[4] । मेघश्याम वंदिती ॥ ५८० ॥ राम म्हणिजे संकर्षण । अनंतरूपी श्रीभगवान । जो कां अखंडदंडायमान । काळ म्हणोन बोलती ॥ ८१ ॥ शुद्धसत्त्व तो वसुदेव । तेथ प्रकाश जो वास्तव । तो बोलिजे वासुदेव । भूतसमूह जो वसवी ॥ ८२ ॥ धर्मा अविरुद्ध जो कां काम । सुखप्रापक नासोनि श्रम । प्रद्युम्न ऐसें ज्याचें नाम । भज्य[5] आश्रयमात्रा† जो ॥ ८३ ॥ विधि अविधि नेणतां प्राणी । सद्भाव जाणे अंतःकरणीं । विरोधिला न वचे कोणीं । श्रुतिपुराणीं विधिवाक्यें ॥ ८४ ॥ तेणें सद्भावें भक्तपति । प्राप्त होय भक्तांप्रति । अनिरुद्ध ऐसिया संकेतीं । तयाप्रति बोलिजे ॥५८५॥ सालोक्यादि चारी मुक्ति । वोपी उपासकांचिया हातीं । तो श्रीकृष्ण जगत्पति । चतुर्मूर्ति एकात्मा ॥८६॥ नागिणी विवरूनि ऐशिया रीती । तुजकारणें नमो म्हणती । पुन्हा चतुर्धा वर्णिती । अभेदस्थिति ते ऐका ॥ ८७ ॥

नमो गुणप्रदीपाय गुणात्मच्छादनाय च । गुणवृत्त्युपलक्ष्याय गुणद्रष्ट्रे स्वसंविदे ॥ ४६ ॥

ते चतुर्धा भेद कैसे । गुणप्रकाशती ज्या प्रकाशें । चित्तचतुष्टय[6] भेदवशें । वृत्तिविशेषें[7] विभाग ॥ ८८ ॥ अंतःकरणचतुष्टय । गुण ऐसें या नामधेय । यां उजळिसी दीपप्राय । त्या तुझे

---

**पाठभेद :—** * नमिती ( मुंगीप्रत ) † आश्रम मात्रा ( मुंगीप्रत )

१ वेदस्वरूपा. २ प्रतिमापूजन. ३ पंडितांनीं विस्तृत केलेली. ४ नित्यतृप्त. ५ सेव्य. ६ मन, बुद्धि, चित्त, अहंकार. ७ स्थितिविशेष.

पाय वंदितसों ॥ ८९ ॥ म्हणसी आत्मा मी एकला । कैसा चतुर्धा विभागिला । भक्तप्रेमासि भाळला । तेणें झाला बहुविध ॥ ५९० ॥ भक्तआवडिच्या कार्या । विचित्र फळें अर्पावया । जाणोनि भक्तमनोदया । आपणया आच्छादिसी ॥ ९१ ॥ गुणीं करितां आच्छादन । तैं मग मजला जाणे कोण । तरी वृत्तिरूपें[1] प्रतीयमान[2] । त्या तुजवीण कोण झांकील ॥ ९२ ॥ मनीं संकल्पाचें स्फुरण । तें तुजवीण करी कोण । बुद्धीसि निश्चयाचें बोधन । तें तुजविण कोणाचें ॥ ९३ ॥ चित्तीं अनुसंधान[3]शक्ति । तुजवीण कोणाची प्रवृत्ति । साभिमानें अहंवृत्ति । कैंची श्रीपति तुजवीण ॥ ९४ ॥ चंद्र विधाता नारायण । विष्णु अथवा गौरीरमण । इत्यादि शक्ति गणेश पूर्ण । होसी संपूर्ण सप्रेमें ॥ ५९५ ॥ वृत्तिज्ञानें जीवमात्र । म्हणसी तैसा मी वृत्तितंत्र[4] । तूं स्वसंवेद्य[5] स्वतंत्र । अगोचर गुणद्रष्टा ॥ ९६ ॥ द्रष्टा सर्वघटीं तूं एक । गुणवृत्तीचा प्रकाशक । नमो तुजकारणें सम्यक । म्हणती पन्नगकामिनी ॥ ९७ ॥ आतां कैसें अगोचरपण । आणि कैसा उपलक्ष्य[6]माण । करूनि द्विधा उपपादन । करिती नमन तें ऐका ॥ ९८ ॥

अव्याकृतविहाराय सर्वव्याकृतसिद्धये । हृषीकेश नमस्तेऽस्तु मुनये मौनशीलिने ॥ ४७ ॥

अव्यक्तीं प्रपंच सामाये । तेव्हां विहार कैंचा काय । अतर्क्य महिमा तर्का नये । अगोचराय तुज नमो ॥ ९९ ॥ साक्षी पृथक्त्वें उरावें । तेव्हां अतर्क्य तर्कू जावें । तें तुजमाजी अभिन्न व्हावें । लीन आघवें साक्षित्वें ॥ ६०० ॥ जागृति सांठवे सुषुप्तिपोटीं । पृथक्स्मृतीची निरसे गोठी । आत्मशून्यतापरिपाटीं । अतर्क्य सृष्टि *आतर्क्य ॥ १ ॥ पुन्हां तेथूनि विकारसिद्धि । अंतःकरणादि मनोबुद्धि । प्रकटावया यथाविधि । समर्थ त्रिशुद्धि तूं होसी ॥ २ ॥ यालागीं नामें हृषीकेश । सर्व करणीं चित्प्रकाश । चोजवूनि विषयाभास । दृश्य अशेष रुढाविसी ॥ ३ ॥ म्हणोनि सर्वव्याकृ[7]तसिद्धा । तुज नमो जी परमानंदा । इंद्रियें रमती विषयानंदा । तूं गोविंदा अगोचर ॥ ४ ॥ म्हणसी मी जरी हृषीके[8]श । इंद्रियद्वारा विषयाभास- । सेवनें[9]जनित पावें तोष । तरी तूं परेश स्वाराम ॥ ६०५ ॥ यालागीं मु[10]नि हें अभिधान । †मौनें[11]शीली मनन । अविस्मृतत्वें मनोन्मन । स्वानंदघन स्वारा[12]मे ॥ ६ ॥

परावरगतिज्ञाय सर्वाध्यक्षाय ते नमः । अविश्वाय च विश्वाय तद्द्रष्ट्रेऽस्य च हेतवे ॥ ४८ ॥

त्या स्वात्मप्रत्ययस्वभावा । तुजकारणें नमो देवा । कैसा म्हणसी तरी परिसावा । श्लोक आघवा यदर्थीं ॥ ७ ॥ परावरगति जाणता । स्थूळसूक्ष्मांचा गतिवेत्ता । परंतु कोठें सज्ज न होतां । एकात्मता न मोडे ॥ ८ ॥ म्हणसी सर्वाध्यक्षता कैसी घडे । तरी सर्वाधिष्ठान तूंचि उघडें । अविश्वाय

**पाठभेदः**— * अस्तिक्य ( उमरखेडप्रत ). † मौनशाली निजात्ममनन ( पैठणप्रत ).

१ कार्यरूपानें. २ अनुभवास येणारा. ३ ध्यान. ४ कर्माधीन. ५ स्वानुभवगम्य. ६ अनुमानानें जाणावयाजोगा. ७ चित्तचतुष्टयास प्रकाशित करून दृश्याभास करणारा. ८ इंद्रियांचा नियामक. ९ विषयसेवनापासून झालेलें. १० वाणी स्वाधीन ठेवणारा. ११ मौन धरण्याचा स्वभाव ज्याचा तो. १२ आत्मानंदनिमग्न.

म्हणतां निवडे । अभेद रोकडें चिद्रूप ॥ ९ ॥ विश्व तुजमाजि साच असतें । तरी स्वरूपा वेगळें पृथग् दिसतें । रज्जु घेतां सर्पत्व तेथें । नोहे अपैतें नाथिलें ॥ ६१० ॥ सूर्य मावळल्या मृगजळ । डोहीं उठते जरी कल्लोळ । तरी स्वरूपाहून वेगळ । ब्रह्मांडगोळ उरता कीं ॥ ११ ॥ विश्वविवर्ता अधिष्ठान । तुजवांचूनि वेगळें कोण । यालागीं विश्वाचें कारण । विश्वाय म्हणोन नमीतसों ॥ १२ ॥ अध्यारोप[1] आणि अपवाद[2] । उभयसाक्षी परमानंद । तद्द्रष्टा या पदें विशद । द्रष्टा गोविंद नमीतसों ॥ १३ ॥ आणि या विश्वाचा अध्यास । अविद्याभ्रमें भासे विशेष । स्वरूपदृष्टीं विद्या-प्रकाश । करी निरास अपवादें ॥ १४ ॥ विद्याअविद्यांचें कारण । पूर्णब्रह्म सनातन । त्या तुजकारणें नमन । अनन्य शरण सद्भावें ॥ ६१५ ॥ अथवा अविश्वायपदाची व्याख्या । विश्वतैजसप्राज्ञप्रमुखाऽ-[3] । वस्थारहित चिदात्मका । तुजकारणें नमोनमो ॥ १६ ॥ पुन्हा प्रत्यगादि विश्वपर्यंत । अवस्थाभिमान स्वांशभूत । मायायोगें प्रकटीकृत । विश्व म्हणिजे तयाहेतु ॥ १७ ॥ त्या अवस्थांचे भावाभाव । त्यांचा साक्षी तूं स्वयमेव । द्रष्टा म्हणोनि वासुदेव । नमूं केशव तो आम्ही ॥ १८ ॥ सर्वगतींचा जाणता । तूं सर्वांचा अधिष्ठाता । आत्माराम चिदात्मसत्ता । निरतिशयऐश्वर्या ॥ १९ ॥ पंचावन्न विशेषणीं । अचिंत्यैश्वर्य चक्रपाणि । स्तवितां प्रशस्त नागिणी । प्रेम जाणोनि तोपला ॥ ६२० ॥ भर्तारासि केला दंड । युक्त म्हणोनि मानिती गोड । अनुमोदनें स्तवनें कोड । वदलें तोंड उरँगींचें[4] ॥ २१ ॥ *जातां जाणोनि प्रसन्न हरि । प्राणी परतंत्र संसारीं । काय अपराध त्यांचे शिरीं । म्हणोनि चतुरी विनविती ॥ २२ ॥

त्वं ह्यस्य जन्मस्थितिसंयमान् प्रभो गुणैरनीहोऽकृत कालशक्तिधृक् ।
तत्तत्स्वभावान् प्रतिबोधयन् स्वतः समीक्षयाऽ मोघविहार ईहसे ॥ ४९ ॥

या लोकांची जन्मस्थिति । आणि तैशीच परिसमाप्ति । कर्ता तूं एक जगत्पति । पृथक् शक्ति यां कैंची ॥ २३ ॥ त्या त्या योनिविशेपभेदा । कृत सौम्यादि विरुद्धा । संस्काररूपें लाविसी धंदा । भाव विविधा जागवूनी ॥ २४ ॥ अथवा जन्मस्थित्यादि श्रेष्ठा । चेष्टविसी तूं परमश्रेष्ठा । अनादिकाल-शक्तीची प्रतिष्ठा । स्वांगीं निष्ठा जागवूनी ॥ ६२५ ॥ चेष्टारहित तूं मायागुणें । कां शक्तिप्रवर्तमानें । अमोघ विहार चेष्टा करणें । हें तुजविणें कोणाचें ॥ २६ ॥ यालागीं चेष्टक तूंचि देवा । तरी कां अपराध या ठेवावा । असो तुमाचिया गौरवा । अवघ्या मावा शोभती ॥ २७ ॥

तस्यैव तेऽमूस्तनवस्त्रिलोक्यां शांता अशांता उत मूढयोनयः ।
शांताः प्रियास्ते ह्यधुनाऽवितुं सतां स्थातुश्च ते धर्मपरीप्सयेहतः ॥ ५० ॥

त्या तुझ्याचि अवघ्या तनु । क्रीडती तव तंत्र भिन्नभिन्न । शांत अशांत योनिगण । मूढ

पाठभेद :— *आतां ( पैठणप्रत )

१ एका वस्तूवर दुसऱ्या वस्तूचा आरोप. २ भेद. ३ विश्वतैजस इ. अवस्था ज्यास नाहींत तो. ४ नागिणीचें.

सज्ञान अनेक ॥ २८ ॥ आतांचि हे नवलपरी । साधु स्वधर्मपालनावरी । प्रवर्तलासि तूं मुरारि । शांतांवरी कृपाळु ॥ २९ ॥ करावया साधूंचें पालन । सत्पथाचें संस्थापन । शांता योनि प्रिय मानून । अवतरोन चेष्टसी ॥ ६३० ॥ अशांत योनि तुवांच केल्या । अपराध ठेवूनि दंडिल्या । अवतारचेष्टचिया खेळा । प्रतिकूळ झाल्या म्हणोनी ॥ ३१ ॥ तरी तो अपराध त्यांचिया माथां । केंवि ठेविजे जगन्नाथा । सहजस्वभाव तूं सर्वथा । तुझिया सत्ता अलोट ॥ ३२ ॥ पक्षी स्वभावें गगनीं उडती । जळामाजीं ते केंवि बुडती । स्थळीं जलचरां नोहे वसति । जळीं न वसति स्थलचरें ॥ ३३ ॥ ऐशी तुझी अनादि सत्ता । आतां अनुसरोनि अवतारचरिता । दोष ठेविला सर्पामाथां । क्षमावंता तो साहीं ॥ ३४ ॥ अवतारचरितासि विरुद्ध । एवढा सर्पाचा अपराध । क्षमा करावया प्रसिद्ध । तूं स्वतःसिद्ध सर्वात्मा ॥ ६३५ ॥

अपराधः सकृद्भर्त्रा सोढव्यः स्वप्रजाकृतः । क्षंतुमर्हसि शांतात्मन् मूढस्य त्वामजानतः ॥ ५१ ॥

तूंतें नेणोनि फणिनायकें । आपुल्या स्वभावें नैसर्गिकें । अपराध केला तो सर्वात्मकें । क्षमा करणें हें उचित ॥ ३६ ॥ स्वप्रजांचे अपराध अमूप । क्षमापनीं मायबाप । समर्थ होती ससाक्षेप । तूं सकृप जगज्जनक ॥ ३७ ॥ नेणत्या मूढाचा अन्याय । तुज सहावया उचित होय । शांतात्मा हें नामधेय । तुजवीण काय आणिकाचें ॥ ३८ ॥ तुझे चरण ज्याचिये शिरीं । त्या तव किंकराच्या आम्ही किंकरी । कृपावरें अनुग्रह करीं । श्रीमुरारि कारुण्यें ॥ ३९ ॥

अनुगृह्णीष्व भगवन् प्राणांस्त्यजति पन्नगः । स्त्रीणा नः साधु शोच्यानां पतिः प्राणः प्रदीयताम् ॥ ५२ ॥

अखिलैश्वर्यसंपन्न । अनंतब्रह्मांडभाजन[1] । यालागीं तूं श्रीभगवान । दुजा कोण तुज साम्य ॥ ६४० ॥ अनंतब्रह्मांडभाण्डोदरा । लागतां तुझिया पार्ष्णिप्रहारा । सोडूं पाहे प्राण-निकरा । स्थूळशरीरा समवेत ॥ ४१ ॥ यालागिं आम्हां स्त्रियांप्रति । वैधव्यदुःखा एवढी खंती । आणिक नाहीं हो श्रीपति । म्हणोनि काकुळती येतसों ॥ ४२ ॥ पतिप्राणांचें भिक्षादान । द्यावें कृपाळु होउन । इतुकें आमुचें करुणावचन । श्रवणीं घेऊन मानावें ॥ ४३ ॥ म्हणसी तुम्हांवरी अनुग्रह । करूनि वांचवूं काळग्रह[2] । तरी इतर प्राण्यांसि प्रळयदाह । हा निर्वाहपूर्वक ॥ ४४ ॥

विधेहि ते किंकरीणामनुष्ठेयं तवाज्ञया । यच्छ्रद्धयाऽनुतिष्ठन्वै मुच्यते सर्वतो भयात् ॥ ५३ ॥

तरी ऐसें न म्हणें पुरुषोत्तमा । तुझिया किंकरींलागिं आम्हां । आज्ञा कीजे मेघश्यामा । आम्ही त्या नियमा अनुसरों ॥ ६४५ ॥ आम्हीं अनुष्ठावें काय । जेणें निरसे सर्व भय । भवसागरीं तरणोपाय । तो उपाय आज्ञापीं ॥ ४६ ॥ श्रद्धापूर्वक अनुष्ठितां । सुटे सर्व भयांची चिंता । भूतमात्रीं

१ असंख्य ब्रह्मांडांचा आधार. २ काळासारखी पीडा करणारी दुष्ट जाति.

**एकात्मता । त्या वृत्तांता आज्ञापीं ॥ ४७ ॥ तुझिये आज्ञेवरूनि आम्ही । प्राणिमात्राच्या कल्याण- कामीं । प्रवर्तों ऐसें करीं स्वामि । हृदयपद्मीं वसोनी ॥ ४८ ॥**

श्रीशुक उवाच — इत्थं स नागपत्नीभिर्भगवान् समभिष्टुतः । मूर्च्छितं भग्नशिरसं विससर्जाङ्घ्रिकुट्टनैः ॥ ५४ ॥

**शुक म्हणे गा परीक्षिति । नागपत्न्यांहीं ऐसिया रीति । स्तवितां सद्भावें श्रीपति । करुणामूर्ति जगदात्मा ॥ ४९ ॥ षड्गुणैश्वर्याचा राशि । जाणोनि त्यांच्या मानसांसी । आवरूनि पार्ष्णिघातासी । कालियासी सोडिलें ॥ ६५० ॥ मूर्च्छापन्न सर्पशरीर । भयंकर महाथोर । पार्ष्णिघातीं भग्नशिर । पडिला विखार अचेष्टित ॥ ५१ ॥ पतिव्रतांच्या करुणास्तवनीं । कळवळूनि चक्रपाणि । कृपाकटाक्षावलोकनीं । झाला फणी सावध ॥ ५२ ॥**

प्रतिलब्धेंद्रियप्राणः कालियः शनकैर्हरिम् । कृच्छ्रात्समुच्छ्वसन् दीनः कृष्णं प्राह कृतांजलिः ॥ ५५ ॥

**जैसे सुषुप्तीमाजि जन । त्रियामा[1] ग्रासितां होय निमग्न । तैसा कालिय मूर्च्छापन्न । होतां विसंज्ञ निश्चेष्ट ॥ ५३ ॥ तंव कृष्णतरणीच्या[2] अपांगारुणें[3] । विश्व धवलितां कृपाकिरणें । यथापूर्व सर्व करणें । होऊनि स्मरण आथिला ॥ ५४ ॥ कृच्छ्रात् म्हणिजे महाक्लेशें । श्वास सांडोनि विगतावेशें[4] । हळूच निर्दोषमानसें । निजात्मतोषें उजळला ॥ ६५५ ॥ मग दीनप्राय हरिप्रति । बद्धांजळि परमप्रीति । अवलोकूनि कृष्णमूर्ति । करी प्रणति सप्रेमें ॥ ५६ ॥**

वयं खलाः सहोत्पत्त्या तामसा दीर्घमन्यवः । स्वभावो दुस्त्यजो नाथ लोकानां यदसद्ग्रहः ॥ ५६ ॥

**मग म्हणे जी तमालश्यामा । विश्वविदिता आत्मयारामा । चेष्टविता तूं भूतग्रामा । वृथा आम्हां दूषण ॥ ५७ ॥ उत्पत्तीपासूनि आम्ही खळ । तामसयोनि क्रोधबहळ । करुणाहीन द्वेषशीळ । हा स्वभाव केवळ आमुचा ॥ ५८ ॥ सकळ लोकांसि दुष्टग्रह । नैसर्गिकचि आमुचा देह । म्हणोनि सर्व प्राणिसमूह । करी द्रोह आमुचा ॥ ५९ ॥ ते नेणती मूढमति । योनिभेदें देहाकृति । निसर्ग- वैराचे संप्राप्ति । जे दूषिती तें उचित ॥ ६६० ॥ तो तूं स्वामि सर्ववेत्ता । आम्हां स्वभावपरतंत्रता । वर्तवूनि आमुचे माथां । सांगे कोणता अन्याय ॥ ६१ ॥ श्वानें सांडूनि विटाळ । केंवि हों शकती निर्मळ । कां वायस आचारशीळ । होईल केवळ द्विजवर्य ॥ ६२ ॥ करावया उदकेंशीं सोयरिक । शीतळ हों पाहे पावक । परी तें आंगींचें दाहक । टाकणें अटक तयातें ॥ ६३ ॥ तैसा दुस्त्यज स्वभाव । तामसयोनीं प्रादुर्भाव । तुवांचि निर्मिला हा समुदाव । मायालाघवप्रसंगें ॥ ६४ ॥**

त्वया सृष्टमिदं विश्वं धातर्गुणविसर्जनम् । नानास्वभाववीर्यौजोयोनिबीजाशयाकृति ॥ ५७ ॥

---

१ रात्र. २ कृष्णरूप सूर्याच्या. ३ नेत्रकटाक्ष हाच अरुण. ४ आवेशरहित.

प्रभो तुवां विश्व* सृजिलें । तेन्हांचि गुणभेद विविध केले । तदनुरूप सर्जन झालें । तें पालटिलें नव जाये ॥ ६६५ ॥ अश्व श्वान खंडेराव । खांडा[1] म्हाळसा आभरणें सर्व । एक सुवर्ण असतां ठाव । भरला गांव भेदाचा ॥ ६६ ॥ तेथ कोरितां ठसा प्रथम । कोठें होय तें रूप नाम । मग त्या ठसां वेढितां हेम । उमटे समसाम्य अवघेंची ॥६७॥ तैसे अवघे योनिभेद । करावया तूंचि कोविदें[2] । प्रवृत्तिव्यवहारविभाग[3] । विविध बोधूनि विशद वेगळा ॥ ६८ ॥ गुणानुसार कर्मे विचित्र । कर्मास्तव प्रारब्धतंत्र । नानास्वभाव पृथगाकार । वीर्यशौर्यप्रतापें ॥ ६९ ॥ वेगळाल्या मतिशक्ति । योनिभेद देहाकृति । वैरें मित्रें कर्मप्रवृत्ति । पृथगाकृति पसरिल्या ॥ ६७० ॥ परस्परें जातिवैरें । कर्मतंत्रें पृथगाकारें । भूतें चेष्टती संस्कारें । परी तूं अंतरें वसविसी ॥ ७१ ॥ मणि माळेचे भिन्नभिन्न । सूत्रामाजि ते अभिन्न । तैसा जगीं तूं जगज्जीवन । सर्वां सर्वज्ञ सर्वात्मा ॥ ७२ ॥ कुतरें उबॅगोनि कुतरेपणा । टाकावया करितां यत्ना । खंडेरायपदवी जाणा । त्यासि कोण देववे ॥ ७३ ॥ एरवीं असे एक्याचि मानें । खंडेरायाशीं काय तें उणें । निर्मिलीं एकाच सुवर्णें । सर्वाभरणें समवेत ॥७४॥

वयं च तत्र भगवन् सर्पा जात्युरुमन्यवः । कथं त्यजामस्त्वन्मायां दुस्त्यजां मोहिताः स्वयम् ॥ ५८ ॥

अनंतअचिंत्यगुणपरिपूर्णा । निखिलैश्वर्यसंपन्ना । श्रीभगवंता तुजवीण कोणा । आमुची करुणा उपजेल ॥ ६७५ ॥ तुवां निर्मिलें चराचर । त्यामाजि सर्पयोनि घोर । शीघ्रकोपी आम्ही विखार । भयंकर सर्वांसी ॥ ७६ ॥ त्या आमुच्या घोरपणां । टाकूं न शकों जी सर्वज्ञा । तुझे मायेच्या मोहना । तुजाविण कोणा निरसवे ॥ ७७ ॥ मायामोहें मोहून आम्हां । योजिलें निसर्गजनितधर्मा[5] । टाकों न शकों उग्रकर्मा । हा दुस्त्यज महिमा मायेचा ॥ ७८ ॥ भाग्यें लाधलों तव पदपांसु[6] । तेणें उजळला ज्ञानदिवसु । जेणें तव कृपेचा अमृतलेशु । वांछूं विशेषु या देहीं ॥ ७९ ॥ एरवीं आम्ही तामसयोनि । पडिलों मायेच्या बंधनीं । आतां जाणों तुजवांचोनी । माया कोणी निरसीना ॥ ६८० ॥

भवान् हि कारणं तत्र सर्वज्ञो जगदीश्वरः । अनुग्रहं निग्रहं वा मन्यसे तद्विधेहि नः ॥ ५९ ॥

तूं मायेचें कारण । मायानियंता सर्वज्ञ । जगदुत्पत्तिस्थितिनिदान[7] । करणें जाण तुज अवघें ॥ ८१ ॥ उग्रस्वभाव दुस्त्यज आम्हां । परी तूं स्वसत्ता परमात्मा । पालटूनि सौम्यधर्मा । लावीं नियमा अनुग्रहें ॥ ८२ ॥ अनुग्रह निग्रह करूनि बळें । जातीमाजूनि वेगळें । आम्हां आणूनि सौम्यमाळे । सत्ता स्वलीले चेष्टवीं ॥ ८३ ॥ निग्रह अनुग्रह हे दोन्ही । यांमाजि रुचे अंतःकरणीं । तेंचि करूनि चक्रपाणि । स्वदासगणीं मज लेखीं ॥ ८४ ॥ ऐसी करुणा भाकितां फणी । कृपे द्रवला चक्रपाणि । काय बोलिला मधुरवाणी । तें नृपाकर्णीं शुक घाली ॥ ६८५ ॥

**पाठभेद** — * हे ( पैठणप्रत ).

१ दुधारी, रुंद पात्याची सरळ व वाटोळ्या टोकाची तलवार. २ सर्वज्ञ. ३ प्रपंचांतील व्यापाराचे भाग. ४ कंटाळून. ५ स्वभावाने उत्पन्न झालेल्या कर्मास. ६ पायांची धूळ. ७ शेवट.

श्रीशुक उवाच — इत्याकर्ण्य वचः प्राह भगवान् कार्यमानुषः । नात्र स्थेयं त्वया सर्प समुद्रं याहि मा चिरम् ॥ ६० ॥

**देवकार्यार्थ मनुष्यपणा । जो निजांगीं लेइला जाणा । तेणें ऐकोनि कालियवचना । केली आज्ञा ते ऐका ॥ ८६ ॥ म्हणे रे सर्पा क्रूरमति । यमुनाह्रदीं त्वां न कीजे वसति । शीघ्र जावें समुद्राप्रति । आज्ञा निश्चिती माझी हे ॥ ८७ ॥**

स्वज्ञात्यपत्यदाराढ्यो गोनृभिर्भुज्यते नदी । य एतत्संस्मरेन्मर्त्यस्तुभ्यं मदनुशासनम् ॥
कीर्तयन्नुभयोः संध्योर्न युष्मद्भयमाप्नुयात् ॥ ६१ ॥

**आपुले स्वजन सुहृद्ज्ञाति । घेऊनि कलत्रें संतति । शीघ्र जावें समुद्राप्रति । एथें वसति न करावी ॥ ८८ ॥ तुज येथूनि गेलिया पाठीं । गाई मनुष्यें जीवकोटि । स्वेच्छा क्रीडती यमुनेपोटीं । भयाची गोठी न धरूनी ॥ ८९ ॥ आणिक ऐकें आज्ञापन । तुजकारणें अनुशासन । जें म्यां केलें त्याचें पठन । करिती पूर्ण सद्भावें ॥ ६९० ॥ प्रथम करूनि निग्रह । पुढतीं केला अनुग्रह । नागपत्न्यांचा स्तवनोत्साह । एतत्समूहपूर्वक ॥ ९१ ॥ सायं प्रातरुभयकाळीं । नित्य नियमें वदनकमळीं । जे जे पढती पुण्यशाली । त्यां निजमौळीं वंदिजे ॥ ९२ ॥ तुम्हीं माझिये आज्ञेवरून । त्यांचें करावें संरक्षण । भय नेदावें अणुप्रमाण । अनुशासन चालविजे ॥ ९३ ॥ ऐसा करूनि आज्ञानियम । पुन्हा वर दे पुरुषोत्तम । जेणें हरे संसारश्रम । उपाय सुगम तो ऐका ॥ ९४ ॥**

योऽस्मिन्स्नात्वा मदाक्रीडे देवादींस्तर्पयेज्जलैः । उपोष्य मां स्मरन्नर्चेत्सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ६२ ॥

**इये माझिये क्रीडास्थानीं । स्नान करूनि जो जो प्राणी । ये ह्रदींच्या जळेंकरूनी । पितरांलागूनि संतर्पी ॥ ६९५ ॥ देवऋषिमनुष्यगण । यथोक्त करूनि संतर्पण । तीर्थविधीसि उपोषण । माझें स्मरणपूर्वक ॥ ९६ ॥ विप्रार्चन सुरार्चन । सदर्चन मदर्चन । करितां कल्मषापासून । मुक्त होऊन उद्धरती ॥ ९७ ॥ ऐसा वर देऊनि हरि । पुन्हा सर्पाचें भय हरी । अभय देऊनि वरोत्तरीं । पुन्हा श्रीमुरारि गौरवी ॥ ९८ ॥**

द्वीपं रमणकं हित्वा ह्रदमेतमुपाश्रितः । यद्भयात्स सुपर्णस्त्वां नाद्यान्मत्पादलांछितम् ॥ ६३ ॥

**तूं आपुलें पूर्वस्थान । रमणकद्वीप सांडून । ज्याच्या भयें पलायन । केलें उद्विग्नें[२] होउनी ॥ ९९ ॥ निर्भय जाणोनि यमुनाह्रद । एथ वससी सांडूनि खेद । ज्याच्या भयें तो न करी द्वंद्व । तुजशीं विषद मद्वरें ॥ ७०० ॥ माझे चरणांचें लांछन । तुझे मस्तकीं देखोनि पूर्ण । गरुड न भक्षी तुम्हांसि जाण । हें वरदान पैं तुज* ॥ १ ॥ ध्वजवज्रादिलांछितपदें । तुझे मस्तकीं देखोनि विषदें । गरुड**

पाठभेद — * माझे ( पैठणप्रत )
१ नियम. २ भयभीत.

विसरोनि पूर्वद्वंद्वें । आशीर्वादें[1] तोषेल ॥ २ ॥ ऐसें ऐकोनि प्रभूचें वचन । कालिय सहितपत्नीगण । गरुड निर्वैर जाणोन । सुखसंपन्न हृत्कमळीं ॥ ३ ॥ आपुलीं सांडूनि वृत्तिनिलयें[2] । एथें क्रमितां नष्टचर्यें[3] । आजि निःशल्य[4] झालीं हृदयें । हें साधलें कार्य हरिकृपें ॥ ४ ॥ मत्पादलांछन देखोनि नेत्रीं । गरुड तुम्हांशीं करील मैत्री । ऐसें निघतां श्रीकृष्णवक्त्रीं । चक्षुःश्रोत्रीं[5] ऐकिलें ॥ ७०५ ॥ दुःख हरोनि देइजे सुख । कीं विष वर्जूनि पाजिजे पीयूख । तैसा सर्पासि संतोख । श्रीहरिवाक्य परिसोनी ॥ ६ ॥

श्रीशुक उवाच — एवमुक्तो भगवता कृष्णेनाद्भुतकर्मणा । तं पूजयामास मुदा नागपत्न्यश्च सादरम् ॥ ६४ ॥

षड्गुणैश्वर्यपरिपूर्ण । यालागिं अद्भुतकर्मा कृष्ण । तेणें सर्प बोधितां जाण । सुखसंपन्न हृत्कमळीं ॥ ७ ॥ तुटलें गरुडाचें अनादि वैर । लाधला श्रीकृष्ण अभयंकर[6] । स्वपदलाभाचा जीर्णोद्धार । आनंदनिर्भर[7] कालिया ॥ ८ ॥ तेणें आनंदें उचंबळोन । श्रीकृष्णाचें करी पूजन । अत्यादरें नागिणी पूर्ण । प्रेमें श्रीकृष्ण पूजिती ॥ ९ ॥

दिव्याबरस्रङ्मणिभिः परार्ध्यैरपि भूषणैः । दिव्यगंधानुलेपैश्च महत्योत्पलमालया ॥ ६५ ॥

दिव्यरूप धरूनि फणी । तैशाचि दिव्यरूपा पद्मिनी । यथोपचारीं चक्रपाणि । दिव्याभरणीं पूजिती ॥ ७१० ॥ पूजापूर्वांग[8] संपादून । दिव्यांबरें केलीं अर्पण । अमूल्य रत्नमणिसुवर्ण । देदीप्यमान निजतेजें ॥ ११ ॥ जया मणींच्या किरणांपुढें । दिसे चंडकिरण बापुडें । ऐसे रत्नमणींचे कोंडें । हार निवांडें अर्पिले ॥ १२ ॥ पदभूषणें कटिमेखळा । वरी फांकती रत्नकिळा[11] । अमोघतेजाचा उमाळा । शिरीं सोज्वळा तो मुकुट ॥ १३ ॥ दिव्य कुंडलें मकराकृति[12] । कंठीं कौस्तुभ श्रीवत्सपंक्ति । अनर्घ्यरत्नें ओपें[13] देती । बाहीं[14] मिरवती अंगदें ॥ १४ ॥ कीर्तिमुखें बाहुवटीं । वीरकंकणें श्रीमणगटीं । दशांगुळीं मुद्रिकादाटी । क्षुद्रघंटिका कांचीतें ॥ ७१५ ॥ ऐशीं भूषणें अर्घातीत[15] । तिहीं भूषिला श्रीभगवंत । दिव्यसुगंधें मघमघित । पन्नगनाथ समर्पी ॥ १६ ॥ निढळीं रेखूनि त्रिपुंड्रटिळा[16] । सुरंग अक्षतमाणिक्यकिळा । चंदन चर्चूनि सुपरिमळा । सुगंधरोळा उधळिला ॥ १७ ॥ भोगिभुवनींचीं[17] दिव्य सुमनें । कल्पतरु लाजती जेणें । तीं अर्पूनि कद्रुनंदनें । उत्पलमाला[18] अर्पिली ॥ १८ ॥ जये उत्पलमाळेतळीं । प्रियतम वनमाळा लोपली । वैजयंती लाजोनि ठेली । प्रेमबहळीं मघमाघित ॥ १९ ॥ महती म्हणिजे महत्त्वा योग्य । ब्रह्मादि लघुत्वें अयोग्य । तें अर्पूनियां श्रीरंग । पूजिला साङ्ग फणिनाथें ॥ ७२० ॥ अपि या अव्ययाचा अर्थ । नैवेद्य फलताम्बूलसहित । सर्वोपचारीं जगन्नाथ । सप्रेमभरित पूजिला ॥ २१ ॥

---

१ यथार्थ भाषणाने. २ उपजीविकेचा धंदा आणि घर. ३ दुर्दैवाने. ४ चिंतारहित. ५ सर्पांनी. ६ भय नाहींसें करणारा. ७ आनंदाने परिपूर्ण. ८ पूजेचा प्रथम भाग. ९ कौतुकाने. १० निश्चयाने. ११ प्रभा. १२ सुसरीच्या आकाराचीं. १३ चकाकी. १४ बाहूंवर. १५ अमूल्य. १६ तीन पट्टयांचा टिकला. १७ पाताळलोकची. १८ कमळाची माळ.

पूजयित्वा जगन्नाथं प्रसाद्य गरुडध्वजम् । ततः प्रीतोऽभ्यनुज्ञातः परिक्रम्याभिवंद्य तम् ॥ ६६ ॥

**पत्नींसहित कालियफणी । ऐसा पूजूनि चक्रपाणि । प्रदक्षिणाअभिवंदनीं । नम्र होऊनि तोषविला ॥ २२ ॥ जो या अखिल जगाचा नाथ । गरुडध्वज[1] श्रीसमर्थ । कालिय त्यातें होऊनि विनत । आज्ञा घेत प्रयाणीं ॥ २३ ॥ देखोनि तयाचा शुद्ध भाव । संतोषोनि वैकुंठराव । आज्ञा देऊनियां स्वयमेव । पूर्वस्थाना पाठविला ॥ २४ ॥ हरीची आज्ञा लाहोनि फणी । माथा ठेऊनि कृष्णचरणीं । कुटुंबेंशीं तत्क्षणीं । सव्य घेऊनि निघाला ॥ ७२५ ॥**

सकलत्रसुहृत्पुत्रो द्वीपमब्धेर्जगाम ह । तदैव साऽमृतजला यमुना निर्विषाऽभवत् ।
अनुग्रहाद्भगवतःक्रीडामानुषरूपिणः ॥ ६७ ॥

**मनुष्यदेहाची घेतली बुंथी[2] । परी तो भगवान् विश्वपति । तदनुग्रहें निर्भय चित्तीं । द्वीपाप्रति चालिला ॥ २६ ॥ पुत्र कलत्र सोयरे सकळ । निःशेष घेऊनि अवघें कुळ । यमुनाजलमार्गें तत्काळ । आनंदबहळ चालिला ॥ २७ ॥ बळीच्या संग्रामीं निर्जरीं । सांडूनियां अमरपुरी । कालक्षेप गिरिकंदरीं । केला ज्यापरी संकटीं ॥ २८ ॥ पुन्हा विष्णूच्या पक्षपातें । बळीशीं सख्य जोडूनि निरुतें । सिंधु मथूनि ऐश्वर्यातें । लाहोनि स्वर्गातें सेविलें ॥ २९ ॥ तैसाचि गरुडभयें फणी । यमुनाहृदीं होता लपोनी । कृष्णवरें आनंदोनी । पुढती सदनीं प्रवेशे ॥ ७३० ॥ सिंधुगर्भीं द्वीप रमणक । त्यामाजि सकुटुंब पन्नक । झाला प्रवेशता निःशंक । लाहोनि पदांक कृष्णाचा ॥ ३१ ॥ गुह्य सांगे स्वजातीसी । पशु अथवा मनुष्यांसी । सहसा न डंखिजे कोणासी । कृष्णवरासि स्मरोनी ॥ ३२ ॥ मनुष्यां अथवा चतुष्पादां । तुमचें विष न चढे कदा । ऐशा श्रीकृष्णवरदा[3] । सर्वीं सर्वदा जाणावें ॥ ३३ ॥ तैंहूनि विरोळियांच्या[4] जाति । जळीं निर्विष न डंखिती । कृष्णवराची हे ख्याति । जगीं जाणती सर्वज्ञ ॥ ३४ ॥ कालिय रमणकद्वीपा गेला । यमुनाप्रवाह निर्विष झाला । अमृता ऐसा स्वाद आला । त्या उदकाला हरिवरें ॥ ७३५ ॥ कालिय जातांचि तत्काळ । यमुना झाली अमृतजळ । हरली विषाची हळहळ । वाहे निर्मळ सुसेव्य ॥ ३६ ॥ पशुपक्ष्यादि सर्व जाति । यमुना स्वइच्छा सेविती । ऐशी श्रीकृष्णाची ख्याति । ऐके परीक्षिति शुकमुखें ॥ ३७ ॥ तें हें श्रीमद्भागवत । महापुराण श्रीव्यासोक्त । वैयासकि[5] नृपा कथित । स्कंध त्यांत दशम हा ॥ ३८ ॥ त्याही माजि कालियमथन । हा अध्याय सोळावा ऐकोन । पुन्हा सप्तदशीं करील प्रश्न । तें सज्जन परिसोत ॥ ३९ ॥ द्वीप नामें जें रमणक । तें कां कालियपन्नक । टाकूनि लपला साशंक । यमुनाहृदीं चिरकाळ ॥ ७४० ॥ या प्रश्नाचें निरूपण । करील व्यासाचा नंदन । सप्तदशीं हें कथाश्रवण । सभाग्य श्रवण करितील ॥ ४१ ॥ श्रीजनार्दनस्वाधिष्ठानीं । सत्ता सन्मात्र सिंहासनीं ।**

---

१ ज्याच्या ध्वजावर गरुडाचें चित्र आहे तो श्रीकृष्ण. २ आच्छादन, बुरखा. पहा—" जैसी आभाळाची बुंथी । करूनि राहे गभस्ती । ज्ञानेश्वरी. ३ वर देणाऱ्या श्रीकृष्णास. ४ पाणसर्प. ५ व्यासपुत्र श्रीशुक.

एकनाथ अद्वयभुवनीं । पूर्णपणें *भ्राजिष्णु ॥ ४२ ॥ चिदानंदचरणसेवे । स्वानंदसाम्राज्यगौरवें । गोविंदनामस्मरणदैवें । वैष्णव आघवे सभाग्य ॥ ४३ ॥ त्यांचिया पादप्रक्षालनीं । दयार्णवाचें प्रज्ञापाणी । लागतां पदरजांच्या श्रेणि । सुकृतखाणी जोडल्या ॥ ४४ ॥ तया सुकृताचेनि बळें । वरदव्याख्यान भाषामेळें । श्रोतयांचीं हृदयकमळें । प्रेमकल्लोळें निववीत ॥ ७४५ ॥ भरला केवळ दयार्णव । तो हा ग्रंथ सद्गुरुराव । भवभ्रमाचीं बुडवूनि नाव । वाढे अथवा स्वानंदें ॥ ४६ ॥ निरपेक्ष विरक्त सद्गुरुभक्त । तो येथ रिघावया समर्थ । रिघोनि शेषशायी पर्यंत । त्यासि एकांत फावेल ॥ ४७ ॥ दयार्णवाची हे विनवणी । सद्भाव धरितां येथींच्या श्रवणि । स्वयें तुष्टोनि चक्रपाणि । योग्यता आणी न मागतां ॥ ४८ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे अष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां कालिय-निर्यापणं नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक ॥ ६७ ॥ टीका-ओवी ॥ ७४८ ॥ एवं संख्या ॥ ८१५ ॥ ( सोळावा अध्याय मिळून ओवीसंख्या ९८१७ )

सोळावा अध्याय समाप्त.

पाठभेद :—*भ्राजिष्ठ ( पैठणप्रत )

१ अत्यंत शोभायमान.

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय १७ वा

श्रीकृष्णपरमात्मने नमः । श्रीसदाशिवाय नमः । परमकुशला परमपुरुषा । परमात्मया पूर्णपरेशा । परावरज्ञा* निर्विशेषा[१] । गोपवेशा गोविंदा ॥ १ ॥ जेथ सर्वांचा उपरम । त्या पदासि बोलिजे परम । कुशल म्हणिजे कल्याणधाम । उत्कृष्टक्षेम† तव पदीं ॥ २ ॥ प्रकृतीपर्यंत पदें सकळें । यथामानें ग्रासिजती काळें । यालागीं जाणूनि ते अकुशलें । तव पदकमळें आश्रयिलीं ॥ ३ ॥ राजमुद्रा अर्घमानें[२] । राजध्वजदंडवसनें । गुरुपादाब्जें तेणें मानें । सगुणपणें नुमाणवे[३] ॥ ४ ॥ मुद्रा नोहे सुवर्णमान । ध्वज नोहे कीं यष्टिवसन । तें नृपसाम्राज्यैश्वर्यचिह्न । नृपा होऊनि मान्यत्वें ॥ ५ ॥ भक्तकारुण्यें सगुणता । जरी शोभली सद्गुरुनाथा । परी‡ समान नोहे भौतिकां भूतां । तूं तत्त्वतां चिन्मात्र ॥ ६ ॥ पुर्यष्टकाचें¶ वेष्टन । पावोनि वर्ते जीवचैतन्य । तैसा पुरुष तूं नोहेसी जाण । त्याचें मोक्षण तूं कर्ता ॥ ७ ॥ यालागीं परमपुरुषा स्वामी । असंगसंगें निष्कामकामी । प्रकृतिपतिव्रतासंगमीं । अस्पष्ट नियमीं नियमिता§ ॥ ८ ॥ तुज परमपुरुषाचा जो अर्थी‖ । त्या नांव परमपुरुषार्थी । येर जाणावे विषयस्वार्थी । धर्मकामार्थी अवघेही ॥ ९ ॥ तुज परमपुरुषार्थाकारणें । धर्मार्थकामांचें सफल जिणें । त्यावीण येर हें पेखणें । भ्रमोक्तपणें मायिक ॥ १० ॥ भ्रमामाजूनि चैतन्य । देखे अध्यस्तप्रपंचभान । तेंही आत्माचि परी भेदज्ञ । जीव होऊन जग देखे ॥ ११ ॥ त्याची फेडूनि जीवात्ममति । कृपेनें आणिसी आत्मस्थिति । तो तूं सद्गुरु अमूर्तमूर्ति । परंज्योति परमात्मा ॥ १२ ॥ कीं आत्मा अभेद चराचरीं । परंतु भेदातें न निवारी । भेदभ्रमाचा विनाश करी । तूं निर्धारीं परमात्मा ॥ १३ ॥ आत्मा असोनि सर्वगत । जीव अविद्याभ्रमें भ्रांत । अभेद असतांचि संतत । भवावर्तन[४] न चुके कीं ॥ १४ ॥ तया भ्रमाच्या निरसनें । अभेद आत्मा

---

पाठभेद — * परापरज्ञा † प्रेम ‡ तरी ¶ पर्या § नियमिया ‖ र्थो कारणें. (मुंगीप्रत)

१ भेदरहित. २ मोलानें. ३ बरोबरी होत नाहीं. ४ जन्ममरणाचे फेरे.

आत्मपणें । वेढे* ऐसें ज्याचें करणें । त्यातें म्हणणें परमात्मा ॥ १५ ॥ जेथें कामा पुरे भरण । त्या पदांतें म्हणिजे पूर्ण । येर पूर्ण म्हणती शून्य । तें अज्ञान नास्तिक्य ॥ १६ ॥ कामापुरतें उरे शेष । तयापरता तूं परेश । परादिवाचांचा अवकाश । सावकाश तुजमाजीं ॥ १७ ॥ कोणापासूनि कोण अपर । कोण तें कोणाहूनि पर । याचा अभिज्ञ तूं साचार । परात्परतर परमात्मा ॥ १८ ॥ गुणसाम्यरूपें स्फुरण । महाभूतादि जे कां त्रिगुण । यांची व्याप्ति जेथ समान । तें सामान्य बोलिजे ॥ १९ ॥ सामान्यत्वें जें अशेष । तें प्रकाश्य तूं स्वप्रकाश । निरसूनि सामान्य विशेष । निर्विशेष अंतीं तूं ॥ २० ॥ गोमान्[1] म्हणिजे जैसा तरणि । मृगजळ प्रकाशूनि स्वकिरणीं । गोपक होनिं अलिप्त गगनीं । तेंवि तूं स्वगुणीं गोगोप्ता ॥ २१ ॥ गोभेद† अभेद चराचर । गोपवेश तूं ईश्वर । गोगोपक हृदयीं स्थिर । अगोचर जगदात्मा ॥ २२ ॥ ऐशिया तुझें‡ हेंचि नमन । आपुलें निरसूनि भिन्नपण । तुझें अपरोक्ष परिज्ञान । पावोनि अभिन्न हो जेणें ॥ २३ ॥ यया होणया कारण । हृदयस्था न करी प्रबोधन । यालागीं सबाह्य कृपाघन । सद्गुरु पूर्ण उपदेष्टा ॥ २४ ॥ नेत्र असोनि आंधळे । निगम[2]गुर्वर्के¶ जों नुजळे । अंतर्विरक्त विवेकमेळें । सबाह्य प्रांजळें धवलिसी ॥ २५ ॥ यालागीं सबाह्य प्रकाशका । अखिलात्मका संतोषका । नमन अभिन्न देशिकां[3] । भावजनका भावस्था ॥ २६ ॥ ऐसें ऐकोनि तोषले गुरु । म्हणती पुरे वाग्व्यापारु । उरगप्रवृत्तिनिवृत्तिपरिहारु । लाभल्या हारु§ कां वदिजे ॥ २७ ॥ तथापि शुभस्वप्नाचा तोष । होय चेइल्यां[4]ही विशेष । तैसाचि तुझा हा स्तवनोत्कर्ष । अभेदहर्षवर्धन‖ ॥ २८ ॥ आतां सांवरूनि हे स्तुति । प्रवर्तावें आरब्ध-ग्रंथीं । कर्णद्वारें अक्षरपंक्ति↑ । भरली चित्तीं गुरुवरें⊤ ॥ २९ ॥ हृद्[5]भू विवेकसग[6]रात्मजीं । खणोनि पर्वत केले रजीं । गंगाओघे वर्णराजीं । भरला सहजीं दयार्णव ॥ ३० ॥ कृपा[7]अपांगसीतळपवनें । उचंबळोनि सप्रेमवनें । प्रज्ञाप्रवाहें सर्वही करणें । पटुतरपणें टवटविलीं ॥ ३१ ॥ माजीं बिंबला गगनसदृश । सद्गुरु जो कां स्वप्रकाश । तेणें श्रवणसुखाचा हर्ष । श्रोतयांस उ[8]पतिष्ठे ॥ ३२ ॥ जैसा महावीराचा शर । फोडी कवचेंशीं शरीर । तेंवि श्रवणीं वरदोत्तर । पडतां संहार संशया ॥ ३३ ॥ निःसंशय जेव्हां मन । तेव्हां अयत्नें उन्[9]मन । पावे स्वरूपसमाधान । आनंदघन स्वतःसिद्ध ॥ ३४ ॥ ते हे हरिवराची‡‡ टीका । क्षणैक एकाग्र आइका । होतां श्लोकार्थ ठाउका । मोडे आवांका भेदाचा ॥ ३५ ॥ साखर घालूनि पहावी तोंडीं । येरा पुसावी नलगे गोडी । तैशी एथींची श्रवणावडी । अपरोक्ष जोडी आणील ॥ ३६ ॥ तरी हें भागवतींचें सार । दशमस्कंधीं कृष्णचरित्र । कालियमथन सविस्तर । ऐकोनि नृपवर पुसतसे ॥ ३७ ॥ तो हा दशमीं सप्तदश । अध्याय यांत कथाविशेष । नाग धाडूनि नागालयास । हरि स्वजनांस भेटला ॥ ३८ ॥ मग प्रसुप्त यमुनातीरीं । गोपगोधनें श्रमित रात्रीं । दावानळें गिळितां हरि । चमत्कारीं संरक्षी ॥ ३९ ॥ तेथ गतकथा

पाठभेद — * वेठे. † गोमेद ‡ तुते. ¶ पूर्वक. § परी. ‖ पै. ↑ मक्षर. ⊤ गुरुवरदे ( मुंगीप्रत ). ‡‡ हरिवरदाची.

१ किरण ज्यापासून निघतात असा. २ ब्रह्मज्ञान सांगणारा गुरु हाच कोणी सूर्य. ३ गुरु, मार्गदर्शक. ४ जागा झाल्यावरही. ५ अंतःकरण हीच पृथ्वी. ६ सगराच्या मुलांनीं. ७ कटाक्ष. ८ संनिध राहे. ९ मायेपासून सुटून ईश्वरीं समरस होणें.

अन्वय । सर्पांहूनि विशेष भय । मानूनि गरुडाचें कालिय । हृदीं निर्भय कैसेनी ॥ ४० ॥ ऐशिये शंकेचें निरसन । करावया कुरुभूषण । शुकासि करिता झाला प्रश्न । सावधान तो ऐका ॥ ४१ ॥

राजोवाचः— नागालयं रमणकं कस्मात्तत्याज कालियः । कृतं किं वा सुपर्णस्य तेनैकेनासमंजसम् ॥ १ ॥

सकळनागांचें नागालय । रमणकद्वीप जें रमणीय । तें टाकूनि कां कालिय । करी निलय यमुनेंत ॥ ४२ ॥ गरुडा भेणें म्हणसी जरी । तरी गरुड सर्पमात्रांचा वैरी । त्यांतूनि कालिय सपरिवारीं । हृदोदरीं कां वसला ॥ ४३ ॥ किंवा अवघ्या सर्पांहुनी । वेगळा एकचि कालियफणी । गरुडा समरीं नाटोपोनी । वैरी होऊनि निवडला ॥ ४४ ॥ पडल्या बलिष्ठेशीं वैर । स्वपक्ष आश्रयिती विवेकचतुर । स्वकुळ सांडूनि हा विखार । कां पां दूर दुरावला ॥ ४५ ॥ भंवतें अगाध सिंधूदक । त्यामाजीं द्वीप जें रमणक । तेथ अवघा नागलोक । नांदे निःशंक निर्भय ॥ ४६ ॥ दुर्गम निर्भय आपुलें भुवन । सांडूनि पक्षपाती स्वजन । यमुनागर्भीं विशेष कोण । कां हें स्थान वसविलें ॥ ४७ ॥ येणें एकलेनि गरुडाचा । काय अपराध केला साचा । संशय त्रिविधा प्रश्नाचा । निरसा *स्वतांचा स्वामिया ॥ ३८ ॥ ऐसा ऐकोनि नृपाचा प्रश्न । वक्ता श्रीशुक सर्वज्ञ । करिता झाला निरूपण । आनंदोन सप्रेमें ॥ ४९ ॥

श्रीशुक उवाचः— उपहार्यैः सर्पजनैर्मासि मासीह यो बलिः ।
वानस्पत्यो महाबाहो नागाना प्राङ्निरूपितः ॥ २ ॥

शुक म्हणे गा कौरवराया । कद्रु विनता कश्यपभार्या । सापत्नच्छळें रवीच्या हया । बोधावया[१] प्रवर्तल्या ॥ ५० ॥ हें आख्यान आदिपर्वीं । व्यासोक्त जाणिजे सर्वत्र सर्वीं । येथ अन्वयार्थ पैं आघवी । सूचना जाणावी कथेची ॥ ५१ ॥ परस्परें सूर्यसप्ति[२] । अनुवादतां वर्णकांति । श्वेत कृष्ण ऐसें म्हणती । दोघी सवती पैजांशीं ॥ ५२ ॥ विनता म्हणे शुक्लवर्ण । कद्रु निषेधूनि म्हणे कृष्ण । जीस येईल लटिकेपण । दासी होऊनि ते राहो ॥ ५३ ॥ ऐशी परस्परें प्रतिज्ञा केली । मग कद्रु स्वसुतां पुसों गेली । तिहीं श्वेतकांति कथिली । ऐकोनि दचकली हृत्कमळीं ॥ ५४ ॥ मग पुत्रांसि सांगे गोठी । तुम्ही असतां माझे पोटीं । दास्यक्रिया हे वोखटी । मी करंटी पावलें ॥ ५५ ॥ त्यामाजि सवतीची दासी होणें । परम निंद्य हें लाजिरवाणें । म्यां जोडिलें प्रतिज्ञापणें । कोण्या गुणें हें निरसे ॥ ५६ ॥ सर्प म्हणती अहो जननी । न विचारितां गोविली वाणी । अदृष्टाची हे अलोट करणी । यत्न कोणी न चाले ॥ ५७ ॥ हें ऐकोनि क्षोभली माय । †तुमचा होईल कुलक्षय । माझा न निरसां अपाय । परिसतां भय सर्पांसी ॥ ५८ ॥ मग म्हणती वो गरलवळें । श्रवणपुच्छ

**पाठभेदः**—* स्ववाचा. † बोधिले ( भुंगीप्रत ).

१ जाणण्यासाठीं. २ सूर्याचा अश्व.

**करूं काळें । विनतेपासूनि प्रतिज्ञाछळें । दास्या वेगळें तुज करूं ॥ ५९ ॥ ऐशिया छळणें सर्पीं कपटी । कद्रु सोडविली संकटीं । विनता परतोनि केली चेटी । हे तुज गोठी कळली कीं ॥ ६० ॥ मग ते विनता कद्रुघरीं । दास्यकर्मीं जन्मवरी । कपटप्रतिज्ञापाशसूत्रीं । सर्पीं यापरी गोविली ॥ ६१ ॥ तेणें संतोषली माय । म्हणे होतां कुळक्षय । तेव्हां रक्षील भागिनेय । कांहीं समुदाय पै तुमचा ॥ ६२ ॥ दास्यीं गुंतल्या विनता सती । ग्लानि तोपवूनि निजपति । तत्प्रसादें पुत्रवती । होऊनि मुक्ति पावली ॥ ६३ ॥ विनतेपोटीं झाला गरुड । तेणें जाणोनि पण अवघड । माता सोडवणेंसी वोड । केलें कैवाड तें ऐका ॥ ६४ ॥ दास्यकर्माच्या पालटें । अमृत देऊं केलें कपटें । शठांसि गौरविलें प्रतिशठें । महाबलिष्ठें खगेंद्रें ॥ ६५ ॥ स्वर्गींहूनि आणितां सुधा । देव गरुडेंशीं मिसळले युद्धा । त्यांसि जिंकितां तिहीं भेदा । करूनि विविधा †रोधिलें ॥ ६६ ॥ गरुडें देवांच्या अनुमतें । सुधा दावितां पन्नगांतें । मुक्त कराविलें विनतेतें । सर्पीं सुधेतें देखोनी ॥ ६७ ॥ सर्पीं करितां सुधापाना । देवीं ‡हरिले करूनि विघ्ना । तेहूनि गरुडा कद्रुनंदना । वैरभावना अभंग ॥ ६८ ॥ सर्प स्वभावें भुजंगम । गरुड केवळ विहंगम । यालागिं सर्पांसि तो दुर्गम । कांहीं विक्रम न चाले ॥ ६९ ॥ गरुड भक्षी सर्पकुळा । समरीं न जिंकवे तो व्याळां । तिहीं सांडूनि भूमंडळा । मग पाताळा वसविलें ॥ ७० ॥ रमणकद्वीप सिंधुपोटीं । जेथें वसिजेत कर्कोटीं । त्यांतें भक्षी गरुड हटीं । महासंकटीं पडिले पै ॥ ७१ ॥ तिहीं कश्यपा कथूनि श्रम । भयें गरुडासि केलें साम । तेणें दाऊनि दिधला द्रुम । नेमिला नेम उभयतां ॥ ७२ ॥ यया वनस्पतीच्या मुळीं । तुम्हीं समस्तीं मिळूनि व्याळीं । आपुलाली येतां पाळी । द्यावा बाळि गरुडातें ॥ ७३ ॥ ऐशी प्रतिमासीं पन्नकीं । बलिअर्पणीं न कीजे चुकी । गरुड निर्वैर तुमचे विखीं । हें निष्टंकीं *नेणिलें ॥ ७४ ॥ गरुडासि निरूपिलें भोजन । दिव्य फळें दिव्य पक्वान्न । तें अर्पिती सर्पजन । मृत्युपासून निर्भय ॥ ७५ ॥ अथवा गरुडासी भक्ष्यरूप । प्रतिमासीं एकैक सर्प । अर्पूनि वनस्पती समीप । निर्विकल्प नांदिजे ॥ ७६ ॥ नागांसि निरूपिलें हें पूर्वीं । तैसें वर्ततां सर्वत्र सर्वीं । कालिय नायकें महागर्वीं । वारितां दर्वीकर सारे ॥ ७७ ॥**

स्वं स्वं भागं प्रयच्छंति नागाः पर्वणि पर्वणि । गोपीथायात्मनः सर्वे सुपर्णाय महात्मने ॥ ३ ॥

**नाग आपुलाले भाग । मासानुक्रमें अर्पिती साङ्ग । आपुल्या रक्षणाकारणें चांग । नेम अभंग चालविती ॥ ७८ ॥ गरुड विष्णूचें वाहन । विशेष महर्षिनंदन । तेणें जिंकिले सुपर्वाण । तो सुपर्ण माहात्मा ॥ ७९ ॥ शरणागता संरक्षण । दुष्टां दुर्मदां दंडन । या विचारें अभयदान । दिधलें संपूर्ण सर्पांसी ॥ ८० ॥ त्या गरुडातें सर्पीं सर्वीं । भाग अर्पितां पर्वीं पर्वीं । त्यातें न मानी कालिय गर्वीं । भंगिला पूर्वीं कृतनेम ॥ ८१ ॥**

विषवीर्यमदाविष्टः काद्रवेयस्तु कालियः । कदर्थीकृत्य गरुडं स्वयं तं बुभुजे बलिम् ॥ ४ ॥

---

**पाठभेदः**— † म्हणे. ‡ हरिले. * नोमिले ( मुंगीप्रत ).

१ दासी. २ भाचा. ३ मोठी. ४ युक्ति. ५ लुच्चा, लबाड. ६ सर्प, नाग. ७ देव. ८ गरुड.

परम दुर्जर ज्याचें गरळ । तैसें उग्र ज्याचें बल । दोहीं मदें प्रचंड व्याळ । महाप्रबळ मातला ॥ ८२ ॥ काद्रवेय तो कद्रुतनय । गरुडा लेखूनि तृणप्राय । नागीं अर्पिलें उपहार्य[1] । भक्षी स्वयें अवघें तें ॥ ८३ ॥ आपण कदापि नेदी कांहीं । पर्वी अर्पिती इतर अहि । बळेंचि भक्षी तें अवघेंही । गरुडा कांहीं न गणूनी ॥ ८४ ॥ नाग म्हणती कालियासी । गरुडकृत नेमा भंगिसी । तुझिया द्वेषें तो आम्हांसी । समस्तांसी भक्षील ॥ ८५ ॥ कालिय नायके त्यांचें वचन । मग ते गरुडासि गेले शरण । कालिय टाकिला निवडून । सर्वां कल्याण चिंतिलें ॥ ८६ ॥

तच्छ्रुत्वा कुपितो राजन्भगवान्भगवत्प्रियः । विजिघांसुर्महावेगः कालियं समुपाद्रवत् ॥ ५ ॥

ज्याचें अचिंत्य ऐश्वर्य । त्या हरीचा गरुड प्रिय । नागीं निवेदितां अनार्य । शत्रु कालिय तो मानी ॥ ८७ ॥ अभय ओपूनि इतरां नागां । पर्वणि अर्पिती जे स्वभागा । कालिय आणूनि समरंगा[2] । दुर्मदभंगा प्रवर्तला ॥ ८८ ॥ कालियाची *प्राणहानि । करावया अंतःकरणीं । क्रोधें क्षोभूनि गगनींहूनी । झड मारूनि उतरला ॥ ८९ ॥ रिघोनि कालियाचे सदनीं । बळें कवळूं पाहे चरणीं । हें देखोनि समरांगणीं । महाफणी मिसळला ॥ ९० ॥

तमापतंतं तरसा विषायुधः प्रत्यभ्ययादुच्छ्रितनैकमस्तकः ।
दद्भिः सुपर्णं व्यदशद्ददायुधः करालजिह्वोच्छ्वसितोग्रलोचनः ॥ ६ ॥

यावा देखोनि खगपतीचा । प्रचंड क्रोध कालियाचा । वर्षाव करीत विषशस्त्राचा । गरुडासन्मुख धांवला ॥ ९१ ॥ अनेक मस्तकें उभारूनी । कडकडा झोंबे गरुडाचरणीं । दंतायुध[3] उग्रलोचनीं[4] । कराल जिह्वालित† ॥ ९२ ॥ श्वासोच्छ्वासीं ज्वाळा वमी । अनावर विषाग्नीची ऊर्मी । नेत्रद्वारें धूम्र व्योमीं । प्रलयरूप कोंडला ॥ ९३ ॥ प्राणिमात्रासि प्रलयकाळ । क्रोधें करितां कालियव्याळ । तें देखोनि विनताबाळ । क्षोभें तात्काळ खवळला ॥ ९४ ॥

तं तार्क्ष्यपुत्रः स निरत्यमन्युमान् प्रचंडवेगो मधुसूदनासनः ।
पक्षेण सव्येन हिरण्यरोचिषा जघान कद्रूसुतमुग्रविक्रमः ॥ ७ ॥

देखोनि कालियाचें उत्थान । ज्यावरी मधुसूदनाचें आसन । तया गरुडाचा आवेश गहन । जैसा कृशान[5] प्रलयींचा ॥ ९५ ॥ तप्तचामीकराची[6] कांति । त्या सव्यपक्षें सर्पाप्रति । क्षोभें हाणितां निष्ठुर घातीं[7] । कद्रूसंतति व्याकुळ ॥ ९६ ॥ उतरोनि गेला मदाभिमान । धैर्य विक्रम ‡हारपोन ।

पाठभेद— *मानहाणी. †ळळळळीत. ‡हारपला जाण ( मुंगीप्रत ).

१ गरुडास नजर करावयाची वस्तु. २ रणांगणांत. ३ दांत हींच शस्त्रें ज्याचीं तो. ४ भयंकर डोळ्यांनीं. ५ अग्नि. ६ सुवर्ण. ७ प्रहारांनीं.

मरणावीण न चुके आन । महानिर्वाण ओढवलें ॥ ९७ ॥ तेव्हां आठविला हृदयीं पिता । तेणें रहस्य स्मरलें चित्ता । रिघोनि कालिंदीआंतौता[1] । पळे कृतांतापासुनी ॥ ९८ ॥

सुपर्णपक्षाभिहतः कालियोऽतीव विह्वलः । ह्रदं विवेश कालिंद्यास्तदगम्यं दुरासदम् ॥ ८ ॥

सोडूनि द्वीप रमणक । यमुना वसवी कां पन्नक । या प्रश्नाचा विवेक । तुज सम्यक कळला कीं ॥ ९९ ॥ सांडूनि दुर्गम नागभुवन । यमुनाह्रदीं विशेष कोण । या प्रश्नाचें निरूपण । ऐकें येथून कुरुवर्या ॥ १०० ॥ अवघ्या सर्पांविगळें काय । §केलें येणेंचि अनार्य । त्याचा कथिला अभिप्राय । तो तुज प्रत्यय आला कीं ॥ १०१ ॥ गरळें न जळेचि खगपति । चरणचंचुपुटें दंतीं । काळयाची खुंटली शक्ति । महाविपत्ति पावला ॥ २ ॥ गरुड प्रतापें हाणितां झडे । नखीं विदीर्ण होती फडे । चंचुप्रहाराभेणें दडे । पळे चहूंकडे घाबिरा ॥ ३ ॥ पक्ष हाणितां निश्चेष्टित । म्हणे मांडला निर्वाणमृत्य । तंव पितृस्मरणें अकस्मात् । निर्भय एकांत सूचला ॥ ४ ॥ अगम्य गरुडातें जें स्थान । तें आठवलें दैवेंकरून । हृदयकमळीं विवंचून । गरुडापासून पळाला ॥ १०५ ॥ सिंधु लंघूनि दाटोदाटीं । प्रवेशूनि यमुनापोटीं । चुकवूनि गरुडभयाची घरटी । ह्रदापोटीं तो वसला ॥ ६ ॥ ऐसें ऐकोनि विचक्षण । पुन्हा परीक्षिति करी प्रश्न । गरुडा अगम्य कोणतें स्थान । तें विवरून मज सांगा ॥ ७ ॥ गरुडाआंगींची प्रतापशक्ति । जाणोनि सुर नर असुर भिती । केसरिगंधें[3] कुंजरपंक्ति[4] । जेवीं न धरिती आंगवणें[5] ॥ ८ ॥ जो विष्णूचा पक्षपाती । लोकत्रयीं अमोघ गति । दुर्गम ऐशिया गरुडाप्रति । कोणे युक्ति स्थळ कोण ॥ ९ ॥ ऐसें पुसतां मार्त्स्यीवत्सें[6] । कल्पद्रुम कां* याचकइच्छे । संशयरुग्णांचे[7] चिकित्से । धन्वंतरि जो दुसरा ॥ ११० ॥ तो निरूपी व्यासतोक[8] । म्हणे कुरुमंडना हें ऐक । विष्णु वाहे श्रीवत्सांक । आज्ञाधारक जयांचा[9] ॥ ११ ॥ आज्ञा लंघूं न शके हरि । तेथ गरुडाची कायसी थोरी । ज्यांच्या आशीर्वादावारी । दासी करी लक्ष्मीसी ॥ १२ ॥ ऐसे ब्राह्मण तपोधन । जैसे प्रलयहुताशन[10] । शापज्वाळा प्रज्वळून । क्षोभें त्रिभुवन जाळिती ॥ १३ ॥ प्रसन्न तरी जे जगत्पति । लक्ष्मीसहित हातीं देती । ईश्वराची ऐश्वर्यप्राप्ति । ज्यांचे भक्तीस्तव जोडे ॥ १४ ॥ ऐशिया ब्राह्मणांचा शाप । ऐकोनि गरुडासी चळकांप । यास्तव ययुनाह्रदीं सर्प । निर्भयरूप राहिला ॥ ११५ ॥ तो तूं म्हणसी ब्राह्मण कोण । काय शापासि कारण । तें संक्षेपें इतिहासकथन । करीं श्रवण सर्वज्ञा ॥ १६ ॥

तत्रैकदा जलचरं गरुडो भक्ष्यमीप्सितम् । निवारितः सौभरिणा प्रसह्य क्षुधितोऽहरत् ॥ ९ ॥

तया यमुनाह्रदापासीं । सौभरिमुनि तपोराशि । होता म्हणोनि जलचरांसी । जलनिवासीं

**पाठभेद**—§ काय ( मुंगीप्रत ). * जो ( मुंगीप्रत ).

१ यमुनेमध्ये. २ लवकर लवकर. ३ सिंहाच्या वासाने. ४ हत्तीचा कळप. ५ धैर्य. ६ मात्स्यी उत्तरा ; विराटराजाची कन्या. ७ संशयरूपी रोगानें ग्रस्त. ८ व्यासपुत्र शुक. ९ ज्या ब्राह्मणाचा. १० प्रलयकाळच्या अग्नीसारखे.

निर्भयता ॥ १७॥ कोणे एके कालीं तेथ । गरुड पातला क्षुधाक्रांत । हृदांतील मत्स्यनाथ । निजाहारार्थ कल्पिला ॥ १८ ॥ परमप्रिय* भक्ष्यस्थानीं । गरुडें मत्स्यपति कल्पूनी । धरूं जातां सौभरिमुनि । निवारणीं प्रवर्तला ॥ १९ ॥ त्यातें नगणूनि क्षुधाभिभूत । बळेंचि हरिला मत्स्यनाथ । दुःखें जळचर आक्रांत । कृपेनें द्रवत सौभरि ॥ १२० ॥

मीनान् सुदुःखितान् दृष्ट्वा दीनान् मीनपतौ हते । कृपया सौभरिः प्राह तत्रत्यक्षेममाचरन् ॥ १० ॥

मीनपतीचें[1] पाहोनि मरण । दुःखें आक्रंदती मीन । सौभरि कृपेनें कळवळून । त्यांचें कल्याण चिंतिलें ॥ २१ ॥

अत्र प्रविश्य गरुडो यदि मत्स्यान् स खादति । सद्यः प्राणैर्वियुज्येत सत्यमेतद्ब्रवीम्यहम् ॥ ११ ॥

गरुडाप्रति शापवचन । आज्ञाभंगें प्रक्षोभोन । बोलता झाला तपोधन । मत्स्यां कल्याण ज्या योगें ॥ २२ ॥ आजिपासूनि ये डोहीं । मत्स्य भक्षील गरुड जयीं । मृत्यु पावेल तेचि समयीं । देव[2]त्रयीं रक्षितां ॥ २३ ॥ आजिपर्यंत तपार्जित । जें म्यां जोडिलें सुकृत । त्याचेनि बळें हें त्रिसत्य[3] । वाक्य माझें ब्रह्मांडीं ॥ २४ ॥ ईश्वर हो कां हरिहर ब्रह्मा । मद्वाक्याचा असत्य महिमा । करूं न शके ऐशिया नेमा । कथिलें तुम्हां जलचर हो ॥ १२५ ॥ तैंहूनि गरुड न वचे तेथें । हें कालियासी विदित होतें । गरुडभयाच्या आकांतें । या ‡हृदातें प्रवेशला ॥ २६ ॥

तं कालियः परं वेद नान्यः कश्चन लेलिहः । अवात्सीद्गरुडाद्भीतः कृष्णेन च विवासितः ॥ १२ ॥

हें वर्म जाणे कालियफणी । यावीण सर्प नेणती कोणी । म्हणोनि गरुडासि बळिदानीं । मित्र जोडूनि वर्तती ॥ २७॥ गरुड कालियें अवमानिला । म्हणोनि एकला वैरी झाला । गरुडें समरीं पराभविला । मग पळाला तेथूनी ॥ २८ ॥ यमुनाहृदीं निर्भयपणें । यावत्[4]काळ गरुडाभेणें । त्यासी अभय वोपिलें कृष्णें । रमणकद्वीपा धाडिलें ॥ २९ ॥ राजमुद्रेचें देखोनि चिह्न । सेवक सन्मानिती पूर्ण । कालियमाथां श्रीकृष्णचरण । तेणें सुपर्णी† निर्वैर ॥ १३० ॥ दारा पुत्र सुहृद्जन । अवघा परिवार घेऊन । कालिय पावला स्वसदन । रमणकभुवन ज्या नांव ॥ ३१ ॥ डोहींहूनि दवडिला सर्प । यमुना केली अमृतरूप । कृष्ण कंदर्पाचा बाप । सर्वां सकृप सर्वस्वें ॥ ३२ ॥

कृष्णं हृदाद्विनिष्क्रान्तं दिव्यस्रग्गंधवाससम् । महामणिगणाकीर्णं जांबूनदपरिष्कृतम् ॥ १३ ॥

हृदापासूनि जनार्दन । बाहिर निघाला देदीप्यमान । यामिनी सांडूनि चंडकिरण । प्रकाशमान ज्यापरी ॥ ३३ ॥ जैसा पूजिला होता नागीं । तैसा सालंकृत सर्वांगीं । अवघे अ[5]निमेष देखती

---

**पाठभेदः**— * प्रियतम. ‡ वृतांतें. † संपूर्ण ( मुंगीप्रत ).

१ मत्स्यांचा राजा. २ ब्रह्मविष्णुमहेशांनीं. ३ कायावाचामन या तिहींकरून सत्य. ४ जोंपर्यंत. ५ डोळे न हालवितां.

दृ[1]गीं । स्वजनसंगीं गोगोप ॥ ३४ ॥ दिव्यांबरें परिधान केलीं । दिव्यगंधें अनुलेपिलीं । दिव्यसुमनें तुरंबिलीं । भावें अर्पिलीं मघमघित ॥ १३५ ॥§ आपा[2]द दिव्य माळा कंठीं । दिव्य रत्नें जडलीं मुकुटीं । दिव्यांगदें बाहुवटीं । दिव्य मनगटीं कंकणें ॥ ३६ ॥ दिव्यजांबूनदसुवर्णें । त्वष्टृ[3]निर्मित सर्वाभरण । अनर्घ्य खेवणां[4] दिव्य रत्न । सर्पीं प्रयत्नें लेवविलीं ॥ ३७ ॥ पाच पेरोजें[5] मुक्ताफळें । वज्र गोमेद इंद्रनीळें । जडित केले कटिमेखळे । श्रवणीं सुढाळें[6] कुंडलें ॥ ३८ ॥ चिंतामणि स्यमंतक-मणि । कौस्तुभमणि पुष्करमणि । ऐशा महामणींच्या श्रेणी । जेथ दिन[7]मणि ठेंगणा ॥ ३९ ॥ जांबूनदसुवर्णघटित । अनर्घ्य महामणिमंडित । दिव्याभरणीं सालंकृत । कमलाकांत प्रकटला ॥ १४० ॥ दिव्य कटकें वांक्या वाळे । क्षुद्रघंटिका कटिमेखळे* । मुद्रिकामंडित दशांगुळें । करपदकमळें चिह्नित ॥ ४१ ॥ या[8]मिनी सांडूनि यमुनोजनकें[9] । निघतां उदयपर्वतीं प्रभा झळके । तेंवि यमुनेंतूनि यदुनायकें । प्रकट केलें निजरूपा ॥ ४२ ॥ त्या कृष्णातें देखोनि सारे । जेंवि कां निद्रिस्त चेहरे । होती तैसे एकसरें । उठोनि सामोरे धांविले ॥ ४३ ॥

उपलभ्योत्थिताः सर्वे लब्धप्राणा इवासवः । प्रमोदनिभृतात्मानो गोपाः प्रीत्याऽभिरेमिरे ॥ १४ ॥

देखोनि कृष्णातें अवघे । जैसे निद्रिस्त होती जागे । तैसे उठिले सवेगें । चेतना वेगें आथिलें ॥ ४४ ॥ अंतःकरणीं प्रकटे स्फुरण । कां संकल्पें आलिंगिलें मन । प्रज्ञा निश्चयाचें भाजन । झाले संपूर्ण पूर्ववत् ॥ १४५ ॥ अनुसंधान† प्रकटे चित्तीं । अभिमान कवळी अहंकृति । पंचप्राणांची प्रवृत्ति । करणप्रांतीं प्रवर्तली ॥ ४६ ॥ व्या[10]न धांविला शब्दवरी । समा[11]न स्पर्शज्ञान विवरी । उदा[12]न रूपाचा विचारी । प्रा[13]ण करी रसशोध ॥ ४७ ॥ अपा[14]न गंधाचें विवरण । करावया झाला प्रवीण । श्रोत्रत्वगा[15]क्षिजिह्वाघ्राण । हा ज्ञानकरणसमुच्चय ॥ ४८ ॥ वाक्पाणिपादपा[16]यूपस्थां[17] । क्रियाचरणीं पांचही प्रशस्ता । कृष्णागमनें अवघा स्वस्था । झाला यथोक्त गोग्रा[18]म ॥ ४९ ॥ मनीं दाटले पूर्णानंद । गो‡गोपाळांचे वृंद । जैसे चकोर देखोनि चंद्र । परमानंद पावती ॥ १५० ॥

यशोदा रोहिणी नंदो गोप्यो गोपाश्च कौरव । कृष्णं समेत्य लब्धेहा आसन् लब्धमनोरथाः ॥ १५ ॥

यशोदा रोहिणी संकर्षण । नंद उपनंद बृहद्वान । वृद्धगोप अवघेजण । थोर लहान सर्वही ॥ ५१ ॥ वडजा बोबडा वांकुडा पेंधा । संवगडियांचा वृंद समु[19]दा । गोपकुमारी प्रमुख राधा । परमानंदा पावली ॥५२॥ बाळा[20] मुग्धा[21] प्रगल्भा[22] प्रौढा[23] । कन्या[24] रोहिणी[25] गौरी[26] नवोढा[27] । अज्ञातयौवना[28]

पाठभेद—§ ३५ वी ओवी येथील पोथींत नाहीं. ( मुंगीप्रत ). * जडल्या. † अथवा. ‡ गोप ( मुंगीप्रत ).

१ दृष्टीनें. २ पायांपर्यंत लोंबणाऱ्या. ३ देवांचा सुतार. ४ कोंदण. ५ वैदूर्यरत्न, 'पांची पेरोज हीरे माणिकें'—धवळे ( फा. फिरूझा ). ६ अत्यंत तेजस्वी. ७ सूर्य. ८ रात्र. ९ सूर्य. १० सर्व शरीरव्यापी वायु. ११ नाभिस्थ वायु. १२ कंठगत वायु. १३ हृदयस्थ वायु. १४ गुदस्थ वायु. १५ आक्षि-डोळा. १६ पायु-मलद्वार. १७ मूत्रद्वार. १८ इंद्रियगण. १९ सगळा. २० षोडश वर्षांची स्त्री. २१ तरुण सुंदर अशी स्त्री. २२ पतीचे इच्छेप्रमाणे वागणारी. २३ तीसपासून पन्नास वर्षांची स्त्री. २४ आठ वर्षांचे आंतील मुलगी. २५ नऊ वर्षांचे वयाची कन्या. २६ रजोदर्शन न झालेली कन्या. २७ नूतन लग्न झालेली स्त्री. २८ तारुण्यदशेस न पावलेली.

रजोगूढा । गोपी झडझडा ऊठिल्या ॥ ५३ ॥ स्मरणाथिले इंद्रियग्राम । करणीं वरिले चेष्टाधर्म । जेंवि लाहोनि कल्पद्रुम । नुरती काम *विफलत्वें ॥ ५४ ॥ अवघीं येऊनि कृष्णाप्रति । मनें नयनें आलिंगिती । ब्रह्मांनदाची विश्रांति । तुच्छ करिती या तोषें ॥ १५५ ॥ अवघे होऊनि पूर्णकाम । वेष्टूनियां पुरुषोत्तम । राहिले त्यांचें देखोनि प्रेम । होती सकाम विधिहर ॥ ५६ ॥

रामश्चाच्युतमालिंग्य जहासास्यानुभाववित् । प्रेम्णा तमंकमारोप्य पुनःपुनरुदैक्षत ।
नगा गावो वृषा वत्सा लेभिरे परमां मुदम् ॥ १६ ॥

ज्याचें ऐश्वर्य नोहे च्युत । त्यातें बलराम प्रेमभरित । आलिंगूनि बैसवीत । स्वानंदयुक्त निजांकीं ॥ ५७ ॥ वास्तव जाणे ऐश्वर्यमहिमा । पुनः पुनः वदनपद्मा । पाहोनि विस्मयें पुरुषोत्तमा । हास्य रामा न सांठवे ॥ ५८ ॥ पुनः पुनः मुखाकडे । ऊर्ध्व पाहे वाडेंकोडें । अभेदसुखाचिये चाडे । मानस वेडें वितुळलें ॥ ५९ ॥ नग म्हणिजे वृक्षवल्ली[१] । विरहें शुष्क पूर्वीं झालीं । कृष्णागमनें टवटविलीं । पाल्हायिलीं सप्रेमें ॥ १६० ॥ गाई वृष आणि वत्सें । निश्चेष्ट होती जैशीं तुच्छें । कृष्णागमें वाहोनि पुच्छें । प्रेमोत्कर्षे हुंबरती ॥ ६१ ॥ तृणवीरुधीं कुहरीं[२] कुक्षीं[३] । अनेकजाति कीटकपक्षी । ते कृष्णाच्या मुखानुलक्षीं । होती निरपेक्षी चित्सुखा ॥ ६२ ॥ ऐसा खेचरां भूचरां जलचरां । सहित अवघ्या चराचरां । कृष्णप्राप्तिप्रेमभरा–। विण दुसरा श्रम नुरे ॥ ६३ ॥ आनंदाश्रु गोपगोपी । द्राव पाझरती पादपी । ऐसा कृष्ण विश्वव्यापी । त्रिजग जोपी कृपेनें ॥ ६४ ॥ तंव पातले याचक जन । वैदिक विद्वांस[४] तपोधन । योगाभ्यासी आत्मनिपुण । नंद वेष्टून घेतला ॥ १६५ ॥

नंदं विप्राः समागत्य गुरवः सकलत्रकाः । ऊचुस्ते कालियग्रस्तो दिष्ट्या मुक्तस्तवाऽऽत्मजः ॥ १७ ॥

श्रौतें[५] स्मार्तें[६] सोमयाजी[७] । ज्योतिष्टोमादि दीक्षित व्रजीं । आशीर्वादकल्याणकाजीं । द्यावया आले व्रजपातें[८] ॥ ६६ ॥ ऐसे गुरुवर ब्राह्मणोत्तम । भूमंडळींचे कल्पद्रुम । अक्षत जोडला पुरुषोत्तम । याच्ञाकामें[९] ते आले ॥ ६७ ॥ पुत्रकलत्र परिवारेशीं । अवघे येऊनि नंदापाशीं । बोलते जाहले उत्साहेंशीं । अभ्युदयासि जाणोनी ॥ ६८ ॥ म्हणती नंदातें ब्राह्मण । सूटला कालियापासून । अक्षत आला ह्रदांतून । तंव नंदन दैवबळें ॥ ६९ ॥ कालिय केवळ प्रलयकाळ । तेणें ग्रासिला होता बाळ । प्रलयपावकीं नवनीतगोळ । भाग्यें केवळ सूटला ॥ १७० ॥ पूर्वसुकृताचें बळ । तें अमुष्टीं होतें सबळ । म्हणोनि चुकली काळवेळ । भाग्यें घननीळ भेटला ॥ ७१ ॥ मरोनि फिरोनि भेटी आला । एवढा उत्साह भाग्यें झाला । दानें देईं ब्राह्मणांला । तेणें विघ्नाला उपशम ॥ ७२ ॥

देहि दानं द्विजातीनां कृष्णनिर्मुक्तिहेतवे । नंदः प्रीतमना राजन् गाः सुवर्णं तदाऽदिशत् ॥ १८ ॥

नंद ऐकोनि आर्यवाणी[१०] । हर्षभरित अंतःकरणीं । सालंकृता धेनु सुवर्णीं । तयां लागूनि

---

**पाठभेद :—***सुफलत्वें ( मुंगीप्रत ).

१ वेली. २ गुहा. ३ पर्वताचा कडा. ४ विद्वान्. ५ वेदोक्त कर्म करणारे. ६ स्मृत्युक्त कर्म करणारे. ७ सोमयज्ञ करणारे. ८ नंदाला. ९ याचनेच्या इच्छेनें. १० श्रेष्ठांचें भाषण.

संकल्पी ॥ ७३ ॥ कृष्णप्राप्तीचा आनंद । कैवल्यप्राप्ति त्याहूनि मंद । तेणें उत्साहभरित नंद । याचकवृंद गौरवी ॥ ७४ ॥ कृष्णप्राप्तीच्या उत्साहगजरीं । दीनता पळाली सपरिवारीं । तेथें दैन्य कोण करी । झाले भिकारी धनाढ्य ॥ १७५ ॥ मृत्तिका पाषाण ओषधिबीजें । त्यांच्या संग्रहें म्हणविती राजे । तैसे नव्हेती सभाग्य जे जे । कृष्णप्राप्तिवैभवें ॥ ७६ ॥ येरीकडे यशोदा सती । तैशीच रोहिणी परमसुमती । आणि व्रजींच्या समस्त युवती । चकारार्थीं शुक बोले ॥ ७७ ॥

यशोदाऽपि महाभागा नष्टलब्धप्रजा सती । परिष्वज्यांकमारोप्य मुमोचाश्रुकलां मुहुः ॥ १९ ॥

प्राणापरीस जें पढियंतें । कृष्णनिधान हरपलें होतें । तें दैवें जोडलें मागुतें । प्रेमें बहुतें आलिंगी ॥ ७८ ॥ *अनपत्यता[1] अमंगळ । दैवें उजळलें कपाळ । पोटीं जन्मला घननीळ । तैंहूनि सफळ संसार ॥ ७९ ॥ श्रीकृष्णाच्या पुत्रपणें । विसरलें होतें जे वेदनें । डोहीं प्रवेशोनियां येणें । पुन्हा शतगुणें दाविली ॥ १८० ॥ ढका लागतां दुखते वर्मी । जैशी †प्रणांत दाटे ऊर्मी । तैशी अनपत्यतादुःखधामीं । पडतां पैं दुखवतें ॥ ८१ ॥ आजिचें चुकलें परम विघ्न । काळें गिळिला मधुसूदन । पुन्हा भेटला दैवेंकरून । झालें वदन उजळतें ॥ ८२ ॥ ऐसा अंकीं घेऊनि हरि । यशोदा विलपे नानापरी । कृष्ण सुस्नात अश्रुधारीं । भोंवत्या नारी सबाष्पा[2] ॥ ८३ ॥ रोहिणी म्हणे कृष्णा-विणें । दुःखें बलराम जातां प्राणें । सर्वां मृत्यु एका मरणें । कृष्णागमनें तो चुकला ॥ ८४ ॥ म्हणती समस्त व्रजींच्या नारी । कृष्णवियोगदुःखसागरीं । बुडाली होती हे व्रजपुरी । पुन्हा बाहेरी काढिली ॥ १८५ ॥ महाभाग्याची तूं यशोदे । परम सुकृत केलें नंदें । तेणें पुढती श्रीमुकुंदें । वदनारविंदें उजळिलीं ॥ ८६ ॥ कृष्णहानि स्मरोनि शोक । पुढती अलभ्यलाभाचा तोष । कुरवाळूनियां श्रीकृष्णमुख । पावल्या संतोष समस्ता ॥ ८७ ॥

तां रात्रिं तत्र राजेंद्र क्षुत्तृड्भ्यां श्रमकर्शिताः । ऊषुर्व्रजौकसो गावः कालिंद्या उपकूलतः ॥ २० ॥

मग सांडूनि यमुनातीर । निघालीं आनंदें निर्भर । उपकूल[3] म्हणिजे जवळ ना दूर । तेथ स्थिर जाहलीं ॥ ८८ ॥ उपकूल यमुनाप्रांतीं । कालियविषा वेगळी स्थिति । विशाल तृणें वाढलीं होतीं । केली वसति ते स्थळीं ॥ ८९ ॥ तृणावेगळा निर्मळ ठाय । टाकावया न चलती पाय । क्षुधे तृषेचा लागतां धाय । झाला विलय[4] धृतीचा ॥ १९० ॥ कृष्णवियोगें व्याकुळ । होऊनि धांविन्नले सकळ । वस्त्रान्नेंवीण विकळ । पुढील सांभाळ तैं कोणा ॥ ९१ ॥ यालागीं श्रमाच्या दाटल्या निजा । म्हणूनि तृणाच्या करूनि शेजा । निद्रिस्त झाले ऐशिये वोजा । अधोक्षजा कवळूनी ॥ ९२ ॥ म्हणाल वनफळें आणून । कां ते न करिती क्षुधाहरण । तरी सवेगें झाला अस्तमान । न पुरे अवसान फलग्रहणीं ॥ ९३ ॥ आणि श्रीकृष्णाचें पाहतां वदन । क्षुधेतृषेची आठवण । निशेःष गेली

**पाठभेदः—*** अनापत्या † प्राणांत ( मुंगीप्रत )

१ अपत्य न होणें. २ ज्यांच्या डोळ्यांतून अश्रु गळतात त्या. ३ तीराच्या जवळ. ४ नाश.

हारपोन । मनें उन्मन हरिवेधें ॥ ९४ ॥ ऐशा गाई व्रजौकस । यमुनोपकूलीं निवास । रात्रीं करूनि सावकाश । राया अशेष राहिले ॥ १९५ ॥

तदा शुचिवनोद्भूतो दावाग्निः सर्वतो व्रजम् । सुप्तं निशीथ आवृत्य प्रदग्धुमुपचक्रमे ॥ २१ ॥

ऐसा निद्रिस्त अवघा व्रज । तंव दावाग्नि तेजःपुंज । ग्रीष्मकाळींचा धूम्रध्वज[१] । महासुतेज प्रज्वळला ॥ ९६ ॥ शुचि म्हणिजे आषाढमास । ग्रीष्म विशेषें कर्कश । शुष्कतृणें वनहुताश[२] । पवनावेशें[३] माजला ॥ ९७ ॥ अथवा अशुचिवनोद्भूत[४] । दावाग्नि तो असंस्कृत[५] । परम हिंसक नियम-रहित । ऐसा अर्थ घडेल ॥ ९८ ॥ विशेष प्रेरिला चंडवातें । अवघीं व्रजौकसें प्रसुप्तें । मध्यरात्रीं वेष्टूनि तेथें । जाळावयातें प्रवर्तला ॥ ९९ ॥

तत उत्थाय संभ्रांता दह्यमाना व्रजौकसः । कृष्णं ययुस्ते शरणं मायामानुषमीश्वरम् ॥ २२ ॥

वणवा झगटी[६] झाडां खोडां । वृक्ष फुटती कडकडां । अग्नि धांवतसे भडभडां । गाई हंबरडा फोडिती ॥ २०० ॥ शुष्कें तृणें सलंब सरळ । तेणें गगनीं लागती ज्वाळ । घाबरोनि उठिले सकळ । बाळ गोपाळ व्रजौकस ॥ १ ॥ पडला प्रळयाग्नीचा वेढा । मार्ग न फुटे कोणीकडां । गाईगोधना हंबरडा । चहूंकडे आकांत ॥ २ ॥ पूर्वपश्चिमांची[७]* निद्रा डोळां । घाबिरे उठोनि देखती ज्वाळा । म्हणती वरपड[८] जालों काळा । मग गोपाळा आश्रयिती ॥ ३ ॥ जो कां ईश्वर श्रीभगवान । मायिक नटला मनुष्यपण । त्या कृष्णातें जाती शरण । प्राणरक्षण करावया ॥ ४ ॥

बल्लवा ऊचुः — कृष्ण कृष्ण महाभाग हे रामामितविक्रम । एष घोरतमो वह्निस्तावकान् ग्रसते हि नः ॥२३॥

ऐसें आक्रंदतां गोप । दैवें स्मरला प्रकाशदीप । गर्गमुनीचा भविष्यकल्प । सुगम सकृप हरि सुचला ॥ २०५ ॥ जो हा नंदाचा नंदन । तोचि प्रत्यक्ष श्रीभगवान । त्यासि अवघे होऊनि शरण । दावाग्निशमन वांछिती ॥ ६ ॥ महायोगियांचा राजा । ऐकें कृष्णा अधोक्षजा । आम्ही व्रजौकसें तुझिया प्रजा । धूम्रध्वजा सांपडलों† ॥ ७ ॥ अगा स्वामी संकर्षणा । अमितविक्रमा[९] पृथ्वीधरणा । आमुचे प्रवर्तें संरक्षणा । घोर कृशानें[१०] ग्रासितां ॥ ८ ॥ घोराहूनि घोरतम । प्रचंड-प्रलयपावक हा विषम । करूं पाहे आमुचा होम । याचा उपशम तूं करीं ॥ ९ ॥ वणवा जाळील तावकांतें[११] । तैसें न घडावें उपरतें[१२] । यास्तव रक्षीं शरणागतें । स्नेहें अंकितें आपुलीं ॥ २१० ॥

सुदुस्तरान्नः स्वान्पाहि कालाग्नेः सुहृदः प्रभो । न शक्नुमस्त्वच्चरणं संत्यक्तुमकुतोभयम् ॥ २४ ॥

मृत्युरूप हा कृष्णवर्त्मा[१३] । यापासूनि रक्षीं आम्हां । निजशरणागतें पुरुषोत्तमा । न करीं दुर्गमा वरपडें ॥ ११ ॥ दुःखें तरूं न शकती कोणी । स्थावर जंगम समस्त प्राणी । कालरूप हा दावाग्नि ।

---

**पाठभेद** — *भ्रमाचि ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ) हाच पाठ शुद्ध वाटतो. † वर पडलों.

१ अग्नि. २ वणवा. ३ वाऱ्याच्या जोरानें. ४ अशुद्ध वनांतून उत्पन्न झालेला. ५ अपवित्र. ६ झाडणें, झटकणें. पहा–'हस्तीं झगटी कबरीभार'—नवनाथभक्तिसार. ७ पूर्वरात्र व उत्तररात्र यांची. ८ बळी. ९ अतर्क्य पराक्रम ज्याचा तो. १० अग्नीनें. ११ तुझ्या भक्तांस. १२ पश्चात्ताप पावलेली, याचा "शरणागतें" याकडे संबंध. १३ अग्नि.

सुहृद यांतुनि वांचवीं ॥ १२ ॥ दुस्तराहूनि दुस्तर घोर । त्यातें म्हणावें सुदुस्तर । प्रभु प्रभुत्वें तत्परपार । स्वकीय समग्र पाववीं ॥ १३ ॥ आम्ही न घेवों मृत्युभेवे । परी चरणवियोग न साहवे । यालागीं कृपेनें आघवें । स्वकीय रक्षावे विभुत्वें ॥ १४ ॥ स्वामी तुझें चरणारविंद । सच्चित्सुखांकुराचा कंद । सर्वदा निर्भय निर्द्वंद्व । अगाधसिंधु स्वसुखाचा ॥ २१५ ॥ आमुचे हृदयीं त्याचें स्मरण । *दावाग्नि ओपी जैं दुर्मरण । हें †कोणतें न्यून पूर्ण । तें तूं सर्वज्ञ जाणसी ॥ १६ ॥

इत्थं स्वजनवैक्लव्यं निरीक्ष्य जगदीश्वरः । तमग्निमपिबत्तीव्रमनंतोऽनंतशक्तिधृक् ॥ २५ ॥

ऐसे दावाग्निग्रस्त स्वजन । त्यांचें देखोनि विकळपण । अचिंत्यैश्वर्य श्रीभगवान । जगज्जीवन जगदीश ॥ १७ ॥ अनंतशक्तीचा धर्ता । ऐसा अनंत निजात्मसत्ता । झाला दावानळा प्राशिता । शरणागतां रक्षोनी ॥ १८ ॥ दावाग्नि जो कां परमतीव्र । त्यातें प्याला नंदकुमार । परीक्षितीतें समाचार । शुकें समग्र हा कथिला ॥ १९ ॥ श्रीमद्भागवतीं हे कथा । दशमस्कंधीं मात्स्यीसुता । शुकें कथिलीं तैशी श्रोतां । परिसोनि दुरिता नाशावें ॥ २२० ॥ श्रीमदेकनाथान्वयीं । चिदानंदें स्वानंदगेहीं । गोविंदसद्गुरुशेषशायी । दयार्णवहृदयीं जलशयन ॥ २१ ॥ त्याचिया पादोदकाचे यात्रे । हरिहरब्रह्मादि प्राणिमात्रें । येऊनि करिती अमळ स्तोत्रें । पुण्यचारित्रें वर्णिती ॥ २२ ॥ तया श्रवणसुखामृतपाना । अधिकार कैसा असुरां जनां । तें एक लोंहणें चरणशरणा । कीं सज्जनां सत्पुरुषां ॥ २३ ॥ कालियाचा दुर्मद हरिला । वरे ‡स्वस्थाना धाडिला । जळतां स्वजन वांचविला । चंडदावाग्नि प्राशूनी ॥ २४ ॥ इतुकेनि संपला सप्तदश । अष्टादशीं श्रोतयांस । निरूपिजेल जो इतिहास । तो समास अवधारा ॥ २२५ ॥ अष्टादशीं ग्रीष्मऋतु । वसंतगुणें उपलक्षितु । आणि प्रलंबाचा धातु । करवी अनंत ¶बळहस्तें ॥ २६ ॥ दयार्णवाची वरदवाणी । सर्वव्यापी चक्रपाणि । भाऊनि भगवत्कथाश्रवणीं । आळस कोणीं न करावा ॥ २७ ॥‡ इति श्रीमद्भागवते महापुराणे अष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीपरिक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां कालियनिर्यापणं दावाग्निप्राशनं नाम सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक २५ ॥ टीकाओव्या ॥ २२७ ॥ एवंसंख्या ॥ २५२ ॥ श्रीगुरुशिवाय नमः ॥ (सतरावा अध्याय मिळून ओवीसंख्या १००६९).

**सतरावा अध्याय समाप्त.**

---

**पाठभेद**— *आणि. †कोण्हातें ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡वरदे ( उमरखेडप्रत ). ¶हळी ( बलराम ) ( मुंगीप्रत ); बळ ( उमरखेडप्रत ). ‡( पाठभेदाची ओवी ) कृष्णें प्राशिला वडवानळ । त्या श्रवणार्थी मन आकळ । होता भव नाशिला समूळ । त्र्यंबकरायें एकदाची ॥ २८ ॥ ( ही ओवी येथील पोथींत आहे.) (मुंगीप्रत); उमरखेडप्रतींत ही अधिक ओवी नाहीं.

१ त्या संकटाचे दुसऱ्या तीरास. २ सत्यस्वरूप, ज्ञानस्वरूप, आनंदस्वरूप यांचा अंकुर. ३ एकनाथाच्या वंशांत. ४ गोविंदसद्गुरु हाच शेषशायी म्ह. श्रीविष्णु. ५ प्राप्त होणें. ६ संक्षेप.

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय १८ वा

श्रीमद्गोविंदात्मने नमः । अनिष्टहरणा[1] अभीष्ट[2]करणा । नमो सद्गुरो करुणापूर्णा । स्वकारुण्यें अबुधोद्ध[3]रणा । शरणागतवत्सला ॥ १ ॥ स्वसंवेद्य ब्रह्म निर्गुण । तेथ मिथ्या मायास्फुरण । होतां भ्रमासि अधिष्ठान । द्वैतभव[4]भान भासलें ॥ २ ॥ जागतांचि निद्राधारें । स्वप्नसृष्टीमाजीं भरे । नाथिलेंचि मानी खरें । मग वोथरे सुखदुःखें ॥ ३ ॥ तैशा मायेच्या दोन्ही शक्ती । आव[5]रणविक्षे[6]प ज्यांतें म्हणती । दोहींमाजीं एकचि भ्रांति । दावी लपवी *उभयत्र ॥ ४ ॥ वास्तवबोधाचा जो विसर । आवरणशक्ति तें साचार । विक्षेपरूपें बोधपर । मानी ईश्वर आपणा ॥ ५ ॥ कनक[7]बीजांची भरली भुली । राजप्रतिष्ठा भ्रमें धरिलीं । क्षणैक तेथूनि धांव घाली । अ[8]वगे चाली अनेका ॥ ६ ॥ तैसा सर्वज्ञ आणि सर्वकर्ता । सर्वसाक्षी सर्वनियंता । ऐशी समष्टिउपाधि जडतां । पुन्हां मूढता स्वीकारी ॥ ७ ॥ मुळींचें आवरितां वस्तुत्व । कवळीं विक्षेपें साक्षित्व । तेंहि आवरितां मूढत्व । गाढ शून्यत्व उपलभे ॥ ८ ॥ तमें †स्वशून्यत्व केलें । तें मालिन सत्या विक्षेपिलें । स्वप्नजागृतिरूपें स्फुरिलें । विपरीत ज्ञान दृश्यत्वें ॥ ९ ॥ ‡पंचभूतें त्रिगुणात्मक । वास्तवविसरें विक्षेप मुख्य । ते हे अविद्या पृथक । योनि अनेक प्रस्फुरवी ॥ १० ॥ ऐसा शिवजीवत्वें सभेद§ । कवळूनि विवळे अवेदवेद । स्वयें नेणोनि सच्चिदानंद । विषयानंद अवलंबी ॥ ११ ॥ तया विषयसुखाच्या लाभें । अनिष्ट इष्टत्वें कवळीं क्षोभें । तें परिहरूनि अभीष्टलाभें । निजात्मप्रभे मेळाविती ॥ १२ ॥ चंद्र परिपूर्ण परिमळें । कीं गार सबाह्य कोंदली जळें । तेवीं करुणापूर्णें श्रीदयाळें । अबुधें अबळें तारिलीं ॥ १३ ॥

---

**पाठभेद :—** * सर्वत्र ( मुंगीप्रत ); उभयत्र ( उमरखेडप्रत ). † सर्व ( मुंगीप्रत ), स्व ( उमरखेडप्रत ). ‡ येचों. § जीवशिवत्वें भेद ( मुंगीप्रत ); शिवजीवत्वें भेद ( उमरखेडप्रत ).

१ विघ्ननाशक. २ प्रिय करणारा. ३ अज्ञ जनांचा उद्धार करणारा. ४ परमात्मा आणि जीवात्मा यांमध्यें भिन्नता भासविणारा जो प्रपंच त्याचें स्मरण. ५ सत्यज्ञानाचें विस्मरण. ६ चित्तवैकल्य. ७ धोतऱ्याचें बीं. ८ जाणतो.

स्वकीयांचे करुणेसाठीं । पूर्णकारुण्यें कळवळूनि पोटीं । नटूनि सगुणपणाचे नेटीं । स्वबोधे गोष्टी प्रकटिसी ॥१४॥ जाणोनि सप्रेम स्वचरणाशरण । तद्वात्सल्यें जाकळून । बळेंचि आणिसी । बोधें* वेधून सद्भावीं ॥ १५ ॥ जैशी जातमात्र तोकीं । स्तनपानीं अनोळखी । माता बळेंचि घालुनि मुखीं । तर्पणतोखीं लांचवी ॥ १६ ॥ अविद्याभ्रमाची निरसतां भुली । मिथ्या भवसुखें जाणवलीं । निजात्मतृप्ति वास्तव रुचली । गुरुमाउलीप्रसादें ॥ १७ ॥ तेथें कायावाचामनें । अव्यभिचारें[३] दास्य करणें । नमनें स्मरणें अनन्यपणें । भिन्न नुरणे† वरभाग्यें ॥ १८ ॥ यया महद्भाग्याकारणें । कठोर तपें पुरश्चरणें । आचरिताती सकामपणें । उदारकरुणें पुरवावें ॥ १९ ॥ ऐकोनि म्हणती सद्गुरुनाथ । कैंचा भेदासि ठाव एथ । अभेदैं[३]बोधा ओपूनि ग्रंथ । वदवूं यथार्थ तव वदनें ॥ २० ॥ येणें वरें‡ दयार्णव । स्वामिकृपेचें गौरव । लाहतां प्रज्ञा कवळी हांव । वासुदेवगुणकथनीं ॥ २१ ॥ दशमस्कंधींचा अष्टादश । अध्यायगर्भींचा कथाविशेष । श्रवणें भवाचा करी नाश । स्वप्रकाश प्रकटूनी ॥ २२ ॥ अष्टादशीं ग्रीष्मकाळ । वसंतगुणें सुशीतळ । तेथ स्कंधीं[४] वळघोनि बळ ॥ वधी तत्काळ प्रलंबा ॥ २३ ॥ कालियफणां यमुनाजळीं । स्वयें नाचोनि वनमाळी । आतां अग्रजाची पाळी ॥ नभोमंडळीं नाचवी त्या ॥ २४॥ प्रलंबखांदां उच्चतर । बैसवूनियां बलभद्र । करितां नभोगर्भीं संचार । करवी संहार तयाचा ॥ २५ ॥ इतुकी कथा अष्टादशीं । शुक निरूपी कुरुवर्यासी । श्रोतीं बैसोनि तत्पंक्तीसी । श्रवणामृतासी सेवावें ॥ २६ ॥

श्रीशुक उवाच — अथ कृष्णः परिवृतो ज्ञातिभिर्मुदितात्मभिः ।
अनुगीयमानो न्यविशद् व्रजं गोकुलमंडितम् ॥ १ ॥

कालीय दवडूनि यमुनाजळ । केलें अमृतोपम निर्मळ । स्वजनांसाठीं दावानळ । गिळी गोपाळ हे गतकथा ॥ २७॥ यानंतरें तो श्रीकृष्ण । सुहृदस्वजनीं परिवारोन । परमानंदें व्रजभुवन । गोधनेशीं प्रवेशला ॥ २८ ॥ श्रीकृष्णवियोगाचें दुःख । कृष्णदर्शनें गेलें निःशेष । तेणें ज्ञातीसि परमसुख । पाहती मुख सप्रेमें ॥ २९ ॥ दावानळें जळतां स्वजन । श्रीकृष्णें रक्षिले त्यापासोन । तेणें ज्ञाति सुखसंपन्न । गुणवर्णन करिताती ॥३०॥ म्हणती कृष्ण ऐश्वर्यनिधि । एक म्हणती विशाळबुद्धि एके याचिये सन्निधी[५] । सिद्धी समृद्धि म्हणताती ॥ ३१ ॥ एक म्हणती तूं ईश्वर । एक म्हणती करुणाकर । एक म्हणती मनोहर । सुखसागर सर्वार्थीं ॥ ३२ ॥ एक वर्णिती अनेक यशें । एक कवळिती§ स्नेहावेशें । एक सप्रेम मानसें । सुखसंतोषें तोषती ॥ ३३ ॥ एक नाचती कृष्णापुढें । एक वीजिती[६] ‖देव्हडे[७] । एक वर्णिती पवाडे । दैत्य गाढे वधिले ते ॥ ३४॥ एक वाजविती

पाठभेदः— * बुद्धि ( मुंगीप्रत ); बोधें ( उमरखेडप्रत ). † नुरवणे. ‡ वरदे ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). § वर्णिती. ‖ देहुडे ( मुंगीप्रत ); दे०हडें ( उमरखेडप्रत ).

१ सोंगांनीं. २ अनन्यभावें. ३ जीवात्मा व परमात्मा यांचें ऐक्य असें ज्ञान. ४ खांद्यावर. ५ जवळ. ६ वारा घालिती. ७ बलाढ्य.

पेंपौरी । एक वाजविती मोहेरी । एक पावे तल्लालोरी[3] । गोप गजरीं चालती ॥ ३५ ॥ एक करिती सुमनवृष्टि । पुष्पें खोंविती कृष्णमुकुटीं । कृष्णगुणांच्या वदती गोष्टी । सुखसंतुष्टि स्वानंदें ॥ ३६ ॥ ऐसा अनुगीयमान[4] हरि । प्रवेशता झाला व्रजपुरीं । तेथींची ही नवलपरी । शुकवैखरी वर्णितसे ॥ ३७ ॥ उदयाचळीं अंशुमाळी[5] । झळकोनि समस्त दिशा धवळी । तेंवि स्वप्रवेशें वनमाळी । करी गोकुळीं मंडन[6] ॥ ३८ ॥ जैसें सुप्तांचें शरीर । भासे केवळ प्रेताकार । ऐसें उद्वस[7] जें व्रजपुर । प्रवेशें श्रीधर शोभवी ॥ ३९ ॥ गाई हुंबरती स्नेहभरें । देती प्रतिवचनें वांसुरें । प्रेमपान्हा स्तनीं न धरे । दुग्ध पाझरे भूमंडळीं ॥ ४० ॥ गोप गोपी घरोघरीं । प्रवर्तती निजव्यापारीं । पाहती कृष्ण अभ्यंतरीं । क्रिया संसारीं तद्वेधें ॥ ४१ ॥ ऐसें गोकुल मंडित । व्रजीं प्रवेशला कृष्णनाथ । इतुका सांगुनि वृत्तांत । कथा कथी तयापुढें ॥ ४२ ॥

व्रजे विक्रीडतोरेवं गोपालच्छद्ममायया । ग्रीष्मो नामर्तुरभवन्नातिप्रेयान् शरीरिणाम् ॥ २ ॥

ऐशिया परी मधुसूदन । व्रजीं करूनि गोपालन । आपुलें ऐश्वर्य आच्छादून । म्हणवी नंदन नंदाचा ॥ ४३ ॥ गोपालच्छद्में[8] हरि । व्रजीं क्रीडतां निरंतरीं । ग्रीष्मऋतु स्वसामग्री । प्रकट करी निजकाळीं ॥ ४४ ॥ वनश्रीवनितेचा[9] कांत । सर्वांसि प्रियकर वसंत । तो होतांचि तिरोहित[10] । मानिती समस्त अप्रिय ॥ ४५ ॥ जैसें पर्युषित[11]भोजन । तेंही करी क्षुधाहरण । परंतु प्रियतम जैसें उष्ण । तैसें अनुष्ण[12] नोहे कीं ॥ ४६ ॥ वसंताहूनि *तैसा ग्रीष्म । न वाटे अत्यंत प्रियतम । एरवीं करी योगक्षेम[13][14] । यथाकाम अवघेची ॥ ४७ ॥ ग्रीष्मीं भ्रमती चक्रवात[15] । तेणें प्राणी क्लेशभूत । जळें आटिलीं समस्त । तेणें आक्रांत जलचरां ॥ ४८ ॥ ग्रीष्मीं वाळूनि गेलिया तृणें । वणवां †जळती शुष्कपर्णें । तेथें जंतु मुकती प्राणें । स्थावर जंगम अनेक ॥ ४९ ॥ औषधिशस्यां[16] होय झाडी । भूचरखेचरां क्षुधा पीडी । फळें निःशेष होती झाडी । बळें झडाडी दुर्वातें ॥ ५० ॥ मही संतप्त चंडकिरणें । श्रम पावतीं श्वापदें हरणें । पश्वादिकां न मिळतीं तृणें । मानवें उष्णें करपती ॥ ५१ ॥ पांथ चालों न शकती वाट । ऐसा ग्रीष्मकाळ कनिष्ठ । वृंदावनीं श्रीवैकुंठ । करितो श्रेष्ठ सुखतमें ॥ ५२ ॥

स च वृंदावनगुणैर्वसंत इव लक्षितः । यत्राऽऽस्ते भगवान्साक्षाद्रामेण सह केशवः ॥ ३ ॥

ऐसा ग्रीष्म तापकर । तोही वृंदावनीं शीतलतर । तेणें भासे वसंताकार । हें विचित्र तेथींचें ॥ ५३ ॥ ऐसे अनेक उत्तम गुण । जेणें निवती समस्त जन । तिहीं करूनि वृंदावन । वसंतासमान ग्रीष्मींही ॥ ५४ ॥ तें व्हावया काय विशेष । बळरामेंशीं श्रीपरेशें[17] । षड्गुणैश्वर्यांचा

**पाठभेद** :— *जैसा. †जाळी ( मुंगीप्रत ), जळती ( उमरखेडप्रत ).

१ पिपाणी. २ पुंगी. ३ तालबद्ध. पहा—‘ मोहऱ्या पांवे तलालोरी । नाचती गजरीं गीत गाती । ’ —निळोबा गाथा. ४ वर्णिला गेलेला. ५ सूर्य. ६ शोभा. ७ ओसाड. ८ गाई राखण्याच्या मिषानें. ९ वनशोभा हीच स्त्री. १० गुप्त. ११ शिळें. १२ निवालेलें. १३ द्रव्यप्राप्ति. १४ द्रव्यरक्षण. १५ वावटळी. १६ वनस्पति व धान्यें. १७ श्रीपरमात्मा—श्रीकृष्ण

ईश । लीलाविलास जेथ करी ॥ ५५ ॥ तरी वसंतेंशीं समान । जिहीं गुणीं तें वृंदावन । तया गुणांचें शुक भगवान । करी वर्णन चौश्लोकीं ॥ ५६ ॥

यत्र निर्झरनिर्ह्रादनिवृत्तस्वनझिल्लिकम् । शश्वत्तच्छीकरर्जीषद्रुममंडलमंडितम् ॥ ४ ॥

जया वृंदावनाचे ठायीं । ग्रीष्मकाळींही सजला[1] मही । जळें स्रवती ठायीं ठायीं । ध्वनि प्रवाहीं ऊठती ॥ ५७ ॥ उच्च स्थळींची पडतीं उदकें । तया प्रतापें फुटतीं खडकें । घोषें दणाणिती तवकें[2] । लोपतीं झिल्लिकां[3]गायनें ॥ ५८ ॥ झिल्लि म्हणिजे सूक्ष्मकीट । परंतु ज्यांचा कठोर कंठ । कर्कश ध्वनीची कटकट । करिती बोभाट सर्वदा ॥ ५९ ॥ जलप्रपात[4]घोषापुढें । झिल्लिकांचें तें गायन दडे । ऐसा वृंदावनीं चहूंकडे । शीतल सुरवाडे[5] भूभाग ॥ ६० ॥ प्रस्रवोदकांचे अंबुकण । पवनें विखुरतां भासे घन । तया मार्दवें पादपगण । सुरवाडोनि लसलासिती ॥ ६१ ॥ *द्रुमीं ओळघल्या[6] वल्ली लता । पत्रीं फळीं सुपुष्पिता । तेणें निदाघ[7] न वाटे भूतां । जीवां समस्तां आनंद ॥ ६२ ॥ ऐशीं द्रुमांचीं मंडलें । ठायीं ठायीं अतिकोमळें । वसंतासम ग्रीष्मकाळें । सुख आगळें तद्योगें ॥ ६३ ॥

सरित्सर:प्रस्रवणोर्मिवायुना कह्लारकंजोत्पलरेणुहारिणा ।
न विद्यते यत्र वनौकसां दवो निदाघवह्न्यर्कभवोऽतिशाद्वले ॥ ५ ॥

निदाघ शब्दें ग्रीष्मकाळ । ते काळींचा अर्क अनळ । बाधूं न शकेचि अळुमाळ[8] । अति शाद्वलभूभागीं ॥ ६४ ॥ शाद्वलें म्हणिजे हरितें[9] तृणें । लसलासित जीं कोमळपणें । त्यांच्या आंगींच्या शीतलगुणें । प्राणी उष्णें न पोळती ॥ ६५ ॥ अथवा शाद्वलें[10]तीत जे मही । ताप न बाधी ते ठायीं । म्हणसी याचें कारण कायी । हे सुरसायी[11] पवनाची ॥ ६६ ॥ सरिता आणि सरोवरें । हेलावती ऊर्मिभरें । आणि प्रस्रवती निर्झरें । तें तें समीरें झगटती ॥ ६७ ॥ प्रस्रवाचे अंबुकण । जलोर्मींचें शीतलपण । कंजोत्पलांचे परागरेण । घेऊनि पवन प्रवाहे ॥ ६८ ॥ कल्हारें जीं जलप्रसूतें । कंजें म्हणिजे साधारणें । उत्पलें जीं रविशशिकिरणें । कुमुदें पयोजें[12] ज्या म्हणती ॥ ६९ ॥ याच्या योगें अतिसुगंध । द्रुमांमाजोनि मंदमंद । जलसंयोगें शीतलसुखद‡ । वायु त्रिविध प्रवाहे ॥ ७० ॥ तया वायूच्या संस्पर्शें । संताप नेणती वनौकसें । ग्रीष्मीं कुसुमाकरासरिसें । सुख उल्हासें क्रीडती ॥ ७१ ॥

अगाधतोयह्रदिनीतटोर्मिभिर्द्रवत्पुरीष्या: पुलिनै: समंतत: ॥
न यत्र चंडांशुकरा विषोल्बणा भुवो रसं शाद्वलितं च गृह्णते ॥ ६ ॥

राया म्हणसी ग्रीष्मकाळीं । कैंचीं शाद्वलें भूतळीं । तेही गोष्टी जाईल कथिली । तुवां ऐकिली

पाठभेद :— * द्रमी. ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡ सुगंध ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ जलसहित. २ आवेशाने. ३ एक प्रकारचा किडा. ४ पाण्याचा धवधबा. ५ शोभे. ६ चढल्या. ७ उष्मा. ८ किंचित्. ९ हिरवीं. १० हिरव्या गवताच्या भूमीस मागें टाकणारी म्ह. तीहून अधिक. ११ सुरसपणा. १२ जलोत्पन्न.

पाहिजे ॥ ७२ ॥ हृदिनीं म्हणिजे नदीप्रवाहीं । अगाध जीवनें भरलीं डोहीं । ऊर्मिकल्लोळ उठतां पाहीं । पुलिनीं दोहीं धांवती ॥ ७३ ॥ तेणें पुलिनें सपंक होती । वृंदावनीं सभोंवतीं । तेणें तृणें लसलसिती । ज्यांतें म्हणती शाद्वलें ॥ ७४ ॥ ऐशिया हरिततृणाच्या ठायीं । प्रस्रवतुषारनि[1]स्यंद मही । शीतळ पवनाचे प्रवाहीं । किरणें कांहीं न तपती ॥ ७५ ॥ विषाहूनि तीव्रतर । ग्रीष्मरश्मि जे *कडतर । कोणा न वाटती दुष्कर । हा प्रकार हरियोगें ॥ ७६ ॥

वनं कुसुमितं श्रीमन्नदच्चित्रमृगाद्विजम् । गायन्मयूरभ्रमरं कूजत्कोकिलसारसम् ॥ ७ ॥

इत्यादिगुणीं गुणसंपन्न । लावण्यलक्ष्मीविराजमान । परम पावन वृंदावन । वेधी तनुमन जनाचें ॥ ७७ ॥ वृंदावनींच्या श्वापदश्रेणी । निसर्गनिर्वैर अंतःकरणीं । परमानंदें निर्भर मनीं । संतोषोनि गर्जती ॥ ७८ ॥ चित्रविचित्र मृगांच्या याति । सुखसंतोषें क्रीडताती । परस्परें संवादती । रोमंथिती उत्साहें ॥ ७९ ॥ तैसे चित्रविचित्र पक्षी । बैसोनियां नाना वृक्षीं । आठवूनियां हृदयसें[2]ाक्षी । तो स्व[3]चक्षीं लक्षिती ॥ ८० ॥ जैसे मस्[4]करी वेदांती । उपनिषद्वाक्यविवरणें गाती । तैसे हंस संवादती । श्रीकृष्णकीर्तिगुणगानें ॥ ८१ ॥ सुमनीं कमळीं विचित्र भ्रमर । हरिकीर्तनीं रुंजती मधुर । प्रेमें नाचती मत्तमयूर । मेघ सुंदर लक्षूनी ॥ ८२ ॥ कोकिळा कूंजती पंचमालापें । सारसें सरोवरीचीं ओं[5]पें । लक्षूनि श्रीकृष्णसारूप्यें । भवसंतापें न †तपती ॥ ८३ ॥ सुख संतोषें करिती रॉ[6]व । । गिळोनि देहींचा अहंभाव । कोटिजन्मांचें फळलें दैव । मानिती सदैवें[7] हरियोगें ॥ ८४ ॥ ऐशिया अनेक जीवश्रेणी । निष्कामभावें सुकृताचरणीं । अभेदप्रेमें मिळोनि कृष्णीं । वृंदावनीं वसताती ॥ ८५ ॥

क्रीडिष्यमाणस्तत्कृष्णो भगवान् बलसंयुतः । वेणुं विरणयन् गोपैर्गोधनैः संवृतोऽविशत् ॥ ८ ॥

ऐशिया वृंदावनाप्रति । क्रीडावयाची आवडी चित्तीं । धरूनि प्रवेशला श्रीपति । सहित सुमति बळराम ॥ ८६ ॥ आंगीं ऐश्वर्याची गारिमा[8] । प्रकट कळों नेदी अधमा । गोपनाट्यां[9]च्या संभ्रमा- । माजीं चंद्रमा जेंवि घनीं ॥ ८७ ॥ भोंवते अनेक गोपाळ । वेणु वाजविती मंजुळ । तेणें गोधनाचा मेळ । तन्मय केवळ हरिवेधें ॥ ८८ ॥ गोप गोधनें संकर्षण । मध्यें वेष्टूनियां श्रीकृष्ण । प्रवेशले वृंदावन । गुणसंपन्न पूर्वोक्त ॥ ८९ ॥ तेथ क्रीडा केली कैशी । नरवैडूर्या[10] जरी हें पुससी । अलंकारले ज्या ज्या वेशीं । तें तुजपाशीं सांगतों ॥ ९० ॥

प्रवालबर्हस्तबकस्रग्धातुकृतभूषणाः । रामकृष्णादयो गोपा ननृतुर्युयुधुर्जगुः ॥ ९ ॥

---

पाठभेदः— * खडतर ( मुंगीप्रत ), कडतर ( उमरखेडप्रत ). † नाचती ( मुंगीप्रत ).

१ पाझर. २ कृष्णपरमात्मा. ३ आपल्या नेत्रांनीं. ४ संन्यासी. ५ उदकें. ६ शब्द. ७ दैवशाली. ८ महत्त्व. ९ गोपाचें सोंग. १० पुरुषश्रेष्ठा–परीक्षिते.

त्रैलोक्यींचें बरवेपण । सच्चित्सुखाचें कारण । तें गोठोनियां श्रीकृष्ण । झाला सगुण सौंदर्यें ॥ ९१ ॥ कृष्णलावण्याची शोभा । सगुणपणें *जाय लाभा । सर्वांगींही निघती जिभा । कैवल्यगाभा चाखावया ॥ ९२ ॥ श्रीकृष्णाचें गुणलावण्य । ऐकतां तृप्त न होती श्रवण । †त्वगिंद्रियासि आलिंगन । तैं मना मनपण नुपलभे ॥ ९३ ॥ कृष्णलावण्य देखतां दिठीं । तृप्ति न बाणे नेत्रापोटीं । अधिकाधिक हांव उठी । कंदर्पकोटी फलकटें[1] ॥ ९४ ॥ कृष्णप्रेमरसास्वादनीं । रसना लंपट लांचावोनी । रतली न परते तेथूनी । विषयसेवनीं वीटली[2] ॥ ९५ ॥ श्रीकृष्णाचीं चरणकमळें । हृदयवक्त्रनेत्रोत्पलें । करपंकजें परागबहळें । घ्राण पांगुळें अवघ्राणीं ॥ ९६ ॥ एवं लावण्याचा राशि । सच्चित्सुखात्मा हृषीकेशी । तेणें नटोनि गोपवेषीं । निजतनूसि डवरिलें[3] ॥ ९७ ॥ लसलशीत तरुपल्लव । ज्यावरी झळके नवलोहींव[4] । आणि बर्हींचे[5] सुरंग बर्ह[6] । गुच्छ अपूर्व तयांचे ॥ ९८ ॥ मुकुटीं मनगटीं बाहुवटीं । आपादमाळा विचित्र कंठीं । फळपुष्पांचिया दाटी । शोभा गोमटी प्रकटिती ॥ ९९ ॥ श्वेत आरक्त आणि काळें । कपिश[7] कर्बुर[8] पाटलें[9] । फारकती[10] हिरवे पिवळे । बाहळे निळे सुरंग ॥ १०० ॥ ऐशिया अनेक धातुरंगीं । तनु चार्चिती यथाविभागीं । ऐशीं भूषणें आंगोआंगीं । श्रीकृष्णसंगी लेइले ॥ १ ॥ रामकृष्णादि समस्त गोप । सालंकृत लावण्यरूप । गाती नाचती ससाक्षेप । युद्धप्रताप दाविती ॥ २ ॥

कृष्णस्य नृत्यतः केचिज्जगुः केचिदवादयन् । वेणुपाणितलैः शृंगैः प्रशशंसुरथापरे ॥ १० ॥

रंगीं नाचतां श्रीकृष्ण । एक गाती तानमान । सप्तस्वरें नवरसगान । ‡सामसवनसंगीत ॥ ३ ॥ अप्सरा किन्नर गंधर्वगण । ऐकोनि होती लज्जायमान । पक्षी चंचरीक[11] होऊन । प्रवर्तमान अभ्यासीं ॥ ४ ॥ तेथ कित्येक धरिती ताल । पाणितलें संगीतकुशल । वेणु वाजविती रसाळ । एक मंजुळ विषाणें ॥ १०५ ॥ एक प्रशंसिती प्रेक्षक । भला श्रीकृष्ण नाटक । नाट्यकळेचें कौतुक । वेधी त्रैलोक्य लोकनीं ॥ ६ ॥ कृष्ण नाचोनि नाचवी जगा । कृष्ण स्वरंगें ओढवी रंगा । लाघव दावोनि लपवी आंगा । कृष्ण अनंगा मोहक ॥ ७ ॥ नृत्यगीतवाद्यमेळ । भला यथोक्त घडला ताल । ऐसे परस्परें गोपाळ । प्रशंसाशीळ हरिरंगीं ॥ ८ ॥ हाचि निसर्ग सगुणांचा । महिमा वाढविजे अपरांचा । दुर्गुण तेथ पैशून्याचा । प्रवाह वाचा प्रकाशी ॥ ९ ॥ श्रीकृष्णाचे जे संवगडे । अमरभुवना सांडूनि कोडें । पहावया श्रीकृष्णक्रीडे । आले निवाडें भूलोका ॥ ११० ॥

गोपजातिप्रतिच्छन्ना देवा गोपालरूपिणः । ईडिरे कृष्णरामौ च नटा इव नटं नृप ॥ ११ ॥

---

**पाठभेद :—** * जये (मुंगीप्रत), जाय (उमरखेडप्रत) † त्वगेंद्रियासी (मुंगीप्रत व अमरखेडप्रत). ‡ समसमानसंगीत (मुंगीप्रत), सामसवनसंगीत (उमरखेडप्रत).

१ तुच्छ. २ कुंठित होते. ३ शृंगारिलें. ४ नवी लाली. ५ मोर. ६ पंख. ७ काळा तांबडा रंग. ८ अनेक रंगांचे. ९ पांढरे, तांबडे. १० पाचेचा. ११ भ्रमर.

गोपजातीची गवसैणी । घेऊनि अनुसरले जे कृष्णीं । ते गोपाळ वृंदावनीं । देवयोनि जाणावे ॥ ११ ॥ म्हणोनि निंदेचा नेणती वारा । *वेगीं स्तविती येरयेरां । श्रीकृष्णा आणि बलभद्रा । सत्कारगिरा गौरविती ॥ १२ ॥ रंगीं होता रसोत्पत्ति । नट नटांतें प्रशंसिती । तैसे गोपाळ †धन्य म्हणती । राम यदुपति नाचतां ॥ १३ ॥ बालक्रीडेचिया परी । रामगोपाळश्रीहरि । क्रीडा करिती परस्परीं । तें अवधारीं भूभुजा ॥ १४ ॥

भ्रामणैर्लंघनैः क्षेपैरास्फोटनविकर्षणैः । चिक्रीडतुर्नियुद्धेन काकपक्षधरौ क्वचित् ॥ १२ ॥

कोठें कोठें परिभ्रमणें । एकमेकांतें प्रतिज्ञापणें । ‡आक्रमिती साभिमानें । बहुताडनें करचपळें ॥ ११५ ॥ एकमेकां उल्लंघिती । प्रतिज्ञामानें अतिक्रमिती । ¶आस्फोटनें आवेशती । आकर्षिती परस्परें ॥ १६ ॥ द्वंद्वयुद्धें मल्लयुद्धें । बाहुयुद्धें एकांगयुद्धें । क्रीडाभ्यासें करिती सिद्धें । कंसादियुद्धें साधावया ॥ १७ ॥ चूडाकरणापूर्वील केश । त्यांतें म्हणिजे काकपक्ष । तिहीं शोभती §रामरमेश । काकपक्षधर ऐसे ॥ १८ ॥ कोठें क्षेपिती परस्परें । कोठें आक्षेपिती निकरें । कोठें विक्षेपउत्तरें । अभिमानपरें बोलती ॥ १९ ॥ ऐशा अनेक अर्भकलीला । मिथ्या क्रीडती कौरवपाळा । तैसेचि अनुसरती गोपाळा । खेळामेळा क्रीडती ॥ १२० ॥

क्वचिन्नृत्यत्सु चान्येषु गायकौ वादकौ स्वयम् । शशंसतुर्महाराज साधु साध्विति वादिनौ ॥ १३ ॥

कोठें नाचती गोपाळ गजरीं । तेथें रामकृष्ण ताल धरी । होऊनिया सप्तस्वरीं । गीतवाद्यें साहित्यें ॥ २१ ॥ अन्य गोपाळ नाचती जेथ । गायक वादक होऊन तेथ । संगीतकलाकौशल्यपथें‖ । साहित्यातें पुरविती ॥ २२ ॥ भलाभला म्हणोनि त्यासी । स्वमुखें श्रीकृष्ण प्रशंसी । ऐसे रामकृष्ण संवगडियांसी । संतोषासी पावविती ॥ २३ ॥ नृत्यें लाजविल्या अप्सरा । गानें गंधर्वकिन्नरां । वाद्यें सिद्धसाध्यां चतुरां । चमत्कारां चोजाविती ॥ २४ ॥

क्वचिद्बिल्वैः क्वचित्कुंभैः क्व चामलकमुष्टिभिः । अस्पृश्यनेत्रबंधाद्यैः क्वचिन्मृगखगेहया ॥ १४ ॥

कोठें कोठें बिल्वफळा । संग्रहूनि खेळती खेळा । कोठें कुंभीफळीं आगळा । दाविती सोहळा क्रीडेचा ॥ १२५ ॥ कोठें धात्रीफळांच्या मुष्टि । चिंतूनि प्रतिज्ञापरिपाटीं । प्रवर्तती निजअभीष्टीं । जिंकिल्या तुष्टि मानिती ॥ २६ ॥ कोठें खेळती डोळे झांकणीं । एक बैसवूनि मुखरणी । नेत्र एकाचे बांधोनी↓ । येर लपोनि राहती ॥ २७ ॥ अवघे लपोनि ठेलिया गडी । मुखरणी त्याचे नेत्र सोडी ।

---

पाठभेद :— * रंगीं ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † प्रशंसिती ( मुंगीप्रत ) ; धन्य म्हणती ( उमरखेडप्रत ). ‡ कीडामीसे. ¶ बाहु ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). § परेश. ‖ तेथें ( मुंगीप्रत ). ↓ झाकोनी.

१ बुरखा. २ सत्काराच्या वाणीनें. ३ हे राजा. ४ झुलपें. ५ लोटिती. ६ ओढिती. ७ खंडन. ८ आंवळीच्या फळांच्या. ९ मुख्य.

स्पर्शों जातां अतितांतडी । पडे मुरकुंडी गडियाची ॥ २८ ॥ मुखरणीतें न स्पर्शितां । जरी त्या स्पर्शे पैं हुडकिता । तरी *जेई आली त्याचिये माथां । चक्षु झांकविता तो होय ॥ २९ ॥ तैसाचि हुडकी तोही पुन्हा । वेगां स्पर्शों धांवे आनां । ऐसें करोनि नेत्रपिधाना । क्रीडा नाना क्रीडती ॥ १३० ॥ दावूनि मृगाचे अनुकार । चेष्टा करिती कुरंगाकार । कोठें पक्ष्याचे प्रकार । चेष्टा अपार दाविती ॥ ३१ ॥

क्वचिच्च दर्दुरप्लावैर्विविधैरुपहासकैः । कदाचित्स्पंदोलिकया कर्हिचिन्नृपचेष्टया ॥ १५ ॥

कोठें उडती दर्दुरा ऐसे । येरां चरणीं धरिती तोषें । त्यांच्या सोडवणेच्या मिसें । गडी विशेषें विनविती ॥ ३२ ॥ ऐशी मंडूकक्रीडारीति† । राम गोपाळ श्रीपति । ठायीं ठायीं क्रीडताती । बालचरितीं संमत जें ॥ ३३ ॥ एकमेकां उपहासवाणी । बोलती कैतवें ठकूनी । ठकल्या हांसती आनंदोनी । अवघे मिळोनि एकातें ॥ ३४ ॥ कित्तेक साखर वदनीं माती । ऐसें एकातें पुसती । तेणें दावितां अवघे म्हणती । इतुकी माती या वदनीं ॥ १३५ ॥ ऐशा अनेक व्यंग्योक्ति । मिथ्या बोलोनि उपहासिती । कोठें हिंदोळां वळंघती । हालविती येरयेरां ॥ ३६ ॥ वटवृक्षाच्या पारंबिया । त्यांच्या करोनि हिंदोळिया । परस्परें देती पाळिया । बैसोनियां त्यांवरी ॥ ३७ ॥ चाळीस पन्नास एक एका । वैसतां मोजोनि देती झोका । ऐशा पाळिया पृथकपृथका । गोपदारकां समस्तां ॥ ३८ ॥ कोठें नृपाचिये क्रीडेपरी । सिंहासनावरी श्रीहरि । बैसवोनि सर्वोपचारीं । गोपकुमारीं वोळंगिजे ॥ ३९ ॥ सचिव प्रधान अमात्य मंत्री । एक होती वेत्रधारी । एक पृथक नियोगाचारी । स्वयें अज्ञाधारी म्हणविती ॥ १४० ॥ देश दुर्ग भांडागार । एक म्हणविती सेनाधर । एक वार्तिक चार हेर । एक किंकर वोळगणे ॥ ४१ ॥ चामर पादुका आतपत्र । एक धरिती निशाण छत्र । एक दुंदुभि वाजंत्र । चित्रविचित्र वाजविती ॥ ४२ ॥ ऐशा अनेक राजचेष्टा । दावूनि मानिती अभीष्टा । तें सुख दुर्लभ नीलकंठा । नेणे स्रष्टा स्वप्नींही ॥ ४३ ॥

एवं तौ लोकसिद्धाभिः क्रीडाभिश्चेरतुर्वने । नद्यद्रिद्रोणिकुंजेषु काननेषु सरस्सु च ॥ १६ ॥

ऐशा मनुष्यलोकीं विविधा । बालक्रीडा ज्या प्रसिद्धा । वृंदावनीं समान मुग्धा । क्रीडोनि विबुधा लाजविती ॥ ४४ ॥ यमुनापुलिनीं गोवर्धनीं । गिरिकंदरीं काननीं । निकुंज उपवनीं उद्यानीं । क्रीडती दोन्ही बळकृष्ण ॥ १४५ ॥ रम्य सरोवरांच्या पाळीं । कुंजसदनीं नवशाद्वलीं । समानवयस्यांचिये मेळीं । रामवनमाळी क्रीडती ॥ ४६ ॥ ऐशिये क्रीडेच्या उत्साहीं । लोकत्रया तोष पाहीं । परंतु दुर्जनाचिये देहीं । अपूर्व कांहीं प्रवृत्ति ॥ ४७ ॥

---

**पाठभेद :—** * डाई ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † करिती ( मुंगीप्रत ).

१ हार. २ डोळे झांकणें. ३ बेडूक. ४ कपट. ५ शब्दाचा उघड दिसणारा अर्थ एक व गर्भितार्थ भिन्न असें भाषण. ६ बालक. ७ सेवा करीत.

पशूंश्चारयतो गोपैस्तद्वने रामकृष्णयोः । गोपरूपी प्रलंबोऽगादसुरस्तज्जिहीर्षया ॥ १७ ॥

रमणीय गोवर्धनाची कूटें[1] । दऱ्या द्रोणि[2] गिरिकपाटें । सरोवरें तटाकतटें । वाळवंटें सरितांचीं ॥ ४८ ॥ यमुनापुलिनींचे मृदुलतर । वनोपवनीं क्रीडापर । संवगडियांशीं नंदकुमार । देखोनि असुर पातला ॥ ४९ ॥ तया वृंदावनाच्या ठायीं । संवगडियांशीं क्रीडतां पाहीं । रामकृष्ण चारिती गाई । तंव विवरी हृदयीं प्रलंब ॥ १५० ॥ पूतना शकट तृणावर्त । अघ बक धेनुकादि समस्त । रामकृष्णाचा करिती घात । पावले मृत्यु अवघेची ॥ ५१ ॥ ते बापुडे मंदमती । न विचारितां बुद्धि परती । मारूं गेले कृष्णाप्रति । तेणें निघातीं ते वधिले ॥ ५२ ॥ करितां बलिष्ठेंशीं छळें[3] । बुद्धि विवरिजे अति प्रबळ । बुद्धीवेगळें बळ तें विकळ । होय तत्काळ विपरीत ॥ ५३ ॥ धान्यजातींत विजातीय खडा । निसूनि टाकिती येकीकडां । तेथें षड्साकार[4]क्ष्वेडा । होतां निवाडा न करवे ॥ ५४ ॥ तेंवि गोपाळांचिये मेळीं । खेळतां बलराम वनमाळी । गोपाळवेशें अतर्क्य छळीं । करितां केली छळीन मी ॥ ५५ ॥ जैसी जालंधराचें नटें । वृंदा छळिली श्रीवैकुंठें । कीं गौतमाकारकपटें । अमरेंश्रेष्ठें[5] अहल्या ॥ ५६ ॥ ऐसें विवरूनि खळदुर्मति । स्वयें नटोनि गोपाकृति । राहु लिप्सा[6] धरूनि अमृतीं । अमरपंक्तीं जेंवि रिघे ॥ ५७ ॥ तैसा कपटीं प्रलंबासुरु । रामकृष्णांची जिघांसा[7] करूं । आला होऊनि गोपकुमरु । जाणें अंतर श्रीपति ॥ ५८ ॥

तं विद्वानपि दाशार्हो भगवान् सर्वदर्शनः । अन्वमोदत तत्सख्यं वधं तस्य विचिंतयन् ॥ १८ ॥

सर्वद्रष्टा जो यदुपति । अचिंत्यैश्वर्याचिये स्थिती । जाणोनिही दैत्य दुर्मति । त्याशिं संगति आदरिली ॥ ५९ ॥ आपणा करूं आला घात । त्याचा विवंचूनि निपात । नेण होऊनि संवगाडियांत । त्याशीं क्रीडत आनंदें ॥ १६० ॥ येरवीं भूतभविष्यवर्तमान । अखिलद्रष्टाही सर्वज्ञ । प्रलंबाचें जेणें मरण । तें क्रीडन आदरिलें ॥ ६१ ॥

तत्रोपाहूय गोपालान् कृष्णः प्राह विहारवित् । हे गोपा विहरिष्यामो द्वंद्वीभूय यथायथम् ॥ १९ ॥

मग बैसोनि एके ठायीं । समीप होकरूनियां गायी । गोपाळांतें शेषशायी । वृत्ता न कायी बोलत ॥ ६२ ॥ पाहोनि अवघेचि गोपाळ । कृष्ण जाणे सर्वही खेळ । म्हणे समान येथींचें भूतळ । परम मृदुल सुखरूप ॥ ६३ ॥ दोघे करूनि धुरंधर । गडी वांटूनि घेऊं येर । हारिजैत क्रीडापर । खेळूं समग्र ये ठायीं ॥ ६४ ॥ सबळा सबळ अबळा अबळ । कृशा कृश स्थूळा स्थूळ । लहान थोर वांटूं सकळ । समानशीळ संवगडे ॥ १६५ ॥ चपळा चपळ कुटिला कुटिल । विकळा विकळ समळा समळ । कुशला कुशल अमळा अमळ । अवघे गोपाळ विभागूं ॥ ६६ ॥ ऐसे समान वांटिलिया गडी ।



१ शिखरें. २ दोन पर्वतांमधील दरा. ३ कपट. ४ विषाला. ५ इंद्रानें. ६ लाभाची इच्छा. ७ घाताची इच्छा.

कोणीं खाऊं नये रडी । डाव येतां घ्यावी चढी । ऐसी परवडी खेळाची ॥ ६७ ॥ नंदतनय बोलतां ऐसें । अवघे नाचती संतोषें । भक्तिप्रेमें ब्रह्मपिसें* । क्रीडामिसें विचरतसे ॥ ६८ ॥

तत्र चक्रुः परिवृढौ गोपा रामजनार्दनौ । कृष्णसंघट्टिनः केचिदासन् रामस्य चापरे ॥ २० ॥

श्रीकृष्णाच्या वाक्यावरूनी । लहानथोर गोप मिळोनि । राम आणि चक्रपाणि । मुख्यस्थानीं बैसविले ॥ ६९ ॥ येर गडी समसमान । दोनी दोनी विभागून । संज्ञा ठेविती भिन्न भिन्न । दुरी जाऊनि ते दोघे ॥ १७० ॥ वृषभ आणि भद्रसेन । दोघे एकीकडे जाऊन । मेरुमंदर† संज्ञा करून । आले फिरोन हरीपाशीं ॥ ७१ ॥ म्हणती कोण्ही घ्या हो मेरु । कोणी घेईजे मंदरु । कृष्णासि म्हणे रोहिणीकुमरु । करीं स्वीकार तूं आधीं ॥ ७२ ॥ अग्रजाच्या वाक्यावरून । मेरु मागे जनार्दन । मंदर वृषभाचें अभिधान । संकर्षण त्या घेत ॥ ७३ ॥ याचि क्रमें अवघे गडी । वाटोनि घेती निवडानिवडी । अग्रजावरी नेघे चढी । म्हणोनि रडी हरि जाय ॥ ७४ ॥ मग श्रीराम आणि कृष्ण । दोघे वांटिले समान । प्रलंब आणि संकर्षण । तुल्य योजोनि वांटिले ॥ १७५ ॥ कृष्णफळीसि कित्तेक आले । अपर रामविभागा गेले । परस्परें क्रीडते झाले । तें परिसिलें पाहिजे ॥ ७६ ॥

आचेरुर्विविधाः क्रीडा वाह्यवाहकलक्षणाः । यत्राऽऽरोहंति जेतारो वहंति च पराजिताः ॥ २१ ॥

गडी वांटूनि घेतल्यावरी । नानाक्रीडांचिये परी[1] । खेळते झाले राममुरारि । बाळकांपरी नटनाट्यें ॥ ७७ ॥ जितुके गडी बळरामाचे । कृष्णसंवगडे नेत्र त्यांचे । झांकिती तैसेचि तेही यांचे । यथाविभागें झांकिती ॥ ७८ ॥ वाटिले जैसे‡ ज्यांचे । परस्परें¶ नेत्र त्यांचे । झांकूनि बैसती[2] वर्तिकेचें[3] । क्षेपण[4] करिती रामहरि ॥ ७९ ॥ मग सोडूनि त्यांचे डोळे । वर्ति हुडाकिती ढाळेंढाळें[5] । सांपडलिया उत्साहमेळें । पृष्ठभागीं[6] वळघती ॥ १८० ॥ शतधनुष्यें[7] करूनि सीमा । पृष्ठीं वाहती जिंकिल्या§ नियमां । परस्परें कृष्णरामां । क्रीडाकामा तोपविती ॥ ८१ ॥ ऐसा सुरंगवातीखेळ । अवघे खेळती गोपबाळ । कोठें राम आणि घननीळ । क्रीडाकुशल बैसती ॥ ८२ ॥ विटीदांडू नानापरी । चेंडूक्रीडा विविधाकारीं । जिंकिल्या वैसती पाठीवरी । परस्परीं पूर्वोक्त ॥ ८३ ॥ येक पाद अतिक्रमणें । तोबा करूनि परिभ्रमणें । वधूवरसंज्ञेच्या[8] ‖पापाणें । स्वारी घेणें जयव्याजें ॥ ८४ ॥ ↓तिंतिडीबीजें[9] ऐकीबेकी । कोठें खेळती वराटिकीं[10] । कोठें बेंदरी[11] आमलेकीं[12] । स्वारी जिंकी तयाची ॥ १८५ ॥

वहंतो वाह्यमानाश्च चारयंतश्च गोधनम् । भांडीरकं नाम वटं जग्मुः कृष्णपुरोगमाः ॥ २२ ॥

---

**पाठभेद :—** *रसे ( मुंगीप्रत ). †मंदार ‡जैसे ¶ते §करूनी ( मुंगीप्रत ). ‖भापणें. ↓तींतिणी.

१ प्रकार. २ वागत असे. ३ वातीचें, सोडग्याचें. ४ फेंकणें. ५ हळूहळू. ६ पाठीवर. ७ चारशें हात. ८ जयाच्या मिपानें. ९ चिंचोक्यांनीं. १० कवड्यांनीं. ११ बोरें. १२ आंवळे.

जिंकिती ते स्वारी घेती । हारती ते पृष्ठीं वाहती । ठायीं ठायीं क्रीडा करिती । गाई चारिती तच्छंदें ॥ ८६ ॥ *भांडीरनामा न्यग्रोधतरु[1] । जो कां गरुडाचा अवतारु । तापिनीमाजीं हा विस्तारु । अथर्वणींच्या उपनिषदीं ॥ ८७ ॥ तया भांडीरवटाप्रती । रामकृष्णप्रमुख जाती । पुन्हां खेळ आरंभिती । यथापूर्व स्वारीचा ॥ ८८ ॥ निंबुटिंबु क्रीडा करिती । पदार्थ चिंतूनि गडियां पुसती । भांडीरवटाचे छायेप्रती । बैसोनि खेळती हा खेळ ॥ ८९ ॥

रामसंघाट्टिनो यर्हि श्रीदामवृषभादयः । क्रीडायां जयिनस्तांस्तानूहुः कृष्णादयो नृप ॥ २३ ॥

परस्परीं खेळतां ऐसें । राया अपूर्व वर्तलें कैसें । श्रीकृष्णाच्या इच्छावशें । होती पिसे ब्रह्मादिक ॥ १९० ॥ बळरामाच्या संवगडियांनीं । डाई जिंकिली खेळांत पणीं । कृष्णगडियांतें झोंबोनी । आरोहणीं प्रवर्तलें ॥ ९१ ॥ श्रीदाम झोंबे श्रीकृष्णासीं । वृषभ झोंबे भद्रसेनासी । संकर्षण प्रलंबासी । स्वारी घेयासि उद्यत ॥ ९२ ॥ आली डाई देणें खरें । यथाविभागें परस्परें । पृष्ठभागीं घेऊनि पोरें । कृष्णादि सारे वाहती ॥ ९३ ॥

उवाह कृष्णो भगवान् श्रीदामानं पराजितः । वृषभं भद्रसेनस्तु प्रलंबो रोहिणीसुतम् ॥ २४ ॥

श्रीदामातें पृष्ठभागीं । जिंकिल्या कृष्ण वाहे वेगीं । षड्गुणैश्वर्य असतां आंगीं । प्रतिज्ञा वाउगी न करवे ॥ ९४ ॥ भद्रसेनें यथोचितें । पृष्ठीं बैसविलें वृषभातें । प्रलंबें रोहिणीसुतातें । पृष्ठावरौतें घेतलें ॥ १९५ ॥ कृष्णसंवगडियांवरी ऐसे । रामसंवगडे बैसले तोपें । तेव्हां प्रलंबें मानसें । असह्य मानिलें कृष्णातें ॥ ९६ ॥

अविषह्यं मन्यमानः कृष्णं दानवपुंगवः । वहन् द्रुततरं प्रागादवरोहणतः परम् ॥ २५ ॥

दानवांचा अग्रगणी । प्रलंब कापट्याची खाणी । कृष्णा अजिंक्य मानुनी । बुद्धि मनीं विवरिली ॥ ९७ ॥ श्रीकृष्णाची चुकवूनि दृष्टि । संकर्षणा घेऊनि पृष्ठीं । सवेग सरकला जगजेठी । दुष्ट कपटी दुरात्मा ॥ ९८ ॥ शतधनुष्याचिया नेमा । लंघूनि अवरोहणांची[2] सीमा । पृष्ठीं येऊनि बलरामा । सवेग व्योमा आक्रमी ॥ ९९ ॥

तमुद्वहन् धरणिधरेंद्रगौरवं महाऽसुरो विगतरयो निजं वपुः ।
स आस्थितः पुरटपरिच्छदो बभौ तडिद्युमानुडुपतिराडिवांबुदः ॥ २६ ॥

राम घेऊनि पृष्ठावरी । प्रलंब उडाला अंबरीं । तंव तो गुरुतर जैसा गिरि । गति खेचरी खुंटली ॥ २०० ॥ विगतवेग झाला असुर ॥ नुचले बळभद्राचा भार । मग दानवी निज

पाठभेद :—* भांडिरकनाम ( मुंगीप्रत ).

१ वडाचें झाड. २ उतरणें.

शरीर । केलें गोचर ते कालीं ॥ १ ॥ जैसे सजल मेघपटल ॥ तैसें आसुरी देह विशाळ । वरी चंद्रमा[2] जैसा धवळ । रोहिणीबाळ शोभतसे ॥ २ ॥ मेघीं विद्युल्लता झळकती । तैशा भूषणांचिया दीप्ति । सुवर्णजडितरत्नपंक्ति । झळकताती त्यांपरी ॥ ३ ॥ चंद्रोपमा शोभे रामा । विद्युत्साम्य हेमललामा[1] । मेघोपमा दैत्या अधमा । बोले महात्मा । शुकयोगी ॥ ४ ॥ उर्डुपतीतें[2] माथां वाहे । सजल मेघ गगनीं राहे । माजी विद्युल्लतांच्या समूहें । शोभता होय तो जैसा ॥ २०५ ॥ असो दैत्याचें उत्प्लवन । आणि *उभमासादृश्यकथन । दैत्यें कपटवेश टाकून । धरिलें प्राचीन निजदेहा ॥ ६ ॥ जें कां परम भयानक । पुढिले श्लोकीं वर्णी शुक । श्रोती तयाचा विवेक । सकौतुक परिसावा ॥ ७ ॥

निरीक्ष्य तद्वपुरलमंबरे चरत् प्रदीप्तदृग्भ्रूकुटितटोग्रदंष्ट्रकम् ॥
ज्वलच्छिखं कटककिरीटकुंडलत्विषाऽद्भुतं हलधर ईशदत्रसत् ॥ २७ ॥

दैत्यदेह भयंकर ॥ देखोनि रामाचें अंतर । त्रास[3] पावलें ईशन्मात्र[4] । मा इतर धीर कोण धरी ॥ ८ ॥ काजळाचेंही काळेपण । कांति तुकितां[5] गमे गौण । भृकुटितटीं प्रदीप्त नयन । जेवीं कृशान प्रलयींचा ॥ ९ ॥ उग्र दंष्ट्राग्रें तीक्ष्णें । मुखीं न समाती दारुणें । सधूम्रज्वाळ[6] हुताशन । स्फुरती तैसे मूर्धजँ[7] ॥ २१० ॥ शुष्क सरितेच्या हृदापरी । विषाळ गर्ता भासे उदरीं । वितृण खडकीं जैसा गिरि । अस्थिपंजरीं समसाम्य ॥ ११ ॥ गिरिकंदरीं सलंब कडे । तैसें करचरण देहुडे । आपणा पृष्ठीं घेऊनि उडे । रामें निवाडें[8] लक्षिलें ॥ १२ ॥ किरीटकुंडलांची दीप्ति । रामें ऐशी दैत्याकृति । अद्भुत देखोनियां चित्तीं । दिधली वसति त्रासासी ॥ १३ ॥ हरिवंशींचें ऐसें मत । रामासि गगनीं नेतां दैत्य । कृष्णें बोधोनि वृत्तांत । केलें प्रदीप्त बलरामा ॥ १४ ॥

अथागतस्मृतिरभयो रिपुं बलो विहाय सार्थमिव हरंतमात्मनः ।
रुषाहनच्छिरसि दृढेन मुष्टिना सुराधिपो गिरिमिव वज्ररंहसा ॥ २८ ॥

असो रामें गगनोदरीं । ते देखोनि आकृतीतें आसुरी । हृदयीं प्रवेशली त्रासलहरी । बाळकापरी नटनाट्यें ॥ २१५ ॥ मग दैत्याचा देखोनि निर्कुर[9] । लब्धस्मृति झाला सत्वर । मानव नव्हें मी ईश्वर । आलों भूभार उतरावया ॥ १६ ॥ भयत्रस्तासि पक्षपाती[10] । अभय देवोनि निर्भय करिती । रामा तैशी निजात्मस्मृति । अभय करिती पैं झाली ॥ १७ ॥ गडी नव्हे हा प्रलंब दैत्य । सांडोनि संवगडे समस्त । गगनगर्भी मजला नेत । चोर हरित जैंवि धन ॥ १८ ॥ ऐसें त्यातें जाणोनि रिपु । हृदयीं प्रकटला काळकोपु† । मौळीं मुष्टींचा निक्षेपु । करोनि प्रतापु दाविला ॥ १९ ॥ महेंद्र वज्रें हाणितां गिरि । सवेग खचे पृथ्वीवरी । तैसा प्रलंब मुष्टिप्रहारीं । पृथ्वीवरी रिचवला ॥ २२० ॥

पाठभेद :— *उपमा ( मुंगीप्रत ). †काळाग्निकोपु ( मुंगीप्रत ).

१ स्वर्णालंकार. २ चंद्र. ३ भय. ४ किंचित्. ५ तुलना करितां. ६ धूर व ज्वाला यांसहित. ७ केश. ८ खळगा. ९ निश्चय. १० साह्यकारी.

स आहतः सपदि विशीर्णमस्तको मुखाद्वमन् रुधिरमपस्मृतोऽसुरः ।
महारवं व्यसुरपतत्समीरयन् गिरिर्यथा मघवत आयुधाहतः ॥ २९ ॥

मुष्टिघातें तो हाणितां दैत्य । मूर्च्छा पावला अकस्मात । मुखें भडभडां रुधिर वमित । झाला अस्त स्मृतीचा ॥ २१ ॥ उंबर जैसें घनाच्या[1] प्रहारीं । विशीर्ण मस्तक तया परी । प्राण सोडी ते अवसरीं । गर्जना करी भयानक ॥ २२ ॥ अकस्मात महासुर । गर्जना करूनि भयंकर । प्राणें वीण पर्वताकार । टाकी शरीर भूपृष्ठीं ॥ २३ ॥ मघवा[2] म्हणिजे पुरंदर । त्याचें आयुध तें महावज्र । त्याच्या घातें भंगे कुध्र[3] । तैसा असुर उलथला ॥ २४ ॥ अपस्मृती म्हणिजे मूर्च्छागत । ऐसें कल्पी आमुचें चित्त । किंवा कांहीं विशेष अर्थ । शुक समर्थ सूचवी ॥ २२५ ॥ ऐशी आशंका श्रोतीं केली । तेणें प्रज्ञा पांगुळली[4] । तेव्हां हृत्कमळीं चिंतिली । निजमाउली गुरुकृपा ॥ २६ ॥ तत्प्रसादें बोलेल वाणी । श्रोतीं घेऊनियां ते श्रवणीं । विवरूनियां अंतःकरणीं । कीजे हानि शंकेची ॥ २७ ॥ मूर्च्छना म्हणिजे क्षणैक आली । सावध होतां स्मृति चेइली । जेंवि निद्रा भंगतां पहिली । लाहे आपुली जागृति ॥ २८ ॥ कां जैशी प्रवर्तलिया राती । तमें दाटे द्यावाक्षिति[5] । प्रकटलिया गभस्ति । पदार्थ दिसती पूर्ववत ॥ २९ ॥ तैसें सुषुप्ति मूर्च्छा मरण । तीन्ही अवस्था समसमान । क्षणैक होय विस्मरण । पुन्हा स्मरण पहिलेंची ॥ २३० ॥ सुषुप्तिगाढमूढ दाटे । अहंभाव निःशेष आटे । परी स्मृति येऊनि भेटे । तैं दुर्णवटे[6] पूर्वोक्त[7] ॥ ३१ ॥ स्मृति भेटवी जैं जागरा । तैं दृश्य प्रकाशी करण-द्वारा । साचचि वाटे भवउभारा । येरी मोहरा शून्यत्व ॥ ३२ ॥ अथवा लिंगदेहाची स्मृति । स्वप्नावस्था उभारी चित्तीं । ते अन्यथा नवटे भयसंचितीं* । प्रकटे स्फूर्ति संकल्पें ॥ ३३ ॥ स्वप्न जागर पुन्हा न येतां । ते सुषुप्ति नव्हे ते सायुज्यता । जरा मृत्यु अन्नेंच †हरतां । तैं त्या अमृता न मनावें ॥ ३४ ॥ पुन्हा जागृति स्वप्नें दावी । म्हणूनि सायुज्य न म्हणावी । तैशीच मूर्च्छा विवंचावी । जे पुन्हां भेटवी स्मृतीतें ॥ २३५ ॥ स्थूल देहासि होय अंतु । तया नांव बोलिजे मृत्यु । पुन्हा स्मृति संसार जनितु । लाहोनि जन्मत संसारीं ॥ ३६ ॥ अंतीं जेथ[8] गुंते मति । तीमाजि लपोनि ठाये स्मृति । पुन्हा होतां देहप्राप्ति । पूर्ण स्थिति प्रकाश ॥ ३७ ॥ म्हणोनि अपस्मृती जो आला । त्रिविध भेदा तो मुकला । परमामृतीं समरसला । नवचे निवडला कल्पांतीं ॥ ३८ ॥ निःशेष स्मृतीचा होय अंत । तैं त्या म्हणिजे परमामृत[9] । संकर्षणाचा मुष्टिघात । लागतां दैत्य उद्धरला ॥ ३९ ॥ विरोधभजनें मोक्षाधिकारी । दैत्य विविध देहधारी । ते जन्मले कृष्णावतारीं । राममुरारि तारक त्यां ॥ २४० ॥ कृष्णदर्शनें स्पर्शनें । द्वेषध्यासें[10] संभाषणें । भयें सक्रोधचिंतनें । विरोधभजनें उद्धरती ॥ ४१ ॥ धातुर्वाद पावतां शीण । लोहीं न जोडे सुवर्ण । स्पर्शमणि न लगतां क्षण । करी कांचन संस्पर्शें ॥ ४२ ॥ करितां तेवीं साधनकोडी । नोहे कैवल्याची जोडी । प्रलंबासि

---

**पाठभेदः**— * संविती. † विहरता ( मुंगीप्रत ).

१ घणाच्या. २ इंद्र. ३ पर्वत. ४ कुंठित झाली. ५ आकाश व पृथ्वी. ६ दुप्पट होतो. ७ पूर्वी सांगितलेला अहंकार. ८ ज्या वस्तूच्या ठिकाणीं. ९ मोक्ष. १० द्वेषपूर्वक निरंतर चिंतन.

न लगतां घडी । सिद्धि रोकडी रामकरें ॥ ४३ ॥ यालागीं तो अपस्मृत । जें स्मृतीचा निःशेष अंत । झाला तेणें जन्ममृत्य । रहित अमृत पांवला ॥ ४४ ॥ झालें आशंकानिरसन । प्रलंब पडिला गतप्राण । आले संवगडे धांवोन । घोष ऐकोन पतनाचा ॥ २४५ ॥

दृष्ट्वा प्रलंबं निहतं बलेन बलशालिना । गोपाः सुविस्मिता आसन् साधु साध्विति वादिनः ॥ ३० ॥

शोभा बलाची आगळी । म्हणोनि संकर्षण बळशाली । तेणें मारिला प्रलंब बळी । पिटिली टाळी गडियांनीं ॥ ४६ ॥* विकराळ दैत्यदेह पडिले । देखोनि अवघे विस्मित झाले । संकर्षणा सन्मानिले । भलारे भला म्हणोनी ॥ ४७ ॥ बरी पाद्‌विली बोचाळी । कपटें खेळूं आली मेळीं । राम आमुचा महाबळी । येणें तत्काळीं लोळविली ॥ ४८ ॥ पहारे लेकाचे विकराळ दांत । म्हणूनि डेंगांहीं[1] विचकित । एक नाकपुडिया आंत । खोली पहात विवराची ॥ ४९ ॥ एक बाबरझोंटींचें[2] ढीग । एक पाहती मोकळें लिंग । रोमावळीचे दाट दांग[3] । भीम[4] सर्वांग नगानिभ[5] ॥ २५० ॥ कपटरूपें खेळूं आला । खेळतां राम गगना गेला । तेणें मारूनि वज्रटोला । बळें फोडिला मस्तक ॥ ५१ ॥ भला गा भला म्हणती रामा । बरा कुंथविला दुरात्मा । वर्णितां रामबळाची गरिमा । देती क्षेमा[6] सप्रेमें ॥ ५२ ॥

आशिषोऽभिगृणंतस्तं प्रशशंसुस्तदर्हणम् । प्रेत्यागतमिवाऽऽलिंग्य प्रेमविह्वलचेतसः ॥ ३१ ॥

मांदी मिळोनि भोंवती । आशीर्वाद मंगलोक्ति । स्वस्ति कल्याण रामाप्रति । अवघे म्हणती उत्साहें ॥ ५३ ॥ एक प्रशंसिती रामबळ । एक म्हणती बुद्धिकुशल । एक म्हणती परम चपळ । जाणे कौटिल्य[7] दैत्याचें ॥ ५४ ॥ एक म्हणती बल बलिष्ठ । एक म्हणती हा गरिष्ठ । एक वर्णिती धारिष्ट । म्हणती अरिष्ट चूकलें ॥ २५५ ॥ एक म्हणती शौर्यमूर्ति । एक म्हणती अद्भुतशक्ति । एक म्हणती धूर्तमति । जाणे दुर्मति दैत्याची ॥ ५६ ॥ एक म्हणती अरिष्ट चुकलें । एक म्हणती दैवें रक्षिलें । एक म्हणती पुण्य फळलें । व्रजौकसां वृष्णींचें ॥ ५७ ॥ कृष्ण श्रीदाम भद्रसेन । वृषभादिक गोपगण । जैसा मृतासि परते प्राण । तेंवि धांवोन भेटती ॥ ५८ ॥ राम नेला होता काळें । वांचला आमुच्या भाग्यबळें । म्हणोनि प्रेमें गळिया गळे । लावूनि स्नेहाळ भेटती ॥ ५९ ॥ परमस्नेहें विह्वळचित्त । म्हणोनि रामा आलिंगित । पापकर्मा प्रलंबदैत्य । पापें मृत्य पावला ॥ २६० ॥ ऐसे कृष्णादि संवगडे । रामा आलिंगिती कोडें । वर्णिती रामाचे पवाडे । तंव देखती पुढें नवलावो[8] ॥ ६१ ॥

पापे प्रलंबे निहते देवाः परमनिर्वृताः । अभ्यवर्षन् बलं माल्यैः शशंसुः साधु साध्विति ॥ ३२ ॥

अकस्मात मेघपटल । जेंवि आच्छादी नभोमंडल । तेवीं विमानीं संकुल । निर्जर सकल

---

पाठभेद :— * ओवी ४७ वी पोथींत नाहीं. ( मुंगीप्रत )

१ काव्यांनीं. २ झिंज्या, झिपऱ्या. पहा–' बाबरझोंटिया केसाळ । तेचि नदीमाजीं शेवाळ ।' एकनाथ रुक्मिणीस्वयंवर. ३ रान. ४ भयंकर. ५ पर्वतसदृश. ६ आलिंगनाला. ७ कपटी स्वभाव. ८ आश्चर्य. ९ घनदाट.

पातले ॥ ६२ ॥ पापकर्मा प्रलंबदैत्य । रामहस्तें पावला मृत्य । झाला अखिलकर्मातीत । हा वृत्तांत जाणोनी ॥ ६३ ॥ वर्णिती रामाचा प्रताप । प्रलंबदैत्य पुण्यरूप । झाला म्हणोनि हर्ष अमूप । करिती पुष्पवर्षाव ॥ ६४ ॥ शत्रु मारिला प्रलंबा ऐसा । राम धर्माचा कुंवासा[1] । प्रतापतेजें उजळलिया दिशा । वर्णिती यश सुस्वर ॥ २६५ ॥ भला भला संकर्षणा । प्रलंब मारूनि आंगवणा[2] । केलें त्रैलोक्यपरित्राणा । निर्जरगणा तोषविलें ॥ ६६ ॥ ऐसे सुरवर पावोनि तोष । वर्णिती रामकृष्णांचें यश । लावूनि दिव्य दुंदुभिघोष । विजयोत्कर्ष मानिती ॥ ६७ ॥ सुभरें जैशी वळींव सरी । वर्षे उत्तरानक्षत्रीं । पुष्पवृष्टि तयापरी । केली निर्जरीं आनंदें ॥ ६८ ॥ भवंती भांडीरवटाहूनी । पंचक्रोशात्मक अवनि । नंदनवनींच्या दिव्यसुमनीं । आच्छादूनी राहिली ॥ ६९ ॥ तया सुमनांच्या सुगंधें । आकर्षिलीं भ्रमरवृंदें । गुंजारवें यशें विशदें । परमानंदें वर्णिती ॥ २७० ॥ *दिवि[3] सांडूनि दिवौकस[4] । इच्छूनि हरीचा सहवास । आवडी झाले व्रजौकस । योनि अशेष जन्मोनी ॥ ७१ ॥ तिहीं घेतां तो मकरंद । म्हणती कृष्णपदारविंद । श्रवणसुखाचा आनंद । निर्जरवृंद नेणती ॥ ७२ ॥ म्हणती कृष्णचरणकमळ । परमानंदामोदबहळ[5] । सेवूं जाणती जे आळिउळ[6] । त्यां हा परिमळ रुचेना ॥ ७३ ॥ ग्राममक्षिका क्षुद्ररसें । ग्राम्यभोगें विषयी तैसे । निर्जर होऊनि स्वर्गवासें । श्लाघेजती ऐश्वर्य ॥ ७४ ॥ राया ऐसा कुरुभूषणा । प्रलंब वधितां संकर्षणा । देवीं पूजोनि उत्साह नाना । केले ते ते तुज कथिले ॥ २७५ ॥ ऐसें भांडीरवनचरित्र । प्रलंबवध अतिपवित्र । भावें ऐकती ज्यांचे श्रोत्र । कैवल्यपात्र ते होती ॥ ७६ ॥ पुढें मुंजाटवीच्या[7] ठायीं । वणवा जळतां गोपगायी । प्राशन करील शेषशायी । श्रवणालयीं तें वसवा ॥ ७७ ॥ इतुकी श्रीमद्भागवतीं । दशमस्कंधीं कृष्णकीर्ति । शुकें कथिली नृपाप्रति । जे हे श्रोत्रीं परिसिली ॥ ७८ ॥ जनार्दनकृपा एकनाथें । चिदानंदस्वानंदभरितें । गोविंदवरें केलें पुरतें । दयार्णवें सप्रेमें ॥ ७९ ॥ हें सप्रेम प्रज्ञाबळें । अष्टादशाचें मोकळें । व्याख्यान केलें जैसें कळे । सुबोध अबळें विवरितां ॥ २८० ॥ दयार्णवाची हे विनति । सप्रेम करितां भगवद्भक्ति । न वांछितां भुक्तिमुक्ति । पाठीं लागती भक्तांचे ॥ ८१ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे अष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां प्रलंबवधो नाम अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥ श्रीरामार्पणमस्तु ॥ श्लोक ३२ ॥ टीका ओंव्या ॥ २८१ ॥ एवं संख्या ॥ ३१३ ॥ (अठरावा अध्याय मिळून ओवीसंख्या १०३८२).

**अठरावा अध्याय समाप्त.**

**पाठभेदः—** * दिव्य ( मुंगीप्रत ).

१ आश्रय. २ सामर्थ्यानें. ३ स्वर्ग. ४ देव. ५ ब्रह्मानंद हाच सुगंधातिशय ज्यांत तें. ६ भ्रमरसमूह. ७ मुंजनामक गवताचें अरण्य.

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय १९ वा

श्रीसदाशिवाय नमः । वरद विभो विवर्तजनका । विस्मृतिस्मृतिप्रकाशका । विवर्तेशीं स्वपादभजकां । तमोग्रासका विदितात्मन् ॥ १ ॥ स्वविस्मृतीचें आवरण । पांघरोनि जो मूढपण । अवगोनि[1] वरपडला आडरान । विपरीतज्ञानविक्षिप्त ॥ २ ॥ बिंबें प्रतिबिंबा देखणें । आपणा विसरोनि तें मी म्हणणें । तैसें विषयातें चैतन्यें । भ्रमोनि येणें जीवत्वा ॥ ३ ॥ तेथ मनाच्या संकल्पें । प्राणप्रवृत्ति देहात्मरूपें । ज्ञानकर्मांच्या साक्षेपें । विषयीं प्रतापें झगटता ॥ ४ ॥ मग तृष्णाउष्णें तापल्या रानीं । तन्मात्रजनित सुखाचें पाणी । न पवतां चिंतिती निर्वाणीं । अनेक श्रेणी देवांच्या ॥ ५ ॥ ऐसे अभीष्टविषयप्रद । होती सकामभजनें वरद । मोद म्हणोनि देती खेद । उदार निजपदपर्यंत ॥ ६ ॥ त्यांचीं पदेंचि नश्वरें । कोठूनि देती अनश्वरें । भज्येंचि बुडिजे भवसागरें । भजक निस्तरे कैसेनी ॥ ७ ॥ गुणाभिमानी देवत्रय । सकामभजनें ओपिती विषय । मा इतरांचा पाड काय । आनंदमय करावया ॥ ८ ॥ मृगाम्भडोहीं नसोनि जळ । मृगांतें भ्रमवी दिसोनि पघळ । तैसे विषय काम्यकर्मफळ । ते निष्फळ वरदेशीं ॥ ९ ॥ लुटुपुटूच्या खेळाप्रती । सुहृद जे जे जेऊं येती । त्यांची येरझार मात्र रिती । वृथा वदती गौरव तो ॥ १० ॥ तेंवि वरदेशीं वरदानें । भवभ्रमाचीं अधिष्ठानें । विवर्तजनका विभुत्व[6]गुणें । तव पदभजनें निरसती ॥ ११ ॥ अनंतकोटिब्रह्मांडपंक्ति* । तव निमेषामाजीं होती । उन्मेषबोधें लया जाती । विभुत्वशक्ति हे तुझी ॥ १२ ॥ तरी निर्गुणीं निमेष तो कोण । जें स्वविस्मृतीचें अंगीकरण । भ्रमोक्त भेदविक्षेपस्फुरण । विवर्त स्वप्न ज्यामाजीं ॥ १३ ॥ स्वप्नीं बुडोनि तोषरोषें । भ्रमें वोसणे तदावेशें । त्यातें प्रबोध स्वप्रकाशें । विवर्तदशे मुकविसी ॥ १४ ॥

---

**पाठभेद** :— * ब्रह्मांडाच्या पंक्ति ( मुंगीप्रत ); अनंतकोटिब्रह्मांडपंक्ति ( उमरखेडप्रत ).

१ मिथ्या भासाचें आदिकारण. २ मूर्ख होऊन. ३ शिरला. ४ देहच मी अशा ज्ञानानें भ्रमिष्ट झालेला. ५ ज्यास भजावयाचें तो. ६ सर्वव्यापकता.

जळीं समरसे जैसें लवण । तैसें स्वपदीं अभेदभजन । देखोनि विवर्तेंशीं प्रसन । करिशी संपूर्ण तयाचें ॥ १५ ॥ देखोनि अवघे निजात्मस्मृति । मुकोनि वरपडले विस्मृति । तेणें बुडाले संश्रुति– । माजीं विवर्तीं गुंतोनी ॥ १६ ॥ तया विवर्तांची निवृत्ति । करावया करुणामूर्ति । प्रकटावया स्वैसंविति । पूर्णस्थिती अवतरसी ॥ १७ ॥ आडीं अवघडीं पडे जड । तेथ काढूं पवाडे जें सुघड । तें रज्जु लांबोनि चौपट दृढ । काढी अबुडोनि बुडतत्यातें* ॥ १८ ॥ जड काढूं जो पवाडला । तो काय म्हणिजे आडीं पडला । विवर्त निरसावया अवतरला । तो तूं दादुला विदितात्मा ॥ १९ ॥ एरवीं कूपामाजीं देखा । दोघां प्रवेश तो सारिखा । परी तुज ऊर्ध्व मार्ग ठावुका । येरां मूर्खां अधोगति ॥ २० ॥ म्हणोनि स्वामी विदितात्मया । तुज नमो जी सद्गुरुराया । वरें† आज्ञापिलिया कार्या । निजगौरवें चालविजे ॥ २१ ॥ तंव सद्गुरु म्हणती भलाभला । अवंचकभाव कळों आला । स्वपादभजनप्रेमा तुजला । आम्हीं ओपिला वेतनार्थ ॥ २२ ॥ दशमस्कंधीं एकोणिसावा । अध्याय आतां निरूपावा । आज्ञेसरिसा दयार्णवा । माजी उठावा प्रज्ञेचा ॥ २३ ॥ प्रलंब वधिला अष्टादशीं । पुढें श्रीकृष्ण एकोणिशीं । वणवा जळतां गोगोपांसी । प्राशूनि ४त्यांसि संरक्षी ॥ २४ ॥ मुंजाटवीचें आख्यान‡ । जेथें दानावळ प्राशून । गोगोपाळां रक्षी कृष्ण । यावरी श्रवण तें कीजे ॥ २५ ॥

क्रीडासक्तेषु गोपेषु तद्गावो दूरचारिणीः । स्वैरं चरंत्यो विविशुस्तृणलोभेन गह्वरम् ॥ १ ॥

शुक म्हणे गा उत्तरातनया । रामें प्रलंब मारिलिया । व्रजीं अद्भुत ऐकोनियां । परमाश्चर्य मानिती ॥ २६ ॥ पुन्हा कोणे एके दिवशीं । गोधनें गोपाळ रामकृष्णाशीं । जाते झाले काननासी । उत्साहेंशीं क्रीडत ॥ २७ ॥ कोणी म्हणती प्रलंबहनना । उपरी तेचि दिवशीं गोधना । चारितां वरपडलीं अडराना । त्या कारणा अवधारीं ॥ २८ ॥ अलौकिक कृष्णखेळ । देखोनि गुंतले गोपबाळ । न करितां धेनूंचा सांभाळ । झाले केवळ क्रीडासक्त ॥ २९ ॥ त्यांच्या मोकाट गाई रानीं । दुरी संचरल्या आडरानीं । कोमळ तृणातें भुलोनी । गह्वरवनीं प्रवेशल्या ॥ ३० ॥

अजा गावो महिष्यश्च निर्विशंत्यो वनाद्वनम् । ईषीकाटवीं निर्विविशुः क्रंदंत्यो दावतर्षिताः ॥ २ ॥

शेळ्या मेंढ्या गाई महिषी । सांडूनि भांडीरकाननासी । वनांतरीं प्रवेशासी । करित्या झाल्या सैरीट ॥ ३१ ॥ ईषीका म्हणिजे दर्भ विशेष । जेथ सजळ भूप्रदेश । तेथ पावोनि अभिवृद्धीस । अग्रीं सरस लसलसिती ॥ ३२ ॥ उष्णें वाळोनि गेलें तळीं । कणसें उधळती व्योमां धवळीं । मुंजावनें ग्रीष्मकाळीं । विरसें मोकळीं कडकडित ॥ ३३ ॥ श्वापदाकुळ महाघोर । नाहीं पश्वादि- संचार । ईषीका वाढली अपार । तेथ धेनु सत्वर रिघाल्या ॥ ३४ ॥ द्विगुणी त्रिगुणी धेनूहून ।

**पाठभेद :—** * बुडत्यातें ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † वरदें ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡ व्याख्यान ( मुंगीप्रत ); आख्यान ( उमरखेडप्रत ).

१ आत्मज्ञान. २ प्रवेशे. ३ समर्थ. ४ मोकळ्या. ५ गुहायुक्त अरण्य. ६ स्वच्छंद. ७ वनपशूंनीं व्याप्त.

सरळ वाढलें लंबायमान । मुंजाटवीं ईषीकातृण । धेनु मग्न त्यामाजीं ॥ ३५ ॥ सरळ वाढली सर्व ईषीका । कोमळ आडव्या फुटल्या शाखा । त्यांच्या स्वादें धेन्वादिकां । हांव अधिका प्रवेशीं ॥ ३६ ॥ स्वादा भुलोनि ईषीकारण्यीं । भरतां ग्रीष्मीं तापल्या किरणीं । मार्ग नुमजे न मिळे पाणी । आक्रंदोनि तळमळिती ॥ ३७ ॥ तंव ते वनीं दावानळ । शुष्कतृणें पेटला प्रबळ । तयावरील तीव्रा[1]निळ । झोंबतां तळमळ धेनूंसी ॥ ३८ ॥ वायुवेगें वणवा धांवे । धेनूपर्यंत पावे न पवे । तंव येरीकडे गोप आघवे । पाहती थवे धेनूंचे ॥ ३९ ॥

तेऽपश्यंतः पशून् गोपाः कृष्णरामादयस्तदा । जातानुतापा न विदुर्विचिन्वंतो गवां गतिम् ॥ ३ ॥

दचकोनि म्हणती एक गडी । खेळां गुंतलीं पोरें वेडीं । गाई भरल्या अरडी दरडी । धांवा तांतडीं हुडकारे ॥ ४० ॥ हें ऐकोनि समस्त । झाले पश्चात्तापवंत । म्हणती खेळीं गुंतलों भ्रांत । धेनु वनांत विखुरल्या ॥ ४१ ॥ धेनु पाहती भंवतें रान । त्याचि सरिसे रामकृष्ण । स्वयें असोनि सर्वज्ञ । नेण होऊन वर्तती ॥ ४२ ॥ एक चढती टेंकावरी[2] । एक वळघले उच्च शिखरीं । एक वेंघूनि तरूवरी । धेनु दुरी न्याहाळिती ॥ ४३ ॥ एक धांवती गिरिकंदरीं । एक पाहती पूर्व अखरीं[3] । एक धांवले गांवखरीं[4] । यमुनातीरीं जलाशयीं ॥ ४४ ॥ तंव रामकृष्णादि बुद्धिमंत । विचाराची कथिती मात । धेनु चरल्या फिरल्या जेथ । ते पदवी[5] घेत चलारे ॥ ४५ ॥ मग ते धेनूंचे मागोवे । घेत चालिले गोप आघवे । कुकारे[6] घालिती घेऊनि नांवें । *दीर्घरवप्लुत[7]मानें ॥ ४६ ॥

तृणैस्तत्खुरदच्छिन्नैर्गोष्पदैरंकितैर्गवाम् । मार्गमन्वगमन् सर्वे नष्टाजीव्या विचेतसः ॥ ४ ॥

धेनुकळपाच्या दळवाढें[8]† । खुरीं तुडविलिया चेंपटें । दातीं तृणें केलीं खुरटें । पाहोनि वाटे धांवती ॥ ४७ ॥ कोणें वितृण भूमिभाग । तेथ उमटले पाहती माग । तेणें पंथें करूनि लाग । अतिसवेग धांवती ॥ ४८ ॥ म्हणती जित्रबें गोधनें गेलीं । तेव्हां जीविकाचि राहिली । मरणावांचूनि कुटुंबें मेलीं । हे चिंता जाकळी गोपाळां ॥ ४९ ॥

मुंजाटव्यां भ्रष्टमार्गं क्रंदमानं स्वगोधनम् । संप्राप्य तृषिताः श्रांतास्ततस्ते संन्यवर्तयन् ॥ ५ ॥

ऐसे सचिंत गोपाळ । धेनुमार्गें उतावीळ । हुडकितां कडतर ग्रीष्मकाळ । तेणें सकळ संतप्त ॥ ५० ॥ हृदयीं चिंतेची आहळणी । बाह्य तापले भवार्क[10]किरणीं । धांवत श्रांत सर्वां करणीं । इच्छिती पाणी सुखाचें ॥ ५१ ॥ तंव तें नाडळे[11]‡ विषयवनीं । मनें गुंतलीं गोगोधनीं । कृष्ण

**पाठभेद** :— * दीर्घरवें ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † दळवटे ( मुंगीप्रत ); दळवटें ( उमरखेडप्रत ). ‡ नाडले ( मुंगीप्रत ), नाडळे ( उमरखेडप्रत ).

१ उष्ण वायु. २ टेंकडीवर. ३ गुरांची एके ठिकाणीं जमून बसण्याची जागा. ४ गांवाचे आसपास. ५ मार्ग. ६ हांका. ७ दीर्घ स्वराहून जो लांब उच्चाराचा स्वर तो प्लुत. ८ समुदायानें. ९ शेतें. १० संसाररूप सूर्याच्या किरणांनीं. ११ आढळत नाहीं.

त्यांमाजीं असोनी । कूटस्थपणीं त्यांसरिसा ॥ ५२ ॥ आत्मप्राप्तीचा श्रेष्ठ मार्ग । साधन गोधनाचा वर्ग । मुंजारण्यामाजीं साङ्ग । क्रंदतां दीर्घ परिसती ॥ ५३ ॥ भ्रष्टमार्गें महा अडचणी । गोधनें शिरकलीं मुंजारण्यीं । आक्रंदतां दीर्घ ध्वनीं । ऐकती कर्णीं गोपाळ ॥ ५४ ॥ ऐकोनि गाईंचा करुणास्वर । समीप धांवले सत्वर । परंतु मुरडावया नव्हे धीर । उष्णें तीव्र पोळले ॥ ५५ ॥ तृषें जाऊं पाहती प्राण । गोधनें वळावयालागून । नोहे गडियां आंगवण । जाणूनि कृष्ण कळवळिला ॥५६॥

ता आहूता भगवता मेघगंभीरया गिरा । स्वनाम्नां निनदं श्रुत्वा प्रतिनेदुः प्रहर्षिताः ॥ ६ ॥

धेनु पडिल्या मुंजाविपिनीं । विकळ संवगडे देखोनी । कृपा आली कृष्णमनीं । धेनूंलागूनि तो बाहे ॥ ५७ ॥ मेघगंभीरगिरा हरि । धेनु बाहतां करुणास्वरीं । जाणूनि हरीची वैखरी । सुखनिर्भरीं हरिखेल्या ॥ ५८ ॥ उच्चस्वरीं वासुदेवें । आळवितां घेऊनि नांवें । आनंदल्या धेनु जीवें । देती गौरवें प्रतिशब्दा ॥ ५९ ॥

ततः समंताद्वनधूमकेतुर्यदृच्छयाऽभूत्क्षयकृद्वनौकसाम् ।
समीरितः सारथिनोल्बणोल्मुकैर्विलेलिहानः स्थिरजंगमान्महान् ॥ ७ ॥

गाई समीप गोपाळ आले । परंतु श्रमें विकळ झाले । कृष्णवाक्यें आनंदले । कळप हुंबरले धेनूंचे ॥ ६० ॥ इतुक्यामाजीं दावानळ । अकस्मात अतिप्रबळ । भोंवतें वेष्टिलें मंडळ । लागती ज्वाळ आकाशा ॥ ६१ ॥ कडकडाटें फुटती ध्वनि । प्रबळ प्रज्वळे एधभानी[3] । चपळ चौताळे शुष्कतृणीं । श्वापदश्रेणीसंहर्ता ॥६२॥ धूम्रध्वज वायुसारथि । वनौकसांच्या क्षयाप्रति । प्रवर्तला तो शलपंक्तीं[4]* । पाडी आवर्तीं जिह्वाग्रें ॥ ६३ ॥ तीव्र शरांचीं संधानें । तैशीं उल्मुकें[5] दारुणें । करिती नभःपथीं उत्प्लवनें । पुढें काननें पेटविती ॥ ६४ ॥ स्फुलिंगें[6] उडती कोट्यानुकोटी । पडती वायूच्या झंझाटी । लागतां तृणीं कोरडचा काष्ठीं । भडका उठी सवेग ॥ ६५ ॥ हिरण्यकशिपूच्या† निर्दलना । असंख्यकोटि नृसिंहसेना । अष्ट दिशा भूमिगगना । व्यापूनि वना चेतविती ॥ ६६ ॥ तैसे स्फुलिंग जेथ तुटती । तेथ स्वयंभ भडके उठती । तापें पाषाणलाह्या फुटती । जेंवि सुटती महायंत्रें[7] ॥ ६७ ॥ वृक्ष गुल्म लता झाली‡ । वंश[8] वेत्रे शाल तांळी[9] । जळतां प्रचंडप्रलयानळीं । होय होळी स्थिरचरां ॥६८॥ सरड पाली सर्प वृश्चिक । नाना यातींचे तृणकीटक । गोमीगणे घुमसी¶ मूषक । महातक्षक जळताती ॥ ६९ ॥ व्याघ्र सिंह रीस वानर । वृक जंबुक मृग सूकर । चितळ सामरें तरस तगर । वनकुंजर शशकादि ॥ ७० ॥ भल्लुक उलूक श्येनपक्षी । शुक सारिका नानावृक्षीं । गृहें सांडोनि

---

**पाठभेद :—** * शलभपंक्ति ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † श्य ( मुंगीप्रत ); शि ( उमरखेडप्रत ). ‡ जाळी ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ¶ घुशी ( मुंगीप्रत ); घुसी ( उमरखेडप्रत ).

१ सामर्थ्य. २ अरण्यांत. ३ अग्नि. ४ ताडांच्या पंक्तींत. ५ जळतीं लांकडें. ६ ठिणग्या. ७ तोफा. ८ वेळू. ९ ताडांचें वन.

अंतरिक्षीं । भ्रमोनि पावकीं पडताती ॥ ७१ ॥ चाष भरद्वाज मयूर । चातक कळविंक* तित्तिर† । काकपिकादि कपोत कीर । लघुलावर शकुंतें ॥ ७२ ॥ अनेक गृध्रांचिया जाति । पिंगळे वलगुला सांगो किती । चिमण्या चिडियां पारापति । टिवटिव्या जळती क्रौंचादि ॥ ७३ ॥ स्थावर जंगमा प्रळयकारी । पडली दावानळाची भंवरी । गाई गोपाळां बोहरी । क्षणामाझारीं हों पाहे ॥ ७४ ॥

तमापतंतं परितो दवाग्निं गोपाश्च गावः प्रसमीक्ष्य भीताः ।
ऊचुश्च कृष्णं सबलं प्रपन्ना यथा हरिं मृत्युभयार्दिता जनाः ॥ ८ ॥

गोपगोधनां नाशहेतु । परिघाकार अकस्मातु । चंडदावाग्नि प्रमत्तु । महद्भूत देखोनि ॥ ७५ ॥ गाई आणि गोपाळ सकळ । मानूनियां तो प्रलयकाळ । प्राणभयें अतिव्याकुळ । दिग्मंडळ लक्षिती ॥ ७६ ॥ नाहीं रक्षिता ते काळीं । पुढें देखोनियां वनमाळी । कृष्णाभोंवतीं मिळालीं सकळीं । म्हणती सांभाळीं प्रपन्नां[3] ॥ ७७ ॥ बलभद्रेंशीं मुकुंदातें । म्हणती रक्षीं दावाग्नितप्तें । तुजविण त्राता नाहीं एथें । शरणागतें सांभाळीं ॥ ७८ ॥ तूंचि आमुचा माता पिता । तूंचि आमुचा भ्राता त्राता । तूंच संकटीं संरक्षिता । अनाथनाथा श्रीकृष्णा ॥ ७९ ॥ पूर्वीं दुष्टें अघासुरें । गिळिलीं वत्सपवांसुरें । तें त्वां रक्षिलीं दातारें । कृपासमुद्रें गोविंदा ॥ ८० ॥ कालियविषाचें पिऊनि पाणी । प्रेत होऊनि पडतां धरणीं । कृपामृतें त्वां चक्रपाणि । अवलोकूनि वांचविलें ॥ ८१ ॥ आतां आजिचिये आकांतीं । कृष्णा तूंचि आमुची गति । प्राणभयें‡ करुणामूर्ति । काकुळती येतसों ॥ ८२ ॥ तेथ दावाग्नि जाळितां राती । तुवां प्राशूनि जगत्पति । गोगोपाळ गोपयुवति । सुखविश्रांतीं पावविलीं ॥ ८३ ॥ कुरुचक्रचूडावतंसमणि । मृत्युभयार्तप्राणिगणीं । जेवि चिंतिजे निर्वाणीं । मोक्षदानी श्रीविष्णु ॥ ८४ ॥ तैसा करुणास्वरें धेनु । समस्त गोळांचा¶ गण । दावानळें संत्रासून । श्रीभगवान् स्तविताती ॥ ८५ ॥

कृष्ण कृष्ण महावीर हे रामाऽमितविक्रम । दावाग्निना दह्यमानान्प्रपन्नांस्त्रातुमर्हथः ॥ ९ ॥

आम्रेडितें[4] आदरार्थीं । कृष्ण कृष्ण आर्तें§ म्हणती । तुझीं वीर्यें लिहितां क्षिति । हे निश्चिति पुरेना ॥ ८६ ॥ तो तूं महावीर्य हरि । सखा आमुचा कैवारी । असतां दावाग्नि जो हरी । दुःखसागरीं आहाळलों ॥ ८७ ॥ अमितविक्रमा श्रीबलरामा । तुझा अपार अगाध महिमा । दावाग्नि हा जाळितो आम्हां । पुरुषोत्तमा संरक्षीं ॥ ८८ ॥ तुम्ही दोघे असतां जवळी । शरणागतां दावाग्नि जाळी । तुमचा महिमा तये काळीं । अस्ताचळीं स्पर्शला‖ ॥ ८९ ॥ ऐसें न करूनियां दोघे । निजैश्वर्यप्रचंडवोघें । विघ्न भंगूनि अवघें । सामर्थ्य वेगें दाखवा ॥ ९० ॥ शरणागतरक्षणार्थ । तुम्ही

---

**पाठभेद :** — * बलविंख ( मुंगीप्रत ); कळविंख ( उमरखेडप्रत ). † तीत्तर ( मुंगीप्रत ); तितर ( उमरखेडप्रत ). ‡ प्रिया ( मुंगीप्रत ) भये ( उमरखेडप्रत ). ¶ गोपाळांचा ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). § आदरें ( मुंगीप्रत ); आर्तें (उमरखेडप्रत). ‖ स्पर्शेना ( मुंगीप्रत ); स्पर्शला ( उमरखेडप्रत ).

१ चिमणी. २ रातकिडा. ३ शरणागतांना. ४ द्विरुक्तीनें.

ऐश्वर्यें समर्थ । प्रकट करूनि स्वसामर्थ्य । महा अनर्थ हा चुकवावा ॥ ९१ ॥ आपण असतां समर्थ । स्वजन दिसती अनाथ । तेव्हां ऐश्वर्य होय व्यर्थ । कोण पुरुषार्थ महिमेचा ॥ ९२ ॥

नूनं त्वद्बांधवाः कृष्ण न चार्हंत्यवसीदितुम् । वयं हि सर्वधर्मज्ञ त्वन्नाथास्त्वत्परायणाः ॥ १० ॥

प्रबोधसिंहाचीं लेंकरें । बळें गांजितां भवकुंजरें । कीं सूर्यकिरणें अंधकारें । ग्रासितां नुरे सूर्यत्व ॥ ९३ ॥ सच्चित्सुखांची तूं राशि । आम्ही सर्वदा सहवासी । नाहीं* पात्र भवदुःखासी । कृष्णा मानसीं विचारीं ॥ ९४ ॥ आम्हां बंधुवर्गां सकळां । जाळीत असतां प्रळयानळा । तूं देखसी गोपाळा । हें घननीळा अयोग्य ॥ ९५ ॥ आम्ही तुझे शरणागत । तुज वेगळा नेणों नाथ । तूंचि आमुचा अर्थस्वार्थ । निजपुरुषार्थ तूं आम्हां ॥ ९६ ॥ सर्वधर्मांचें अधिष्ठान । सर्ववेत्ता तूं धर्मज्ञ । तावक जाळितां कृशान । तैं हें न्यून कोणासी ॥ ९७ ॥ लेंकुराचें न्यून पूर्ण । अवघा मातेसी अभिमान । कामिनीचें अलंकरण । तें भूषण कांतासी ॥ ९८ ॥ स्वकीयांसि होतां ग्लानि । ते स्वामीची मानहानि । सर्वधर्मज्ञालागूनी । काय दुजेनीं सांगावें ॥ ९९ ॥ ऐशी बंधुवर्गाची ग्लानि । कृष्णें परिसोनि आपुल्या कानीं । पूर्ण कृपाळु चक्रपाणि । अंतःकरणीं कळवळिला ॥ १०० ॥

श्रीशुक उवाच — वचो निशम्य कृपणं गोपानां भगवान् हरिः ।
निमीलयत मा भैष्ट लोचनानीत्यभाषत ॥ ११ ॥

षड्गुणैश्वर्य अव्याहत । गोपवेषामाजीं गुप्त । तो श्रीकृष्ण भगवंत । ना भी म्हणत सखयांतें ॥ १ ॥ म्हणे गडी हो भिऊं नका । सोडा दावानळाची शंका । एक विचार सांगतों निका । तो आइका अवघेची ॥ २ ॥ तुम्ही माझिये आज्ञेवरून । दृश्य देखणें झांका नयन । ऐसें बोलतां झाला वचन । श्रीभगवान जगदात्मा ॥ ३ ॥

तथेति मीलिताक्षेषु भगवानग्निमुल्बणम् । पीत्वा मुखेन तान् कृच्छ्राद्योगाधीशो व्यमोचयत् ॥ १२ ॥

ऐकोनि कृष्णाची अमृतवाणी । अवघे तोषले अंतःकरणीं । जेंवि मरतया निर्वाणीं । प्राणदानी हरि होय ॥ ४ ॥ अंगीकारूनि कृष्णवचन । तिहीं झांकिले असतां नयन । सुखें दावानळ उल्बण । प्राशूनि स्वजन सोडवी ॥ १०५ ॥ श्रीकृष्णाचें वदनकमळ । कोमल जैसें नीलोत्पल । तेणें प्रचंड दावानळ । गिळी गोपाळ केंवि म्हणा ॥ ६ ॥ योगमायेचा नियंता । अगाध ज्याची ऐश्वर्यसत्ता । निमेषामाजीं सोडविता । झाला तत्त्वतां श्रीकृष्ण ॥ ७ ॥ संसारगह्वरप्रवेश । मार्गामार्गें धावतां क्लेश । क्षुधातृषाक्रांतिदोष । केला मोक्ष तेथूनी ॥ ८ ॥ मोहदावाग्नीचें भय । जेथ कां प्रचंड तापत्रय । नेणों तितुकें झाले काय । पुसिला ठाय दुःखाचा ॥ ९ ॥ योगमायेची विचित्र करणी ॥

पाठभेदः — * नहीं ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ ईश्वरी ज्ञान. २ सद्रूप, ज्ञानरूप, आनंदरूप या रूपत्रयाचा राशि. ३ तुझे आश्रित. ४ प्रदीप्त.

पूर्वस्थळीं भांडीरवनीं । कृष्णें ठेविले नेऊनी । अणुमात्र चरणीं न चालतां ॥ ११० ॥ लंकेमाजीं राक्षसाहातीं । स्वप्नभ्रमें सांपडे रातीं । त्यासि पूर्व सदनाप्रति । आणी जागृति ज्यापरी ॥ ११ ॥ तैसें कृष्णें चमत्कारें । गोपगोधनें गोवरें । भांडीरवना नेलीं त्वरें । अमृतोद्गारें तोषविलीं ॥ १२ ॥

ततःश्च तेऽक्षीण्युन्मील्य पुनर्भांडीरमापिताः । निशाम्य विस्मिता आसन्नात्मानं गाश्च मोचिताः ॥ १३ ॥

तंव ते अवघेचि गोपाळ । श्रवणीं आइकती निह्ळे । तापत्रयाचा दावानळ । कोणा प्रबळ नतावी ॥ १३ ॥ मग उघडूनि पाहती डोळे । भोंवते गोधनांचे मेळे । म्हणती भांडीरवनाजवळें* । कोणे लीलें पातलों ॥ १४ ॥ नाहीं करचरण चालिले । नाहीं वाचें उच्चारिलें† । नाहीं मानसें कल्पिलें । कैसें ठाकलें हें स्थान ॥ ११५ ॥ एक एकातें सांगती । ऐकोनि अवघे विस्मित होती । गोधनासहित आम्हांप्रति । म्हणती श्रीपति रक्षिता ॥ १६ ॥ शेळ्या मेंढ्या गाई महिशी । आम्हां समस्त‡ गोपाळांसी । रक्षिता झाला हृषीकेशी । दावानळासी प्राशूनी ॥ १७ ॥ ऐसा पूर्ण परामृश[2] । करूनि मानिती संतोष । म्हणती कृष्ण हा आदिपुरुष । गोपवेष अवगला[3] ॥ १८ ॥ श्रीकृष्णाची अतर्क्यलीला । मुखें प्राशिलें दावानळा । आम्हां रक्षिलें गोगोपाळां । प्रलयकाळापासोनी ॥ १९ ॥ नेत्र झांकूनि उघडी नुघडी । तंव आणिलें भांडीरवडीं । माया कृष्णाची केवढी । जो§ निजगडी पैं आमुचा ॥ १२० ॥ प्रलंब वधिला संकर्षणें । दावानळ प्राशिला कृष्णें ॥ ऐसें अगाध यांचें करणें । वृथा नटोनि मनुजत्वीं ॥ २१ ॥

कृष्णस्य योगवीर्यं तद्योगमायाऽनुभावितम् । दावाग्नेरात्मनः क्षेमं वीक्ष्य ते मेनिरेऽमरम् ॥ १४ ॥

ऐसें कृष्णाचें महिमान । योगमाया अनुभवून ॥ प्रत्यक्ष म्हणती अवघे जन । ब्रह्म पूर्ण हा होय ॥ २२ ॥ कृष्ण केवळ अमरपति किंवा ईश्वर आदिमूर्ति । घेऊनि गोपवेषाची बुंथी । म्हणवी संतति नंदाची ॥ २३ ॥ अजा अँविकें[4] सहित गुरें । आम्हां जाळितां वैश्वानरें ॥ कृष्णें रक्षिलें चमत्कारें । आम्हीं स्वनेत्रें पाहिलें ॥ २४ ॥ तंव ते गोपाळ देवकोटि । म्हणोनि चमत्कारले पोटीं । कृष्णकीर्तीच्या करिती गोठी¶ । योगपरिपाठी परमार्थें ॥ १२५ ॥ एक म्हणती इंद्रजाळ । कृष्णें दाविलें आम्हां सकळ । तापत्रय हा दावानळ । संसार केवळ गह्वर ॥ २६ ॥ गोगोधनापाठीं लागे । दुःखशोकाचीं फिरतां‖ दांगें[5] । क्षुधेतृषेच्या पांगिलों[6] पांगें । विश्रांतिमार्गें सांडवलों ॥ २७ ॥ आम्हांचि माजीं असतां कृष्ण । मायामोहें विस्मरण । पडिलें म्हणोनि पावलों शीण । दैवें आठवण दीधली ॥ २८ ॥ कृष्ण चिंतूनि सर्वभावें । शरण रिघतांचि आघवें । येणें लोपोनियां मावे । केलें ठावें निजरूप ॥ २९ ॥ कैंचा दाव दावानळ । आम्ही कृष्णाचे गोपाळ । कृष्णसंगें खेळों खेळ । नित्य निर्मळ

**पाठभेदः—** * हा ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † उच्चारिले ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡ स्ता ( मुंगीप्रत ); स्ता ( उमरखेड ). § तो ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ¶ ष्टी ( मुंगीप्रत ), ठी ( उमरखेडप्रत ). ‖ फिरती ( मुंगीप्रत ); फिरतां ( उमरखेडप्रत ).

१ अद्‌भुत चमत्कार. २ विचार. ३ जाणिला. ४ मेंढरें. ५ अरण्यें. ६ वेगळे पडलों. ७ चिंतेनें.

निर्दोष ॥ १३० ॥ महाभयकृद्भयनाशन । तो हा श्रीकृष्ण भगवान । गोधनेंशीं आमचे प्राण । रक्षी पिऊनि दावाग्नि ॥ ३१ ॥ तो हा अमरां अमरपति । कृष्ण केवळ सद्गुरुमूर्ति । करी मायेची प्रवृत्ति । आणि निवृत्तिकर्ता जो ॥ ३२ ॥ ऐसे गोपाळ आपुले मनीं । कृष्णमहिमा अनुभवूनी । केला निश्चय अंतःकरणीं । हा चक्रपाणि सुरवर्य ॥ ३३ ॥

गाः संनिवर्त्य सायाह्ने सहरामो जनार्दनः । वेणुं विरणयन् गोष्ठमगाद्गोपैरभिष्टुतः ॥ १५ ॥

दोहीं बाहीं गोपथाटी । वेणु वाहती चंगाटी । कृष्ण बलराम जगजेठी । मध्यपीठीं शोभती ॥ ३४ ॥ ऐसे गोपाळ करिती तर्क । तंव बळरामेंशीं व्रजपाळक । गाई परतवूनि सम्यक । व्रजासन्मुख मोहरविल्या ॥ १३५ ॥ श्यामराजीवलोचन । हृदयीं श्रीवत्सलांछन । आजानुबाहु सर्वाभरण । पीतवसन परमात्मा ॥ ३६ ॥ शशांककांति नीलवसन । कंबुवलय संकर्षण । निर्जर होऊनि गोपगण । परिवारून सेविती ॥ ३७ ॥ गोपाळ करिती नानास्तोत्रें । अलौकिकें बालचरित्रें । नित्य नूतनें विचित्रें । घेतां श्रोत्रें मोक्षदें ॥ ३८ ॥ ऐसा रामसहित कृष्ण । गोप गोधनें घेऊन । सायंकाळीं व्रजभुवन । स्वानंदघन प्रवेशला ॥ ३९ ॥

गोपीनां परमानंद आसीद्गोविंददर्शने । क्षणं युगशतमिव यासां येन विनाऽभवत् ॥ १६ ॥

तंव कृत्तिकायुक्तपूर्णिमेसी । गगनीं मोहरतां पूर्णशशी । भरतें भरे क्षीराब्धीसी । गोपीमानसीं त्याहूनी ॥ १४० ॥ गोधनें गोपाळ गोविंद । व्रजासमीप आनंदकंद । आला जाणूनि गोपीवृंद । परमानंद पावती ॥ ४१ ॥ वियोगरजनीचिये अंतीं । उदया येतां कृष्णगभस्ति । पद्मवदना गोपयुवती । उल्हासती आल्हादें ॥ ४२ ॥ गोविंददर्शनाचे ठायीं । गोपी निमग्न आनंदडोहीं । होतां गृहमेध्यांची कांहीं । स्मृति देहीं न धरती ॥ ४३ ॥ अहंतेची पुलिका* विरे । स्वानंदाचें भरतें भरे । उचंबळोनि कर्णद्वारें । पाहती सादर हरिरूप ॥ ४४ ॥ सबाह्य कोंदलें कृष्णसुख । नयनां रुचलें श्रीकृष्णमुख । वदनचंद्रींचें पीयूख । चकोर होऊनि सेविती ॥ १४५ ॥ ऐसा गोपिकांचा प्रेमा । गवसणी होय कृष्णसोमा । पुढती वियोगाची अमा । युगशतसमसाम्य होय ॥ ४६ ॥ कृष्णवियोग क्षणार्ध एक । वाटे दिव्ययुगांचें शतक । तेव्हां हरिविरहाचें दुःख । जाळी पावक ज्यापरी ॥ ४७ ॥ दावानळें ग्रीष्मकाळीं । जळोनि काननें होती होळी । परंतु जीवनें राहती मुळीं । प्रेम न्यहाळीं मेघार्थ ॥ ४८ ॥ तैशी हरीच्या पुनरागमनीं । जीविताशा गोपीमनीं । पुन्हा प्रत्यक्ष हरिदर्शनीं । उल्हासोनि टवटविती ॥ ४९ ॥ ऐशी प्रेमळांची जाति । बाणे सप्रेमळां चित्तीं । येरांलागीं हे व्युत्पत्ति । चंद्रामृतीं ध्वांक्षत्वें ॥ १५० ॥ म्हणूनि राया कुरुपाळका । जाणसी सप्रेमश्रवणसुखा ।

**पाठभेद—** * अळिका ( मुंगीप्रत ); पुलिका ( उमरखेडप्रत ).

१ भय उत्पन्न करणारा व भय नाहींसें करणारा. २ समुदाय. ३ परत आणिल्या. ४ शंखाचें कंकण धरणारा. ५ कार्तिकी पूर्णिमा. ६ उगवतां. ७ गृहस्थपणाची. ८ बिंदु, पुळी. ९ अमावास्या. १० चार मानुषयुगें म्ह. दिव्ययुग. ११ कावळेपणानें.

गोपीप्रेमाचा आवांका । केला ठाउका यालागीं ॥ ५१ ॥ प्रथम प्रलंबाचें हनन । आणि दावाग्निप्राशन । करूनि व्रजपुरीं भगवान् । निववी मन गोपींचें ॥ ५२ ॥ इतुकी कथा ये अध्यायीं । राया तुझिये श्रवणालयीं । वसविली ते तुझ्या हृदयीं । तोषदायी वसों दे ॥ ५३ ॥ यावरी अध्याय विसावा । श्रवणमात्रें दे विसांवा । तेरांसहित चोविसावा । नलगे पुसावा ये स्थळीं ॥ ५४ ॥ वर्षाशरत्काल दोन्ही । राया येथींच्या निरोपणीं । रामगोपाळचक्रपाणि । क्रीडती वनीं स्वानंदें ॥ १५५ ॥ इतुकी कथा भागवतीं । दशमस्कंधीं रायाप्रति । शुक निवेदी महामति । जो संतति व्यासाची ॥ ५६ ॥ आदिगुरु दत्तात्रेय । जनार्दनासि दाविली* सोय । एकनाथें तदन्वयें । चिदानंदीं प्रकटिली ॥ ५७ ॥ तेचि स्वानंदाचिये मुखें । वरदकृपा गोविंदरसें । वर्षली तद्रसपाउसें । भरला तोषें दयार्णव ॥ ५८ ॥ नोहे थिल्लर[1]सांचवणी । ब्रह्माद्रि[2]शिखरींचे जीवनीं । प्रेमें प्राशन करितां श्रवणीं । होय हानि तृष्णेची ॥ ५९ ॥ यालागीं साधकीं संतीं । सार होऊनि श्रवणांप्रति । दयार्णवामृतभरती । सप्रेमभक्ति सेविजे ॥ १६० ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे अष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां दावानलप्राशनं नामैकोनविंशोऽध्यायः ॥ १९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक १६ ॥ टीका-ओव्या ॥ १६० ॥ एवंसंख्या ॥ १७६ ॥ श्रीगुरुशिवाय नमः ॥ ( एकोणिसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १०५५८ ).

एकोणिसावा अध्याय समाप्त.

पाठभेद— * जो ( मुंगीप्रत ); ली ( उमरखेडप्रत ).

१ डबक्यांतील पाणी. २ ब्रह्मरूप पर्वतशिखरावरील.

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय २० वा

श्रीगोविंदसद्गुरवे नमः । परमपुरुषा मंगलमूर्ति । अमलैश्वर्य अमलकीर्ति । अखिल अमरां चक्रवर्ती । भवावर्ती तारक तूं ॥ १ ॥ अविद्यापूर्यष्टकनिवासी[1] । पुरुषशब्दें बोलिजे त्यासी । ऐशिया जीवचैतन्यासी । गर्भवासीं* घडामोडी ॥ २ ॥ तैसेंचि प्रकृतिपुर्यष्टकें[2] । जे कां अविद्यानिषेधक । तदभिमानी सर्वात्मक । सर्वज्ञापक सर्वेश† ॥ ३ ॥ शुद्धसत्त्वात्मकपुरीं । सर्वैश्वर्यता शेजारीं । स्वप्नें देखे निद्राभरीं[3] । नानावतारीं अवनार्थ ॥ ४ ॥ जीवशिवां समा निंदें[4] । तरी विद्याअविद्यांमाजीं कें भेद । ऐसें म्हणाल तरी अनुवाद । येथींचा विशद परियेसा ॥ ५ ॥ जीव अविद्यानिद्राभरें । दुःस्वप्नींचीं दुःखें घोरें । भोगितां चौऱ्यांशीं लक्ष फेरे । खातां वोथरे‡ वोसणाय ॥ ६ ॥ शुद्धसंकल्पइच्छावशें । ध्यानशेजे शिवें प्रवेशे । आवड तया प्रपंचवेशें । सुखें संतोषें सर्वदा ॥ ७ ॥ स्वेच्छा कल्पनाध्यानशील । म्हणोनि दुःखाचा नेणे मळ । येर प्रपंच गोंधळ । दोघां केवळ सरिसाची ॥८॥ आपुलें ओझें घेतां शिरीं । अथवा धरिलिया बिगारी । एक सुखी स्वसत्ताभरीं । येरु घोरीं पराधीनु ॥ ९ ॥ ऐशिया जीवेश्वराचा ईश । यालागीं तूं परमपुरुष । अमंगळाचा नाहीं स्पर्श । पूर्ण परेश परब्रह्म ॥ १० ॥ ज्ञानाज्ञान उभय भ्रम । निरसूनि सोलीव परब्रह्म । करिशी जैसें हेमीं हेम । रूप नाम समरसतां ॥ ११ ॥ स्वगतभेदाची आइती । तेचि अमंगळाची व्यक्ति । अभेद तो तूं मंगलमूर्ति । द्वैतस्फूर्ति नातळतां ॥ १२ ॥ स्वगतभेदाचा उजळे अंक । तोचि अमंगळ भेद कलंक । अमल ऐश्वर्य निष्कलंक । नित्य निष्टंक गुरुवर्या ॥ १३ ॥ अमल तव कीर्तिमंदाकिनी । उगमा

---

**पाठभेद** — * गर्भवासासी ( मुंगीप्रत ); गर्भवासीं ( उमरखेडप्रत ). † सर्वज्ञ ( मुंगीप्रत ); सर्वेश ( उमरखेडप्रत ). ‡ वोसरे ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ अविद्येमध्यें आठ पुरींच्या ठिकाणीं जीवरूपानें राहणारा. २ पंचमहाभूतें, मन, ज्ञान, अविद्या. ३ निद्रा. ४ परमात्मा. ५ दुसरा.

येऊनि प्रवाहे वदनीं । श्रवणें पठनें मनोमज्जनीं । मलक्षालनीं पटुतरा ॥ १४ ॥ तो तूं सद्गुरु अमलकीर्ति । अमरनियंता वेदविहितीं । अमरकरणचक्रवर्ती । आत्मस्थिति स्वसत्ता ॥ १५ ॥ होणें जाणें नवीन कांहीं । भवाप्ययांचे बुडती डोहीं* । त्यांसि कवळूनि स्वस्मृतिबाहीं । होसी लवलाहीं तारक तूं ॥ १६ ॥ जीवेश्वरत्वें कलंक । विद्या अविद्या उभयात्मक । तें तूं फेडूनि कंचुक । करिसी आत्म्यैक्य स्वबोधें ॥ १७ ॥ एवं जीवशिवोद्धरणा । गोकुळेश्वरा गोरक्षणा । करिसी म्हणोनि †चरणस्मरणा । ओपीं करुणावत्सला ॥ १८ ॥ निखिल चाळितां करणवृंद । चराचरीं अमरवरद । एकचि सद्गुरु गोविंद । तारक स्वपदभजकांसी ॥ १९ ॥ जंव जंव पदपल्लवां न शिवे । तंव तंव आवर्तीं पडिजे जीवें । तें घडलियां मग आघवें । होय ठावें वांवसें‡ ॥ २० ॥ म्हणोनि तुझिया वरातळीं¶ । शक्र विरिंचि चंद्रमौळी । तो तूं सुलभ सप्रेमळीं । गोगोपाळीं गोविंदा ॥ २१ ॥ परी मी विकळ शरीरधर्मीं । धिंवसा धरूनि श्रीपादपद्मीं । अनुसरलोंसें विगतकामीं । तें तूं स्वामी जाणसी ॥ २२ ॥ बालक कांहींच न करी धंदा । निजाचरणें ओपी खेदा । परस्परें मुखारविंदा । पाहोनि मोदा पावती ॥ २३ ॥ इतुकिया भांडवलाचा ऋणी । वांचूनि दिला दास्याचरणीं । देवें स्वशरणातें चरणीं । अंगीकरणीं§ नुबगावें ॥ २४ ॥ ऐसें ऐकोनि म्हणती गुरु । न धरीं भेदभावाचा पदरु । अभेदबोधें परमादरु । आरब्धग्रंथीं वाढवीं ॥ २५ ॥ वरदाज्ञेची पूर्णिमा । दयार्णवीं वाढवी प्रेमा । प्रज्ञाकल्लोळ कवळी व्योमा । कथनधर्मा प्रवर्तें ॥ २६ ॥ आतां विसाव्यामाझारीं । रामगोपांसहित हरि । प्रावृट्काळीं क्रीडा करी । कोणें प्रकारीं तें ऐका ॥ २७ ॥ प्रथम चोवीस श्लोकीं जाण । प्रावृट्काळाचें वर्णन । सप्तश्लोकीं हरिक्रीडन । शेष कथन शरँच्छ्री ॥ २८ ॥ त्यांगा दानगुणीं उपमा । प्रावृट्शरदृतूची परमा । वर्णी अद्भुतऐश्वर्यमहिमा** । कृष्णपरमात्मा क्रीडतां ॥२९॥ इतुकी कथा श्रीशुकमुनि । सांगेल परीक्षितीलागूनी । तेंचि श्रोतीं ये व्याख्यानीं । सादर होऊनि परिसिजे ॥ ३० ॥

श्रीशुक उवाच — तयोस्तदद्भुतं कर्म दावाग्नेर्मोक्षमात्मनः । गोपाः स्त्रीभ्यः समाचख्युः प्रलंबवधमेव च ॥ १ ॥

कौरववंशावतंस सुमना । कृष्णलीलामृतरसपाना । मानस आणूनि†† श्रवणभुवना । सावधान बैसवीं ॥ ३१ ॥ परीक्षितीसि सावधान । जाणोनि व्यासाचा नंदन । म्हणे दावाग्नि प्राशून । व्रजीं भगवान् प्रविष्टला ॥ ३२ ॥ आपुलालिया सदनाप्रति । गोप गोधनें घेऊनि जाती । ते ते रामकृष्णांची कीर्ति । नूतन कथिती अद्भुत ॥ ३३ ॥ माता भगिनी वनिता दुहिता । इत्यादि स्त्रीवर्गा समस्तां । आणि पुरुषांही ग्रामस्थां । कथिती वार्ता अपूर्व ॥ ३४ ॥ म्हणती आम्हां

**पाठभेद** — * गेहीं ( मुंगीप्रत ); डोहीं ( उमरखेडप्रत ). † स्व ( मुंगीप्रत ). ‡ वास्तव्य ( मुंगीप्रत ). ¶ वरदातळीं ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). § अंगिकारोनी ( मुंगीप्रत ); अंगीकरणि ( उमरखेडप्रत ). ** गरिमा ( मुंगीप्रत ). †† आपूंणी ( मुंगीप्रत ).

१ उत्पत्ति आणि लय यांचे. २ स्मरणरूप हातांनीं. ३ आवरण. ४ व्यर्थसें. ५ धैर्य. ६ न कंटाळावें. ७ शरदृतूची शोभा. ८ दान. ९ शिरोभूषण.

ईषीकावनीं । गोधनेंसहित जाळितां अग्नि । करितां कृष्णासी विनवणी । तेणें वदनीं सांठविला ॥३५॥ आच्छादूनि आमुचे नयन । कृष्णें केलें दावाग्निपान । न भरतांचि अर्धक्षण । केलें मोक्षण आमुचें ॥ ३६ ॥ गाई महिषी अजा अविक । लहान थोर गोरक्षक । आलों भांडीरवटीं अचुक । नेत्रविमोकें[2] करितांची ॥ ३७ ॥ आणि प्रलंबनामा दैत्य । गोपवेशें क्रीडासक्त । होऊनि नेला रोहिणीसुत । गगनाआंत वधावया ॥ ३८ ॥ कृष्णें जाणोनि तो दुर्जन । राम केला सावधान । तेणें मुष्टिप्रहारेंकरून । विगतप्राण पाडिला ॥ ३९ ॥ उभयतांच्या अद्भुतलीला । आजि प्रत्यक्ष देखिल्या डोळां । ऐसें प्रशंसितां गोपाळां । विस्मय सकळां हृत्कमळीं ॥ ४० ॥

गोपवृद्धाश्च गोप्यश्च तदुपाकर्ण्य विस्मिताः । मे निरे देवप्रवरौ कृष्णरामौ व्रजं गतौ ॥ २ ॥

गोपवृद्ध आणि गौळणी । ऐकोनि गोपाळांच्या वाणी । परमविस्मयें अंतःकरणीं । म्हणती करणी अद्भुत हे ॥ ४१ ॥ बागुलाभेणें कांपती शिशु । आणि याचा हा उत्कर्षु । तरी हे कोणी पुराणपुरुष । व्रजीं निवास करूं आले ॥ ४२ ॥ बाळपणीं हे अद्भुत ख्याति । तरी हे कोण्ही निर्जरपति[3] । वृथा मानूं निजसंतति । मोहभ्रांतीस्तव आम्ही ॥ ४३ ॥ ऐसें जाणोनि गोपगोपीं । रामकृष्ण ईश्वररूपी । भजननिष्ठेच्या साक्षेपीं । मनःसंकल्पीं प्रवृत्ति* ॥ ४४ ॥ तंव तो लाघवी भगवान मोह । पसरूनि लोपी ज्ञान । जैसें तमीं विद्युत्स्फुरणें[4] । क्षणें फांकोन हारपे ॥ ४५ ॥ मग यथापूर्व बालभावें । रामकृष्णांतें आघवे । मानूनि स्नेहाच्या लाघवें । धेनूंसवें पाठविती ॥ ४६ ॥ अवघियां व्रजींचिया गोपाळां । नंद निरवी[5] उभय बाळां । म्हणे या दोघांतें सांभाळा । अवघिया वेळां सावध ॥ ४७ ॥ जातां येतां सावधपणें । रामकृष्णां न विसंबणें । बैसतां उठतां कृष्ण पाहणें । कृष्णावीण न वसिजे ॥ ४८ ॥ खातां जेवितां पाणी पितां । लेतां नेसतां देतां घेतां । चालतां बोलतां धंदा करितां । कृष्णनाथा न विसंबा ॥ ४९ ॥ देखूनि अद्भुत पराक्रम । पुढती मायेचा संभ्रम । तेणें मानिती अबलांसम । पुरुषोत्तम व्रजवासी ॥ ५० ॥ असो लोटल्या ग्रीष्मकाळ । पुढें प्रावृट् प्रभवनशीळ । प्रवर्तलिया प्राणी सकळ । व्याप्त केवळ सुखदुःखें ॥ ५१ ॥ तया वर्षाकाळींची क्रीडा । शुक निवेदी नृपा पुढां । वृष्टिभरें आनंद गाढा । पावती पीडा जलशैत्यें ॥ ५२ ॥

ततः प्रावर्तत प्रावृट् सर्वसत्त्वसमुद्भवा । विद्योतमानपरिधिर्विस्फूर्जितनभस्तला ॥ ३ ॥

प्रलंबहनन दावाग्निपान- । कथनानंतर राया जाण । प्रावृट्काळ वर्तमान । तद्वर्णन अवधारीं ॥ ५३ ॥ विराट्पुरुषाचें जें वीर्य । वृष्टिरूपें स्रवतें होय । भूमिदेवी गर्भ लाहे । प्राणिमय चराचर ॥ ५४ ॥ पत्नी जाणूनियां ऋतुमती । कांत आलिंगी एकांतीं । विरहताप टाकूनि क्षिति ।

पाठभेद :— * प्रवर्तांति ( मुंगीप्रत ).

१ दर्भाची एक जात. २ नेत्र उघडणें. ३ देवपति. ४ विजेचें चकाकणें. ५ ( मुलांविषयीं ) व्यवस्था करण्यास सांगणें.

तैशी चित्तीं संतुष्ट ॥ ५५ ॥ गर्भ संभवलिया उदरीं । दोहद[1] होती परोपरी । धरा तैसी सस्यभरीं[2] । होय विकारीं विकृत ॥ ५६ ॥ चहूं खाणींमाजीं प्राणी । प्रावृट्काळीं प्रसवे धरणी । आदिपुरुषाची हे करणी । राया श्रवणीं परियेसीं ॥ ५७ ॥ प्रावृट्शब्द हा स्त्रीलिंगी । विराट् कालात्मा आलिंगी । द्यावाभूमी[3] उभयआंगीं । सालंकृत दंपती ॥ ५८ ॥ चंद्र सूर्य परिधिमंत । नाडरीं[4] प्रतिमंडळें बिंबत । द्यावाभूमी विस्फूर्जित । उपहासत परस्परें ॥ ५९ ॥ क्षणैक उष्ण क्षणैक अभ्र । कांहीं वृष्टि कांहीं समीर । वर्षारंभीं चमत्कार । होती विकार लघुदीर्घ ॥ ६० ॥

सांद्रनीलांबुदैर्व्योम्नि सविद्युत्स्तनयित्नुभिः । अस्पष्टज्योतिराच्छन्नं ब्रह्मेव सगुणं बभौ ॥ ४ ॥

पुढें पुढें प्रबळ मेघ । नभीं दाटती पैं अमोघ । शुभ्र धूसर सजल साङ्ग । सवेग रंग पालटती ॥ ६१ ॥ नभ आच्छादे निबिड घनीं । माजीं गर्जना दीर्घध्वनी । विद्युल्लतांचिया स्फुरणीं । दृश्य दिसोनि हारपे ॥ ६२ ॥ चंद्र सूर्य तारांगणें । घेती अभ्रांचीं प्रावरणें । स्पष्टास्पष्टप्रभाहीनें । तेणें गुणें भासती ॥ ६३ ॥ सजल मेघांच्या येती सरी । तेव्हां झांकोनि जाती गिरि । जळें वाहती पृथ्वीवरी । चिंता अंतरीं पांथिकां ॥ ६४ ॥ जेंवि गुणमय ब्रह्म सगुण । करूनि आणी जीवपण । प्रावृट्काळीं सजल घन । लेवूनि गगन तेंवि नटे ॥ ६५ ॥ सत्त्वगुणाची विवेकमति । तैशा विद्युल्लता झळकती । रजोवल्गनांची आयति[5] । घनगर्जितीं[6] उपमावी ॥ ६६ ॥ तमोगुणाचेनि पाडें । सजल मेघीं गडद पडे । जीवचैतन्या सांगडें* । सगुण भासे खंब्रह्म ॥ ६७ ॥

अष्टौ मासान्निपीतं यद्भूम्याश्चोदमयं वसु । स्वगोभिर्मोक्तुमारेभे पर्जन्यः काल आगते ॥ ५ ॥

सगुण ब्रह्म जीवेश्वर । उभय सादृश्यप्रकार । शुकाचार्य परम चतुर । कथनीं भूवर[7] तोषवी ॥ ६८ ॥ ईश्वर म्हणिजे जगत्पति । जीव बोलिजे पैं नृपति । दोहीं दृष्टांतें व्युत्पति । करी दार्ष्टांती† सूर्याचें ॥ ६९ ॥ प्रजांपासूनि निजशासनें । राजा अंगीकारी धनें । पुन्हा देऊनि संरक्षणें । करी वर्धन प्रजांचें ॥ ७० ॥ किंवा ईश्वर जगत्कर्मा[8] । नेमूनि वेदाज्ञेच्या नेमा । पुन्हा फलद जाणूनि कामा । कल्पद्रुमा सम होय ॥ ७१ ॥ हेमंतादि अष्ट मास । भूमिसंबंधीं जो जलरस । किरणें आकर्षी दिनेश । नृप धनास ज्यापरी ॥ ७२ ॥ पर्जन्य म्हणिजे तो गभस्ति । उचित काळाची जाणोनि प्राप्ति । किरणसेवकां हातीं पुढतीं । अर्पणाप्रति प्रवर्ते ॥ ७३ ॥

तडित्वंतो महामेघाश्चंडश्वसनवेपिताः । प्रीणनं जीवनं ह्यस्य मुमुचुः करुणा इव ॥ ६ ॥

विद्युल्लता कडकडाटी । महामेघांचिया दाटी । चंडवायो झडझडाटी । करी दिग्पटी

पाठभेद :— * सांकडे ( मुंगीप्रत ); सांगडे ( उमरखेडप्रत ) † दृष्टांती ( मुंगीप्रत ).

१ डोहाळे. २ धान्य. ३ आकाश व पृथ्वी. ४ थिल्लर, उदकाचे डबके. ५ प्रभाव. ६ घनगर्जना. ७ राजा परीक्षिति. ८ जग उत्पन्न करणारा.

सकंप ॥ ७४ ॥ जैसे करुणावंत पुरुष । संतप्त जाणूनि जनास । वेंचूनि आपुलें अर्थायुष्य‡ । देती तोष सर्वस्वें ॥ ७५ ॥ तैसेंचि जाण चंडघन । मोक्षण[1] करूनि निजजीवन । या जगासि आप्यायन[2] । ¶सदयासमान करिताती ॥ ७६ ॥ जलचरां जीववितीं जीवनें । तृणादिकां अभिवर्षणें । भूचरां खेचरां तृणें धान्यें । आप्यायनें पौष्टिकें ॥ ७७ ॥

तपःकृशा देवमीढा आसीद्वर्षीयसी मही । यथैव काम्यतपसस्तनुः संप्राप्य तत्फलम् ॥ ७ ॥

ग्रीष्मकाळींचा महा आतप । तेणें शोषूनि गेलें आप । विपर्ण[3] झाले पादप । झाला लोप तृणाचा ॥ ७८ ॥ दावानळें जळालीं तृणें । झाडीं न थरती जीर्ण पर्णें । आहळलीं[4] वाळलीं[5] वठेलीं उष्णें । तीं संपूर्ण खांकरलीं[6] ॥ ७९ ॥ तृणीं वनीं जीवनीं जंतु । ग्रीष्मतापें पावले अंतु । कृपि संपूर्ण सस्यरहितु । तापें श्रमित धरित्री ॥ ८० ॥ देखोनि कृशता धरित्रीआंगीं । देव म्हणिजे महामेघीं । मीढ[7]शब्दें शिंपितां वेगीं । पुष्टता सर्वांगीं जाहली ॥ ८१ ॥ पतिव्रता विरहतापें । कृशता पावे विरहपापें । पुढती लाहतां स्वामिकृपें । होय कंदर्पें संतुष्ट ॥ ८२ ॥ किंवा सकाम तापस । कृच्छ्रें तनु करिती कृश । सफळ होतां त्यांचे क्लेश । पावती तोप पुष्टत्व* ॥ ८३ ॥ तैशी पृथ्वी अष्ट मास । उष्णतापें होतां कृश । यथाकाळें तो पाऊस । वर्षतां तोष पावली ॥ ८४ ॥ मृत्तिका सांडोनि कठोरत्व । प्रकटे सर्वांगीं मार्दव । उखरीं[8] अखरीं[9] जे जे जीव । जीवनें सर्व तोपती ॥ ८५ ॥

निशामुखेषु खद्योतास्तमसा भांति न ग्रहाः । यथा पापेन पाखंडा न हि वेदाः कलौ युगे ॥ ८ ॥

अविद्येचीं मेघपटलें । झांकोळिती ग्रहमंडळें । तेणें गडद पडे काळें । मार्ग न पडे कर्दमीं ॥ ८६ ॥ प्रदोषकाळीं निशामुखीं । प्रभा आगळी खद्योतकीं । मोडे ग्रहांची ओळखी । कोणा ठाउकीं नक्षत्रें ॥ ८७ ॥ कळीमाजीं जैसी पापें । वेदप्रणीत मार्ग लोपे । जैसे †माल्हावलेनि दीपें । विविधें रूपें हारपती ॥ ८८ ॥ निगम लोपतां संपूर्ण । प्रकाशती पाखंडगण । वेदविहित निषेधून । महाप्रवीण अभिचारीं ॥ ८९ ॥ वेदोक्त पुत्रेष्टिसाधन । सांडोनि सटवीचें पूजन । संतानवृद्धीसि कारण । विपरीताचरण कलींचें ॥ ९० ॥ जारण[10] मारण[11] स्तंभनें[12] । **उद्वेजणें[13] उच्चाटन[14] । ††संमोहन वशीकरण । इहीं मान्य पाखंडी ॥ ९१ ॥ मद्यमासांचीं सेवनें । नानाहिंसादि बलिदानें । ऐसे पाखंड पापाचरणें । महाज्ञानें मिरविती ॥ ९२ ॥ आच्छादूनि निगमाचार । मान्य कलिकाळीं अभिचार[15] । ‡‡जैसे प्रावृटीं खेचर । लोपूनि धुंधुरें[16] फांकती ॥ ९३ ॥

---

**पाठभेद**— ‡आयुष्य ( मुंगीप्रत ); अर्थायुष्य ( उमरखेडप्रत ). ¶ सम ( मुंगीप्रत ); सदया ( उमरखेडप्रत ). * पुष्टत्वें ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † मालवलेनी ( मुंगीप्रत ). माल्हावलेनि ( उमरखेडप्रत ). **उद्वेशण ( मुंगीप्रत ); विद्वेपण ( उमरखेडप्रत ). †† सभामोहन ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡‡ तैसे ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ सोडणें. २ वाढणें, पोषण. ३ पानें गळून गेलीं. ४ पोळलीं. ५ सुकलीं. ६ पानें गळून गेलेलें झाड. ७ शिंपलेली. ८ डोंगराळ जमीन. ९ माळ जमीन. १० आयुष्याची हानि होईल असें मंत्रादिकांनीं करणें. ११ मरण येईल असें करणें. १२ शरीराचें चलनवलन बंद करणें. १३ शरीरास इजा होईल असें करणें. १४ उन्मूलन करणें. १५ जादूचे प्रकार. १६ काजवे.

श्रुत्वा पर्जन्यनिनदं मंडूका व्यसृजन् गिरः । तूष्णीं शयानाः प्राग्यद्वद्ब्राह्मणा नियमात्यये ॥ ९ ॥

प्रावृट्कालाचें निशाण । ऐकोन मेघांचें गर्जन । खवळे मंडूकांचें सैन्य । जेंवि ब्राह्मण ¶नियमांतीं ॥ ९४ ॥ स्नानसंध्येच्या§ शेवट- । पर्यंत आचार्य मौननिष्ठ । त्याचा ऐकोनि शांतिपाठ । उठे बोभाट छात्रांचा ॥ ९५ ॥ पूर्वीं प्रसुप्त छात्रभार । ऐकोनि आचार्याचा स्वर । एकसरा ते करिती गजर । तेंवि दर्दुरें[1][2] प्रावृटीं ॥ ९६ ॥

आसन्नुत्पथवाहिन्यः क्षुद्रनद्योऽनुशुष्यतीः । पुंसो यथाऽस्वतंत्रस्य देहद्रविणसंपदः ॥ १० ॥

प्रावृट्कालीं पर्जन्यभरें । क्षुद्र नद्या लोटती पूरें । मार्ग रोधिल्या उतारे । ‖सांर्थ[3] व्यवहारें सांडविती ॥ ९७ ॥ क्षणैक उत्पथ वाहती पूर । सर्वेचि पात्रीं न मिळे नीर । जेंवि मूर्खाचा स्वैराचार । यौवनभर लोटतां ॥ ९८ ॥ इंद्रियाधीन तो परतंत्र । जाणे विषयसेवन मात्र । ओहटूनि गेलिया अर्थ गोत्र । रितें पात्र मग पडे ॥ ९९ ॥ त्याच्या देहद्रव्यसंपदा । ओहटूनि जातां प्राप्त आपदा । तैसें उत्पथ नदी नदा । न थरे कदा जलबिंदु ॥ १०० ॥

हरिता हरिभिः शष्पैरिंद्रगोपैश्च लोहिताः । उच्छिलींध्रकृतच्छाया नृणां श्रीरिव भूरभूत् ॥ ११ ॥

सार्वभौमाची जैशी लक्ष्मी । तैशी शोभती झाली भूमि । चित्रविचित्र रति* हेमीं । वस्त्रीं सद्मीं विराजित ॥ १ ॥ हिरवीं बालतृणें लसलसित । तेणें पाचरंगीं राजित । माणिक्यरंगीं विराजित । इंद्रगोपप्राचुर्यें[4] ॥ २ ॥ उच्छिलिंग† ठायीं ठायीं । उठती तेणें शोभे मही । राजवाहिनी-[5] प्रवाहीं । जैशीं छत्रें विराजती ॥ ३ ॥ कोमळ तरूंचे पल्लव । चंचळ चामरीं दाविती भाव । दुंदुभि-घोषस्थानीं रव । सरिताप्रसवप्रपात ॥ ४ ॥

क्षेत्राणि सस्यसंपद्भिः कर्षकाणां मुदं ददुः । धनिनामुपतापं वै दैवाधीनमजानताम् ॥ १२ ॥

यथाकालीं होतां वृष्टि । सस्यें[7] पिकलीं देखोनि दृष्टीं । आनंद कृषीवळांचे[8] पोटीं । सभाग्य सृष्टीं मानिती ॥ १०५ ॥ वृष्टि खंडतां चांचरे पीक । तेणें सर्वेचि पावती दुःख । नेणोनि अदृष्ट-विवेक । जैसे लोक व्यवसायी ॥ ६ ॥

जलस्थलौकसः सर्वे नववारिनिषेवणात् । अबिभ्रद्रुचिरं रूपं यथा हरिनिषेवया ॥ १३ ॥

जलामाजीं ज्यांचा वास । मत्स्यादि जलचर अशेष । कमलादि वल्ली तृणविशेष । ते जलौकस

**पाठभेद**:—¶ निगमांती (मुंगीप्रत), नियमांतिं (उमरखेडप्रत). § चा (मुंगीप्रत व उमरखेडप्रत). ‖ पथ (मुंगीप्रत); पांथ (उमरखेडप्रत). *रत्न (मुंगीप्रत); रत्नीं (उमरखेडप्रत). † ध्र (उमरखेडप्रत).

१ विद्यार्थी. २ बेडूक; ९६ व्या ओवीवरून ऋग्वेदांतील मंडूकसूक्ताची आठवण होते. ३ व्यापारी. ४ मृगनक्षत्रांत तांबडे किडे उत्पन्न होतात ते. ५ छत्रीच्या आकाराची वनस्पति. ६ सैन्य. ७ धान्यें. ८ शेतकरी.

बोलिजे ॥ ७ ॥ जळाबाहिर वनांतरीं । खेटखर्वटीं पुरीं नगरीं । नाना जंतु चराचरीं । ते निर्धारीं स्थलौकस ॥ ८ ॥ ओक शब्दें बोलिजे आलेय। जळीं कां स्थळीं ज्यांचें होय। त्यांसि तैसेंचि नामधेय। जलौकसें स्थलौकसें ॥ ९ ॥ ते सर्वेही स्थलजलवासी। करितां नवनीरसेवनासी। पुष्टी पावती आनंदेशीं। अमरां जैसी पीयूषें ॥ ११० ॥ तेणें नवरसा रति तनु । अवयव टवटविती नूतन । रुचिररूपें शोभायमान । सुखसंपन्न वर्तती ॥ ११ ॥ जैसा श्रीहरि जगज्जीवन । त्यातें सेविती जे जे जन । त्यांचें होय त्रितापशमन । सुखसंपन्न सहजेंची ॥ १२ ॥ संसारसंतप्त उन्हाळा । तापत्रयाच्या तीव्र ज्वाळा । तेणें आहाळणी भूतां सकळां । जीवनकळा हरिप्रेम ॥ १३ ॥ तें लाहती जे जे जीव । ते ते होती वासुदेव । सांडूनि मृत्यूचें लाघव । अमृतगौरव मिरविती ॥१४॥ तैसें नीलघनाचें कृपाजळ । सेवूनि स्थलजलवासी सकळ । रूपें निवडती सोज्वळ । परम रसाळ लावण्यें ॥ ११५ ॥

सरिद्भिः संगतः सिंधुश्चुक्षुभे श्वसनोर्मिमान् । अपक्वयोगिनश्चित्तं कामाक्तं गुणयुग्यथा ॥ १४ ॥

मेघभरें महापूर । सरिता टाकिती सागर । संगमीं एकवटतां नीर । तेणें समुद्र क्षोभती ॥१६॥ वर्षवाताच्या झंझाटा- । सरिशा प्रचंड उठती लाटा । मोडती जलयानाच्या वाटा । पांथ संकटा वरपडती ॥ १७ ॥ सरिता सिंधूसि जेथ मिळणी । महानौका तये स्थानीं । येतां जातां स्थिरावोनी । क्रियाचरणीं वर्तती ॥ १८ ॥ महापुराच्या संगमकाळीं । त्या न थरती तये स्थळीं । प्रबलवातें ऊर्मिमाली । सागर समूळीं क्षोभती ॥ १९ ॥ जैसें साधनीं अपक्वचित्त । योगमार्गें संक्षोभत । तेथ झगटतां कंदर्पवात । ऊर्मि उठत तृष्णेच्या ॥ १२० ॥ इहामुत्रार्थाभिलाष- । सिद्धि गर्जती अशेष । सरितापूरविषयाभास । मिळती विशेष उत्पथ ॥ २१ ॥ तेणें तरणोपायसन्मार्गतरणि । विषयसरितां उत्पथमिळणी । नियमें थारों न शकती करणी । जाती उधळोनि सैराट ॥ २२ ॥

गिरयो वर्षधाराभिर्हन्यमाना न विव्यथुः । अभिभूयमाना व्यसनैर्यथाऽधोक्षजचेतसः ॥ १५ ॥

भगवन्निष्ठ जैसे व्यसनीं । पीडितां दुर्दैवें ग्रहगणीं । व्यसना पावती अंतःकरणीं । निंद्यवचनीं त्रितापीं ॥ २३ ॥ अक्षजज्ञाना[3] गोचर नव्हे । त्यासी अधोक्षज म्हणावें । चित्तासि तें सुख जेव्हां फावे । मग नाठवे भवदुःख ॥ २४ ॥ तयां अधोक्षजचेतसांसी[4] । विघ्नें बाधूं न शकती जैशीं । कीं आर्कतुळें* आकाशासी । नोहे जैसी वेदना ॥ १२५ ॥ तैसें प्रबलवृष्टिभरीं । आच्छादूनि †ठाती गिरि । तेणें न दुखवती तिळभरी । धाराप्रहारीं खोंचतां ॥ २६ ॥

---

**पाठभेद** — * अर्कतुळें ( उमरखेडप्रत ). † जाती ( मुंगीप्रत ).

१ स्थान. २ आध्यात्मिक ( खोकला, पडसें इ. ताप. ), आधिभौतिक ( चोर, व्याघ्र इ. ताप. ), आधिदैविक ( अतिवृष्टि, अनावृष्टि इ. ताप. ). ३ इंद्रियज्ञान. ४ श्रीविष्णूचे ठिकाणीं ज्यांनीं लक्ष लाविलें ते.

मार्गा बभूवुः संदिग्धास्तृणैश्छन्ना ह्यसंस्कृताः । नाभ्यस्यमानाः श्रुतयो द्विजैः कालहता इव ॥ १६ ॥

प्रावृट्काळीं वृष्टिभरें । तृणें वाढती पैं अपारें । मार्गज्ञान तेणें न स्फुरे । पथकांतारें समसाम्यें ॥ २७ ॥ प्राचीनमार्गपरिज्ञान । लोपोनि दुष्पथ भासे रान । वार्षिकीं चालों न शकती जन । तेणें धोरण बुजालें ॥ २८ ॥ वृक्षपाषाणसीमादि लक्ष । संदिग्ध मार्गें चालती दक्ष । येर अव्हळें तोचि पक्ष । धरणिकक्ष[1] तुडविती ॥ २९ ॥ जैसें दुष्काळें जठरासाठीं । द्विजीं धावतां अन्नापाठीं । न बैसोनि श्रुतीच्या पाठीं । व्यासंगराहटीं गुंतले ॥ १३० ॥ तया द्विजांचा श्रुतिप्रणीत । सन्मार्ग होय जैसा उपहत । तृणाच्छन्न[2]‡ तो असंस्कृत¶ । अभ्यासवर्जित अक्षुण्ण[3] ॥ ३१ ॥ दुष्काळयोगें मलिनाचार । तेणें लोपती श्रुतिसंस्कार । तये काळींचे §ब्राह्मणकुमार । त्यां तो आचार दृढ होय ॥ ३२ ॥ भक्ष्याभक्ष्य ग्राह्याग्राह्य । त्याज्यात्याज्यविचार राहे । पोट भरे ज्या उपायें । तो तैं होय निजमार्ग ॥ ३३ ॥ तृणें मार्ग आच्छादिती । तेंवि निगमाचार लोपती । गति अभ्यास खुंटती । बुजोनि जाती‖ अक्षुण्ण ॥ ३४ ॥

लोकबंधुषु मेघेषु विद्युतश्चलसौहृदाः । स्थैर्यं न चक्रुः कामिन्यः पुरुषेषु गुणिष्विव ॥ १७ ॥

वर्षाकाळींचें कौतुक । पुन्हा अपूर्व वर्णी शुक । त्यामाजीं दृष्टांतें विवेक । घेती साधक स्वहितार्थ ॥ १३५ ॥ लोकबंधु मेघ सजळ । सगुण सजळ शिखंडिप्रिय[4] । विद्युल्लता पुंश्चलीप्राय[5] । स्थिर नोहे स्वकांतीं ॥ ३६ ॥ जैशा योषितां[6] स्वैरिणी । पुरुष जोडल्या उत्तमगुणी । तेथ न भजोनि चंचलपणीं । यथेष्टाचरणीं दुर्वृत्ता ॥ ३७ ॥ तैशा मेघीं चपळ चपळा[7] । जेंवि कटाक्षें पुंश्चली अबळा । सुखप्रकाश दावूनि डोळां । देती सोहळा अंधतमीं ॥ ३८ ॥

धनुर्वियति माहेंद्रं निर्गुणं च गुणिन्यभात् । व्यक्ते गुणव्यतिकरेऽगुणवान् पुरुषो यथा ॥ १८ ॥

इंद्रधनुष्य भासे गगनीं । प्रत्यंचारहित* जें अगुणी । गमे टणत्काराचे ध्वनीं । साज्जिलें गुणीं ज्यांबद्ध[8] ॥ ३९ ॥ जैसें निर्विकार निर्गुण । ब्रह्म सन्मात्र संपूर्ण । गौणप्रपंच[9] पांघरून । भासे सगुण सर्वात्मा ॥ १४० ॥ तैसें निर्गुणें[10] शक्रचाप । टणत्कारोनि वर्षे आप । तेणें भासे सप्रताप । सज्जरूप सगुणवंत ॥ ४१ ॥

न रराजोडुपश्छन्नः स्वज्योत्स्नाराजितैर्घनैः । अहंमत्या भासितया स्वभासा पुरुषो यथा ॥ १९ ॥

---

**पाठभेद** — ‡ तृणाच्छिन्न ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ¶ असंस्तुत ( मुंगीप्रत ). § द्विज ( मुंगीप्रत ). ‖ ठाति ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). * रहित प्रत्यंचा ( मुंगीप्रत ).

१ पृथ्वीवरील गवत. २ गवतानें झांकलेला. ३ ज्यावरून चालणें बंद झालें तो ( रस्ता ). ४ मोरांस प्रिय. ५ व्यभिचारिणी स्त्री. ६ स्त्रिया. ७ विजा. ८ धनुष्याची दोरी. ९ त्रिगुणात्मक संसार. १० ज्यास दोरी नाहीं ते.

प्रावृट्काळीं न शोभे शशी । नभीं फांकोनिही स्वप्रभेसी । मेघ दाटती प्रबलतेसी । इंद्रप्रभेसी छादक ॥ ४२ ॥ शुद्धसत्त्वाचीं चंद्रकिरणें । झांकोळती सजल घनें । उदयास्तही कोण्ही नेणें । तमें चांदिणें लोपलिया ॥ ४३ ॥ अनंतैश्वर्य परमात्मा । माजी झांकतां अविद्याभ्रमा । देहबुद्धीची होय अमा । निजात्मपरमा लोपोनी ॥ ४४ ॥ जीव जैसा निजात्मविसरें । इहामुष्मिक मानी खरें । अष्टमदांच्या आविष्कारें । ज्ञान न स्फुरे वास्तव ॥ १४५ ॥ देहबुद्धीच्या अभिमानें । ज्ञाता कर्ता भोक्ता म्हणे । असंग अमृत असतां नेणे । तैसा घनें शशी लोपे ॥ ४६ ॥

मेघागमोत्सवा हृष्टाः प्रत्यनंदन् शिखंडिनः । गृहेषु तप्ता निर्विण्णा यथाऽच्युतजनागमे ॥ २० ॥

प्रावृट्काळीं मेघ सजळ । देखोनि तोषती कलापिमेळ[1] । सन्मुख धांवती प्रेमविह्वळ । करिती कल्लोळ स्वानंदें ॥ ४७ ॥ जैसे संसारी विषयासक्त । त्रितापदुःखें होती विरक्त । त्यांसि भेटतां अच्युतासक्त । आनंदभरित ज्यापरी ॥ ४८ ॥ विजातीय कवळूनि मोहो । आत्मबुद्धि पार्थिवदेहो । विषयसुखांचा करितां लाहो । त्रितापदाहो झळंबला ॥ ४९ ॥ वणवां पडलिया पाडसा । दाही दिशा भवें वळसा । तैसे शिरकले कर्मफांसा । विश्रांतिलेशा नेणती ॥ १५० ॥ त्यांसि अच्युत-जनागमन । अवर्षणीं जैसा घन । कीं मरतया अमृतपान । दैवें आणून योजिलें ॥ ५१ ॥ अच्युत-जनांचे संगति- । मात्रें तापत्रय भंगती । भजनप्रेमा बाणे चित्तीं । बोधे विश्रांति स्वसुखाची ॥ ५२ ॥ गीत नृत्य हरिकीर्तनें । आनंदाश्रु ढळती जीवनें । प्रेम संवाद स्फुंदनें । मज्जनोन्मज्जनें स्वानंदीं ॥ ५३ ॥ तैसे सजल मेघासमोर । हर्षोत्साहें धांवती मयूर । करिती नृत्य गीत केकार । आनंदाश्रु विसर्जिती ॥ ५४ ॥

पीत्वाऽपः पादपाः पद्भिरासन्नानात्ममूर्तयः । प्राक् क्षामास्तपसा श्रांता यथा कामाऽनुसेवया ॥ २१ ॥

वर्षाकाळीं स्वैर आप । चरणें प्राशिती पादप[2] । तेणें होती अनेकरूप । करिती व्याप सभंवतां ॥ १५५ ॥ मुळियांप्रति फुटती कोंभ । सरळ सरकोनि आक्रमिती नभ । पूर्विला ऐसेचि स्वयंभ । लांब लांब बहु होती ॥ ५६ ॥ पूर्वतापें पानें झडलीं । उष्णें आहळोनि खांकरलीं[3] । वृष्टिभरें पुन्हा झालीं । फांपावलीं बहु वृक्षीं ॥ ५७ ॥ सकाम तापस जैसे क्षाम[4] । क्षुधे तृषेचे साहतां श्रम । कृच्छ्रादि[5] अनेक चाळितां नेम । अभीष्टकाम लाभती ॥ ५८ ॥ पूर्वी एकाकी[6] निस्पृह । वनौकस अपरिग्रह[7] । तपें पूर्ण संकीर्ण देह । त्यांसि उत्साह फळलाभीं ॥ ५९ ॥ मग अनेक देहवंत । होऊनि होती कामासक्त । तपें क्लेशाचें सुकृत । स्वेच्छा तेथ भोगिती ॥ १६० ॥ तैसा अवृष्टीचा ताप । सांडोनि प्राशितां वृष्टिआप । होती एकाचे अमूप । वनीं पादप सुरवाडे ॥ ६१ ॥

सरस्स्वशांतरोधस्सु न्यूषुरंगापि सारसाः । गृहेष्वशांतकृत्येषु ग्राम्या इव दुराशयाः ॥ २२ ॥

---

१ मयूरसमूह. २ वृक्ष. ३ झडून गेलीं. ४ कृश. ५ चांद्रायणादि तपें. ६ एकटा. ७ पुत्रदारादिकाविषयीं आसक्तिरहित.

वर्षाकाळीं सरिता सरें । पूरें दाटती वृष्टिभरें । तेथें बुडोनि पूर्वींचीं तीरें । नवीं दुस्तरें उमटती ॥ ६२ ॥ कंटक कर्दम ओसाणें । समल जळें बहळ फेण । तथापि चक्रवाकांचे गण । सुख न पावोन वसताती ॥ ६३ ॥ जैसे गृहाश्रमी गृहासक्त । नाहीं झाले तृष्णारहित । त्यांचीं गृहेंचि अशांत* । घालिती नित्य दुर्भरीं ॥ ६४ ॥ व्यवहारीं साधिजे वृत्ति भूमि । शत्रु जिंकावे संग्रामीं । देवता वश कीजे नेमीं । यथाकामीं फलदात्री ॥ १६५ ॥ लहान वाडा कीजे थोर । तन्हीर[2] मोडून धवळार[3] । दृढ पाषाणीं प्राकार[4] । बांधोनि सधर[5] होइजे ॥ ६६ ॥ पारद[6] औषधिसाधन । धातुवादाचें कांचन । करावया दीर्घ यत्न । नित्य नूतन आरंभीं ॥ ६७ ॥ ऐशीं अनेक दीर्घ कृत्यें । सिद्धि न पावोनि अशांतें । तृष्णाभरें गृहस्थातें । कवळूनि दुःखांत पाडिती ॥ ६८ ॥ इत्यादि कर्में सिद्धीस †जावीं । मग गृहकृत्यें शांत व्हावीं । हे तो मिथ्या उठाठेवी । ग्राम्यां गोवी दुर्लोभें‡[7] ॥ ६९ ॥ दुष्टकर्मांचे संस्कार । तेणें विषयकामीं भर । दुराशयवंत नर । दुःखी अपार गृहवासी ॥ १७० ॥ तैसीं सारसें सरितातटें । कंटककर्दमफेणपुंजितें¶ । जरी सुखाचा लेश न वटे । तरी उपविष्टे संक्लेश ॥ ७१ ॥ अंग म्हणोनि संबोधून । शुकें रायासि इतुकें कथून । पुढें म्हणे सावधान । प्रावृड्वर्णन अवधारीं ॥ ७२ ॥

जलौघैर्निरभिद्यंत सेतवो वर्षतीश्वरे । पाखंडिनामसद्वादैर्वेदमार्गाः कलौ यथा ॥ २३ ॥

जैसा प्रवर्तलिया कलिकाळ । बलिष्ठ पाखंडियांचा मेळ । असद्वादें महाकुटिळ । भंगिती समूळ सन्मार्ग ॥ ७३ ॥ वर्षाकाळींचे उत्तरमेघ । इंद्र वर्षतां क्षोभती ओघ । सेतु भंगितां पावती भंग । जनपदमार्ग तद्योगें ॥ ७४ ॥ निंदूनि वेदविहिताचार । बळें प्रशंसिती अभिचार । क्षुद्र दावोनि चमत्कार[8] । सिद्धि अघोर साबरी ॥ १७५ ॥ रोगहरणीं कां संतानीं । धनागमनीं नृप-सन्मानीं । इत्यादि लोभें प्रलोभवोनी । दुष्टाचरणीं घालिती ॥ ७६ ॥ जारणमारण स्तंभन । वशीकरण मोहन उच्चाटन । क्षणिक सामर्थ्य दावून । आज्ञानजन भुलविती[9] ॥ ७७ ॥ महातमी जे मांगभाव । पाखंडरूपी आघवी माव । भोंवाळ करूनि घरींचे देव । बोधूनि अभावं[10] सांडविती ॥ ७८ ॥ रोधूनि वेदविहिताचार । बळेंचि प्रशंसिती अवसर । ऐसे अनेक पाखंडभार । श्रोतीं अनखर न मनावे ॥ ७९ ॥ सांडूनि वेदविहिताचरण । अविधि वेषाचें धारण । तितुक्या वेषें पाखंडगण । किती म्हणोन निवडावे ॥ १८० ॥ जटी मुंडी[11] लुंचितकेश[12] । राउळपगारी[13] बीभत्सवेष[14] । विष्णु-शिवशक्तिगणेश- । भजनावेश पाखंडी ॥ ८१ ॥ हाडें कातडीं घालिती गळां । एक घालिती कवडेमाळा । एक कंठीं बांधती शिळा[15] । म्हणती आगळा शिवमार्ग ॥ ८२ ॥ अष्टादशयातिजन ।

पाठभेद :— * आशाकृत् ( मुंगीप्रत ); अशांतकृत ( उमरखेडप्रत ). † दावी ( मुंगीप्रत ). ‡ दुर्लभ ( मुंगीप्रत ). ¶ ही तटे ( मुंगीप्रत ); पुहितें ( उमरखेडप्रत ).

१ पुरांतील केरकचऱ्याचा समूह. २ गवताचें खोपट. ३ मंदिर. ४ तट. ५ आधारयुक्त. ६ पारा. ७ दुर्लभ बाळगणारे. ८ इंद्रजाल. ९ भ्रम. १० ईश्वर नाहीं असें. ११ संन्यासी. १२ केश उपटून टाकले ज्यानें तो. १३ देवळांत राहून जें मिळेल त्यावर निर्वाह करणारा. १४ घाणेरडा पोशाख करणारे. १५ लिंगरूपी शिवमूर्ति.

दीक्षा देऊनि करिती पवन । वेष दिधल्या न दिसे भिन्न । अवघें लिंगा न सोंवळें ॥ ८३ ॥ ऐसे जितुके वेषधारी । यातिकुळापासूनि दूरी । वर्णाश्रमाची बोहेरी । दुराचार सहजेंची ॥ ८४ ॥ बाह्य महती वाढवून । शिष्यमांदी मेळवून । शिश्नोदर[2]परायण । ते पाखंड मान्य कळिकाळीं ॥ १८५ ॥ श्रोतयांमाजीं कांहीं कांहीं । असतां ऐसे संप्रदायी । क्षोभें विषादा न योनें[3] तिहीं । विचार हृदयीं विवरावा ॥ ८६ ॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र । ऐसे चारी वर्ण मात्र । प्रसवे आदिपुरुषाचें गात्र । संततिगोत्र मग याचे ॥ ८७ ॥ विलोमाँनुलोमसंचारें । विहिताविहित उत्पथाचारें । जरी पावले जात्यंतरें । मुळींचे खरे चौघे कीं ॥ ८८ ॥ लक्षचौऱ्यांशीं भेद गणितें । झालीं भौतिकें अनंतें । तरी मुळींचीं पंचभूतें । निजअंशातें भजताती ॥ ८९ ॥ तैसें न भजोनि वेदविहिता । अनुसरोनि पाखंडमता । वरपडे होती जे दुष्पथा । क्षणिक स्वार्था भुलोनी ॥ १९० ॥ परी हे कळीचेनि क्षोभें । भांबावती क्षणिक लोभें । एऱ्हवीं अदृष्टावीण न लभे । दुष्पथवालभें धुंडितां ॥ ९१ ॥ एवं कळिकाळीं पाखंडगण । श्रुतिसेतूचें खंडन । करिती तैसे वर्षतां घन । सेतुभंजन जलओघें ॥ ९२ ॥

व्यमुंचन् वायुभिर्नुन्ना भूतेभ्योऽथामृतं घनाः । यथाऽऽशिषो विश्पतयः काले काले द्विजेरिताः ॥ २४॥

सुवावो ढळोनी वळती मेघ । यथाकाळें सुवृष्टि चांग । भूतांकारणें अमृतभाग । ओपिती सांग प्रावृटीं ॥ ९३ ॥ जळ नव्हे तें अमृतपान । भूतांकारणें आप्यायन । येर दुर्वातें अकाळघन । भूत-नाशन विषवृष्टि ॥ ९४ ॥ तैसे न होती सुवासयुक्त । भूतांकारणें ओपिती अमृत । जैसे सुब्राह्मण-सुप्रणीत । आशीर्वाद नृपातें ॥१९५॥ अनध्यायपरित्याग । करूनि वेदपठन सांग । वेदविहिताचार मार्ग । जे अव्यंग आचरती ॥ ९६ ॥ तया द्विजां प्रेमार्चनें । यथाभीष्ट पदार्थदानें । संतोषोनि आशीर्वचनें । पूजकाकारणें देती ते ॥ ९७ ॥ यथाकाळीं कामप्रद । तयांचे होती आशीर्वाद । प्रजापाळकां भूपां विशद । तैसें अंबुद भूतांते ॥ ९८ ॥ प्रावृट्शोभा एथवरी । शुकें वर्णूनि सविस्तरीं । आतां ते वनीं कैसा हरि । क्रीडे ते परी निरूपी ॥ ९९ ॥

एवं वनं तद्वर्षिष्ठं पक्वखर्जूरजंबुमत् । गोगोपालैर्वृतो रंतुं सबलः प्राविशद्धरिः ॥ २५ ॥

एथूनि सप्तश्लोकावधि । प्रावृट्काळींची क्रीडाविधि । वर्णिता होय शुक सुबुद्धि । श्रोता गुणाब्धि परीक्षिति ॥ २०० ॥ एवं पूर्वोक्त प्रावृट् परमा । तेणें ऋतुमती कानन[10]रमा* । देखोनि सगोप कृष्णरामा । अद्भुत प्रेमा क्रीडावया ॥ १ ॥ वन विशिष्टसमृद्धिमंत । पक्व खर्जूरी मघमघित । सफळित जंबुवृक्ष जेथ । लता अनंत पुष्पिता ॥ २ ॥ मोहरें लगडालिया धात्री[11] । हेमप्रभा सफळकारी । तिंदुकें[12] धामणी फळभारीं । रानबोरी मोहरल्या ॥ ३ ॥ [13]कपित्थ बिल्व

---

पाठभेद— परमा ( मुगीप्रत ).

१ राखरांगोळी. २ मैथुन आणि भक्षण यांच्या सतत पाठीस लागलेले. ३ न येऊन. ४ उच्चनीच किंवा नीचोच्च वर्णाच्या शरीरसंबंधानें. ५ प्रविष्ट. ६ वारा. ७ पाणी. ८ तृप्ति. ९ मेघ. १० वनशोभा. ११ आंवळीचें झाड. १२ टेंभुरणीचें झाड. १३ कंवठीचे झाड.

कोमळफळीं । सेव सौवीरें[1] सिताफळी । फांपावल्या कर्पूर कदळी । नारिकेली क्रमुकादि ॥ ४ ॥ द्राक्षा मरीच लवंगलतिका । जाती यूथिका मालतिका । बकुळी पुन्नाग नागलतिका । नागचंपक फूलले ॥ २०५ ॥ बलभद्रेंशीं नंदकुमार । भंवता गोपाळांचा भार । शोभाढ्य देखोनि कांतारें[2] । क्रीडापर प्रवेशला ॥ ६ ॥

धेनवो मंदगामिन्य ऊधो भारेण भूयसा । ययुर्भगवताहूता द्रुतं प्रीत्या स्नुतस्तनीः ॥ २६ ॥

वनीं प्रवेशोनि श्रीहरि । स्फुरितां मंजुळ मोहरी । ध्वनिलाघवें सप्तस्वरीं । धेनु हकारी सन्निध ॥ ७ ॥ अद्यापि कित्येक गोरक्षक । तेणें मार्गें अंतर्मुख । धेनु करूनि नादसुख । भोगिती निष्टंक वनवासीं ॥ ८ ॥ धेनु सवत्सा नूतन । मंद चालती हुंबरून । कांसा दाटल्या दुग्धेंकरून । वोरसें[3] स्तन पाझरती ॥ ९ ॥ कृष्णमुखींचें आवाहन । सवेग धांवती परिसोन । पाहती श्रीकृष्णाचें वदन । टंवकारोन सप्रेम ॥ २१० ॥

वनौकसः प्रमुदिता वनराजीर्मधुच्युतः । जलधारा गिरेर्नादानासन्ना ददृशे गुहाः ॥ २७ ॥

हर्षनिर्भर अंतःकरणीं । देखे वनौकसांच्या श्रेणी । वनराजी मधुस्राविणी* । चक्रपाणि देखतसे ॥ ११ ॥ धारावंत पाहे गिरि । गुहा गर्जती तेणें गजरीं । ऐशीं अनेक कौतुकें नेत्रीं । पाहे मुरारि ऋतुलक्ष्मी ॥ १२ ॥ वनीं प्रवेशला श्रीहरि । गोधनाचिया हुंकारगजरीं । आनंदोनि पुलिंद-नारी[4] । पाहती सादरीं सान्निध्यें ॥ १३ ॥ तैसा श्रीहरी आपुल्या नेत्रीं । कृपेनें पाहतां पुलिंदनारी । हर्षनिर्भरा शरीरीं । धन्य संसारीं मानिती ॥ १४ ॥ राजी म्हणिजे काननहारी । सन्निध येतांचि श्रीहरि । हर्षा पावोनि अंतरीं । बाह्यमधुधारीं पाझरती ॥ २१५ ॥ तैसाचि गोवर्धन पर्वत । समीप जाणूनि अनंत । अंतरीं होऊनि हर्षयुक्त । धारा स्रवत पाझर ॥ १६ ॥ तया धारांचे पतनध्वनि । भरती निकटगुहावदनीं । तेणें मुखें कृष्णस्तवनीं । गिरि तोषूनि प्रवर्ते ॥ १७ ॥ वनीं आला जाणोनि कृष्ण । सादर होऊनि पुलिंदीगण । असता झाला हर्षायमाण । हें व्याख्यान दुसरें ॥१८॥ तैशीच काननपरंपरा । करिती† झाली मधुपाझरा । गोवर्धनही अंबुधारा । स्रवता झाला आनंदें ॥१९॥ तया धारांचा पतननाद । गुहा प्रतिशब्द करी विशद‡ । अंतरवेत्ता श्रीगोविंद । देखोनि प्रमोद पावतसे ॥ २२० ॥

क्वचिद्वनस्पतिक्रोडे गुहायां चाभिवर्षति । निर्विशन् भगवान् रेमे कंदमूलफलाशनः ॥ २८ ॥

कोणे एके पर्वतप्रांतीं । तिंतिड्यादि[5] वनस्पति[6] । त्यांचे कोटरीं[7] निर्गळ[8] क्षिति । देखोनि

**पाठभेदः**—* श्रावणी ( मुंगीप्रत ); श्राविणी ( उमरखेडप्रत ). † धरिती ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡ करिती निनद ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ बोरीचें झाड. २ अरण्य. ३ स्नेहभरित पान्ह्यानें. ४ भिल्ल जातीच्या स्त्रिया. ५ चिंच इत्यादि. ६ वृक्ष. ७ ढोलींत. ८ जेथें गळत नाहीं ती.

श्रीपति प्रवेशे ॥ २१ ॥ सर्वत्र वर्षतां पाऊस । आश्रयूनि तो निर्जल देश । कंदमूळफळातें भक्ष्य । कल्पूनि विशेष क्रीडति ॥ २२ ॥ कोठें पर्जन्याची सरी । येतां गुहामाजि हरि । प्रवेशोनि क्रीडा करी । कंदमूलफळ भक्षी ॥ २३ ॥ वनस्पतिकोटरें कपाटीं । गुहा असती त्या तळवटीं । तेथें प्रवेशोनि* जगजेठी । क्रीडे वृष्टि वर्षतां ॥ २४ ॥

दध्योदनमुपानीतं शिलायां सलिलांतिके । संभोजनीयैर्बुभुजे गोपैः संकर्षणाऽन्वितः ॥ २९ ॥

मेघ ओसरतां जला निकटीं । शिला पाहूनि गोमटी । बैसे श्रीकृष्ण जगजेठी । भवंती थाटी गडियांची ॥ २२५ ॥ दध्योदनाची शिदोरी । स्निग्ध बांधिली होती घरीं । ते काढोनि तये अवसरीं । भोजन आदरी सप्रेमें ॥ २६ ॥ संकर्षणेंशीं एकवाट । प्राणसखे घेऊनि निकट । दध्योदनाचे स्वादिष्ठ । कवळ प्रविष्ट त्यां करी ॥ २७ ॥ नानारुचिकरा कोशिंबिरी । अनेक लवणशाकांच्या परी । रायतीं मेतकुटें सांबारीं । लेहनें करी त्या ग्रासीं ॥ २८ ॥ नित्य वनभोजनलीले । ज्या गडियांशीं जैसा खेळे । त्यांचे तैसे पुरवी लळे । कवळें कवळें नर्मोक्ति ॥ २९ ॥

शाद्वलोपरि संविश्य चर्वतो मीलितेक्षणान् । तृप्तान् वृषान् वत्सतरान् गाश्च स्वोधोभरश्रमाः ॥ ३० ॥

रामगोपांशीं चक्रपाणि । जेवितां स्मरे अंतःकरणीं । जैसें झालें वत्साहरणीं । तें ये क्षणीं झणें होय ॥ २३० ॥ म्हणोनि गोधनां सांभाळी । तंव तीं बैसलीं शाद्वळीं । तृप्त होऊनि सुखकल्लोळीं । करिती सकळीं रोवंथ† ॥ ३१ ॥ वृषभ वांसुरें धाकुटीं । गोऱ्हे काल्हवडी पारंठीं । सर्व गोधनें घाटीं‡ मोठीं । कृपादृष्टि हरि पाहे ॥ ३२ ॥ नवप्रसूता वोहाभारें । गाई श्रमतां वनसंचारें । तृप्त होऊनि कोमळचारें । अत्यादरें रोवंथती ॥ ३३ ॥ दृष्टि झांकूनि विषयात्मक । योगमुद्रेनें अंतर्मुख । कृष्णध्यानीं लावूनि लक्ष । निमीलिताक्ष गोधनें ॥ ३४ ॥

प्रावृट्श्रियं च तां वीक्ष्य सर्वभूतमुदावहाम् । भगवान् पूजयांचक्रे आत्मशक्त्युपबृंहिताम् ॥ ३१ ॥

ऐसा कृष्ण भोजनकाळीं । गोपगोधना न्याहाळी । प्रावृट्श्रियेची नव्हाळी । तोषबहळीं अवलोकी ॥ २३५ ॥ सप्त श्लोकीं निरूपण । केलें प्रावृट्श्रीवर्णन । भूतमात्रा सुखसंपन्न । पाहोन कृष्ण तोषला ॥ ३६ ॥ षड्गुणैश्वर्यांचा राशि । तो श्रीकृष्ण व्रजनिवासी । जाणोनि स्वशक्तिविशेषीं । प्रावृट्श्रियेसी गौरवी ॥ ३७ ॥ म्हणे धन्य हे प्रावृट्शोभा । सर्व जंतूंसी वल्लभा । द्यावाभूमीसहित नभा । कंदर्पशोभा पाववी ॥ ३८ ॥ जें सुख दंपतीमाझारीं । रमतां उधळे सप्रेमभरीं ।

पाठभेद :—* प्रवेशोनिया ( मुंगीप्रत ). † रोमंथ ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡ धाकटी ( मुंगीप्रत ).

१ लोणचें. २ तोंडी लावणें. ३ थट्टेचीं भाषणें. ४ हिरव्या गवताच्या जागेंत. ५ रेडके. ६ कांसेच्या भारानें. ७ प्रिय. ८ आकाश आणि पृथ्वी. ९ मदनासारखें सौंदर्य.

तें सुख सर्वांचे अंतरीं । ओपी श्रीहरि प्रावृटीं ॥ ३९ ॥ प्रावृट्कथन संपल्यावरी । पुढें शरत्काळाची थोरी । अठरा श्लोकीं शुकवैखरी । कथी ते चतुरीं परिसिजे ॥ २४० ॥

एवं निवसतोस्तस्मिन् रामकेशवयोर्व्रजे । शरत्समभवद्व्यभ्रा स्वच्छांब्वपरुषानिला ॥ ३२ ॥

एवं पूर्वोक्त* क्रीडापर । राम आणि मुरलीधर । व्रजीं वसतां निरंतर । शरद्वासर[1] पातला ॥ ४१ ॥ विगतअभ्र[2] झालें नभ । स्वच्छ शीतळ सर्व अंबु[3] । अमृतोपम काश्मीरप्रभ[4] । जें दुर्लभ वसंतीं ॥ ४२ ॥ वर्षाकाळींचा प्रबळ वात । शरद्वासरीं झाला शांत । वाहे सुखरूप निवांत । भूतां विपरीत न स्पर्शे ॥ ४३ ॥

शरदा नीरजोत्पत्त्या नीराणि प्रकृतिं ययुः । भ्रष्टानामिव चेतांसि पुनर्योगनिषेवया ॥ ३३ ॥

जियेंकरूनि नीरजोत्पत्ति[5]† । तिये शरदेची संप्राप्ति । जाणोनि नीरें निजप्रकृति । स्वादें येती स्वच्छत्वें ॥ ४४ ॥ योगभ्रष्टाचें जैसें चित्त । कामक्षोभें होय उपहत[6] । विषयाचरणीं मग‡ उत्पथ[7] । अव्यावस्थ अनर्गळ[8] ॥ २४५ ॥ पुन्हा मुरडूनि योगाभ्यासें । हृदयकमळाच्या विकाशें । निजप्रकृति भजतां जैसें । तुळे अकाशें सुशांत ॥ ४६ ॥

व्योम्नोऽब्दं भूतशाबल्यं भुवः पंकमपां मलम् । शरज्जहाराश्रमिणां कृष्णे भक्तिर्यथाऽशुभम् ॥ ३४ ॥

आकाशादि चारी भूतें । वर्षाकाळीं मलाभिभूतें । शरद् निर्मळ करी त्यांतें । जेवीं आश्रमातें हरिभक्ति ॥ ४७ ॥ योगसिद्धीचें अनुष्ठान । कपिलमुनीचें जैसें मन । नेणे संकल्पविकल्पस्फुरण[9][10] । तैसें गगन निर्मेघ ॥ ४८ ॥ अभ्रपटुलें वायु पाणी । विद्युल्लतेची झळकणी । पंचभूतांची हे मिळणी । निर्मळपणीं तैं निवडे ॥ ४९ ॥ भूतशाबल्य[11] म्हणिजे यासी । शरत्स्वागमनें ते निरसी । आणि पार्थिवा कर्दमा शोषी§ । करी आपासी सोज्वळ ॥ २५० ॥ ब्रह्मचारी गृहनिवासी । वनस्थ आणि चौथा संन्यासी । कृष्णभक्ति या चौघां जैशी । श्रमापासूनि सोडवी ॥ ५१ ॥ नानाश्रमें वेदाध्ययन । करूनि कीजे पाणिग्रहण । षट्कर्मांचें अनुष्ठान । व्रताचरण कर्कश ॥ ५२ ॥ विरक्ति तये ठायीं नुपजे । तैं मग वनस्थ होइजे । परम दुर्घट कर्म जें जें । तें आचरिजे तये ठायीं ॥ ५३ ॥ तेथही न लभतां आत्मरति । तैं चौथा आश्रम होइजे यति । देहीं वृद्धाप्यें न थरे शक्ति । होय विपत्ति आचरतां ॥ ५४ ॥ त्या चौघांसि विश्रांति- । दायक जैशी श्रीकृष्णभक्ति । सप्रेम करितां निजात्मरति । चौघे पावती अक्लेशें ॥ २५५ ॥ तयापरी शरत्काळ । चौ भूतांचा निरसी मळ । अमळ करी ब्रह्मांड- गोळ । भजनशील ज्यापरी ॥ ५६ ॥

**पाठभेद :—** * झाले ( मुंगीप्रत ). † नीरसो ( मुंगीप्रत ). ‡ प्रेम ( मुंगीप्रत ). § शशी ( मुंगीप्रत ).

१ शरदृतूंतील दिवस. २ मेघरहित. ३ उदक. ४ चंदन. ५ धूलिरहित पदार्थ, कमळें ( श्लेष ). ६ दूषिता. ७ कुमार्ग. ८ निष्प्रतिबंध. ९ हे मी करीन असें चिंतन करणें. १० हे करूं किंवा करूं नको असें चिंतन करणें. ११ पंचभूतांचा विचित्रपणा.

सर्वस्वं जलदा हित्वा विरेजुः शुभ्रवर्चसः । यथा त्यक्तैषणाः शांता मुनयो मुक्तकिल्बिषाः ॥ ३५ ॥

**जंववरी सकळ* असती घन । तंववरी दिसती कृष्णवर्ण । सांडितां सर्वस्व जीवन । शुभ्र संपूर्ण शोभती ॥ ५७ ॥ पुत्रवित्तलोकेषणा[1] । त्यागितां प्रवृत्तिवासना । मुक्तकिल्बिष योगी जाणा । उपमा घना शरदुत्था† ॥ ५८ ॥**

गिरयो मुमुचुस्तोयं क्वचिन्न मुमुचुः शिवम् । यथा ज्ञानामृतं काले ज्ञानिनो ददते न वा ॥ ३६ ॥

**शरत्कालीं गिरिवर । कोठें कोठें स्रवती नीर । येर सर्वत्र कठोर । अल्प पाझर न द्रवती ॥ ५९ ॥ जैसे प्रावृट्काळीं गिरि । सर्वत्र वाहती तोयधारीं । शरदागमीं[2] तयापरी । निर्मलनीरीं न द्रवती ॥२६०॥ पूर्वमीमांसा उपाध्याय । सर्वत्र करविती स्वाध्याय । तैसे ज्ञानी स्वप्रत्यय । लाभतां‡ सोय न वदती ॥ ६१ ॥ कोणा एकाच्या शुद्ध भावें । कृपे द्रवोनि निजानुभवें । ज्ञानामृत करिती ठावें । कैवल्यसीमे पाववितीं ॥ ६२ ॥ तैसे शरत्कालीं गिरि । क्वचिद्द्रवती निर्मळनीरीं । येर विरक्तांचिये परी । सर्वप्रकारीं निर्मम[3] ॥ ६३ ॥**

नैवाविदन्क्षीयमाणं जलं गाधजलेचराः । यथायुरन्वहं क्षय्यं नरा मूढाः कुटुंबिनः ॥ ३७ ॥

**शरत्कालीं उतळें जळें । नित्य आटतां जलचरां न कळे । दिवसेंदिवस आयुष्य पळे । नेणती केवळें मूढमति ॥ ६४ ॥ कुटुंबाचिये भरोवरी । लोभें भ्रमतां दिवारात्री । लागली आयुष्या कातरी । नेणती अंतरीं ते जैसे ॥ २६५ ॥ निःशेष आयुष्याचिये अंतीं । अकस्मात मरोनि जाती । थिल्लरीं-चिया जलचरांप्रति । तैशीच गति जाणिजे ॥ ६६ ॥**

गाधवारिचरास्तापमविंदन् शरदर्कजम् । यथा दरिद्रः कृपणः कुटुंब्यविजितेंद्रियः ॥ ३८ ॥

**शरत्कालींचा तीव्रतरणि । प्रवृत्त सस्यांच्या शोषणीं । तें तें तापे सांचवणीं । होय आहळणी जलचरां ॥ ६७ ॥ जैसा दरिद्री दीन कृपण । कुटुंबवत्त्वें§ इंद्रियाधीन । करूं जातां यथेष्टाचरण । भोगी दारुण संताप ॥ ६८ ॥**

शनैः शनैर्जहुः पंकं स्थलान्यामं च वीरुधः । यथाहंममतां धीराः शरीरादिष्वनात्मसु ॥ ३९ ॥

**ठायीं ठायीं उतल्या [4]बिदी‖ । चिखलें मातल्या पाणधी । वाळूनि जाती त्या शारदीं । होय**

---

**पाठभेदः—** * सजळ ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † शरदोत्थां ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡ आसता ( मुंगीप्रत ). § वत्सल ( मुंगीप्रत ); वछळ ( उमरखेडप्रत ). ‖ बेदी ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ पुत्रानें आपणांस बरें म्हणावें, द्रव्य मिळवावें, लोकांनीं बरें म्हणावें अशी इच्छा. २ शरदृतूंतील. ३ ममतारहित. ४ रस्ता, गल्ली, ( सं. वीथि; कान. वीदि ) पहा–इंद्रियग्रामींचे राजबिदीं ।; बिदी आणि महानदी —ज्ञानेश्वर.

भूशुद्धि हळूहळू ॥ ६९ ॥ तैशाच वनस्पति अपक्कता । सांडिती हळूहळू तत्त्वतां । बीजें पावती पक्कता । करीं ताविता शरदर्क ॥ २७० ॥ जैसे विवेकी विचारपर । अनात्मवर्गाचा परिहार । अहंताममतात्यागीं धीर । होती सधर शनैः शनैः ॥ ७१ ॥ प्रबोधशरदर्कांच्या किरणीं । ममता-कर्दम जाय वाळूनी । ब्रह्माहमस्मि पक्कपणीं । ओषधि निवडोनि निर्डारती ॥ ७२ ॥

निश्चलांबुरभूत्तूष्णीं समुद्रः शरदागमे । आत्मन्युपरते सम्यङ्मुनिर्व्युपरतागमः ॥ ४० ॥

शरत्कालीं वातवर्ष । वारूनि होय निरभ्राकाश । सरिता पूर्वस्वरूपास । पावती अशेष सौम्यत्वें ॥ ७३ ॥ तेणें निश्चल होती जळें । समुद्र क्षोभें नुचंबळे । मौन धरूनि सौम्यलीलें । तये वेळे अवलंबी ॥ ७४ ॥ वेदवेदांगपारंगत । पुरुष दैवें होय विरक्त । तो जेंवि त्यागूनि क्रियाजात । राहे मौनस्थ स्वस्वरूपीं ॥ २७५ ॥ मग तो निजात्मसंतोष । पावोनि‖ सांडी वेदघोष । मौन अवलंबी सावकाश । तेंवि सिंधु संपूर्णत्व ॥ ७६ ॥

केदारेभ्यस्त्वपोऽगृह्णन्कर्षका दृढसेतुभिः । यथा प्राणैः स्रवज्ज्ञानं तन्निरोधेन योगिनः ॥ ४१ ॥

शारदीं सरतां मेघभर । वळेवें* बांधोनि कृषिकार[३] । निश्चळ भरूनि केदारें[४] । नेती† नीर स्वच्छंदें ॥ ७७ ॥ प्राणप्रवृत्ति‡ क्रियाचरणें । विषयज्ञानें स्रवती करणें । योगी त्यांतें प्राणरोधनें । निजात्मज्ञानें स्वच्छंद करिती ॥ ७८ ॥ प्राणविरोधें जेंवि योगी । ज्ञानामृतें स्वानंद भोगी । तैसें कृषीवल तोयमार्गीं । सस्यविभागीं संतुष्ट ॥ ७९ ॥

शरदर्कांशुजांस्तापान्भूतानामुडुपोऽहरत् । देहाभिमानजं बोधो मुकुंदो व्रजयोषिताम् ॥ ४२ ॥

शरत्कालींचा तापवी रवि । रात्रींत ताप चंद्र निववी । तापत्रयातें प्रबोध शमवी । कां मुकुंद जेवीं व्रजांगना ॥ २८० ॥

खमशोभत निर्मेघं शरद्विमलतारकम् । सत्त्वयुक्तं यथा चित्तं शब्दब्रह्मार्थदर्शनम् ॥ ४३ ॥

शरत्कालीं निर्मेघ नभा- । माजि निर्मळ उडुगणशोभा[५] । जेंवि सत्त्वसंपन्नहृदयीं[६] प्रभा§ । शब्द-ब्रह्मार्थदर्शनें[७] ॥ ८१ ॥ रजतमरहित अंतःकरण । तया म्हणिजे सत्त्वसंपन्न । उपनिषदर्थें निजात्मज्ञान तें दर्शन शब्दब्रह्म ॥ ८२ ॥

**पाठभेदः—** ‖घेवोनि ( मुंगीप्रत ). * वळणे ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † नेदी ( मुंगीप्रत ). ‡ प्रकृति ( मुंगीप्रत ). § शोभा ( मुंगीप्रत ).

१ विषयमात्रांत असलेलें जें भगवत्स्वरूप त्याच्या साक्षात्काराने परिपक्वदशा पावणें. २ ओबडधोबड मोठा धोंडा. ३ शेतकरी. ४ शेत. ५ नक्षत्रपुंजांची शोभा. ६ धर्मज्ञान वैराग्य इ. गुणसंपन्न. ७ वेदार्थज्ञानानें.

अखंडमडंलो व्योम्नि रराजोडुगणैः शशी । यथा यदुपतिः कृष्णो वृष्णिचक्रावृतो भुवि ॥ ४४ ॥

**न्यूनाधिक्यरहित व्योमीं । नक्षत्रगणीं राका[1]स्वामी । शोभे जैसा श्रीकृष्ण भूमीं । वृष्णिसमाजीं राजित ॥ ८३ ॥ सकळ यादवांचा पति । तैसा वृष्णिचक्रीं[2] श्रीपति । निर्मळ गगनीं तारापति । शोभे रातीं त्यापरी ॥ ८४ ॥**

आश्लिष्य समशीतोष्णं प्रसूनवनमारुतम् । जनास्तापं जहुर्गोप्यो न कृष्णहृतचेतसः ॥ ४५ ॥

**शरत्काळीं जैसे जन । प्रसून[3]वनावरील पवन । शीतउष्णीं समसमान । आलिंगून निवताती ॥ २८५ ॥ तैशा न निवतीच गोपी । कृष्णविरहाच्या कंदर्पीं । चित्तें चोरूनि विश्वव्यापी । गेला म्हणोनि संतप्ता ॥ ८६ ॥ अथवा नकार उपमेवारी । लावितां त्याचि गोपनारी । चित्तें आलिंगूनी श्रीहरि । संताप दुरी सांडिती ॥ ८७ ॥**

गावो मृगाः खगा नार्यः पुष्पिण्यः शरदाऽभवन् । अन्वीयमानाः स्ववृषैः फलैरीशक्रिया इव ॥ ४६ ॥

**आनंदभरें शरदवसरीं[4]* । धेनु पक्षिणी मृगी का नारी । कामी कांत नेच्छी जरी । बळात्कारीं उपयुक्त ॥ ८८ ॥ चाटु[5] चटुल क्रीडारोळें । हावभावें मोडिती डोळे । क्षेमालिंगनें कंदर्पलीले । पुरुषा बळें कवळिती ॥ ८९ ॥ कां जे शरदृतूचा महिमा । पुष्पिणी म्हणिजे ऋतुमती रामा । चित्तें अनुसरोनियां कामा । सुरतीं प्रेमा स्वकांतीं ॥ २९० ॥ जैशा नित्यनैमित्तिकक्रिया । ईश्वराराधनार्थ केलिया । फळ न मागतां फळलिया । बळें आलिया भोगार्थ ॥ ९१ ॥**

उदहृष्यन् वारिजानि सूर्योत्थाने कुमुद्विना । राज्ञा तु निर्भया लोका यथा दस्यून्विना नृप ॥ ४७ ॥

**शुक म्हणे गा परीक्षिति । शरदीं उगवतां गभस्ति । कुमुदांवांचूनि कमलांप्रति । आह्लाद चित्तीं न समाये ॥ ९२ ॥ जैसें नृपाच्या आगमनीं । दस्युतस्करां[6] पडे पळणी । त्यां वेगळे सर्वजनीं । आनंदोनि वर्तिजे ॥ ९३ ॥ चरमदिग्वधू[7]मंदिरा । जातां देखोनि दिनकरा । पद्मिनी पतिव्रता सुंदरा । ईर्ष्यापरा कोमाइल्या ॥ ९४ ॥ पुन्हा देखोनि मित्रागमन । सर्वसंकोच विसर्जून । प्रेमें उत्फुल्ल होऊन । होती निमग्न स्वानंदीं ॥ २९५ ॥ परंतु दुःखिता कुमुदिनी । जैशा वनिता व्यभिचारिणी । येतां स्वकांत देखोनी । जार असोनि तिरोहिता[8] ॥ ९६ ॥ तैसा चंद्र असोनि गगनीं । सूर्य आलिंगितां पद्मिनी । संकोच पावती कुमुदिनी । जैशा स्वैरिणी लज्जिता ॥ ९७ ॥ आणि तैसेचि सत्पांथिक । स्वमार्गाचारें वर्तती लोक । दस्यु तस्कर दुरात्मक । भयें साशंक लोपती ॥ ९८ ॥**

---

**पाठभेद** :—*शरदावसरी ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ चंद्र. २ यादवसमूहांत. ३ पुष्प. ४ शरत्काळीं. ५ प्रेमानें खोटें बोलणें. ६ शत्रु व चोर. ७ पश्चिम दिशा हीच स्त्री. ८ गुप्त.

जैसे नृपाच्या दर्शनीं । जार तस्कर लोपती दोन्ही । येर आनंदें वर्तिजे* जनीं । तेवि पद्मिनी शरदर्कीं ॥ ९९ ॥

पुरग्रामेष्वाग्रयणैरैंद्रियैश्च महोत्सवैः । बभौ भूः पक्कसस्याढ्या कलाभ्यां नितरां हरेः ॥ ४८ ॥

शरत्कालीं नानापरी । शोभती झाली वसुंधरी । पुरीं पट्टणीं ग्रामीं नगरीं । उत्साहगजरीं बहुविधा ॥ ३०० ॥ ब्राह्मणादि वर्णत्रय । जे आहिताग्नि[1] सदन्वय[2] । नवान्नप्राशनीं प्रवृत्तिविनय§ । यथाम्नाय[3] आग्रयणीं[4] ॥ १ ॥ येर शांतिकें पुष्टिकें । क्षेमकल्याणकारकें । इंद्रियद्वारा विषयसुखें । अभिवर्धकें जीं कर्मे ॥ २ ॥ गर्भाधानें पुंसवनें[5] । जातकर्में[6] नामकरणें । अन्नप्राशनें निष्क्रमणें[7] । चौलोपनयनें[8] व्रतादि ॥ ३ ॥ समाराधनें यज्ञ दानें । नानाव्रतांचीं उद्यापनें[9] । तुळसीधात्र्यादिपूजनें । वनभोजनें वनयात्रा ॥ ४ ॥ महोत्साह हे इंद्रियपर । यांसि ऐंद्रिय हा उच्चार । भूमि सस्याढ्य सफळतर । आनंदकर करणांसी ॥ ३०५ ॥ शरत्कालीं कलभाषणें । पक्षिविराव द्विजाध्ययनें । पेषणें[10] कंडनें दधिमंथनें । गाती गायनें पुरंध्री[11] ॥ ६ ॥ इत्यादि श्रवणे सुखकारके । शरत्कालींचें कौतुके । त्वगिंद्रियासि वाटे हरिखे । दांपत्तिकसंस्पर्शें ॥ ७ ॥ समसमान शीत उष्ण । यालागीं आवडे वस्त्राभरण । स्वच्छ सालंकृत देखोन । उत्साहपूर्ण परस्परें ॥ ८ ॥ वनीं सकळ सफळ तरु । लता वीरुधें[12] सुमनभारु । जळें वाहती अमृतसारु । आनंदकरु सर्वार्थीं ॥ ९ ॥ शरत्कालीं जनीं वनीं । ऐशी शोभा सुखकर नयनीं । तैशीच रसज्ञेलागुनी । रसास्वादनीं उत्साह ॥ ३१० ॥ फळें मूळें नूतन धान्यें । मधुघृततैलादि कषायलवणें । यथेष्ट दुभती नवगोधनें । अन्नपानें स्वादिष्टें ॥ ११ ॥ तिक्त अम्ल कषाय कटु । मधुर क्षार रसनापटु । मिळती षड्रस एकवाटु । शरत्कालीं सर्वत्र ॥ १२ ॥ पद्माकरीं[13] परागधूलि । सुमनें मघमघिती परिमळीं । सस्यें सुगंध पड्रस साळी । शरत्कालीं जिघ्रुष्ट ॥ १३ ॥ इत्यादि महोत्सवीं बहळ । शोभे शोभाढ्य भूमंडळ । त्याहूनि विशेष व्रजमंडळ । रामगोपाळक्रीडेनें ॥ १४ ॥ उत्तर दक्षिण समान† कळा । सूर्यें अधिष्ठिजे तुळा । चंद्रादित्य हरीच्या कळा । भूमंडळा शोभविती ॥ ३१५ ॥ दिवापति रजनीपति । ते हे बळराम श्रीपति । व्रजभुवनीं प्रकाशिती । गोपयुवति[14]कुमुदाब्जें ॥ १६ ॥ नितराम् म्हणिजे येथें स्पष्ट । हरीचा विशेष महिमा प्रकट । दोघे असतां एकवाट । सुखें संतुष्ट कुमुदाब्जें ॥ १७ ॥ यशोदादि स्निग्धा गौळणी । प्रकट प्रेमाच्या पद्मिनी । येर सकामा कुमुदिनी । कुत्सिताचरणीं निशीं रम्या ॥ १८ ॥ कुत्सितमोदा[15] अधिष्ठान । म्हणोनि कुमुदे हें अभिधान । अर्थ

**पाठभेद :—** * वर्ततीं ( मुंगीप्रत ). § निचय ( मुंगीप्रत ). † मानस सफळा ( मुंगीप्रत ); समानकाळा ( उमरखेडप्रत ).

१ अग्निहोत्री. २ कुलीन. ३ वेदांत सांगितल्याप्रमाणें. ४ कार्तिक शुक्ल पूर्णिमेस नव्या भाताचा यज्ञ करितात तें. ५ स्त्रीस गर्भ राहिल्यास दुसऱ्या अ० तिसऱ्या महिन्यांत गर्भास पुंस्त्वप्राप्ति होण्याकरितां जो विधि करितात तें. ६ मूल उपजल्यावर नालच्छेदनादि विधि करितात तो. ७ चौथ्या महिन्यांत मुलास बाहेर फिरविणें. ८ प्रथम शेंडी राखण्याचा संस्कार. ९ व्रतांतील कर्मविशेष. १० दळणें. ११ साध्वी स्त्रिया. १२ वेली. १३ तळें. १४ गोपांच्या तरुण स्त्रिया हींच चंद्रविकासी कमळें. १५ निंद्य आनंदाला.

जाणती सर्वज्ञ । येर सामान्य गुंतती ॥ १९ ॥ कृष्णींही जरी अविधि[१] प्रेमा । तरी तो म्हणती कुमुदनामा । कां जे ऐशा पुढें रामा । विषयीं अधमा प्रवृत्ती† ॥ ३२० ॥ कुत्सितमार्गें जे जे मुद । ते ते नामें बोलिजे कुमुद । स्वधर्ममार्गें पाविजे‡ सुमुद । धर्मकोविद जाणती ॥ २१ ॥ भावी गोपींचें अंतर । जाणूनि बोलिला योगींद्र । ऐसें जाणतां राजेंद्र । प्रश्नीं तत्पर न होय ॥ २२ ॥ जेवीं जातीचे[२] कोमळ कळिके । घ्राणदेवता सुगंध नचखे । हृदयीं जाणे कीं जेव्हां फाके । तैं दे सुखें सौरभ्य ॥ २३ ॥ तेवीं गोपींचा मनोरथ । पुढिले अध्यायीं विशदर्थ । बोलणार तो हा येथ । श्रोतीं संकेत जाणावा ॥ २४ ॥ यावरी मुनि बादरायणि । शरद्वर्णनोपसंहरणीं । अध्यायान्तीं श्लोक वर्णी । तो श्रोतीं करणीं परिसिजे ॥ ३२५ ॥

वणिङ्मुनिनृपस्नाता निर्गम्यार्थान् प्रपेदिरे । वर्षरुद्धा यथा सिद्धाः स्वपिंडान् काल आगते ॥ ४९ ॥

प्रावृट्‌काळीं रोधल्या वृत्ति । होतां स्वच्छ शरत्प्राप्ति । आपुलाले *उपहितार्थी[३] । लोक वर्तती तें ऐका ॥ २६ ॥ वर्षरुद्ध[४]व्यासंगक । नानापरीचे वार्धुषिक[५] । स्थळोस्थळीं ते जाती देख । स्वार्थ सम्यक साधावया ॥ २७ ॥ तैसेच वर्षारुद्धमुनि । राहिले होते नानास्थानीं । ते ते तोषोनि शरदागमनीं । स्वेच्छा प्रयाणीं प्रवर्तती ॥ २८ ॥ तैसेचि राजे वर्षारुद्ध । अश्वगजादिशाळा विविध । शरदागमीं सेनाबद्ध । जाती सन्नद्ध[६] दिग्विजया ॥ २९ ॥ आणि उपनीतक[७] स्नातक[८] । वार्षिकीं सेविती जननीजनक । शरत्कालीं ते देशिकें[९] । सेऊनि सम्यक् श्रुति पढती ॥ ३३० ॥ एवं स्वार्थ जे जे ज्यांचे । व्यवसायसाधनोपाय त्यांचे । शरदागमीं लोक साचे । प्रतिपादिती संतोषें ॥ ३१ ॥ जैसे मांत्रिक कां योगी सिद्ध । करूनि राहिले आयुष्यरोध । सिद्धि[१०] लाधतां ते प्रसिद्ध । देहतादात्म्य[११] त्यागिती ॥ ३२ ॥ मग योगसिद्धीचिये संपत्ती । देवगंधर्वकिन्नरयाती- । सारिखे पिंड नवे लाहती । तेंवि अर्थावाप्ति वाणिजादिकां ॥ ३३ ॥ एवं प्रावृट्‌शरच्छोभा । दृष्टांतरूप प्रबोधगर्भा । माजि क्रीडतां पद्मनाभा । विश्ववल्लभा अघहंत्री[१२] ॥ ३४ ॥ जैसें सामान्य सरितोदक । चरण क्षाळितां देशिक । सार्धत्रिकोटितीर्थात्मक । होय सम्यक् तत्क्षणीं ॥ ३३५ ॥ तैसा क्रीडतां पुरुषोत्तमा । ऋतुद्वयाचा एवढा महिमा । कथनीं शुकासि चढतां प्रेमा । नृपसत्तमा श्रवणार्ह ॥ ३६ ॥ तस्माद्योनि-वर्णाश्रम । न म्हणोनियां अधमोत्तम । जेथें रंगला पुरुषोत्तम । तेथ प्रेम त्रिजगाचें ॥ ३७ ॥ तुळसी म्हणिजे रानींचें झाड । गोवर्धन तो केवळ दगड । तैसाचि पाञ्चजन्य[१३] हाड । ‖आवडी गोड श्रीकृष्णाची ॥ ३८ ॥ कीं पाखराचे पांख बर्हे । कृष्णप्रियतम विश्वीं अर्हे । एवं साहूनि योग्यतागर्व । मानिजे सर्व हरियोगें ॥ ३९ ॥ प्रेम बांधिती श्रीकृष्णचरणीं । वैकुंठ सांडोनि धांवे धरणी । प्रेमळाचे

पाठभेद :— † तिष्ठति ( मुंगीप्रत ). ‡ बोलिजे ( मुंगीप्रत ). * निज ( मुंगीप्रत ). ‖ परी ( मुंगीप्रत ).

१ अशास्त्र. २ जाईचें. ३ एकीकडे ठेविलेले उद्योग. ४ पावसाळ्यामुळें ज्यांच्या उद्योगास प्रतिबंध झाला ते. ५ व्याजबट्टा करणारा. ६ सज्ज. ७ ज्यांचें मौंजीबंधन झालें तो. ८ उपनयनानंतर ब्रह्मचर्यव्रतानें राहून वेदाध्ययन संपवून गृहस्थाश्रम घेण्यास तयार झालेला. ९ गुरु. १० साध्यपुरुषार्थाची प्राप्ति. ११ देह हाच आत्मा असा अहंकार. १२ पापनाशिनी. १३ पंचजनात्मक दैत्याचे उदरांत सांपडलेला शंख.

अंतःकरणीं । नांदे करणीं प्रकटोनी ॥३४०॥ ते मग होती विश्ववंद्य । त्यासी न भजती तेचि निंद्य । ऐसा भक्तिमहिमा आद्य । सप्रेम वंद्य परस्परें ॥ ४१ ॥ यालागीं सर्वांसि हेचि खूण । सप्रेम पढावे हरीचे गुण । श्रवण कीर्तन नामस्मरण । करिती श्रीकृष्ण घरांघरीं ॥ ४२ ॥ कृष्णचरणीं जडल्या मन । तेव्हां कृष्णचि अवघे जन । सहजींसहज कृष्णार्पण । प्रकटे भजन अहेतुक ॥ ४३ ॥ ऐशी प्रावृट्शरत्काळीं । कृष्णें केली बाळकेलि । शुकें कथिली नृपाजवळी । तो हृत्कमळीं निवाला ॥ ४४ ॥ तें हें भागवत अजस्र । संख्या अष्टादशसहस्र । परमहंसासि प्रियकर । स्कंध विचित्र दशम हा ॥ ३४५ ॥ प्रावृट्शरत्काळ दोन्ही । उपमाविशेषविशेषणीं । आणि बळराम चक्रपाणि । क्रीडले वनीं कथिलें ॥ ४६ ॥ पुढिले अध्यायीं गोपिकांसी । कृष्ण आठवितां मानसीं । जैशा करिती संवादासी । तो रायासि शुक सांगे ॥ ४७ ॥ तये कथेचे श्रवणयात्रे । घेऊनि यावें अवधानमात्रें । संवादसंगमीं मज्जतां श्रोत्रें । चिन्मात्र गात्रें पूतत्वें ॥ ४८ ॥ पूर्णब्रह्म नारायण । तदनुगृहीत चतुरानन । अत्रि तयाचा नंदन । अत्रिसूनु श्रीदत्त ॥ ४९ ॥ अत्रिपादप्रसादलब्ध । दत्तात्रेय महासिद्ध । त्याचा अनुग्रह प्रसिद्ध । जनार्दन स्वामीतें ॥ ३५० ॥ वायुपुराणीं इतिहास । ब्रह्मविद्येचा उपदेश । नारदें केला श्रीदत्तास । †अत्र्यादेशपूर्वक ॥ ५१ ॥ श्रीरामासी अनुग्राहक । वशिष्ठाज्ञेनें श्रीकौशिक[३] । हाही तैसाचि विवेक । परंपरात्मक जाणती ॥ ५२ ॥ जनार्दनकृपेनें सनाथ । एकनिष्ठ तो एकनाथ । ज्याचे घरीं द्वारकानाथ । सेवास्वार्थसाधक ॥ ५३ ॥ एकनाथकृपावरद । पूर्ण लाधला चिदानंद । तेणें बोधिला स्वानंद । सुखसंवाद सन्मात्र ॥ ५४ ॥ तया स्वानंदसुखाचा ठाव । तो सद्गुरु गोविंदराव । पादोदकें दयार्णव । अगाध भरिला गोविंदें ॥ ३५५ ॥ गुरुतीर्थाची आवडी ज्यासी । तिहीं देऊनि अवधानासी । श्रवणमार्गें कैवल्यकाशी । यात्रासिद्धि साधावी ॥ ५६ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे अष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां प्रावृट्शरत्कालवर्णनं नाम विंशोऽध्यायः ॥ २० ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक ४९ ॥ टीका ओव्या ॥ ३५६ ॥ एवं संख्या ॥ ४०५ ॥ श्रीगुरुशिवाय नमः ॥ ( विसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १०९६३ ).

**विसावा अध्याय समाप्त.**

---

**पाठभेद**— †आत्रिआदेश ( मुंगीप्रत ), अत्रीअदेश ( उभरखेडप्रत ).

१ फार मोठा. २ लक्ष्यरूप सामग्रीला. ३ विश्वामित्र.

कृष्णदयार्णवकृत

# हरि वरदा

## अध्याय २१ वा

श्रीगणेशांबागुरुभ्यो नमः[*]। गोविंद गोवळ गोकुळपति। गोगोधना निजविश्रांति। गोविंदगुणीं गुंततां वृत्ति। गोविंदप्राप्ति गुणनाशें ॥ १ ॥ गोशब्दार्थवाच्य बाण। त्याचा प्रेरिता तूं संपूर्ण। यालागीं गोविंद हें अभिधान। तुज लागून स्वतःसिद्ध ॥ २ ॥ तुझिया निजबोधाचा शर। होतां लिंग[1]देहीं कडतर। विकळ पडिला अहंकार। न थरे समोर समरंगीं ॥ ३ ॥ मग तो सोऽहंभावें[2] मिळणी। आणितां लागला तुझिये चरणीं। तेव्हां अवघा तुझेपणीं। पूर्णत्व लाहोनि भजिन्नला ॥ ४ ॥ तुझिया प्रत्यक्ष कामबाणें। गोपी वेधिल्या जीवें प्राणें। शेखीं त्यांमाजि घालूनि ठाणें। केलें साजणें तयांसी ॥ ५ ॥ तुझा जयासि लागला बाण। ते ते पावले निजनिर्वाण। पुन्हा खुंटलें भेदभान। जीवप्राण मग कैंचा ॥ ६ ॥ गोगोधनें स्वैराचारीं। भरतां विषयाच्या डोंगरी। त्यांतें झोडूनि विवेकवेत्रीं। निजात्मक्षेत्रीं आखीं[3]रसी ॥ ७ ॥ म्हणोनि तुवां गोवळपणें। सर्व गोकुळ संरक्षणें। गोकुळपति या कारणें। म्हणती पुराणें श्रुतिस्मृति ॥ ८ ॥ भानूपासूनि प्रतिबिंब वरी। अभंगप्रभा निरंतरीं। तेथ अबळांचे अंतरीं। प्रतिमा खरी मानतसे ॥ ९ ॥ तेवीं सच्चित्सुखविश्रांति। करणद्वारा बहिःस्फूर्ति। विषयाभासीं भाऊनि भ्रमती। मंदमति भवग्रस्त ॥ १० ॥ जैसा आत्मच्छायेभेणें। दचकोनि मरे त्या मारिलें कोणें। तेवी विषयांच्या साचपणें। भव भोगणें प्राकृता ॥ ११ ॥ येरवीं स्वआस्तिक्येंवीण। कैचें करणांसि चैतन्य। तद्भावीं विषयभान। कैचें कोठूनि कोणासी ॥ १२ ॥ एवं विषयानंदरूपें भ्रांति। किंवा वास्तव निजविश्रांति। उभयसुखात्मक संविर्त्ति[4]। गोगोधनां[5] तुझेनी ॥ १३ ॥ तें हें

---

**पाठभेदः—** *श्रीकृष्णपरमात्मने नमः (मुंगीप्रत व उमरखेडप्रत).

१ दहा इंद्रियें, पंचविषय आणि मन यांचा समुदाय, जीवाचें सूक्ष्मशरीर. २ मी तो (ईश्वर) आहें असा निश्चय. ३ गोठणीवर आणतोस. ४ ज्ञान. ५ इंद्रियें हींच गोधनें म्ह. गाईंचा समूह.

गोविंदगोमय जग। सबाह्य गोविंद अभेद सांग। असोनि गुणमयीचा आवर्ग[1]। पाडी पांग[2][*] सुखाचा ॥ १४ ॥ पुन्हा गोविंदगुणकीर्तनीं। भाग्यें रंगे जेव्हां वाणी। गोविंदप्राप्ति तेचि क्षणीं। होय जाणी[†] त्रिगुणांचीं ॥ १५ ॥ गुणत्रयाचें मोडतां नांव। गुणमयीसी कैंचा ठाव। गोविंद प्रकटे स्वयमेव। दयार्णव दीनांचा ॥ १६ ॥ तोचि वंदूनि अभेदभावें। गोविंदाज्ञेच्या गौरवें। चाले व्याख्यान तेथ द्यावें। श्रोतीं स्वभावें अवधान ॥ १७ ॥ कायसा भानूपुढें प्रकाश। कीं जलार्णवावरी पाऊस। पूर्णानंदा कासेनि तोष। कीजे विशेष विचारा ॥ १८ ॥ परंतु भक्तीची ऐसी जाति। सूर्यापुढें काडवाती। सागरांस्तृप्यंताम्[3] म्हणती। तज्जल हातीं अर्पूनी[‡] ॥ १९ ॥ तैसे संत स्वानंदघन। तयासी करूनि सावधान। आरब्धग्रंथाचें व्याख्यान। परिसावया प्रार्थना ॥ २० ॥ परंतु नभाच्या[§] आलिंगना। सामर्थ्य असे दिगंगना[4]। कीं वर्षलिया अंबुकणा। सांठवण जळराशि ॥ २१ ॥ तैसे सद्गुरु आणि संत। अभेदबोधाचा परमार्थ। श्रोत्यां वक्त्यां सप्रेम भरीत। भेदरहितस्वानंदें ॥ २२ ॥ यालागीं तुमचेंचि बोलणें। तुमचें तुम्हींच बोलणें। तुम्हां वेगळें ऐकिजे कोणें। गोडसेपणें रुचलेनी ॥ २३ ॥ आपुले रक्तमांसाची जळ्ळ। गर्भीं चरोनि प्रसवे बाळ[‖]। जर्‍हीं ते प्रायशः समळ बहळें[¶]। माता निर्मळ प्रिय मानी ॥ २४ ॥ तैसी आवडी तुमची तुम्हां। तिचें स्वरूप नकळे आम्हां। बालभाषणीं वाढवा प्रेमा। स्वानंदगरिमा हे तुमची ॥ २५ ॥ तंव संत म्हणती राहें। सद्गुरुआज्ञेचेनि उत्साहें। व्याख्यान चालवीं लवलाहें। श्रवणीं स्नेहें यंत्रिलों[5] ॥ २६ ॥ ऐसा संतांचा आह्लादकर। पूर्णसुखाचा उद्गार। येतां प्रज्ञेसि अनावर। प्रमेयपूर उचंबळला ॥ २७ ॥ मग मौनें माथा ठेवूनि चरणीं। म्हणे ऐका जी बादरायणि। परीक्षितीचिये सांगे कर्णीं। तें वाखाणीं यावरी ॥ २८ ॥ पूर्वी वर्षाशरद्वर्णन। करूनि तेथें श्रीभगवान। कैसा क्रीडला तें लक्षण। केलें निरूपण सविस्तर ॥ २९ ॥ तया शरत्काळीं वनीं। रामगोपेंशीं चक्रपाणि। वेणु वाहतां व्रजभुवनीं। पडला[↑] कानीं गोपिकांच्या ॥ ३० ॥ तेणें हरोनि नेली चित्त। मग त्या वदती एकमेकींतें। कृष्णक्रीडाविलासातें। ये अध्यायीं ते कथा ॥ ३१ ॥

श्रीशुक उवाच — इत्थं शरत्स्वच्छजलं पद्माकरसुगंधिना। न्यविशद्वायुना वातं स गोगोपालकोऽच्युतः ॥ १ ॥

शुक म्हणे गा गौरवनाथा। शरत्काळाची स्वच्छता। पूर्वाध्यायीं सविस्तरता। तुज तत्त्वता निवेदिली ॥ ३२ ॥ ऐसे शरत्काळींचे गुण। तिहीं गुणाढ्य[6] वृंदावन। पूर्वकथेचें अनुसंधान[7]। संक्षेपकथन[8] वनशोभा ॥ ३३ ॥ वनामाजीं स्वच्छ जळें। स्थळोस्थळीं अतिनिर्मळें। त्यामाजी विकासलीं कमळें। सुपरिमळें मघमघिती ॥ ३४ ॥ पंकजवनावरूनि अनिळ। घेऊनि परागधूलिमेळ। वनीं धांवे

---

**पाठभेद** — * स्वसुखाचा ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † हाणी ( मुंगीप्रत ); हाणि ( उमरखेडप्रत ). ‡ स्पर्शोनी ( मुंगीप्रत ); आर्पुनि ( उमरखेडप्रत ). § दिशाच्या ( मुंगीप्रत ). ‖ बाळू ( मुंगीप्रत ). ¶ बहळू ( मुंगीप्रत ). ↑ पडली ( मुंगीप्रत ); पडिला ( उमरखेडप्रत ).

१ अहंकार. २ दुर्लभता. ३ समुद्र तृप्त होवोत. ४ दिशा ह्याच स्त्रिया. ५ वश केला गेलों. ६ गुणसंपन्न. ७ चिंतन. ८ थोडक्यांत सांगतों.

सुगंधानिळ[†] । तेथ गोपाळ प्रवेशे ॥ ३५ ॥ गाई गोपाळ संकर्षण । सवें घेऊनि जगज्जीवन । हृदयीं उत्साह मानूनि पूर्ण । तोषें कानन प्रवेशला ॥ ३६ ॥

कुसुमितवनराजिशुष्मिभृंगद्विजकुलघुष्टसरःसरिन्महीध्रम् ।
मधुपतिरवगाह्य चारयन् गाः सहपशुपालबलश्चुकूज वेणुम् ॥ २ ॥

सरिता आणि सरोवर । सगुल्मलतांशीं गिरिवर । इहीं सालंकृत कांतार । शोभे विचित्र सुमनादि ॥ ३७ ॥ शरत्काळींचें उन्मादकर । मधु सेवूनि मातले भ्रमर । जाणूनि श्रीकृष्णसंचार । करिती गजर स्वानंदें ॥ ३८ ॥ सरितासरोवरजीवनीं । चित्रविचित्रकमलवनीं । रोलंबांचा[१] झुंकार-ध्वनि । मधुरगानीं गांधर्वी ॥ ३९ ॥ तैसेच स्थलारविंदीं भ्रमर । लतागुल्मीं कुसुमभार । मधु प्राशूनि आनंदकर । रुंजी करिती हरिप्रेमें ॥ ४० ॥ नानाद्रुमीं विहंगम । फळें भक्षोनि उत्तमोत्तम । हृदयीं चिंतूनि पुरुषोत्तम । करिती सप्रेम विरोव ॥ ४१ ॥ गंधर्व आणि मुनीश्वर । वनीं जाहले पक्षी भ्रमर । कृष्णक्रीडेचा अवसर । परम सादर साधावया ॥ ४२ ॥ ते[*] जे भ्रमरपक्षियाति । त्यांचें अभीष्ट जाणूनि चित्तीं । रामगोपेंशीं श्रीपति । ओपी विश्रांति संचारें ॥ ४३ ॥ उभा राहोनि ठायीं ठायीं । कोमळ तृणीं चारी गाई । वेणुस्वरें लावी सोई । खेचरभूचरजलचरां ॥ ४४ ॥ [§]कृष्ण-वेणूचा मधुरध्वनि । भ्रमरपक्ष्यांच्या गायनीं । द्यावाभूमी वेधलीं दोन्ही । व्रजकामिनी हृतचित्ता ॥४५॥

तद् व्रजस्त्रिय आकर्ण्य वेणुगीतं स्मरोदयम् । काश्चित्परोक्षं कृष्णस्य स्वसखीभ्योऽन्ववर्णयन् ॥ ३ ॥

शरच्चंद्राचिया मंडळा । देखोनि द्रवती तत्काळ शिळा । येरां प्राकृतां पर्वतोपळां[३] । प्रेमाजिव्हाळा न द्रवे ॥ ४६ ॥ प्रभा मात्र ते पांघुरती । ताप सांडूनि विश्रामती । आंगींचीं तेजें प्रकाशिती । परी न द्रवती वैजात्यें[४] ॥ ४७ ॥ तेवीं विधिवरें सुरयोषिता । व्रजीं जाहल्या गोपवनिता । ऐकोनि श्रीकृष्ण-वेणुगीता । झाला चित्ता स्मरोदय ॥ ४८ ॥ श्रीकृष्णाचें वेणुगीत । कानीं पडतां वेधलें चित्त । मग त्या सेवूनि एकांत । वदती वृत्तांत परस्परें ॥ ४९ ॥ कृष्ण क्रीडत असे[‡] वनीं । परोक्ष म्हणिजे अनिके[५] स्थानीं । व्रजामध्यें कोण्ही कोण्ही । गोपकामिनी मिळाल्या ॥ ५० ॥ समानवयस्का समानव्यसनी । समानगुह्यप्रभाषिणी । ऐसिया स्वसखिया मिळोनी । कृष्णवर्णनीं अनुरक्ता ॥ ५१ ॥ सखियांकारणें परस्परें । कथिती कृष्णाचीं चरित्रें । तेणें वेधतां हृदयश्रोत्रें । संतप्त गात्रें स्मर करी ॥ ५२ ॥

तद्वर्णयितुमारब्धाः स्मरंत्यः कृष्णचेष्टितम् । नाशकन् स्मरवेगेन विक्षिप्तमनसो नृप ॥ ४ ॥

**पाठभेद** :— † सुगंध, बहळ ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). * मुंगीप्रतींत ४३ व ४४ या ओव्यांतील चरण पुढेमागें झाले आहेत. § श्रीकृष्ण ( मुंगीप्रत ). ‡ असतां ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ भ्रमरांचा. २ शब्द. ३ पर्वतावरील दगड. ४ विजातीयपणानें. ५ एकांतस्थानीं.

श्रीकृष्णाचें विचेष्टितें[1] । हृदयीं स्मरोनि इत्थंभूत । झाल्या वर्णनीं उद्युक्त । मनीं मन्मथ अवतरतां ॥ ५३ ॥ मन्मथवेगें विकळें[2]चित्ता । साहों न शकती विरहव्यथा । परस्परें करिती कथा । तें नृपनाथा परियेसीं ॥ ५४ ॥ कृष्णस्वरूप त्यांचे मनीं । बिंबलें सगुण[3] सर्वाभरणीं[4] । काम क्षोभे ज्यांचे स्मरणीं । तें आकर्णीं नृपवर्या ॥ ५५ ॥

बर्हापीडं नटवरवपुः कर्णयोः कर्णिकारं बिभ्रद्वासः कनककपिशं वैजयंतीं च मालाम् ।
रंध्रान्वेणोरधरसुधया पूरयन् गोपवृंदैर्वृंदारण्यं स्वपदरमणं प्राविशद्गीतकीर्तिः ॥ ५ ॥

गोपीमानसीं कृष्णरूप । जैसें स्मरलें लावण्यदीप । स्मरणें क्षोभविला कंदर्प । शुक सकृप तें वर्णी ॥ ५६ ॥ सकळलावण्याचें बीज । तें वरवपु तेजःपुंज[5] । ज्याच्या स्मरणें मकरध्वज । दावी *चोज[6] चराचरां ॥ ५७ ॥ ज्या वपूच्या स्मरणमात्रें । काम क्षोभोनि तापवी गात्रें । मा तें प्रत्यक्ष देखतां नेत्रें । कोण्हा सांवरे देहभाव[7] ॥ ५८ ॥ विविध मृत्तिकांचे गोळे । जन्मती चौऱ्यांशीं लक्ष खोळे । तेथ स्वयोनीच्या तारुण्यबळें । काम खवळे अनावर ॥ ५९ ॥ तये योनीच्या विरहदुःखें । भ्रमती परस्परें कामुकें । अबळावीण सर्वलोकें[9] । स्मरकौतुकें अनुभूत ॥ ६० ॥ स्मरविरहाची भरतां भुली । चंद्र चंदन शीतळ जाळी । रसना रसा न सांभाळी । करणें आंधळीं सहजेंची ॥ ६१ ॥ परी ते स्वजाती[10] पृथग्योनीं । नोहे अन्यजातीमोहनी । क्रीडतां देखिजे सकल जनीं । मन्मथ मनीं नुपजे कीं ॥ ६२ ॥ व्याघ्री देखोनि कंदर्पखाणी । मनुष्य सकाम नोहे मनीं । कीं लावण्य देखोनि भुजंगिणी । मूषक मैथुनीं खवळेना ॥ ६३ ॥ जरी मदोन्मत्त हस्ती । न रमे सिंहाचे उपस्थीं । मा येर ज्या सामान्य जाती । धरी असक्ति तेथ तऱ्ही ॥ ६४ ॥ स्वयोनीचाचि कामाभिलाप । भासवी रतिसुखाचा आभास । जैसा कूपीं प्रतिभावेश[11] । करी भ्रंश सिंहातें ॥ ६५ ॥ तैसा लटिकाची विषयकाम । करी चराचरां सकाम । श्रीकृष्ण वास्तव कंदर्पधाम । पूर्णकाम परमात्मा ॥ ६६ ॥ जीवनालागीं सर्वभूतें । जातियोनिभेदरहितें । सेवूं धांवती आर्तभूतें । तेंवि कृष्णातें स्थिरचर ॥६७॥ कृष्णात्मकचि होतां काम । आत्मरूप तें कृष्णप्रेम । तेणें विषयाचा विराम । वृत्ति उपरमे सहजेंची ॥ ६८ ॥ कृष्णकामें भुलला हर । काम जाळूनि झाला शंकर । विषयी कामाचे किंकर । दुःख दुर्धर भोगिती ॥ ६९ ॥ नारद वेधला कृष्णकामें । ब्रह्मचर्यें कृष्णीं रमे । द्वैत विसरोनि कृष्णप्रेमें । आत्मारामें रमविला ॥ ७० ॥ सनकादिक ऊर्ध्वरेते[12] । ते वेधले कृष्णसुरतें । विसरोनियां तनुमनांतें । कृष्णीं एकांत रातले[13] ॥ ७१ ॥ कृष्णकामें वेधला फणी । नित्य भोगी कृष्णशयनीं । कृष्णीं सकाम †अंडजयोनि[14] । हरि हृद्भुवनीं भोगीतसे ॥ ७२ ॥ एवं आब्रह्मस्तंभपर्यंत । कृष्णकामीं सर्व आसक्त । येर विषयीं केले भ्रांत । ते भवग्रस्त दुर्दैवें ॥ ७३ ॥ ऐसें वरवपु तेजःपुंज । विशेष

**पाठभेदः**— * ओज ( मुंगीप्रत ); चोच ( उमरखेडप्रत ). † अंडज ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ चरित्र. २ व्याकुळ. ३ साकार. ४ अलंकारसहित. ५ तेजोराशि. ६ कौतुक. ७ देहास होणारे लज्जादि विकार. ८ वेगानें. ९ सर्व जनांनीं. १० आपल्या जातींत. ११ प्रतिबिंब. १२ साधु. १३ रमले. १४ ब्रह्मा.

नटनाट्याची वोज । ब्रह्मादिकां नोहे उपजे[1]§ । ते अधोक्षज अवलंबी ॥ ७४ ॥ नाट्यकौतुकें महेशें । प्रार्थितां नटला मोहिनीवेशें । सकामभ्रमें तो होऊनि पिसें । निष्कामदशे विसरोनी ॥ ७५ ॥ हंस-नाट्यें मोहिला विधि । कीं वटुनेटें[2] मुनींची मांदी । शुक्रादि बलिमखसंसदीं[3] । श्रुतिसंवादीं भुलविली ॥ ७६ ॥ आधींच लावण्य वरवपु । विशेष नाट्याचा आटोपु[4] । गोपी स्मरतां श्रीकृष्णरूपु । केंवि कदर्प खवळेना ॥ ७७ ॥ इंद्रनीळाचे गाळींव किळ । ज्योतिर्मय[5] कृष्ण सुनीळ । सहज वरवपु सोज्वळ । भूषामेळ वरनाट्यें ॥ ७८ ॥ जया वरवपूच्या ठायीं । नाट्यें मुकुट धरिला पाहीं । मयूर-बर्हाची[6] नवाई । रचना *पाहीं विचित्र ॥ ७९ ॥ चैतन्यघन श्रीकृष्णतनु । देखणें पिऊनि धाले नयन । दृश्यभावीं पडलें शून्य । मुकुटीं श्रीकृष्ण तें धरी ॥ ८० ॥ तोचि शोभे बर्हापीड । चैतन्यघन प्रकाशनिबिड । ज्याचा सर्वात्मक उजियेड । शोभवी वाड गुणागुण ॥ ८१ ॥ उभयश्रवणीं कर्णिकारें । कृष्णस्वरूपश्रवणादरें । शोभे आणूनि अभ्यंतरें । अत्यादरें विकाशती ॥ ८२ ॥ मकर-कुंडलें श्रवणासक्त । पूर्वींच होतीं रत्नखचित । कर्णिकाराचा विशेष एथ । कथिला अद्भुत वरनाट्यें ॥ ८३ ॥ घनीं †सौदर्मनींची[7] दाटी । तैसी पीतांबर मालगांठी । इंद्रधनुष्याची राहटी । शोभे कंठीं वैजयंती ॥ ८४ ॥ न पवोनि गुणांचा शेवट । लाजोनि अधोमुखें प्रकट । प्रेमोत्कर्षें स्तोत्रपाठ । करिती बोभाट क्षुद्रघंटा ॥ ८५ ॥ वज्र वैडूर्य अमूल्यमणि । रुक्म[8]मंडित ललाम[9]श्रेणी । त्रैलोक्यरचना ‡चित्रवेखणीं । ¶रशना जघनीं प्रभाढ्य ॥ ८६ ॥ अंदु[10] नूपुरें वांकी वाळे । कृष्ण-चरणप्राप्तिबळें । धन्य मानूनि प्रेमबहळें । गुणीं रसाळें गर्जती ॥ ८७ ॥ केयूरांगदें करकंकणें । रत्नमुद्रिका कंठाभरणें । कौस्तुभ श्रीवत्सलांछनें । धातुलेपनें नटशोभा ॥ ८८ ॥ कोण्ही म्हणती अलंकार । श्लोकीं नसतां वर्णिले फार । चतुरीं करावा हा विचार । सिंहेक्षणीं वक्ष्यमाणीं ॥ ८९ ॥ मागें पुढें जरी वर्णिलें । येथ काय फेडूनि ठेविलें । राजिक दैविकासि भ्याले । किंवा नेले जायांचे[11] ॥ ९० ॥ असो मूर्खांची आशंका । कोण वर्णी विश्वात्मका । सालंकृता नटनाटका । स्मरती गोपिका स्मरतप्ता ॥ ९१ ॥ कोटिचंद्रांची शोभा वदनीं । कुटिल कुंतळ रुळती श्रवणीं । उभयकुंडल तरणिकिरणीं । कुंतळश्रेणी लखलखती ॥ ९२ ॥ बर्हस्तबकें[12]मंडित मुकुट । ललाटपाटीं नीटनिघोंट । स्मरचापाकृति भृकुटितट । अवक्र व्यंकट कटाक्ष ॥ ९३ ॥ अनंगाचे सायक[13] साङ्ग । तैसे वेधक कृपापाङ्ग । अनंगरंगें सुकृतभंग । हे अभंग सुखदानी ॥ ९४ ॥ सकल लावण्याचें स्थान । सरळ सुरेख शोभे घ्राण । विश्वदेखणे विशाळ नयन । जो आकर्ण बरवंट[14] ॥ ९५ ॥ कुंतळ कुंडलजोडपाडें । मिश्रप्रभा दोहींकडे । पडतां शोभती उभयगंडें । तें लावण्य तोंडें विधि न वदे ॥ ९६ ॥ दशनीं[15] वज्र[16]मणींची कांति । कीं शशाङ्ककळांची द्विधापंक्ति । कीं इंदिराधरामृताची व्यक्ति । दंताकृती

**पाठभेद :**— § उमज ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). * कांहीं ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † सौदामिनींची ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡ चित्रखेवणी ( मुंगीप्रत ); चित्रखेवणी ( उमरखेडप्रत ). ¶ रसाळ ( मुंगीप्रत ); रसना ( उमरखेडप्रत ).

१ उत्पन्न करणें. २ ब्रह्मचारी वेषानें. ३ यज्ञांतील सभा. ४ डौल. ५ तेजोमय. ६ मोरांच्या पिसांचा तुरा. ७ विजांची. ८ सुवर्ण. ९ भूषणें. १० पायांतील वाळा. पहा— ‘ अंदु तोडराचा झणत्कार ’ वेणा—सीतास्वयंवर. ( सं. अंद्—बांधणें ). ११ दुसऱ्याचा चार दिवस मागून आणलेला पदार्थ. १२ मोराच्या पिसांचा झुबका. १३ बाण. १४ सुंदर ( = बरवंटा ). पहा— ‘ बरविया बरवंटा घनमेघसांवळा ’ तुकारामगाथा; ( सं. वरम् ). १५ दांत. १६ हिरे.

परिणमली ॥ ९७ ॥ उभयोष्ठांच्या मीलनोन्मीलनीं । उदयास्तांची होत शिरोणी । म्हणतां ब्रह्मांडांचिया श्रेणी । तेचि क्षणीं घडमोडी ॥ ९८ ॥ कोमळ हनुवटी त्या तळवटीं । मृगमदकेशरतिलक ललाटीं । भ्रमर रुंजती श्रवणीं मुकुटीं । आणि कंठीं वनमाळे ॥ ९९ ॥ रूपरेखा लावण्यगुण । नटनाट्यादि सालंकरण । मंडित मांडूनि त्रिभंगी ठाण । वेणु श्रीकृष्ण वाजवी ॥ १०० ॥ वृक्ष झाले कल्पद्रुम । जीव अवघे सुरसत्तम । विरोनि गेला भेदभ्रम । पुरुषोत्तमसान्निध्यें ॥ १ ॥ ठायीं ठायीं मांडूनि ठाण । ठकारें ठाकोनि मधुसूदन । वेणु वाहतां गोगोपगण । होती कंकण रसलोभें ॥ २ ॥ स्वपद म्हणिजे कैवल्यसदन । त्याहून सुखतम वृंदावन । करूनि रमवी स्वपादशरण । प्राणिगण स्थिरचर जे ॥ ३ ॥ अथवा स्वपद वैकुंठभुवन । चहूं मुक्तींचें अधिष्ठान । तत्तुल्य करी वृंदावन । स्वयें श्रीकृष्ण संचारें ॥ ४ ॥ कीं ध्वजवज्रांकमंडितचरणीं । श्रीकृष्ण *विचरोनि वृंदावनीं । शोभा प्रकटीं लावण्यखाणी । जे रतिजननी †त्रिजगातें ॥ १०५ ॥ वनश्रीसंपन्न रतिजनक । स्वपदचिह्नीं जगन्नायक । परम रमणीय सकौतुक । वृंदारण्य प्रवेशला ॥ ६ ॥ तेथ देहुडें मांडूनि ठाण । वेणु वाहे मधुसूदन । वाम कपोल बाहुलग्न । दक्षिणभागीं करयुग्म ॥ ७ ॥ सुनील कोमलांगुलिमेळ । स्वरसुताळें‡ रंध्रीं चपळ । किंचित्कुंचित ओष्ठयुगळ । नीलप्रवाळ रंगाक्त ॥ ८ ॥ अल्प उन्नत भृकुटितट । वेणु सुढाळ §सरसनीट । माजीं अधरसुधेचा पाट । फावे प्रकट त्रिजगातें ॥ ९ ॥ नादरूपें अमृतलहरी । उसळोनि भरती दिगंतरीं । खेचरीं भूचरीं जलचरीं । चरीं अचरीं रस लाहो ॥ ११० ॥ अधरसुधेकरोनि तत्त्वता । वेणु पूरित होत्साता । वृंदावनीं प्रवेशतां । गोप गुणकथा वर्णिती ॥ ११ ॥ सनकादिक सामगानें । गंधर्वादि तानमानें । जयजयकारीं सुरगर्जनें । तें एथ गाणें गडियांचें ॥ १२ ॥ ऐसें ध्यानीं नटवरवपु । स्मरतां तापवी हररिपु । अधरसुधाध्वनीचें रूप । श्रवणें कंदर्प क्षोभवी ॥ १३ ॥

इति वेणुरवं राजन् सर्वभूतमनोहरम् । श्रुत्वा व्रजस्त्रियः सर्वा वर्णयन्त्योऽभिरेभिरे ॥ ६ ॥

ऐसा वेणूचा सुधारव । राया ऐकतां प्राणी सर्व । विसरोनि गेले देहभाव । सुख वास्तव भजिन्नले ॥ १४ ॥ कृष्णवेणूच्या सुधास्वनें । सर्वभूतांचीं हरिलीं मनें । मग तीं सहजाचि उन्मनें । सच्चित्सुखघनें वेधलीं ॥ ११५ ॥ कृष्ण केवळ परब्रह्म । तेथें प्रकटतां नादब्रह्म । विरोनि भूतभेदाचा भ्रम । अभेद आब्रह्म समाधि ॥ १६ ॥ अनाहत ध्वनींचें लक्ष । धरोनि योगी साधिती मोक्ष । तें एथ नादब्रह्मचि प्रत्यक्ष । विश्वीं अपरोक्ष प्रकाशी ॥ १७ ॥ तृषितांमुखीं बळेंचि सुधा । रिघोनि तृषेची हरी बाधा । तैं ते पात्र अमरानंदा । होवोनि खेदा न त्यजिती? ॥ १८ ॥ किंवा गोरक्षकांचिये वदनीं । बळेंचि प्रकटे निगमजननी । तैं ते बृहस्पतीचिया श्रेणी । जिणोनि गुरुपणीं न

**पाठभेद:**—* विचरे ( मुंगीप्रत ). † त्रिजगादे ( मुंगीप्रत ). ‡ ले ( मुंगीप्रत ). § सरळ ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ आकारास आली. २ लाभ. ३ मोहक रीतानें. ४ लावण्यरूप. ५ काम. ६ अमृतासारखा नाद. ७ एकसारखा चालणारा.

तोषती१ ॥ १९ ॥ तेवीं ब्रह्मरसाचा सुधोद्गार । हरितां सर्वभूतांतर । ब्रह्मानंद चराचर । भोगी विकार विसरोनी ॥ १२० ॥ ऐशी श्रीकृष्णसुधाध्वनि । ऐकोनि गोपिका व्रजभुवनीं । नटवरवपु भरोनि ध्यानीं । सर्वांकरणीं हरि रुचला ॥ २१ ॥ मग त्या सम सुकृता सर्वी । समवयस्का समानुभवी । समरस प्रेम गुणगौरवीं । वासुदेवीं अभिरमती ॥ २२ ॥ रमत्या जाहल्या सर्वप्रकारीं । कैशा म्हणसी राया जरी । परमानंदमूर्ति श्रीहरि । अभ्यंतरीं आकळिती ॥ २३ ॥ कृष्णक्रीडा-गुणानुकथनें । विरहशृंगाररसवर्णनें । परमानंदा आलिंगनें । स्वचैतन्यें अभिरमती ॥ २४ ॥ तेंचि कैसें अभिवर्णन । तेरा श्लोकीं शुक भगवान । निरूपील तें सावधान । श्रोते सर्वज्ञ परिसोत ॥१२५॥

गोप्य ऊचुः— अक्षण्वतां फलमिदं न परं विदामः सख्यः पशूननु विवेशयतोर्वयस्यैः ।
वक्त्रं व्रजेशसुतयोरनुवेणु जुष्टं यैर्वा निपीतमनुरक्तकटाक्षमोक्षम् ॥ ७ ॥

परस्परें मिळोनि गोपी । ज्या वेधल्या परमानंदरूपीं । कृष्णविलासक्रीडाकल्पीं । विरहजल्पीं जल्पती ॥ २६ ॥ गोपी म्हणिजे सप्रेमळ । अद्यापि त्यांचा विरहरोळ । भगवद्गीते तो श्रीगोपाळ । बोधी प्रांजळ पार्थातें ॥ २७ ॥ मच्चित्ता मद्गतप्राणा । परस्परें बोधिती जाणा । कथिती नित्यत्वें मद्गुणा । संतोषोनि अभिरमती ॥ २८ ॥ गोपी म्हणती अवो साजणी । महद्भाग्य हें डोळसपणीं । याहूनि देखणेपणाची धणी । कोण उमाणी ब्रह्मांडीं ॥ २९ ॥ प्रियदर्शनें नेत्र सफळ । नेत्रवंतां हें दुर्लभ फळ । अन्य न जाणों केवळ । याहूनि विशाळ दृक्३सुख ॥ १३० ॥ करण४द्वारा अंतःकरणीं । प्रियवैशिष्ट्यें भजती प्राणी । नेत्र सफळ तद्दर्शनीं । हा चित्सुखखाणी श्रीकृष्ण ॥ ३१ ॥ इष्ट मित्र दुहिता पुत्र । भर्ता अथवा मातापितर । यांच्या दर्शनें निवती नेत्र । मा हा चिन्मात्र श्रीकृष्ण ॥३२॥ सकळ प्रियदर्शनाची सीमा । तो हा श्रीकृष्णपरमात्मा । डोळसपणें आलिया जन्मा । भाग्यमहिमा दुर्लभ हा ॥ ३३ ॥ तेंचि भाग्य कैसें म्हणसी । वना जातां गोगोपेंशीं । रामकृष्णांचा वदनशशी । जिहीं चकोरप्राय प्राशिला ॥ ३४ ॥ अनुलक्षूनि वेणुरंध्र । किंचित् कुंचित कोमलाधर । मदोन्नत भ्रुकुटिनेत्र । चंचलतर सविलास ॥ १३५ ॥ एवंविध वदनकमळ । वना नेतां गोगोपमेळ । पाहोनि निवती जे पुण्यशील । जन्म सफळ तयांचें ॥ ३६ ॥ नेत्र लाधलियाचें फळ । तिहींच भोगिलें केवळ । येर जें कां दृश्य टवाळ । तें निर्फळ देखणें ॥ ३७ ॥ जिहीं रामकृष्णांचें वदन । अनुरक्त कटाक्षीं सुलक्षण । नेत्रवंतीं केलें पान । सफळ धन्य ते नेत्र ॥ ३८ ॥ बर्हापीडा५दि ठाणमाण । सप्रेम स्मरले कृष्णध्यान । ऐसें प्राशिती ज्यांचे नयन । म्हणती धन्य त्यां गोपी ॥ ३९ ॥ हें ऐकोनि अन्य गोपी । प्रेमें रंगोनि श्रीकृष्णरूपीं । सानुरागें विरहजल्पीं । बोलती साक्षेपीं सखियांसी ॥ १४० ॥

चूतप्रवालबर्हस्तबकोत्पलाब्जमालानुपृक्तपरिधानविचित्रवेषौ ।
मध्ये विरेजतुरलं पशुपालगोष्ठ्यां रंगे यथा नटवरौ क्व च गायमानौ ॥ ८ ॥

१ दृष्टि असणें. २ तुलना करी. ३ दृष्टि असण्याचें सार्थक्य. ४ इंद्रियद्वारा. ५ मयूरपिच्छांचें शिरोभूषण.

गोपी म्हणती सखियां प्रति । बलराम आणि कमलापति । विचित्र वेषींच्या लेवूनि बुंथी । बरवंताती गोपसे* ॥ ४१ ॥ तेचि कैसे वेष विचित्र । आम्रप्रवाल परम पवित्र । मयूरपिच्छ जें सुनेत्र । कृतकोटीर[2] सुस्तबक[3] ॥ ४२ ॥ त्यामाजीं विकासित सुढाळ कमळें । जळजें[4] स्थलजें सकोमळें । विचित्ररंगीं रसाळ दळें । मुकुटीं माळे श्रवणींही ॥ ४३ ॥ आम्रप्रवाल बर्होत्पळें । लावण्य वनमाळे-आगळें । नीलपीतांबराच्या मेळें । एकत्र रुळे[5] संलग्न ॥ ४४ ॥ ऐसे विचित्र वेश उजवट । ठाणमाण ठकारें[6] नीट । गोपसभेमाजीं वरिष्ठ । शोभती उत्कट ऐश्वर्यें ॥ १४५ ॥ जैसे रंगीं नट वरिष्ठ । तैसे बळरामवैकुंठ[7] । मुरली मधुरगायननिष्ठ । विश्व संतुष्ट रसपानें ॥ ४६ ॥ ऐशियांचे संनिधानीं । गोप बैसोनि सभास्थानीं । लावण्यरस प्राशिती नयनीं । सुकृतश्रेणि[8]साफल्यें ॥ ४७ ॥ हें ऐकोनि गोपी अपर । म्हणती ऐका वो सादर । काय वेणूचें सुकृतसार । तें सत्वर सांगा वो ॥ ४८ ॥

गोप्यः किमाचरदयं कुशलं स्म वेणुर्दामोदराधरसुधामपि गोपिकानाम् ।
भुंक्ते स्वयं यदवशिष्टरसं ह्रदिन्यो हृष्यत्त्वचोऽश्रु मुमुचुस्तरवो यथाऽऽर्याः ॥ ९ ॥

आम्ही ब्रह्मयाचेनि वरें । श्रीकृष्णप्रियचिकीर्षादरें[9] । झालों गौळ्यांचीं लेंकुरें । सकामभरें हरिरक्ता ॥ ४९ ॥ म्हणोनि दामोदराची अधरसुधा । सेवनार्ह आम्हां स्निग्धां । ते आम्हुतें न लभे कदा । वेणु सर्वदा आस्वादी ॥ १५० ॥ कृष्ण भुलवूनि स्वमधुरता । स्वतंत्र सेवी अधरामृता । न धरी लोकेषणेची वार्ता । आम्ही लज्जिता विरहिणी ॥ ५१ ॥ केवळ रस मात्र अवशिष्ट । कैवल्य-सुख जें परमश्रेष्ठ । श्रीकृष्णाचे चुंबूनि ओष्ठ । वेणु यथेष्ट ते सेवी ॥ ५२ ॥ पैल पहा वो साजणी । या वेणूची जनकजननी । आर्यापरी सत्पुत्र गुणी । देखोनि मनीं संतुष्ट† ॥ ५३ ॥ ज्या सरितांचें पयःप्राशन । केलें वेणूनें संपूर्ण । तेणें पावला तनुपोषण । यास्तव नंदन तयाचा ॥ ५४ ॥ कृष्णीं सप्रेम जडला वेणु । श्रीकृष्णाधरसुधेचा स्वनु । सरिता तोषल्या ऐकोन । निजनंदन हरिनिष्ठ ॥१५५॥ कमलवनें उत्फुल्लित । त्या संहृष्ट रोमांचित । कंजें[10] स्रवती मदोदित । ते प्रशस्त हर्षाश्रु ॥ ५६ ॥ जलाश्रयीं पक्षिकुल । वेणुस्वरें झालें निश्चळ । तेणें सरिता सद्गदशीळ ॥ शब्द पांगुळ होऊनी ॥ ५७ ॥ कृष्णवेणूचा सेवूनि स्वर । ठेला जळचरीं संचार । तेणें सरिता सुखानिर्भर । वृत्ति स्थिर ज्यापरी ॥ ५८ ॥ तैसाचि जये वंशीं वेणु । जन्मोनि सेवी सप्रेम कृष्ण । देखोनि संतुष्ट कानन । वंशोद्धरण जाणोनी ॥ ५९ ॥ आपुले वंशींचा ‡तरला कृष्णीं । म्हणोनि तरुवर आनंदोनी । मधुधारा ज्या सोडिती धरणी । ते त्यां नयनीं हर्षाश्रु ॥ १६० ॥ पत्रें टवटवीत थरकती ॥ हर्षरोमांच ते त्यांप्रति । मंद मंद जे डोलती । ते माथे तुकिती सुखसौख्यें ॥ ६१ ॥ जैसे वंशीं वृद्ध आर्य ।

**पाठभेद —** * गोपसभे ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † ही ओवी मुंगीप्रतींत नाहीं, उमरखेडप्रतींत आहे. ‡ रतला ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ शोभतात. २ चूडामणि. ३ झुबका. ४ जलोद्भव कमळ. ५ अंगावर हालणे. ६ रम्य दिसणे. ७ कृष्ण. ८ पुण्यसंग्रह. ९ प्रिय करण्यास तत्पर. १० कमळें.

**वंशज देखोनि भगवत्प्रिय । अष्टभावीं आनंदमय । धन्य अन्वय मानिती ॥ ६२ ॥ हें ऐकोनि अपरा कोण्ही । गोपी म्हणती वो साजणी । स्वर्ग जाणोनि‡ वृंदावनीं ॥ कीर्ति अवनीं पावली ॥ ६३ ॥**

वृंदावनं सखि भुवो वितनोति कीर्तिं यद्देवकीसुतपदांबुजलब्धलक्ष्मि ।
गोविंदवेणुमनु मत्तमयूरनृत्यं प्रेक्षाद्रिसान्वपरतान्यसमस्तसत्त्वम् ॥ १० ॥

**भूमिगर्भीं वृंदावन । यास्तव तेंही भूसंतान । कीर्ति विस्तारी परम गहन । स्वर्गाहून धरणीची ॥ ६४ ॥ तरी तें कैसें वृंदावन । कोणा योगें कीर्ति विस्तीर्ण । भूमंडळींची स्वर्गाहून । करी संपूर्ण तें ऐका ॥ १६५ ॥ मुख्य इतुक्या कारणास्तव । जे देवकीतनय वासुदेव । राम गोगोपसमुदाव । घेऊनि स्वयमेव क्रीडतसे ॥ ६६ ॥ मलयागराचे संगतीं । काष्ठें सांडूनि पूर्व स्थिति । दिव्यसौरभ्यें लाहोनि कीर्ति । निढळीं बैसती अमरांचे ॥ ६७ ॥ कीं स्पर्शमणीचें संस्पर्शन । निरसी लोहदशेचें दैन्य । इंद्रादिकां दिव्याभरण ॥ तें होय कांचन देदीप्यमान ॥ ६८ ॥ तैशीं श्रीकृष्णपादकमळें । वृंदावनीं क्रीडती स्वलीलें । वैभव त्रिदिवाहूनि आगळें । भूमंडळें वरिलें पैं ॥ ६९ ॥ कृष्णचरणींच्या रेणूंसाठीं । तापस कर्मठ योगी हठी* । साधनें करिती कोट्यानकोटी । परमसंकटीं दुर्लभ त्यां ॥ १७० ॥ श्रीकृष्णपादाब्जरजःकणिका । कमलाकपर्दिकंजजप्रमुखां । परम दुर्लभ सनकादिकां । वृंदारकां कैंची ते ॥ ७१ ॥ ते श्रीकृष्णपादाब्जलक्ष्मी । वृंदावनीं लाधली भूमि । साम्य करितां त्रिदशधामीं । अतुल व्योमीं न समाये ॥ ७२ ॥ ज्योतिष्टोमादिकें स्वर्ग । करूनि भोगिती अमरभोग । पुण्यक्षयीं अधोमार्ग । गर्भप्रसंग चुकेना ॥ ७३ ॥ निष्काम पुण्याचिया श्रेणी । तैं वैराग्य विषयाचरणीं । कर्मत्यागें स्वचिंतनीं । कैवल्यसदनीं समरसती ॥ ७४ ॥ परम दुर्लभ ब्राह्मणयोनि । त्यामाजीं दुर्लभ विहिताचरणी । त्याहूनि दुर्लभ उभयभुवनीं । विरक्त होऊनि निवृत्त ॥ १७५ ॥ या वेगळ्या सर्व याति । त्यांची चुकेना पुनरावृत्ति । ऐशी दुर्लभ कैवल्यप्राप्ति । ते सुलभ ये क्षितीं सर्वांतें ॥ ७६ ॥ कृष्ण केवळ कैवल्यधाम । वृंदावनीं क्रीडाकाम । पाहतां वृत्तीचा उपरम । सहजचि कर्मनिवृत्ति ॥ ७७ ॥ जें वैराग्य दुर्लभ जनीं । सर्व सत्त्वांतें वृंदावनीं । कर्मीं निवृत्त होऊनी । सप्रेम कृष्णीं अनुरक्त ॥ ७८ ॥ कृष्णवेणूचा मधुर नाद । गुहागह्वरीं घुमतां मंद । मेघ मानूनि श्रीगोविंद । मयूरवृंद नाचती ॥ ७९ ॥ मेघश्याम मुरलीधर । विद्युल्लता पीतांबर । मेघगर्जना वेणुरवर । मानूनि मयूर नाचती ॥ १८० ॥ उन्मत्तमयूरनर्तन । देखोनि समस्त प्राणिगण । स्वकर्मसंन्यस्त होऊन । कृष्णीं उन्मन वेधती ॥ ८१ ॥ खेचर भूचर स्थावर जंतु । पृथक् पृथक् एकीभूत । शिखरोशिखरीं कर्मनिवृत्त । वेणुस्वनित सेविती ॥ ८२ ॥ ऐशी वृंदावनींच्या ठायीं । कैवल्यसुखाची नवाई । सर्वां सुलभ तेणें मही । स्वर्गाहुनीही प्रख्यात ॥ ८३ ॥ कृष्णचरणांचेनि लाभें । वृंदावनीं पावली शोभें । ते भूकीर्तीचिये प्रभे- । पुढें न शोभे स्वर्गादि ॥ ८४ ॥ वृंदावन ऐशियापरी । कीर्ति पृथ्वीची विस्तारी । तंव आणिकी गोपनारी । सप्रेमभरी बोलती ॥ १८५ ॥**

**पाठभेद :—** ‡ जिणोनि ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). * हट्टी ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).
१ वंश. २ भूमीवर. ३ दिव्य सुगंध. ४ कपाळ. ५ देवलोक. ६ लक्ष्मी. ७ शिव. ८ ब्रह्मदेव. ९ देव. १० सर्वकर्मत्याग.

धन्याः स्म मूढमतयोऽपि हरिण्य एता या नंदनंदनमुपात्तविचित्रवेषम् ।
आकर्ण्य वेणुरणितं सहकृष्णसाराः पूजां दधुर्विरचितां प्रणयावलोकैः ॥ ११ ॥

ऐका सखिया हो कौतुक । योनि पावोनिही तिर्यक् । इह जन्माचें सार्थक । केलें सम्यक् तें ऐका ॥ ८६ ॥ पहा वो पैल कुरंग[1]युवति । तिर्यग्योनि मूढमति । वेणु ऐकोनि शीघ्रगति । कृष्णाप्रति अनुसरल्या ॥ ८७ ॥ जो कां नंदाचा नंदन । नटवरवेश करूनि ग्रहण । मिरवी विचित्रलावण्य । ए[2]णी* धन्य निरखिती ॥ ८८ ॥ वेणुवेधें तन्मयचित्त । कांतासहित विकल्परहित । विनयपूर्वक अवलोकित । श्रीकृष्णनाथ पूजिती ॥ ८९ ॥ आपुल्या नेत्रांचें लावण्य । कृष्णनयनेंशीं तुळितां गौण । विशेष परिसोनि वेणुगान । तनुमनप्राणें वेधल्या ॥ १९० ॥ आविर्भव[3]ती अष्ट[4]भाव । तेंचि तयांचें पूजाद्रव्य । प्रणयसन्मान गौरव । इहीं केशव पूजिती ॥ ९१ ॥ यालागीं यांचें सार्थक जन्म । आमुचें कर्म याहूनि विषम । आमचे भर्तार क्षुद्र परम । आत्माराम नोळखती ॥ ९२ ॥ कृष्णीं आमुचें प्रेम गहन । देखों न शकती बल्लवगण । मा प्रत्यक्ष पूजितां नंदनंदन । घेती प्राण सक्रोधें ॥९३॥ गोपी बोलती ऐशा एकी । हें ऐकोनि म्हणती आणिकी । याहूनि आश्चर्य देवलोकीं । नंदतोकीं दाविलें ॥ ९४ ॥

कृष्णं निरीक्ष्य वनितोत्सवरूपशीलं श्रुत्वा च तत्क्वणितवेणुविचित्रगीतम् ।
देव्यो विमानगतयः स्मरनुन्नसारा भ्रश्यत्प्रसूनकबरा मुमुहुर्विनीव्यः ॥ १२ ॥

मृत्युलोकींचे भुलती प्राणी । हें आश्चर्य केतुलें कृष्णीं । परी देवता भुलविल्या विमानीं । हे अगाध करणी कृष्णाची ॥ १९५ ॥ श्रीकृष्णाचें वेणु[5]क्वणित । नवरस सप्तस्वरसंगीत । विचित्ररागांगें मू[6]र्च्छनायुक्त । ऐकोनि मोहित सुरवनिता ॥ ९६ ॥ वेणुश्रवणें मोहित पोटीं । सादर होवोनि पाहती दृष्टीं । श्रीकृष्णाची अंगयष्टि । मन्मथकोटि लावण्य ॥ ९७ ॥ चटुल चाटु विचेष्टितें । सविलास कटाक्ष ईक्षितें । रूपलावण्यइंगितें । भुलवी चित्तें वनितांचीं ॥ ९८ ॥ रूपलावण्यवैभव । पाहोनि वनितांसि उत्सव । तो देखोनि वासुदेव । देवी मोह पावल्या ॥ ९९ ॥ रूपलावण्यवेणुगीता । देखोनि ऐकोनि देववनिता । विमानयानें गगनीं जातां । मोह सकांता पावल्या ॥ २०० ॥ बसल्या असतांही निर्जराअंकीं । स्मरमोहिता एकाएकीं । धैर्यें सांडवल्या कामुकी । स्थितिवोळखी मूकल्या ॥१॥ तींचि ऐका मोहचिह्नें । क[7]वरी सुटोनि विखुरलीं सुमनें । फिटोनि गेलीं परिधानवसनें । परी निजमनें नेणती ॥ २ ॥ कृष्णविलासें निर्जरवनिता । जालिया ऐशा स्मरमोहिता । आणिकी श्रीकृष्णाच्या चरिता । आश्चर्यता वर्णिती ॥ ३ ॥

पाठभेदः— * वणि ( उमरखेडप्रत ), ८८ वी ओवी मुंगीप्रतींत नाहीं, उमरखेडप्रतींत आहे.

१ हरिणाच्या स्त्रिया. २ हरिणी. ३ उत्पन्न होतात. ४ स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग, कंप, विवर्णता, अश्रुपात, प्रलय. ५ वेणुनाद. ६ सप्तस्वरांत प्रथम स्वरापासून द्वितीय स्वरापर्यंत जे सूक्ष्म तीन स्वरांश होतात ते प्रत्येक. ७ वेणी.

गावश्च कृष्णमुखनिर्गतवेणुगीतपीयूषमुत्तभितकर्णपुटैः पिबन्त्यः ।
शावास्नुतस्तनपयःकवलाः स्म तस्थुर्गोविंदमात्मनिदृशाऽश्रुकलाः स्पृशन्त्यः ॥ १३ ॥

देवी मन्मथविलासचतुरा । कृष्णलावण्या मुरलीस्वरा । भुलोनि जालिया स्मरातुरा । आश्चर्य न करा येविषयीं ॥ ४ ॥ परंतु पशुयोनि या गाई । तैशींच तान्हीं वांसुरें तींही । श्रीकृष्ण-वेणुगीतनवाई । सेवितां देहीं तटस्थ ॥ २०५ ॥ कृष्णवदनापासूनि निर्गत । केवळ मधुर वेणुगीत । नादरूप जें परमामृत । सेविती समस्त गोवत्सें ॥ ६ ॥ झणें क्षरेल पृथ्वीवरी । म्हणोनि उभारल्या कर्णविवरीं । विमुख विस्मृत निजव्यापारीं । प्राशन करीत होत्सातीं ॥ ७ ॥ तृणकवळें त्यजिती धेनु । वेणुगीतामृता वेधून । विशेष वत्सें मुखींचे स्तन । करितां प्राशन सोडिती ॥ ८ ॥ क्षुधित होत्सातीं वांसुरें । स्तन प्राशिती अत्यादरें । अकस्मात वेणुस्वरें । वेधितां न स्फुरे पयःपान ॥ ९ ॥ ते पयाचे कवळ तैसेचि वदनीं । मुखें स्तनींचीं आसंडोनि । नादामृत रुचलें मनीं । तैं सेविती कर्णीं उभारल्या ॥ २१० ॥ करितां क्षुधितही स्तनपान । त्याहूनि विशेष कृष्णगान । रुचतां वेधलें तनुमन । देहभान मग कैंचें ॥ ११ ॥ वृत्तिवेधाचें कारण । नेत्रद्वारा प्राशूनि कृष्ण । मनें देतां आलिंगन । सोडिती नयन हर्षाश्रु ॥ १२ ॥ म्हणोनि तटस्थ गाईवत्सें । उत्तंभितें कर्णपुच्छें । कृष्ण-प्रेमापुढें तुच्छें । अपरें सौख्यें कुत्सितें ॥ १३ ॥ अमृतापुढें मृगजळपान । तैसें विषयसुखाचें भान । कृष्णप्रेमापुढें गौण । जाणोनि निमग्न तद्रसीं ॥ १४ ॥ तंव आणिका गोपकामिनी । म्हणती परिसा अहो जननी । कृष्णप्रेमें महामुनि । पक्षी ये वनीं जाहले ॥ २१५ ॥

प्रायो बताम्ब विहगा मुनयो वनेऽस्मिन् कृष्णेक्षितं तदुदितं कलवेणुगीतम् ।
आरुह्य ये द्रुमभुजान् रुचिरप्रवालान् शृण्वन्त्यमीलितदृशो विगतान्यवाचः ॥ १४ ॥

गोपी म्हणती अहो आई । कृष्णवेणुगीतनवाई । पक्षी वेधले ठायींच्या ठायीं । होती काई मुनिवर हे ॥ १६ ॥ बहुतकरोनि गमतें मनीं । पक्षी होऊं शकती मुनि । उपलक्षिजे[3] उपलक्षणीं[4] । क्रियाचरणीं समसाम्य ॥ १७ ॥ फलपुष्पादि आशारहित । वृक्ष *केवळ प्रवाळवंत[5] । तयांच्या शाखावरी स्वस्थ । दर्शनासक्त श्रीकृष्णीं ॥ १८ ॥ कृष्ण अधरामृतेंकरून । विस्तारितां वेणुगान । तद्रसाचें करिती पान । होती उन्मन सुखलाभें ॥ १९ ॥ कृष्णस्वरूपीं वेधले नयन । वेणुगायनें मन उन्मन[6] । तेणें होतां सुखसंपन्न । देहभान विसरले ॥ २२० ॥ सबाह्य कृष्णीं वेधले कैसें । उघड्या नयनीं विश्व न दिसे । कृष्णप्रेमसुखाचें पिसें । विषयसोसें सांडवले ॥ २१ ॥ वाचा विसरली शब्दरचना । अन्य रसांतें मुकली रसना । अन्य रूप न फवे नयनां । शब्दीं श्रवणा अनोळखी ॥२२॥ वेणुगायनें मन उन्मन । तेणें झालें संकल्पशून्य । कैचें त्वचेसि संस्पर्शन । क्रियाविहीन प्राणादि ॥२३॥

**पाठभेद :—** * कोमल ( मुंगीप्रत ), कोमळ ( उमरखेडप्रत ).

१ व्यापार. २ उभारलेले. ३ अनुमान करावे. ४ अनुमानांनीं. ५ पल्लवयुक्त. ६ मायेपासून मुक्त होऊन ईश्वराकडे लागलेलें.

तैसेचि मुनिही विषयविरक्त। श्रीकृष्णदर्शनीं परम आसक्त। काम्य[1]निषिद्धकर्मरहित। चित्तशुद्ध्यर्थ स्वकर्मीं[2] ॥ २४ ॥ फलपुष्पाढ्य सांडूनि द्रुम। कोमळ प्रवाळीं विहंगम। तेंवि वेदशाखासंस्थित कर्म। निष्कामकाम आचरती ॥२२५॥ निष्कामकर्म जें कां अमळ। ते वेदशाखेचे अफळ प्रवाळ। तदाश्रयें सर्व काळ। ध्याती गोपाळ हृत्कमळीं ॥ २६ ॥ जैसे विहंगम वेणुगायनीं। अंतर्मुख[3] आनंदोनी। तैसेचि मुनिही श्रीकृष्णगुणीं। सुखावोनि एकाग्र ॥ २७ ॥ श्रवण गोवूनि अनाहतीं। अचंचल नेत्रपातीं[4]। कृष्ण चिन्मात्र लक्षिताती। बाह्यवृत्ति उपरमे ॥ २८ ॥ बाह्य लोपला दृश्यभाग। कृष्णमयचि झालें जग। नयनीं रंगला श्रीकृष्णरंग। भोगिती अभंग समाधि ॥ २९ ॥ तेचि केवळ इये वनीं। पक्षी झाले गमती मुनि। उभयसाम्य उपलक्षणीं। समान कृष्णीं अनुराग ॥२३०॥ यदर्थीं सखिये नवल कोण। जें कां केवळ भगवद्ध्यान। तें भागवत भावें श्रवण। करितां भगवान होऊं शकती ॥ ३१ ॥ कृष्णगानें कृष्णध्यान। कृष्णप्रेमरसाचें पान। रुचतां सबाह्य श्रीकृष्ण। होतां कोण आशंका ॥ ३२ ॥ कृष्णीं रतलेंचि पाहिजे मन। मग कृष्ण होणें दुर्लभ कोण। कृष्णप्रेमाचें महिमान। न्यून पूर्ण न ठेवी ॥ ३३ ॥ यालागीं या पक्षियाति। नयनें प्राशिती कृष्णमूर्ति। मनें रंगले कृष्णगीतीं। केवळ यति तपोधन ॥ ३४ ॥ मृगपश्वादि पक्षिगण। हे तों जीव सचेतन। कृष्णप्रेमें रंगले पूर्ण। नवल कोण पैं याचें ॥ २३५ ॥

नद्यस्तदा तदुपधार्य मुकुंदगीतमावर्तलक्षितमनोभवभग्नवेगाः।
आलिंगनस्थगितमूर्मिभुजैर्मुरारेर्गृह्णन्ति पादयुगलं कमलोपहाराः ॥ १५ ॥

परंतु पहा वो पैल सरिता। ऐकोनियां श्रीकृष्णगीता। कृष्णप्रेमें सकामचित्ता। जाल्या व्यापा मन्मथें ॥ ३६ ॥ नद्यांमाजी भ्रमणशील। भ्रमती आवर्त[5] विशाल। कृष्णमन्मथें व्याकुळ। चिह्नीं सकळ जाणवती ॥ ३७ ॥ कृष्णकाम भरला चित्तीं। तेणें खुंटल्या प्रवाहगति। नीरें तुंबोनि तीरें बुजती। त्या आलिंगिती कृष्णातें ॥ ३८ ॥ प्रतिबिंबित जे कृष्णमूर्ति। हृदयीं गाढ आलिंगिती। तेणें सुखें भग्नगति। आत्मस्थिति स्थिरावल्या ॥ ३९ ॥ ऊर्मिरूपें[6] पसरोनि भुजा। घेऊनि विकासितां विविधां जलजां[7]। तीं अर्पूनि पादपूजा। हरिपादाब्जां[8] दृढ धरिती ॥ २४० ॥ जैशा पतिव्रता सुंदरा। घेऊनि कुसुमादि उपचारा। जाऊनि कांताच्या शेजारा। होती सादरा पदभजनीं ॥ ४१ ॥ तैशा ऐकोनि वेणुगीता। कृष्णरूपीं वेधल्या सरिता। परमाश्चर्य गमे पाहतां। अन्य वृत्तांता परिसा वो ॥ ४२ ॥

दृष्ट्वाऽऽतपे व्रजपशून् सहरामगोपैः संचारयन्तमनुवेणुमुदीरयन्तम्।
प्रेमप्रवृद्ध उदितः कुसुमावलीभिः सख्युर्व्यधात् स्ववपुषांबुद आतपत्रम् ॥ १६ ॥

१ स्वर्गप्रापक ज्योतिष्टोमादि कर्म – काम्य; अधोगतिदायक, कांदा खाणे इ. निषिद्ध कर्म. २ फलेच्छारहित ईश्वरप्रीत्यर्थ केलेले कर्म. ३ ज्यांनी दृश्यावरील दृष्टि काढून अंतरात्म्याकडे लाविली ते. ४ एकाग्र ( नेत्रपाती ). ५ भोंवरे. ६ लाटारूप. ७ कमल. ८ श्रीकृष्णाचे पादकमल.

कृष्णरंगीं रंगला मेघ। शीलसद्गुण न वंची आंग। सबाह्य कृष्णीं अर्पूनि चांग। भजन साङ्ग संपादी ॥ ४३ ॥ रामगोपेंशीं धेनुप्रति । वनीं संचरतां श्रीपति । तदनुलक्ष्यें वेणुगीति । करी विश्रांति त्रिजगातें ॥ ४४ ॥ तेव्हां तीव्र तपे उष्ण। तें देखोनि सदय घन। करी जो विश्वार्तिनाशन। वेंचूनि जीवन आपुलें ॥ २४५ ॥ कृष्ण जनार्तिहरणशील। विद्युद्वसनी कांति सुनील। इत्यादि समसाम्यें दयाळ। मेघ केवळ हरिसख ॥ ४६ ॥ आपुल्या सख्यातें देखोनी। क्षणें तापेल तीव्र उष्णीं। म्हणोनि अंतरीं कळवळूनी। मेघ गगनीं प्रकटला ॥ ४७ ॥ सप्रेमभरें कृष्णावरी। सुरसुमनांची वृष्टि करी। अथवा शीतळ कुसुमापरी। अमृततुषारीं वर्षत ॥ ४८ ॥ छत्र होवोनि आपण। करी आतपनिवारण। अनुलक्षूनि वेणुगान। करी गर्जन मंदतर ॥ ४९ ॥ ऐसा सबाह्य सेवितां कृष्ण। कृष्णमयचि झाला घन। कृष्णप्रेमाथिला धन्य। आम्ही हीन अभाग्या ॥ २५० ॥ ऐशा विरहें गोपी तप्त। आपणां अभिमानें निंदित। आम्हांहूनि भाग्यवंत म्हणती किरातकामिनी ॥ ५१ ॥

पूर्णाः पुलिंद्य उरुगायपदाब्जरागश्रीकुंकुमेन दयितास्तनमंडितेन ।
तद्दर्शनस्मररुजस्तृणरूषितेन लिंपन्त्य आननकुचेषु जहुस्तदाधिम् ॥ १७ ॥

कैशा सभाग्य पुलिंदवनिता। तरी त्या ऐका हो तत्त्वता। कृष्णांघ्रिकुंकुमरागलिप्ता। होऊनि मन्मथा परिहरिती ॥ ५२ ॥ कृष्णांघ्रिकुंकुम त्यां कें प्राप्त। म्हणाल तरी ते ऐका मात। कृष्ण केवळ कमलाकांत। प्रिय एकांत ते भोगी ॥ ५३ ॥ कमलाकुचीं कुंकुमलग्न। तिहीं करितां कुचमर्दन*। कुंकुमें रंगले कृष्णचरण। तेणें अरुणभा तळवां ॥ ५४ ॥ तदुपरि दायिता सप्रेमळा। कुंकुममंडितकुचमंडळा। मर्दिती श्रीकृष्णचरणकमळां। सुरतवेळां स्वानंदें ॥ २५५ ॥ उरुगाय म्हणिजे विशाळकीर्ति। त्या कृष्णाची लावण्यमूर्ति। तळवां स्वयंभ †माणिक्यकांति। ते जडली ज्योति कुंकुमा ॥ ५६ ॥ कमलादयिताकुंचमंडन। कृष्णचरणयोगें अरुण। तिहीं चरणीं फिरतां वन। तृणीं संलग्न कुंकुम तें ॥ ५७ ॥ इत्यादि लक्षणीं उपयुक्त। कुंकुम देखूनि तृणरूषित‡। पुलिंदवनिता मन्मथतप्त। प्रेमें लेपिती कुचवदनीं ॥ ५८ ॥ कामज्वराचें उपशमन। कृष्णचरणींचें कुंकुम जाण। घेऊनि चर्चिती स्तनआनन। आनंदोन त्या निवती ॥ ५९ ॥ कामज्वरें कुच तापले। हरिपदकुंकुमें विलेपिले। व्यथा सांडोनि विज्वर झाले। मनोरथ फळले तयांचे ॥ २६० ॥ यास्तव धन्य पुलिंदवनिता। हरिपदप्रसाद झाल्या प्राप्ता। आम्ही विरहिणी कंदर्पतप्ता। जन्मोनि वृथा भूभार ॥ ६१ ॥ कृष्णपदप्रसादलेश। लाहोनि न पवोंचि संतोष। आम्हांहूनि भाग्य विशेष। पुलिंदवनिता भोगिती ॥ ६२ ॥ तंव आणखी गोपी हर्षें। म्हणती प्रेमाच्या उत्कर्षें। गोवर्धनही कृष्णदास्यें। भाग्यविशेषें रंगला ॥ ६३ ॥

**पाठभेद :—** * पटमर्दन ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † लावण्य ( मुंगीप्रत ). ‡ रुचित ( मुंगीप्रत ).

१ पाणी ( प्राण ). २ वीजरूपी वस्त्र धारण करणारा. ३ उदक. ४ भिल्ल जातीच्या स्त्रिया. ५ गवतास चिकटलेलें.

हन्तायमद्रिरबला हरिदासवर्यो यद्रामकृष्णचरणस्पर्शप्रमोदः ।
मानं तनोति सहगोगणयोस्तयोर्यत् पानीयसूयवसकंदरकंदमूलैः ॥ १८ ॥

हरिदासवर्गामाजीं श्रेष्ठ । गोवर्धनाचि परमवरिष्ठ । रामकृष्णीं एकनिष्ठ । प्रेम उत्कट* तच्चरणीं ॥ ६४ ॥ चरणस्पर्शें पावला मोद । तृणोद्गमादि रोमांच विशद । प्रस्रवोदकाचे बाष्पबिंदु । पाझर स्वेदसमसाम्य ॥ २६५ ॥ सभाग्यमहिमा इत्यादि चिह्नीं । कृष्णचरणस्पर्शें करूनी । विस्तारी जो आनंदोनी । हृदयभुवनीं सर्वदा ॥ ६६ ॥ भाग्यें आपुल्या स्थळाप्रति । गोगोपेंशीं रामश्रीपति । आले जाणोनि सप्रेमभक्ति । पूजनादि सादर ॥ ६७ ॥ गोधना तर्पी पांनीयतृणीं । कंदमूळफळ-भोजनीं । गोप बळराम चक्रपाणि । अवंचकपणीं अर्चित ॥ ६८ ॥ आपुलिये कंदरेंदेशीं । वसती गोपी विश्रांतीसी । कंदरोद्भवां उपचारांसी । सहसा कोणासि न वंची ॥ ६९ ॥ मृगपक्ष्यादिवनचर-श्रेणी । कुटुंबैंपोष्यें पंक्तीसि आणी । अनन्यभावें श्रीकृष्णचरणीं । गिरि सद्गुणी हा धन्य ॥ २७० ॥ अनन्यभावें भेदरहित । वैर †विसरला समस्त । जॆड होत्साता सद्भाववंत । धन्य हरिरंत गिरिवर हा ॥ ७१ ॥ तंव आणिकी म्हणती गोपरामा । हा सखिया हो विचित्रमहिमा । पैल स्थावरां जंगमां । विपरीत कर्मा प्रकाशी ॥ ७२ ॥

गा गोपकैरनुवनं नयतोरुदारवेणुस्वनैः कलपदैस्तनुभृत्सु सख्यः ।
अस्पंदनं गतिमतां पुलकस्तरूणां निर्योगपाशकृतलक्षणयोर्विचित्रम् ॥ १९ ॥

गाई गोपाळ घालोनि पुढें । मागें राम कृष्ण निज गडे । वनीं उपवनीं चारितां कोडें । पाहती निवाडें जे प्राणी ॥ ७३ ॥ कोमल पदांचे विन्यास । मधुरवेणुगायन सुरस । सेवितां ताटस्थ्य जंगमांस । स्थावरांस चंचलता ॥ ७४ ॥ जंगम जे जे प्राणिमात्र । कृष्णक्रीडारसाचें पात्र । होतां सेविती सन्मात्र । बाह्य गात्र ‡अचेष्ट ॥ २७५ ॥ लांचावैतां वेणुस्वरीं । वृत्ति उपरमे माघारी । इंद्रियें सप्राण अंतरीं । निर्विकारी मन होय ॥ ७६ ॥ मग ते सुषुप्ति गाढमूढ । कीं शुष्कद्रुमाचें लांकूड । तैसें देह अचेष्ट जड । होती गूढ हरिरूपीं ॥ ७७ ॥ तैशाचि स्थावरवृक्षादि याति । वेधतां श्रीकृष्ण-वेणुगीतीं । अंतरीं द्रवोनियां झरताती । सत्त्ववृत्ति बाष्पांबु ॥ ७८ ॥ पर्णी थरकती तरुवर । तेचि स्वानंदरोमांकुर । इत्यादि अष्टभावप्रकार । जड स्थावर प्रकटिती ॥ ७९ ॥ हें व्हावया काय कारण । पैल पहा हो उपलक्षण । मस्तकीं निर्योगवेष्टन । ऐका विवरण पैं त्याचें ॥ २८० ॥ धेनु खडाणा नाटोपती । धीट सैराट चौताळती । केवळ मनाच्या चंचळ वृत्ति । स्थिर न होती बावरीया ॥ ८१ ॥ वेणुनादाची टाकोनि सडक । सवेग करिती अंतर्मुख । ते बळराम यदुनायक । विश्ववेधक

---

**पाठभेद**—* उत्कृष्ट ( मुंगीप्रत ). † विसरली ( मुगीप्रत ). ‡ विचेष्ट ( मुंगीप्रत ).

१ उदक. २ गुहा. ३ कुटुंबांतील माणसांप्रमाणें पोसण्यास योग्य. ४ चेतनारहित. ५ हरिभक्तींत गढून गेलेला. ६ लुब्ध झाले असतां. ७ नेत्रोदक. ८ गाईचे पाय बांधावयाच्या दोऱ्या. ९ दूध थोडें देते व लाथा फार मारते अशी गाय.

ऐश्वर्यें ॥ ८२ ॥ सडक दोर पदबंधन । स्कंधीं मस्तकीं परिवेष्टन । निर्योगपाश[1]कृतलक्षण । हें व्याख्यान ये पदींचें ॥ ८३ ॥ चंचलासी करिती स्थिर । स्थिरा योजिती संचार । नंदकुमार कीं हे ईश्वर । महिमा विचित्र हा त्यांचा ॥ ८४ ॥ अष्टधा[2] प्रकृति जड केवळ । स्वचैतन्यें करिती चळ । जीवचैतन्या निश्चळ । करिती तत्काळ स्ववेधें ॥ २८५ ॥ चेता[3]चेतविपर्यासें । वेणुगानें लावोनि पिसें । वृंदावनीं क्रीडामिसें । विश्व चिद्रसें भरिताती ॥ ८६ ॥ शुक म्हणे गा कुरुमंडना । गोपी मानसें कवळूनि कृष्णा । विरहवेधें कथिती गुणां । त्या व्याख्याना निरूपिलें ॥ ८७ ॥

एवंविधा भगवतो या वृंदावनचारिणः । वर्णयन्त्यो मिथो गोप्यः क्रीडास्तन्मयतां ययुः ॥ २० ॥

षड्गुणैश्वर्यें संपन्न । वृंदावनीं क्रीडतां कृष्ण । त्याच्या क्रीडा मनीं स्मरोन । करिती कथन परस्परें ॥ ८८ ॥ एवं पूर्वोक्त ज्या ज्या क्रीडा । विविध निरोपिल्या तुजपुढां । कृष्णविरहें मन्मथपीडा-। हरण[4]चाडा त्या वदती ॥ ८९ ॥ एवं वृंदावनीं श्रीहरि । गोपगोधनपरिवारीं । वेणुगायनें सप्तस्वरीं । गोपी शरीरीं स्मरतप्ता ॥ २९० ॥ सालंकृत हरीचें ध्यान । तत्क्रीडांचें अनुसंधा[5]न । करितां तन्मयता पावोन । सुखसंपन्न जाहल्या ॥ ९१ ॥ तया गोपींचा विसांवा । तो श्रीकृष्ण चोविसा[6]वा । सप्रेम वाटे ज्यां पुसावा । तिहीं परिसावा अध्याय हा ॥ ९२ ॥ इये अध्यायीं इतुकी कथा । शुकें निवेदिली भारता । त्यावरी कात्यायनीव्रता । पुढें कथिता होईल ॥ ९३ ॥ तो अध्याय बाविसावा । यज्ञपत्न्यांचा विसांवा । एकाग्र होवोनि परिसावा । जरी वाटे वसावा हरि हृदयीं ॥ ९४ ॥ भागवतींचें हेंचि बिरुद[7] । श्रवणीं वेधूनि पावतां मोद । तेथें प्रकटोनि गोविंद । ओपी आनंद स्वसुखाचा ॥ २९५ ॥ तपें तीर्थें व्रतें शिणतां । कृष्णप्रेमानंद चढे हाता । तो येथ सुलभ भागवता । श्रवण करितां सद्भावें ॥ ९६ ॥ परंतु इतुकेंचि पथ्य करणें । सद्गुरुचरणांतें दृढ धरणें । त्याचिया मुखें हें विवरणें । अंतःकरणें एकाग्रें ॥ ९७ ॥ म्हणाल सद्गुरु कोठें मिळे । तरी जें परब्रह्म सांवळें । गाई राखे गोवळमेळें । तें हृत्कमळीं स्मरोनी ॥ ९८ ॥ निष्ठा धरीत भागवतीं । स्वयमेव प्रकटे सद्गुरुमूर्ति । निरसोनि संशयाची गुंती । चित्सुखविश्रांति भोगवी ॥ ९९ ॥ तें हें श्रीमद्भागवत । अठरा सहस्र परमामृत । परमहंस जेथ रमत । संहिता विख्यात पारमहंसी ॥ ३०० ॥ शुकपरीक्षितिसंवाद । त्यामाजीं पावन दशमस्कंध । मिथ्या गोपींचा अनुवाद । अध्याय विशद एकविसावा ॥ १ ॥ आदिसद्गुरु श्रीदत्तात्रेय । तत्कृपेचा वरदान्वय । जनार्दनद्वारा वाढता होय । एकात्मसोय एकनाथीं ॥ २ ॥ तत्पादभजनीं चिदानंद । रहस्य पावला स्वानंद । तेवी कृपेनें गोविंद । ओळला वरद दयार्णवा ॥ ३ ॥ गोविंद सद्गुरु कृपेची साठवण । म्हणोनी दयार्णव म्हणिजे पूर्ण । संतीं प्रक्षाळोनिया चरण । कीजे शरण सनाथ ॥ ४ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे

---

१ पादबंधनरज्जु आणि दावां ही लक्षणें ज्यांवर आहेत ते. २ पंचमहाभूतें, मन, बुद्धि, अहंकार. ३ सचेतन व अचेतन यांची उलट स्थिति. ४ मदनाची पीडा निवारण्याच्या इच्छेनें. ५ चिंतन. ६ संध्येतील केशवादि चोवीस नांवांपैकीं शेवटचा. ७ प्रतिज्ञा.

अष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकाया दयार्णवानुचरविरचितायां वृंदावनवेणुवादनक्रीडा मिथ्यागोपीसंवादो नाम एकविंशतितमोऽध्यायः ॥ २१ ॥ श्रीरामार्पणमस्तु ॥ श्लोक २० ॥ टीका ओव्या ॥ ३०४ ॥ एवं संख्या ॥ ३२४ ॥ श्रीगुरुशिवाय नमः ॥ (एकविसावा अध्याय मिळून ओवीसंख्या ११२८७).

एकविसावा अध्याय समाप्त.

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय २२ वा

श्रीकृष्णदयार्णवः प्रसन्नः । ॐ नमो गोपीमानसहरणा । सप्रेमविरहप्रवर्धना । कृपाकटाक्षें करूनि करुणा । स्वपादशरणा उद्धरिसी ॥ १ ॥ परब्रह्म जें निर्विकार । करूनि *चिच्छक्त्यंगीकार । तोचि सगुण प्रणवांकुर[1] । ईश्वर गुरु विश्वाचा ॥ २ ॥ तेथूनि सबळमायायोग । गुणत्रयात्मक विविध जग । भासवूनि दृश्य वाउगें । तेथ निजांगें अभिरमसी ॥ ३ ॥ परी तो अनंत मायारोळ । ज्यामाजीं असंख्य ब्रह्मांडगोळ । होती जाती एवढा काळ । तव निहाळ[2] न भरतां ॥ ४ ॥ जेंवि लचकलियाची दिठी । रज्जुसर्पादि विवर्तकोटी । हर्षशोका आणिती भेटी । यथार्थ पोटीं उमजे तो ॥ ५ ॥ तेंवि विश्वाकारें आभासोन । तादात्म्य[3] अवलंबी चैतन्य । तेंचि ठसावें विपरीत ज्ञान । भोगी भवभान नाथिलें ॥ ६ ॥ तेव्हां आपुलिये सोडवणें । पूर्णप्रबोधें आविर्भवणें । करूनि गुरुत्वें धांवणें । विपरीत निरसणें नाथिलें ॥ ७ ॥ त्या तुज नमोजी गोविंदा । इंद्रियवृत्ति गोपीप्रमदा । विषयीं रमोनि पावल्या खेदा । जाणोनि आनंदा ओपिसी ॥ ८ ॥ अहो चुकोनि चोखी मान । त्या वत्साते दावितां स्तन । प्रतीति येतां अमृतपान । होय संलग्न ज्यापरी ॥ ९ ॥ गोपी म्हणिजे तैसी करणें । विषयाभा† तैशीं शिणलीं शीणें । त्या तुवां वेधितां स्वानंदघनें । विपरीत स्मरणें सांडविलीं ॥ १० ॥ मग त्या वियोगें विह्वळ । संयोगार्थ सप्रेमळ । इये अधिकारदशेचें मूळ । कृपा केवळ पैं तुझी ॥ ११ ॥ ऐसे जे कां स्वपादशरण । करिसी स्ववेधें लांचवून । मग त्यां न रुचेचि विषयभान । तें उद्धरणें सहजेंची ॥ १२ ॥ ऐशिया स्वामी प्रणतपाळा । पूर्णकृपेचा जिव्हाळा । ओपूनि वाढवीं ‡मज बाळा । गुणगणमाळाग्रथनार्थ ॥ १३ ॥ हें ऐकोनि करुणावंत । म्हणती चालवीं

---

**पाठभेद** — * चित्शक्ति अंगिकार ( मुंगीप्रत ); चिच्छक्ती अंगिकार ( उमरखेडप्रत ). † विषयांभांशीं ( मुंगीप्रत ); विषयांभासीं ( उमरखेडप्रत ). ‡ जव ( मुंगीप्रत ).

१ ब्रह्मरूपाचा अंकुर. २ निमेष. ३ त्या विश्वाचा अभिमान.

आरब्धग्रंथ। कैसें कात्यायनीव्रत। गोपी समस्त आचरल्या ॥ १४ ॥ श्रवणीं सादर महानुभाव। त्यांचे चरणीं धरूनि भाव। ये अध्यायीं यादवराव। करी अपूर्व जें चरित ॥ १५ ॥ शुकोक्तीवरूनि तें वाखाणीं। ऐशी वदतां प्रभूची वाणी। हर्षें माथा ठेवूनि चरणीं। आज्ञा मूर्ध्नीं वंदिली ॥ १६ ॥ कृपामृताची मंदाकिनी। अपांगपातें उचंबळोनी। दयार्णवगर्ता प्रज्ञानिम्नीं। सांठवूनी राहिली ॥ १७ ॥ संवादमथनीं तेथींचीं रत्नें। श्रोतीं श्रवणीं लेइजेत यत्नें। क्षणैक बैसोनि सावधमनें। इतुकें प्रार्थणें सेवेसी ॥ १८ ॥ श्रीकृष्णप्राप्तीचीं कारणें। कात्यायनीव्रताचरणें। सप्रेम कृष्णीं जडलीं मनें। निःसीमपणें गोपींचीं ॥ १९ ॥ त्यांहीं ऐकोनि वेणुगीत। जाल्या हरिविरहें संतप्त। परस्परें कृष्णचरित। एकविसांत त्या वदल्या ॥ २० ॥ हें जाणोनि सर्ववेत्ता। सफल करावया त्यांचिया व्रता। लीलाविनोदें उदारचरिता। करी तें आतां परिसावें ॥ २१ ॥ इतुकें कथेचे अवसानीं। संपली द्वितीय एकादशिनी। जे हे परीक्षितीचे कानीं। घाली शुकमुनि तें ऐका ॥ २२ ॥

श्रीशुक उवाच — हेमंते प्रथमे मासि नंदव्रजकुमारिकाः। चेरुर्हविष्यं भुंजानाः कात्यायन्यर्चनव्रतम् ॥ १ ॥

वृश्चिकीं[4] पावे जैं ग्रहपति[5]। तेव्हां हेमंतउत्पत्ति। तैंहूनि गोपकुमारी सुमति। ज्या व्रजीं वसती नंदाच्या ॥ २३ ॥ वृश्चिक धनुष्य लंघी भास्वत। हेमंतऋतु तंवपर्यंत। सूर्यमानें[7] प्रथम तेथ। सहोमास[6] बोलिजे ॥ २४ ॥ तिये हेमंतीं मार्गशीर्षीं। गोपकुमारी प्रथम मासीं। जाल्या आचरत्या व्रतासी। दृढनेमेंशीं सकामा ॥ २५ ॥ उपःकालीं प्रातःस्मरण। यथोक्त सारोनि शौचाचरण। करिती मुखप्रक्षालन। वाङ्नियमनपूर्वक ॥ २६ ॥ आहारविहारवसनाशन। अवघें विध्युक्त नियमून। नित्य सेविती हविष्यान्न। कदन्न‡ परान्न न घेती ॥ २७ ॥ प्रधानदेवता कात्यायनी। निरत तयेच्या अर्चनीं। अरुणोदयीं यमुनास्नानीं। जाती मिळोनि व्रजबाळा ॥ २८ ॥

आप्लुत्यांऽभसि कालिंद्या जलांते चोदितेऽरुणे। कृत्वा प्रतिकृतिं देवीमानर्चुर्नृप सैकतीम् ॥ २ ॥

ऐसें परीक्षिते† सावधान। करिसी नरांचें पालन। नृप ऐसें जें संबोधन। गुणलक्षण-सौभाग्यें ॥ २९ ॥ अरुणें प्राची प्रकाशितां। येती यमुनेप्रति समस्ता। पूजासौभाग्यद्रव्ययुक्ता। परमनियता व्रतनियमें ॥ ३० ॥ मनें चिंतोनि कात्यायनी। संकल्प करिती तत्पूजनीं। मग मज्जती यमुनाजीवनीं। वसनें ठेवूनि तटाकीं ॥ ३१ ॥ यमुनाजीवनीं करोनि स्नानें। करिती स्ववस्त्रें परिधानें। सौभाग्यद्रव्यें विलेपनें। नामस्मरण आननीं ॥ ३२ ॥ भूमि शोधोनि यमुनापुलिनीं। वाळुवेची शुभलक्षणी। रूपरेखाठाणमाणीं। मूर्ति निर्मूनि साजिरी ॥ ३३ ॥ सालंकृत कात्यायनी सायुध चिंतूनियां ध्यानीं। मूर्तीमाजी आवाहूनी। मग पूजनीं प्रवर्तती ॥ ३४ ॥ आसनपाद्यार्घ्याचमन। पंचामृतशुद्धस्नान। प्रतिष्ठा[8]पन वसनभूषण। सौभाग्यमंडन अर्पिती ॥ ३५ ॥

---

**पाठभेद :—** ‡कदान्न ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † परीक्षिति ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ सज्जन. २ खळगा. ३ बुद्धि. ४ वृश्चिक राशीवर. ५ सूर्य. ६ मार्गशीर्ष मास. ७ सूर्यानें. ८ आसनावर बसविणें.

गंधैर्माल्यैः सुरभिभिर्बलिभिर्धूपदीपकैः । उच्चावचैश्चोपहारैः प्रवालफलतंडुलैः ॥ ३ ॥

हरिचंदन देवदारु । रक्तचंदन कृष्णागरु । कस्तूरी गोरोचन मलयागरु । आणि कर्पूर काश्मीर ॥ ३६ ॥ इत्यादि विशिष्टगंधें । समर्पिती भगवतीसि सिद्धें । तैसींच सुगंधें सुमनें विविधें । जीं प्रसिद्धें पूजनीं ॥ ३७ ॥ चंपक मोगरे सेवंती । जाती यूथिका मालती । बकुळ केतकी पंकजयाति । विविध अर्पिती अंबेतें ॥ ३८ ॥ अपामार्ग[1] मरु आम्र । दूर्वा दर्भ तुळशी ताम्र । शिरीप शमी परम नम्र । गायत्र्यादि प्रवाळ ॥ ३९ ॥ दशांगगुग्गुलतरुनिर्यासें[2]† । धूप अर्पिती अंबिकेस । साज्य[3]वर्तिकादि पोतास । एकार्तिदीप उजळिती ॥ ४० ॥ पायसघृताक्तपक्वान्नें । लाडू मोदक विविधौदनें[4] । मंडकें[5] शष्कुल्या चित्रान्नें । शाका लवणें पाचिता ॥ ४१ ॥ लेह्यपेयचोष्य खाद्य । भक्ष्यभोज्यादि बहुविध । अर्पिती अंबेतें नैवेद्य । पति गोविंद दे म्हणती ॥ ४२ ॥ मध्यें अर्पूनि अमृतपानें । कल्पिती उत्तरापोशनें । मुखकरपादप्रक्षालनें । करोद्वर्तनें[6] सुगंधें ॥ ४३ ॥ श्रीफळें[7] लकुच[8] नारीकेळें । जंबु बीजपूरें[9] रायांवळे । निंबें नारिंगें द्राक्षें केळें । आणि रसाळें फणसादि ॥ ४४ ॥ क्रमुकें[10] खर्जूर अंजिर । इक्षुदंड विचित्र मधुर । इत्यादि अर्पिती फलसंभार । कृष्ण भ्रतार इच्छूनी ॥ ४५ ॥ नागवल्ली सुपक्वदळें । क्रमुकखदिरचूर्णमेळें । एळा[11] लवंगा जातीफळें । कंकोळ कर्पूर जायपत्री ॥ ४६ ॥ त्वंज[12]मरीच नागर[13]युक्त । त्रयोदशपदार्थमंडित । तांबूल अर्पूनि नंदसुत । याचिती कांतदेवीतें ॥ ४७ ॥ यथाशक्ति हेमरत्नें । अनर्घ्यें महार्घ्यें सामान्यें । साङ्गतासिद्धि लक्षूनि मनें । विविध दक्षिणे वाहती ॥ ४८ ॥ विविध कर्पूरनीराजनीं । नीराजिती कात्यायनी । छत्रचामरनृत्यगायनीं । राजचिन्हीं तोषविती ॥ ४९ ॥ कुंकुमाक्त तंडुल करीं । दिव्यसुमनांच्या संभारीं । पुष्पांजलि अर्पूनि गौरी । वंदिती शिरीं पदकमळां ॥ ५० ॥ मग सारूनि प्रदक्षिणा । करिती मौनविसर्जना । शुद्धभावें पढती स्तवना । कुरुभूषणा तें ऐकें ॥ ५१ ॥

कात्यायनि महामाये महायोगिन्यधीश्वरि । नंदगोपसुतं देवि पतिं मे कुरु ते नमः ॥ ४ ॥

उभ्या राहुनि बद्धांजलि । दृष्टि ठेऊनि चरणकमळीं । मुखें पढती नामावळी । प्रेमकल्लोळीं जयघोषें ॥ ५२ ॥ जय जगदंबे कात्यायनी । महामाये जय भवानी । अघटितघटके जय योगिनी । अखिलजननी अधीश्वरी[14] ॥ ५३ ॥ स्तवनमिसें निजाभीष्ट । सूचित्या झाल्या ज्या तन्निष्ठ । तें तूं राया ऐकें प्रकट । गूढार्थ स्पष्ट येथींचा ॥ ५४ ॥ नंदगोपाचा जो कुमार । कात्यायनी तो देईं वर । देतां नमनीं तें दुष्कर । सिद्धि समग्र तुजपाशीं ॥ ५५ ॥ महामोहें मोही जन । मायालाघवें भुलवी कृष्ण । महामाये हें संबोधन । यालागून त्या स्तविती ॥ ५६ ॥ योगसिद्धीचिया बळें । योगी

**पाठभेदः**—* फुले ( मुंगीप्रत ) † निर्वास ( मुंगीप्रत ).

१ आघाडा. २ चीक. ३ तुपाच्या वाती. ४ तरतऱ्हेचे भात. ५ मांडे. ६ हातास सुवासिक गंधादि लावून धुणे. ७ बेलफळ. ८ ओटव. ( = ओटआंबा, गोमंतक व कर्नाटकमधील एक आंब्यासारखे झाड, हे फळ मसाल्यांत वापरतात. ) ९ महालुंग. १० सुपारी. ११ वेलदोडे. १२ दालचिनी व काळी मिरी. १३ सुंठ. १४ सर्वांमध्ये श्रेष्ठ.

टाकिती इच्छिलीं स्थळें । महायोगिनी वेल्हाळे । तेवीं गोपाळें सह रमवीं ॥ ५७ ॥ करणदेवता[1] सर्व शरीरीं । तूं तयांची अधीश्वरी । आमच्या मनोरथानुसारी । त्या मोहरीं[2] जगदंबे ॥ ५८ ॥ विश्वीं रहस्य आच्छादून । वश्य होऊनि वर्ते कृष्ण । व्रतें होईं सुप्रसन्न । अभीष्टवरदान हें वोपीं ॥ ५९ ॥ हेतुगर्भिता संबोधनीं । ऐशी स्तविली तिहीं भवानी । हें कळावें तुज म्हणोनी । प्रकट करूनी बोलिलों ॥ ६० ॥ मग बैसोनि पृथगासनीं । चित्तें एकाग्रें करूनी । मंत्र जपती मुकुलित नयनीं । जो हा व्याख्यानीं तुज कथिला ॥ ६१ ॥ महामाये कात्यायनी । अधीश्वरी महायोगिनी । नंदगोपसुतकामिनी । *भवानी तुज नमो ॥ ६२ ॥

इति मंत्रं समुच्चार्य पूजां चक्रुः कुमारिकाः । एवं मासं व्रतं चेरुः कुमार्यः कृष्णचेतसः ॥ ५ ॥

ऐसा मंत्र षोडशशतें । †जपती परमैकाग्रचित्तें । अर्पण करूनि जगदंबेतें । मग ध्यानातें विसर्जिती ॥ ६३ ॥ तीर्थप्रसाद पूजाशेष । घेऊनि आचरती व्रतास । कृष्णीं ठेऊनि मानसांस । पूर्णमास यथोक्त ॥ ६४ ॥

भद्रकालीं समानर्चुर्भूयान्नंदसुतः पतिः । उषस्युत्थाय गोत्रैः स्वैरन्योन्याबद्धबाहवः ॥ ६ ॥

एवं मास संपल्यावरी । महामहोत्साहगजरीं । भद्रकाली यथोपचारीं । अर्चित्या झाल्या सप्रेमें ॥ ६५ ॥ व्रतसाङ्गतेकारणें । भद्रकाली महदर्चनें । कुमारिकांहीं विशुद्धमनें । सप्रेमभजनें तोषविली ॥ ६६ ॥ नंदतनय व्हावा पति । परमाभीष्ट हें वांछिती । यथापूर्व यमुनेप्रति । स्नाना जाती अनुदिनीं ॥ ६७ ॥ उषःकाळीं अवघ्याजणी । शौचाचार संपादूनी । गोत्रें म्हणिजे नामग्रहणीं । पाचारूनि परस्परें ॥ ६८ ॥ परस्परें बाहु खांदा । घालुनि हर्षें चालती मुग्धा[3][4] । प्रेमें गाती परमानंदा । श्रीमुकुंदा कृष्णातें ॥ ६९ ॥

कृष्णमुच्चैर्जगुर्यान्त्यः कालिंद्यां स्नातुमन्वहम् । नद्यां कदाचिदागत्य तीरे निक्षिप्य पूर्ववत् ॥
वांसासि कृष्णं गायंत्यो विजह्रुः सलिले मुदा ॥ ७ ॥

श्याम[5] राजीवलोचन[6] । रूपरेखा ठाणमाण । वदनमूर्ती मनमोहन । गाती कृष्ण सप्रेमें ॥ ७० ॥ नंदयशोदेचा सुत । महदैश्वर्य रमाकांत । रूपलावण्यमन्मथतात । बुद्धिमंत सर्वज्ञ ॥ ७१ ॥ पंकजभवभवांचा[7] गुरु । अगाधगुणरत्नाकरु । अतुल अनुपम अपारु । सर्वांतर वेदक ॥ ७२ ॥ सुरभूसुरसुरभिगोप्ता । जो तोषद नंदादिआप्तां । तोचि आम्हां विरहतप्तां । निववूं प्राप्तां प्रपन्नां ॥ ७३ ॥ वामबाहु वामकर्ण । वक्रभृकुटि देहुडें ठाण । §चंचलांगुळीं वाजवी वेणु । गोपीमोहन गोविंद ॥ ७४ ॥ ऐशा गाती उच्चस्वरीं । गांधारादि निषादवरीं । पदोपदीं सप्रेमगजरीं । पंचमस्वरीं पिककंठ्या[8] ॥ ७५ ॥

---

**पाठभेदः—*** करी ( मुंगीप्रत ); करि ( उमरखेडप्रत ). † जपतां ( मुंगीप्रत ). § पंच ( मुंगीप्रत ).

१ इंद्रियांच्या देवता. २ मोह उत्पन्न कर. ३ थोडे झांकलेले. ४ तरुण स्त्रिया. ५ सुंदर नीलवर्णाचा. ६ कमलनयन. ७ ब्रह्मदेवाचा व शंकराचा. ८ कोकिलासारख्या मधुर स्वराच्या.

भूमीवरी न्यसितां पदें । नेणती हरिगुणगायनवेधें । यमुनास्नानार्थ अनुदिनीं छंदें । परमानंदें त्या जाती ॥ ७६ ॥ ऐशा संपूर्ण मासवरी । यमुनातीरीं पूजिती गौरी । जो गौरीचें अभ्यंतरीं । तो मुरारि तुष्टला ॥ ७७ ॥ लभते च ततः कामान् । गीते सप्तमाध्यायीं भगवान् । बोलिला तो भक्तिसंपन्न । गोपी देखोन तोषला ॥ ७८ ॥ कात्यायनीच्या पूजनें । अभीष्ट वांछिती गोपीमनें । तें द्यावया जगज्जीवनें । लीलाविंदान आदरिलें ॥ ७९ ॥ जो कोण्ही एक हरिवराचा* । दिवस उदेला सोनियाचा । जिये दिवशीं हरिकृपेचा । अमृतघन ओळला ॥ ८० ॥ तये दिवशीं यथापूर्व । शौचाचार सारूनि सर्व । घेऊनि सामग्री पूजनार्ह । जाती अपूर्व हरितोषा ॥ ८१ ॥ ऐशा व्रतस्था व्रजकुमारी । यथापूर्व यमुनातीरीं । वस्त्रें ठेऊनि जलांतरीं । हरिगुणगजरीं प्रवेशल्या ॥ ८२ ॥ श्रीकृष्णातें गाती वदनीं । कृष्णरूप पाहती नयनीं । कृष्ण रुचला ध्यानीं मनीं । वेधें कामिनी कृष्णमय ॥ ८३ ॥ श्रीकृष्णाची श्यामलतनु । तेचि भावूनि यमुनाजीवन । वेधें देती आलिंगन । म्हणती श्रीकृष्ण कवळिला ॥ ८४ ॥ जीवनीं बिंबलीं आपुलीं वदनें । कृष्णवेधें देती चुंबनें । सर्वेंद्रियें प्रांजळपणें । कृष्णार्पणें अर्पिती ॥ ८५ ॥ कृष्ण सांपडला एकांतीं । आतां स्वेच्छा भोगा रति । कायशी हरिविरहाची खंती । आम्हां श्रीपति तुष्टला ॥ ८६ ॥ कृष्णविलास विस्तीर्ण । म्हणोनि क्रमिती रविजीवन[१] । श्रीकृष्ण अगाध म्हणोन । होती निमग्न हरिरूपीं ॥ ८७ ॥ एकीपुढें एकी पळती । एकीमेकींतें आकळिती । तेणें छंदें हरिगुण गाती । सलिलीं विहरती स्वानंदें ॥ ८८ ॥

भगवांस्तदभिप्रेत्य कृष्णो योगेश्वरेश्वरः । वयस्यैरावृतस्तत्र गतस्तत्कर्मसिद्धये ॥ ८ ॥

भूत भविष्य वर्तमान । यांचे उदय अस्तमान । ज्यामाजीं तो श्रीभगवान । सर्वीं सर्वज्ञ सर्वगत ॥ ८९ ॥ सर्वांचिये हृदयदेशीं । नांदे §उभयप्रतीतीशीं । यालागीं जाणोनि भविष्यासी । अपयशासी अस्पृष्ट ॥ ९० ॥ कालानुरूप अर्थज्ञान । †हृसवृद्धींसी कारण । ज्याच्या प्रकाशें प्रकाशमान । श्रीसंपन्न कीं ना तो ॥ ९१ ॥ ज्याचे श्रीसि नाहीं हृास । तोचि आश्रय औदार्यास । ज्याचे ज्ञानीं याचा वास । तो उदास म्हणिजे ना ॥ ९२ ॥ भूत भविष्य वर्तमान । म्हणाल जाणती दैवज्ञ[३] । तरी तेचि म्हणावे सर्वज्ञ । हा अनुमान नाथिलों[४] ॥ ९३ ॥ दैवज्ञ जीवकर्मतंत्र । त्यांवरी कर्माचा बलात्कार । यालागीं ऐश्वर्यें ईश्वर । कृष्ण स्वतंत्र भगवान ॥ ९४ ॥ म्हणोनि जाणे सर्वांतर । साङ्ग असाङ्ग प्रकार । कुमारींचा व्रताचार । साङ्ग अच्छिद्र जाणोनी ॥ ९५ ॥ त्यांच्या कर्माची फलसिद्धि । अर्पावया कृपानिधि । लीलाविनोदें योजी बुद्धि । मन्मथआधिशमनार्थ[५] ॥ ९६ ॥ यमुनाजळीं वस्त्ररहिता । कृष्णप्रेमें गोपी निरता । सवंगडियांशीं रमाभर्ता । झाला येता ते ठायीं ॥ ९७ ॥ योगी नाना योगाभ्यासीं । श्रमोनि पावती सिद्धीसी । ज्यापासूनि तो हृषीकेशी । ऐश्वर्येंशीं योगीश ॥ ९८ ॥ गोपकुमारीं बहुताजनीं । कृष्णैकांत वांछिती मनीं । त्यांची पुरवावया

**पाठभेद :**—* हरिवरदाचा ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). § हृदय ( मुंगीप्रत ). † ऱ्हास ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). हाच पाठ बरोबर असून छापील प्रतींतील 'हृस' हा हस्तदोष वाटतो.

१ लीलेची युक्ति. २ यमुनाजळ. ३ ज्योतिषी. ४ नाहींसा केला. ५ कामाची बाधा शमन करण्यासाठीं.

आर्यणी । जो बहुपर्णी हों जाणे ॥ ९९ ॥ हें तों रासक्रीडाकाळीं । प्रकट दावील श्रीवनमाळी । सूचनार्थ नृपाजवळी । शुक ये वेळीं बोलिला ॥ १०० ॥

तासां वासांस्युपादाय नीपमारुह्य सत्वरः । हसद्भिः प्रहसन् बालैः परिहासमुवाच ह ॥ ९ ॥

कृष्णप्रेमें जलांतरीं । गोपी क्रीडतां स्वानंदगजरीं । वस्त्रें घेऊनि कदंबावरी । वेंघे मुरारि सवेग ॥ १ ॥ देखोनि कृष्णाचें लाघव । कौतुकें हांसती गोप सर्व । तयांसहित वासुदेव । हास्य करीत होत्साता ॥ २ ॥ गोपकुमारींशीं विनोदवचन । हांसोनि बोले मधुसूदन । शब्दलाघवें मनमोहन । वेधी तनुमन अबलांचें ॥ ३ ॥

अत्रागत्याबलाः कामं स्वं स्वं वासः प्रगृह्यताम् । सत्यं ब्रवाणि नो नर्म यद्यूयं व्रतकर्शिताः ॥ १० ॥

सस्मित वदनें जगज्जीवन । म्हणे अबला हो ऐका वचन । सहसा नव्हे प्रतारण[२] । न मना गौण उपहास ॥ ४ ॥ तुम्ही व्रतस्था तपस्विनी । श्रांता[३] व्रतनियमेंकरूनी । यालागीं यथार्थ माझी वाणी । उपहास म्हणोनि न गणावी ॥ १०५ ॥ वयें धाकुटीं हांव मोठी । काय कामना असे पोटीं । ते सफळ माझिये दृष्टीं । बांधा गांठी शकुनाची ॥ ६ ॥ आंगीं असोनि बाल्यावस्था । झालां दृढनियमें व्रतस्था । एकभक्ता शीतार्दिता[४] । अतिश्रमिता चिरकाळ ॥ ७ ॥ यालागीं विनोद सहसा न करीं । सत्य मानूनि मम वैखरी । अवघ्याजणी या बाहेरी । शंका दुरी ठेऊनी ॥ ८ ॥ आपुलालीं यथासुखें । वस्त्रें घ्या हो निजहस्तकें । प्रत्ययार्थ प्रांजळमुखें । पुढतीं कौतुकें हरि बोले ॥ ९ ॥

न मयोदितपूर्वं वा अनृतं तदिमे विदुः । एकैकशः प्रतीच्छध्वं सहैवोत सुमध्यमाः ॥ ११ ॥

जें पूर्वींच वेदोदितें[५] । माझें बोलणें नाहीं अनृत । देवांश हे गोप समस्त । इत्थंभूत जाणती ॥ ११० ॥ प्रमादें अज्ञानें एकांतीं । घडल्या पातकाच्या निवृत्ति । ऐकोनि सर्वज्ञाची उक्ति । प्रायश्चित्तीं प्रवर्तिजे ॥ ११ ॥ श्रुति स्मृति सर्वज्ञोक्ति । दोषादोषांची व्यावृत्ति । विवरूनि जें जें निरूपिती । तें यथार्थ चित्तीं मानूनी ॥ १२ ॥ निःशंक होऊनि अनुष्ठितां । निरसे कर्मवैगुण्यता । यालागीं तुमची व्रतसाङ्गता । अच्छिद्र तत्त्वता मम वाक्यें ॥ १३ ॥ रहसि प्रमादीं दुष्कृत । त्यासी प्रकट प्रायश्चित्त । तें हें जाणोनि प्रेमोदित । तुम्ही समस्त अनुष्ठा ॥ १४ ॥ देहबुद्धीची शंका दुरी । सांडूनि अवघ्या या बाहेरी । तेव्हां तुमचीं व्रतें खरीं । स्वेच्छा स्वकरीं घ्या वस्त्रें ॥ ११५ ॥ एकी एकी पृथक् पृथाका । येऊनि वस्त्रें घ्या निःशंका । अथवा अवघ्या होऊनि एका । स्वेच्छा अंशुका[६] स्वीकरा ॥ १६ ॥ यदर्थीं *आग्रह न करूं आम्ही । व्रतसाङ्गता लक्षूनि तुम्हीं । माझे आज्ञेचिया

**पाठभेदः—** * अग्रह ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ इच्छा. २ फसवणें. ३ श्रमलेल्या. ४ थंडीनें कांकडलेल्या. ५ वेदानें सांगितलेलें. ६ वस्त्र.

नेमीं । मनोधर्मीं दृढ व्हावें ॥ १७ ॥ मध्यभाग सुष्ठु म्हणोन । सुष्ठु देखोनि सर्वाचरण । सुमध्यमा हें संबोधन । करी सर्वज्ञ गोविंद ॥ १८ ॥

तस्य तत्क्ष्वेलितं दृष्ट्वा गोप्य: प्रेमपरिप्लुता: । व्रीडिता: प्रेक्ष्य चान्योन्यं जातहासा न निर्ययु: ॥ १२ ॥

जेवीं नृपाचें दर्शन । दुर्लभ इच्छिती सामान्य जन । तेणें सप्रेमें लालन । करितां तनुमन आह्लादे ॥ १९ ॥ तेंवि गोपिका कृष्णकामा । ब्रह्मांडपाळका मेघश्यामा । देखोनि त्याच्या विनोदकर्मा । मनोधर्मा भूलल्या ॥ १२० ॥ भगवत्कृपेच्या प्रेमरसें । निमग्न होत्सात्या निजमानसें । बाह्य स्त्रीजात्या लज्जावशें । म्हणती कैसें करावें ॥ २१ ॥ श्रीकृष्णाच्या विनोदवचनें । आनंदनिर्भर झाल्या मनें । सलज्ज पाहती अन्योन्यवदनें । जगज्जीवनें वेधिल्या ॥ २२ ॥ उपहासिल्या विनोद-वचनीं । तेणें शंका पावल्या मनीं । बाहिर न निघती लाजोनी । यमुनाजीवनीं बैसल्या ॥ २३ ॥

एवं ब्रुवति गोविंदे नर्मणा क्षिप्तचेतस: । आकंठमग्ना: शीतोदे वेपमानास्तमब्रुवन् ॥ १३ ॥

ऐसें बोलत असतां हरि । विनोदें लज्जिता अभ्यंतरीं । आकंठमग्ना जलांतरीं । सहसा बाहेरी न निघती ॥ २४ ॥ तंव तें हेमंतकाळींचें शीत । विशेष अनुदित प्रभात । सूर्योदयीं मंदवात । तेणें शीतार्त गोपिका ॥ १२५ ॥ थरथरां कांपती शरीरें । खडखडां वाजती दांतारें । मग कृष्णातें आर्तस्वरें । मधुरोत्तरें प्रार्थिती ॥ २६ ॥

स्त्रिय ऊचु — माऽनयं भो: कृथास्त्वां तु नंदगोपसुतं प्रियम् ।
जानीमोंऽग व्रजश्लाघ्यं देहि वासांसि वेपिता: ॥ १४ ॥

भो: श्रीकृष्ण ऐसें म्हणती । अंग म्हणोनि संबोधिती । बद्धांजलि संप्रार्थिती । तें भूपते अवधारीं ॥ २७ ॥ नंदनंदना तूंतें आम्ही । श्लाघ्य जाणों कीं व्रजस्वामी । ह्मणें ऐशिये अन्यायकर्मीं । मनोधर्मीं न प्रवर्ते ॥ २८ ॥ नंदादि आम्ही व्रजनिवासी । आम्हां प्रिय तूं हृषीकेशी । म्हणोनि ऐशिये अन्यायासी । तुवां मानसीं न धरावें ॥ २९ ॥ व्रजपतीचा तूं नंदन । तुवां करावें व्रजपालन । तेणें करूनि श्लाघ्यपण । करितां छलन अन्याय ॥ १३० ॥ तस्करीं कीजे वस्त्राहरण । नृपें करावें त्यांचें दमन । करूनि दुःखाचें उपशमन । *व्रजपालन सुखदानें ॥ ३१ ॥ तो तूं हरूनि आमुच्या चीरा । अनयसंमत[3] होऊनि चोरां । शीतार्दितां दुःखपरां । पाहणें श्रीधरा उचित कीं ॥ ३२ ॥ येणें श्लाघ्यत्व न राहे । म्हणोनि न करीं हा अन्याय । आतां आमुतें सुखद होय । कृपेनें पाहें निजपोष्यां[4] ॥ ३३ ॥ शीतें कांपतसों थरथरां । शंका जाकळी मंदवारा । वस्त्रें देईं करुणाकरा ।

पाठभेद:— * प्रजापालन (मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ सुंदर कटिभाग ज्यांचा. २ न उगवलेली. ३ अन्याय ज्यास मान्य होतो असा. ४ आपल्या आश्रितांस.

ऐशा सुंदरा विनविती ॥ ३४ ॥ अस्पृष्टयौवना मुग्धा नारी । तिहीं विनविला ऐसा हरि । आतां प्रौढा ज्या गोपकुमारी । त्यांची वैखरी अवधारा ॥ १३५ ॥

श्यामसुंदर ते दास्यः करवाम तवोदितम् । देहि वासांसि धर्मज्ञ नोचेद्राज्ञे ब्रुवामहे ॥ १५ ॥

प्रौढा म्हणती दामोदरा । श्यामसुंदर मनोहरा । आम्ही किंकरी आज्ञाधारा । जाणोनि करा आज्ञेतें ॥ ३६ ॥ तुझी आज्ञा वंदूनि शिरीं । सत्य मानीं हे वैखरी । आमुचीं वस्त्रें देईं हरि । धर्म विचारीं धर्मज्ञा ॥ ३७ ॥ आम्हां स्त्रीजातीचें जिणें । लोकीं अश्लाघ्य वस्त्रांविणें । तूं जाणसी सर्वज्ञपणें । काय सांगणें तुज आम्हीं ॥ ३८ ॥ तुजसारिखा धर्मवेत्ता । आणिक न देखों तत्त्वता । स्वधर्माचा* परिज्ञाता । कीं नेणसी वृत्तांता आमुचिया ॥ ३९ ॥ याहीवरी करिसी रैळी । वस्त्रें न देतां वनमाळी । आम्ही सांगों रायाजवळी । वाढेल कलि तैं थोर ॥ १४० ॥ ऐसें ऐकिल्या नंदरायें । तेव्हां तुझें महत्त्व काय । विशेष कंसाचेंही भय । झणें हें होय त्या विदित ॥ ४१ ॥ एवं ऐकोनि गोपीवचना । षड्गुणैश्वर्याचा राणा । वेधी तयांच्या अंतःकरणा । धर्माचरणा बोधूनी ॥ ४२ ॥

श्रीभगवान् उवाच — भवत्यो यदि मे दास्यो मयोक्तं वा करिष्यथ ।
अत्राऽऽगत्य स्ववासांसि प्रतीच्छन्तु शुचिस्मिताः ॥ १६ ॥

हांसोनि बोले मधुसूदन । तुम्ही दासी हें सत्य वचन । तरी माझी आज्ञा अभिवंदून । एथें आगमन करावें ॥ ४३ ॥ लब्धानंदें हास्यवदनें । स्वेच्छा घ्यावीं आपुलीं वसनें । शंका सांडूनि प्रशस्तमनें । आज्ञा करणें हे माझी ॥ ४४ ॥

ततो जलाशयात्सर्वा दारिकाः शीतवेपिताः । पाणिभ्यां योनिमाच्छाद्य प्रोत्तेरुः शीतकर्शिताः ॥ १७ ॥

ऐसें ऐकोनि कृष्णवचन । थरथरां कांपती शीतेंकरून । निघाल्या जलाशयापासून । †आंग झांकुनि करयुग्मीं ॥ १४५ ॥ प्रबळ शीताची न सोसवे पीडा । यास्तव सांडूनि तिहीं व्रीडा । आज्ञापालनीं झाल्या दृढा । आल्या झडझडां हरीपाशीं ॥ ४६ ॥

भगवानाह ता वीक्ष्य शुद्धभावप्रसादितः । स्कंधे निधाय वासांसि प्रीतः प्रोवाच सस्मितम् ॥ १८ ॥

ईषणारहित वसनाविणें । हर्याज्ञेतें निःशंकपणें । अनुसरल्या हें जगज्जीवनें । अंतःकरणें ओळखिलें ॥ ४७ ॥ श्रीकृष्णाज्ञा वंदूनि शिरीं । लोकलज्जा सांडूनि दुरी । शुद्धभावें जळाबाहेरी ।

**पाठभेदः**—* सर्व ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † योनि ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).
१ आग्रह. २ प्रसन्न करण्याविषयीं इच्छा.

गोपकुमारी पातल्या ॥ ४८ ॥ ऐसा आज्ञेसि देऊनि मान । शुद्धभावें श्रीभगवान । केला होत्साता प्रसन्न । परमामृतघन ओळला ॥ ४९ ॥ भगवत्प्राप्तीचीं कारणें । योनि ऐसें तयासि म्हणणें । अच्छिद्र गोपींचीं कृतपुण्यें । पाहोनि कृष्ण तोषला ॥ १५० ॥ गोपिकांचीं *अंगद्वारें । अक्षत देखोनि जगदीश्वरें । तोष मानिला हें व्यासकुमारें । कथिलें म्हणतां न लाजिजे ॥ ५१ ॥ ह्मणें हें वाखाणिती अल्पज्ञ । म्हणोनि श्रीशुक परम सुज्ञ । ज्ञानवैराग्यादिगुण । श्लोकीं भगवान पदें †वदला ॥ ५२ ॥ त्रैलोक्यींचा त्रैकालिक । द्रष्टा सर्वज्ञ यदुनायक । कीं नग्न ‡अंग पाहोनि सम्यक । अक्षतविवेक त्या कळला ॥ ५३ ॥ ज्ञानैश्वर्यसंपन्न । आणि नग्न ¶अंग विलोकून । अक्षत जाणें हें म्हणतां वदन । कुष्टी होऊनि झडेना ॥ ५४ ॥ अन्यकामनारहितमनें । स्वपर गोपींचीं व्रताचरणें । स्कंधीं ठेवूनि गोपीवसनें । हास्यवदनें बोलत ॥ १५५ ॥

यूयं विवस्त्रा यदपो धृतव्रता व्यगाहतैतत्तदु देवहेलनम् ।
बद्ध्वांजलिं मूर्ध्न्यपनुत्तयेऽंहसः कृत्वा नमोऽधोवसनं प्रगृह्यताम् ॥ १९ ॥

तुम्ही सकामा व्रतधारिणी । परंतु विवस्त्रा स्नानाचरणीं । प्रवर्तलां देवहेळणीं[1] । पापकरणी हे तुमची ॥ ५६ ॥ व्रतोंदेष्टा[2] आदिपुरुष । साङ्ग असाङ्ग विदित त्यास । तो फलदाता श्रीपरेश । नेदी फळास हेळितां ॥ ५७ ॥ लोभें अज्ञानें क्लेशभयें । प्रमादें जें न्यून होय । तोचि देवांचा परमान्याय । वृथा जाय तें कर्म ॥ ५८ ॥ तुम्हीं नग्न केलें स्नान । तेणें घडलें देवहेलन । तदर्थ प्रायश्चित्ताचरण । करा संपूर्ण मद्वाक्यें ॥ ५९ ॥ तेंही प्रायश्चित्त सोपें । निरसी देवावज्ञापापें । व्रतसाङ्गता सफळरूपें । मद्वाक्यदीपें वर्ततां ॥ १६० ॥ मूर्ध्नींवरी बद्धांजलि । §करूनि नमितां कदंबातळीं । व्रतवैगुण्य[3] होय होळी । सफळितफळीं व्रतसिद्धि ॥ ६१ ॥ ऊर्ध्वहस्तें बद्धांजलि । नमन करूनि कदंबातळीं । आपुलीं वसनें घ्या हो सकळी । म्हणे वनमाळी सस्मित ॥ ६२ ॥ ऐसें बोलतां मधुसूदन । गोपी सकंपा रहितवसन । व्रतवैगुण्यनिरसन । अलोट[4] आज्ञा मानिती ॥ ६३ ॥

इत्यच्युतेनाभिहितं व्रजाबला मत्वा विवस्त्राप्लवनं व्रतच्युतिम् ।
तत्पूर्तिकामास्तदशेषकर्मणां साक्षात्कृतं नेमुरवद्यमृग्यतः ॥ २० ॥

अच्युताचें अच्युतवचन । व्रजअबळांहीं ऐकोनि पूर्ण । नग्नस्नानें व्रतवैगुण्य । सत्य मानूनि शंकल्या ॥ ६४ ॥ तया व्रतादि अशेषकर्मा । माजीं जोडल्या अनेक जन्मा । तया सद्गुणपूर्तिकामा ।

पाठभेदः—* मूत्र (मुंगीप्रत व उमरखेडप्रत). † पढला (मुंगीप्रत व उमरखेडप्रत). ‡ योनि (मुंगीप्रत व उमरखेडप्रत). ¶ योनि (मुंगीप्रत व उमरखेडप्रत). § ६० व ६१ या ओवींबद्दल मुंगीप्रतींत या ओव्या आहेत. आपुली वस्त्रे ध्या हो सकळी । मूर्ध्नींवरी बद्धांजली । नमन करूनि कदंबातळीं ॥ म्हणे वनमाळी सस्मित ॥ ५९ ॥ ऊर्ध्वहस्तें बद्धांजलि नमन करूनि कदंबातळीं । वृत्त गौण्य होय होळी । सफळीत फळी सफळीत ॥ १६० ॥

१ देवाचा अपमान. २ व्रताचा उपदेशक. ३ व्रतांतील दोष. ४ अलंध्य.

पुरुषोत्तमा वंदिती ॥ १६५ ॥ अशेषसत्कर्मांचें फळ । †तो हा श्रीकृष्ण प्रणतपाळ । वैगुण्यमार्जक[1] केवळ । नमिती तत्काळ फलदाता ॥ ६६ ॥ यज्ञादिकें कर्माचरणें । प्रमादें घडलीं अंगहीनें । साङ्ग होती ज्याच्या स्मरणें । याकारणें पापमृक्[2] ॥ ६७ ॥

तास्तथाऽवनता दृष्ट्वा भगवान्देवकीसुतः । वासांसि ताभ्यः प्रायच्छत् करुणस्तेन तोषितः ॥ २१ ॥

जो कां देवकीचा सुत । भगवान् षड्गुणैश्वर्यवंत । गोपी देखोनि नम्र ‡बहुत । तोष पावत तत्कर्में ॥ ६८ ॥ जो कां केवळ करुणामूर्ति । तैशा प्रकारें गोपीप्रणति । देखोनि संतोष पावला चित्तीं । वस्त्रें त्यांप्रति अर्पिलीं ॥ ६९ ॥

दृढं प्रलब्धास्त्रपया च हापिताः प्रस्तोभिताः क्रीडनवच्च कारिताः ।
वस्त्राणि चैवापहृतान्यथाप्यमुं तानाभ्यसूयन्प्रियसंगानिर्वृताः ॥ २२ ॥

भुवन जीवन कांचन । परीक्षौच्छलना[3] करितां सहन । गोपींसहीत भगवज्जन । वंद्य पावन हरितोष ॥ १७० ॥ सच्छिष्य कां पतिव्रता । नानाछळणीं परीक्षितां । शुद्धभावें सहन करितां । स्वामी भर्ता प्रिय होय ॥ ७१ ॥ कुळव नांगर फणी[4] तिफणी । भूमि छळितां नानाखननीं । अनेक अपराध न गणी मनीं । अक्षोभपणीं सुशांत ॥ ७२ ॥ लत्ताप्रहारें तुडविताती । मलमूत्रादि निक्षेपिती । घट मठ दुर्गें करिती । तरी अक्षुब्ध क्षिति[5] शुद्धत्वें ॥ ७३ ॥ तिचें जाणोनि अभ्यंतर । धरी अर्धांगीं कमलावर । धरारक्षणीं धराधरें[6] । धरी अवतार अघटित ॥ ७४ ॥ तेवींच विशुद्ध जाणिजे आपा । क्षालिती जगाच्या पापतापा । विश्वजीवनीं अनुकंपा । छलनत्रपा[7] त्यागूनी ॥ १७५ ॥ नाना ^मळीं करिती समळ । माजी टाकिती अमंगळ । प्रक्षाळिती नाना विटाळ । परी तें निर्मळ सबाह्य ॥ ७६ ॥ यालागीं आपोनारायण । म्हणवी सर्वांगें आपण । जल सबाह्य नांदे पूर्ण । करूनि सदन स्वानंदें ॥ ७७ ॥ वरकलावरी[8] लाविती कसीं । तावितां[9] तोडूनि कानसीं । नाना परीचे परीक्षेसी । परीक्षकांहीं छळितां ही ॥ ७८ ॥ तुच्छ फुटकी कांचवटी । तयेसमान तुळितां सृष्टीं । तरी विषाद न मनीं पोटीं । पूर्ण दृष्टि निजतेजें ॥ ७९ ॥ गुंजेसमान जरी केलें । जतुकासंगीं[10] नियोजिलें । नीचप्रसंगें हिनावलें । गौरव आपुलें न संडी ॥ १८० ॥ जों जों जाळूनि घालिती पुटीं । तों तों शुद्धता धरी मोठी । यालागीं देवोत्तमामुकुटीं । श्रवणीं कंठीं मिरवतसे ॥ ८१ ॥ जरी विशुद्ध झालें रत्न । तरी तें एकदेशी गौण । नेणे कांचनासमान । न्यून पूर्ण संपादूं ॥ ८२ ॥ घनाचे घायही साहूनी । प्रवर्ते पुढिलांचे कल्याणीं । ऐसी सुशांति सुवर्णीं । म्हणोनि जनीं प्रिय झालें ॥ ८३ ॥ तैसाचि चंदन निज सुवासें । वेधी सर्पांचीं मानसें । परंतु त्यांच्या कृतघ्नदोषें । लिप्त नोहे

पाठभेदः— † होता ( मुंगीप्रत ). ‡ भूत. ^ मठी ( मुंगीप्रत ).

१ दोषक्षालन करणारा. २ पापक्षालन करणारा. ३ परीक्षाछल केला असतां. ४ वरील आउताचा एक दांत. ५ पृथ्वी. ६ शेष. ७ छलाची लाज. ८ कसोटीवर. ( कानडी—‘ओरेकल’ ). ९ तापवतात. १० लाख.

कदापि ॥ ८४ ॥ नीचकाष्ठें आपुल्या पाडें । पालटूनियां गर्वा न चढे । शस्त्रीं खंडूनि करिती खोडें । तरी न मोडे सौरभ्य ॥ १८५ ॥ क्रूरपाषाणीं झिजविती । पाणियापरी पातळ करिती । तऱ्ही तयांची तापनिवृत्ति । करूनि विश्रांति देतसे ॥ ८६ ॥ यालागीं नरपति सुरपति । प्रेमें ललाटीं चर्चिती । पूज्य पावन परम भक्ती । वंद्य त्रिजगतीं चंदन ॥ ८७ ॥ तैसेंच दुर्जनीं करितां छलन । अथवा विपत्ति त्रितापैजन्य । सज्जन समत्वें करिती सहन । धन्य पावन हरि तोषें ॥ ८८ ॥ सद्गुरुदास्य सच्छिष्यासी । समीं विषमीं दुर्घट क्लेशीं । नाना त्रासीं कां उपहासीं । शुद्धभावेंशीं गुरुतुष्टि ॥ ८९ ॥ तैसीच जाणा पतिव्रता । अनन्यभावें भजे भर्ता । त्याचें वैगुण्य न मनी चित्ता । ते उभयतां कुळ तारी ॥ १९० ॥ इत्यादि कसितां उतरलीं कसीं । म्हणोनि अैहे दृष्टांतासी । एथ तैसीच गोपिकांसी । कृष्णप्राप्तीसी योग्यता ॥ ९१ ॥ कृष्णें छळितां नानापरी । गोपी विशुद्ध अभ्यंतरीं । जेणें तुष्टला श्रीहरि । तें छलन अवधारीं कुरुवर्या ॥ ९२ ॥ कृष्णप्राप्तीसि करितां यत्न । ईषणादिकीं जें असहिष्ण । दैवी मानुषी विविध छलन । साहिल्यावीण फल कैंचें ॥ ९३ ॥ दृढ म्हणिजे अतिशयेंशीं । कृष्णें छळितां गोपिकांसी । परी साहती उत्साहेंशीं । प्रेम मानसीं निःसीम ॥ ९४ ॥ जें जें सकाम अनुष्ठान । तेथें अवश्य होय छलन । सहिष्णु पावे फळ संपूर्ण । कीं असहिष्णें *वैकल्यें ॥ १९५ ॥ परम सलज्ज स्त्रियांची जाति । लज्जेसाठीं प्राण देती । गोपींसी स्वमुखें श्रीपति । विवस्त्रस्मृति अर्पूनी ॥ ९६ ॥ तुम्हीं नग्न केलीं स्नानें । म्हणोनि सलज्जा केल्या स्मरणें । एथें येऊनि वस्त्रें घेणें । आग्रहें येणें कोंडिल्या ॥ ९७ ॥ तेणें उत्साहित मनीं । सांडवल्या पैं लज्जेंकरूनी । असत्य नोहे माझी वाणी । व्रतविधानीं उपहासिल्या ॥ ९८ ॥ गोपाळ जाणती म्हणोन । दिधलें साक्षिबाहुल्यस्मरण । नग्न येऊनि वसनग्रहण । शंका सांडूनि करवी त्यां ॥ ९९ ॥ आल्या जाणोनि कदंबातळीं । मस्तकीं ठेवूनि बद्धांजलि । प्रायश्चित्ताचेनि छळीं । त्यां वनमाळी उपहासी ॥ २०० ॥ ऐशा छळिल्या नाना परी । लज्जा सांडविली दुरी । प्रस्तोभिल्या विनोद-गजरीं । उपहासोत्तरीं नाचविल्या ॥ १ ॥ तरी गोपिका वाडेंकोडें । दोष न लाविती कृष्णाकडे । अभीष्ट मानूनि रोकडें । प्रेम गाढें हरिचरणीं ॥ २ ॥ कांहीं आमुचा अपराध नसतां । वस्त्रें हरिलीं कां नंदसुता । ऐशी न करिती विरोधवार्ता । आनंदभरिता हरिसंगें ॥ ३ ॥ जैशी प्रथमगर्भिणी नारी । क्लेश साहे नानापरी । परमसंतुष्ट अंतरीं । प्रसूतिगजरीं पुत्रफळें ॥ ४ ॥ तैशा गोपी अभीष्टसुख । पावल्या म्हणोनि छळणें हरिख । तें वाखाणी वक्ता शुक । तो हा श्लोक परिसावा ॥ २०५ ॥

परिधाय स्ववासांसि प्रेष्ठसंगमसज्जिताः । गृहीतचित्ता नो चेलुस्तस्मिँल्लज्जायितेक्षणाः ॥ २३ ॥

परमानंदें निर्भरचित्ता । अनुसरोनि कृष्णानुमता । घेऊनि स्ववसनें समस्ता । परिधान

पाठभेदः— * कैवल्यें ( मुंगीप्रत ).

१ मुवास. २ आध्यात्मिक, आधिभौतिक, आधिदैविक. ३ योग्य. ४ उपहास केल्या गेलेल्या.

करित्या जाहल्या ॥ ६ ॥ वस्त्रें नेसूनि गोपकुमरी । परमप्रियतम पाहती हरि । कृष्णवेधें अभ्यंतरीं । गोष्टी दुसरी स्मरेना ॥ ७ ॥ लोह वेधे अयस्कांतीं[1] । कीं पारदा मोही कृत्रिमयुवति[2] । तेवीं स्ववेधें श्रीपति । वेधी निश्चितीं व्रजकुमारी ॥ ८ ॥ एवं प्रेष्ठसंगममात्रें[3] । निश्चेष्ट जालीं गोपीगात्रें । अचेतन चळती सूत्रें । दारुयंत्रें §परवशें ॥ ९ ॥ जैशा प्रियसंगमें करूनी । गोपी केल्या वशवर्तिनी । चित्तें घेतलीं हिरोनी । यालागुनी न चळती ॥ २१० ॥ हरीनें हिरोनि नेलीं मनें । यालागीं विषय-परिज्ञानें । *रहित सबाह्य सर्वकरणें । विवर्तभानें सांडवलीं ॥ ११ ॥ कृष्णीं मात्र एकाग्र झाल्या । बाह्यप्रपंचा मूकल्या । सलज्जदृष्टी घनसांवळा । पाहती डोळां सप्रेमें ॥ १२ ॥ बाह्यप्रपंचा लोप झाला । स्वरूपानंदही फावला । असामरस्यें भेद †उरला । तेणें लाजला वधूनिचय[4] ॥ १३ ॥ विराम आराम कषाय[5] भेद । ईदंत्वादि[6] रसास्वाद । लय[7] विक्षेप[8] पृथगानंद । इहीं स्त्रीवृंद सलज्ज ॥ १४ ॥ पुढें पाहूं न कळे हरि । प्रपंचा मिथ्यात्वें बाहेरी । ऐसिये अवस्थेमाझारी । गोपकुमारी सलज्जा ॥ २१५ ॥ सप्रेमकटाक्षबाणसुटी । प्रेष्ठोपलब्धि हातबोटीं । श्रोत्रीं नेत्रीं न फवे गोठी । तेणें हिंपुटी[9] सत्रपा[10] ॥ १६ ॥ साधनयुक्ति याहूनि पुढें । पूर्वाराधनावीण न चढे । व्रत सुकृत विशुद्ध गाढें । तेणें निर्वाडें[11] सुखलब्धि ॥ १७ ॥ जेथवरी शिडियेच्या पायऱ्या असती । चढणारातें तोंवरी गति । ऊर्ध्वगवाक्षें[12] वरिला हातीं । ओढूनि घेती तै वळघे ॥ १८ ॥ तेवीं होतां स्वरूपावबोध । सहज प्रपंचा होय बाध । चिन्मात्रैकरसास्वाद । सूक्ष्मभेद हा नसे ॥ १९ ॥ एथ पूर्वील सद्गुरुभजन । विशुद्ध उपास्याराधन । निष्काम सविराग कर्माचरण । तों तें क्षीण तत्पुण्यें ॥ २२० ॥ भूपतीचा बाळमित्र । वियोगें झाला विपत्तिपात्र‡ । पुन्हा सुकृप नृपाचे नेत्र । करिती स्वीकार आप्तत्वें ॥ २१ ॥ तैंचि त्याची विपत्ति टळे । येऱ्हवीं श्रमोनि भूपाजवळें । गेलिया त्याचे अनोळख डोळे । तो नाकळे तन्मयता ॥ २२ ॥ तैशी जाणोनि प्रेष्ठप्राप्ति । परंतु दुर्लभ संगावाप्ति । सलज्ज अचळा गोपयुवति । हें जाणे श्रीपति सर्वज्ञ ॥ २३ ॥

तासां विज्ञाय भगवान् स्वपादस्पर्शकाम्यया । धृतव्रतानां संकल्पमाह दामोदरोऽबलाः ॥ २४ ॥

गोपिकांची पूर्वस्मृति । कीं या निगमोत्तमांगश्रुति[13] । ब्रह्मवरदें निर्जरयुवति । इये भागवतीं प्रसिद्ध ॥ २४ ॥ अनंतकल्पें विरक्त यति । क्षमार्जवेंशीं तपःसंपत्ति । निष्काम सप्रेम भगवद्भक्ति । चित्सुखप्राप्ति अभिलाषें ॥ २२५ ॥ त्या या गोपिका व्रतधारिणी । मदंघ्रिस्पर्शकामनेकरूनी[14] । त्यांचा दृढ संकल्प मनीं । पूर्णज्ञानी हरि जाणे ॥ २६ ॥ षड्गुणैश्वर्यसंपन्न । अबाधित त्रिकालज्ञ ।

पाठभेद :— §उपशमानि, ( मुंगीप्रत ); परवसें ( उमरखेडप्रत ). * हरिहित ( मुंगीप्रत ). † नुरला ( मुंगीप्रत ). ‡ पंक्ति ( मुंगीप्रत ).

१ लोहचुंबकाला. २ मोहिनीचें रूप पाहून शंकर मोहित झाला, त्या वेळीं त्याचें वीर्य पतन पावलें, तोच पारा होय. तो पारा स्त्रीदर्शनानें चंचल होतो अशी कथा आहे. ३ अत्यंत प्रिय जो कृष्ण त्याचा समागम. ४ स्त्रीसमूह. ५ प्रपंचासक्ति. ६ हें ( वस्तु ) पणा. ७ मोह अ० निद्रा यांतील अज्ञान. ८ स्वप्न अ० जागृति यांतील ज्ञान. ९ खिन्न. १० सलज्ज. ११ निश्चयें. १२ खिडकी. १३ वेदांचें उत्तमांग वेदान्त, त्यांतील वचनें. १४ माझ्या चरणस्पर्शाच्या इच्छेनें.

यालागीं तो श्रीभगवान। संकल्प जाणोन गोपींचा ॥ २७॥ दांम बांधिलें असतां उपरीं। गुह्यकांतें जो उद्धरी। भक्तवत्सल तो श्रीहरि। सदय अंतरीं गोपींतें॥ २८॥ म्हणे आह्लादें दामोदर। तुमचा संकल्प जो मत्पर। मदर्चनातें अभ्यंतर। वांछी साचार सुभगांहो ॥ २९ ॥

श्रीभगवान् उवाच :— संकल्पो विदितः साध्व्यो भवतीनां मदर्चनम्।
मयाऽनुमोदितः सोऽसौ सत्यो भवितुमर्हति ॥ २५ ॥

चिरकाळ तुम्हीं जो संकल्प केला। तोही म्यांचि अनुमोदिला। सत्य होऊं शके भला। विश्वास धरिला पाहिजे ॥ २३० ॥

न मय्यावेशितधियां कामः कामाय कल्पते। भर्जिता क्वथिता धाना प्रायो बीजाय नेष्यते ॥ २६ ॥

तुम्हीच पूर्वीं माझ्या ठायीं। मनोबुद्धि होऊनि पाहीं। मत्प्राप्तिकामनाप्रवाहीं। क्रिया सर्वही आचरलां ॥ ३१ ॥ जेव्हां मत्पर झाला काम। तेव्हांच खंडले पुनर्जन्म। भोगाल मत्संगआराम। कैवल्यधाम न नेसोनी ॥३२॥ विषयकामें लोकांतरें। जन्म मृत्यु न परिहरे। मत्प्राप्तीच्या कामभरें। नुरे दुसरें भवभान ॥ ३३ ॥ ज्ञानानळें कर्मबीज। दग्ध करूनि भजले मज। त्यांसी जन्ममृत्यूचें काज। नाहीं सहज मत्कामें ॥ ३४ ॥ ज्ञानसंपन्न जे अभेद। मत्प्रेमभजनें परमानंद। भोगिती त्यांचा जन्मकंद। समूळीं विशद उन्मळला ॥ २३५ ॥ ज्ञानानळें ज्या भर्जित[3]। सप्रेमभजनानंदें क्वथित[4]। सकामक्रिया त्या अंकुररहित। झाल्या निश्चित मत्कामें ॥ ३६ ॥ साळीयवादि धान्यजाति। भाजल्या उकडिल्या पूर्वस्थिति। आहारीं व्यवहारीं प्रतीति। परी नुगवती पेरिल्या ॥ ३७ ॥ अल्पक्षुधाहरणीं पटु। व्यापितां वृद्धि न शके घटूं। तैसा मत्कामें शेवटु। फाटे पटु[5] संसृतीचा ॥ ३८ ॥ तैसा तुम्हीं मद्रतिकाम। लक्षूनि केले व्रतादि नियम। तोही तुमचा मनोधर्म। स्वेच्छासंगम पावाल ॥ ३९ ॥

यातावला व्रजं सिद्धा मयेमा रंस्यथ क्षपाः। यदुद्दिश्य व्रतमिदं चेरुरार्यार्चनं सतीः ॥ २७ ॥

अबळा सिद्धा तुम्ही येथ। सिद्धि पावले मनोरथ। म्हणोनि व्रजाप्रति आनंदभरित। जावो समस्त मद्वाक्यें ॥ २४० ॥ जया मनोरथाचिये सिद्धि। आर्यापूजन[6] यथाविधि। आचरलां ते फळोपलब्धि। झाली त्रिशुद्धि ये काळीं ॥ ४१ ॥ जरी तूं मनोरथाचा वेत्ता। तरी कां व्रजा धाडिसी आतां। ऐसें म्हणाल तरी वृत्तांता। ऐका तत्त्वता अबला हो ॥ ४२ ॥ पुढें येणार ज्या या रजनी। तें *स्वेच्छा कुंजवनीं। मजशीं रमा हें गुह्य कानीं। ऐकोनि मनीं असों द्या ॥ ४३ ॥ मत्प्राप्तीचीं कृतसाधनें। फलोन्मुखें होती जेणें। तेणें मद्ध्यानें मत्स्मरणें। मनें वदनें रंगों द्या ॥ ४४ ॥ बोधितां संकेत उत्तरें। चित्तें मीनलीं परस्परें। गोपीमानसें कृष्णाकारें। बाह्यव्यापारें न चलती ॥ २४५ ॥

**पाठभेद:—** * स्वइच्छा (मुंगीप्रत व उमरखेडप्रत).

१ दांवें. २ न बिघडून. ३ भाजलेल्या. ४ कढविलेल्या. ५ वस्त्र. ६ गौरीपूजन.

श्रीशुक उवाच :— इत्यादिष्टा भगवता लब्धकामाः कुमारिकाः ।
ध्यायंत्यस्तत्पदांभोजं कृच्छ्रान्निर्विविशुर्व्रजम् ॥ २८ ॥

शुक म्हणे गा मात्सीवत्सा । जाणोनि गोपींची *अभीप्सा । संकेतवचनीं त्यांतें प्रोत्सा- । हूनी सदना पाठवी ॥ ४६ ॥ इत्यादि वचनें श्रीभगवानें । आज्ञापितां गोपीमनें । खेद मोद उभय- पवनें । दोलायमान भासती ॥ ४७ ॥ सिद्धि पावले मनोरथ । तेणें कुमारी आनंदभरित । पुन्हा वियोग आज्ञाजनित । होती दुःखित तदुद्योगें ॥ ४८ ॥ प्रेष्ठाज्ञांचें पालन । तेणें प्रेमाभिवर्धन । आज्ञा लंघितां भंगे मन । विकल्पजनन तद्योगें ॥ ४९ ॥ आज्ञा अनुल्लंघ्य जाणूनि मनीं । परमक्लेशें व्रजकामिनी । हरिपादाब्जें धरूनि ध्यानीं । कष्टें तेथूनि निघाल्या ॥ २५० ॥ समानशीला समान- व्यसनीं । समान अभीष्टफलसाधनीं । परमक्लेशें आज्ञेंकरूनी । त्या व्रजभुवनीं प्रवेशल्या ॥ ५१ ॥ कृष्णीं वेधल्या मनोवृत्ति । गृहीं यथापूर्व वर्तती । परंतु अस्ताव्यस्तस्मृति । इंद्रियगतिवैकल्यें[1] ॥ ५२ ॥ ध्यानें मानसें कृष्णाकार । वदनीं कृष्णनामोच्चार । श्रवणीं कृष्णगुणादर । नेत्र तत्पर हरिरूपीं ॥ ५३ ॥ ऐशा गोपी पूर्णकामा । चित्तें मीनल्या मेघश्यामा । त्यांतें अश्वासूनि परमात्मा । यज्ञधामा चालिला ॥ ५४ ॥ कन्यकांच्या भक्तियोगें । अनुकंपिल्या कृपापाङ्गें । भक्तिवर्जित जे वाउगे । त्रयीमार्गी याज्ञिक ॥ २५५ ॥ त्यांच्या पत्न्या तपस्विनी । त्यांवरी अनुग्रह इच्छूनि मनीं । याज्ञिकांच्या स्मयापहरणीं[2] । चक्रपाणि प्रवर्तला ॥ ५६ ॥ ते येथूनि पुढें कथा । शुक †निवेदी सौभद्रसुता । श्रवणवदनें तेंचि श्रोतां । दयार्णवीं प्राशिजे ॥५७॥ (इति कात्यायनीव्रतम् ।) यज्ञपत्न्यांचें शुद्धपुण्य । तेणें ओळला करुणाघन । विप्रकार्मठ्यगर्वापहरण[3] । मनीं धरूनि चालिला ॥ ५८ ॥

अथ गोपैः परिवृतो भगवान् देवकीसुतः । वृंदावनाद्गतो दूरं चारयन् गाः सहाग्रजः ॥ २९ ॥

गोपकुमरी आश्वासून[4] । संगवडियांशीं परिवारून । षड्गुणैश्वर्यसंपन्न । देवकीनंदन चालिला ॥ ५९ ॥ वृंदावनापासूनि दुरी । बलभद्रेंशीं श्रीमुरारि । गाई चारावया कांतारीं । गेला गजरीं स्वानंदें ॥ २६० ॥ विप्रभार्यांसि अनुग्रह । करावया देवकीतनय । यज्ञमंडपा समीप जाय । जातां काय बोलतसे ॥ ६१ ॥ श्रेष्ठजन्म ब्राह्मणयोनि । कर्मठ याज्ञिक सदाचरणी । अवघें वृथा निर्दयपणीं । धन्य यांहूनि हे द्रुम ॥ ६२ ॥ येणें अभिप्रायेंकरून । द्रुमां प्रशंसी भगवान् । संवगडियांतें संबोधून । म्हणे धन्य तरुवर हे ॥ ६३ ॥

निदाघार्कातपे तिग्मे छायाभिः स्वाभिरात्मनः । आतपत्रायितान्वीक्ष्य द्रुमानाह व्रजौकसः ॥ ३० ॥

उष्णकाळींचा तीव्र तरणि । तावित असतां कडतरकिरणीं । छत्राकार छाया करूनि ।

पाठभेद :— * अभीच्छा ( मुंगीप्रत ), अभीष्टइच्छा ( उमरखेडप्रत ). † निरोपी ( मुंगीप्रत ).
१ व्याकुळतेनें. २ गर्वहरणाविषयीं. ३ यज्ञादि कर्में करून ब्राह्मणांना झालेला गर्व. ४ मनोरथसिद्धीविषयीं धैर्य देऊन.

आपणातें रक्षिती ॥ ६४ ॥ ऐशिया देखोनि द्रुमांतें । व्रजौकसां संवगडियांतें । संबोधूनि सांगे त्यांतें । द्रुमगुणांतें भगवान् ॥ २६५ ॥

हे स्तोककृष्ण हे अंशो श्रीदामन् सुबलार्जुन । विशालर्षभ तेजस्विन् देवप्रस्थ वरूथप ॥ ३१ ॥

कृष्णावेगळा गोपाळ आन । स्तोककृष्ण नामेंकरून । त्यासि संबोधी भगवान् । हे स्तोककृष्ण म्हणोनी ॥ ६६ ॥ बलरामाहूनि वेगळा । त्या सुबळनामका गोपाळा । संबोधूनि तये वेळां । घनसांवळा बोलतसे ॥ ६७ ॥ अर्जुन आणि विशाळनामा । देवप्रस्थ अंशु सुवर्मा । ऋषभ तेजस्वी श्रीदामा । वरूथपादि वयस्य ॥ ६८ ॥ एवमादि गोपाळांसी । संबोधूनियां हृषीकेशी । म्हणे पहा हो तरुवरांसी । करुणा कैशी जाकळी ॥ ६९ ॥

पश्यतैतान् महाभागान् परार्थैकान्तजीवितान् । वातवर्षातपहिमान् सहतो वारयन्ति नः ॥ ३२ ॥

पहा रे गडी हो या वृक्षांतें । दयावंतां सभाग्यांतें । परोपकारार्थ स्वजीवितें । अवंचकैत्वें वाहती ॥ २७० ॥ चंडवायु झडझडाट । जलवृष्टीचा कडकडाट । चंडकिरणांचा उद्भट । ग्रीष्मादिकीं निदाघ ॥ ७१ ॥ तैसेंचि शीतकाळींचें हिम । प्राणिपीडक जें दुर्गम । इत्यादि आन सोसिती श्रम । देती विश्राम आम्हांतें ॥ ७२ ॥

अहो एषां वरं जन्म सर्वप्राण्युपजीवनम् । सुजनस्येव येषां वै विमुखा यान्ति नार्थिनः ॥ ३३ ॥

परमाश्चर्य हें म्हणोनी । पहा हो हे स्थावरयोनि । जीवविताती सर्व प्राणी । सर्वार्पणीं सर्वदा ॥ ७३ ॥ शाखा पत्रें पुष्पें फळें । अग्र अंकुर त्वचा मूळें । इच्छेसारिखीं एके काळें । अर्पूनि मोकळे निर्ममें ॥ ७४ ॥ जयांपासूनि विमुख अर्थी । कोण्हे काळीं ही न वचती । जन्मूनि धन्य ते परमार्थी । जे स्वार्थें परार्थीं उपकृत ॥ २७५ ॥ सज्जना परी ते हे द्रुम । अर्थिकांचे पुरविती काम । यालागीं धन्य त्यांचेंचि जन्म । पुरुषोत्तम म्हणतसे ॥ ७६ ॥ सधनें वसनें धान्यें धनें । वृत्तिक्षेत्रतनुसंतानें । अर्थस्वार्थें पशुगोधनें । दयाळुपणें उपकरिती ॥ ७७ ॥ जीवें प्राणें अवंचक । जयांपासूनि याचक । विमुख गेले हा कलंक । न शिवोनी शशांक लाजविती ॥ ७८ ॥ तयांशीं तुल्य हे द्रुमवर । कैसे सर्वस्वें उदार । तेंचि *मुखें मुरलीधर । सविस्तर वर्णितसे ॥ ७९ ॥

पत्रपुष्पफलच्छायामूलवल्कलदारुभिः । गंधनिर्यासभस्मास्थितोक्मैः कामान्वितन्वते ॥ ३४ ॥

देखोनि पत्रांचे अर्थी जन । त्यांसि करिती पत्रार्पण । पुष्पेप्सूंचें आर्तिहरण । पुष्पें वांपूनि

**पाठभेद**:— * स्वमुखें ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ व्याकुळ करिते. २ औदार्यानें. ३ प्रखर. ४ उष्मा. ५ ममतारहित. ६ याचक.

करितातीं ॥ २८० ॥ फळांची अपेक्षा असे ज्यांसी । इच्छिलीं फळें देती त्यांसी । वातातपशीतार्तांसी । स्वच्छायेशीं सुख देती ॥ ८१ ॥ त्वचामूळें भस्मार्पणें । करूनि उपचारिती रुग्णें[1] । मधुमक्षिकाभ्रमरघ्राणें[2] । गंधार्पणें तोषविती ॥ ८२ ॥ निर्यास म्हणिजे डीक चीक । त्यांचे अर्थी जे याचक । त्यांसि न होऊनियां विमुख । देती सुख तदर्पणें ॥ ८३ ॥ तोक्म म्हणिजे पल्लवांकुर । केवळ शुष्ककाष्ठें ते दारु[3] । वल्कलें त्वचांमाजील पदर । जे सादर तदर्पणें ॥ ८४ ॥ अस्थि म्हणिजे अंठोळिया । त्याही अर्चिती अर्थियां । जीवें प्राणें वेंचूनियां । जे आलिया निर्वीवती ॥ २८५ ॥ ज्यांचे जैसे मनोरथ । ते पुरविती विसरूनि स्वार्थ । ऐसा जयांचा परमार्थ । धन्य परार्थ जे झाले ॥ ८६ ॥

एतावज्जन्मसाफल्यं देहिनामिह देहिषु । प्राणैरर्थैर्धिया वाचा श्रेय एवाचरेत्सदा ॥ ३५ ॥

अनेक देहवंतांच्या ठायीं । येथ जन्मले जे मनुष्यदेहीं । त्यांचें जन्मसाफल्य पाहीं । गुणीं इहीं हरि म्हणे ॥ ८७ ॥ मनुष्यदेहीं वृक्षापरी । अवंचक जे परोपकारी । त्यांचीच जन्मसाफल्यथोरी । वर्णी श्रीहरि निजवदनें ॥ ८८ ॥ बुद्धिपूर्वक अर्थें प्राणें । येथ कायावाचामनें । श्रेय संग्रहिती परोपकरणें । सुकृताचरणें सर्वदा ॥ ८९ ॥

इति प्रवालस्तबकफलपुष्पदलोत्करैः । तरूणां नम्रशाखानां मध्येन यमुनां गतः ॥ ३६ ॥

ऐसे द्रुमांचे सद्गुण । सदयसज्जनेंशीं उपमून । पथीं चालतां द्रुमांमधून । स्वमुखें भगवान प्रशंसी ॥ २९० ॥ सदय रसाळ कोंवळे । विनयनम्रतेंकरूनि लवले । अभेदबोधार्जवें[4] सरळे । जे फुलले सुकृतौलीं[5] ॥ ९१ ॥ निर्मळ सत्क्रियाप्रवाळ[6] । वाङ्माधुर्यें सकोमळ । सुरभिसत्कीर्ति सुपरिमळ । सदय घोंसाळ सुशांत ॥ ९२ ॥ ऐशिया निबिड पादपीं हरि । प्रवेशोनि गोगोपभारीं । अभेदभक्ति यमुनातीरीं । स्वानंदगजरीं पातले ॥ ९३ ॥

तत्र गाः पाययित्वाऽपः सुमृष्टाः शीतलाः शिवाः । ततो नृप स्वयं गोपाः कामं स्वादु पपुर्जलम् ॥ ३७॥

मग ते यमुनेचिये ठायीं । सप्रेमजळीं पाजिल्या गायी । सुमृष्टीं[7] सुखावल्या पाहीं । शीतळ देहीं सुशांता ॥ ९४ ॥ शिवा म्हणिजे कल्याणवती । सुमंगला गोधनपंक्ति । प्राशितां यमुना अभेदभक्ती । निजविश्रांति पावल्या ॥ २९५ ॥ ऐकें परीक्षिति नरपालका । सेवितां सप्रेम यमुनोदका । गाई पावल्या अक्षय सुखा । तो महिमा ऐसिका[8] आपाचा ॥ ९६ ॥ भक्तियमुनेचें विशुद्धजळ । सुमृष्ट सबाह्य निर्मळ । तापत्रयहर सुशीतळ । परम मंगळ शिवरूप ॥ ९७ ॥ गज गणिका कां अजामिळ । ऐसे अनेक जे कां समळ । तिहीं सेवितां जेथींचें जळ । झाले निर्मळ सुमृष्ट ॥ ९८ ॥ कैंदर्यादि[9]

१ रोगी. २ नाक. ३ लांकूड. ४ भेदरहित ज्ञानाने निष्कपट. ५ पुण्यरूप ओलाव्यानें. ६ पल्लव. ७ धुऊन स्वच्छ केलेल्या. ८ सगळा. ९ कृपण.

त्रितापतप्त । तयांसि होतां जें जल प्राप्त । झाले सुशीतल संतृप्त । पुन्हा अलिप्त भवतापा ॥ ९९ ॥ भेद तितुका अमंगळ । तो हा संसार दावानळ । सप्रेमभक्ति यमुनाजळ । करी मंगळ मज्जनें ॥ ३०० ॥ ऐशा सुमृष्ट शीतळ शिवा । आपा पाजूनि गोरुवां[1] । रामकृष्ण प्राशिती तेव्हां । सहित अवघा गोपगण ॥ १ ॥ रसाळ शीतळ अमृतवारि । यथास्वेच्छा कैटभारि । बलरामेंशीं गोपभारीं । प्राशूनि उपवनीं पातले ॥ २ ॥

तस्या उपवने कामं चारयंतः पशून् नृप । कृष्णरामावुपागम्य क्षुधार्ता इदमब्रुवन् ॥ ३८ ॥

मग ते यमुनेचे उपवनीं । पशु स्वेच्छा स्वादु[2] तृणीं । चारित असतां गोपगणीं । केली जाचणी क्षुधेनें ॥ ३ ॥ सुबळ आणि स्तोककृष्ण । अंशु श्रीदामा अर्जुन । ऋषभ विशाळ विवस्वान । देवप्रस्थ वरूथप ॥ ४ ॥ इत्यादि संवगडियांचा मेळा । क्षुधार्त होतां मध्याह्नकाळा । समीप येऊनि रामगोपाळां । कथिती सकळा वृत्तांत ॥ ३०५ ॥ म्हणती ऐकें गा श्रीहरि । आम्हां न घेतां सिदोरी । घेऊनि आलासि सत्वरीं । गोपकुमारी ठकावया ॥ ६ ॥ गोपकुमारींच्या उपहास्यें । आम्हां गोविलें कौतुकावेशें । पुढां तैसेच सुखसंतोषें । गोधनासरिसे विहरलों ॥ ७ ॥ नुगवतांच पुरता दिन । गोपकुमारी पाहिल्या नग्न । यास्तव आम्हां न मिळे अन्न । क्षुधेनें प्राण जाताती ॥ ८ ॥ कृष्णा तुझें जें जें करणें । तें तें तुजसी श्लाघ्यवाणें । आम्ही विचंबू[3] जिवें प्राणें । तुज कारुण्यें कींव भाकूं ॥ ९ ॥ प्रभातें गोपी दाविल्या नग्न । तेणें आम्हांसि आजि लंघन । आतां कृष्णा देईं अन्न । वांचवीं प्राण क्षुधितांचे ॥ ३१० ॥ ऐशी गोपाळमंडळी । येऊनि रामकृष्णांजवळी । क्षुधापहरणार्थ ते काळीं । करिती बोली ते ऐका ॥ ११ ॥ शुक म्हणे गा कुरुपुंगवा । कृष्णपवाडा नित्य नवा । ऐकतां तृप्ति न[4] बणे जीवा । पुढें परिसावा वाटे कीं ॥ १२ ॥ हें ऐकोनि मुनीचें वचन । परमानंदें नित्य निमग्न । म्हणे जाणसी माझें मन । सर्वज्ञ पूर्ण तूं योगी ॥ १३ ॥ इतुकी कथा निरोपूनी । संपली द्वितीया एकादशिनी । पुढिले कथेच्या व्याख्यानीं । द्यावें सज्जनीं अवधान ॥ १४ ॥ यज्वपत्न्यांसि अनुग्रहण । याज्ञिकांचें मदापहरण । अन्न याचवूनि[5] रमारमण[6] । करील पूर्ण तद्व्याजें ॥ ३१५ ॥ तो तेविसावा अध्याय पुढां । व्यासऔरस नृपापुढां । सांगेल तेथींचा अर्थ उघडा । बोलीं बोबड्या वदिजेल ॥ १६ ॥ तयाचे श्रवणीं श्रद्धावंत । अपारसुकृती सादर संत । देखोनि सद्गुरु आज्ञापित । स्वानंदभरित निजवदनें ॥ १७ ॥ भूवैकुंठप्रतिष्ठानीं[8] । शांतिसुखाचे सिंहासनीं । साधनसंपन्ननिर्जरगणीं । जो अनुदिनीं सुपूज्य ॥ १८ ॥ चिदानंदाचीं भूषणें । त्यांवरी स्वानंदाचीं सुमनें । गोविंदपादांबु सांठवणें । पूर्ण करणें दयार्णवा ॥ १९ ॥ तया एकनाथाचिया तीर्था । तीर्थें वोडविती माथा । अघौघहारिणी ते हे कथा । अखिलपुरुषार्थदायिनी ॥ ३२० ॥ श्रवणें करितां इचें पान । ओपी कैवल्यसोपान । तुच्छ करूनि सोमपान । म्हणवी धन्य

---

१ गुरांना. २ रुचिकर. ३ खोळंबून राहूं. ४ न ठसे. ५ मागून. ६ श्रीकृष्ण. ७ त्या मिषानें. ८ भूमीवरील वैकुण्ठ विष्णुलोकच असें जें प्रतिष्ठान नगर, किंवा पैठण.

सुरपूज्य ॥ २१ ॥ तें हें श्रीमद्भागवत । महापुराण विख्यात । अष्टादशसहस्रगणित । रमती तेथ परमहंस ॥ २२ ॥ त्यांतील हा दशमस्कंध । कात्यायनीव्रत प्रसिद्ध । गोपीवस्त्रापहरण विशद । अध्याय शुद्ध बाविसावा ॥ २३ ॥ दयार्णवाची इतुकी विनति । सप्रेमश्रीकृष्णचरणीं रमती । रंगोनि श्रवणीं सादर होती । ते नाकळती कळिकाळा ॥ २४ ॥ अभीष्टलाभाचें भाजन । तेचि होती धन्यमान्य । कृष्णप्रेमें ज्यांचें मन । श्रवणीं रंगोनि सुख भोगी ॥ ३२५ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां कात्यायनीव्रतगोपीवस्त्रापहरणं नाम द्वाविंशतितमोऽध्यायः* ॥ २२ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक ३८ ॥ टीका ओव्या ॥ ३२५ ॥ एवं संख्या ॥ ३६३ ॥ श्रीगुरुशिवाय नमः ॥ (बाविसावा अध्याय मिळून ओवीसंख्या ११६५० ).

**बाविसावा अध्याय समाप्त.**

**पाठभेद :—** *गोपी वर प्राप्त ॥ श्रीकृष्ण सह बलराम गोप उपवण प्रवेशोन्नाम ( मुंगीप्रत ); कात्यायनीव्रतव्रजकुमारीचीरहरणविलासो नाम ( उमरखेडप्रत ).

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय २३ वा

श्रीकृष्णपरमात्मने नमः। अनुपमा जी गरिष्ठतमा[1]। परमलाघवें[2] सर्वी समा। द्वैताद्वैतनिक्षेपधामा[3]। पूर्णकामा गोविंदा ॥ १ ॥ पिंजूनि मोकळा केला तूळ[4]। तो विशाळ भासे परंतु हळु। तैसाचि पुरुष क्षमादिसुशीळ*। लघुत्वें केवळ गुरुतर ॥ २ ॥ मेरुसागरकुळाचळ[5]–। सहित सगळा ब्रह्मांडगोळ। तवानुग्रहलेशें व्याळ[6]। वाहे केवळ तिळप्राय ॥ ३ ॥ ब्रह्मांडाहूनि गरिष्ठसार[7]। तरीच वाहे ब्रह्मांडभार। तेथ वसिष्ठाचा दर्भांकुर। झाला पटुतर[8] तत्कर्मी ॥ ४ ॥ ज्याचेनि चिंतनें वशिष्ठासी। तपऐश्वर्यें शक्ति ऐसी। तोचि तूं अनंतब्रह्मांडांसी। †न धरूनि वाहसी ऐश्वर्यें ॥ ५ ॥ अनंतब्रह्मांडांचिया श्रेणी। निमेषाचिया मीलनोन्मीलनीं। एवढी गरिष्ठता कोणी। केंवि उपमानीं उपमिजे ॥ ६ ॥ न पुरे उपमेसी ईश्वर। कीं त्याचा ही ऐश्वर्यभार। उतरोनि वोपिसी निजशेजार। अक्षय सन्मात्र कृपेनें ॥ ७ ॥ म्हणाल ईश्वरें आदिशक्ति। प्रबोधिली पूर्णस्थिती। तेचि सद्गुरुभजनोपलब्ध युक्ति। निजात्मस्थितिप्रापक ॥ ८ ॥ काष्ठापोटीं प्रकटे वह्नि। तो काय गणिजे‡ काष्ठपणीं। प्रकटे भजनसंवादमथनीं। तेंवि ज्ञानाग्नि ईशत्वीं ॥ ९ ॥ एकाकी न रमे या कषायें। इच्छाशक्तीच्या उपायें। अभीष्ट बहुत्व जें कां होये। ¶तज्ज्ञातृत्वकर्तृत्व ॥ १० ॥ त्यासीच बोलिजे सर्वशब्दें। तन्नियंतृत्वें ईशत्व नांदे। विक्षेपजनकें ईश्वरपदें। केंवि स्वबोधें जागिजे ॥ ११ ॥ निकटवासिया सुलभ जल। येरां दुर्लभ प्रयत्नबहळ। परंतु उभयत्र केवळ। ↑स्थितिवेगळ जळेंशीं ॥ १२ ॥

---

**पाठभेद :**— * क्षमादिशीळ ( मुंगीप्रत ). † धरूनि ( मुंगीप्रत ); न धरूनि ( उमरखेडप्रत ). ‡ बोलिजे ( मुंगीप्रत ). ¶ तत्ज्ञातृत्व ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ↑ वसती वेगळें ( मुंगीप्रत ); स्थिती वेगळें ( उमरखेडप्रत ).

१ फार मोठ्याहून मोटा. २ अतिसूक्ष्मत्वानें. ३ जीवात्मा व परमात्मा यांमध्यें भिन्नभाव किंवा ऐक्यभाव यांचे निवासस्थान. ४ कापूस. ५ महेंद्रादि सात कुलपर्वत. ६ शेष नांवाचा सर्प. ७ मोटा बलवान. ८ अधिक समर्थ.

गगनचुंबित विशाळ मठ । त्यामाजि सर्षपमात्र एक घट । तारतम्येंचि लघु वरिष्ठ । ‖ऐक्यीं विपट[2] सम व्योमीं ॥ १३ ॥ म्हणाल ईश्वरावांचूनि कोण्हीं । नाहीं ऐकिला प्रथमस्फुरणीं । तरी तें वामांग ईश्वरपणीं । आंगीं दक्षिणीं गुरुत्व ॥ १४ ॥ जेंवि रसना आणि वाणी । दोन्ही असती एकेचि लपनीं[3] । वागिंद्रिय‡ संभाषणीं । रसास्वादनीं रसज्ञा ॥ १५ ॥ तेथ वाक्शून्याची गिरा । समर्थ नोहे वाग्व्यापारा । परी रसास्वादनविचारा । जेंवि पटुतरा देखिजे ॥ १६ ॥ तैसा सर्वज्ञ कर्ता ईश्वर । परी उतरूं न शकेचि स्वोपाधिभार । यालागिं तोही तव किंकर । नोहे सधर उपमेतें ॥ १७ ॥ ऐसा अनुपम गरिष्ठतम । परंतु लाघवें सर्वां सम । ईश्वरमौळीं पूर्णकाम[4] । सहस्रदळीं नांदसी ॥ १८ ॥ जो तूं ईश्वराचिये शिरसीं । तो तूं सामान्या उपेक्षिसी । प्राणिमात्रीं स्वप्रकाशीं । वसति करिशी सहस्रदळीं ॥ १९ ॥ यालागिं गुरुत्वें लाघवें । तूं अनुपमचि निजवैभवें । यास्तव द्वैताद्वैत आघवें । सम्यक् सांठवे तुजमाजीं ॥ २० ॥ तुझ्या ठायीं कामना नसे । याचि लागिं अभेददशे । द्वैताद्वैत समूळ रुसे । सहजप्रकाशें पूर्णता ॥ २१ ॥ त्या तुज नमो पूर्णकामा । वेदांतवेद्या परब्रह्मा । गोगोपका गोविंदनामा । श्रीपरमात्मा सर्वगा ॥ २२ ॥ तंव सद्गुरु म्हणती स्तवन पुरे । कात्यायनीव्रता-नंतरें । तेविसाव्या अध्यायीं व्यासकुमरें । कथिलें तें तूं निरूपीं ॥ २३ ॥ एवं आज्ञाश्रीपादगंगें[5] । पावन करितां त्रिविध जगें । रिक्तदयार्णव तत्प्रसंगें । निदाघभंगें भरियेला ॥ २४ ॥ तेथ जलशायी भगवान् । प्रश्नावधानें श्रोते जन । संवादसुमनीं¶ अभ्यर्चून । होती संपन्न प्रसादें ॥ २५ ॥ आतां तृतीय एकादशिनी । उपाइली जे निरूपणीं । ते प्रभूचिये आज्ञेवरूनी । वाखाणिजेल तत्सत्ता ॥ २६ ॥ तेथ तेविसामाजि गडी । क्षुधित कृष्णा घालूनि कोडीं । प्रार्थितां यज्ञमंडपा धाडी । तिहीं ते बराडी दवडिले ॥ २७ ॥ तया कर्मठांचा गर्व । हरूनियां वासुदेव । तत्पत्न्यांचा प्रेमभाव । देखोनि अपूर्व तुष्टला ॥ २८ ॥ चोविसामाजीं इंद्रमख । निषेधूनि मन्मथजनक । गोवर्धनाध्वर मुख्य । प्रवर्तक हेतुवादीं ॥ २९ ॥ पंचविसाव्या अध्यायीं शक्र । क्षोभें प्रेरितां मेघचक्र । गिरी उचलूनियां अवक्र । व्रज समग्र हरि रक्षी ॥ ३० ॥ सव्विसाव्या अध्यायीं गोप । विस्मित देखूनि हरिप्रताप । नंदें लावूनि गर्गोक्तिदीप । केला लोप भ्रमतमा ॥ ३१ ॥ श्रीकृष्णाची अद्भुत शक्ति । देखोनि सुरभि आणि सुरपति । गवेंद्रपदीं अभिषेकिती । हे उत्साहकीर्ति सत्ताविशीं ॥ ३२ ॥ अठ्ठाविसामाजीं वरुण । करी नंदाचें कर्षण । कृष्ण करी तन्मोक्षण । वैकुंठदर्शन गोपां दे ॥ ३३ ॥ एकुणतिशीं गोपिकाहरि । व्यंग्यैंोत्तरें परस्परीं । वदोनि रासक्रीडा आदरी । गुप्तकांतारीं तद्व्याजें ॥ ३४ ॥ तिसाव्यामाजि विरहतप्ता । गोपी हुडकिती कृष्णनाथा । वनोपवनीं शंकारहिता । भ्रमती उन्मत्ता सारिख्या ॥ ३५ ॥ एकतिसाव्यामाजीं पुन्हां । पुलिना आल्या व्रजांगना । विरहप्रेमें करिती गायना । कृष्णागमना प्रार्थिती ॥ ३६ ॥ बत्तिसाव्यांत गोपीगीतीं । कृष्ण कळवळूनियां चित्तीं । प्रकट होऊनि तयांप्रति । सांत्वनोक्ती सन्मानी ॥ ३७ ॥ तेहतिसाव्यांत यदुनायक । रासक्रीडा

पाठभेदः— ‖ एक ( मुंगीप्रत ). ‡ वागेंद्रिय ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ¶ डहनी ( मुंगीप्रत ).

१ मोहरीएवढा. २ परस्परविरुद्ध. ३ मुखांत. ४ नित्यतृप्त. ५ आज्ञारूप गंगोदकानें. ६ उत्कृष्ट. ७ वाच्यार्थाहून इतर जो अर्थांतरांश तो.

सकौतुक । गोपी रमवी एकानेक । अलौकिक वनकेलि ॥ ३८ ॥ इत्यादि कथानिरूपणीं । रसाळ तृतीय एकादशिनी । श्रीप्रभूचिये आज्ञेवरूनी । तद्व्याख्यानीं प्रवृत्ति ॥ ३९ ॥ रासक्रीडा सप्रेमरस । कल्पूं न शके धीमानस । सद्गुरुकृपावरलेश* । देह †व्यास तत्कथनीं ॥ ४० ॥ तुम्हीं सज्जनीं तदनुसार । देतां पूर्ण कृपेचा नीहार । मादृश बुद्धिमंद पामर । होईल सधर व्याख्यानीं ॥ ४१ ॥ संतकृपेच्या अनुमोदनें । वाङ्मयप्रवाह प्रकटे वदनें । ज्यामाजि निगमागमार्थसदनें । करिती कदनं कलिमला ॥ ४२ ॥ हें ऐकोनि संतसदय । म्हणती अभेदीं स्तवन काय । आम्ही अधिष्ठूनि तुझें हृदय । निखिल वाङ्मय प्रकाशूं ॥ ४३ ॥ ऐसे सज्जनसद्गुरुवरद । लाहूनि तत्कृपेचा प्रसाद । म्हणे एका कथा विशद । गोपगोविंदचरित्र ॥ ४४ ॥ गोपिकांचीं देऊनि चीरें । वनीं चारितां गाई गुरें । क्षुधाक्रांत झालीं पोरें । करुणोत्तरें विनविती ॥ ४५ ॥

गोपा ऊचुः — राम राम महावीर्य कृष्ण दुष्टनिबर्हण । एषा वै बाधते क्षुन्नस्तच्छान्तिं कर्तुमर्हथः ॥ १ ॥

अखिलचराचराभिरामा । सवंगडी म्हणती भो बळरामा । तुझा अगाध वीर्यमहिमा । तरी कां आम्हां ही दशा ॥ ४६ ॥ कृष्ण दुष्टनिर्दलना । क्षुधा आमुच्या जाकळी प्राणा । तुम्ही समर्थ क्षुधोपशमना । आमुची करुणा परिसावी ॥ ४७ ॥ अघबकादि अनेक दुष्ट । तुम्हीं प्रतापें मारिले श्रेष्ठ । परी हे क्षुद्बाधेचे कष्ट । कां पापिष्ठ ठेविले ॥ ४८ ॥ आमुचे क्षुद्बाधेची शांति । करावयाची सामर्थ्यशक्ति । तुमच्या आंगीं आहे पुरती । म्हणोनि विनति करीतसों ॥ ४९ ॥

श्रीशुक उवाच — इति विज्ञापितो गोपैर्भगवान् देवकीसुतः ।
भक्ताया विप्रभार्यायाः प्रसीदन्निदमब्रवीत् ॥ २ ॥

ऐशिया प्रकारें गोरक्षगणीं । देवकीतनय जो वंशपाणि । षड्गुणैश्वर्याचा दानी । विनीतवचनीं विनविला ॥ ५० ॥ मग सद्भक्त विप्रांगणा । जाणोनि अंतरीं हरीशी करुणा । उपजली तत्संरक्षणा । करित होत्साता हे बोले ॥ ५१ ॥ राशी म्हणिजे एक वचन । परी साळीचे बहुत कण । कीं सहस्र पात्र म्हणतां जाण । पात्रें भिन्न द्विजपंक्ति ॥ ५२ ॥ तेवीं श्रद्धाळुवें विप्रभार्येसी । कृपें बोळला हृषीकेशी । हें एक वचन समुदायेशीं । विप्रांगनांशीं जाणावें ॥ ५३ ॥ असो हे पदार्थ घडमोडी । क्षुधेनें जाकळिली सांगडी । जाणोनी याज्ञिकापाशीं धाडी । गोष्टी उघडी ते ऐका ॥ ५४ ॥

श्रीभगवान् उवाच — प्रयात देव यजनं ब्राह्मणा ब्रह्मवादिनः ।
सत्रमांगीरसं नाम ह्यासते स्वर्गकाम्यया ॥ ३ ॥

**पाठभेद** — *वरदलेश ( मुंगाप्रत व उमरखेडप्रत ). †तेणे हव्यास ( मुंगीप्रत ).

१ अकरा अध्यायांचा समूह. २ बुद्धि व मन. ३ तुषार. ४ माझ्यासारख्या. ५ अधिकाश्रययुक्त. ६ विद्याप्रवाह. ७ वेदशास्त्रार्थांचीं घरें. ८ वस्त्रें.

कृष्ण आज्ञापी संवगडियांसीं । ब्राह्मण करिती अध्वरासीं । वेदविद्या विदित ज्यासी । ते तपोराशी कर्मठ ॥ ५५ ॥ वेदवचनीं विश्वास दृढ । धरोनी झाले कर्मारूढ । स्वर्गभोगाची मनीं चाड । कामना वाँढ वाढविती ॥ ५६ ॥ तीहीं आंगीरसनाम सत्र । मांडिलें आहे यथासूत्र । स्वर्गभोगकामनामात्र । क्रिया पवित्र मानूनी ॥ ५७ ॥

तत्र गत्वौदनं गोपा याचतास्मद्विसर्जिताः । कीर्तयंतो भगवत आर्यस्य मम चाभिधाम् ॥ ४ ॥

आम्हीं पाठविली यावरून । तुम्हीं टाकावें सत्र सदन । करोनी ऋषींचें प्रार्थन । मागा ओंदन ममाज्ञा ॥ ५८ ॥ षड्गुणैश्वर्यसंपन्न । श्रीभगँवान संकर्षण । जगद्वंद्य पूज्य पावन । सांगा अभिधान तयाचें ॥ ५९ ॥ आणि तयाचा अनुज बंधु । निगमागमीं जो प्रसिद्धु । आम्ही उभयतां रामगोविंदु । करा अनुवाद नामाचा ॥ ६० ॥ ऐसीं आमुचीं सांगूनी नामें । समर्यादविनयधर्में । अन्न मागोनी घ्या सप्रेमें । आज्ञानियमें गोप हो ॥ ६१ ॥ म्हणाल आम्ही कां मागो भीक । तरि आमुचे म्हणवितां सेवक । तुम्हांसी यांच्ञेचा कळंक । न शिवे निष्टंक गडि हो ॥ ६२ ॥ अपात्र मानूनि गोपगणा । म्हणाल नेदीती यज्ञौदना । सांगतां आमुचिया अभिधाना । तुम्ही कल्पना हे न धरा ॥ ६३ ॥ षड्गुणांचा ऐश्वर्यराशी । तणें आज्ञा करोनी ऐसी । धाडिले यज्ञमंडपाशीं । साक्षेपेशीं संवगडे ॥ ६४ ॥

इत्यादिष्टा भगवता गत्वाऽयाचन्त ते तथा । कृतांजलिपुटा विप्रान् दंडवत् पतिता भुवि ॥ ५ ॥

आज्ञा वंदोनी ते गोपाळ । यज्ञमंडपा जावोनि सकळ । वंदिते झाले क्रियाकुशळ । विप्र सुशीळ त्रैविद्यँ ॥ ६५ ॥ ऊर्ध्वहस्तें बद्धांजली । दंडप्राय भूमंडळीं । नमस्कारोनी तये काळीं । वदती मोकळीं मृदु वाक्यें ॥ ६६ ॥ कृष्णें आज्ञा केली जैशी । गोपाळ याच्ञा करिती तैसी । त्या गोपोक्ति नृपासी । आश्चर्येंशीं शुक सांगे ॥ ६७ ॥

गोपा ऊचुः — हे भूमि देवाः शृणुत कृष्णस्यादेशकारिणः ।
प्राप्ताञ्जानीत भद्रं वो गोपान्नो रामचोदितान् ॥ ६ ॥

गोप म्हणती भूर्सुराप्रती । तुम्ही समस्त वेदमूर्ति । आम्हां कृष्णकिंकरांची विनती । ऐकोनि चित्तीं विवरा हो ॥ ६८ ॥ आम्ही कृष्णाचे आज्ञाकरी । तुम्हीं जाणावें अंतरीं । रामकृष्णांचे वचनावरी । तुमचिये द्वारीं पातलों ॥ ६९ ॥ कल्याण असावें तुम्हांसी । येथूनि समीप हृषीकेशी । गाई चारी अग्रजेंशीं । वनीं उपवासी क्रीडत ॥ ७० ॥

१ अधिक. २ यज्ञ. ३ यथाविधि. ४ ज्याच्यामध्ये अपार सामर्थ्य व गंभीर्य आहे असा. ५ उच्चार. ६ याचनेचा. ७ तीन वेद म्हटलेले. ८ ब्राह्मण.

गाश्चारयंतावविदूर ओदनं रामाच्युतौ वो लषतो बुभुक्षितौ ।
तयोर्द्विजा ओदनमर्थिनोर्यदि श्रद्धा च वो यच्छत धर्मवित्तमाः ॥ ७ ॥

बहुत दूर ना समीप । धेनु पाजूनि यमुना आप । आम्हां हातीं हा निरोप । ससाक्षेप पाठविला ॥ ७१ ॥ रामकृष्ण क्षुधाक्रांत । सहित संवगडे समस्त । तुमच्या अन्नाची इच्छा बहुत । धरूनि निवांत बैसले ॥ ७२ ॥ रामकृष्णांच्या ठायीं भक्ति । वर्तत असेल तुमच्या चित्तीं । तरी ओदन देऊनि आमुच्या हातीं । कृष्णाप्रति पाठविजे ॥ ७३ ॥ जरी म्हणाल आम्ही दीक्षित । आमुचीं अन्नें सुसंस्कृत[1] । विप्रभोजनाविरहित । नाहीं आर्पित इतरांसी ॥ ७४ ॥ *कृष्ण साक्षात् श्रीभगवान । षड्गुणैश्वर्यसंपन्न । त्यासि सप्रेम देतां अन्न । सफळ यज्ञ निर्दोप ॥ ७५ ॥ आमुचीं न होतां भोजनें । तुम्हांसि देऊं नयेती अन्नें । तरी यदर्थीं ऐका वचनें । जीं प्रमाणें श्रुतिस्मृति ॥ ७६ ॥

दीक्षायाः पशुसंस्थायाः सौत्रामण्याश्च सत्तमाः । अन्यत्र दीक्षितस्यापि नान्नमश्नन्हि दुष्यति ॥ ८ ॥

दीक्षाग्रहण† केलिया वरी । पशुसंस्थाख्यअध्वरीं[2] । जोंवरी पश्वालंभन[3] करी । अग्नीषोमीय[4]-इष्टीचा ॥ ७७ ॥ तंववरी भक्षूं नये अन्न । न कीजे कोणासि अर्पण । भक्षितां देतां लागे दूषण । विधिलंघन म्हणोनी ॥ ७८ ॥ तैसीच सौत्रामर्ण्यमखीं[5] । दानीं भक्षणीं अन्नविखीं । श्रुतीनें केली उखीविखीं । विधिलंघनदोषाची ॥ ७९ ॥ अन्यत्र सर्व क्रतूंच्या ठायीं । दानीं भक्षणीं दूषण कांहीं । दीक्षित असतां यजमानही । निषेध नाहीं अन्नाचा ॥ ८० ॥ अन्यत्र दीक्षितांचेंही अन्न । न भक्षितां दीक्षित यजमान । देतां घेतां निर्दूषण । तुम्ही विचक्षणसत्तम ॥ ८१ ॥

इति ते भगवद्याच्ञां श्रृण्वंतोऽपि न शुश्रुवुः । क्षुद्राशा भूरिकर्माणो बालिशा वृद्धमानिनः ॥ ९ ॥

ऐशी भगवंतें याच्ञा केली । संवगडियांहीं निवेदिली । ब्राह्मणीं ऐकोनि नायकिली । जे कर्मभुलीं भूलले ॥ ८२ ॥ कर्मभुलीचें लक्षण । असतां बालिश[8] अज्ञान । ज्ञानवृद्ध महामान्य । आपणां आपण मानिती ॥ ८३ ॥ जात असतां पश्चिमेकडे । पश्चिम म्हणतां लाविती वेडें । पूर्व म्हणती कवळिले मौढ्यें[9] । दिग्भ्रमें[10] रोकडे नुमजती ॥ ८४ ॥ वेळुवावरी चढणें उडणें । नग्नशस्त्रेंशीं झगटणें । सर्पजिह्वेसी डसवणें । भीक मागणें फळ त्याचें ॥ ८५ ॥ व्याघ्र सर्प काळ कोपी । त्यांतें रक्षूनि साक्षेपीं । भिकेपरौते महापापी । कोणे कल्पीं वर होती ॥ ८६ ॥ मेरु खणोनि परता करणें । ते भू अमृतोदकें भिजविणें । तेथें धत्तूर पिकवूनि खाणें । भुलीचें जिणें तें ऐसें ॥ ८७ ॥ बहुत करूनि कर्मक्लेश । वरजन्माचा[11] आयुष्यनाश । धरिती स्वर्गभोगीं हव्यास । म्हणोनि बालिश याज्ञिक ॥ ८८ ॥ क्षणें होईल कर्म व्यंग । तरी अंतरेल स्वर्गभोग । ऐसिया बुद्धी यज्ञान्तरंग[12] ।

पाठभेदः— *७७ वी ओवी ( मुंगीप्रत ) येथील पोथींत नाहीं. †तरी कृष्ण ( मुंगीप्रत ).

१ मंत्रसंस्कारयुक्त. २ 'पशूचा यज्ञ' असें ज्याचें नांव आहे तो. ३ पशु मारणे. ४ अग्नि आणि सोम यांसंबंधीं. ५ यज्ञाचा. ६ विशेष यज्ञ. ७ विचार. ८ मूढ. ९ मूर्खपणानें. १० दिशाभूल. ११ श्रेष्ठ. १२ यज्ञाचे आंतील अंग श्रीरंग.

जिहीं श्रीरंग नादरिला ॥ ८९ ॥ एका श्रीकृष्णस्मरणासाठीं । बैसिजे सायुज्यश्रियेच्या पाठीं । नेणोनि याज्ञिकें करंटीं । कर्मराहाटीं भांबावलीं ॥ ९० ॥ वेदीं शास्त्रीं आणि पुराणीं । महिमा ऐकिला असतां श्रवणीं । गोपमुखें हे त्याचीच वाणी । ऐकोनि कर्णीं न घेती ॥ ९१ ॥ जाणोनि नृपाचें अंतर । शंका आणि प्रत्युत्तर । जें बोलिला शुक योगींद्र । तें येथ चतुर परिसोत ॥ ९२ ॥

देशः कालः पृथग्द्रव्यं मन्त्रतन्त्रर्त्विजोऽग्नयः । देवतायजमानश्च क्रतुर्धर्मश्च यन्मयः ॥ १० ॥

म्हणसी राया जरी तूं ऐसें । देशकालें देवतोद्देशें । यज्ञीं विभाग विहित असे । तो अन्योद्देशें केंवि दीजे ॥ ९३ ॥ जेथ कृष्णमृगांचा स्वेच्छावास । अश्वत्थ शमी पलाश प्लक्ष । तिल यव दूर्वा मुंजा कुश । तो तो देश यज्ञार्ह ॥ ९४ ॥ जेथ निर्दोष वेदाध्ययनें । जेथ निर्दोष सुब्रह्मण्यें । जेथ निर्दोष कर्माचरणें । तो देश जाणणें यज्ञार्ह ॥ ९५ ॥ जेथ अष्टादशधान्योत्पत्ति । वर्णविभाग यथाविहितीं । आश्रमादि धर्मप्रवृत्ति । ते ते क्षिति यज्ञार्ह ॥ ९६ ॥ गंगायमुनामध्यदेश । पुण्यफळद अतिविशेष । त्याहूनि कोटिगुणें उत्कर्ष । प्रयागक्षेत्रीं श्रुति वर्णी ॥ ९७ ॥ पुण्यनद्यांचीं उभयतीरें । पुष्करादिसरोवरें । पुण्यारण्यें पावनें ऊषरें । पुण्यक्षेत्रें यज्ञार्ह ॥ ९८ ॥ सौराष्ट्र मगध कालिंग । कामरूप अंग वंग । कच्छकीकट यकटंग । मरुवाडादि निषिद्ध ॥ ९९ ॥ तुळवेहैवेकिंग कोंकण । मलयार मखर जांगल हूण । ‡तुरुष्कादि सदूषण । अब्रह्मण्य दुर्देश ॥ १०० ॥ तीर्थ क्षेत्र यात्रेविण । इत्यादि देशीं करितां गमन । पतित होती चार्‍ही वर्ण । पावतां मरण अधोगति ॥ १ ॥ ऐसा देशाचा निर्देश । कुंडमंडपवेदिप्रदेश । कर्मनिर्दिष्ट सूक्ष्मदेश । सामान्य विशेष त्यामाजीं ॥ २ ॥ अमुक देशीं पात्रासादन । अमुके स्थळीं ब्रह्मासन । अमुके प्रदेशीं यजमान । ऐसें प्रमाण पार्थक्यें ॥३॥ कृतयुगीं पुण्यकाळ । त्रेतायुगीं तोचि समळ । द्वापरीं होय अर्धविवळ । मलिन केवळ कलिसमय ॥ ४ ॥ सूर्यप्रकाशें पदार्थज्ञान । अणूपासूनि थोर लहान । शुद्धाशुद्ध जाणोनि नयन । वर्तती जाण निःशंक ॥ १०५ ॥ तेचि रात्रीं अग्निप्रकाशें । नयन साशंक देखती जैसे । त्याहूनि उतरतें* मंद जैसें । पुनिवेपासूनि शशितेजें ॥ ६ ॥ तैसे कृतयुगींचे जन । सत्यशौचसत्त्वसंपन्न । देवमनुष्यादि भगवान । ते संपूर्ण वोळखती ॥ ७ ॥ जाणोनि उचित योग्यायोग्य । कर्म आचरती अव्यंग । असत्याचा न लगे डाग । म्हणोनि श्रीरंग आकळिती ॥ ८ ॥ मग कलीपर्यंत उत्तरोत्तर । सत्यलोपें असत्याचार । तेणें पडला अंधकार । अविद्याप्रचुर अज्ञान ॥ ९ ॥ कृतीं ध्यान त्रेतीं यज्ञ । अर्चन आणि संकीर्तन । कालानुरूप केलें प्रमाण । द्वापरीं आणि कलिकाळीं ॥ ११० ॥ वेदोदित कर्माचरण । तपश्चर्या यज्ञदान । कलीपर्यंत बोलिले जाण । परी ते खूण अनारिसी ॥ ११ ॥ वेदशास्त्रक्रियारक्षण† । काळपरत्वें न्यून पूर्ण । विहिताविहित गौणागौण । कर्माचरण वेदाज्ञा ॥ १२ ॥ देवरींपासूनि सुतोत्पत्ति । पितृयज्ञीं फळप्रवृत्ति । गवालंभ यज्ञीं विहितीं । आश्रमीं यति

पाठभेद-- ‡तुरुकादि ( मुंगीप्रत ). *उतरले ते ( मुंगीप्रत ). † लक्षण ( मुंगीप्रत ).

१ काळवीट. २ वड. ३ खार्‍या मातीची जागा. ४ प्रथक्‌पणानें. ५ शारीर आणि मानसिक शुद्धि. ६ वेदोक्त. ७ भिन्न. ८ दीर. ९ गाई मारणें.

कलिवर्ज्य ॥ १३ ॥ पंचसहस्र वर्षें कलि । भरे तोंपर्यंत भूमंडळीं । वर्णाश्रमाचार कुळीं । आभासमात्र उरतील ॥ १४ ॥ पुढें पुढें लुप्ताचार । आश्रमधर्मवर्णसंकर । ऐसें कलिकाळीं होणार । काळविचार तो ऐसा ॥ ११५ ॥ त्याहीमाजि कालविशेष । अयन ऋतु मास पक्ष । तिथि वासर[1] ऋक्ष[2] निर्दोष । ज्या कर्मास जें युक्त ॥ १६ ॥ पैत्र्[3]कर्मोदित जो काळ । तो देवकर्मीं अमंगळ । शांतिकपौष्टिककर्म सकळ । समर्यी सफळ यथोक्त ॥ १७ ॥ तैशींच द्रव्यें पृथक् पृथक् । चरु[4] पुरोडाश[5] बस्त[6] घोटक[7] । आज्य पिष्ट क्षालनोदक । ऐशीं अनेक विधिप्रणीत ॥ १८ ॥ अग्निसूर्यसोमप्रमुख । यज्ञदेवता पृथक् पृथक् । नामलिंगक्रियासूचक । मंत्र पृथक् बोलिले ॥ १९ ॥ सव्यें अपसव्यें व्यत्यासें । तंत्रही पृथक् अनारिसें । ऋत्विजही तदुद्देशें । न्यूनाधिक्यकल्पना ॥ १२० ॥ आहवनीय दक्षिणाग्नि । गृहपति सभ्य‡ आवसथ्य वह्नि । नानाइष्टि नानाभिधानीं । पृथग्विधानीं पावक ॥ २१ ॥ प्रधानदेवताही पृथक् । विविध यजमान कामनात्मक । क्रियाकलाप क्रतु अनेक । धर्म निष्टंक तद्वदित ॥ २२ ॥ क्रतु करितां कोणी एक । देशकालद्रव्यादिक । हें अवघेचि पृथक् पृथक् । विधि सम्यक् अचुक हा ॥ २३ ॥ यथोक्त देशीं काळीं याग । देवतापरत्वें द्रव्यविभाग । तेणें यज्ञफल आतुडे सांग । होय व्यंग वैगुण्यें ॥ २४ ॥ ऐसें असतां विधिबंधन । तरी गोवळां केंवि दीजे अन्न । म्हणाल तरी हा श्रीभगवान । स्मरणें यज्ञफलदाता ॥ १२५ ॥ कृतयुगीं सत्यव्रती । म्हणोनी भगवल्लीला वोळखती । तेचि कलिकाळसंप्राप्ति । जन नोळखती हरिमहिमा ॥ २६ ॥ अहं क्रतुरहं यज्ञः । देशकालादि संपूर्ण । एवं हरिमय हें जाणोन । करिती अर्पण हरिप्रेमें ॥ २७ ॥ जेवीं मुखीं घालितां ग्रास । जीवचैतन्या होय तोष । तेणें करणसमुच्चयास पोष । कीं तो अशेष तन्मय ॥ २८ ॥ देशकालादि अवघें तैसें । भगवन्मयचि स्वयंभ असे । तो श्रीकृष्ण गोपवेशें । नेणती पिसे कर्मठ ॥ २९ ॥ कलिकल्मषें ज्ञानदृष्टि । लोपूनि कर्माची परिपाटी । पूर्वप्रवाहें करिती इष्टि । भगवत्तुष्टि नेणोनी ॥ १३० ॥

तं ब्रह्म परमं साक्षाद्भगवंतमधोक्षजम् । मनुष्यदृष्ट्या दुष्प्रज्ञा मर्त्यात्मानो न मेनिरे ॥ ११ ॥

ओं तत्सन्निर्देश[8]वचन । ब्राह्मण* वेद आणि यज्ञ । त्रिविध[9] ब्रह्म जें अभिन्न । तो श्रीभगवान अधोक्षज ॥ ३१ ॥ साक्षात्परब्रह्म निर्गुण । प्रणवाकृति तेंचि सगुण । ब्राह्मण† वेद आणि यज्ञ । त्रिधा अभिन्न त्रयीचर्या ॥ ३२ ॥ जो हा अनंतगुणपरिपूर्ण । ज्याहूनि अध अक्षजज्ञान । ब्रह्मादि देवता अक्षगण । नेणती म्हणोन अधोक्षज ॥ ३३ ॥ ज्याचिया ऐश्वर्यसत्तायोगें । माया अजड-जडात्मक जागे । तेथें त्रैगुण्य यथाविभागें । विविधा रंगें गुजबुजी ॥ ३४ ॥ त्या परब्रह्मा भगवंतातें । ब्राह्मण नाहींच झाले मानिते । मनुष्यबुद्धि जाणोनि चित्तें । गोरक्ष म्हणोनि हेळिलें ॥ १३५ ॥ जन्मले असती वैश्ययोनी । असंस्कृत गोरक्षपणीं । अन्नें याचिती मध्याह्नीं । क्षुधेची ग्लानि

पाठभेद — ‡ ग्राहपत्य ( मुंगीप्रत ); ग्रहपती ( उमरखेडप्रत ). * देव ( मुंगीप्रत ) † देव ( मुंगीप्रत ).

१ दिवस. २ नक्षत्र. ३ पितरांस उद्देशून केलेलें. ४ हवन करण्यास योग्य पाक. ५ यवाच्या पिठाची पोळी ज्या तुपांत बुडवून यज्ञ करितात तें तूप. ६ बोकड. ७ घोडा. ८ उच्चार करणें. ९ ॐ, तत् आणि सत् असें तीन प्रकारचें. १० ब्रह्मरूप.

निरसावया ॥ ३६ ॥ आम्ही वेदशास्त्रसंपन्न । पात्रानिर्णयविचक्षण । यज्वे त्रैविद्याभिज्ञ । श्रेष्ठ सर्वज्ञ महंत ॥ ३७ ॥ श्रेष्ठत्वगर्वें प्रज्ञा दुष्ट । म्हणोनि नेणती ब्रह्म प्रकट । मानूनि सामान्य फलकट । नेदिती स्पष्ट उत्तरही ॥ ३८ ॥

न ते यदोमिति प्रोचुर्न नेति च परंतप । गोपा निराशाः प्रत्येत्य तथोचुः कृष्णरामयोः ॥ १२ ॥

कृष्णसंवगडियां लागुनी । ऐशिया बुद्धी अनादरूनी । आहे नाहीं या प्रतिवचनीं । मौन धरूनि राहिले ॥ ३९ ॥ ऐकोनिही कृष्णमहिमान । न अंगीकरिती‡ गोपवचन । नाहीं म्हणोनि प्रतिवचन । ते ब्राह्मण न देती ॥ १४० ॥ शत्रुतापना परीक्षिति । याज्ञिक सगर्व दुर्मति । गोवळांशीं न बोलती । मग ते जाती निराश ॥ ४१ ॥ भणगापरी वाढवेळ । तिष्ठत राहिले पशुपाळ । मग निराश क्षुधाकुळ । गेले बेंबळ हरीपाशीं ॥४२॥ जाऊनि ते रामकृष्णापुढें । वृत्तांत सांगती संवगडे । ते ऐकोनिया निवाडे । हास्य गाढें[१] हरी करी ॥ ४३ ॥

तदुपाकर्ण्य भगवान् प्रहस्य जगदीश्वरः । व्याजहार पुनर्गोपान् दर्शयन् लौकिकीं गतिम् ॥ १३ ॥

सकळजगाचा ईश्वर । म्हणोनि जाणे सर्वांतर । भगवान् षड्गुणऐश्वर्य धर । बोले उत्तर गोपेंशीं ॥ ४४ ॥ अहो ऐशी लौकिक गति । प्रवर्तलीया याचक वृत्ति । कोणा नव्हे लघुत्वप्राप्ति । महत्त्वोपहती[२] न पवतां ॥ १४५ ॥ श्रीराम समुद्रा याचितां मार्ग । तो उपेक्षी मानोनि उबग । तेणें होऊनी महत्त्व भंग । लघुत्व आंगा शिवतलें[३] ॥ ४६ ॥ द्रोणाद्रीतें अंजनीसुतां[४] । रामाज्ञेनें औषधी याचितां । महत्त्व जावोनी पावे लघुता । परी न कळे पर्वता कपिमहिमा ॥ ४७ ॥ तथापि निजकार्या कारणें । महत्त्वहानीहि न गणूनि मनें । पुन्हा प्रवर्तती शाहाणे । विरक्तपणें नुबगति ॥ ४८ ॥ ऐशी बोधूनि लौकिकी गति । संवगडीयांतें कमलापति । कथोनियां रहस्ययुक्ति । पाठवी पुढती याच्ञेतें ॥ ४९ ॥

मां ज्ञापयत पत्नीभ्यः ससंकर्षणमागतं । दास्यन्ति काममन्नं वः स्निग्धा मय्युषिता धिया ॥ १४ ॥

एका गडीहो रहस्यखूण । तुम्हीं पत्नीशाळे जाऊन । माझें करावें परिज्ञान । गुणवर्णन करूनी ॥ १५० ॥ संकर्षणेशीं चक्रपाणी । पातला आहे ये वनीं । ऐसे यज्वपत्न्यांचे कानीं । मंजुळ वचनीं निवेदा ॥ ५१ ॥ तुम्हांस पूर्वीं जेविं ब्राह्मणी । उपेक्षिले अवगणूनि । तैशा ज्ञणे मानाल पत्नी । त्या मद्भजनीं अनुरक्ता ॥५२॥ धन्य यज्वपत्न्यांचें प्रेम । स्वमुखें वर्णी पुरुषोत्तम । सनकादि विरक्त जे निष्काम । तेही सकाम ज्या प्रेमा ॥ ५३ ॥ संवगडियांतें म्हणे हरी । यज्वपत्न्यांची भजनपरी । त्या देहमात्र वर्तती घरीं । येर मजमाझारीं सर्वस्वें ॥ ५४ ॥ अंतःकरणें

**पाठभेद** —‡ अंगिकारिती ( मुंगीप्रत ).

१ मोठें. २ मानहानि. ३ शिवलें. ४ मारुति.

मजमाजीं लीन। तेणें समाधि सुखसंपन्न। मनें चिंतितां मनमोहन। त्या उन्मन मद्रूपीं ॥१५५॥ बुद्धि करोनि सदाचारीं। वर्ततां दिसती घरोघरीं। परि त्या मजमाजीं प्रेमभरीं। साक्षात्कारीं समरसल्या ॥ ५६ ॥ मनःकल्पित हा संसार। तन्निश्चयीं बुद्धिचतुर। तिनें केलें मजमाजीं घर। नुसधें शरीर गृहकृत्यीं ॥ ५७ ॥ मुख्य मनबुद्धि या दोन्ही। वसिन्नली माझ्या ठाईं। प्राणेंद्रियादि तत्प्रवाहीं। वर्ततां देहीं अनोळख ॥ ५८ ॥ मातें लक्षोनि पदार्थमात्रीं। बुद्धि निश्चयातें जैं करी। चित्त अनुसंधानीं धरी। तदनुसारी अहंता ॥५९॥ प्राणप्रवाह मांदूळेती। तन्मय इंद्रियांच्याही* वृत्ति। प्रतीतिरूढ मदात्मस्थिति। रिती भ्रांति भवभानीं ॥ १६० ॥ ऐशा मदात्मवेधेंकरूनि। माझ्या ठाईं यज्वपत्नी†। राहिल्या होत्सात्या बाह्य सदनीं। प्रपंचभानीं कलिवरें ॥ ६१ ॥ यालागिं स्नेहाळा माझ्या ठायीं। त्या मजवेगळें प्रियतम नाहीं। माझें नाम ऐकतां पाही। सर्वस्वही अर्पिती ॥ ६२ ॥ यथापेक्षित जें जें अन्न। तुम्हांसी अर्पिती संपूर्ण। ऐसें ऐकतां भगवद्वचन। गडी तोषोन चालिले ॥ ६३ ॥ यज्वपत्न्या§ पाहों नयनीं। ऐशी आवडी अंतःकरणीं। अन्नयाच्ञा भगवद्वचनीं। आनंदोनी चालले ॥ ६४ ॥

गत्वाऽथ पत्नीशालायां दृष्ट्वाऽऽसीनाः स्वलंकृताः। नत्वा द्विजसतीर्गोपाः प्रश्रिता इदमब्रुवन् ॥ १५ ॥

यज्वयुवती‡ प्रेमकथन। भगवन्मुखें करूनी श्रवण। त्यानंतरें गोपगण। पत्नीभुवन पावला ॥ १६५ ॥ जावोनि पत्नीशाळेप्रति। देखते झाले यज्वयुवति। हरीनें वर्णिल्या जैशा रिती। त्या ते स्थिती पूर्णत्वें ॥ ६६ ॥ श्रवण रंगले हरिकीर्तनीं। हरिगुणकथनीं रंगल्या वाणी। नेत्र गुंतले हरिरूपध्यानीं। कृष्णालिंगनीं त्वगिंद्रियें ॥ ६७ ॥ कृष्णप्रेमरसाची गोडी। घेऊनि रसना झाली वेडी। मोडली बाह्य विषयांची आवडी। दिधली बुडी हरिनामीं ॥६८॥ कृष्ण नामामृतस्वादें। जीवशिवांशीं निघती दोंदें। नाचो लागलीं परमानंदें। पूर्णत्व स्फुंदे घडमोडी ॥ ६९ ॥ कृष्णपादपद्मामोद। तेणें घ्राणासि लागला वेध। कर्मेंद्रियां प्रवृत्तिच्छंद। ज्या गोविंदमय रुचला ॥१७०॥ अलंकरणीं सुमंडिता। करणव्यापारीं पूर्णता। बैसल्या असती स्वानंदभरिता। भगवन्निरता सौभाग्यें ॥ ७१ ॥ देखोनि निवाले अंतरीं। नमस्कारोनि विप्रनारी। परम नम्र मधुरोत्तरीं। वृत्तांत कथिते जाहले ॥ ७२ ॥

गोपा ऊचुः — नमो वो विप्रपत्नीभ्यो निबोधत वचांसि नः।
इतोऽविदूरे चरता कृष्णेनेहेषिता वयम् ॥ १६ ॥

विप्रपत्नीहो तुम्हांकारणें। गोपाळ अवघे करितसों नमनें। येथें आम्हांसी धाडिलें कृष्णें।

पाठभेद— *इंद्रियाच्याही ( उमरखेडप्रत ). †यज्वपत्नी ( उमरखेडप्रत ). §यज्व ( उमरखेडप्रत ). ‡यज्व ( उमरखेडप्रत ).

१ फक्त. २ चिंतन. ३ एकवटून चालणे. ४ यज्ञ करणाऱ्या ऋषींच्या स्त्रिया. ५ जीवात्मा आणि परमात्मा. ६ उद्योगाचा नाद.

आम्हुचीं वचनें परिसावीं ॥ ७३ ॥ अविदूर म्हणिजे समीप वनीं । बलरामेंसीं चक्रपाणी । धेनु चारावयालागुनी । यमुनापुलिनीं पातला ॥ ७४ ॥

गाश्चारयन् सगोपालैः सरामो दूरमागतः । बुभुक्षितस्य तस्यान्नं सानुगस्य प्रदीयताम् ॥ १७ ॥

गाई चारीत होत्साता । सर्वे गोपाळ आणि जेष्ठभ्राता । बहुत दूर झाला येतां । सर्वे न घेतां शिदोरिया ॥ १७५ ॥ कोमल तृणें गोधनें तृप्त । जल प्राशूनि झाल्या स्वस्थ । समुदायेंशीं क्षुधाक्रांत । तेणें येथें पाठविलें ॥ ७६ ॥ तया सानुगा क्षुधिता हरी । सप्रेम सदन्नाचिया परी । वोपूनियां आम्हुच्या करीं । अतिसत्वरीं पाठवा ॥ ७७ ॥

श्रुत्वाऽच्युतमुपायातं नित्यं तद्दर्शनोत्सुकाः । तत्कथाक्षिप्तमनसो बभूवुर्जातसंभ्रमाः ॥ १८ ॥

ऐसी गोपांची मंजुळवाणी । पडतां *यज्वपत्न्यांचे काना । समीप आला चक्रपाणी । हें ऐकोनी हरिखेल्यां[१] ॥ ७८ ॥ जो का दुर्लभ सनकादिकां । करिती निगमागम ठाउका । तो पातला मृत्युलोका । सप्रेमसुखा वालभें ॥ ७९ ॥ निर्गुण निर्विकार निरुपम । त्यासीही भुलवी ज्याचें प्रेम । सगुणसाकार परब्रह्म । धावे सकाम भेटीसी ॥ १८० ॥ अनंत कल्प अनिवडपणें । भजती आत्मनिवेदनें । सूर्यासवें अभिन्न किरणें । तेवी अवतरणें त्यां भक्तीं ॥ ८१ ॥ त्याची हेंचि वोळखण । जेवीं उगवतां चंडकिरण । पद्मिनी होती फुल्लारमान । प्रेम अभिन्न उभयत्र ॥ ८२ ॥ तेवी अवतरतां श्रीपरेश । सरिसें अवतरती तदंशें[३] । बाह्य वेगळे दाविती वेश । परि अभिन्न अशेष सप्रेमें ॥ ८३ ॥ परस्परें अविसरपणें । यज्व† पत्न्यांचीं अंतःकरणें । इकडे तैसेची श्रीकृष्णें । केले येणें तत्प्रेमें ॥ ८४ ॥ ऐशा‡ यज्वपत्न्या हरिपदनिरता[४] । हरिदर्शनीं उत्सुकचित्ता । समीप पातलिया अच्युता । झाल्या ऐकतां उताविळा ॥ १८५ ॥ नित्य नूतन कृष्णकथा । परस्परें करिती बैसोनि स्वस्था । अर्था स्वार्था आणि परमार्था । त्याविण सर्वथा नेणती ॥ ८६ ॥ ज्याचे कथेंत निमग्नमनें । तो समीप आला हें ऐकोनि श्रवणें । प्रेमें कळवळूनि अंतःकरणें । चिन्मात्रजीवनें चुबकळल्या ॥ ८७ ॥ वसंतग्रीष्मीं तापलीं मोरें । आनंदती नवघनगजरें । प्रेमें धांवती सामोरें । कीं मधुकरें नवकंजीं[५] ॥ ८८ ॥ नातरी प्रावृट्काळींच्या रातीं । क्रामितां चकोरां अपार खंती । शरत्काळींचा राकापति[६] । जेवि त्यांप्रति तोषद ॥ ८९ ॥ तेंवि अच्युताचेनि आगमनें । आनंदभरित झालीं मनें । प्रेमें संभ्रमें* कवळिती गगनें । प्रपंचभानें विसरल्या ॥ १९० ॥ समीप पातला अच्युत । सराम-सगोप क्षुधाक्रांत । आमुचें अन्न अपेक्षित । हें ऐकोनि त्वरित ऊठिल्या ॥ ९१ ॥

चतुर्विधं बहुगुणमन्नमादाय भाजनैः । अभिसस्रुः प्रियं सर्वाः समुद्रमिव निम्नगाः ॥ १९ ॥

---

पाठभेद :— *ऐकोनी हरिखेल्या ( उमरखेडप्रत ). †यज्व ( उमरखेडप्रत ). ‡ऐशा ( उमरखेडप्रत ). *सप्रेम ( मुंगीप्रत ).
१ संवगड्यांसहित. २ हर्ष पावल्या. ३ त्या परेशाचे अंश. ४ कृष्णचरणीं एकनिष्ठ. ५ नव्या कमलावर. ६ चंद्र.

जाऊनियां पाकशाळे । पात्रें घेऊनि सोज्वळें । अन्नें भरियलीं रसाळें । बहुपरिमळें स्वादिष्ठें ॥ ९२ ॥ लेह्यें[1] चोष्यें[2] भक्ष्यें भोज्यें । अन्नें निर्मिलीं दुग्धें आज्यें । जेवावया त्रिदशपूज्यें[3] । नेती अभोज्यें यजमानीं ॥ ९३ ॥ खाद्यपेयादि पदार्थ । त्यांसि अन्न म्हणणें व्यर्थ । म्हणोनि चतुर्विध हा शब्दार्थ । शुकसमर्थ वाखाणी ॥ ९४ ॥ नानासंस्कारीं संस्कृत । स्निग्ध[4]स्वादसुरभियुक्त । खाद्यपेयादि समवेत । भरिती त्वरित अमत्रकें[5] ॥ १९५ ॥ धातुपाषाणमृदुभाजनीं । बहुविध दिव्यान्नें भरूनी । निघत्या झाल्या गजगामिनी । आत्मा लक्षूनि जेंवि श्रुति ॥ ९६ ॥ तेवीं प्रियतमा कृष्णाप्रति । न धरत सर्वही पवनगति । जैशा सरिता समुद्रा येती । तैशा धांवती निःशंक ॥ ९७ ॥ सांडूनि गृहकृत्यें लेंकुरें । यज्ञविधानानियमोत्तरें । लज्जाभयशंकाव्यवहारें । जाती सत्वरें सांडवल्या ॥ ९८ ॥

निषिध्यमानाः पतिभिर्भ्रातृभिर्बंधुभिः सुतैः । भगवत्युत्तमश्लोके दीर्घश्रुतधृताशयाः ॥ २० ॥

त्यांसि वर्जावया[6] भर्तार । आडवे धांवती सत्वर । म्हणती लंघूनि अध्वर । बाह्य संचार न करावा ॥ ९९ ॥ कर्मभंगाची अर्गळा[7] । घालूनि करिती ते अडखळा । बंधुलज्जापाशें गळा । बांधोनि वेह्लाळा कोंडिती ॥ २०० ॥ भ्रातृवर्गगोत्राभिमानें । वृत्तिक्षेत्रादि धनधान्यें । गोऊनि करिती दृढबंधनें । कां पैशून्य सुहृदादि ॥ १ ॥ कन्यापुत्र स्नेहदोरें । बांधोनि कर्षिती अभ्यंतरें । इतुक्यां उरमंडूनि[8] बलात्कारें । त्या सत्वरें निघाल्या ॥ २ ॥ इत्यादि सर्व ईषणा[9]त्यागें । धांवती वेगें निर्वेध मार्गें । निंदाद्वेष घालूनि मागें । सप्रेमरंगें *निवडल्या ॥ ३ ॥ एवढें काय त्यांचें बळ । राया म्हणसी जरी केवळ । पूर्वीं त्यांहीं बहुत काळ । श्रीगोपाळ प्रिय केला ॥ ४ ॥ विषयमैंदाचें सन्निधान । सांडूनि शमें[10] दमें[11] साधुजन । दृढ विश्वासें सेवूनि पूर्ण । श्रवणमनन साधिलें ॥ २०५ ॥ मधुमक्षिका मधुरसासी । तेवीं आत्मा प्रिय मानसीं । उबग केला विवर्तासी । गुरुदास्यासी विनटोनी ॥ ६ ॥ त्याचेनि मुखें भगवद्गुण । आत्मप्रेमें करितां श्रवण । विसरोनि गेल्या विवर्तभान । सगुण निर्गुण हरिप्रेमें ॥ ७ ॥ एवं असत्प्रपंचरोधें । ब्रह्मात्मैक्यसुखावबोधें । उत्तमश्लोकीं परमानंदें । ज्या स्वच्छंदें अनुसरल्या ॥ ८ ॥ अंतःकरण मनीषा मन । चित्त अहंता करणें प्राण । चिद्रूपीं उपरमलीं संपूर्ण । त्या निर्वाण धृताशया ॥ ९ ॥ मथनें निवडलें नवनीत । जरी ताकाचि माजि वसत । तरी तेणेंशीं अलिप्त । नोहे लिप्त कालवितां ॥ २१० ॥ जळामाजूनि निघे कमळ । परी तें जळाहूनि †वेगळ । धांवे दिगंतीं परिमळ । प्रिय अळिउळें[12] अनुरागें ॥ ११ ॥ तैसें हरिगुण-श्रवणीं प्रेम । रंगलें होतें बहुतजन्म । उत्तमश्लोकीं करूनि धामें[13] । करणग्राम वसिन्नला ॥ १२ ॥ तेणें मुनिपत्न्यांचीं मनें । होतीं श्रीकृष्णीं संलग्नें । कृष्णागमन ऐकोनि श्रवणें । प्रपंचभान

---

**पाठभेद —** * निघाल्या ( मुंगीप्रत ). † वेगळें ( मुंगीप्रत ).

१ चाटण्याचीं. २ चोखण्याचीं. ३ देवास मान्य. ४ मवागी ज्यांत आहे तें. ५ भांडीं. ६ निवारण्यास. ७ अडसर. ८ टाकून. ९ इच्छा. १० विषयापासून मन आवरणे. ११ बाह्येंद्रियांचें विषयापासून निवारण. १२ भुंग्यांचा समूह. १३ आश्रय.

सांडवल्या ॥ १३ ॥ स्वर्मी कुटुंबवत्सल । होत्या यज्ञादिक्रियाशील । कृष्णारुणोदयीं तत्काळ । चेइल्या केवळ हरिप्रेमें ॥ १४ ॥ सूर्योदयीं जैसे पक्षी । नीडें सांडूनि प्रपंचवृक्षीं । धांवती चित्सुखचारयासी । त्या हरीपाशीं तैसिया ॥ २१५ ॥ घेऊनि अन्नांचे संभार । मार्गे धांवती अनावर । जेंवि सरिता सिंधूसमोर । पूरें निर्भर धांवती ॥ १६ ॥ मनें वेधल्या कृष्णवेधें । कृष्णस्मरणें ठेविती पदें । चपळ चौताळती तच्छंदें । श्रीगोविंदें मोहिल्या ॥ १७ ॥

यमुनोपवनेऽशोकनवपल्लवमंडिते । विचरंतं वृतं गोपैः साग्रजं ददृशुः स्त्रियः ॥ २१ ॥

शांतियमुनेच्या उपवनीं । अशोकद्रुमांची दाटणी । अकामअलोभ पुष्पीं पर्णी । नानावृक्ष लगडले ॥ १८ ॥ भूतदयेच्या रसाल वेली । विनयतेचि दाट साउली । संवादाच्या मंदानिलीं । सज्जन मौळि डोलविती ॥ १९ ॥ सत्कीर्तीचा सुमनगंध । वनीं प्रवाहे जो अमंद । द्विरेफां[1]चा कीर्तनानंद । ब्रह्मानंद मंदावी ॥ २२० ॥ नवपल्लवां डोलवी वारा । तेचि समता गमे चामरां । स्वानुभवाच्या सुखसंभारा । अच्युतमहुरां[2] दाविती ॥ २१ ॥ ध्यानस्थ कोकिला मौनव्रतीं । शब्द न करितीच हेमंतीं । कृष्णस्मरणें घुमघुमिती । पारा[3]पतें तन्निष्ठें ॥ २२ ॥ ऐसिये स्वानंद[4]भरीत वनीं । शांतियमुनेच्या उपपुलिनीं । साग्रज सगोप चक्रपाणि । देखती नयनीं मुनिवनिता ॥ २३ ॥ वनीं विहरतां श्रीकृष्णातें । देखत्या झाल्या मुदितचित्तें । तथा लावण्यनटवेषातें । बोधी नृपातें शुकयोगी ॥ २४ ॥ भवविभवातें घालूनि मागां । कृष्णदर्शनीं सानुरागा । आल्या तैशा त्या श्रीरंगा देखत्या झाल्या मुनिपत्न्या ॥ २२५ ॥

श्यामं हिरण्यपरिधिं वनमाल्यबर्हधातुप्रवालनटवेषमनुव्रतांसे ।
विन्यस्तहस्तमितरेण धुनानमब्जं कर्णोत्पलालककपोलमुखाब्जहासम् ॥ २२ ॥

कनकखेव[5]णीं इंद्रनील । कीं चंपकप्रसूनीं अलिउळ । विद्युत्प्रभेमाजि सजल । मेघसुनीळ ज्यापरी ॥ २६ ॥ तेवीं मन्मथनयनाञ्जन । प्रभारंगीं मनमोहन । राजस *पीत परिधान । कं[6]जलोचन कलुशारी ॥ २७ ॥ गं[7]डमंडितकुंडलप्रभा । वरी कुळकुळीत कुंतळशोभा । श्यामसुंदर गगनगाभा । जेवीं चित्प्रभा पांघुरला ॥ २८ ॥ सरळ नासिका सुरंग अधर । वदन वर्तुळ स्वसुखागार । सुकुंद[8]रदन शशिभास्कर । †कंदर्पेंशीं कुरवंडी ॥ २९ ॥ विशाळ भाळ बर्हावतंस । कर्णोत्पळीं शोभाविशेष । विचित्ररंगीं नटवरवेश । मिरवी अशेषदृग्द्रष्टा ॥ २३० ॥ सुंदर हनुवटी कंबुकंठ । श्रीवत्सांक हृदयकपाट । विश्वनिवासीं पटुतर पोट । त्रिव[9]ळीमंडित प्रशस्त ॥ ३१ ॥ पंकजनाभ श्रीवैकुंठ । परिवेष्टित पुरटपं[10]ट । नितंब ऊरु जानु निर्घोटें[11] । जंघा गुल्फा पदकमळें ॥ ३२ ॥

**पाठभेद —** * पीत परिधान ( मुंगीप्रत ). † कंदर्प शरीर ( मुंगीप्रत ); कंदर्पेसी ( उमरखेडप्रत ).

१ भ्रमर. २ मोहर. ३ पारवे. ४ मनाची विकाररहित स्थिति. ५ कोंदणांत. ६ कमलनयन. ७ गाल. ८ कुंदाच्या कळ्यांप्रमाणें दांत. ९ पोटावरील तीन वळ्या. १० जरीचा पीतांबर. ११ संपूर्ण.

वनसुमनांची विचित्र माळा । वरिष्ठ शोभा नवप्रवाळां । धातु नवरंग तेजाळा । रविशशिकळा लोपवी ॥ ३३ ॥ धातु नटनाट्यें चर्चिलेया । प्रसूनपंक्ति तुरंबिल्या । लाजविती रत्नमूल्या । गुंजापुंज सुतेजें ॥ ३४ ॥ गडियांमाजी अनुव्रत । त्यांचे स्कंधीं वाम हस्त । दक्षिणहस्तें जलजें धृत । तें भ्रमवीत कौतुकें ॥ २३५ ॥ लीलेंकरूनि भंवंडी कमळ । हासयुक्त वदनोत्पल । सर्वसाक्षी सकोमल । नयनीं निहाळ कृपेचा ॥ ३६ ॥ ऐशिया कृष्णातें मुनिपत्नी । देखत्या झाल्या सप्रेम नयनीं । आनंदनिर्भर अंतःकरणीं । कवळिती मनीं उल्हासें ॥ ३७ ॥

प्रायः श्रुतप्रियतमोदयकर्णपूरैर्यस्मिन्निमग्नमनसस्तमथाक्षिरंध्रैः ।
अंतः प्रवेश्य सुचिरं परिरभ्य तापं प्राज्ञं यथाऽभिमतयो विजहुर्नरेंद्र ॥ २३ ॥

भव्यशरीरें घेवोनि धांवा । सवेग पावल्या त्या माधवा । वृत्ति मिनल्या ऐक्यभावा । तें तूं भूधवा अवधारीं ॥ ३८ ॥ परमप्रियतम जो परमात्मा । त्याच्या उत्कर्षाची गरिमा । चिरकाळ श्रवणें हृदयपद्मा-। माजीं रुचोनि राहिल्या ॥ ३९ ॥ भक्तकैपक्षें अभ्युदय । प्रत्यवतारीं ऊर्जितें विजय । बहुकाळश्रवणें करितां प्रिय । हृदयीं सदय ठसावला ॥ २४० ॥ तया प्रियतमाच्या विजयकीर्ति । तिहीं केली श्रवणपूर्ति । श्रवणभूषणाची आर्यति । त्या शोभविती सप्रेमें ॥ ४१ ॥ प्रथमयौवनीं रतिरहस्य । कीं *धनकामुका जेंवि परिस । तेंवि मुनिवधूंसी सगुणवेश । ध्यानगर्भींचा प्रगटला ॥ ४२ ॥ मग त्या हरिगुणकर्णभूषणीं । मनें निमग्न झालिया कृष्णीं । पुढतीं लावण्य विग्रह नयनीं । नेती प्राशोनि हृत्कमळीं ॥ ४३ ॥ मग त्या उत्सुका प्रेमबाहीं । निश्चल आलिंगूनि हृदयीं । अनेक जन्मींचा तापत्रयीं । शून्य घालूनि निवाल्या ॥ ४४ ॥ जैशा कर्णोन्मुखा अहंमति । परतोनि प्रज्ञा आळंगिती । सुषुप्तिमाजीं लीन होती । ताप सांडूनि भवजनित ॥ २४५ ॥ कीं प्रज्ञावंत सुशीलगुरु । सदय सुविचार प्रबोधचतुर । ताप सांडोनि साक्षात्कार । लाहोनि निवती सच्छिष्य ॥ ४६ ॥ तेंवी परमात्मप्राप्तिसुखें । अनेकजन्मींचां संसारदुःखें । सांडोनि विश्रांती पावल्या हरिखें । द्वैत पारिखें दवडूनी ॥ ४७ ॥ एवं श्रीकृष्णदर्शनसिद्धि । पावल्या मुनिपत्न्या समाधि । हें जाणोनि कृपानिधि । प्रेमसंवादीं प्रवर्ते ॥ ४८ ॥

तास्तथा त्यक्तसर्वाशाः प्राप्ता आत्मदिदृक्षया । विज्ञायाखिलदृग्द्रष्टा प्राह प्रहसिताननः ॥ २४ ॥

निजात्मदर्शनाकारणें । सर्व कामना त्यजिल्या मनें । तैशा जाणोनि त्या श्रीकृष्णें । हास्यवदनें बोलत ॥ ४९ ॥ शीतोष्णादि क्षुधातृषा । सांडिली स्थूलतनूची आशा । †करणमार्गें तृष्णावळसा ।

**पाठभेद :—** *धनिकामुका ( मुंगीप्रत ). †कारण ( मुंगीप्रत ).

१ शंख. २ गरगर फिरावेणें. ३ सांठा. ४ एकरूप झाल्या. ५ भक्ताचा कैवार. ६ पृथ्वीवर येणें. ७ मोठा. ८ प्राप्ति. ९ हरिगुण हींच कर्णभूषणें. १० प्रेमरूप भुजांनीं. ११ अज्ञान.

*ते विषयाशा सांडिली ॥ २५० ॥ प्राणत्यागें विषया व्याप्ती । कीं धन वेंचुनि जोडणें ‡स्फीति[1] । ते दंभाशा सांडूनि परती । मुनींच्या युवती पातल्या ॥ ५१ ॥ भावी जन्मादि सांसारिक । कीं स्वर्गादि पारत्रिक । अथवा मोक्षश्रीदायक । हे त्यजिली पृथक पुण्याशा ॥ ५२ ॥ एवं आत्मप्रियत्वें निष्काम-प्रेम । निजात्मअभेदें मेघश्याम । पहावया ससंभ्रम । आला उत्तम सद्भावें ॥ ५३ ॥ भक्त कामना धरूनि पोटीं । देवा अर्पी उपचार कोटि । भेदें अर्पोन मुटमुटी । कैसें शेवटीं होईल ॥ ५४ ॥ देव पावेल किंवा न पावे । भक्त धाके येणें भावें । तो भावाचि देवतानावें । काय या द्यावें म्हणतसे ॥ २५५ ॥ भाजी अर्पोनि मागे केंजे[3] । ¶तैशिया भजना देवाचि लाजे । देव मानी भजन-वोझें । भेदें नुमजे देवत्व ॥ ५६ ॥ तैसे नोहे अभेद भजन । परस्परें §अभिनंदन । जेंवि बाळ आंधळें ‖मातेविण । माता त्याविण आंधळी ॥ ५७ ॥ तीर्थगादि अनेक योनी । निष्कामप्रेमा बाळपाळणीं । तैशी अवंचक आवडी मनीं । अभेदभजनी निसर्गें ॥ ५८ ॥ सांडोनिया विषयगोवां[4] । करणसमुच्चय आघवा । सुषुप्तिगर्भीं घेऊनि धांवा । प्राज्ञ खेंवां कवळिती ॥ ५९ ॥ त्या तैशिया मुनिकामिनी । सर्व आशा विसर्जूनी । प्राप्त झाल्या *निजदर्शनीं । हें जाणोनि हरि बोले ॥ २६० ॥ सर्वबुद्धीचा जो साक्षी । स्वप्रकाशें विश्व लक्षी । पूर्णकरुणेच्या कटाक्षीं । हास्यवक्त्रें वदतसे ॥ ६१ ॥

श्रीभगवानुवाच — स्वागतं वो महाभागा आस्यतां करवाम किम् ।
यन्नो दिदृक्षया प्राप्ता उपपन्नमिदं हि वः ॥ २५ ॥

महाभागा हें संबोधन । करूनि आळवी श्रीभगवान । म्हणाल यांचें भाग्य कोण । तें विवरून पहा हो ॥ ६२ ॥ चोरापासूनि सुटला । अक्षत वांचूनि सदना आला । तयासि म्हणती सभाग्य झाला । काय तो वांचला चिरकाळ ॥ ६३ ॥ विषयासारिखे तस्कर । ज्यांचेनि षड्वैरी कठोर । त्यांपासूनि वैराग्यपर । होऊनि सत्वर निघाल्या ॥ ६४ ॥ भगवान स्वमुखें सभाग्य म्हणे । त्यांच्या भाग्यासि काय उणें । अक्षयामृतप्रापिकपणें । त्या श्रीकृष्णें संबोधिल्या ॥ २६५ ॥ †भाग्य-वंत हो म्हणे हरि । तुमच्या आगमनाची परी । कल्याणवंत सर्वप्रकारीं । सुष्ठु आहे कीं सती हो ॥ ६६ ॥ सांडूनि मोहाचें अटव्य । आला म्हणोनि झालां स्तव्य । ऐसें तुमचें भाग्य भव्य । कीं झालों सुसेव्य मी तुम्हां ॥ ६७ ॥ आतां बैसा वो स्वस्थासनीं । काय प्रियतम अंतःकरणीं । तें निरूपा मजलागूनि । चक्रपाणि म्हणतसे ॥ ६८ ॥ काय करूं तें मज सांगा । जें जें अपेक्षित तें तें मागा । मत्प्राप्तीनें तुम्ही सुभगा । निजात्मलिंगा[9] दिदृक्षु[10] ॥ ६९ ॥ आमुचे दर्शनेच्छेंकरूनी । सर्वप्रतिबंध

पाठभेद :— * तेवि आशा ( मुंगीप्रत ). ‡ क्षिती ( मुंगीप्रत ); भ्फती ( उमरखेडप्रत ). ¶ ऐसिया ( मुंगीप्रत ) § अभिवंदन ( मुंगीप्रत ) ‖ माये ( मुंगीप्रत ). * मुनिकामिनी ( मुंगीप्रत ). † सभाग्यवंत ( मुंगीप्रत ).

१ भरभराट. २ गुदद्वार. ३ मोबदला. पहा— ‘ आदरासी मोल नये लावूं केंजे ’ —तुकारामगाथा, ( सं.—क्रैय; प्रा.—केज्ज). ४ बंधन. ५ क्षेम; कल्याण. ६ अक्षय्य मोक्ष. ७ अरण्य. ८ स्तुतीस पात्र. ९ हृदयस्थ ईश्वर. १० पाहण्यास इच्छिणाऱ्या.

निवारूनी । प्राप्त झालां हें मद्भजनीं । संतत रंगोनि साधिलें ॥ २७० ॥ हेंचि तुम्हांसि संपादलें । जें निर्विघ्न मम दर्शन झालें । काय करूं तें सांगा वेहिलें । ‡संपन्नत्वें जाणोनी ॥ ७१ ॥

नन्वद्धा मयि कुर्वन्ति कुशलाः स्वार्थदर्शनाः । अहैतुक्यव्यवहितां भक्तिमात्मप्रिये यथा ॥ २६ ॥

इंद्रियांवांचूनि विषयग्रहण । करूं न शकेचि अंतःकरण । यालागीं विषयांचें प्रियपण । करणालागूनि बोलिजे ॥ ७२ ॥ प्राणवाहें करणें* पुष्ट । प्राणप्रवाह संकल्पनिष्ठ । तो संकल्पही होय प्रविष्ट । लक्षूनि स्पष्ट स्वसाक्षी ॥ ७३ ॥ तो प्राज्ञ[2]ही करण[3]नाशें । [4]वेठे प्रत्यगात्मत्ववेशें । आप्तप्रियत्वें स्वलक्षांशें । प्रेमें भजितसे निष्काम ॥ ७४ ॥ तो आत्मा मी गोपवेशें । नटलों अस्पष्टभूतलेशें । विशुद्धविज्ञानप्रकाशें । कळलें ऐसें ज्यांलागीं ॥ २७५ ॥ ते विवेक† माझ्या ठायीं । विचारें विवरूनि स्वप्रत्ययीं । आत्मप्रियत्वें भजती पाहीं । दृढनिश्चयीं स्वस्वार्थें ॥ ७६ ॥ ईश्वरपर्यंत शुद्ध सत्त्व । उभवी मायेचें लाघव । तिचा जेथें अनुद्भव । तोचि स्वयमेव श्रीकृष्ण ॥ ७७ ॥ ऐशिया अपरोक्षबोधें दृष्टि । यथार्थभक्ति त्यांचे गांठीं‡ । येर भजणें जें विषयासाठीं । ते उफराटी भववेली ॥ ७८ ॥ वृत्तिक्षेत्रार्थसंपन्न । वृद्धवंध्यापुत्ररत्न । जोडल्या करी त्याचें भजन । तत्कल्याण फळलाभा ॥ ७९ ॥ आपुलें वेंचूनि तनु मन धन । इच्छी तयासीच कल्याण । तयावरूनि आपुला प्राण । कुरवंडूनि सांडीतसे ॥ २८० ॥ आत्मा वै पुत्रनामासि । त्या आत्मत्वीं प्रेमा¶ ऐशी । मां जे अपरोक्षकांतदर्शी । यथार्थतैशीं न भजती कां ॥ ८१ ॥ फलाभिलाषरहित भक्ति । अवंचकत्वें संतत गति । हे आत्मत्वींच घडे प्रतीति । अभेद स्थिति अपरोक्ष ॥ ८२ ॥ तरी आत्मत्वींच अभेदभजन । म्हणाल घडेल काय म्हणून । त्या आत्म्याचें श्रेष्ठपण । सर्वांहून तें ऐका ॥ ८३ ॥

प्राणबुद्धिमनःस्वात्मदारापत्यधनादयः । यत्संपर्कात्प्रिया आसंस्ततः को न्वपरः प्रियः ॥ २७ ॥

देहात्मता अधिकरू[5]न । वर्ततां घडे जें कर्माचरण । प्रारब्ध होय तें परिणमोन । तेथ चैतन्य अनुकरे ॥ ८४ ॥ तया चैतन्याचेनि संपर्कें । प्रारब्धजनकें उपकारकें । दारापत्यधनादिकें । प्राप्तिविशेषें प्रिय होती ॥ २८५ ॥ ज्या चैतन्याचेनि सन्निधानें । नाना संकल्प करिजती मनें । त्या मनाच्या अभिरंजनें । कवळी प्रियपणें पदार्थ ॥ ८६ ॥ ज्याच्या संपर्कें बुद्धि शाहणी । विविधां विषयां पारखिणी । प्राणप्रवाह तनुधारिणी । निजाधिकरणीं पटुतर ॥ ८७ ॥ देह आत्मत्वें कवळून । करिती तयाचें अभिमंडन । अनेकपदार्थसंग्रहण । हें बाह्य प्रियपण ज्याचेनी ॥ ८८ ॥ तया प्रारब्धाचिये क्षयीं । चैतन्यसंपर्क उपलयीं । दारापत्यादिप्रियत्वें पाहीं । कोण ते ठायीं कवळिता ॥ ८९ ॥ शरीरपरत्वें दारादिभरण । त्या देहासी उबगती स्वजन । एवं आत्मत्वें चैतन्य । त्याहूनि कोण प्रिय सांगा ॥ २९० ॥ तो मी परमात्मा श्रीकृष्ण । लीलाविग्रही चैतन्यघन ।

**पाठभेद :—** ‡ प्रसंन्नत्वें ( मुंगीप्रत ). * प्राणवाहेकरण ( मुंगीप्रत ); † विवेकी ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ); ‡ पोटीं ( मुंगीप्रत ); ¶ आत्मवित्ते प्राणेंशी ( मुंगीप्रत ); ऐशी ( उमरखेडप्रत ).

१ सत्वर. २ कारणदेह आणि सुषुप्ति यांचा अभिमानी जो आत्मा तो. ३ अज्ञान. ४ वेष्टितो. ५ जीवात्मरूपानें. ६ मानून.

**वैराग्यभाग्यें सुसंपन्न । कृतार्थ* म्हणोन पावलां ॥ ९१ ॥ एथूनि तुमचिये प्राप्तदशे । कर्मबाधेचें नातळे पिसें । मदैकशरणा मत्समरसें । अविनाशतोषें आथिलां† ॥ ९२ ॥ तस्मात्‡ तुम्ही पूर्ण कामा । सती साध्वी यज्ववामा । मदाज्ञेनें निजाश्रमा । निष्कामकर्मा साधा जा ॥ ९३ ॥**

तद्यात साध्व्यो यजनं पतयो वो द्विजातयः । स्वसत्रं पारयिष्यंति युष्माभिर्गृहमेधिनः ॥ २८ ॥

**जाऊनि यज्ञमंडपासी । समाप्ति पावविजे यज्ञासी । तुमच्या योगें भर्तारांसी । सर्वकर्मासी अधिकार ॥ ९४ ॥ यज्ञभोक्ता तूं पूर्णपणें । आम्ही कृतार्थ तव दर्शनें । आतां किमर्थ परतोनि‖ जाणें । कर्माचरण किमर्थ ॥ २९५ ॥ ऐसें न मना वो सुंदरी । ब्राह्मण केवळ कर्माधिकारी तदनुग्रहार्थ संसारीं । श्रुतिनिर्धारीं वर्तावें ॥ ९६ ॥ तुमच्या परिग्रहें करून । झाले गृहमेधी ब्राह्मण । यालागीं वेदाज्ञे प्रमाण । कर्माचरण संपादा ॥ ९७ ॥ ऐसें ऐकोनि हरीचें वचन । सप्रेम यज्वपत्न्यांचें मन । अवियोगाचें प्रतिपादन । करिती पूर्ण विधिवाक्यें ॥ ९८ ॥**

†स्त्रिय ऊचुः — मैवं वचोऽर्हति भवान्गदितुं नृशंसं सत्यं कुरुष्व निगमं तव पादमूलम् ।
प्राप्ता वयं तुलसिदाम पदावसृष्टं केशैर्निवोढुमतिलंघ्य समस्तबंधून् ॥ २९ ॥

**श्रीकृष्णातें यज्वजाया । म्हणती निष्ठुर बोलावया । योग्य नव्हेसि यादवराया । शरण आलिया आम्हुतें ॥ ९९ ॥ निष्ठुरवाक्यें मेघश्यामा । शरणागतांचा भंगे प्रेमा । कोणें शिकविजे हें तुम्हां । तूं जगदात्मा सर्वज्ञ ॥ ३०० ॥ आणि प्रतिज्ञापूर्वक तुझें वचन । जें श्रुतिस्मृतिरूपें प्रमाण । कीं निर्वाणभक्त मदेकशरण । पुनरावर्तन त्या नाहीं ॥ १ ॥ न मे भक्तः प्रणश्यति । ऐशिया तुझ्या अनेकोक्ति । पादप्रपन्ना पुनरावृत्ति । निषेधस्थिति बोलिल्या ॥ २ ॥ यद्गत्वा न निवर्तन्ते । इत्यादि पुनरावृत्तिवर्जितें । अभयवाक्यें श्रीअनंतें । वृथा कैशीं करिजती ॥ ३ ॥ दासी हुआवया आवडी । सांडूनि बंधुवर्गाची गोडी । करूनि तदवज्ञा रोकडी । घातली उडी पदपंकीं ॥ ४ ॥ जेथ रुळती तुलसीदाम । तें दुर्लभ श्रीपादपद्म । केशीं झाडावयाचें प्रेम । तें दास्यकर्म वांछितसों ॥ ३०५ ॥ पायें लोटूनि अवज्ञेवारी । तुलसीदाम तों दिधलें हरि । तें सद्भावें वाहों शिरीं । आम्ही किंकरी होआवया ॥ ६ ॥ करूनि बंधुवर्गाची अवज्ञा । मोडूनि विध्युक्त वेदाज्ञा । प्राप्त झालों तुझिया चरणां । कैंवि शरणां उपेक्षिसी ॥ ७ ॥**

गृह्णन्ति नो न पतयः पितरौ सुता वा न भ्रातृबंधुसुहृदः कुत एव चान्ये ।
तस्माद्भवत्प्रपदयोः पतितात्मनां नो नान्या भवेद्गतिररिंदम तद्विधेहि ॥ ३० ॥

---

**पाठभेद :—** * कृतार्था ( उमरखेडप्रत ). † नाथिला ( मुंगीप्रत ). ‡ ही ओवी मुंगी येथील पोथींत नाहीं. ‖ सदना ( मुंगी ). † यज्ञपत्न्य ऊचुः ( मुंगीप्रत ).

१ यज्ञ करणाऱ्या ऋषींच्या स्त्रिया. २ गृहस्थाश्रमी. ३ माझा भक्त नाश पावत नाहीं. ४ ज्या स्थानीं गेलेला प्राणी पुनर्जन्म पावत नाहीं. ५ त्वां ( तूं ).

आतां ऐकें मेघश्यामा । ज्यांची अवज्ञा करूनि आम्हां । शरण आलिया त्वत्पद्पद्मा । पुन्हा का मा उपेक्षिसी ॥ ८ ॥ अवज्ञा करूनि बंधुवर्गाची । जोडी केली श्रीचरणांची । तेथ गेलिया पुन्हा आमुची । सांगा कैशी प्रतिष्ठा ॥ ९ ॥ विप्रवेदाग्निभगवान् । माता पिता सुहृत्स्वजन । साक्षी करूनि पाणिग्रहण । केलें जाण पतीनें ॥ ३१० ॥ काया वाचा आणि मनें । अर्थें स्वार्थें जीवें प्राणें । भर्त्राज्ञेतें नुलंघणें । ऐसें श्रुतिवचन नेमिलें ॥ ११ ॥ त्या पतीसी तृणावारी । न लेखूनि श्रीमुरारि । आम्ही धांविलों वनांतरीं । घेऊनि शिरीं यज्ञान्नें ॥ १२ ॥ आज्ञाभंग यज्ञभंग । लौकिकमर्यादेचा भंग । करूनि पावलों श्रीरंग । पुढती पांग जरी त्यांचा ॥ १३ ॥ आतां आमुच्या दर्शनें । क्षुब्ध होती त्यांचीं मनें । आमुचीं देखूनियां वदनें । करिती स्नानें सचैलें ॥ १४ ॥ असो भर्तारांची कथा । जन्मकारणें माता पिता । आम्हां देखोनि कांतत्यक्तां । मानिती वांतासारिखें ॥ ३१५ ॥ पोटीं जन्मले जे कुमर । आम्हां मानूनि त्यक्ताचार । आमुच्या मृत्यूचे विचार । निरंतर विवरिती ॥ १६ ॥ *पोटीं जन्मलीं कन्यारत्नें । निर्भर्त्सिती तीं प्रयत्नें । बंधुवर्ग मानिती उणें । गोत्रज जिणें धिक्कारिती ॥ १७ ॥ आप्तवर्गाची ऐशी परी । पिशुन सोयिरे संसारी । यांवेगळा अंगीकारी । कोण धरित्रीवरि सांगा ॥ १८ ॥ ज्यांचें त्यांहीं उपेक्षिलें । न वचे कोणीं संरक्षिलें । पत्र वृक्षाचें तूटलें । न वचे जडलें अन्य द्रुमीं ॥ १९ ॥ काम क्रोध लोभ मोहो । मदमत्सरादि शत्रुसमूहो । दमितां अरिंदम महाबाहो । तो तूं नाहो कमलेचा ॥ ३२० ॥ अरिंदम हें संबोधन । तुज एकातें शोभायमान । येरां प्रतिष्ठाविशेषण । नोहेचि जाण अन्वर्थ ॥ २१ ॥ अरिंदमा श्रीअनंता । आदिपश्चात्सर्ववेत्ता । याकारणें आमुची कथा । विवरीं चित्तामाजिवडी ॥ २२ ॥ मागें उरला नाहीं थार । पुढें नेदिसी तूं आधार । वाक्यें बोलसी निष्ठुर । कोण विचार तैं आमुचा ॥ २३ ॥ तुझिया पदकमलाचीं अग्रें । तेथें आमुचीं शरीरें । पडलीं असतां दंडाकारें । गत्यंतरें न चिंतूं ॥ २४ ॥ जेव्हां भर्तार टाकिले । तेव्हांचि इहसुख अंतरलें । यज्ञविधीतें उल्लंघिलें । तेव्हां गेलें आमुष्मिक ॥ ३२५ ॥ आतां स्वपादशरणां आम्हां । न लंवीं इहामुष्मिककामा । निजचरणांचा देऊनि प्रेमा । दास्यकर्मा अनुमोदीं ॥ २६ ॥ आम्ही त्वच्चरणाच्या दासी । होऊनि रंगों सप्रेमेंशीं । ऐसें करावें हृषीकेशी । अन्यगतीसि नेदूनी ॥ २७ ॥ ऐसें ऐकोनि श्रीभगवान । षड्गुणैश्वर्यसंपन्न । अशेष अभिप्राय लक्षून । बोले वचन तयांसी ॥ २८ ॥

श्रीभगवान् उवाच — पतयो नाभ्यसूयेरन्पितृभ्रातृसुतादयः ।
लोकाश्च वो मयोपेता देवा अप्यनुमन्वते ॥ ३१ ॥

भर्तारादि स्वजन वर्ग । म्हणाल आमुचा करिती त्याग । विधिलंघनें यज्ञभंग । म्हणाल स्वर्ग

पाठभेदः— * मुंगीप्रतींत या ओंवीचे चरण पुढें-मागें झाले आहेत.

१ ताचेदारी. २ वस्त्रासहित. ३ नवऱ्याला सोडिलें ज्यांनीं त्या. ४ ओकारी. ५ दोष बाहेर काढणारे. ६ वद्य. ७ पति. ८ यथार्थ. ९ परलोक. १० लावूं नको.

अंतरला ॥ २९ ॥ लोकीं झालों म्हणाल निंद्य । मत्पादप्रेम मानाल हृद्य[1] । हें अनिष्ट इष्टत्वें फळेल सद्य । मी गोविंद तुष्टल्या ॥ ३३० ॥ सर्वांमाजीं मी वसें आत्मा । पदार्थमात्रीं तद्गतप्रेमा । यालागीं न निंदिती कांत तुम्हां । या निजवर्मा जाणावें ॥ ३१ ॥ पतिप्रेमा तुमच्या ठायीं । असतां सुहृद आप्त ते कायी । माता पिता बंधु तेही । पूर्ण स्नेहें वोळगती ॥ ३२ ॥ तेव्हां इहलोकींच्या *सुसंपत्ति । पूर्विल्याहूनि पूर्णस्थिति । कोटिगुणें सुखावाप्ति । तुम्हांसि करिती मद्द्वारें ॥ ३३ ॥ यज्ञरूप जो मी हरि । त्या मज भजलां परमादरीं । यज्ञसांगता सर्वां शिरीं । तुम्हीं निर्धारीं साधिली ॥ ३४ ॥ माझे गोपाळ आघवे । देवसमूह हे जाणावे । माझे आज्ञेच्या लाघवें । तुमच्या दैवें पातले ॥ ३३५ ॥ इहीं याचितां तुम्हांसि अन्नें । तुम्हीं केलीं कृष्णार्पणें । यालागीं देवही प्रसन्नपणें । तुमच्या यज्ञें तुष्टती ॥ ३६ ॥ यज्ञसिद्धीचें विहित फळ । †ते ते भोगाल लोक अमळ । मी तुष्टल्या श्रीगोपाळ । सर्व अनुकूळ सर्वदा[2] ॥ ३७ ॥ दासी होऊनि चरणपद्मीं । प्रेमा वांछिला ‡जो कां तुम्हीं । त्याचें रहस्य हृदयपद्मीं । सांगेन जें मी तें ठेवा ॥ ३८ ॥

न प्रीतयेऽनुरागाय ह्यंगसंगो नृणामिह । तन्मनो मयि युंजाना अचिरान्मामवाप्स्यथ ॥ ३२ ॥

मत्स्या न टाकवे जीवन । तैसें टाकूं न शकां चरण । मद्वियोगें जाती प्राण । म्हणोनि ग्लानि जरि मानां ॥ ३९ ॥ तरी हा भौतिक[3] अंगसंग । न लवी निरुपाधि अनुराग । म्हणाल सोपाधि तऱ्ही चांग । विषयसंग घडेल ॥ ३४० ॥ तरी मनाची असतां अनावडी । देहसंगीं कैंची गोडी । मन भांबावे विषयवोढी । स्वसुख मोडी स्वतःसिद्ध ॥ ४१ ॥ असतां निद्सुरी कामिनी । भर्तार आला प्रवासींहूनी । अंगसंगें गजबजूनी । शंखध्वनी करीत उठे ॥ ४२ ॥ जार तस्कर झोंबला म्हणे । इच्छी सक्रोधें धांवणें । तोचि ओळखिल्या निजमनें । कवळी मौनें निजशेजे ॥ ४३ ॥ किंवा असतां देशांतरीं । मानसप्रेमें अभ्यंतरीं । आळंगिती परस्परीं । स्वप्नामाझारीं कीं नाहो ॥ ४४ ॥ तैसाचि मातापुत्रांच्या ठायीं । मानसप्रेमाचि मुख्य पाहीं । मनावेगळा देहोदेहीं[4] । झगडतां नाहीं सुखलाभ ॥ ३४५ ॥ मनुष्यासी जीवलोकीं । सर्व मनाची वोळखी । मनचि हेतु सुखीं दुःखीं । गोष्टी ठाउकी असों द्या ॥ ४६ ॥ याकारणें यज्वसती । माझ्या ठायीं निजविश्रांति । मनेंचि भोगितां अहोरात्री । सद्यः[5] मत्प्राप्ति पावाल ॥ ४७ ॥ करूनि देहाचें सन्निधान । तुझ्या ठायीं योजूं मन । म्हणाल तरी ‖हें न घडे वचन । ऐका विवरूनि सांगतों ॥ ४८ ॥

श्रवणाद्दर्शनाद्ध्यानान् मयि भावोऽनुकीर्तनात । न तथा सन्निकर्षेण प्रतियात ततो गृहान् ॥ ३३ ॥

ऐकोनि स्वर्गींचें विचित्र सुख । करिती मोदादीं शतमख । सन्निध हृदयींचें चित्सुख । सांडिती मूर्ख सलगीनें ॥ ४९ ॥ नित्य सूर्याचें दर्शन । तेथ सादर न होती नयन । दुर्लभ राहूचें

पाठभेद :— * सुसंपत्ति ( मुंगीप्रत ). † तेणें ( मुंगीप्रत ). ‡ ज्या ( मुंगीप्रत ). ‖ ते ऐका ( मुंगीप्रत ).
१ मनोरम. २ अनुकूल होतील. ३ पंचभूतांसंबंधी. ४ प्रत्येक देहांत. ५ तत्काल.

म्हणून । पाहती ग्रहण सप्रेम ॥ ३५० ॥ गृहीं असतां अंगनारत्न । परवनितेचें करिती ध्यान । ऐकोनि त्रिवेणीमहिमान । तनु संपूर्ण कर्वेतिती ॥ ५१ ॥ यालागीं श्रवणीं दर्शनीं ध्यानीं । प्रेमा वाढे अनुकीर्तनीं । तैसा प्रेमा सन्निधानीं । सहसा मनीं न राहे ॥ ५२ ॥ मलयाचळींच्या किरात-जनेंनी । चंदन कलिपती पचनेन्धनीं । किंवा गंगाजीवन शौचाचरणीं । अपानशोधनीं तटस्थां ॥५३॥ म्हणोनि सती हो मद्गुणश्रवणें । रंगलां चिरकाल कीर्तनें । तणें निवालां मद्दर्शनें । निष्कामपुण्यें मत्प्राप्ति ॥ ५४ ॥ आतां हेंचि ध्यानसुख । भोगावया भावपूर्वक । माझ्या ठायीं मनचि एक । तुम्ही निष्टंक ठेऊनी ॥ ३५५ ॥ सुखें जाइजे सदनाप्रति । विध्युक्त भजोनि आपुले पति । करितां यज्ञाची समाप्ति । मत्प्रेम चित्तीं असों द्या ॥ ५६ ॥ जैसें श्रवणें दर्शनें ध्यानें । प्रेम वाढे मत्कीर्तनें । ऐसें न वाटे सन्निधानें । ये निजखुणे जाणावें ॥ ५७ ॥

श्रीशुक उवाच- इत्युक्ता विप्रपत्न्यस्ता यज्ञवाटं पुनर्गताः ।
ते चानसूयवः स्वाभिः स्त्रीभिः सत्रमपारयन् ॥ ३४ ॥

शुक म्हणे गा परीक्षिति । ऐसें बोलोनि जगत्पति । धाडिता झाला गृहाप्रति । पावन युवति विप्रांच्या ॥ ५८ ॥ तिहीं हें ऐकोनि श्रीकृष्णवचन । परतोनि ठाकिलें यज्ञसदन । पाहतां निज-पत्नींचें मन । आनंदोनि हरिखेले ॥ ५९ ॥ ते ते ब्राह्मण आपुलाल्या स्त्रिया । परम साध्वी जाणोनियां । तदवलंबें यज्ञकार्या । सांगतया संपविती ॥ ३६० ॥ पूर्विलाहूनि कोटिगुणें । पतिस्नेहें परिलालनें । देखोनि ऋषिपत्न्यांचीं मनें । सुखसंपन्नें इहभोगीं ॥ ६१ ॥ आपुल्या ठायीं दोषदृष्टि । कांत कल्पान्तीं न धरिती पोटीं । अनसूयत्वें गृहरहाटी । ऐशी गांठी हरिवरें ॥ ६२ ॥

तत्रैका विधृता भर्त्रा भगवंतं यथाश्रुतम् । हृदोपगुह्य विजहौ देहं कर्मानुबंधनम् ॥ ३५ ॥

अपूर्व ऐकें गा भारता । एकी ब्राह्मणी वना जातां । जाऊं नेदी तिचा भर्ता । धरिली तत्त्वता सक्रोधें ॥ ६३ ॥ तुज म्यां गृहस्थाश्रमासाठीं । पड्विधकर्माची राहटी । चालवावया बांधिली गांठी । केंवि सैराटी धांवसी ॥ ६४ ॥ ऐकोनि सक्रोध पतीचें वचन । विशेष देहा निर्बंधन । भगवद्रूप होतें श्रवण । तैसें ध्यान चिंतिलें ॥ ३६५ ॥ ते ध्यानींची भगवन्मूर्ति । आलिंगूनि सप्रेम भक्ति । तनु वोपुनि कांताहातीं । निजविश्रांति पावली ॥ ६६ ॥ जेणें चाले कर्मसमूह । तो हा पांचभौतिक देह । घेईं म्हणोनि त्यजिला पहा हो । कृष्णीं स्नेह गोउनी ॥ ६७ ॥ मोहें ब्राह्मण चाकाटले । अंत्येष्टीतें प्रवर्तले । हें आश्चर्य नृपा कथिलें । पुढें वर्तलें कथीतसे ॥ ६८ ॥

भगवानपि गोविंदस्तेनैवान्नेन गोपकान् । चतुर्विधेनाशयित्वा स्वयं च बुभुजे प्रभुः ॥ ३६ ॥

१ प्रयागक्षेत्रीं गंगा, यमुना, सरस्वती या तीन नद्यांचा झालेला संगम. २ मिळे स्त्रिया. ३ यज्ञसदनांत राहिल्या. ४ गुणाच्या ठिकाणीं दोषारोप न करतां.

तंव येरीकडे मेघश्याम । नीपकदंब कल्पद्रुम । छाया पाहोनि परम रम्य । अनिम्न सम भूभाग ॥ ६९ ॥ तेथ बैसोनि गोपपंक्ति । मध्यें बळराम श्रीपति । पात्रें मांडूनियां निगुतीं । पैरिवेषिती[1] संवगडे ॥ ३७० ॥ आणूनिया यमुनाजळ । पात्रें प्रोक्षिलीं निर्मळ । प्रतिचक्षूंत शशिमंडळ । तेंवि निर्मळ चरु पात्रीं ॥ ७१ ॥ सोलीव मुगांचें त्यावरी सूप[2] । भोंवतीं व्यंजनें[3] समीप । लेह्यचोष्यादिकें अमूप । कोशिंबिरी चटणिया ॥ ७२ ॥ कूष्मांण्डवटक[4]लवणशाका[5] । तीळ अजाजी[6] मरीच[7]वटिका । पर्पट[8] शुष्क काचऱ्या पाचका । घृतपाचिता कुरवडिया ॥ ७३ ॥ येरीं भागीं बारा क्षिरी । सदुग्धा गोधूमविकारी । नीवार[9]गर्भ सशर्करीं । नानापरी पायसें ॥ ७४ ॥ महाराष्ट्र-पूरणाचिया पोळ्या । सर्वां प्रियकर भाळ्याभोळ्यां । तैलाज्यपाचिता वेगळ्या । तेलवरिया सगर्भा ॥ ३७५ ॥ गुर्जरदेशींचा लाडू चुरमा । गडी वाढिती मेघश्यामा । मांडे पुरिया अतिउत्तमा । साकरफेण्या अनारसे ॥ ७६ ॥ घाऱ्या घारगे गुळवरिया । वाराणसीचिया लुचुया । विचित्र गयेच्या साखरोळिया । शुभ्र पोळिया प्रयागींच्या ॥ ७७ ॥ रुमीवा दाळीचे दहिंवडे । अंबवडे चिंबवडे । विचित्र मिरियांचे मिरवडे । कोरवडे क्कथिकाक्त ॥ ७८ ॥ बहुप्रकारीं शष्कुलिया[10] । विचित्रसुद्रव्यें भरिलिया । गुडशर्करा पूर्णाथिलिया । परिवेषिलिया समपात्रीं ॥ ७९ ॥ लाडुवांचिया अनेक परी । शर्करागोधूमाज्यविकारीं । चणक[11]मिश्रित परोपरी । नानाबीजें फळगर्भ ॥ ३८० ॥ कदळीआम्रपनसफळें । आर्द्रें फोडूनि नारिकेळें । मधुपाचितें अतिरसाळें । चूतद्राक्षें तिंतिणी ॥ ८१ ॥ सद्यस्तप्तें एकें थिजलीं । साजूक नवनीतें गोठलीं । एकें अर्ध बोथिजलीं[12] । संस्कारिलीं कर्पूरें ॥ ८२ ॥ ऐशिया घृतीं भरले द्रोण । कर्दळीचे चतुष्कोण । साय शर्करा संपूर्ण । सर्वां समान वाढिल्या ॥ ८३ ॥ मग म्हणोनि कृष्णार्पण । यज्ञभोक्ता जनार्दन । ऋषिपत्न्यांचें भाग्य धन्य । सप्रेम अन्न हरि जेवी ॥ ८४ ॥ ग्रासोग्रासीं भोक्ता हरि । संवगडे म्हणती जयजयकारीं । ग्रास घेती परस्परीं । आनंदगजरीं जेविती ॥ ३८५ ॥ अन्नें रुचाविती मानवती । जें जें लागेल तें तें घेती । पुनः पुनः परिवेपिती । स्वाद सांगती येरयेरां ॥ ८६ ॥ साजुकतक्राची स्वादिष्ठ क्कथिका[13] । जीरक मरीच रामठ[14] भुरका । लवणशुंठीसहित धनिका[15] । चणकपिष्टसंयुक्ता ॥ ८७ ॥ मध्यें मध्यें उष्णोष्ण । गडी वाढिती करूनि प्रश्न । सर्वांमाजि भोक्ता कृष्ण । न्यून कोणा होंनेदी ॥ ८८ ॥ रामेश्वरींचें तिंतिणीसार[16] । चिरकाळ क्कथित भेषजाकार । भोजनीं प्राशितां सर्व शरीर । घामें झरझर पाझरे ॥ ८९ ॥ दधि स्वादिष्ठ यशोदाकरींचें । तक्र साजुक गौळणीघरींचें । गडी वाढिती तैशिये परीचें । मुनिअध्वरींचें वधूदत्त ॥ ३९० ॥ अग्नि वरुण कां गृहपति । सूर्यसोमादि सुरपति । मनसोद्दिष्ट[17] प्रजापति । पावले तृप्ति हरिवदनें ॥ ९१ ॥ ऋषिपत्न्यांचा प्रेमा धन्य । ज्यांचेनि अन्नें जनार्दन । तृप्ति पावतां अनंत यज्ञ । सांग संपूर्ण साधले ॥ ९२ ॥ मग* प्राशूनि यमुनाजळें । हस्त-

**पाठभेद :—** * मुंगीप्रतीत या ओवीचे चरण मागें-पुढें झाले आहेत.

१ वाढितात. २ वरण. ३ चटण्याकोशिंबिरी. ४ कोहाळ्याचे वडे. ५ लोणचें. ६ जिरें. ७ मिरीं. ८ पापड. ९ देवभात. १० करंज्या. ११ हरभरे. १२ पातळ केलेलें. १३ कढी. १४ हिंग. १५ कोथिंबीर. १६ चिंचेचें सार. १७ मनांत चिंतिलेलें.

पादवदनकमळें । प्रक्षाळूनि गोपमेळें । घेती तांबूल मुखशुद्धि ॥ ९३ ॥ जवादीकस्तूरी सुपरिमळा । केशरचंदन चर्चिती भाळां । कंठीं सुगंध सुमनमाळा । परिमळ द्रव्यें उधळिती ॥ ९४ ॥ ऐशी विचित्र भोजनकेलि । करिता झाला श्रीवनमाळी । व्यासऔरसें नृपाजवळी । गोष्टी मोकळी हे कथिली ॥ ३९५ ॥ म्हणाल विस्तार नाहीं मूळीं । तरी ऋषिपत्न्यांहीं अन्नें आणिलीं । तीं काय पात्रेंचि तिहीं भक्षिलीं । कीं वाढिलीं विस्तारें ॥ ९६ ॥ त्यांचा विनियोग पाहिजे केला । म्हणोनि प्रकट निरूपिला । संत जाणती प्रेमकळा । मूर्खा अबळां उमजेना ॥ ९७ ॥ पूर्णतृप्त श्रीभगवान । तोही होऊनि क्षुधावान । संकर्षणेंशीं गोपगण । जेववी पूर्ण तदन्नें ॥ ९८ ॥ जो कां प्रभुत्वें संपन्न । ऋद्धिसिद्धि ज्या अधीन । तोही यज्ञपत्न्यांचें अन्न । प्रीतीकरून जेविला ॥ ९९ ॥

एवं लीलानरवपुर्नृलोकमनुशीलयन् । रेमे गोगोपगोपीनां रमयन् रूपवाक्कृतैः ॥ ३७ ॥

लीलेंकरूनि मनुष्यतनु । धरूनियां श्रीजनार्दनु । अनंत अचिंत्य गुणपरिपूर्ण । ऐसा भगवान् क्रीडतसे ॥ ४०० ॥ मनुष्यलोकींचे अनुकार । त्यामाजिं लौकिकप्रकार । क्रीडामिसें जगदुद्धार[1] । आणि संहार दुष्टांचा ॥ १ ॥ गाई गोपाळ गोपिकांसी । रंजवी पुण्याच्या उत्कर्षीं । मनुष्यलीला-नाट्यविशेषीं । रमवी स्वजनांसी क्रीडोनी ॥ २ ॥ स्वयें अवाप्तपूर्णकाम । परंतु गोगोपगोपीप्रेम । जाणूनि क्रीडे आत्माराम । जेंवि सकाम लालस ॥ ३ ॥ ब्राह्मांडगर्भींचा लावण्यरस । एकवटोनि वोतिली[2] मूस । त्याहूनि सौंदर्य विशेष । दाऊनि स्वजनांस रंजवी ॥ ४ ॥ गोपी रंजवी लावण्य-गुणें । गोप रंजवी लीलाचरणें । गाई रंजवी संबोधनें । मंजुळवचनें बाहोनी ॥ ४०५ ॥ नित्य नूतन दावी खेळ । विस्मित अवघा ब्रह्मांडगोळ । कोणा नुमजे काळवेळ । श्रीगोपाळसान्निध्यें ॥ ६ ॥ ऐशी क्रीडा करूनि हरि । साग्रज गाई गोपभारीं । विचित्र वेणु श्रृंग मोहरी[3] । वाद्यगजरीं परतला ॥ ७ ॥ एक मांदी वारिती वेत्रीं । एक वीजिती चामरें वस्त्रीं । गोपी प्राशिती तृषिता नेत्रीं । व्रजाभीतरीं प्रवेशतां ॥ ८ ॥ कृष्ण गेलियानंतरें । येरीकडे विप्रांतरें । तप्त झालीं अनुताप-भरें । तें नृपवरें परिसावें ॥ ९ ॥

अथानुस्मृत्य विप्रास्ते अन्वतप्यन् कृतागसः । यद्विश्वेश्वरयोर्याच्ञामहन्म नृविडंबयोः ॥ ३८ ॥

संपवोनि तो अध्वर । स्वस्थ बैसोनि ऋषीश्वर । करिती परस्परें विचार । म्हणती थोर अपराध ॥ ४१० ॥ सामान्यनृपाची आज्ञामात्र । भंगितां होइजे दंडासि पात्र । मनुष्यनाट्यें विश्वेश्वर । हे साचार रामकृष्ण ॥ ११ ॥ यांची याच्ञा भंगिली आम्हीं । दीक्षित अल्पज्ञ स्वर्गकामी । ऐसे भ्रमलों मायाभ्रमीं । पूर्णब्रह्मीं वंचलों ॥ १२ ॥ ऐसे आम्ही कृतागस[4] । दुष्ट दुरात्मे सदोष । भक्तिविहीन दुर्गतीस । झाली आम्हांस पात्रता ॥ १३ ॥

दृष्ट्वा स्त्रीणां भगवति कृष्णे भक्तिमलौकिकीम् । आत्मानं च तया हीनमनुतप्ता व्यगर्हयन् ॥ ३९ ॥

---

१ जगाचा उद्धार करणारा. २ मिळविले. ३ मुरली. ४ अपराधी.

चिंतामणि चढला करीं । निर्दैव जैसा परता करी । त्याचा उपयोग इतरां घरीं । देखोनि झुरझुरी मग जैसा ॥ १४ ॥ तैसे आपण कृतागस । देखोनि स्त्रियांचा भक्तिविशेष । पश्चात्तापें अंतरीस । वारंवार धिक्कारिती ॥ ४१५ ॥ कृष्ण प्रत्यक्ष कैवल्यदानी । स्त्रिया केवळ गृहमेधिनी । निर्वाणभक्ति त्यांलागुनी । देखूनि मनीं अनुतप्त ॥ १६ ॥ मग आपणां धिक्कारिती । व्रतें साधनें हेळसिती । कृतकर्मातें उच्चारिती । आणि निंदिती अभिजात्या ॥ १७ ॥

धिग्जन्म नस्त्रिवृद्विद्यां धिग्व्रतं धिग्बहुज्ञताम् । धिक्कुलं धिक् क्रियादाक्ष्यं विमुखा ये त्वधोक्षजे ॥ ४० ॥

मातृगर्भीं कृतसंस्कार । जातकर्मादि जे जे अपर । जेणें पवित्र हें शरीर । त्या धिक्कार शौक्रजन्मा ॥ १८ ॥ पितृवीर्यें करूनि जन्म । त्या जन्मासि शौक्र नाम । सुसंस्कृत उत्तमोत्तम । तोही अधम भक्तिविण ॥ १९ ॥ पुन्हा द्विजातिसंस्कार । सबीजगायत्र्युच्चार । ज्या उपदेशें वेदाधिकार । त्यासि धिक्कार भक्तीविण ॥ ४२० ॥ पठन करूनि वेद चारी । गृहस्थधर्मे यज्ञाधिकारी । दैक्ष जन्म जें अध्वरीं । धिक् धिक् हरिविमुखांतें ॥ २१ ॥ ऐसे त्रिजन्मीं दीक्षित श्रेष्ठ । परंतु नादरितां वैकुंठ । झालों सर्वांहूनि कनिष्ठ । धिक् पापिष्ठ पैं आम्ही ॥ २२ ॥ ब्रह्मचर्यादि करूनि व्रतें । संपादूनि त्रैविद्येतें । जीं जीं जोडिलीं सुकृतें । धिक् समस्तें तीं आमुचीं ॥२३॥ ऋग्यजुःसामादि वेद । धनुर्वेद आयुर्वेद । ज्योतिर्वेद गांधर्ववेद । पढलों विशद पढविलें ॥ २४ ॥ न्याय वैशेषिक परिभाषा । सांख्य पातंजल मीमांसा । वेदांतोक्ति उपन्यासा । करूनि ज्ञाते म्हणवीतसों ॥ ४२५ ॥ धिक्कार आमुचे सर्वज्ञतें । विमुख झालों भगवंतातें । कांहीं नेणोनि हरिप्रेमातें । रतल्या चित्तें त्या धन्य ॥ २६ ॥ धिक्कार तयां मातापितरां । जे न लाविती भजनादरा । धिक्कार तयां सहोदरां । जे श्रीधरा नेणती ॥ २७ ॥ धिक्कार तया पवित्र कुळा । जें कां विमुख हरिपदकमळा । धिक्कार तयां क्रियां सकळां । ज्या गोपाळा नादरिती ॥ २८ ॥ धिक्कार तयां देशिकांप्रति । इहामुष्मिकीं जे गोविती । कृष्णभजनीं विमुखवृत्ति । प्रबोधिती भव रम्य ॥२९॥ एवं धिक्कार जन्मकर्मा । कुलशीलरूपनामा । एक न भजती परमात्मा । सर्व कर्मा धिक्कार॥४३०॥ अग्नि वरुण सूर्य सोम । इंद्रविरिंचिलोकोत्तम । तत्प्राप्तीचा वृथा काम । पुरुषोत्तमवैमुख्यें ॥ ३१ ॥ ब्रह्मादि करणदेवता सहज । त्यांचें ज्ञान तें अक्षज । ज्याहूनि अध तो अधोक्षज । जगत्पूज्य जगदात्मा ॥ ३२ ॥ विमुख असतां त्याचिये भजनीं । जरी जोडल्या वैभवश्रेणी । ते जाणावी भवजाचणी । निरयखाणीयातना ॥ ३३ ॥ ऐसें आपणां धिक्कारूनी । पश्चात्तापें तापले मनीं । पुन्हा म्हणती विचारूनी । विश्वमोहिनी हरिमाया ॥ ३४ ॥

नूनं भगवतो माया योगिनामपि मोहिनी । यद्वयं गुरवो नृणां स्वार्थे मुह्यामहे द्विजाः ॥ ४१ ॥

१ चिंतिलेली वस्तु देणारं रत्न. २ मनाला. ३ पश्चात्ताप पावले. ४ कुलीनतेला. ५ दीक्षा दिलेले. ६ शौक्र, सावित्र आणि दैक्ष असे तीन प्रकारचे जन्म. ७ बंधु. ८ गुरु. ९ कृष्णभक्तिपराङ्मुखतेने. १० इंद्रियजन्य. ११ नरकाच्या खाणींतील यातना.

निश्चयेंशीं हे हरीची माया । योगियांसिही भुलवावया । समर्थ तेथ आमुचा *वायां* । *ज्ञान-चातुर्यादिकवर्ग* ।। ४३५ ।। वशिष्ठासी पुत्रशोक । नारदासि अंगनावेख । साठी पुत्रेंशीं पतीचें दुःख । इत्यादिजनक हरिमाया ।। ३६ ।। येरवीं मनुष्यामाजीं थोर । आम्ही गुरुत्वें भूनिर्जर । केवढा पडला अंधकार । स्वार्थ साचार विसरलों ।। ३७ ।। हितोपदेशें मनुष्यांसी । पात्र झालों गुरुत्वासी । ते अंतरलों निजहितासी । दैवी मायेसी वश्य झालों ।। ३८ ।। आम्हांहूनि धन्य नारी । श्रुताधीतें रहिता घरीं । सप्रेमभक्ति अभ्यंतरीं । जगदीश्वरीं निष्काम ।। ३९ ।।

अहो पश्यत नारीणामपि कृष्णे जगद्गुरौ । दुरंतभावं योऽविध्यन् मृत्युपाशान् गृहाभिधान् ।। ४२ ।।

अहो आश्चर्य पहा कैसें । भोळीं स्त्रियांचीं मानसें । भगवत्प्रेम तेथ ऐसें । अप्रयासें अवतरलें ।। ४४० ।। अखिलब्रह्मांडाचा जनक । तो हा प्रत्यक्ष यदुनायक । त्याचे चरणीं आत्यंतिक । प्रेमा निष्टंक स्त्रियांचा ।। ४१ ।। दुर्लभ सायुज्याचिये माथां । भक्ति आत्यंतिकी तत्त्वता । जिणें कवळिलिया भगवंता । मग भगवत्कथा ते कैंची ।। ४२ ।। ते भक्तीचा प्रादुर्भाव । स्त्रियांचे ठायीं हेंचि अपूर्व । जेणें तोडिला पाश सर्व । संसारसंभवबंधाचा ।। ४३ ।। लोहादिनिगडही[3] तोडिती । ते गृहबंधनीं बळेंचि पडती । ममतापाशीं सांपडती । मोहभ्रांति सर्वज्ञ ।। ४४ ।। ऐसे संसारमोहपाश । पुत्र वित्त आप्त अशेष । इत्यादिनामीं बांधोनि भ्रंश । करूनि दुःखास भेटविती ।। ४४५ ।। सप्रेम-कृष्णभक्तीच्या मुळें । स्त्रियांहीं तोडिले ते एकेचि वेळे । नसतां साधनाचीं आंगीं बळें । कैंवि हें न कळे आम्हांसी ।। ४६ ।।

नासां द्विजातिसंस्कारो न निवासो गुरावपि । न तपो नात्ममीमांसा न शौचं न क्रियाः शुभाः ।। ४३ ।।

चौलोपनयनादि[4] संस्कार । स्त्रियांसी नाहींत कीं साचार । संध्यावंदन क्रियाधार । शौचाचार पैं नाहीं ।। ४७ ।। गुरुप्रसादन शांतिपाठ । नाहीं निवास गुरुनिकट । गुरुपरिचर्येची[5] कटकट । स्त्रिया स्पष्ट नेणती ।। ४८ ।। अथवा इष्टापूर्त[6] करणें । ज्यांसि नाहीं स्वतंत्रपणें । वेदांतशारीर[7] विचारणें । पाञ्चीकरणवाक्यादि ।। ४९ ।। ध्यान धारणा आसन मुद्रा । प्राणरोधणें प्राशणें चंद्रा । इत्यादि साधनें जीं योगींद्रा । तीं या सुंदरा नेणती ।। ४५० ।। ऐशिया *निर्राट[8] कामिनी । कृष्णीं मीनल्या एकांतभजनीं । हें आश्चर्य अंतःकरणीं । बहुतां गुणीं वाटतसे ।। ५१ ।।

अथापि ह्युत्तमश्लोके कृष्णे योगेश्वरेश्वरे । भक्तिर्दृढा न चास्माकं संस्कारादिमतामपि ।। ४४ ।।

आम्ही सर्वसंस्कारवंत । वेदशास्त्रपारंगत । त्यां आम्हांसि प्रेमतंतु । नाहीं संतत

---

**पाठभेद :—** * विटक ( मुंगीप्रत ).

१ ब्राह्मण. २ श्रवण किंवा अध्ययनरहित अशा. ३ लोखंडाची बेडी. ४ चौल, मौंजीबंधन वगैरे. ५ गुरुसेवा. ६ धर्मार्थ तळीं वगैरे बांधणें. ७ ब्रह्मसूत्रावर भाष्य. ८ अज्ञान.

भक्तीचा ॥ ५२ ॥ योगेश्वरांचा ईश्वर । उत्तमश्लोक निर्विकार । कृष्ण परब्रह्म साचार । नेणती पार शिवविधि ॥ ५३ ॥ तथापि आमुची त्याच्या ठायीं । दृढविश्वासें भक्ति नाहीं । जैसा प्रेमा स्त्रियांचे ठायीं । उपलब्ध पाहीं पूर्णत्वें ॥ ५४ ॥

ननु स्वार्थविमूढानां प्रमत्तानां गृहेहया । अहो नः स्मारयामास गोपवाक्यैः सतां गतिः ॥ ४५ ॥

अहो हेंचि आश्चर्य मोठें । निश्चयेंशीं आम्हांसि वाटे । स्वार्थीं विमुख धाटेमोठे । अम्ही करंटे कर्मठ ॥ ४५५ ॥ घोकिंवा विद्येचा गर्व बहुत । तेणें अभिमानें मूढमत्त । गृहचेष्टांचें कौशल्यकृत्य । दावूं समस्त लौकिकीं ॥ ५६ ॥ टिळे माळा खटाटोप । नानाक्रियांचे आटोप । तपश्चर्यांचे प्रताप । दावूं समीप येती तयां ॥ ५७ ॥ ऐकांतिकी[1] भगवद्भक्ति । नसतां अवघे अधःपाती[2] । ऐशिया आम्हा सतांगति[3] । करुणामूर्ति कळवळिला ॥ ५८ ॥ *गोपां हातीं याच्ञावचन । पाठवूनियां दिधलें स्मरण । परंतु आम्ही दैवहीन । नाहीं पूर्ण समजलों ॥ ५९ ॥ आमुच्या उद्धाराकारणें । याच्ञामिसें स्मरण देणें । येऱ्हवी त्या कारुण्यपूर्णें । याच्ञा करणें किमर्थ ॥ ४६० ॥ समुद्र तान्हेला मृगजळा । धुंधुरेंवीण रवि आंधळा । तैसें तया त्रैलोक्यपाळा । याच्ञाछळा[4] अनुसरणें ॥ ६१ ॥

अन्यथा पूर्णकामस्य कैवल्याद्याशिषां पतेः । ईशितव्यैः किमस्माभिरीशस्यैतद्विडंबनम् ॥ ४६ ॥

ज्याच्या संकल्पाचें स्फुरण । ईशनशक्तीसि[5] अधिष्ठान । तच्चिंतनें कामना पूर्ण । महा तो पूर्ण चित्सुख ॥ ६२ ॥ ब्रह्मसदनादि अखिल सुखें । तीं अवघींच कामनात्मकें । कैवल्यपर्यंत अशेखें । वरलेशें† जो वोपी ॥ ६३ ॥ कैवल्यादिवरदपति । पूर्णकाम जो चिन्मूर्ति । गोपवेशें नटोनि क्षिती । पावन कीर्ति विस्तारी ॥ ६४ ॥ अस्मादृशांचा गर्वभंग । सर्वज्ञतेचा काढूनि डाग । दावावया कैवल्यमार्ग । दावी सोंग प्रभुत्वें ॥ ४६५ ॥ येरव्हीं आमुचीं थोरपणें । जाणोनि तेणें याच्ञा करणें । आम्हीं त्यासी काय देणें । अंतःकरणें विचारा ॥ ६६ ॥ ज्याचें वैभव वदतां वेद । बोलों न शकती पुरता शब्द । स्तवितां शेष पावला खेद । तो हा प्रसिद्ध परमात्मा ॥ ६७ ॥

हित्वाऽन्यान् भजते यं श्रीः पादस्पर्शाशयाऽसकृत् । स्वात्मदोषापवर्गेण तद्याच्ञा जनमोहिनी ॥ ४७ ॥

लक्ष्मी लावण्य सुभगा चतुरा । डावलूनियां सुरनरापितरां । ज्याचिया पादस्पर्शाधिकारा । येकही वार इच्छोनि ॥ ६८ ॥ लावण्य चातुर्य गर्वाभिमान । महत्त्व दंभ ईर्षा सन्मान । चापल्यादि जे निजगुण । सांडोनि शरण श्री झाली ॥ ६९ ॥ एकवारही पादस्पर्श । दुर्लभ म्हणोनि आदरी

**पाठभेद :—** * मुंगीप्रतींत ५८ चा अर्धा व ५९ अर्धा अशी एक ओवी आहे. तसेंच ५८ चा अर्धा व ५९ चा अर्धा भाग मुंगीप्रतींत नाहीं. † वरदलेशें ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ अत्यंत. २ अधोगतीस जाणारे. ३ साधूचा उद्धारक. ४ याचनेचें मिष. ५ अधिकार चालविण्याची शक्ति.

दास्य । तयेवरी जो उदास । याच्ञा त्यास मौघिक ॥ ४७० ॥ नित्यतृप्तासी क्षुधा कैंची । अवाप्तकाम अन्न याची । हे जनमोहिनी माया त्याची । विश्व प्रपंची भुलवीतसे ॥ ७१ ॥

देशः कालः पृथग्द्रव्यं मंत्रतंत्रर्त्विजोऽग्नयः । देवता यजमानश्च क्रतुर्धर्मश्च यन्मयः ॥ ४८ ॥

देश काल द्रव्य पृथक् । मंत्र तंत्र ऋत्विज पावक । देवता यजमान मख । धर्मप्रमुख अवघें जो ॥ ७२ ॥ जेंवि एकचि कल्पतरू–। माजीं अवघा फलविस्तारू । देश कालादि मंत्रतंत्र । सविस्तर अवघें जो ॥ ७३ ॥

स एवं भगवान्साक्षाद्विष्णुर्योगेश्वरेश्वरः । जातो यदुष्वित्यश्रृण्म ह्यपि मूढा न विद्महे ॥ ४९ ॥

तोचि हा प्रत्यक्ष श्रीभगवान । षड्गुणैश्वर्यसंपन्न । योगेश्वरांचा ईश्वर पूर्ण । विश्वव्यापन श्रीविष्णु ॥ ७४ ॥ एथ भूभारहरणकार्या । अवलंबूनि योगमाया । यदुकुळीं जन्मला ऐशिया । जाणों गुह्या पैं आम्ही ॥ ४७५ ॥ शास्त्रदृष्टी कां महर्षिमुखें । आम्हांसि असतांही ठाउकें । कार्मठ्यमोहें मूढात्मकें । ठकलों मूर्ख पैं आम्ही ॥ ७६ ॥ ऐकोनि विदित असतां पोटीं । विश्वास न घटे आमुच्या घटीं । गोपांमुखें परिसोनि गोठी । आम्हीं कर्मठीं नादरिली ॥ ७७ ॥ एवं ऐशी हरीची माया । समर्थ विधि हर मोहावया । आतां रसरसूनि काय वायां । लाभ गेलिया हातींचा ॥ ७८ ॥ तंव बोलती एक ब्राह्मण । सर्वज्ञ दीनदयाळ श्रीकृष्ण । त्याचिये कृपेनें आम्ही धन्य । हें लक्षण अवधारा ॥ ७९ ॥ आम्हां ठकिलें कार्मठ्यभ्रमें । परी कारुण्यावाप्तिकामें । आमुच्या तरणोपायप्रेमें । स्त्रिया संभ्रमें बोधिलया ॥ ४८० ॥ आम्हांपासूनि विमुख गेले । ते गोप स्त्रियांपें पाठविले । अन्नयाच्ञेचें मिष केलें । परी स्मरण दिधलें आम्हांसी ॥ ८१ ॥

अहो वयं धन्यतमा येषां नस्तादृशीः स्त्रियः । भक्त्या यासां मतिर्जाता अस्माकं निश्चला हरौ ॥ ५० ॥

अहो म्हणती आश्चर्याशीं । धन्य आमुच्या तपोराशि । कीं त्या सुपत्न्या आम्हांसी । ज्या कृष्णासी भजिन्नल्या ॥ ८२ ॥ धन्य आम्ही ये संसारीं । ज्या आमुच्या ऐशिया नारी । ज्यांच्या भजनप्रेमावरी । आमुच्या अंतरीं सद्बोध ॥ ८३ ॥ कृष्णीं भजल्या सप्रेमभावें । पूर्णकृपेनें वासुदेवें । अनुग्रहिल्या म्हणूनि मात्रे–। पासूनि दैवें सांडवल्या ॥ ८४ ॥ स्त्रियांची देखूनि एकांतभक्ति । आमुची विराली कार्मठ्यभ्रांति । श्रीकृष्णचरणीं निश्चळ मति । प्रेमप्रवृत्ति पैं झाली ॥ ४८५ ॥ ऐसें ज्याचें कृपेचें करणें । नमो त्या भगवंता तुजकारणें । तुझिये पूर्ण कृपेविणें । माया निस्तरणें घडेना ॥ ८६ ॥

१ विरक्त. २ मिथ्या. ३ यजमानानें धन देऊन यज्ञकर्माचे ठायीं योजिलेले जे आग्नीध्र, होता, ब्रह्मा इ० षोडशब्राह्मण ते प्रत्येक.

नमस्तुभ्यं भगवते कृष्णायाऽकुंठमेधसे । यन्मायामोहितधियो भ्रमामः कर्मवर्त्मसु ॥ ५१ ॥

नमो श्रीकृष्णा भगवंता । परमानंदसुखैकभरिता । अचिंत्यानंतगुणपूर्णता । शोभे तत्त्वता तुज तुझी ॥ ८७ ॥ तुझी मेधा अकुंठित । तूं सत्यसंकल्पवंत* । लीलाविग्रह अव्याहत । करुणावंत शरण्यां ॥ ८८ ॥ तुझिया मायेचेनि भ्रमें । बुद्धि झांकोळली तमें । मार्ग चुकोनि करितां कर्में । संसारश्रमें श्रांतलों ॥ ८९ ॥ मायामोहित झाली बुद्धि । म्हणोनि विसरलों आत्मशुद्धि । अनेक-कर्ममार्गीं विविधीं । धावों पाणधी भ्रमभरें ॥ ४९० ॥

स वै न आद्यः पुरुषः स्वमायामोहितात्मनाम् । अविज्ञातानुभावानां क्षंतुमर्हत्यतिक्रमम् ॥ ५२ ॥

ज्याची माया मोहक ऐशी । मोही† हरिहरब्रह्मादिकांसी । तो तूं श्रीकृष्ण निश्चयेंशीं । आदि-पुरुष परमात्मा ॥ ९१ ॥ अज्ञानासी कनकबीज । चारूनि भुलविलिया मग सहज । मर्यादेची सांडूनि वोज । पूज्यापूज्य नाठवी ॥ ९२ ॥ तेंवि तां स्वमाया मोहिलें आम्हां । तैंहूनि नेणोंचि तुझा महिमा । भ्रांतिगर्भितअवज्ञाक्षमा । पुरुषोत्तमा त्वां कीजे ॥ ९३ ॥ अपराधक्षमा करावया । तूंचि समर्थ जगदात्मया । कीं हे अवघी तुझी माया । मोहकार्या प्रकाशी ॥ ९४ ॥ ऐसे अनुतापें ब्राह्मण । वारंवार जनार्दन । स्मरोनि करिती स्वदोषकथन । स्तुतिस्तवनपूर्वक ॥ ४९५ ॥

इति स्वाघमनुस्मृत्य कृष्णे ते कृतहेलनाः । दिदृक्षवोऽप्यच्युतयोः कंसाद्भीता न चाचलन् ॥ ५३ ॥

ते ब्राह्मण ऐशिया परी । कृष्ण उपेक्षिल्या हेलनेवारी । तें अघ स्मरोनि अभ्यंतरीं । नमस्कारीं उद्युक्त ॥ ९६ ॥ एकमेकां म्हणती द्विज । राम आणि अधोक्षज । पाहूं चला सहजीं सहज । सांगों गुज अंतरींचें ॥ ९७ ॥ हेलनारूप घडलीं पापें । तितुकीं जळालीं पश्चात्तापें । आतां संपादूं त्याचिये कृपें । चरणां समीप जाऊनी ॥ ९८ ॥ परब्रह्म मूर्तिमंत । सगुण सुंदर रामाच्युत । नयन भरूनि पाहतां तृप्त । होऊं सनाथ सर्वस्वें ॥ ९९ ॥ ऐसे उद्यत दर्शनालागीं । तंव एक म्हणती न कीजे सलगी । दुराचारी कंस जगीं । अनयमार्गीं प्रवृत्त¶ ॥ ५०० ॥ राजशासन त्याचें दुष्ट । विवेकहीन तो पापिष्ठ । ऐकोनि मानील परमानिष्ट । तेव्हां कष्ट भोगावे ॥ १ ॥ यालागीं असो मनींच्या मनीं । नित्य यज्ञाचरणें सदनीं । प्रेमा‖ ठेवूनि कृष्णभजनीं । चक्रपाणि तोषवा ॥ २ ॥ ऐसें कंसरायाभेणें । चंचल न होतां ब्राह्मणें । गृहींच राहिलीं समाधानें । दर्शनाकारणें न वचोनी ॥ ३ ॥ इतुकी कथा मात्स्यीसुता । बादरायणि झाला कथिता । तें व्याख्यान ऐकोनि

**पाठभेद :**— * भगवंत ( मुंगीप्रत ) †तोही ( मुंगीप्रत ). ¶प्रवर्तें ( मुंगीप्रत ). ‖ स्तुतिस्तवनें अंतःकरणी ( मुंगीप्रत ) या ओवीचे चरण या प्रतीत मागे-पुढे आहेत.

श्रोतां । वोपिजे चित्ता हरिप्रेमा ॥ ४ ॥ पुढिले अध्यायीं श्रीरंग । निवारूनियां इंद्रयाग । गोवर्धनाख्य यज्ञ सांग‡ । प्रवर्तवील निजसत्ता ॥ ५०५ ॥ तये कथेच्या श्रवणसुखा । आमंत्रण हें पुण्यश्लोकां । कृष्णीं प्रेमा धरितां निका । नोहे ठावुका कळिकाळ ॥ ६ ॥ आदिगुरु ईश्वरमूर्ति । मनीषा दत्तात्रेय सुमति । जनार्दन उदानवृत्ति । एकनाथ तच्चक्षु ॥ ७ ॥ चिदानंदा चक्षुसूर्या । स्वानंदरूपा किरणनिचया- । पासूनि गोविंदा जलदमया । ग्रंथप्रमेया वर्षला ॥ ८ ॥ तेणें भरला दयार्णव । श्रवणें सुस्नात होती जीव । पावती कैवल्यसाम्राज्यविभव । सांडूनि दुर्भवदारिद्र्या ॥ ९ ॥ ऐसें श्रीमद्भागवत । अठरा सहस्र श्लोकीं¶ गणित । संहिता परमहंसाभिमत । स्कंध त्यांत दशम हा ॥ ५१० ॥ यज्ञपत्न्यांचें आख्यान । परम पावनां पावन । श्रवणें निरसी कर्माभिमान । अध्याय पूर्ण तेविसावा‖ ॥ ११ ॥ श्रीमद्भागवत दशमस्कंध । टीका हरिवरद अगाध । दयार्णवकृत परम विशुद्ध । अध्याय प्रसिद्ध तेविसावा ॥ १२ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरिक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां यज्ञपत्न्याख्यानं नाम त्रयोविंशतितमोऽध्यायः ॥ २३ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु । श्लोक ॥ ५३ ॥ टीका ओव्या ॥ ५१२ ॥ एवं संख्या ॥ ५६५ ॥ ( तेविसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १२२१५. )




तेविसावा अध्याय समाप्त.

---

पाठभेद :— ‡ प्रसंग ( मुंगीप्रत ). ¶ ज्याचे ( मुंगीप्रत ); ‖ वर्णनं याज्ञिक महागर्व भंजनं पत्न्या वरदानप्राप्त नाम.

कृष्णदयार्णवकृत

# हरि वरदा

## अध्याय २४ वा

श्रीगोविंदपरब्रह्मणे नमः ॥ भवविरागें विभवप्रदा । निर्विकारा आनंदकंदा । चिदात्मका चिन्मकरंदा । नमो गोविंदा सद्गुरो ॥ १ ॥ करणहरिणां[1] भवमृगजल । वृथा भासोनि भ्रमवी पघळ । तदर्थ धांवतां कोरडे माळ । करिती तळमळ विकळत्वें ॥ २ ॥ बैल वोढितां गाडा पुढें । आरूढा तैसेंचि जाणें पडे । करणनिर्दिष्टविषयचाडे[2] । तेंवि अवघडे चैतन्य ॥ ३ ॥ अनादिमुक्तता विसरूनी । देहात्मता पांघरोनी । पवाडे[3] बाह्यविषयाचरणीं । साचारपणीं सुखलाभें ॥ ४ ॥ ऐशिया अनंतजन्मखेपा । करूनि भोगितां पापतापा । जेव्हां तुजला येईल कृपा । तैं विवेकदीपा उजळिसी ॥ ५ ॥ विवेकें उजळतां अभ्यंतर । उपजे सत्संगीं आदर । सत्कथाश्रवणीं स्फुरे विचार । तैं असाचार[4] भव उमजे ॥ ६ ॥ फिटतां रुपेपणाची भ्रांति । कोणा रुचती फुकटा शुक्ति । इहामुष्मिकविषयांप्रति । तेंवि विरक्ति मिथ्यात्वें ॥ ७ ॥ साउली भावूनि निजशरीर । कवळूं धांवतां शिणले फार । तया श्रमाचा परिहार । निजांग* साचार उमजतां ॥ ८ ॥ श्रमनिरासें आनंदमात्र । पूर्वींच आहे कीं स्वतंत्र । ऐसें अभेदीं[5] भेदचरित्र । दाविसी विचित्र नटनाट्यें ॥ ९ ॥ तया नमो गोगोपका । श्रीगोविंदा विश्वात्मका । सप्रेमभजनें मनःशशांका । प्रमेयपीयूखा[6] अभिवृद्धि ॥ १० ॥ विनयभावें लोटांगणीं । संतां विनवीं जोडूनि पाणि । मज गोविंदें तुमच्या चरणीं । निजनिर्याणीं[7] निरविलें[8]¶ ॥ ११ ॥ सौम्यवत्सरीं[9] शरत्काळीं । जरिका प्रकटली भूमंडळीं । तेणें तनू विकळ झाली । म्हणोनि अंतरली पंढरी ॥ १२ ॥ भूमंडळीं वलयांकित । मनुष्यमात्र जरिकाग्रस्त । मास पक्ष रात्री

---

**पाठभेदः—** * निजांगं ( मुंगीप्रत ). ¶ गौरविलें ( मुंगीप्रत ).

१ इंद्रियें हींच कोणी हरिणें. २ इंद्रियांनीं सुचविलेल्या विषयांची गोडी. ३ शिरतो. ४ मिथ्या. ५ परमात्म्याशीं ऐक्य. ६ ज्ञानामृत. ७ देह ठेवतांना. ८ हातीं दिलें. ९ त्रेचाळिसावें संवत्सर. १० तापाची साथ.

सप्त । झाले व्याप्त ज्वरशीतें ॥१३॥ मग कार्तिकशुद्धपक्षीं । प्रयाण केलें पंढरीसी । तैं कात्यायनी-व्रतव्याख्येसी[†] । मार्गीं जातां विवरिलें ॥ १४ ॥ तंव येरीकडे मार्गशिर । शुद्धतृतीया बुधवार । शूळयोग मूळनक्षत्र । अरुणोदयीं शुभवेळे ॥ १५ ॥ वंजरे समीप उत्तरे ग्राम । खळबिरें ऐसें जयासि नाम । तेव्हां तेथ कैवल्यधाम । सद्गुरुनाथें स्वीकेलें ॥ १६ ॥ चंद्रमंडळामाजि गुरु । गगनीं झाले जैं एकत्र । तेव्हां गोविंदें स्थूल गात्र । सोडूनि चिन्मात्र निवडिलें ॥ १७ ॥ मास[§] एक अनशनव्रत । केलें घेऊनि प्रायश्चित्त । अभ्यासमार्गें स्वानंदभरित । निजएकांत पावले ॥ १८ ॥ तयेसमयीं माझें स्मरण । करूनि संतांसि निरविलें पूर्ण । समीप नसतां मज हे खूण । बोधिली दर्शन देऊनी ॥१९॥ आतां माझे सद्गुरुनाथ । सगुणविग्रही संत समर्थ । पूर्ण प्रकाशूनि परमार्थ । गोविंद जेथ वसिन्नला ॥ २० ॥ गोविंदाचें सगुण ध्यान । आतां कोठूनि पाहती नयन । झालों पोरटा हीन दीन । न वचे शीण हृदयींचा ॥ २१ ॥ विरहें प्रेमा भरला गहन । कोण चालवी व्याख्यान । तेव्हां गोविंदें येऊन । हरीला शीण अंतरींचा ॥ २२ ॥ अभिन्न सद्गुरुसंतमूर्ति । श्रवणीं सांगूनि[||] दिधली स्फूर्ति । ते हे व्याख्या सप्रेमभक्ति । सावध श्रोतीं परिसिजे ॥ २३ ॥ यज्ञपत्न्यांसी मागोनि अन्नें । केला अनुग्रह जनार्दनें । ये अध्यायीं मधुसूदनें । मद भंगणें इंद्राचा ॥ २४ ॥ हेतुवादाच्या अनेक युक्ति । बोधूनियां नंदाप्रति । गोवर्धनाख्यमखप्रवृत्ति[‡] । करवी निवृत्ति शक्रमखा ॥ २५ ॥ तो गोवर्धनमखोत्सव । कृष्णें प्रेरितां ते बल्लव । वनीं संपादूनियां सर्व । आले स्वयमेव व्रजभुवना ॥ २६ ॥ चोव्विसाव्या अध्यायांत । परीक्षितीसि व्याससुत । इतुकी कथा निरूपित । भाषा प्राकृत ते ऐका ॥ २७ ॥

श्रीशुक उवाच — भगवानपि तत्रैव बलदेवेन संयुतः । अपश्यन्निवसन् गोपानिंद्रयागकृतोद्यमान् ॥ १ ॥

भुसूर म्हणिजेत ते ब्राह्मण । त्यांचा भंगूनि क्रियाभिमान । आतां स्वर्गींचे सुरगण । त्यांचा अभिमान भंगितसे ॥ २८ ॥ अमरपति जो पुरंदर[२] । त्याचा निवारूनि अध्वर[३] । करी गर्वाचा परिहार । तो विस्तार अवधारा ॥ २९ ॥ सतीसान्निध्यें ब्राह्मणांसी । चित्तशुद्धीच्या प्रकाशीं । कृष्णमहिमा प्रतीतीसी । आलिया कंसासि ब्याहाले[४] ॥ ३० ॥ जावया श्रीकृष्णदर्शना । धीर नुपजेचि ब्राह्मणा । मग निजाश्रमींच कृष्णभजना । करीत दुर्जना भिऊनी ॥ ३१ ॥ श्रीकृष्णही तेचि वर्नी[*] । व्रजीं असतां गोपपणीं । देखता झाला आपुले नयनीं । गोपांलागूनि उद्युक्त ॥ ३२ ॥ धरिलें कंसभय ब्राह्मणीं । कृष्ण निर्भय ऐश्वर्यगुणीं । अमरां क्षोभवी अवगणूनी । मख रोधूनि शक्राचा ॥ ३३ ॥ षड्गुणैश्वर्यसंपत्तिमंत । संकर्षणेंशीं समवेत । व्रजीं वसतां गोप समस्त । उद्योगवंत देखतसे ॥ ३४ ॥ उद्योग म्हणाल कैसा काय । इंद्रक्रतूचा[५] उपाय । द्रव्यदक्षिणा विप्रवर्य । स्थान-

पाठभेद :— † व्याख्यानासी ( मुंगीप्रत ). § माझे ( मुंगीप्रत ). || सगुणी ( मुंगीप्रत ). ‡ निजवृत्ति ( मुंगीप्रत ). * क्षणीं ( मुंगीप्रत ).

१ उपोषण. २ इंद्र. ३ यज्ञ. ४ भ्याले. ५ इंद्रास उद्देशून केलेला यज्ञ.

मानादि योजना ॥ ३५ ॥ ऐसें देखोनि चक्रपाणि । ऐश्वर्य लपवूनि बाळपणीं । करी शैशवसंपादणी । लीलाचरणीं चिन्मात्र ॥ ३६ ॥

तदभिज्ञोऽपि भगवान् सर्वात्मा सर्वदर्शनः । प्रश्रयावनतोऽपृच्छद् वृद्धान्नंदपुरोगमान् ॥ २ ॥

त्यांचिया उद्योगाचें तत्त्व । जाणें ऐसें अभिज्ञत्व । असोनि लपवी जो महत्त्व । नाट्यलाघव प्रकटूनी ॥ ३७ ॥ भूत भविष्य वर्तमान । अबाधित त्रिकालज्ञ । यालागीं तो सर्वदर्शन । साक्षी सर्वज्ञ सर्वात्मा ॥ ३८ ॥ ऐसा असोनि बाळपणें । समर्याद अंतःकरणें । परम नम्र करी पुसणें । कलभाषणें मन मोही ॥ ३९ ॥ नंद सुनंद उपनंद । वृषभानादि गोपवृंद । मुख्य जे जे बल्लववृद्ध । पुसे मुकुंद तयांसी ॥ ४० ॥

कथ्यतां मे पितः कोऽयं संभ्रमो व उपागतः । किं फलं कस्य चोद्देशः केन वा साध्यते मखः ॥ ३ ॥

कृष्ण म्हणे अहो ताता । कोण हा संभ्रम तुमच्या चित्ता । आजि आठवला तत्त्वता । तत्कार्यार्था उद्युक्त ॥ ४१ ॥ म्हणाल वृथा संभ्रम नोहे । कोणी एक हा यज्ञ आहे । येणें करूनि जें फल होये । तें मज स्नेहें निरोपा ॥ ४२ ॥ येथ प्रधानदेवता कोण । कोण अधिकारी यजमान । मंत्र तंत्र द्रव्यसाधन । कैसें कोण निरोपा ॥ ४३ ॥

एतद् ब्रूहि महान्कामो मह्यं शुश्रूषवे पितः । न हि गोप्यं हि साधूनां कृत्यं सर्वात्मनामिह ॥ ४ ॥

श्रवणेच्छा मजकारणें । म्हणोनि तुम्हीं हें बोलणें । जैसें जैसें प्रार्थिलें प्रश्नें । तें तें कथणें भो ताता ॥ ४४ ॥ हें सविस्तर परिसावयासी । मोठा अभिलाष मम मानसीं । महामनोरथें उद्योगासी । तुम्हां सर्वांसी प्रवृत्ति ॥ ४५ ॥ कांहीं कार्यावांचूनि प्राणी । न प्रवर्तती कर्माचरणीं । कोण कामना अंतःकरणीं । तें मजलागूनि निरूपा ॥ ४६ ॥ ऐसें पुसतां यदुनायक । मौन धरूनि ठेला जनक । तयाप्रति प्रासंगिक । सकौतुक हरि बोले ॥ ४७ ॥ सर्वात्मकत्वें ज्यांची दृष्टि । अभेदभावना ज्यांचे पोटीं । ऐसे धन्य साधु सृष्टीं । ते काय गोष्टी लपविती ॥ ४८ ॥ विश्वीं पाहती आपणांसी । गोप्य करिती कोणापाशीं । म्हणोनि साधु समचित्तांसीं । निज कृत्यासी न झांकवे ॥ ४९ ॥ मी तंव तुमचें निज लेंकरूं । पुसावयाचा मज अधिकारू । तुम्हीं नये गोप्य करूं । कांहीं विचार मजपुढें ॥ ५० ॥ येथ या उद्योगाच्या ठायीं । मजशीं गोप्य न कीजे कांहीं । साधु सर्वात्मकत्वें पाहीं । कृत्य कोणाही न वंचिती ॥ ५१ ॥

अस्त्यस्वपरदृष्टीनाममित्रोदास्तविद्विषाम् । उदासीनोऽरिवद्वर्ज्य आत्मवत्सुहृदुच्यते ॥ ५ ॥

---

१ बालपणाची बतावणी. २ गोड बोलून. ३ उद्योग. ४ मोठ्या उद्देशाने ५ प्रसंगास उचित. ६ सर्वात्मक, सर्वव्यापी.

ज्यासि नाहीं आपपर । जे नेणती मित्रामित्र । उदासीन का स्नेहपात्र । नेणती सर्वज्ञ जे द्वेष्टा ॥ ५२ ॥ ऐशी समान दृष्टि ज्यांची । प्रकट सर्व कृत्यें त्यांचीं । सर्वात्मा तो कोणा वंची । स्थिति साधूंची हे सहज ॥ ५३ ॥ भेदही असतां बहुतापरी । विवरूनि पाहतां विचारचतुरीं । गोप्य करणीय कृत्य जरी । तरी निर्धारीं विवरिजे ॥ ५४ ॥ अमित्रें द्वेष्टा कीं उदासीन । विचारीं वर्ज्य परकीय म्हणोन । सुहृद आत्मत्वें* समान । त्यांसि गोपन न करावें ॥ ५५ ॥ सुहृद बुद्धि-कुशल आप्त । मिळोनि मंत्रें[3] विवरिजे गुप्त । स्वबुद्धि प्रवर्तती जे दृप्तें[4] । त्यांसी प्राप्त फळ नोहे ॥ ५६ ॥

ज्ञात्वाऽज्ञात्वा च कर्माणि जनोऽयमनुतिष्ठति । विदुषः कर्मसिद्धिः स्यात्तथा नाविदुषो भवेत् ॥ ६ ॥

विदुष म्हणिजे कोविदजन । कर्में अनुष्ठिती[5] जाणोन । कर्मफळसिद्धि संपूर्ण । लाहती विघ्न न बधितां¶ ॥ ५७ ॥ तैसें‡ नेणोनि देखोवेखीं । कर्में अनुष्ठितांही मूर्खीं । सिद्धि न पवोनि होती दुःखी । विषयाभिलाखी अविचारें ॥ ५८ ॥

तत्र तावत्क्रियायोगो भवतां किं विचारितः । अथवा लौकिकस्तन्मे पृच्छतः साधु भण्यताम् ॥ ७ ॥

तेथें तुम्हीं हा क्रियायोग । विचारिला तो कोण मार्ग । शास्त्रदृष्टि कीं प्रसंग । लोकाचार-प्रवृत्ति ॥ ५९ ॥ पूर्वीं जैसे केले प्रश्न । तैसें तैसें उपपादून । सर्व रहस्य मजलागून । कीजे कथन भो ताता ॥ ६० ॥ नित्य किंवा नैमित्तिक । किंवा शांतिक पौष्टिक । पारमार्थिक कीं लौकिक । इहामुष्मिक किंवा हें ॥ ६१ ॥ ऐसें ऐकोनि नंद बोले । वृद्धाचारबोधें आलें । तें तें अवश्य पाहिजे केलें । प्राप्त झालें कुळकर्म ॥ ६२ ॥

नन्द उवाच — पर्जन्यो भगवानिंद्रो मेघास्तस्यात्ममूर्तयः । तेऽभिवर्षंति भूतानां प्रीणनं जीवनं पयः ॥ ८ ॥

कृष्णा तुवां केला प्रश्न । येथ प्रधानदेवता कोण । तरी हा मुख्य इंद्र भगवान । नामें पर्जन्य बोलिले ॥ ६३ ॥ मेघ तयाच्या आत्ममूर्ति । ते सर्वत्र अभिवर्षती । भूतमात्राची जीविकावृत्ति । प्राणवृत्ति तत्तोयें ॥ ६४ ॥ भूतमात्राचें जीवन । प्राणतर्पण आप्यायन । हृष्टिपुष्टीचें कारण । पय संपूर्ण वर्षती ॥ ६५ ॥

तं तात वयमन्ये च वार्मुचां पतिमीश्वरम् । द्रव्यैस्तद्रेतसा सिद्धैर्यजंते क्रतुभिर्नराः ॥ ९ ॥

आतां कोण यजमान म्हणसी । तरी आम्ही सर्व व्रजनिवासी । आणखीही देशोदेशीं । त्यां

पाठभेदः— * आत्मत्वें ( मुंगीप्रत ). ¶ न बाधितां ( मुंगीप्रत ). ‡ ऐसें ( मुंगीप्रत ).

१ ज्यास शत्रुमित्र समान तो. २ शत्रु. ३ मसलत. ४ अभिमानी. ५ ज्ञात. ६ करतात. ७ लोक करतात म्हणून आपण करावें ही समजूत. ८ जीव जगविण्याचें साधन. ९ प्राणधारण. १० संतोष.

सर्वांसि यजनीय ॥ ६६ ॥ समस्त मेघ ज्याच्या मूर्ति । तो ईश्वर वारिदपति । त्या इंद्रातें आम्हीं समस्तीं । द्रव्यीं उचितीं यजावें ॥ ६७ ॥ म्हणसी द्रव्यें येथ कोण । इंद्रें रेत अभिषेचन । करूनि वाढविलीं जीं पूर्ण । सिद्धें नूतन तीं द्रव्यें ॥ ६८ ॥ ते ते यथालब्धोपहार । नाना द्रव्यांचे संभार । मेळवूनि यजिती नर । जलदेश्वर फळलोभें ॥ ६९ ॥ म्हणसी काय इंद्राहातीं । तरी हे मेघ ज्याच्या मूर्ति । रेत वृष्टीस्तव वोपिती । सस्यसंपत्ति पयलोभें ॥ ७० ॥

तच्छेषेणोपजीवंति त्रिवर्गफलहेतवे । पुंसां पुरुषकाराणां पर्जन्यः फलभावनः ॥ १० ॥

यज्ञद्वारा त्याचें त्यास । अर्पितां उरे जें जें शेष । तेणें जीविकार सावकाश । त्रिवर्ग पुरुष साधिती ॥ ७१ ॥ यज्य यजन हाचि धर्म । अर्थ समस्त द्रव्या नाम । काम म्हणिजे योगक्षेम । जेणें सुगम त्रिवर्ग हा ॥ ७२ ॥ जरी तूं कृष्णा म्हणसी ऐसें । कृषिगोरक्षणादि आयासें । त्रिवर्ग संपादिजे तो पुरुषें । इंद्र अनायासें तो कैं दे ॥ ७३ ॥ तरी ऐकें गा जनार्दना । करितां कृष्यादि अनेक यत्नां । पर्जन्याविण *फलभावना । नव्हेचि कोणा आपैती ॥ ७४ ॥ तस्मात् फलदाता पर्जन्य । त्याचें सर्वीं करूनि यजन । स्वेच्छा त्रिवर्ग संपादून । समाधान पाविजे ॥ ७५ ॥

य एवं विसृजेद्धर्मं पारंपर्यागतं नरः । कामाल्लोभाद्भयाद् द्वेषात्स वै नाप्नोति शोभनम् ॥ ११ ॥

ऐसे वृद्ध पूर्वापर । करीत आले जो अध्वर । त्यातें टाकील जो कां नर । कामीं तत्पर होत्साता ॥ ७६ ॥ विषयकाम पुरवावया । प्रवर्तोनि स्वधर्मक्रिया । अव्हेरितां दुःखालया । नांदावया पवाडे ॥७७॥ कीं द्रव्याचा लोभ धरी । पूर्वधर्मातें अव्हेरी । तेणें बुडे दुःखसागरीं । न पवे परतीरीं सुखाच्या ॥७८॥ अथवा कायक्लेशभयें । धर्म जो का पारंपर्य । विसर्जूनि मोकाट होय । तो न लाहे कल्याण ॥ ७९ ॥ अथवा विपरीत प्रारब्धगति । देव आम्हां जो कां न पवती । म्हणोनि द्वेषें धर्म त्यजिती । ते पावती दुःखातें ॥ ८० ॥ कामें लोभें भयें द्वेषें । पूर्वधर्मावरी जो रुसे । त्यास कल्याण प्राप्त नसे । भोगी अवदशे विमुखत्वें ॥ ८१ ॥ जो धर्मासि विमुख झाला । स्वर्मीं कल्याण विमुख‖ त्याला । म्हणूनि आम्हां समस्तांला । न वचे त्यजिला कुळधर्म ॥ ८२ ॥ यथाशास्त्र नंदवचन । वृद्धपरंपरा †मान्य । ऐकोनि तोषला जनार्दन । परी हृदयीं आन अभिप्राय ॥ ८३ ॥

श्रीशुक उवाच— वचो निशम्य नंदस्य तथान्येषां व्रजौकसाम् ।
इंद्राय मन्युं जनयन् पितरं प्राह केशवः ॥ १२ ॥

---

**पाठभेद**—* काळ भावना ( मुगीप्रत ). ७३ व ७४ या ओव्या मुंगीप्रतींत पुढे-मागें आहेत. ‖ नाहीं ( मुंगीप्रत ). † असे मान्य ( मुंगीप्रत ).

१ पूज्य. २ मेघराज. ३ यथाशक्ति मिळविलेल्या द्रव्यांचा बळी. ४ सामग्री. ५ शिरे. ६ शरीरास कष्ट होतील या भीतीनें. ७ परंपरेनें चाललेला. ८ दुसरा.

शुक म्हणे गा गोत्रापति । नंद बोलिला जे रीती । तैसेंच गोपवृद्धीं समस्तीं । कृष्णाप्रति प्रशंसिलें[1] ॥ ८४ ॥ कृष्णें ऐकोनि नंदोक्तीस । तैसेंच समस्तांचिया वचनास । परिसोनि झाला परमतोष । अन्योद्देश तथापि ॥ ८५ ॥ इंद्रासि उपजावया क्रोध । बोले जनकेंशीं प्रसिद्ध । नानायुक्ति ‡हेतुवादें[2] । जें विरुद्ध पूर्वोक्ती ॥ ८६ ॥ इंद्रासि क्रोध उपजवणें । स्वसामर्थ्यें प्रसंग तेणें । गर्व परतोनि उतरवणें । याचि कारणें व्यंग्योक्ति ॥ ८७ ॥ येऱ्हवीं परंपरागतधर्म । सहसा न खंडी पुरुषोत्तम । इंद्रमदभंगाचा काम । धरूनि विषमें[3] प्रतिपादी ॥ ८८ ॥ इंद्रासि क्रोधाचा उद्भव । शीघ्र होय तो धरूनि भाव । बोले पितरेंशीं केशव । तें सदैवें[4] परिसोत ॥ ८९ ॥

श्रीभगवानुवाच :— कर्मणा जायते जंतुः कर्मणैव प्रलीयते ।
सुखं दुःखं भयं क्षेमं कर्मणैवाभिपद्यते ॥ १३ ॥

कृष्ण म्हणे अहोजी जनका । कां पां भजिजे इंद्रादिकां । कर्मेंचि पाविजे सुखदुःखा । कर्म भयशोका दायक ॥ ९० ॥ कर्में करूनि जंतु जन्मे । पुढतीं कर्मेंच करूनि निमे[5] । सुखें दुःखें भयें क्षेमें । अवघीं कर्में संपादी ॥ ९१ ॥ कर्मेंचि जन्म स्थिति लय । सुखदुःखें कां क्षेमभयें । इत्यादि अवघें कर्मचि विये[6] । तरी इंद्रादि काय भजोनी ॥ ९२ ॥ स्नानीं पानीं प्रक्षाळणीं । अथवा पचनादि अन्योपकरणीं । सामर्थ्य असतां गंगावनीं[7] । तरी मृगांभशिराणी[8] किमर्थ ॥ ९३ ॥ ताता आशंका जरी तूं घेसी । कर्म जडें एकदेशी । कैंवि देती फळसिद्धीसी । तरी येविशीं ऐकावें ॥ ९४ ॥ चलन वलन आकुंचन । उत्क्षेपण[9] अपक्षेपणें[10] । पंचविध कर्म म्हणोन । कीजे कथन नैयायिकीं[11] ॥ ९५ ॥ वायुवेगें वस्त्र उडे । लांब पसरे गगनीं मुरडे । ऊर्ध्व चढोनि मागुतें पडे । कर्में जडें तेंवि म्हणती ॥ ९६ ॥ अहो हें आश्चर्य केवढें । न वचोनि मीमांसा उजियेडें । खद्योत स्वमत* तेजें गाढें । सूर्यापुढें प्रकाशिती ॥ ९७ ॥ जलप्राशनें तृषाहरण । येथ फलद ईश्वर कोण । तस्मात्कर्मेचि फळाचें कारण । प्रकट जाण असतांही ॥ ९८ ॥ करणी करितां कर्माचरण । सिद्धि पावे अन्नादि पचन । तद्भोक्तृत्वें इंद्रियगण । पटुतर पूर्ण तत्कर्मीं ॥ ९९ ॥ ऐसें बोधा आलें असतां । सांगा काय अनुपपन्नता[12] । कर्मासि जडत्व आणि फलदाता । ईश्वर म्हणतां न लाजावें ॥ १०० ॥ तथापि ताता ऐसें म्हणसी । जीव अज्ञान एकदेशी । तो स्वकर्मसंग्रहासी । कैंवि संरक्षी भवनिधनीं[13] ॥ १ ॥ अनिष्ट इष्ट मिश्र कर्म । फलही उत्तम मिश्र अधम । जीव अज्ञान कैंवि हें कर्म । जाणे सुगम प्राप्तीचें ॥ २ ॥ यालागीं भावें ईश्वरासी । भजतां अधर्म मिश्र निरसी । उत्तम सत्कर्में संरक्षी । मग भोगासि नियोजी ॥ ३ ॥ तरी हें वायांचि म्हणणें ताता । ईश्वर कर्माचा फलदाता । होऊनि उठवाठेवी करितां । लिप्त होता मग तोही ॥ ४ ॥

---

**पाठभेद :**— ‡ भेदवाद ( मुंगीप्रत ). * तेज गाढें ( मुंगीप्रत ).

१ सांगितलें. २ सकारण वाद. ३ विरुद्ध. ४ दैववान्. ५ मरे. ६ प्रसवते. ७ गंगोदकांत. ८ मृगजलाची आवड. ९ वर फेंकणें. १० खालीं फेंकणें. ११ न्यायशास्त्रनिपुण. १२ अयोग्यपणा. १३ जन्ममरणामध्यें.

अस्ति चेदीश्वरः कश्चित् फलरूप्यन्यकर्मणाम् । कर्तारं भजते सोऽपि न ह्यकर्तुः प्रभुर्हि सः ॥ १४ ॥

जरी ईश्वर असतां कोणी एक । अन्य जीवाचा कर्मपरिपाक । तोही तत्कर्मचि दायक । न्यून अधिक न करितां ॥ १०५ ॥ अकर्ता जो जीव आहे । त्यासि कर्मजानितें भोग समूहें । गोवावया समर्थ नोहे । ईश्वर तोही प्रभुत्वें ॥ ६ ॥ अनिष्ट मिश्र ईश्वर मोडी । तरी उत्तमचि पावतें वाढी । अनेक योनींची घडमोडी । कोणे प्रौढी वाढती ॥ ७ ॥ तस्मात्कर्मांचे संस्कार । अनिष्ट इष्ट आणि मिश्र । कर्मेंचि घेऊनि अंकुर । कर्माकार प्रसवती ॥ ८ ॥

किमिंद्रेणेह भूतानां स्वस्वकर्मानुवर्तिनाम् । अनीशेनान्यथा कर्तुं स्वभावविहितं नृणाम् ॥ १५ ॥

तरी इंद्रें येथ काय करणें । कर्मांवांचूनि सामर्थ्यहीनें । अजागळस्तनांचें जिणें । उपयोगें विणें न शोभे ॥९॥ आपुलाल्या कर्मानुसार । येथ भूतांचा व्यवहार । अन्यथा करूं न शके इंद्र । विहित-विहार कर्मांचा ॥ ११० ॥ कर्त्यासि जें ईप्सिततम । त्यासि वैयाकरण* म्हणती कर्म । तो वाक्य-विभक्तियोजनक्रम । कर्ताकर्मक्रियादि ॥ ११ ॥ जेथ प्रथमांतकर्ता होय । तो द्वितीयान्त कर्म पाहे । तदनुरूप क्रियेठाय । दशलैंकारीं निर्दिष्ट ॥ १२ ॥ तृतीयांत कर्ता जरी । तैं प्रथमांत कर्म निर्धारीं । ऐशा विभक्ति परोपरी । सुप्तिङ्र्तीं कारकें ॥ १३ ॥ एवं कर्ता कर्म क्रिया । अवघी शब्दांची प्रक्रिया । वैयाकरणमतकर्तया । प्रेरावया असमर्थ ॥ १४ ॥ उपासनाकांडींचा नेम । कर्तया प्रेरक होय कर्म । तें कर्म प्रवृत्तीचें वर्म । देवताप्रेमउपयोगें ॥ ११५ ॥ म्हणोनि इंद्रादिदेवताभजन । कर्मप्रवृत्तीसी कारण । ऐसें ताता सहसा न म्हण । स्वभावजन्य तें अवघें ॥ १६ ॥

स्वभावतंत्रो हि जनः स्वभावमनुवर्तते । स्वभावस्थमिदं सर्वं सदेवासुरमानुषम् ॥ १६ ॥

स्वभाव म्हणिजे कर्म प्राक्तन । संस्काररूपें उद्दीपन । अंतर्यामित्वें प्रेरण । तें अन्यथा कोण करूं शके ॥ १७ ॥ जैसा पूर्वकर्मसंस्कार । कर्मप्रवृत्ति तदनुसार । पालटावया असमर्थ इंद्र । तरी कां आदर तयाचा ॥ १८ ॥ स्वभावतंत्र जीव असतां । कर्मीं संस्कारें प्रवर्ततां । कैंची इंद्रासि तेथें सत्ता । अंतर्यामिता भोगावया ॥ १९ ॥ शतक्रतूच्या कर्माचरणें । जीवचि वैंठे इंद्रपणें । देव मनुष्य असुर होणें । याचिप्रमाणें स्वभावें ॥ १२० ॥

देहानुच्चावचाञ्जंतुः प्राप्योत्सृजति कर्मणा । शत्रुर्मित्रमुदासीनः कर्मैव गुरुरीश्वरः ॥ १७ ॥

तस्मात्संस्कारप्रेरणेस्तव । कर्में निर्माण होय सर्व । त्या कर्मासीच कारणत्व । पूज्य यास्तव कर्मचि ॥ २१ ॥ गाईपासूनि दुग्ध घेणें । रांसभी पोखिंजे मेळवणें । असतां फळसिद्धि कर्माचरणें ।

**पाठभेद :—** * वैयाकरणी (मुंगीप्रत).

१ अति आवडीनें. २ क्रियापद. ३ संस्कृतांत काळ व अर्थ मिळून दहा आहेत, त्यांतील प्रत्येकास लकार म्हणतात. ४ गर्दभी. ५ पोसावी.

देवां भजणें हें तैसें ॥ २२ ॥ देवमनुष्यतिर्यग्याति । अनेक देह जंतूप्रति । कर्मे करूनि प्राप्त होती । पुन्हा सोडिती कर्मक्षयीं ॥ २३ ॥ संचित प्रारब्ध क्रियमाण । ऐसें त्रिविध कर्म जाण । नाना योनीं देहजनन । उपसंहरण करी पुन: ॥ २४ ॥ कर्मे करूनि शत्रुमित्र । कर्मे करूनि मातापितर । कर्मे करूनि पुत्रकलत्र । योनि विचित्र भोगणें ॥ १२५ ॥ शत्रु मित्र उदासीन । अवघें कर्मचि एक जाण । गुरु ईश्वर कर्माविण । सहसा आन असेना ॥ २६ ॥ कर्मे माता प्रसवे पुत्र । प्रारब्धक्षयीं टाकूनि गात्र । पुन्हा पुत्राचें होय कलत्र । कर्म विचित्र तें ऐसें ॥ २७ ॥ स्त्री भर्तार व्याघ्र धेनु । कर्मसंस्कारें करून । परस्परें घेती प्राण । वैर स्मरोन कर्मज ॥ २८ ॥ एवं पूर्वोक्त उच्चावच । कर्मेचि देह जोडती साच । ऐसा कर्मांचा नटनाच । दाऊनि विवंचे करीतसे ॥ २९ ॥ अनेक देहांच्या देऊनि* बुंथी । पांगुरोनी ममताभ्रांति । कर्म बहुरूपी जीवाप्रति । विविधाकृती नाचवी ॥ १३० ॥ यालागीं कर्माहूनि अपर । गुरु† आणि ईश्वर । कैंचा फलदाता येथ शक्र । कर्मप्रचुर अवघेंचि ॥ ३१ ॥

तस्मात्संपूजयेत्कर्म स्वभावस्थः स्वकर्मकृत् । अंजसा येन वर्तेत तदेवास्य हि दैवतम् ॥ १८ ॥

स्वभावस्थ जो संस्कारनिष्ठ । स्वकर्म करीत होत्साता प्रकट । त्यास्तव कर्मचि त्या श्रेष्ठ । पूज्य अभीष्ट फलप्रद ॥ ३२ ॥ ताता तूं जरी म्हणसी ऐसें । द्रव्यत्याग देवतोद्देशें । यज्ञामाजि विहित असे । तरी कर्मासि कैसें स्वातंत्र्य ॥ ३३ ॥ विनादेवता न घडे कर्म । ऐसा सहसा न धरीं भ्रम । कर्मांगदेवता हें जाणिजे वर्म । स्वातंत्र्यधर्मवर्जित ॥ ३४ ॥ जीवकृषीवळें कर्मभूमीं । जें जें देवताबीज नामीं । प्रतिष्ठिजे तें अभीष्टकामीं । फलद स्वधर्मी अर्चितां ॥ १३५ ॥ गहूं पेरिल्या होती फलद । तेथ जोंधळे काय सांगती वाद । तैसेचि येथ देवताभेद । कर्मी विशद अंगत्वें ॥३६॥ जेणें ज्याचें अभिवर्तन । चाले साकल्येंकरून । तेचि देवता तोचि यज्ञ । त्यालागून सुसेव्य ॥ ३७॥ स्वयुक्तीचे हेतुवाद । ऐसे बोलोनि मुकुंद । वैपरीत्यें दोषप्रद । तेंचि विशद प्रकाशी ॥ ३८ ॥

आजीव्यैकतरं भावं यस्त्वन्यमुपजीवति । न तस्माद्विंदते क्षेमं जारं नार्यसती यथा ॥ १९ ॥

जनन जीवन परिवर्धन । जेणें उभयत्र कल्याण । तें सांडूनि विहिताचरण । अन्यसेवन जो करी ॥ ३९ ॥ तया अन्यापासूनि कांहीं । सहसा क्षेम होणार नाहीं । असती जारिणी जैसी कांहीं । जारगेहीं न निंद्य ॥ १४० ॥ तैसें आपुलें कर्म आपण । करितां लाहिजे कल्याण । अन्य कर्म सदूषण । दुःख दारुण भोगवी ॥ ४१ ॥ तरी कोणकोणा कैसें कर्म । तेंही ताता ऐकें वर्म । नियमपूर्वक भजतां सुगम । फलसाम्य¶ सर्वांसी ॥ ४२ ॥

**पाठभेद :—** * करूनि ( मुंगीप्रत ). † नाहीं ( मुंगीप्रत ). ¶ समसाम्य ( मुंगीप्रत ).

१ नाश. २ बहुविध. ३ संकटसमयींचा विचार. ४ देवतेवांचून. ५ कर्मे जीं वेगवेगळीं आहेत त्यांच्या देवता. ६ शेतकऱ्यानें. ७ पूजितां. ८ पूर्णपणें. ९ शास्त्राप्रमाणें आचरण. १० जारिणी स्त्री.

वर्तेत ब्रह्मणा विप्रो राजन्यो रक्षया भुवः । वैश्यस्तु वार्तया जीवेच्छूद्रस्तु द्विजसेवया ॥ २० ॥

वेदाध्ययनें अध्यापनें । वेदविहितकर्माचरणें । वेदार्थाच्या परिचिंतनें । भव निस्तरणें ब्राह्मणीं ॥ ४३ ॥ संरक्षूनि भूमंडळ । प्रजापीडक मारूनि खळ । धर्मन्यायें सर्वकाळ । भव भूपाळ निस्तरिती ॥ ४४ ॥ चतुर्विध वार्तावृत्ति । तदनुष्ठानें वैश्य तरती । द्विजसेवनें शूद्रयाति । पार पावती भवाचा ॥ १४५ ॥ ऐसें असतां इंद्रादिक । कैंचे कोणासि फलदायक । आपुलें कर्म जें निष्टंक । सेव्य अचुक तें आम्हां ॥ ४६ ॥

कृषिवाणिज्यगोरक्षा कुसीदं तुर्यमुच्यते । वार्ता चतुर्विधा तत्र वयं गोवृत्तयोऽनिशम् ॥ २१ ॥

वार्ता चतुर्विध ते कैशी । त्यामाजि प्रथम बोलिजे कृपि[1] । हलादि अनेक उपकरणेंशीं । शुद्ध क्षितीसी करावें ॥ ४७ ॥ क्षिति शोधूनि कीजे क्षेत्र । माजी प्रेरिजे बीज मात्र । तेणें लाभेंशीं सर्वत्र । चाले स्वतंत्र वर्तन ॥ ४८ ॥ वर्तन जीवन चाले जेणें । वृत्ति ऐसें तयासि म्हणणें । म्हणोनि कृषीच्या कर्माचरणें । वृत्तिजीवनें वैश्यांचीं ॥ ४९ ॥ बीज पेरूनि अल्पमात्र । अपार लाभा होइजे पात्र । यालागीं कृपि म्हणिजे क्षेत्र । कर्म स्वतंत्र वैश्यांचें ॥ १५० ॥ कृषिकर्में वर्तन ज्यांचें । दुर्भिक्ष दास्य करी त्यांचें । अभयस्थान जें त्रिजगाचें । कर्म वैश्यांचें प्रथम हें ॥ ५१ ॥ सफळ वृक्षांचीं राजीवनें । पुष्पवाटिका शृंगारवनें । इक्षुपानवाडिया उपवनें । अनेक धान्यें शुष्कार्द्रें ॥ ५२ ॥ फळें मूळें शाकपत्रां । सजळें निर्जळें प्रसवे गोत्रा । यवगोधूमादिविचित्रा । धान्यसंभारा कृषि-कर्में ॥ ५३ ॥ प्रथम कृषीवळा हे कृपि । आतां ऐका वाणिज्यासी । यत्नें जाऊनि देशोदेशीं । समग्र वस्तूंसी संग्रहणें ॥ ५४ ॥ मग वृषभादि अनेक याति । यानें करूनि शीघ्रगति । दुर्भिक्ष असेल जिये प्रांतीं । तेथें विक्रयार्थीं नेइजे ॥ १५५ ॥ मार्गरक्षकां देऊनि कर । निर्भय कीजे पथसंचार । महार्घ विकोनि लाभ अपार । तें साचार वाणिज्य ॥ ५६ ॥ आतां तृतीय गोरक्षण । ऐका तयाचें लक्षण । अरोग पाहोनि तृणजीवन । तेथें गोधन रक्षावें ॥ ५७ ॥ शेळ्या मेंढ्या गाई महिषी । चतुर्विध या गोधनासी । संरक्षूनि जीविकेसी । कीजे वैश्यीं स्वधर्में ॥ ५८ ॥ नाना रोगीं संरक्षणें । श्वापदभया निवारणें । संग्रहूनि बहुविध तृणें । प्रतिपाळणें तद्योगें ॥ ५९ ॥ वसंतीं ग्रीष्मीं यवसजळ* । अर्पूनि करावा सांभाळ । वातवृष्टिरहित स्थळ । प्रावृट्काळभयहरणीं ॥ १६० ॥ अनेक जंतु गोमक्षिका । नित्य निरसूनि देइजे सुखा । ऐसिया पाळणें निजजीविका । कीजे ऐका ते कैशी ॥ ६१ ॥ अर्धपयें वत्सपाळणें । अर्ध घेइजे दोहून । तत्क्रयविक्रयें आपण । जीविकावर्तन करावें ॥ ६२ ॥ दुग्धदधितक्रलोणी- । घृतादिकांच्या विक्रयें करूनी । जीविकावृत्ति बल्लवगणीं । श्रुतिपुराणीं कथिलीसे ॥ ६३ ॥ क्षौद्रमधुफळसंग्रह । ऊर्णीलाक्षानिर्याससमूह । इत्यादिवर्तनप्रवाह । गोरक्षणवृत्तीचा ॥ ६४ ॥ कुसीद म्हणिजे वृद्धिजीवन । पराचें हेमरौप्य ठेवून । वृद्धिस्वार्थें देइजे

पाठभेद :— * येवं सजळ ( मुंगीप्रत ).

१ शेती. २ शेती. ३ नांगर. ४ आवडते. ५ गाई. ६ फुलांच्या बागा. ७ बगिचे. ८ पृथ्वी. ९ गहूं.

धन । शतांस मान नियमूनी ॥ १६५ ॥ कीं धान्याची वाढीदिढी । अनेकपदार्थघडमोडी । बैसले ठायीं कीजे सुघडी । कुसीद उघडी हे वृत्ति ॥ ६६ ॥ खिस्ती खांदे काळांतरें । हुंडीपत्रें देशांतरें । द्रव्य जोडिजे या व्यापारें । इत्यादि प्रकारें कुसीद ॥ ६७ ॥ चतुर्विध हे वार्ता एक । त्यामाजि आम्ही गोरक्षक । नित्य गोधनें अवनात्मक । कर्म निष्टंक आमुचें ॥ ६८ ॥ ताता म्हणसी जगाचा जनक । विघ्न भंगोनि संरक्षक । अंतीं मुक्तिप्रदायक । कोणी एक सुरेंद्र ॥ ६९ ॥ तरी हे ऐसे सहसा न घडे । अनादि कर्में घडे मोडे । इंद्र किमात्मक[१] बापुडें । ऐक निवाडें सांगतों ॥ १७० ॥

सत्त्वं रजस्तम इति स्थित्युत्पत्त्यंतहेतवः । रजसोत्पद्यते विश्वमन्योऽन्यं विविधं जगत् ॥ २२ ॥

जरी म्हणसी* गोरक्षण । तेंही असे इंद्राधीन । इंद्र वर्षतां तृण जीवन । तेणें पाळण पशूंचें ॥ ७१ ॥ ये शंकेच्या निराकरणीं । सांख्यमत अवलंबूनी । निरीश्वरवाद[२] प्रतिपादूनी । चक्रपाणि बोलतसे ॥ ७२ ॥ सत्त्व रज आणि तम । तिहीं गुणीं त्रिविध कर्म । स्थिति उत्पत्ति लय संभ्रम । प्रसवे काम क्षोभोनी ॥ ७३ ॥ काम खवळे रजोगुणीं । तेथ दांपत्यभावें अनेक योनि । परस्परें होतां मिळणी । घडे† खाणी त्रिजगाची ॥ ७४ ॥ सत्त्वगुणें विवेक प्रचुरें[३] । परस्परें पडोनि मैत्र । पुष्टि पावे भूतमात्र । स्थिति स्वतंत्र गुणकर्में ॥ १७५ ॥ तमोद्रेकें प्रमादबहळें । विषयस्वार्थीं भेद खवळे । परस्परें विरोधबळें । मग मावळे सहजेंची ॥ ७६ ॥ ऐसा स्थिति उत्पत्ति लय । गुणात्मकें कर्म होय । तरी इंद्र ईश्वर येथें काय । आम्हां भजनीय केंउतां[४] ॥ ७७ ॥

रजसा चोदिता मेघा वर्षंत्यंबूनि सर्वतः । प्रजास्तैरेव सिध्यंति महेंद्रः किं करिष्यति ॥ २३ ॥

रजोगुणाच्या क्षोभेंकरून । प्रावृट्काळीं खवळती घन । सर्वत्र वर्षती तें जीवन । तें लक्षण अवधारीं ॥ ७८ ॥ समुद्रीं पर्वतीं काननीं महीं । जळ वर्षतां चहूं ठायीं । तेणें जीवन सर्वां देहीं । तरी इंद्रें काय करावें ॥ ७९ ॥ धेनूपासूनि पयाचा लाभ । वृथा व्याघ्रीचा समारंभ । वृष्टीकारणें जैं गुणक्षोभ । तरी कां वालभ शक्राचें ॥ १८० ॥ मही प्रसवे अनेक सस्यें । काननीं होती विविध यवसें । पर्वतीं गुल्मलता वृक्ष आपैसें । सुखसंतोषें वाढती ॥ ८१ ॥ नाना पदार्थ रत्नें लवणें । समुद्र वोपी वर्षता घन‡ । येथ इंद्रमखाचें कोण । प्रयोजन मज सांगा ॥ ८२ ॥ ताता म्हणसी देवताभजनें । संततिसंपत्ति संरक्षणें । अप्राप्यांची प्राप्ति होणें । याकारणें सुर पूज्य ॥ ८३ ॥

न नः पुरो जनपदा न ग्रामा न गृहा वयम् । वनौकसस्तात नित्यं वनशैलनिवासिनः ॥ २४ ॥

तरी त्या प्रजा बहुतां परी । भजती योगक्षेमानुसारीं । पुरीं पट्टणीं ग्रामीं नगरीं । गृहव्यापारीं हव्यास ॥ ८४ ॥ आम्ही नागरें[५] ना ग्रामवासी । अथवा न फिरों देशोदेशीं । नित्य आम्हां

**पाठभेदः—** * तूं म्हणसी ( मुंगीप्रत ). † उघडे ( मुंगीप्रत ). ‡ वने ( मुंगीप्रत ).

१ किंपदार्थ. २ नास्तिक मत. ३ पुष्कळ. ४ कसा. ५ नगरवासी.

वनौकसांसी । गिरिवनवासीं नांदणुक ॥ १८५ ॥ ज्यांचें जीवन ज्यांपासून । तेंचि पूज्य त्यांलागून । तस्मात् गोधनगिरिकानन । पूज्य पावन आम्हांसी ॥ ८६ ॥

तस्माद्गवां ब्राह्मणानामद्रेश्चारभ्यतां मखः । य इंद्रमखसंभारास्तैरयं साध्यतां मखः ॥ २५ ॥

या कारणास्तव ताता । हेंचि कर्तव्य आम्हां समस्तां । धेनुविप्रार्चनें तत्त्वता । सिद्धि सांगता यज्ञाची ॥ ८७ ॥ धेनुब्राह्मणपूजनात्मक । गोवर्द्धनाख्य जो कां मख । आतांचि आरंभिजे सम्यक् । नंदप्रमुखसमस्तीं ॥ ८८ ॥ विधिविधानें येथ कैसें । जाणों इच्छिजेल मानसें । तरी ऐका तें होय तैसें । निजसंतोषें मम मुखें ॥ ८९ ॥ निगमागमप्रकाशक । तो हा प्रत्यक्ष यदुनायक । स्वमुखें शंसी¶ अद्रिमख । विधिपूर्वक तो ऐका ॥ १९० ॥ इंद्रयागाचे संभार । तिहींच साधिजे हा अध्वर । पांचां श्लोकीं नंदकुमर । तो विस्तार निरूपी ॥ ९१ ॥

पच्यंतां विविधाः पाकाः सूपांताः पायसादयः । संयावापूपशष्कुल्यः सर्वदोहश्च गृह्यताम् ॥ २६ ॥

गोवर्धनासमीपवर्ती । शुद्ध समान करूनि क्षिति । तेथ बल्लवीं समस्तीं । सर्व संपत्ति आणाव्या ॥ ९२ ॥ दोहोनि गोधनें चतुर्विध[2] । अवघें संग्रहिजे दुग्ध । पायस[3] पचविजे* परम शुद्ध । जें भूविबुध[4]प्रियतम ॥ ९३ ॥ शुद्ध गोधूम भरडून । अपआज्यशर्करा मेळवून । संयावनामक[5] परमान्न । कीजे निर्माण यज्ञार्थ ॥ ९४ ॥ व्रीहि[6] शाली नीवारयाति । आणूनि प्रियंगु ओदनार्थी । शार्माक-कोद्रवादि पंक्ति । तंडुल निगुतीं रांधावे† ॥ १९५ ॥ अपूप मंडक वटक पुरिया । सगर्भ भक्ष्यें विडुरिया । बहुविध शष्कुल्या फेणिंया । क्षीर घारिया सकुमारा ॥ ९६ ॥ लाडु मोदक गुळवरिया । चणकपूरणाच्या तेलवरिया । संयावसगर्भ सांजवरिया । आणि कुरवडिया खुसखुशित ॥ ९७ ॥ मरीचवटक कूष्मांडवटक । शाका शलाटुव्यंजनें अनेक । संधितें सांडया पर्पटक । रस अनेक निर्मावे ॥ ९८ ॥ लेह्यपेयचोष्यखाद्यें । भक्ष्यें भोज्यें नानाविधें । पायसें निर्मावीं केवळ दुग्धें । परम शुद्धें यज्ञार्थ ॥ ९९ ॥ मुद्गांटकादि सोलीव दाळी । नैश चूर्णाक्त सूपें पिवळीं । क्वथिका रुचिकर भोजनकाळीं । वेळोवेळीं साक्षेप ॥ २०० ॥ साय नवनीत सद्यस्तप्त । थिजलें विघरलें मध्यस्थ । गव्याज्य मधु संग्रह बहुत । तो तो अगत्य करावा ॥ १ ॥ भर्जित रामठ[10] शुंठीमिरें । कोथिंबिरी लवणमिश्रें । वाघारणी देऊनि तक्रें । अतिरुचिकरें अशीं‡ द्या ॥ २ ॥ पच्यंतां विविधाः पाकाः । येथील विस्तार हा आसिका । जो जो विस्तारील जितुका । अर्थ तितुका ये ठायीं ॥ ३ ॥ अग्नि-प्रतिष्ठेवांचून । सहसा शोभा न पवे यज्ञ । गोवळांमनीं भक्ति उत्पन्न । व्हावया लागून हरि प्रेरी ॥ ४ ॥

पाठभेदः — ¶प्रशंसी ( मुंगीप्रत ). * पंचविध जे ( मुंगीप्रत ). † ९४ व ९५ या ओव्या मुंगीप्रतींत पुढेमागे आहेत. ‡ असो ( मुंगीप्रत ).

१ एखाद्या कार्यांत अवश्य करण्याच्या गोष्टी. २ गाई, म्हशी, शेळ्या व मेंढ्या. ३ क्षीर. ४ ब्राह्मणांस फार प्रिय. ५ सांजा. ६ भात नांवाचें धान्य. ७ कांग. ८ सांवे. ९ हरिक. १० हिंग.

हूयंतामग्नयः सम्यग् ब्राह्मणैर्ब्रह्मवादिभिः । अन्नं बहुविधं तेभ्यो देयं वो धेनुदक्षिणाः ॥ २७ ॥

**वेदवेत्ते सुब्राह्मण । जे कां मूर्तिमंत यज्ञ । ते साक्षेपें बोलावून । अग्निस्थापन करवावें ॥२०५॥ स्वस्तिवाचनपूर्वक । अभ्यर्चूनि नान्दीमुख । समारंभें कीजे मख । मंत्रघोक विध्युक्त ॥ ६ ॥ तुम्हीं वैश्यवर्गीं समस्तीं । ब्राह्मण पूजूनि पूर्णभक्ति । पूर्वोक्त अन्नें तयांप्रति । परमप्रीति अर्पावीं ॥ ७ ॥ सालंकृता सदक्षिणा । धेनु अर्पाव्या ब्राह्मणां । फलतांबूलस्रक्चंदना । देऊनि नाना उपचार ॥ ८ ॥ अथवा धेनुचि दक्षिणेवारी । अर्पूनियां विप्रांकरीं । ब्राह्मण तोषती अंतरीं । ते ते प्रकारीं पूजावे ॥ ९ ॥ ऐसे तोषवूनि ब्राह्मण । सुप्रसन्न चित्तेंकरून । ते जैं देती आशीर्वचन । तेव्हां कल्याण सर्वांसी ॥ २१० ॥ ब्राह्मणपूजनानंतर । अभ्यर्चिजे भूतमात्र । जेणें निवे सर्वांतर । परम सुखकर तें कर्म ॥ ११ ॥ समान करितां उच्चावच । वर्णाश्रमाचा विसंच । होऊं नेदिजे इतुकाच । तंतु साच रक्षावा ॥ १२ ॥**

अन्येभ्यश्चाऽऽश्वचांडालपतितेभ्यो यथाऽर्हतः । यवसं तु गवां दत्वा गिरये दीयतां बलिः ॥ २८ ॥

**जैशी जयाची योग्यता । तदनुसार त्या अर्चितां । परमतोष उपजे चित्ता । यथार्हता म्हणोनियां ॥ १३ ॥ ब्राह्मणांहूनि जे सामान्य । पिपीलिकादि[1] जंतु¶ सान[2] । वायसादि पक्षिगण । शृगाळ[3] श्वान[4] इत्यादि ॥ १४ ॥ व्रात्य[5] पतित[6] चांडाळ । त्यां कारणेंही अन्न जळ । देऊनि करावा सांभाळ । जाणोनि शीळ यथोचित ॥ २१५ ॥ आर्द्र शुष्क उत्तम तृण । अर्पूनि कीजे गोतर्पण । त्यांसी अयोग्य मंगळ स्नान । दीजे म्हणोन* प्रिय ज्यां जें ॥ १६ ॥ मग त्या गोवर्धनाद्रितळीं । विविधोपचारीं दीजे बळी । अन्नगोरसीं पुष्पीं फळीं । गिरिवर सकळीं पूजावा ॥ १७ ॥ मग व्रजवासी समस्त । शिष्टप्रसादें† भक्तवंत । शुचिष्मंत सालंकृत । चंदनलिप्त सुवासस[7] ॥ १८ ॥**

स्वलंकृता भुक्तवंतः स्वनुलिप्ताः सुवाससः । प्रदक्षिणं च कुरुत गोविप्रानलपर्वतान् ॥ २९ ॥

**सकळ सुहृद् स्वजनज्ञाति । बैसोनियां एकपंक्तीं । भोजन कीजे यावत्तृप्ति । अन्नीं प्रीति ज्यां जैशी ॥ १९ ॥ ऐसीं सारूनि भोजनें । लेऊनि रुक्मरत्नाभरणें । परिधान करूनि दिव्य वसनें । माथां सुमनें वोवावीं ॥ २२० ॥ गाई ब्राह्मण हुताशन । आणि स्वर्चित[9] गोवर्धन । यांसि करावें अभिवंदन । प्रदक्षिणापूर्वक ॥ २१ ॥ ऐसें समस्त बल्लवांसी । रहस्य सांगे हृषीकेशी । डोलवूनि निजमौळासी । नंदादिकांसी अनुमोदी ॥ २२ ॥ गाई ब्राह्मण हुताशन । धन्य पर्वत गोवर्धन । याचा महिमा वर्णी कोण । स्वमुखें कृष्ण म्हणतसे ॥ २३ ॥ इत्यादि अर्चन यज्ञविधि । असाध्य साधिती सर्व सिद्धि । ऐशी माझी अलोट बुद्धि । गोपवृद्धीं विचारिजे ॥ २४ ॥**

**पाठभेद :—** ¶जे जंतु ( मुंगीप्रत ). * भोजन ( मुंगीप्रत ). † शेष ( मुंगीप्रत ).

१ मुंग्या. २ लहान. ३ कोल्हा. ४ कुत्रा. ५ जातिसंस्काररहीन. ६ भ्रष्ट. ७ उत्तम वस्त्रें परिधान केलेले. ८ सुवर्ण. ९ सुपूजित.

एतन्मम मतं तात क्रियतां यदि रोचते । अयं गोब्राह्मणाद्रीणां मह्यं च दयितो मखः ॥ ३० ॥

**ऐसें माझें मत हें ताता । जरी रुचेल तुम्हां समस्तां । तरी अनुष्ठिजे आतां । विलंब सर्वथा न करावा ॥ २२५ ॥ विप्र धेनु हुताशन । पर्वतरूपी गोवर्धन । यासी परम प्रिय हा यज्ञ । मजही कारणें प्रियतम ॥ २६ ॥ विप्र धेनु पावक अद्रि । यांचा महिमा नेणिजे क्षुद्रीं । यांसी प्रिय हा बल्लवेंद्रीं । अत्यादरीं मख कीजे ॥ २७ ॥ मजकारणें ही परम प्रिय । ऐसें म्हणतां यादवराय । नंदादि पशुपांचा समुदाय । ऐकोनि विस्मय पावला ॥ २८ ॥ शुक म्हणे गा धरित्रीपाळा । भारत-कुळवल्लीच्या फळा । कृष्णें बोधूनि गोपां सकळां । ज्ञातृत्वकळा मोहिल्या ॥ २९ ॥**

श्रीशुक उवाच — कालात्मना भगवता शक्रदर्प जिघांसता ।
प्रोक्तं निशम्य नंदाद्याः साध्वगृह्णंत तद्वचः ॥ ३१ ॥

**ज्याचें सत्यसंकल्पस्फुरण । चेववी शुद्धसत्त्वाभिमान । लेववूनि ईश्वरपण । करी सर्वज्ञ अद्वैतता ॥ २३० ॥ जागवूनि इच्छाशक्ति । उपजवी बहुत्वाची प्रीति । तो कालात्मा भगवन्मूर्ति । गोप यज्ञार्थीं प्रबोधी ॥ ३१ ॥ षड्गुणैश्वर्यसंपन्न । करावया भूभारहरण । अवतरलों हे प्रकटी खूण । सर्व सुरगण लाजवुनी ॥ ३२ ॥ ब्रह्मा ठकिला वत्साहरणीं । प्राशूनि निर्वीर्य केला वह्नि । यम लाजविला गैर शोषुनी । पूतनास्तनीं लाविता* ॥ ३३ ॥ आतां इंद्राचा दर्पभंग । करावया विश्वान्तरंग । प्रेरिता झाला अद्रियाग । तो बल्लवीं याग आदरिला ॥ ३४ ॥ भगवंताची ऐकोनि वाणी । नंदादिप्रवृद्धबल्लवगणीं । भला गा भला ऐसें म्हणोनी । अंतःकरणीं हरिखेले ॥ २३५ ॥ एकमेकांकडे पाहती । म्हणती केवढी विशाळ मति । बोधूं विसरला प्रजापति । तेंही याप्रति सूचलें ॥ ३६ ॥ श्रुतीसिही जें कळलें नव्हतें । बोधूं विसरलीं बहु ऋषिमतें । म्हणोनि स्मृति-पुराणांतें । यावत्काळ अविदित ॥ ३७ ॥ तें या कृष्णें आमुचे श्रवणीं । कथितां कळलें अंतःकरणीं । मग कृष्णाचे आज्ञेवरूनी । यज्ञाचरणीं प्रवर्तले ॥ ३८ ॥**

तथा च व्यदधुः सर्वं यथाऽऽह मधुसूदनः । वाचयित्वा स्वस्त्ययनं तद्द्रव्येण गिरिद्विजान् ॥ ३२ ॥

**जैसजैसें बोधिलें कृष्णें । तैसें ऐकोनि सर्वीं श्रवणें । विवरूनियां अंतःकरणें । यज्ञाकारणें अनुसरले ॥ ३९ ॥ इंद्रयागार्थ जे संभार । द्रव्यसामग्री पावनतर । तेचि घेऊनि गिरिअध्वर । अतिसत्वर आदरिला ॥ २४० ॥ वेदशास्त्रपारंगत । कर्मउपासनात्रिकाण्डनिरत । यज्ञावतार मूर्तिमंत । ते ब्राह्मण तेथें आणिले ॥ ४१ ॥ योगाभ्यासी तपोधन । महाव्रती जे उदासीन । निष्काम ज्यांचें कर्माचरण । विरक्त पूर्ण उभयत्र ॥ ४२ ॥ वैयाकरण‡ नैयायिक । सांख्य तार्किक मीमांसक ।**

**पाठभेद :—** * शोषोनि ( मुंगीप्रत ). ‡ वैयाकरणी ( मुंगीप्रत ).

१ अज्ञानी जनाची. २ विष. ३ जोपर्यंत. ४ अतिपवित्र. ५ कर्म, उपासना, ज्ञान अशीं तीन काण्डें. ६ तपस्वी.

पाञ्चरात्र वैशेपिक । वेदपाठक पुरश्चरणी ॥ ४३ ॥ वेदांतविद्यामूलपीठें । उपनिषदर्थं मुक्तकपाटें । ऐशीं द्विजरत्नें चोखटें । सप्रेमनिष्ठें प्रार्थिलीं ॥ ४४ ॥ आप्त स्वजन सुहृद्गण । आदरें आणिले सन्मानून । मग सेवूनि गोवर्धन । यज्ञसदन निर्मिलें ॥ २४५ ॥ समान करूनि भूमिभाग । कृष्ण-प्रणीत विधानमार्गे । तैसतैसा तेथ याग । बल्लववर्ग आदरिती ॥ ४६ ॥ स्वस्तिवाचन नान्दीश्राद्ध । मातृका ग्रहमख यथाविध । कुंडीं अग्नि करूनि सिद्ध । द्रव्यें विविधें होमाविती ॥ ४७ ॥ वसुधारा पूर्णाहुति । करूनि यज्ञाची समाप्ति । बलिप्रदानीं श्रीकृष्णोक्ति । तैसीं अर्पिती तीं द्रव्यें ॥ ४८ ॥ अग्नीमाजि करूनि हवन । पूजिला गिरि गोवर्धन । यथोचित गोब्राह्मण । अभ्यर्चून तोषविले ॥ ४९ ॥

उपहृत्य बलीन् सर्वानादृता यवसं गवाम् । गोधनानि पुरस्कृत्य गिरिं चक्रुः प्रदक्षिणम् ॥ ३३ ॥

अन्यत्र जे* श्वचांडाल । अनाथ पतित व्रात्यमेळ । यथायोग्य पूजूनि सकळ । सुखसुकाळ त्यां केला ॥ २५० ॥ परम सादर बल्लवगण । करूनि सर्वांचें पूजन । स्निग्धरसाळ कोमल तृण । गाईलागूनि अर्पिती ॥ ५१ ॥ मग गोवर्धनप्रदक्षिणे । करिती गौळियें थोरें लाहानें । पुढें घालूनि निजगोधनें । वाद्यगर्जनें जयशब्दें ॥ ५२ ॥

अनांस्यनडुद् युक्तानि ते चारुह्य स्वलंकृताः । गोप्यश्च कृष्णवीर्याणि गायंत्यः सद्विजाशिषः ॥ ३४ ॥

बल्लवीं गोधनें शृंगारिलीं । हेमरत्नें शृंगें मढविलीं । कंठीं घंटा घागरवाळी । पृष्ठीं शोभलीं क्षौमांबरें ॥ ५३ ॥ शुभ्रचामरें विषाणीं । स्वर्णमोहरख्या जडितरत्नीं । माथाटियांवरी¹ जडिले मणि । ते दिनमणि² लाजविती ॥ ५४ ॥ कंठीं कनकाच्या शृंखळा । त्रिगुंफिता कौशल्यकळा । चरण-चापल्यें खळखळा । वांकी वाळे वाजती ॥ २५५ ॥ उत्तंभित श्रवणहारी । पुच्छें वाहूनि पृष्ठीवरी । गोधनें चारिती हुंकारगजरीं । गोप कुकारीं तोपविती ॥ ५६ ॥ शृंगें मोहरी वाद्यगजर । रसाळ वेणु सप्तस्वर । गोपगायनें त्यामाजि मधुर । नादाकार नभोगर्भ ॥ ५७ ॥ बैल जुंपूनियां गाडां । सालंकृता गोपी सुघडा । शकटीं होऊनि आरूढा । घेती पुढां निजबाळें ॥ ५८ ॥ गोधनाचिये पृष्ठभागीं । गाडे धांवती वातवेगीं । कृष्णवीर्यें काञ्चनांगी³ । नवरसरंगीं आळविती ॥ ५९ ॥ सप्तस्वरांचिया छंदें । तानमानें गीतप्रबंधें । क्रीडा केली जे मुकुंदें । ते गाती आनंदें गोपिका ॥२६०॥ त्यांमाजि ब्राह्मणांचे भार । विविध शाखा विविध मंत्र । पठनें आशीर्वादपर । करिती गजर प्लुतघोषें ॥ ६१ ॥ ऐसी उत्साहें प्रदक्षिणा । करूनि पातले पूर्वस्थाना । तंव आश्चर्य कुरुभूषणा । कृष्णप्रेरणा तें ऐका ॥ ६२ ॥

कृष्णस्त्वन्यतमं रूपं गोपविश्रंभणं गतः । शैलोऽस्मीति ब्रुवन् भूरि बलिमादद्‌बृहद्वपुः ॥ ३५ ॥

**पाठभेद** — * जे जे ( मुंगीप्रत ).

१ बैलांच्या शिंगांस लावलेले गोंडे. २ सूर्य. ३ सोन्याप्रमाणें तेजस्वी.

इंद्रमखाचा करूनि भंग । कृष्णें करविला पर्वतयाग । तेथ विश्वास व्हावया चांग । दावी श्रीरंग चमत्कार ॥ ६३ ॥ आपण असूनि गोपांसमीप । दुसरें धरूनि विशाळ रूप । म्हणे गिरिवर मी जालों सद्रूप । शुद्ध संकल्प देखुनी ॥ ६४ ॥ मी गोवर्धन तुमची भक्ति । देखोनि प्रकटिली निजाकृति । प्रसन्न जाहलों अभीष्टप्राप्ति । तुम्हीं समस्तीं याचिजे ॥ २६५ ॥ ऐसें वारंवार बोले । गोवळीं अन्नादि जें अर्पिलें । तें सर्वही स्वीकारिलें । हें आश्चर्य देखिलें बल्लवीं ॥ ६६ ॥

तस्मै नमो व्रजजनैः सह चक्रेऽऽत्मनाऽऽत्मने । अहो पश्यत शैलोऽसौ रूपी नोऽनुग्रहं व्यधात् ॥ ३६ ॥

मग तो यशोदानंदन । सहित अवघे व्रजींचे जन । आपणाचि झाला गोवर्धन । मग त्या कारणें वंदीतसे ॥ ६७ ॥ देव होऊनि देवां यजिजे । आगमगर्भीं[१] रहस्य हें जें । अनुष्ठूनियां गरुडध्वजें । तें येथ सहजें दाविलें ॥ ६८ ॥ व्रजजनेंशीं कृष्ण आपण । आपणाकारणें करी नमन । अहो पहा हें आश्चर्य कोण । म्हणे स्मयमान[२] होउनी ॥ ६९ ॥ प्रत्यक्ष गोवर्धनाचळ । रूप धरूनियां विशाळ । प्रकट झाला दीनदयाळ । वरद स्नेहाळ आम्हांसी ॥ २७० ॥ आम्हांकारणें अनुग्रह । करावया धरिला देह । येऱ्हवीं भूतमात्रीं स्नेह । निःसंदेह पैं याचा ॥ ७१ ॥

एषोऽवजानतो मर्त्यान् कामरूपी वनौकसः । हंति ह्यस्मै नमस्यामः शर्मणे आत्मनो गवाम् ॥ ३७ ॥

तरी हा गोवर्धनागिरि । इच्छेसारिखीं रूपें धरी । आपणा न जाणती त्यां मारी । वनसंचारी विहरतां ॥ ७२ ॥ याचा महिमा जें नेणती । गोधनेंसहित तेयां प्रति । व्याघ्रसर्पादि धरूनि व्यक्ति । क्षोभकवृत्ति संहारी ॥ ७३ ॥ आम्हीं पूजिला सप्रेमभावें । प्रकट झाला परमदैवें । आतां नमस्कारूं या आघवे । कल्याण व्हावें जरी तुम्हां ॥ ७४ ॥ आमुच्या धनधान्यगोधना । कुटुंबेंशीं बल्लवगणा । क्षेमकल्याणवर्धना । याच्या चरणां नमीतसों ॥ २७५ ॥ मग तो गोवर्धनभगवान । कृपादृष्टि अवलोकून । पावता झाला तिरोधान¶ । देखोनि व्रजजन विस्मित ॥ ७६ ॥

इत्यद्रिगोद्विजमखं वासुदेवप्रचोदिताः । यथा विधाय ते गोपाः सहकृष्णा व्रजं गताः ॥ ३८ ॥

निवारूनियां महेंद्रयाग । जैसा कृष्णें बोधिला मार्ग । गोद्विजाद्रिअध्वर चांग । तैसा सांग संपविला ॥ ७७ ॥ इतुकें कृत्य संपादून । कृष्णेंसहित बल्लवगण । निज गोधनें पुरस्कारून[३] । व्रजभुवन पातले ॥ ७८ ॥ परस्परें करिती गोष्टी । केवढें आश्चर्य देखिलें दृष्टी । गोवर्धनाची कृपादृष्टि । सुखसंतुष्टि पावलों* ॥ ७९ ॥ प्रतिवत्सरीं इंद्रमख । गोपवृद्ध नंदप्रमुख । करितां न लभों ऐसें सुख । कृष्णें कौतुक दाविलें ॥ २८० ॥ एक म्हणती हा श्रीपति । गोपाळक† बाळमति । यासि कोठूनि मखव्युत्पत्ति[४] । कैसी युक्ति हे कथिली ॥ ८१ ॥ एक म्हणती हा सर्वज्ञ । कालरूपी त्रिकालज्ञ ।

**पाठभेद :—** ¶ अंतर्धान ( मुंगीप्रत ). * ७९, ८० या ओव्या मुंगीप्रतींत पुढें-मागें आहेत. † गोगोपक ( मुंगीप्रत ).
१ शास्त्रांत. २ आश्चर्यचकित. ३ पुढें करून. ४ यज्ञाविषयींचें ज्ञान.

भूत भविष्य वर्तमान । जाणे संपूर्ण कालात्मा ॥ ८२ ॥ ऐसे गोपाळ गोपयुवति[1] । कृष्णमाहिमा वाखाणिती । परस्परें विस्मय करिती । शुक हें कथी नृपातें ॥ ८३ ॥ दत्तात्रेयकृपावरद । श्रीमज्जनार्दनप्रसाद । एकनाथें चिदानंद । निजस्वानंद पावविला ॥ ८४ ॥ तया स्वानंदाची मूर्ति । गोविंदसद्गुरु चक्रवर्ती । पदजलप्रसादभागीरथी । भाग्यें आपैती दयार्णवा ॥ २८५ ॥ तें हें श्रीमद्भागवत । अठरा सहस्र ज्याचें गणित । परमहंस जेथें रमत । स्कंध त्यांत दशम हा ॥ ८६ ॥ त्यांतील अध्याय चोव्विसावा । मख वारूनि श्रीकृष्णें मघवा । क्षोभविला तो वृत्तांत आघवा । मनुष्यदेवा शुक वदला ॥ ८७ ॥ पुढले अध्यायीं निरूपण । व्रजनाशार्थ संक्रंदन । वर्षतां कृष्ण गोवर्धन । धरूनि रक्षण करील ॥ ८८ ॥ तया कथेच्या श्रवणाप्रति । सादर असावें सभाग्यश्रोतीं । अभाग्यांची न चुके गुंती । ममताभ्रांति भवभानें ॥ ८९ ॥ तथापि श्रोते सभाग्य जनीं । निजवैभवें विभागूनी । बैसावें त्या कथाश्रवणीं । स्वसुख देऊनि निववावें ॥ २९० ॥ कृष्णकथामृताचा स्वाद । चाखतां पावती परमानंद । मग त्या भवभणगत्वें शब्द । कोण अनुवाद करूं शके ॥ ९१ ॥ निंदास्तुतीसि देऊनि पाठीं । वृथा न करूनि चावटी । कृष्णकीर्तनश्रवणासाठीं । लागे पाठीं अपवर्ग[2] ॥ ९२ ॥ सर्वांचरणीं ठेवूनि माथा । प्रार्थी दयार्णव परमार्था । सांडूनि भवभयाची व्यथा । हे सत्कथा सेवावी ॥ ९३ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायामिंद्रविषादो† नाम चतुर्विंशतितमोऽध्यायः ॥ २४ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक ३८ ॥ टीका ओव्या २९३ ॥ एवं संख्या ३३१ शुभं भवतु ॥ ( चोविसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १२५४६ )

**चोविसावा अध्याय समाप्त.**

---

**पाठभेदः**— *राये अमृते धरोनि भाव । ग्रंथलेखन केले सर्व । श्रीकृपेने समुद्भव । लघूनि विभव भोगितसे ॥ ९४ ॥ तीर्थरूपें ग्रंथलेखन । केलें त्यात आध्य न्यून । होती ते स्वामी कृपेनें । राय अमृते लिहिलेसें ॥ २९५ ॥ आतां करोनि कृपादृष्टि । सर्वदा रक्षावे भवसंकटी । संतती संपत्ती आक्ष पुष्टी । देऊनि तुष्टी तारावे ॥ ९६ ॥ इतुके मागतो वरदान । मज द्यावेजी कृपाघन । वर्षोनि मजला जीवनें । अमृतपणे पोसावे ॥ ९७ ॥ ग्रंथरूपें श्रीहरि । वसति करावी मम मंदिरीं । वंशपरंपरा टाकूनि दुरे । क्षणभरही न वजावे ॥ ९८ ॥ आजि धन्य धन्य हे शरीर । आजि धन्य धन्य तिथीवार । की मज हस्त ग्रंथ आवग्र । लेखन समग्र केलेसे ॥ ९९ ॥ ( या ओव्या मुंगीप्रतीत अधिक आहेत, त्या लेखकानें घातल्या असाव्यात ). † इंद्रमखभंगो नाम ( मुंगीप्रत ).

१ गवळणी. २ मोक्ष.

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय २५ वा

श्रीगोविंदसद्गुरवे नमः। स्तवनीं मौनावले वेद। कथनीं शेषा रसनाभेद। सप्रेमभावें श्रीगोविंद। नमनें वरद वालभीं[1] ॥ १ ॥ करूनि मायेचा निषेध। अतन्निरसनमुखें शोध। करितां देखिला अगाध। महिमा *अभेद भक्तीचा ॥ २ ॥ अभेदभजनप्रेमासाठीं। अनंत ऐश्वर्याचे मुकुटीं। बैसोनि मिरविजे फळकटीं। निगमचावटी तैं कुंठे ॥ ३ ॥ माया मिथ्या म्हणतां नये। प्रेमें सन्मात्र कवळूनि ठाये। सत्य म्हणतां द्वैत होय। कैसें काय वदावें ॥ ४ ॥ निर्गुण आणि निर्विकार। ऐसाचि धरूनि राहतां भार। तरी मायेचा मिथ्याकार। देऊनि परिहार झाडिता ॥ ५ ॥ लटकी माया म्हणों जातां। सप्रेम भजनें ती औतौता[2]। औतुडे तेव्हां लाजे वक्ता। निजगुह्यार्था लोपोनि ॥ ६ ॥ सत्य म्हणोनि प्रतिपादन। असत्य म्हणोनि निषेधन। करावयासि सामर्थ्यहीन। धरिलें मौन तैं निगमीं ॥ ७ ॥ अनंतगुणगणनेचा धंदा। अवलंबूनि गुणानुवादा। करितां जिह्वा पावल्या भेदा। तऱ्हीं गोविंदा न वर्णवे ॥ ८ ॥ अनंतवदनें अनंतकल्प। अनंतगुण गणितां अल्प। नुमाणती मग होऊनि †तळप। सोडी संकल्प कथनाचा ॥ ९ ॥ तो तूं सप्रेमभजनासाठीं। सद्गुरु स्वमुखें सांगतां गोठी। सच्छिष्यांचे श्रवणपुटीं। उठाउठीं सांठवसी ॥ १० ॥ महत्त्वें टाकितां नव्हसी गगना। तो साकल्यें अणूच्या मना-। माजीं वससी या महिमाना। तुजवीण §कोणा जाणिव ॥ ११ ॥ महत्त्व लाघव तुजचि तुझें। येर जाणीव वृथा वोझें। तो तूं मानस वसविसी माझें। हें मी बुझें तव ‡वरें ॥ १२ ॥ आज्ञेवरूनि दशमस्कंध। भाषाव्याख्यान चालतां शुद्ध। क्रमेंचि उदेला प्रसिद्ध। पंचविसावा अध्याय ॥ १३ ॥ चोविसामाजि इंद्रमख। करितां वारिले

---

पाठभेदः— *अगाध (मुंगीप्रत). †तल्प (मुंगीप्रत व उमरखेडप्रत). §कोवणा (मुंगीप्रत); कोण्हा (उमरखेडप्रत). ‡वरदें (मुंगीप्रत व उमरखेडप्रत).

१ भक्तांस. २ आंत, मध्यें. ३ प्राप्त होय.

नंदप्रमुख । गोद्विजाद्रियज्ञें दुःख । ‡शत्रु सम्यक पावला ॥ १४ ॥ पंचविसाव्या अध्यायीं तेणें । अत्यंत क्रोधें संक्रंदनें । गोकुलनाशार्थ प्रलयघनें । उपलजीवनें वर्षतां ॥ १५ ॥ भयें त्रासले गाईगोप । मिळाले श्रीकृष्णा समीप । करितां शतक्रतूचा कोप । झाला सकृप जगदात्मा ॥ १६ ॥ प्रभुत्वें उचलोनि गोवर्धन । केलें गोकुळसंरक्षण । ये अध्यायीं इतुकें कथन । व्यासनंदन निरूपी ॥ १७ ॥

श्रीशुक उवाच— इंद्रस्तदाऽऽत्मनः पूजां विज्ञाय विहतां नृप ।
गोपेभ्यः कृष्णनाथेभ्यो नंदादिभ्यश्चुकोप सः ॥ १ ॥

शुक म्हणे गा यादवीपौत्रा । वारिधिपरिधान पाळिसी गोत्रा । हरिमित्राच्या पुत्रपुत्रा । कृष्णचरित्रा परियेसीं ॥ १८ ॥ कृष्णें निवारितां शक्रमख । तेणें मानिलें परमदुःख । अमर ऐश्वर्याचा हरिख । मानी फोक सक्रोध ॥ १९ ॥ पंक्तीमाजूनियां उठविलें । कीं सभेमाजि निर्भर्त्सिलें । किंवा रासभीं आरूढ केलें । गजावरूनि उतरूनियां ॥ २० ॥ तैसा आपुला पूजानिषेध । इंद्रें जाणोनिया प्रसिद्ध । नंदादिगोपांवरी सक्रोध । करूं निरुद्ध प्रवर्तला ॥ २१ ॥ नंदादिगोपां रक्षणार्थ । शिरीं असतां कृष्णनाथ । इंद्र त्यांच्या संहारार्थ । स्वसामर्थ्य अवलंबी ॥ २२ ॥

गणं सांवर्तकं नाम मेघानां चांतकारिणाम् । इंद्रः प्राचोदयत् क्रुद्धो वाक्यं चाहेशमान्युत ॥ २ ॥

प्रळयकर्ता जो मेघगण । जया सांवर्तक अभिधान । इंद्र तया करी प्रेरण । बोले कोपोन ईशत्वें ॥ २३ ॥ अहो तुम्ही प्रळयमेघ । घेऊनि दुर्वृष्टीचा वोघ । करा नंदादिगोकुळभंग । अतिसवेग वर्षोनी ॥ २४ ॥ गोपांशिरीं नाथ कृष्ण । असतां न चले म्हणाल यत्न । तरी मरुद्गणेंशीं परिवारून । शक्र भगवान् मी येतों ॥ २५ ॥ आंगीं *भरतां क्रोधवारें । सहसा विवेक तेव्हां न थरे । गर्वें आंगींच्या हुंबरे । सत्त्वविचार सांडवला ॥ २६ ॥ शिव विरंचि प्रमुख करून । क्षीराब्धितटीं करितां स्तवन । प्रसन्न होऊनि जो भगवान । विधीच्या वदनें बोलिला ॥ २७ ॥ साक्षाद्वसुदेवाचे सदनीं । भूभार । उतरावया लागुनी । मी अवतरतों ऐसी वाणी । शक्र ऐकोनि विसरला ॥ २८ ॥ त्यावरी गर्भस्तुतीचे ठायीं । सुरविरंच्यादिसुरसमुदायीं । सर्वीं स्तविला शेषशायी । तें ये समयीं विसरला ॥ २९ ॥ आणि पूतनादिअघबकहननीं । सुरसमुदायें सहित गगनीं । दुंदुभिघोषें विमार्यींहुनी । वर्षे सुमनीं उत्साहें ॥ ३० ॥ तें आजि अवघेंचि विसरला । स्वमानभंगें संतापला । पदाभिमानें गर्वा चढला । बोले दुर्बोला सक्रोधें ॥ ३१ ॥ आपुला अपमान अंतरीं । स्मरोनि दुःखें विस्मय करी । त्या शक्रोक्ति शुकवैखरी । पांचां श्लोकीं वाखाणी ॥ ३२ ॥

पाठभेद :— ‡ शक्र ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). * या ओवीचे चरण मुंगीप्रतींत मागेंपुढें आहेत.

१ खडकाकार उदक. २ इंद्र. ३ सुभद्रेचा नातू. ४ समुद्रवलयांकित. ५ पृथ्वी. ६ गाढवावर. ७ प्रलयकर्ता. ८ मीच ईश्वर अशा गर्वानें. ९ देवगण. १० शब्द करी. ११ ज्ञानविचार.

इंद्र उवाच— अहो श्रीमदमाहात्म्यं गोपानां काननौकसाम् ।
कृष्णं मर्त्यमुपाश्रित्य ये चक्रुर्देवहेलनम् ॥ ३ ॥

**अहो ऐसें म्हणे खेदें । मनुष्यें देवां †न मनती श्रीमदें । वृथा आमुचीं शक्रादिपदें । बल्लववृंदें हेळितां ॥ ३३ ॥ श्रीमदाचा महिमा कैसा । कळूनि कृष्ण मनुष्य ऐसा । धरूनि तयाचा भरंवसा । केलें उपहासा सुरांच्या ॥ ३४ ॥ जळामाजि आपुलें जिणें । वैर मत्स्यांशीं लावणें । ऐसें केलें बल्लवगणें । उन्मत्तपणें श्रीमदें ॥ ३५ ॥ गौळियें वनौकसें वनीं । यांची जीविका गोधनीं । कृष्ण मनुष्य आश्रयूनी । माझे अपमानीं प्रवर्तलीं ॥ ३६ ॥**

यथाऽदृढैः कर्ममयैः क्रतुभिर्नाम नौनिभैः । विद्यामान्वीक्षिकीं हित्वा तितीर्षंति भवार्णवम् ॥ ४ ॥

**यांचा श्रीमद हरितां मज । कोण वारील प्रतापपूज्य[2] । अजाश्रयें[3] हेळितां गज । न वटे लाज यां कैसी ॥ ३७ ॥ जैसे मीमांसक मूर्ख । अध्यात्मविद्येसि[4] होऊनि विमुख । भवनिस्तरणा श्रयिती मख । अदृढनौकेसारिखें ॥ ३८ ॥ तैसेंचि बल्लवगणीं येथ । फलप्रदानीं जे असमर्थ । गोद्विजाद्रिमख प्रशस्त । कल्याणार्थ पैं केले ॥ ३९ ॥ जैशी कागदाची नाव । नामावरूनि धरितां भाव । सांडूनि सुदृढ तरणोपाव । मूर्ख अपावें[5] पावती ॥ ४० ॥ तैसें अवमानूनि मातें । करूनि नाममात्र मखातें । भुलोनि कृष्ण मनुष्यातें । गौळी अनयांतें[6] आचरले ॥ ४१ ॥ कृष्ण मनुष्य मानूनि शक्र । निंदाप्रवाहें वदवी वक्त्र । परी ते सरस्वती[7] तेथ अवक्र । प्रकटी स्तोत्र कृष्णाचें ॥ ४२ ॥**

वाचालं बालिशं स्तब्धमज्ञं पंडितमानिनम् । कृष्णं मर्त्यमुपाश्रित्य गोपा मे चक्रुरप्रियम् ॥ ५ ॥

**निंदात्मक प्रथम भाव । तो हा शक्रअभिप्राव । त्याचि वाक्यें गिरा स्तव । करी लाघव तें ऐका ॥ ४३ ॥ कृष्णा मनुष्या आश्रयूनी । श्रीमदोद्धतगोपगणीं । केली मजशीं अप्रिय करणी । आतां कोठूनि वांचती ॥ ४४ ॥ कृष्ण वाचाळ बहुभाषणी । कृष्ण बालिश अपूज्यपणीं । कृष्ण अनम्र स्तब्धगुणीं । म्हणवी ज्ञानी अज्ञत्वें ॥ ४५ ॥ इत्यादि निंदा हेलनोक्ति । इंद्र बोलिला ज्या दुरुक्ति । त्या वाक्यांत सरस्वती । वदली स्तुति ते ऐका ॥ ४६ ॥ वेदशास्त्रांचा वक्ता कृष्ण । कोण वाचाळ त्यावांचून । वक्तृत्वाचें जन्मस्थान । आदिकारण ऋतसत्य[8] ॥ ४७ ॥ जैसें बालक निरभिमान । न मगे पूजादि सन्मान । सर्वगतत्वें श्रीकृष्ण पूर्ण । पूजाभिमानवर्जित ॥ ४८ ॥ जे जे जेथ होय पूजा । अर्पे सर्व गा गरुडध्वजा । नव्हे कीं एकदेशी बिडौजा[9] । जो क्षोभे व्रजा अपमानें ॥ ४९ ॥ कृष्ण जगज्जनकाचा[10] जनक । त्यावीण श्रेष्ठ नाहीं पृथक् । कोणा लववील तो**

**पाठभेद** —† न मानिती ( मुंगीप्रत ); न मनिती ( उमरखेडप्रत ).

१ अवज्ञा केली असतां. २ पराक्रमामुळें सर्वमान्य. ३ बोकडाच्या आधारानें. ४ ब्रह्मविद्या ( पहा—प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपाः – उपनिषद् ). ५ दुःख. ६ अन्यायास. ७ वाणीची अधिदेवता. ८ खरें व मधुर जें भाषण तें ऋत. सर्वत्र सारखें पाहणें तें सत्य. अशा गुणद्वयानें संपन्न. ९ इंद्र. १० ब्रह्मदेवाचा.

मस्तक । राहे निष्टंक स्तब्धत्वें ॥ ५० ॥ ज्याहूनि पृथक् ज्ञाता नाहीं । म्हणोनि श्रीकृष्ण अज्ञ पाहीं । अभेदज्ञानें विदुषां देहीं । वर्ते पाहीं आत्मत्वें ॥ ५१ ॥ अभेद ज्ञानियांच्या मूर्ति । कृष्णाचि म्हणवी पूर्णस्थिति । भक्तवात्सल्यें मनुष्यव्यक्ति । घे श्रीपति परब्रह्म ॥ ५२ ॥ ऐसिया श्रीकृष्णातें नेणोन । शक्र निंदी प्रक्षोभोन । क्षोभें आज्ञापी मेघगण । तें निरूपण अवधारा ॥ ५३ ॥

एषां श्रियाऽवलिप्तानां कृष्णेनाध्मायितात्मनाम् । धुनुत श्रीमदस्तंभं पशून्नयत संक्षयम् ॥ ६ ॥

म्हणे अहो संहारघन । व्रजीं प्रळयजळें वर्षोन । नंदादिगोपांचा श्रीमद भग्न । करा संपूर्ण पशुनाशें ॥ ५४ ॥ श्रीमदें मातले हे गोप । कृष्णें वचनें दिधली वोप[1] । म्हणोनि माझा यज्ञलोप । केला दर्प वाढवुनी ॥ ५५ ॥ यांचा दर्प नेइजे लया । गोधनें पाववूनियां क्षया । मीही येतसें सहाया । ऐरावता वळघोनी ॥ ५६ ॥ प्रथमश्लोकीं अन्वयार्थ । उल्लेख कथिला तोचि येथ । श्लोकामाजि प्रकटी अर्थ । मुनिसमर्थ तें ऐका ॥ ५७ ॥

अहं चैरावतं नागमारुह्यानुव्रजे व्रजम् । मरुद्गणैर्महावीर्यैर्नंदगोष्ठजिघांसया ॥ ७ ॥

म्हणाल गोपांशिरीं श्रीकृष्ण । असतां न चले आंगवण[3] । तरी ऐरावतीं आरूढोन । येतों मागून सवेग मी ॥ ५८ ॥ मरुद्गण महाक्रूर । सर्वें घेऊनि निर्जरवीर[4] । नंदगोष्ठाचा संहार । करूं सत्वर क्षोभोनी ॥ ५९ ॥ ऐसा जाणोनि निश्चय । न धरूनि कृष्णकैपक्षभय । करा नंदगोष्ठाचा क्षय । महाप्रळयमेघ हो ॥ ६० ॥ मी असतां पाठीवरी । कृष्ण मानवी काय करी । वर्षोनियां मुसळधारीं । क्षणामाझारीं व्रज भंगा ॥ ६१ ॥

श्रीशुक उवाच— इत्थं मघवताऽऽज्ञप्ता मेघा निर्मुक्तबंधनाः । नंदगोकुलमासारैः पीडयामासुरोजसा ॥ ८ ॥

ऐसें इंद्रें आज्ञापून । मुक्त केला मेघगण । तेणें सवेग व्यापिलें गगन । करिती गर्जन भयानक ॥ ६२ ॥ नाना अभ्रांचे[6] उमाळे । काळे निळे अरुण धवळे[7] । मिश्र उठती एके काळें । तेणें झांकोळे रविप्रभा ॥ ६३ ॥ महाप्रतापें नंदगोष्ठ । धारा वर्षोनि दिधले कष्ट । पीडा पावविली यथेष्ट । तें ऐकें स्पष्ट नृपोत्तमा ॥ ६४ ॥

विद्योतमाना विद्युद्भिः स्तनंतः स्तनयित्नुभिः । तीव्रैर्मरुद्गणैर्नुन्ना ववृषुर्जलशर्कराः ॥ ९ ॥

नभेंसहित दिग्मंडळ । झांकूनि दाटलें अभ्र सजळ । माजि विद्युल्लता चपळ । तरळ बहळ झळकती ॥ ६५ ॥ भरोनि नभाचा अवकाश । विद्युल्लतांचा प्रकाश । दाटतां प्राणी पावती त्रास । भयें नेत्रांस झांकिती ॥ ६६ ॥ प्रळय तेजाच्या सागरीं । अपार उठती कल्लोळ लहरी । तैशा

१ ज्ञान्यांच्या शरीरांत. २ धीर. ३ सामर्थ्य. ४ देवयोद्धे, ५ साह्य. ६ मेघांचे. ७ पांढरे. ८ अति तेजस्वी.

विद्युल्लतांच्या हारी । चमत्कारीं चमकती ॥ ६७ ॥ अकस्मात कडकडाटीं । एकविसां स्वर्गांची उतरंडी । कोसळे तैसी गर्जना गाढी । गाजे ब्रह्मांडीं भीकर ॥ ६८ ॥ सहस्त्रावधि तेंडाग फुटती । जैशीं प्रळयेयंत्रें सुटती । भयें प्राणी मूर्च्छित होती । कल्पान्त म्हणती बुध विबुध ॥ ६९ ॥ सात-सातांचा एक गण । सात सप्तकें एकोणवन्न । आवहप्रवहादि ज्यां अभिधान । ते मरुद्गण क्षोभले ॥ ७० ॥ गगनींहूनि पडतां पाणी । वरिच्यावरी उडविती गगनीं । त्या कडकडाटें उठती ध्वनि । नभभाजनीं नसमात ॥ ७१ ॥ सौधींहूनि भांडें पडे । प्रतिसोपानीं आदळे उडे । सप्त मरुद्गण तेणें पाडें । मेघगडाडें गाजविती ॥ ७२ ॥ पवनसाट सीतळ सबळ । लागतां गगनीं गोठे जळ । गारा होऊनि वर्षती स्थूळ । तेणें भूतळ आच्छादे ॥ ७३ ॥ चंडवायुझडझडाट । विद्युल्लता-कडकडाट । शिळा रिचवती उद्भट । दुःखें संकट स्थिरचरां ॥ ७४ ॥ निगम गिंवसितां सागरीं । मत्स्यविग्रहें जैसा हरि । अंगचालनें उडवी वारि । तें भूवरी जेंवि परते ॥ ७५ ॥ कीं कल्पान्तीं महाप्रचंड । दिग्गजांचे शुंडादंड । धारा वर्षती तेंवि अखंड । सर्व ब्रह्मांड बुडवावया ॥ ७६ ॥ तेंवि न धरत अनावरा । गगनीं अखंड प्रचंड धारा । माजि काश्मीरासारिख्या गारा । महाथोरा रिचवती ॥ ७७ ॥

स्थूणास्थूला वर्षधारा मुंचत्स्वभ्रेष्वभीक्ष्णशः । जलौघैः प्लाव्यमाना भूर्नादृश्यत नतोन्नतम् ॥ १० ।

अनिलजलोपलेंशीं जळ । भूमीपासूनि नभोमंडला । भरोनि वर्षतां एकवेळ । निम्न उतळ लक्षेना ॥ ७८ ॥ गगनगंगांचे लोटले लोट । किंवा फुटला रोदसीघट । कीं विराला ब्रह्मांडमठ । आवरणोदकीं प्रळयान्तीं ॥ ७९ ॥ जळप्रवाहीं बुडाली धरा । निम्न अनिम्न अगोचरा । उपमे साम्य गमे सागरा । मोडला थारा सत्त्वांचा ॥ ८० ॥

अत्यासारातिवातेन पशवो जातवेपनाः । गोपा गोप्यश्च शीतार्ता गोविंदं शरणं ययुः ॥ ११ ॥

इतुका वृष्टीचा उत्कर्ष । होत असतां नंदघोष[11] । न साहवेचि वातवर्ष । पशु निःशेष कांपती ॥ ८१ ॥ सुदृढ सौधें[12] खचोनि जाती । झाडें मोडोनि पडती क्षिती । गोपगोपीगोधनांप्रति । कैची वसति ते काळीं ॥ ८२ ॥ गोपगोपी लहानें थोरें । गुरें वासुरें वृद्धें लेंकुरें । थरथरां कांपती शैत्यभरें । शक्रें निकरें त्रासितां ॥ ८३ ॥ तृषार्त मरतां चिंती जळ । किंवा बुभुक्षु[13] अन्नकवळ[14] । तैसे गोपीगोपाळ । चित्तीं वननीळ चिंतिती ॥ ८४ ॥ प्राणप्रयाणीं योगीश्वर । जेंवि सेविती कमलावर । तैसे व्रजवासी समग्र । नंदकिशोर आश्रयिती ॥ ८५ ॥ गौळियें नर नारी लेंकुरें । कृष्ण स्मरती दीर्घ स्वरें । कैसीं शरण आलीं गुरें । तें नृपवरें परिसावें ॥ ८६ ॥

---

१ तळीं. २ तोफा. ३ ज्ञाते. ४ देव. ५ पायरी. ६ वायुवेग. ७ फोडिती. ८ प्रचंड. ९ शुभ्र संगमरवरी दगड. पहा— 'मग काश्मीराचे स्वयंभ । कां रत्नबीजा निघाले कोंभ । —ज्ञानेश्वरी ६·२५३. १० आकाश व भूमि हाच घट. ११ नंदाचा गवळवाडा. १२ राजवाडा. १३ भुकेनें व्याकुळ झालेला. १४ अन्नाचा घांस.

शिरः सुतांश्च कायेन प्रच्छाद्यासारपीडिताः । वेपमाना भगवतः पादमूलमुपाययुः ॥ १२ ॥

अधोमुख कदली कमळें । तैशा धेनु लवविती मौळें । श्रवणपुच्छें कदलीदळें । वाळोनि गळितें ज्यापरी ॥ ८७ ॥ कंप दाटला सर्वेशरीरीं । जेंवि काळमृत्यूचीं शारीं । मुखें घालूनि चरणांतरीं । पाठीमोरीं जळवर्षीं ॥ ८८ ॥ वत्सें गाई आड निघती । न सोसवे वर्षविपत्ति । कृष्ण-चरणांची विश्रांति । लक्षूनि येती हरीपाशीं ॥ ८९ ॥ चतुष्पाद पश्वादिगण । यालागीं करूं न शकती स्तवन । आश्रयूनि श्रीकृष्णचरण । कृपाकारुण्यें भाकिती ॥ ९० ॥ दीनवदनें सभय नेत्र । पाहती श्रीकृष्णाचें वक्त्र । तैसेचि गौळी सपुत्रकलत्र । करिती स्तोत्र कृष्णाचें ॥ ९१ ॥

कृष्ण कृष्ण महाभाग त्वन्नाथं गोकुलं प्रभो । त्रातुमर्हसि देवान्नः कुपिताद्भक्तवत्सल ॥ १३ ॥

आम्रेडितें[1] म्हणती कृष्ण । काल कालात्मा तूं पूर्ण । तुझें करितां चरणस्मरण । विघ्नें भंगोन नाशती ॥ ९२ ॥ प्रभो म्हणोनि संबोधन । प्रभुत्वें पूतनाशोषण । प्रभुत्वें केलें कालियमथन । दावाग्निप्राशन प्रभुत्वें ॥ ९३ ॥ प्रभुत्वें वधिला अघासुर । प्रभुत्वें केला गुह्यकोद्धार । तुझ्या प्रभुत्वाचा विचार । गर्गमुनिवर बोलिला ॥ ९४ ॥ महाभाग हें संबोधन । तुज म्हणतसों याकारणें । आमुचें सभाग्य झालें जिणें । तुझें जन्मणें जैंहुनी ॥ ९५ ॥ पूर्वीं गौळियें अनाथ । तुझेनि गोकुळ सनाथ । आतां प्रकटूनि स्वसामर्थ्य । महा अनर्थ हा निरसीं ॥ ९६ ॥ वंशपरंपरा धेनुकूळ । तें हें नंदाचें गोकुळ । त्याचा नाथ तूं गोपाळ । असतां विकळ होतसे ॥ ९७ ॥ व्याकुळतेसि काय कारण । ऐसा जरी तूं करिसी प्रश्न । इंद्र कोपला दारुण । आमुचे प्राण घ्यावया ॥ ९८ ॥ सक्रोध इंद्रापासूनि आम्हां । रक्षावयासि मेघश्यामा । समर्थ तूंचि पुरुषोत्तमा । प्रभु परमात्मा परिपूर्ण ॥९९॥ म्हणसी इंद्रें केलें विघ्न । तरी इंद्रासीच रिघा शरण । भक्तवत्सल हें संबोधन । भक्ताभिमान-वहनार्थ ॥ १०० ॥ स्वपादशरणत्राणकर्ता । तुजविण कैंचा श्रीभगवंता । म्हणऊनि आम्हां इंद्रत्रस्तां । रक्षीं समर्था प्रभुत्वें ॥ १ ॥ अनन्य[2]बाळकाची ग्लानि । माता पाहों न शके नयनीं । तेंवि कारुण्यें चक्रपाणि । अंतःकरणीं कळवळिला ॥ २ ॥ ऐकें कुरुकुळकोटीरमणि[3] । पार्थपौत्रा पार्थिवाग्रणी । निगम[4]गोप्ता गोगोपग्लानि । देखोनि मनीं विवरीतसे ॥ ३ ॥

शिलावर्षनिपातेन हन्यमानमचेतनम् । निरीक्ष्य भगवान् मेने कुपितेंद्रकृतं हरिः ॥ १४ ॥

गोगोपगोपी प्रार्थिती हरि । त्याहूनि पूर्वींच निजांतरीं । कुपितकृत्य हें पौरंदरी[5] । जाणूनि करी तदुपाय ॥ ४ ॥ विशाल वर्षती जलोपलें[6] । मुसळधारा अखंडजळ । तेणें अचेतन गोकुळ । झालें विकळ मुमूर्षु[7] ॥ १०५ ॥ ऐसें देखोनि श्रीभगवान । षड्गुणैश्वर्यसंपन्न । गोपगोधनें दीनवदन । पाहतां संपूर्ण कळवळिला ॥ ६ ॥

१ पुनरुक्तीनें. २ अनाथ. ३ शिरोभूषणरत्न. ४ वेदशास्त्रसंरक्षक. ५ इंद्राचें. ६ गारा. ७ मरणोन्मुख.

अपर्त्वर्त्युल्बणं वर्षमतिवातं शिलामयम् । स्वयागे निहतेऽस्माभिरिंद्रो नाशाय वर्षति ॥ १५ ॥

नंदप्रमुख बल्लवगणीं । अथवा आपुले अंतःकरणीं । श्रीकृष्ण बोले आश्चर्यवचनीं । इंद्रकरणी मखभंगें ॥ ७ ॥ अहो गेला वर्षाऋतु । पाठीं शरत्सह हेमंत* । शिशिरकाळीं जलोत्पात । हें दुष्ट कृत्य इंद्राचें ॥ ८ ॥ मागें बहुत अतिवृष्टि । वृद्धवृद्धीं देखिल्या दृष्टि । ऐसी कोण्ही न वदे गोष्टी । इंद्राहटीसारिखी ॥ ९ ॥ व्याघ्र पोशिला बळिअर्पणीं । न पवतां खवळे प्राणग्रहणीं । तेवीं मखभंगें निर्जरमणि[1] । गोकुळहननीं वर्षतसे ॥ ११० ॥ दस्यु[2] न पवतां दायितें[3] । पल्लीभंगार्थ[4] प्रवर्ते । तेंवि इंद्रें वर्षतां वातें । व्रजक्षयातें आदरिलें ॥ ११ ॥ जैसी पल्ली पल्लीनाथें । संरक्षिलिया स्वसामर्थ्यें । दीनवदनें दस्यु तेथें । जाय विजयार्थें सांडवला ॥ १२ ॥

तत्र प्रतिविधिं सम्यगात्मयोगेन साधये । लोकेशमानिनां मौढ्याद्धरिष्ये श्रीमदं तमः ॥ १६ ॥

तैसा गोकुळीं इंद्रयाग । सांवत्सरिक घे निजभाग । तो वर्जितां मी श्रीरंग । करीन मदभंग शक्राचा ॥ १३ ॥ त्रिदशपूज्यता अभिमानी । स्वराज्यपदवी अमरभुवनीं । विश्वनियंता ऐसें मानी । मौनें न मनूनि मज ईशा ॥ १४ ॥ तेथ या इंद्रकृत्याचा भंग । स्वयें करीन मी श्रीरंग । तेव्हां अपयशाचा डाग । पावेल अंग शक्राचें ॥ ११५ ॥ मज रक्षितां ऐश्वर्यशक्ति । इंद्र बापुडे वर्षेल किती । श्रीमदगर्वतमोऽपहति । तैं अपयशःप्राप्ति तयासी ॥ १६ ॥ स्वसंभावना मूर्खपण । त्यापासूनि श्रीमदाज्ञान । मी निजात्मयोगें व्रज रक्षून । करीन मदभग्न शक्रातें ॥ १७ ॥ ऐसेचि जे जे पदाभिमानी । यमवरुणादि क्रमेंकरूनी । त्यांची करीन मदझाडणी । हा सूचवी ध्वनि बहुवचनें ॥ १८ ॥ गोपवृद्ध हो मानाल मनीं । सत्वें सुकृती देवयोनि । पाविजे ते भक्तगणीं । मदझाडणी त्यांची कां ॥ १९ ॥ ऐसी आशंका सहसा न कीजे । सत्त्वसंपन्न मद्भक्त जे जे । पदाभिमान त्यां सहसा नुपजे । येर कवळिले§ रजें मदगर्वी ॥ १२० ॥

न हि सद्भावयुक्तानां सुराणामीशविस्मयः । मत्तोऽसतां मानभंगः प्रशमायोपकल्पते ॥ १७ ॥

निष्काम अनन्य माझ्या ठायीं । सत्त्वसंपन्न भजतां पाहीं । भोगवासना उठतां कांहीं । मी लवलाहीं त्यां वोपीं ॥ २१ ॥ सकाम कर्मठ विविधा यज्ञीं । यजितां वरपडे होती विघ्नीं । अल्प वासना मद्भक्तगणीं । मी जाणोनि पुरवीतसें ॥ २२ ॥ मदाराधन ध्रुवें केलें । निष्काम विरागें आराधिलें । वासनाबीज जाणोनि पहिलें । म्यां वोपिलें ध्रुवपद ॥ २३ ॥ परी तो अढळपदींही सहसा । पदाभिमानाच्या न धरी लेशा । सुरासुरांच्या देखे क्लेशा । परी न पडे फांसा सत्त्वांच्या ॥ २४ ॥ बळीनें इंद्रपदाच्या लोभें । ब्राह्मण अर्चिले मम वालभें । त्यासि मी वधूं न शकें क्षोभें । सप्रेम प्रभे

पाठभेद — * हेमंतु ( मुंगीप्रत ). § कवाळिजे ( मुंगीप्रत ); कवळीले ( उमरखेडप्रत ).

१ इंद्र. २ शत्रु. ३ द्यावयाचें कबूल केलेलें द्रव्य. ४ ग्राम. ५ डौल.

भुलविलें ॥ १२५ ॥ सुरकार्यार्थ छलना करूं । नटोनि बटुत्वें लेंकरूं । गेलों तंव तो भजनें सधर । दानें समग्र अर्पिला ॥ २६ ॥ तेव्हांचि कैवल्य तया जोगें । परी पूर्वील इंद्रपदेच्छाभोगें । कवळिला होता तें मी आंगें । द्वारीं जागें पुरवावया ॥ २७ ॥ या इंद्राचें सुकृत वेंचे । तंववरी द्वार राखीन त्याचें । मग बळीसी इंद्रपदींचें । ऐश्वर्य साचें वोपीन ॥ २८ ॥ ऐसे अनेक भक्तजन । सूक्ष्म-वासनेस्तव सुरगण । जाले तथापि पदाभिमान । अणुप्रमाण न शिवे त्यां ॥ २९ ॥ त्यांसि नाहीं सुरलोकीं । सप्रेम मद्भक्ति ठावुकी । भजनीं पडों नेदिती चुकी । निर्जरसुखीं विरक्त ॥ १३० ॥ ऐसे अपार माझे भक्त । पदाभिमानें अनुन्मत्त । सुरश्रियेसी नित्य विरक्त । विवेकवंत मत्प्रेमें ॥३१॥ ते शुद्धसत्त्वाचे निखळ । सुरपदींही वैराग्यशीळ । माझ्या ठायीं सप्रेमळ । मानिती किडाळ ऐश्वर्य ॥ ३२ ॥ अभेदप्रेमाचिया सुखा–। वरूनि कुरवंडिती *विमुखा । शक्रपदादि वरिष्ठलोकां । भेद नरकासम म्हणती ॥ ३३ ॥ मी तयाचा आज्ञाधर । किंवा सबाह्य अभ्यंतर । प्रेमें कवळूनि निरंतर । तिष्ठें सादर सर्वदा ॥ ३४ ॥ आतां सकामरजें मिश्रित । करूनि यज्ञादिसुकृत बहुत । पदाभिमानी जे उन्मत्त । परी मद्भक्त म्हणविती ॥ १३५ ॥ भूतमात्रीं माझी वसति । ते ते उन्मत्त नोळखती । पदाभिमानें गर्व धरिती । तुच्छ मानिती त्रिजगातें ॥ ३६ ॥ जैसा सामान्य माण्डलिक । नमनी नृपाचा मुद्रांक । राजा त्याचा भंगूनि तवँक । करूनि सेवक वोळगवी ॥ ३७ ॥ तैसे उन्मत्त अमरगणीं । असदैश्वर्यें पदाभिमानी । त्यांसि प्रशम मजपासुनी । सुखालागूनि भेटवी ॥ ३८ ॥ बाळ आचरे अन्यायकरणी । माउली प्रवर्ते तत्ताडनीं । दुर्मति भंगोनि योजी गुणीं । तेंवि सुरगणीं मम दंड ॥ ३९ ॥

तस्मान्मच्छरणं गोष्ठं मन्नाथं मत्परिग्रहम् । गोपाये स्वात्मयोगेन सोऽयं मे व्रत आहितः ॥ १८ ॥

तस्मात् इंद्राचा पदाभिमान । श्रीमदेंशीं प्रतापभग्न । करूनि गोकुळ मदेकशरण । संरक्षीन निजयोगें ॥ १४० ॥ मीचि नाथ यांचे शिरीं । परिग्रहरूपें यां मी हरि । त्राता रक्षिता कैवारी । नाहीं भवपूरीं मजवीण ॥ ४१ ॥ भंगीन इंद्राचा पदाभिमान । गोकुळ रक्षीन मदेकशरण । हा म्यां संकल्प वरिला पूर्ण । मिथ्या कोण करूं शके ॥ ४२ ॥ ऐसें विवरूनि अंतरीं । मायालाघवें श्रीहरि । चमत्कारें अद्भुत करी । तें अवधारीं कुरुभूपा ॥ ४३ ॥

इत्युक्त्वैकेन हस्तेन कृत्वा गोवर्धनाचलम् । दधार लीलया कृष्णश्छत्राकमिव बालकः ॥ १९ ॥

ऐसा बोलोनि निजसंकल्प । गोवर्धनाद्रि मन्मथबाप । गरिष्ठ जैसा वज्रकल्प । उचली अल्प-तूळप्राय ॥ ४४ ॥ प्रचंड गोवर्धनाचळ । लीलेंकरूनि श्रीगोपाळ । धरिता झाला व्रजवत्सल । सव्यकरतळ उभवूनी ॥ १४५ ॥ पर्जन्यकाळीं वारुळावरी । वर्तुळ उगवे छत्राकारीं । तें छत्राकँ जैसा

---

**पाठभेद** :— * पियुखा ( मुंगीप्रत ); पीयुखा ( उमरखेडप्रत ).

१ मुंजा होऊन ( वामन अवतारीं ). २ केवळ. ३ तुच्छ. ४ गर्व. ५ मला अनन्यशरण झालेले. ६ कापूस. ७ अळंबीं.

बाळक धरी । तेंवि मुरारि अचॅलातें ॥ ४६ ॥ हरिमायेची अगाध करणी । पर्वताताळवटीं समान धरणि । पटुतर गोष्ठसंरक्षणीं । केली ते क्षणीं ऐश्वर्यें ॥ ४७ ॥ वर्षोपल वात हिम । देऊं न शकती कोणा श्रम । भू विस्तीर्ण अतिउत्तम । जेथ विश्राम सर्वांसी* ॥ ४८ ॥ एक्या हातें धरूनि शैल । तळीं निर्मूनि ऐसें स्थळ । जळें त्रासलें गोकुळ सकळ । तेथ गोपाळ प्रवेशवी ॥ ४९ ॥

अथाऽऽह भगवान् गोपान् हेंऽब तात व्रजौकसः । यथोपजोषं विशत गिरिगर्तं सगोधनाः ॥ २० ॥

परमनिर्भय निर्मूनि स्थळ । म्हणे गोपांतें गोपाळ । गोधनें सहित कुटुंबमेळ । येथ सकळ प्रवेशा ॥ १५० ॥ इंद्रासि वोपूनि अपयश । अव्याहत मिरवे यश । विजयलक्ष्मीस्वप्रकाश । यालागीं श्रीश श्रीपति ॥ ५१ ॥ इंद्रें करितांही अपकार । त्याचा भंगोनि श्रीमँद[3] घोर । करी अनुग्रह उदार । दामोदर औदार्यें ॥ ५२ ॥ गोपगोपीगोधनांसी । अभय वोपी हृषीकेशी । पर्वतातळीं विश्रांतीसी । औदार्यैंशीं प्रवेशवी ॥ ५३ ॥ सर्वज्ञपणें रमाकांत । जाणे सर्वांचें मनोगत । म्हणोनि भंगी इंद्रकृत्य । व्रज निवांत संरक्षी ॥ ५४ ॥ देहबुद्धीवरी उदास । परम विरक्त कृष्ण परेश । म्हणोनि नाठवी इंद्रदोष । भंगोनि मदास ¶अनुग्रही ॥ १५५ ॥ अखिलैश्वर्यसमर्थ । चराचरात्मा कृष्णनाथ । सर्वभूतांच्या कल्याणार्थ । करी यथार्थ प्रतिज्ञा ॥ ५६ ॥ धरापांसूंची[4] ढेंपुळी । ज्याच्या ऐश्वर्यें न विरे जळीं । अर्णवोदॅक[5] न शोषे अनळीं । पावका न गिळी प्रभंजन ॥ ५७ ॥ सच्छिद्र शून्य अवघें गगन । असतां न गिळी प्रभंजॅन[6] । ज्यांचें ऐश्वर्यशासन । शकती कोण उल्लंघूं ॥ ५८ ॥ तेणें उचलूनि गिरिवर । सव्यॅंहस्तें[7] धरिला सधॅर[8] । मग व्रजौकसें समग्र । प्रार्थूनि सत्वर प्रवेशवी ॥ ५९ ॥ अहो अंब अहो ताता । म्हणे व्रजौकसां समस्तां । महावृष्टीची सांडूनि चिंता । हे गिरिगर्ता[9] वसवावी ॥ १६० ॥ कुटुंब गोधनें समुदाव । सहित पदार्थ नावेंनांव । ज्यांसी पाहिजे तितुका ठाव । तिहीं तो स्वयमेव आवरिजे ॥ ६१ ॥ गुरें वांसुरें लेंकुरें । ग्रहसामग्री पशूंचे चारे । घेऊनि प्रवेशिजे अत्यादरें । आज्ञाउत्तरें माझिया ॥ ६२ ॥

न त्रास इह वः कार्यो मद्धस्ताद्रिनिपातने । वातवर्षभयेनालं तत्त्राणं विहितं हि वः ॥ २१ ॥

तुम्हीं समस्तबल्लवगणीं । पर्वत माझिये हस्तींहुनी । पडेल ऐसी शंका मनीं । भयें त्रासूनि न धरावी ॥ ६३ ॥ करॅका[10] आणि विद्युत्पात । प्रळयवृष्टि झंझावॅात[11] । यांच्या भयाचे आघात । तुम्हांसि येथें न बाधिती ॥ ६४ ॥ तुमच्या रक्षणार्थेचि केवळ । उचलूनि गोवर्धनाचळ । म्यां निर्मिलें निर्भय स्थळ । येथ सकळ प्रवेशा ॥ १६५ ॥ वातवृष्टि सलिलोपळ । विद्युत्पातांचे बंबॅाळें[12] । इंद्रक्षोभें प्रळयकाळ । अक्षत गोकुळ मी रक्षीं ॥ ६६ ॥ आप तेज प्रळयवात । गृहपतनाचे पार्थिवॅाघात[13] ।

पाठभेद :—* ४८ व ४९ या ओव्या मुंगीप्रतीत पुढेंमागें झाल्या आहेत. ¶ ही ओवी मुंगीप्रतीत नाही.

१ पर्वत. २ गारा. ३ ऐश्वर्यमद. ४ मृत्तिकेची. ५ समुद्राचें पाणी. ६ वायु. ७ डावा हात. ८ पर्वत. ९ खळि; घळ. १० गारा. ११ मोठा सोसाट्याचा वारा. १२ समुदाय. १३ पृथ्वीवरील प्रहार.

**भूतक्षोभें प्रलय होत । तेथ मद्भक्त मी रक्षीं ॥ ६७ ॥ गोपगोपींसह लेंकुरें । गुरें वांसुरें लहानें थोरें । आपुलीं सांभाळा समग्रें । निर्भयप्रकारें ममाज्ञा ॥ ६८ ॥ माझे कृपेचें अभेद्य वर्म[1] । असतां तुम्हांसि *न बधी श्रम । इंद्रें केलें दुष्कर कर्म । मी पुरुषोत्तम परिहर्ता ॥ ६९ ॥ ऐसी ऐकोनि कृष्णवाणी । बल्लव निर्भय अंतःकरणीं । पर्वत धरिला एके पाणीं । तैं पतनग्लानि सांडिली ॥ १७० ॥**

तथा निर्विविशुर्गर्तं कृष्णाश्वासितमानसाः । यथाऽवकाशं सधनाः सव्रजाः सोपजीविनः ॥ २२ ॥

**जैसें कृष्णें आज्ञापिलें । तैसें निर्भय मानस केलें । मग समस्त प्रवेशले । गोवर्धनातळवटीं ॥ ७१ ॥ गाडे भरूनि सोपस्कर[2] । गोपिकांशीं कुमरी कुमर । बाळंतिणी आणि स्थविर[3] । अतिसत्वर प्रवेशती ॥ ७२ ॥ लहान थोर दासी भृत्य । ज्यां अधीन जें जें कृत्य । तत्कर्माचें उपसाहित्य । घेऊनि त्वरित प्रवेशले ॥ ७३ ॥ आश्रित पुरोहित ब्राह्मण । सूत मागध बंदिजन । आशीर्वचन स्तुति स्तवन । पठनें जीवन ज्यां व्रजीं ॥ ७४ ॥ कुलाल[4] कर्मार[5] रथकार[6] । दिवाकीर्ति[7] स्नेहकार[8] । कारुक[9] कैवर्तक[10] धीवर । सव्यापार प्रवेशती ॥ १७५ ॥ दैवज्ञ गणक देवलक[11] । मनुत्वष्टा[12] मयशिल्पक[13] । चित्रलेखक तौर्यत्रिक । नटनाटक प्रवेशले ॥ ७६ ॥ पुक्कस[14] चांडाल श्वपाक । किरातनिपादादि चर्मक । भ्राष्ट्र माल्यक वार्धुषिक । ऐंद्रजालिक प्रवेशले ॥ ७७ ॥ व्रजाश्रयें उपजीविका- । कर्ता समुदाय होता जितुका । विविधन्यासंग विविधां लोकां । ते ते स्वसुखा प्रवेशती ॥ ७८ ॥ बल्लव चतुर्विध गोधन । आपुलालें पुरस्करून । गिरितळवटीं निवेशन । करिती स्मरोन कृष्णातें ॥ ७९ ॥ ज्यांचें जैसें ज्ञातिकुळ । त्यांसि प्रशस्त तैसें स्थळ । सर्वप्रकारें यथानुकूळ । लाहती केवळ गिरितळीं ॥ १८० ॥**

क्षुत्तृड्व्यथां सुखापेक्षां हित्वा तैर्व्रजवासिभिः । वीक्ष्यमाणो दधावद्रिं सप्ताहं नाचलत्पदात् ॥ २३ ॥

**जाऊनि गिरीच्या तळवटीं । बसली व्रजजनगोधनथाटीं । गिरिधररूपीं जडल्या दृष्टि । पडली गांठी स्वानंदीं ॥ ८१ ॥ क्षुधेतृषेची व्यथा परम । विषयसुखाचा अपेक्षाकाम । सांडूनि तटस्थ इंद्रियग्राम । मेघःश्याम निरखिती ॥ ८२ ॥ एके हस्तीं धरिला अचळ । अपर हस्त अभयशील । पाहतां तटस्थ व्रजजन सकळ । सुखकल्लोळ भोगिती ॥ ८३ ॥ कृष्णलक्षीं जडल्या दृष्टि । तटस्थ ठेल्या शरीरयष्टि । नाठवे क्षुधेतृषेची गोष्टी । सुखसंतुष्टीमाजिवडी ॥ ८४ ॥ जैसें पर्वतगर्भींचें लेणें पाषाण रेखिले मनुष्यपणें । परी चलनें वळणें नेत्रचाळणें । त्याकरणें जे विसरती ॥ १८५ ॥ तेचि अवस्था सकळांप्रति । सप्त दिवस सप्तराती । कृष्णवदना निरीक्षिती । कृष्णीं वृत्ति उपरमल्या ॥ ८६ ॥ मेरूसारिखा अचलतर । गोवर्धनासि देऊनि कर । स्वस्थानींहूनि कमलावर । पद अणुमात्र**

**पाठभेद :—** * न बाधी ( मुंगीप्रत ).

१ कवच. २ सामानसुद्धां. ३ वृद्ध. ४ कुंभार. ५ शिल्पशास्त्रज्ञ. ६ सुतार. ७ न्हावी. ८ तेली. ९ रंगारी. १० कोळी. ११ गुरव. १२ विश्वकर्मा. १३ मयासुरासारखे शिल्पज्ञ. १४ निषाद व शूद्रा यांची संतति.

चाळीना ॥ ८७ ॥ तैसींच अवघीं व्रजौकसें । कृष्णवदनेन्दुसुधारसें । वेधितां मुकलीं जीवात्मदशे । कृष्णसमरसें तटस्थ ॥ ८८ ॥ चंडकिरण कृष्ण *नयन । कृष्ण समीरणाचा प्राण । कृष्ण ज्वलना उद्दीपन । कृष्ण जीवन सलिलांचें ॥ ८९ ॥ कृष्ण धरेचा आधार । कृष्णीं गगनासि विस्तार । कृष्णीं महदादि अहंकार । घेती अंकुर कृष्णेच्छा ॥ १९० ॥ ब्रह्मापासूनि काडीवरी । कृष्ण चैतन्य भूतमात्रीं । कृष्ण जगदात्मा असूत्रसुत्रीं । पहाती नेत्रीं व्रजवासी ॥ ९१ ॥ क्षेत्रज्ञ होतां सुखसुलीन । तटस्थ क्षेत्रींचा करणगण । तैसा व्रजात्मा अचल कृष्ण । तैं अचल व्रजजन सहजेंची ॥ ९२ ॥ व्रजींचा वृत्तांत ऐसिया परी । राया वर्तला सप्तरात्री । तो निवेदिला तुझिये श्रोत्रीं । जो बाळचरित्रीं कवि गाती ॥ ९३ ॥ तंव येरीकडे मरुद्गण । संवर्तकादि प्रळयघन । मेघज्योति प्रभंजन । व्रजीं वर्षोन त्रासलीं ॥ ९४ ॥ व्रजींचा वांकुडा नोहे रोम । वृथा झाला अवघा श्रम । निष्फळ देवेंद्राचा काम । दुःखें विराम पावले ॥ १९५ ॥ †वृत्तांत कथिती शक्रापासीं । कृष्ण ऐश्वर्याचा राशि । तेणें रक्षिलें गोकुळासी । गोवर्धनासी उचलूनी ॥ ९६ ॥ आमुचा झाला हृदयस्फोट । रिक्त झाला सिंधुघट । भरूनि जातां यमुनापाट । जीवसंघाट आटले ॥ ९७ ॥ जलोपळांचे झाले अचळ । कर्पूरगौरऐसे धवळ । तन्मौळींचें गंगाजळ । तैसे हळुहळु पाझरती ॥ ९८ ॥ प्रभंजनाचीं वळलीं मेटें । विद्युल्लतांच्या कडकडाटें । दिग्गजांचीं कर्णकपाटें । घोषें अचाटें अडकलीं ॥ ९९ ॥ यावरी काय कर्तव्यता । ते विवराजी अमरनाथा । कृष्ण असतां पशुपांमाथां । विक्रम वृथा हा तुमचा ॥ २०० ॥

कृष्णयोगानुभावं तं निशाम्येंद्रोऽतिविस्मितः । निःस्तंभो भ्रष्टसंकल्पः स्वान् मेघान् संन्यवारयत् ॥ २४ ॥

योगमायाप्रवर्तक । तो श्रीकृष्ण व्रजनायक । त्याचा प्रताप ऐकोनि अचुक । झाला अधोमुख अमरेंद्र ॥ १ ॥ गळाला आंगींचा पदाभिमान । व्रजनाशाचा संकल्प भग्न । सलज्ज विस्मित धरूनि मौन । हातें निजगण निवारी ॥ २ ॥ मरुद्गण संवर्तक । संज्ञेवरूनि वारी सम्यक । कृष्णावज्ञेचा धरूनि धाक । विवर्णमुखें अमरेंद्र ॥ ३ ॥ कुध्रघ्न मानी उदेलें विघ्न । ऐश्वर्यप्रताप झाला भग्न । लज्जा चिंता दोन्ही नग्न । लागलें लग्न तयांशीं ॥ ४ ॥ संवर्तकादि मरुद्गण । भ्रूसंकेतें निवारून । पुन्हा करूनि पटबंधनें । प्रलयमेघगण ठेविला ॥ २०५ ॥

खं व्यभ्रमुदितादित्यं वातवर्षं च दारुणम् । निशाम्योपरतं गोपान् गोवर्धनधरोऽब्रवीत् ॥ २५ ॥

ऐकोनि इंद्राचें आज्ञावचन । प्रळयमेघ प्रभंजन । उपरम पावतां निरभ्र गगन । चंडकिरण उगवला ॥ ६ ॥ प्रळयकाळींची काळरात्री । दिग्मंडळ नभ धरित्री । व्रजीं अवतरली सप्त रात्री ।

पाठभेद :—* चंडकिरण कृष्णाचे नयन ( मुंगीप्रत ). † वृत्तांता ( मुंगीप्रत ).

१ वायु. २ अग्नि. ३ महत्तत्त्वादि. ४ आत्मा. ५ विद्युत्. ६ शंकर. ७ धैर्य खचलें. ८ हस्तादि संकेतानें. ९ फिकट चेहरा. १० पर्वत भेदणारा इंद्र. ११ मेघांचे बंध.

**सर्वां नेत्रीं अप्रकट* ॥ ७ ॥ ऐसें दुर्दिनें महाघोर । हरलें होतां नभ निरभ्र । निर्मळ प्रकटला सहस्रकर । प्राणी समग्र हरिखेले ॥ ८ ॥ प्रचंडवायूचा †सडसडाट । प्रलयवृष्टीचा झडझडाट‡ । विद्युत्पतनाचे कडकडाट । झाले प्रविष्ट निजलोकीं ॥ ९ ॥ कोवळें उष्ण अमृतोपम । सीतार्दिसांसि आवडे परम । निर्वात देखोनि हरले श्रम । सर्व विश्राम पावले ॥ २१० ॥ मेघवर्जित नभ मेदिनी । इंद्र व्रीडित अंतःकरणीं । हें जाणोनि पशुपां चक्रपाणि । अभयवचनीं आज्ञापी ॥ ११ ॥**

निर्यात त्यजत त्रासं गोपाः सस्त्रीधनार्भकाः । उपारतं वातवर्षं व्युदप्रायाश्च निम्नगाः ॥ २६ ॥

**जो कां गोवर्धनाचा धर्ता । होऊनि निर्माण केली गर्ता । त्रिदशपतीचा गर्वहर्ता । कमलाभर्ता भगवान् ॥ १२ ॥ तो श्रीकृष्ण म्हणे गोपां । शक्रें वारिलें दुर्वृष्टि आपा । दुष्कर समय झाला सोपा । आतां कां पां येथ वसिजे ॥ १३ ॥ वातवृष्टीचा सांडूनि त्रास । घेऊनि गोधनें स्त्रियार्भकांस । येथूनि निघा सावकाश । पोटीं भयलेश न धरूनी ॥ १४ ॥ ज्याचा तुम्हीं केला यज्ञ । तो तुमचे शिरीं गोवर्धन । असतां बापुडें इंद्र कोण । विघ्न दारुण करूं शके ॥ २१५ ॥ सप्तरात्रें हे वाकुडी । वर्षोनि उघडली रोकडी । राहिली वायूची झडाडी । नभीं मेहुडीं वितुळलीं ॥ १६ ॥ उत्पथ सरिता वाहती स्थिर । वोहटूनि गेले महापूर । तुम्ही सकुटुंब सपरिवार । निघा बाहीर निःशंक ॥ १७ ॥ जाणोनि अरुणोदयाची वेळ । प्रबोध पावे पक्षिकुळ । तेंवि हें वदतां श्रीगोपाळ । सर्व गोकुळ चेइलें ॥ १८ ॥ किंवा प्राज्ञआलिंगन । सोडूनि निवडतां विश्वाभिमान । निजव्यापारीं करण¶ प्राण । लाहती चैतन्य ज्या परी ॥ १९ ॥ तेंवि व्रजजनांच्या वृत्ति । गिरिधररूपी ऐक्यस्थिति । रमल्या होत्या त्या मागुती । शरीरस्मृति पावलिया ॥ २२० ॥ मग पहाती चहूंकडे । वाम दक्षिण मागें पुढें । म्हणती पहा हो केवढें । आश्चर्य गाढें वर्तलें ॥ २१ ॥ तंव कृष्णोक्ति पडली श्रवणीं । निर्भय बाहेर निघा म्हणोनी । निरभ्र निर्वात गगन धरणि । देखोनि मनीं हरिखेले ॥२२॥**

ततस्ते निर्ययुर्गोपाः स्वं स्वमादाय गोधनम् । शकटोढोपकरणं स्त्रीबालस्थविराः शनैः ॥ २७ ॥

**त्यानंतरें ते गोपाळ । गाडे जुंपूनि उतावेळ । वरी उपकरणें भरिलीं सकळ । आणि स्त्री बाल स्थविर ही ॥ २३ ॥ गोधनें कळप घालूनि पुढें । मागें हळूहळू हाकिती गाडे । एक व्रजामाजि वेंगाडे । गेले धडफुडे वीक्षणा ॥ २४ ॥ लहान थोर नारी नर । गाई वांसुरें जीवमात्र । स्वसामग्री सोपस्कर । सांडूनि गिरिवर निघाले ॥ २२५ ॥ जितुका वस्तूंचा सांटोपा । तितुका काढिती करूनि खेपा । मग प्रार्थिती सुरपादपा । कंदर्पबापा कृष्णातें ॥ २६ ॥ गिरितळवट सांडूनि सकळ । बाहीर निघालें गोकुळ । ऐसें जाणूनि तमाळनीळ । ठेवी शैल स्वस्थानीं ॥ २७ ॥**

---

**पाठभेदः—*** या ओवीचे चरण मुंगीप्रतींत मागेंपुढें आहेत. † झडझडाटें ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡ सडसडाट ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ¶करण प्राण ( मुंगीप्रत ).

१ मेघाच्छादित दिवस. २ लज्जित. ३ देवांचा राजा इंद्र. ४ मेघ. ५ उंचसखल मार्ग. ६ जागें झालें. ७ सुषुप्ति व कारणदेह यांना अभिमानी आत्मा. ८ त्वरेनें. ९ हातोपातीं. १० कल्पवृक्ष.

भगवानपि तं शैलं स्वस्थाने पूर्ववत्प्रभुः । पश्यतां सर्वभूतानां स्थापयामास लीलया ॥ २८ ॥

षड्गुणैश्वर्यसंपन्न । लीलाविग्रही श्रीभगवान । तोही स्थापी गोवर्धन । व्रज संपूर्ण निघालिया ॥ २८ ॥ गोपसमूह व्रजा गेला । कृष्णें पर्वतही उतरिला । पूर्वी होता जेंवि संचला । तेंवि स्थापिला स्वस्थानीं ॥ २९ ॥ रेखा सांधा न दिसे चीर । चळों नेदितां अणुमात्र । लीलें-करूनि ठेवी गिरिवर । सर्व चराचर देखतां ॥ २३० ॥ गगन स्वयंभ निरावलंब । जेणें निर्मिलें नसतां स्तंभ । अर्णवोदकीं* हा ब्रह्मांडकुंभ । त्रिजगद्गर्भ संरक्षी ॥ ३१ ॥ निश्चळापोटीं भ्रमणशीळ । नक्षत्रादि ग्रहमंडळ । यथानियमें चाळी अनिळ । नोहे बरळ अणुमात्र ॥ ३२ ॥ पूर्वे उगवोनि नक्षत्र-माळ । पश्चिमे उजु चाले सकळ । तेथेंचि नवग्रहांचा मेळ । चाले हळूहळू पूर्वेसी ॥ ३३ ॥ तेथ भौमादि भास्करि जीवां । पूर्व पश्चिम दोहींसवा । गगन मोकळें घ्यावया धांवा । आज्ञा गौरवा अनुरूप ॥ ३४ ॥ जळापासूनि होती तरु । त्यामाजि वाढे वैश्वानरु । ऐशी ज्याची आज्ञा सधरु । तो गिरिधर प्रभुवर्या ॥ २३५ ॥

तं प्रेमवेगान्निभृता व्रजौकसो यथा समीयुः परिरंभणादिभिः ।
गोप्यश्च सस्नेहमपूजयन् मुदा दध्यक्षताद्भिर्युयुजुः सदाशिषः ॥ २९ ॥

संस्थापूनि गोवर्धन । येतां देखोनि मधुसूदन । प्रेमवेगें उचंबळून । धावे व्रजगण सामोरा ॥ ३६ ॥ आपुलालिया स्नेहभरीं । संबोधिती नानापरी । नाना बाबा दादा हरि । म्हणती मुरारि मुकुंदा ॥ ३७ ॥ एक कडकडां भेटती । एक स्नेहें आलिंगिती । एक पोटेंशीं कवळिती । हृदयीं धरिती पैं एक ॥ ३८ ॥ एक मस्तकावघ्राण । करूनि उतरिती निंबलोण । एक पाहती चक्षुष्मान । सुंदर वदन कृष्णाचें ॥ ३९ ॥ एक हनुवटी धरिती करीं । एक चुंबन देती हरी । एक स्नेहाळ पद्मकरीं । गिरिवरधारी स्पर्शती ॥ २४० ॥ एक देवडे उभे करीं । लोण उतरूनि कृष्णावरी । मुष्टि निजश्रवणा शेजारीं । लाऊनि श्रीहरि वोवाळिती ॥ ४१ ॥ एक मिथा देती टाळी । हास्यविनोद गदारोळीं । एक परस्परें करिती रळी । श्रीवनमालितुष्ट्यर्थ ॥ ४२ ॥ जैसा जैसा ज्यांचा प्रेमा । तैसा तैसा मेघश्यामा । पुढें जाऊनि देती क्षेमा । सुखसंभ्रमा भोगिती ॥ ४३ ॥ तैशाचि गोपी बाळा मुग्धा । प्रौढा प्रगल्भा आणि वृद्धा । सप्रेमभरें परमानंदा । श्रीमुकुंदा कवळिती ॥ ४४ ॥ नयन मेळवूनियां नयना । एक सलज्ज व्रजाङ्गना । एक कवळिती मनें मना । सव्रीड जनामाजिवड्या ॥ २४५ ॥ एक कृष्णावरूनि वारा । लागो आपुलिया शरीरा । म्हणवूनि सेविती शेजारा । बाह्य व्यापारा विसरोनी ॥ ४६ ॥ एकी कृष्णाचें मधुर वचन । श्रवणें करावया प्राशन । क्षुधित तृषित अंतःकरण । जगज्जीवन प्राशिती ॥ ४७ ॥ कृष्णलावण्य सविलास ।

**पाठभेद :—** * आवर्णोदकी ( मुंगीप्रत ); आवरणोदकी ( उमरखेडप्रत ).

१ राहिला. २ मगळ. ३ शनि. ४ गुरु. ५ अग्नि. ६ अनुलंध्य. ७ मस्तक हुंगणे. ८ परस्पर. ९ आनंदाच्या आरोळ्यांनी. १० थट्टामस्करी. ११ आलिंगन.

पहावया सावकाश । वाढविती सप्रेम रस । भवहॅव्यास[१] विसरूनी ॥ ४८ ॥ एक स्नेहें कवळूनि *पाठीं । करिती श्रीकृष्णाशीं †गोठी । एक स्नेहाळ अंगयष्टि । पहाती दृष्टिक्षेतभयें[२] ॥ ४९ ॥ एक झाडिती कृष्णकुरळां । एकी पुसिती वदनकमळा । एकी कवळूनि बाहुयुगळा । सवें घननीळा चालती ॥ २५० ॥ एकी परिमार्जिती[३] पाठी । एकी मिठी घालिती कंठीं । एकी कृष्णमूर्ति धाकुटी । मानूनि हनुवटी चुंबिती ॥ ५१ ॥ एकी बल्लवी सुकुमारा । कृष्णाचिया श्रमपरिहारा । निजपॉलवें[४] घालिती वारा । गाती सुस्वरा तच्छंदें ॥ ५२ ॥ एकी धाकुट्या व्रजकुमारी । कृष्णापुढें आनंदगजरीं । नृत्य करिती नानापरी । सबाह्य श्रीहरि लक्षूनी ॥ ५३ ॥ एकी कृष्णासि जितोंणें[५] । करिती सुस्निग्ध[६] अंतःकरणें । दध्यक्षता शुद्ध सुमनें । निर्मळ जीवनें आणूनी ॥ ५४ ॥ हर्षोत्कर्षें पूजिती हरि । प्रेम न समाये अंतरीं । आशीर्वाद सहस्रवरी । सुभगा नारी वोपिती ॥ २५५ ॥ वोवाळूनि सांडिती धनें । एकी कुरवंडिती तनुमनें । एकी करिती नीरांजनें[७] । आशीर्वचनें वोपुनी ॥ ५६ ॥ ऐसिया बल्लव बल्लवी सकळा । कृष्णीं अद्भुत स्नेहाळा । प्रेमें कवळिती घनसांवळा । तंव आला मेळा पितरांचा ॥ ५७ ॥

यशोदा रोहिणी नंदो रामश्च बलिनां वरः । कृष्णमालिंग्य युयुजुराशिषः स्नेहकातराः ॥ ३० ॥

नंद यशोदा रोहिणी । मातृतुल्य वृद्ध गौळणी । प्रेमपान्हा दाटोनि स्तनीं । आलीं धांवोनि हरीपाशीं ॥ ५८ ॥ एक मांदी सारिती करीं । एक दाविती पैल हरि । पुत्रवात्सल्यें घाबिरीं । हृदयीं श्रीहरि कवळिती ॥ ५९ ॥ मौळ कुरवाळिती हातें । स्नेहें हुंगिती मस्तकातें । पर्वत धरिला कोण्या हातें । म्हणोनि गात्रातें स्पर्शिती ॥ २६० ॥ झणें कृष्णासि होईल दृष्टि । म्हणोनि लोण उतरिती मुष्टि । वदन पुसोनि झाडिती पृष्ठीं । धरूनि हनुवटी चुंबिती ॥ ६१ ॥ गगनीं भ्रमती शशिभास्कर । जंववरी औत्तानपादि[८] स्थिर । तंववरी चिरायु गिरिधर । असो आधार व्रजजना ॥ ६२ ॥ श्रीकंठांचा[९] जटाजूट । वसवी जान्हवीजलाचा[१०] पाट । तोंवरी चिरायु कंबुकंठ[११] । हो शितिकंठप्रसादें[१२] ॥ ६३ ॥ श्वेतवराह[१३] दाढेवरी । जंववरी ब्रह्मकटाह धरी । तंववरी चिरायु श्रीमुरारि । करो ईश्वरी जगदंबा ॥ ६४ ॥ जंववरी भ्रमे नक्षत्रमाळ । पंचभूतेंशीं दिग्मंडळ । तोंवरी माझा श्रीगोपाळ । असो निश्चळ चिरायु ॥ २६५ ॥ कृष्णा तुझे शत्रुवर्ग । महाविघ्नीं पावती भंग । अक्षत आयुष्मान् अभंग । तुज श्रीरंग संरक्षो ॥ ६६ ॥ ऐसे अनेक आशीर्वाद । देऊनि कवळिती मुकुंद । तंव परम बळिष्ठ बंधु स्निग्ध । आला सन्निध बलराम ॥ ६७ ॥ श्रीकृष्णासि आलिंगन । देऊनि म्हणे संकर्षण । ब्रह्मांडगर्भींचें कल्याण । त्याचें स्थान तूं होईं ॥ ६८ ॥ माता पिता बंधु आप्त । कृष्णालिंगनें झाले तृप्त । अमरपतीचा गर्व लुप्त । तेणें तो संक्षिप्त[१४] सलज्ज ॥ ६९ ॥

**पाठभेद :—** * पोटीं ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † गुह्य गोठी ( मुंगीप्रत ).

१ संसाराची इच्छा. २ दृष्टीनें भोक पडेल ह्या भीतीनें. ३ पुसिती. ४ पदरानें. ५ कुरवंडी. ६ अतिप्रेमळ. ७ आरती. ८ उत्तानपादराजाचा पुत्र ध्रुव. ९ शंकराचा. १० गंगा. ११ शंखाकृति कंठ ज्याचा तो. १२ शंकर. १३ वराहावतार. १४ संकुचित.

दिवि देवगणाः साध्याः सिद्धगन्धर्वचारणाः । तुष्टुवुर्मुमुचुस्तुष्टाः पुष्पवर्षाणि पार्थिव ॥ ३१ ॥

मग अमरेंद्र सलज्जचित्तें । सुरगण प्रेरिले होत्साते । स्वर्गीं करिती उत्साहातें । तें नृपातें शुक सांगे ॥ २७० ॥ ऐकें मत्स्येंद्रतनयातनया । पार्थिवाग्रणी कौरवराया । इंद्रें जाणूनि निजअनार्या । हरिपरिचर्या आदरिली ॥ ७१ ॥ शक्रें आज्ञापिले सुरगण । साध्य गंधर्व चारण । देवयानीं भरलें गगन । आले संपूर्ण सुरसिद्ध ॥ ७२ ॥ गुह्यक किंपुरुष किन्नर । यक्ष *पिंगळ विद्याधर । नासत्य विश्वेदेव पितर । दिव्य फणिवर ओजस्वी ॥ ७३ ॥ रुद्र आदित्य मरुद्गण । लोकपाळ सवैश्रवण[1] । दिव्य महर्षि तपोधन । सुप्रसन्न हृत्कमळीं ॥ ७४ ॥ इंद्रमदगर्वाचा भंग । देखोनि कृष्णमहिमा अभंग । गगनीं पातले सवेग । स्तविती श्रीरंग जयशब्दीं ॥ २७५ ॥ जय जय ब्रह्माण्डभाण्डोदरा । जय जगज्जनका जगदीश्वरा । जयजय आम्नायाभ्यंतरा । जगदाधारा जगन्मया ॥ ७६ ॥ जयजय व्रजजनमनोरंजना । जयजय निर्जरवरगंजना[2] । जयजय भवगंजमद-[3]भंजना । जय जनजननावनाप्यया ॥ ७७ ॥ क्ष्वेडपमानसकुवलयभृंगा[4] । कुवलयदुकूलतनयारंगा[5] । कैवळयदुकुलनिदाघभंगा । निःसंगसंगा चिन्मात्रा ॥ ७८ ॥ कमलाकुंकुमप्रकाशका । कंबुग्रीवा कलुषान्तका[6] । कलिमलमथना कामजनका । कुटिलालका कमनीया ॥ ७९ ॥ पद्माप्रियतम-कलत्रवंता । परममंगला पूर्णभरिता । पदजलपावनप्रकटीकृता । पुण्यचरिता परमात्मा ॥ २८० ॥ सुखतमसदया सुरवरपाळा । सुंदर सुकुमार सप्रेमळा । सामसुललितसुमंगळा । सुजन्न सुशीळा सुसेव्या ॥ ८१ ॥ कौणपपूज्या[7] कौणपमथना । गीर्वाणसेव्या गीर्वाणकथना । निर्वाणदानीनिर्वाण-सदना । निजरतरमणा रमणीया ॥ ८२ ॥ मंगळजननीमंगलसूत्रा । मधुसूदना मधुचरित्रा । गोगोपक गोपीपुत्रा । गिरिवरधरा गोविंदा ॥ ८३ ॥ ऐसीं स्तोत्रें सुललितवाणी । करूनि स्तविला सुरवरगणीं । परमानंदें वर्षती सुमनीं । दिव्यविमानीं नरवर्या ॥ ८४ ॥

शंखदुंदुभयो नेदुर्दिवि देवप्रणोदिताः । जगुर्गंधर्वपतयस्तुंबुरुप्रमुखा नृप ॥ ३२ ॥

मृदंगपणवानकगोमुख । मुरु मर्दल मुरज शंख । कृष्णविजयश्रीचा घोक । दुंदुभि निःशंक त्राहटिती[8] ॥२८५॥ तंत्री वल्लकी ब्रह्मवीणा । विपंच्यादि[10] प्रभेद नाना । झल्लरी कांसोल तालमूर्च्छना । जीं तानमाना तपांगें ॥ ८६ ॥ हाहा हूहू चित्ररथ । गंधर्वपति जे विख्यात । नारदतुंबुरुप्रमुख तेथ । गाती ऊर्जित कृष्णयश ॥ ८७ मधुसामादि चित्र सामें । एक आळविती बृहत्सामें । माजि सुमंगल प्रभूचीं नामें । गाती सुखतमें आनंदें ॥ ८८ ॥ एक वैष्णव बागडे । कृष्णप्रेमें सबाह्य वेडे । गाती कृष्णाचे पवाडे । चंद्रचूडें समवेत ॥ ८९ ॥ गाजे आनंदें रोदसी । म्हणती इंद्रा कां रोदिसी[11] ।

**पाठभेद :—*** किन्नर ( मुंगीप्रत ).

१ कुबेर. २ जिंकणारा. ३ सृष्टिस्थितिलयकर्ता. ४ शंकर. ५ समुद्राच्या कन्येचा म्हणजे लक्ष्मीचा पति. ६ पाप. ७ राक्षस. ८ वाजविती. ९ सूरसोटा. १० वीणा. ११ रडतोस.

तुळना करितां क्षीरोदेंशीं । नाडरांशीं कैं समता ॥ ९० ॥ ऐसा सुरवरांचा मोद । व्यासनंदन निरूपी विशद । ऐकोनि पावला परमानंद । कुरुकुलकुंमुदचंद्रमा ॥ ९१ ॥

ततोऽनुरक्तैः पशुपैः परिश्रितो राजन् सगोष्ठं सबलोऽव्रजद्धरिः ।
तथाविधान्यस्य कृतानि गोपिका गायंत्य ईयुर्मुदिता हृदिस्पृशः ॥ ३३ ॥

तंव येरीकडे सप्रेमळ । राया गौळिणी गोपाळ । भंवता वेष्टूनि घननीळ । सहित प्रबळ बळराम ॥ ९२ ॥ अवघे चालती आनंदगजरीं । वेणु विषाणें वंश मोहरी । वाद्यें वाजती जयजयकारीं । सुमनें सुरवरीं वर्षतां ॥ ९३ ॥ चामरें अंशुकें कंबल । ऊर्ध्व ढाळिती बल्लवबाळ । गीतनृत्यवाद्यकुशळ । रंगीं सुताळ नाचती ॥ ९४ ॥ ऐसा अनेक उत्साहगजरीं । स्वजनसाग्रजें सहित श्रीहरि । राया प्रवेशला व्रजपुरीं । गाती सुंदरी हरिचरितें ॥ २९५ ॥ अद्भुत श्रीकृष्णाची लीला । कृष्णें गोवर्धन उचलिला । कृष्णें अघ बक संहारिला । कृष्णें नाथिला कालिया ॥ ९६ ॥ कृष्ण प्याला दावानळ । कृष्ण उन्मळी अर्जुन यमळ । कृष्णें शोषूनि स्तनींचें गरळ । मारिली विशाळ पूतना ॥९७॥ कृष्णें शकट भंगिला चरणें । तृणावर्त घेतला प्राणें । ऐशीं अनंतगुणकीर्तनें । गाती वदनें व्रजललना ॥ ९८ ॥ ज्याचे हृदयीं श्रीकृष्णगुण । सप्रेमभरें स्पर्शले पूर्ण । कीं तो परम प्रियतम कृष्ण । *हृदयीं स्पर्शोन ‡ठसावया ॥ ९९ ॥ म्हणोनि जागृतिस्वप्नसुषुप्ती ।–माजि कोंदला कमलापति । कायावाचामनोवृत्ति । अन्य प्रवृत्ति विसरलीं ॥ ३०० ॥ ऐशी अद्भुत कृष्णलीला । तुज परिसविली कुरुभूपाळा । पुढें नंदादि गोपां सकळां । मनीं अवँगमला हरिमहिमा ॥ १ ॥ विस्मयें गोप परस्परें वदती । बाळकाआंगीं हे अद्भुत शक्ति । तरी हा केवळ ईश्वरमूर्ति । व्रजीं उत्पत्ति अयोग्य ॥ २ ॥ तयांसि नंदें गर्गवचनें । विवरूनि कथिलीं भविष्यमानें । तें ऐकोनि गौळी मनें । समाधानें निवाले ॥ ३ ॥ तये कथेच्या श्रवणाप्रति । विशुद्धमानस सत्सुकृती । परीक्षितीचे मागिलिये पंक्ती । बैसतां तृप्ति समसाम्य ॥ ४ ॥ सप्तवासरीं अवधि थोडी । म्हणऊनि चोजवूं न लाहे गोडी । अहोरात्र जैसा बराडी । तैसें तांतडी नृप सेवी ॥ ३०५ ॥ तें परमामृत तया पाठीं । शौनकाचार्योचिये मठीं । बैसवूनि समस्त ऋषींचिया थाटी । सूत त्यां वाढी व्यासाज्ञा ॥ ६ ॥ भाषाभाजनीं तेंचि सुधा । भरूनि श्रोतयां मानसशुद्धां । समर्पणाचा वरदें धंदा । मज गोविंदें निरूपिला ॥ ७ ॥ विबुध प्रबुद्ध बुधाबुध । श्रवणपात्रीं जे सावध । त्यांसि निर्वाणसुधाबोध । लाभे प्रसिद्ध हरिवरें§ ॥ ८ ॥ एकनाथसाम्राज्यभुवनीं । चिदानंदें कळवळोनी । स्वानंदसुखाचीं पारणीं । गोविंदसद्गुणीं श्रोतयां ॥ ९ ॥ ते पाकशाळेचीं शुद्ध अन्नें । पक्कें दयार्णवजीवनें । श्रोतीं पाहोनि मनाच्या नयनें । कृष्णस्मरणें सेवावीं ॥ ३१० ॥ जाणिवेची मक्षिका पडे । तरी जेविलेंही होय उंबडें । सर्व पंक्तीसी वैरस्य घडे ।

पाठभेदः— * सप्रेम ( मुंगीप्रत ). ‡ ठसावे ( मुंगीप्रत ); ठसावला ( उमरखेडप्रत ). § हरिवरदें ( मुंगीप्रत ).

१ डबकें. २ कुरुकुलरूपी कमलास प्रफुल्लित करणारा चंद्र परीक्षिति. ३ जुळे. ४ समजला. ५ व्रताच्या शेवटीं भोजन. ६ जाणण्याची शक्ति. ७ व्यर्थ.

भोजन पुढें न रुचे तें ॥ ११ ॥ मक्षिका जाणिवेची वारणें । संशयहेरळां निवारणें । निंदाविटाळासि न शिवणें । विकल्पशुनें नातळिजे ॥ १२ ॥ अभिमानाची गरळ पडतां । तैं अमृतचि प्रवर्ते घाता । यालागिं सावधपणें श्रोतां । परमामृता सेविजे ॥ १३ ॥ प्रपंचचिंतेचा ऋणकरी । आण घालूनि अभ्यंतरीं । बैसो नेदी पात्रावरी । वोढी बाहेरी हृद्रोग ॥ १४ ॥ तयासि संतांचिया वचनें । प्रारब्धमर्यादानियमनें । मग निश्चित अंतःकरणें । श्रोतीं सेवणें चित्सुख हें ॥ ३१५ ॥ येणें निःशेष भवरोग झडे । स्वानंदबोधें दृष्टि उघडे । कृष्णात्मकत्वें समरस घडे । मानस बुडे दयार्णवीं ॥ १६ ॥ तें हें श्रीमद्भागवत । अठरासहस्र मुनिप्रणीत । परमहंसाचा निजएकांत । स्कंध त्यांत दशम हा ॥ १७ ॥ शुकपरीक्षितिसंवाद । महाराष्ट्रटीका भगवद्वरद । कृष्णदयार्णव निरूपी विशद । सद्गुरुगोविंद-प्रसादें ॥ १८ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां *गोवर्धनोद्धरणं नाम पंचविंशतितमोऽध्यायः ॥ २५ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक ॥ ३३ ॥ टीका ओव्या ॥ ३१८ ॥ एवंसंख्या ॥ ३५१ ॥ ( पंचविसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १२८९७ ).

पंचविसावा अध्याय समाप्त.

---

**पाठभेद** — * इंद्रक्षोभो ( मुंगीप्रत ); गोवर्धनोद्धरणो ( उमरखेडप्रत ).

१ रेतीसारखे बारीक खडे.

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय २६ वा

श्रीगोविंदसद्गुरुमूर्तये नमः† । पद्मनाभी पद्मारमणा । पद्मधारका पद्मायतना । पद्मजजनका पद्मलोचना । पद्मवदना गोविंदा ॥ १ ॥ भवभयाचें दुःखावर्त । भोगितां प्राणी त्रासले बहुत । त्या भयाच्या उपशमनार्थ । शरणागत पदपद्मीं ॥ २ ॥ त्यांसि वोपिसी नाभीकार[1] । कृपेनें उचलूनि पद्मकर । म्हणोनि पद्मनाभी हा नामोच्चार । घडे साचार तुजलागीं ॥ ३ ॥ स्वजनहृत्पद्मजा[2] प्रीति । अव्यभिचारें[3] अनन्यगति । जाणोनि रमसी तूं एकांतीं । ‡पद्मवतीप्राणेशा ॥ ४ ॥ मनःपद्मीं मनसिज-वसति । तेणें तरळे तन्मात्रभ्रांति । तें तव चरणीं जे अर्पिती । मग त्यां विश्रांति नैश्चल्यें ॥ ५ ॥ प्रणतमानसपद्मचरणीं । धरिसी प्रतापें गोवूनि भजनीं । पद्मधारक यालागुनी । म्हणती मुनि तुजलागीं ॥ ६ ॥ सहस्रदलपद्मीं आयतन । तुझें वास्तव वसतिस्थान । पद्मायतन हें अभिधान । तुजलागून स्वतःसिद्ध ॥ ७ ॥ त्रिविधतापें भवसंतप्तां । देखोनि स्वपादशरणागतां । पद्मकर तें ठेवूनि माथां । अनुग्रहीता तूं होसी ॥ ८ ॥ तवानुग्रहकर पद्मज । पद्मजनक तो तूं सहज । तुज-पासूनि नुपजे रज । जो विश्वबीजविधाता ॥ ९ ॥ कृपावलोकें नेत्रपद्मा- । पासूनि अक्षय वोपिसी पद्मा । पद्मलोचना पुरुषोत्तमा । कैवल्यधामापर्यंत ॥ १० ॥ वदनपद्में प्रकटिसी बोध । तेणें निरसे भव विरुद्ध । वास्तव चित्सुख लाभे शुद्ध । तो तूं प्रसिद्ध पद्मवदन ॥ ११ ॥ इत्यादिविशेषणीं विशिष्ट । अचिंत्यैश्वर्यगरिष्ठ । अजाड्य जाड्यातीत स्पष्ट । अलघिष्ठलघिष्ठ शोभविसी ॥ १२ ॥ गोशब्दार्थें बोलिजे केश । तद्गतवेदना सूक्ष्मविशेष । जाणता सर्वज्ञ तूं परेश । त्या तुज अशेष श्रुति गाति ॥ १३ ॥ म्हणोनि अखिलात्मका तुज । नम्य नमितां नमन सहज । अभेदबोधें प्रेमबीज[4] । हें

---

**पाठभेद** :— †श्रीकृष्णपरमात्मने नमः ( उमरखेडप्रत ). ‡ पद्मावती ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ अभयवचन. २ भक्तांच्या हृदयांत उत्पन्न झालेली. ३ एकाग्रतेनें. १ प्रेमसंस्कार.

निजगुज श्रुतिगोप्य ॥ १४ ॥ एकात्मकत्वें न फवे गोडी । भजतां भेद उभवी गुढी । यालागिं स्वरूपीं दिधली बुडी । सप्रेमखोडी न मोडतां ॥ १५ ॥ एकात्मत्वें सुवर्ण खरें । वरी राजमुद्रेचीं अक्षरें । मोल न तुटोनि शेषाकारें । जेंवि व्यवहारें[1] अभेदें ॥ १६ ॥ तैसी दशमस्कंधावरी । लक्षूनि शुकाची वैखरी । महाराष्ट्रभाषाव्याख्यान करीं । आज्ञा निर्धारीं हे केली ॥ १७ ॥ प्रभूची आज्ञा अव्याहत । म्हणोनि निरूपिलें चाले कृत्य । श्रोतयांचे मनोरथ । पुरवी समर्थ पूर्णत्वें ॥ १८ ॥ तेथ पंचविसाव्या माझारी । इंद्र वर्षतां धरिला गिरि । निर्भय सप्त अहोरात्रीं । कृष्णें व्रजपुरी रक्षिली ॥ १९ ॥ तें देखोनि व्रजनिवासी । अद्भुत मानिती निजमानसीं । सव्विसाव्या अध्यायीं त्यांसी । गर्गोक्तीसी नंद कथी ॥ २० ॥ कृष्णकर्में अत्यद्भुतें । देखोनि गोप† विस्मितांतें । नंद गर्गोक्तिसंमतें[2] । भावी वीर्यातें[3] परिसवी ॥ २१ ॥ शुक म्हणे गा कुरुवरभूपा । तुजवरी प्रभूची अनुकंपा । म्हणऊनि हरिगुण समानमधुपा । प्रियतमस्तनपा[4] स्तनसाम्यें ॥ २२ ॥

श्रीशुक उवाच — एवंविधानि कर्माणि गोपाः कृष्णस्य वीक्ष्य ते ।
अतद्वीर्यविदः प्रोचुः समभ्येत्य सुविस्मिताः ॥ १ ॥

हरिगुणकथामृताची चवी । राया जाणसी तूं एक बरवी । म्हणोनि प्रेमा नित्य नवी । कां जाणती आघवी शिवेशिवा[5] ॥ २३ ॥ जाणोनि विश्व आर्तभूत । स्वयेंचि वर्षे तडित्वंत[6] । कीं क्षुधित होतां सुप्तासुप्त । पुन्हा न धरँत[7] जननी ये ॥ २४ ॥ तेंवि राजा न करितां प्रश्न । योगींद्र भूत-भविष्यज्ञ । अंतर रायाचें जाणोन । करी निरूपण स्वयमेव ॥ २५ ॥ शक्रगर्व हरिल्यावरी¶ । इंद्रें स्तविला असेल हरि । तें निरूपील यावरी । हें अंतरीं नृपाचे ॥ २६ ॥ परी जो प्रांजळ भूतवेत्ता[8] । दैवें नृपासि जोडला वक्ता । तो यथापूर्व वर्तली कथा । तैसी तत्त्वता निरूपी ॥ २७ ॥ ऐकें आर्जुनिनंदना । कृष्णें धरूनि गोवर्धना । व्रज रक्षितां बल्लवगणा । विस्मय मना बहु गमला ॥ २८ ॥ जन्मापासूनि आजिपर्यंत । नित्य नूतन अत्यद्भुत । पाहोनि हरिकर्म समस्त । झाले विस्मित व्रजवासी ॥ २९ ॥ विस्मित व्हावयाचें कारण । कीं ते नेणती हरिमहिमान । अद्भुत कर्में अवघे जन । कथिती येऊन नंदातें ॥ ३० ॥ जीं जीं कर्में कृष्णें केलीं । तीं तीं बल्लवीं नंदा कथिलीं । शुकें रायासि निवेदिलीं । श्रोतीं ऐकिलीं पाहिजती ॥ ३१ ॥

बालकस्य यदेतानि कर्माण्यत्यद्भुतानि वै । कथमर्हत्यसौ जन्म ग्राम्येष्वात्मजुगुप्सितम् ॥ २ ॥

अवघे मिळोनि म्हणती नंदा । बाळक मानिसी आनंदकंदा । ज्याचा एवढा अद्भुत धंदा । त्या गोविंदा सुत म्हणसी ॥ ३२ ॥ देव मनुष्य आणि पितर । गण गंधर्व ऋषीश्वर । त्यांसि कर्म जें अगोचर । तें तें सत्वर करीतसे ॥ ३३ ॥ ऐसें असोनि गोपांसदनीं । याचें जन्म काय

**पाठभेद :—** † गोप ( मुंगीप्रत ). ¶हरि ( मुंगीप्रत )

१ व्यवहार करितें. २ गर्ग ऋषीच्या भाषणांतील मतें. ३ पराक्रम. ४ प्रियकर. ५ शंकरपार्वती. ६ मेघ. ७ न थांबतां. ८ गतकथा जाणणारा.

म्हणोनी । क्षुद्र मानवी कुत्सित योनि । यालागूनी अयोग्य हें ॥ ३४ ॥ कृष्ण ईश्वराचा ईश्वर । प्रतापें तुळितां परमेश्वर । न कळे कोण्हा हा विचार । मोहें किशोर या मानूं ॥ ३५ ॥ नंदा कर्में याचीं परिस । जन्मापासून दिवसेंदिवस । याचें अद्भुत ऊर्जित यश । परी कोणास न चोजवे[1] ॥ ३६ ॥

य: सप्तहायनो बाल: करेणैकेन लीलया । कथं बिभ्रद्गिरिवरं पुष्करं गजराडिव ॥ ३ ॥

नंदा आजूनि तुज कां नुमज[2] । सप्त वर्षांचा तवात्मज । परी हा अद्भुतप्रतापपुंज । शैशव-ओज[3] प्रकटीतसे ॥ ३७ ॥ रातोत्पलदलकरपदतळ । नीलोत्पलदलनयनयुगळ । सहस्रपत्र तें वक्त्रकमळ । जावळ अळिउळभाभंजी[4] ॥ ३८ ॥ वज्रभासुरदशनपंक्ति । अधर विद्रुमा लाजविती । इंद्रनीळाची लोपे दीप्ति । अंगकांति पडिपाडें ॥ ३९ ॥ बाल्यें मृदुल कल भाषणें । सुधारसासि आणी उणें । स्निग्ध सविलास वीक्षणें । तनुमनप्राणें जन मोही ॥ ४० ॥ पदविन्यासें हंसगति । धाष्ट्यें जैसा पैं मृगपति । सांग अनंत अनंगमूर्ति । लोपोनि जाती लावण्यें ॥ ४१ ॥ क्रीडा पाहतां जननयनासी । आठवूं नेदी दिवसनिशी । ऐसा अनंतगुणैकराशि । बल्लवासी सुत न सजे ॥ ४२ ॥ सप्तवर्षांचा हा कुमर । परमसकुमार¶ सुंदर । लीलें करूनि धरीं गिरिवर । दुसरा कर न लवितां ॥ ४३ ॥ सुरगज पंकज शुंडादंडें । जळीं क्रीडतां उचली कोडें । गोवर्धनही तेणें पाडें । धरी कैवाडें तव कलभ ॥ ४४ ॥ एवढें कैसें अद्भुत कर्म । पहा विवरूनि याचें वर्म । बल्लवबाळकासि हा सम । करितां परम स्मय वाटे ॥ ४५ ॥ ऐसींच अवघीं अद्भुत कर्में† । बल्लवीं वर्णिलीं विस्मयागमें । बारा श्लोकीं मुनिसत्तमें । नृपा सप्रेमें निवेदिलीं ॥ ४६ ॥ बालकें गिरिवर सप्तरात्री । कैसा धरिला एके करीं । हें आश्चर्य चमत्कारीं । गोप निर्धारीं चोजविती ॥ ४७ ॥ हें ऐकोनि बल्लव कोण्ही । म्हणती कृष्णें जन्मतेक्षणीं । जे कां केली अद्भुत करणी । पाहोनि नयनीं कां विसरां ॥ ४८ ॥

तोकेनामीलिताक्षेण पूतनाया महौजस: । पीत: स्तन: सह प्राणै: कालेनेव वयस्तनो: ॥ ४ ॥

पुरते नुघडिले असतां डोळे । जातमात्रें या तव बाळें । पूतनेचीं स्तनमंडळें । सहगरळें शोखिलीं ॥ ४९ ॥ दीडयोजन विशाल* काया । भीम बलाढ्य राक्षसी माया । नटोनि लावण्य-रूपी जाया । आली वधावया बाळातें ॥ ५० ॥ यशोदाप्रमुख व्रजगौळिणीं । भुलल्या मायामोहें करूनी । पूतना बाळा लावी स्तनीं । जैशी जननी सत्कुलीं[6] ॥ ५१ ॥ कृष्णें उघडिले नसतां नयन । प्राणें सहित प्याला स्तन । आयुष्यैशीं तनुतारुण्य । काल प्राशन जेंवि करी ॥ ५२ ॥ जीच्या

पाठभेद:— ¶ हा कुमर ( मुंगीप्रत ). † केली ( मुंगीप्रत ). * विक्राळ ( मुंगीप्रत ); विशाळ ( उमरखेडप्रत ).

१ न जाणवे. २ अज्ञान. ३ बालस्वभाव. ४ भुंग्याची कांति नष्ट करणारें. ५ हिऱ्यासारख्या तेजस्वी. ६ उत्तम कुलांतील.

मेतकलेवरपातें[1] । दीडयोजन झालीं प्रेतें । स्थावरजंगमें भौतिकें भूतें । अक्षत तेथें निर्भय हा ॥ ५३ ॥ कैसें अद्भुत या लेंकुरा । योग्य कर्म ऐसें विवरा । एका वांचूनि ईश्वरा । हें सुरनरां अघटित ॥५४॥ हें ऐकोनि अन्य गौळी । म्हणती आमुचे गोपकुळीं । भाविभूतादित्रिकाळीं । विक्रमशाली[2] हा एक ॥ ५५ ॥

हिन्वतोऽधः शयानस्य मास्यस्य चरणावुदक् । अनोऽपतद्विपर्यस्तं रुदतः प्रपदाहतम् ॥ ५ ॥

पुरते न भरतां तीन मास । परिवर्तनोत्सवीं[3] यास । शकटतळीं सावकाश । करवी शयनास यशोदा ॥ ५६ ॥ आपण गुंतली उत्साहकार्या । स्वागतार्चनीं पुरंध्री आर्या । करितां †शिष्टांची परिचर्या । क्षुधिता तनया विसरली ॥ ५७ ॥ कृष्णें क्षुधार्त करितां रुदन । शिशुस्वभावें पदचालन । प्रपदें[4]स्पर्शें शकट भग्न । पडला उलथून खंडशः ॥ ५८ ॥ तया शकटाचा पतनध्वनि । समस्त पातलों ऐकोनी । लेंकुरीं कथिली याची करणी । परी सत्य निजमनीं तें न मनूं ॥ ५९ ॥ कैसें* अद्भुत हें याजोगें । अवघे सावध विवरा वेगें । तीं महिन्यांचा तैं हा आंगें । शकट भंगे या कैसा ॥ ६० ॥ हें ऐकोनि गोप अपर । म्हणती ऐका आश्चर्य थोर । नंद मानी या निजकुमर । परी हा निर्जरवर[5]वरद ॥ ६१ ॥

एकहायन आसीनो ह्रियमाणो विहायसा । दैत्येन यस्तृणावर्तमहन् कंठग्रहातुरम् ॥ ६ ॥

हा एकसंवत्सराचा बाळ । घेऊनि यशोदा वेल्हाळ । खेळवितां दैत्यकुटिळ । आला वाहटुळस्वरूपीं ॥ ६२ ॥ तेणें गोकुळ पाडिलें फेरीं । केली यशोदा घाबिरी । कृष्ण उडविला अंबरीं । माया आसुरी दावूनी ॥ ६३ ॥ तया तृणावर्ताकंठीं । कृष्णें घातली वज्रमिठी । गतप्राण तो उठा[6]उठीं । शिलापृष्ठीं आपटला ॥ ६४ ॥ गगनींहुनी पतन जाहलें । अवयव खंडविखंड पडले । त्याचे वक्षःस्थळीं हा लोळे । निर्भय डोळे न झांकी ॥ ६५ ॥ एका वर्षाचें लेंकरूं । केंवि हें अद्भुत शके करूं । कोणा न करवे निर्धारु । विवरा साचार गोप हो ॥ ६६ ॥ हें ऐकोनि अपर गोप । म्हणती अद्भुत क्रीडाकल्प । कोणा साकल्यें करवे जल्प । कांहीं अल्प अवधारा ॥ ६७ ॥

क्वचिद्धैयंगवस्तैन्ये मात्रा बद्ध उलूखले । गच्छन्नर्जुनयोर्मध्ये बाहुभ्यां तावपातयत् ॥ ७ ॥

कोणे एके अवसरीं । आडिचा वर्षांचा श्रीहरि । परम चपळ चित्त[7] चोरी । कोणा क्षणभरी नाकळे ॥ ६८ ॥ जेथ तेथ असे उभा । सर्व पाहती लावण्यशोभा । भुलवी बल्लवी[8] स्वबालभा । दुर्लभ सुलभसम¶ भासे ॥ ६९ ॥ यशोदा पाजितां प्रेमपान्हा[9] । साजुका गोदुग्धा क्रियमाणा । उतोनि

पाठभेद :— † श्रेष्ठांची ( मुंगीप्रत ). * तैसे ( मुंगीप्रत ). ¶ सुलभासम ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ देह. २ अति पराक्रमानें शोभायमान. ३ मूल उपडी वळण्याच्या वेळीं उत्सव करितात तो. ४ पायाचें अग्र. ५ देवश्रेष्ठ जो इंद्र यास वर देणारा. ६ तत्काळ. ७ मन हरण करी. ८ गौळणी. ९ आपल्या प्रेमानें.

दवडी या विंदाना। नंदांगना न जाणे ॥ ७० ॥ पाजितां ठेउनि कृष्ण कोडें। यशोदा धांवे दुग्धाकडे। प्रारब्धमथन गोरसभांडें। फोडी रोकडें श्रीकृष्ण ॥ ७१ ॥ मग प्रवेशोनि †माजिघरीं। संचित नवनीत भक्षी हरि। हैयंगव या संज्ञोत्तरीं। ज्यातें सूरि[1] बोलती ॥ ७२ ॥ मुक्त करूनि पश्चिमद्वार[2]। ‡मर्कट आणि गोपकुमार। संचित नवनीत समग्र। वोपी सत्वर तयांसी ॥ ७३ ॥ करितां यशोदा गवेषण[3]। करी सत्वर पलायन। धरूं धांवे अनुलक्षून। परी ¶हा स्तेनें[4] नाटोपे ॥ ७४ ॥ धरितां क्लेश पावली फार। परम क्लेशें धरिला कुमर। उखळीं बांधोनि दामोदर। झाली §सादर गृहमेधा[5] ॥ ७५ ॥ नवनीत चोरितां वनमाळी। यशोदेनें बांधिला उखळी। तैसाचि गेला अर्जुनातळीं‖। क्रीडाशाली चापल्यें ॥ ७६ ॥ अर्जुनांमधूनि गेला चपळ। बाहुबळें वोढितां उखळ। बळें उन्मळूनियां यमळ। द्रुम विशाळ पाडिले ॥ ७७ ॥ कैसें लेंकुराचें हें कृत्य। कर्म कृष्णांचें परमाद्भुत। पहात असतां होतसों भ्रान्त। कां हें समस्त विवराना ॥ ७८ ॥ हें ऐकोनि बल्लव आन। म्हणती याचें कर्म गहन। वयें पहातां दिसे लहान। विश्वमोहन विदितात्मा ॥ ७९ ॥

वने संचारयन् वत्सान् सरामो बालकैर्वृतः। हंतुकामं बकं दोर्भ्यां मुखतोऽरिमपाटयत् ॥ ८ ॥

औट[6] वर्षांचा वनमाळी। बळरामेंशीं वत्सप मेळीं। वत्सें चारितां यमुनाकूळीं[7]। दैत्य निर्दळी बकनामा ॥ ८० ॥ मुखें गिळावा श्रीहरि। कीं मारावा चंचुप्रहारीं। ऐसें विवरूनि अभ्यंतरीं। दुराचारी तो आला ॥ ८१ ॥ तेणें कृष्ण गिळितां बळें। कंठीं पोळला प्रळयानळें। उगळूनि टाकिला तये वेळे। क्रोधें खवळे हरिहनना ॥ ८२ ॥ सवेग टोंचितां चंचुघातें। कृष्णें चंचु धरूनि हातें। चिरूनि टाकिलें त्या वैरियातें। कर्में अद्भुतें हीं त्याचीं ॥ ८३ ॥ ऐसें ज्याचें कर्म प्रबळ। तो हा कैसा बल्लवबाळ। रूपलावण्यशौर्यशीळ। तुळितां अतुळ त्रिजगीं हा ॥ ८४ ॥

वत्सेषु वत्सरूपेण प्रविशंतं जिघांसया। हत्वा न्यपातयत्तेन कपित्थानि च लीलया ॥ ९ ॥

तंव आणिक म्हणती कृष्णमहिमा। देखोनि नाठवे कां पां तुम्हां। वत्सरूपी वत्सनामा। हननकामा पातला ॥ ८५ ॥ वत्सरूपाची घेऊनि खोळ। वत्समेळीं विचरे चपळ। मारावया रामगोपाळ। लक्षी वेळ दुरात्मा ॥ ८६ ॥ तें या कृष्णासि कळलें मनीं। सपुच्छ धरूनि मागिलां चरणीं। भंवडूनि टाकितां कपित्थमूर्ध्नीं[8]। पडिला धरणीं सकपित्थ ॥ ८७ ॥ मायाकपट उडोनि गेलें। राक्षसीदेह प्रकट पडिलें। अद्भुत कर्म हें पशुपबाळें। जाय केलें कैंवि हो ॥ ८८ ॥ हें ऐकोनि पशुप एक। म्हणती नव्हे हा बल्लवतोक। अद्भुतकर्में समस्तलोक। जाणती सम्यक् पै याची ॥ ८९ ॥

---

पाठभेद — † माजघरीं ( मुंगीप्रत ). ‡ मर्कट ( मुंगीप्रत ). ¶ हस्ते न ( मुंगीप्रत ). § सावध ( मुंगीप्रत ). ‖ जवळी ( मुंगीप्रत ).

१ पंडित. २ मागील दार. ३ शोध. ४ चोर. ५ गृहकृत्यास. ६ साडेतीन. ७ यमुनातीरीं. ८ सोग. ९ कवठीच्या झाडांच्या शेंड्यावर.

हत्वा रासभदैतेयं तद्बंधूंश्च बलान्वितः । चक्रे तालवनं क्षेमं परिपक्वफलान्वितम् ॥ १० ॥

धेनुकनामा दितिनंदन । रासभरूपी जो बळवान् । तेणें वसवूनि ताळवन[1] । केलें निर्जन[2] दुर्गम[3] ॥ ९० ॥ तज्जातीचे रासभाकार । शतसहस्र दैत्य घोर । त्यांच्या भयें भयंकर । जेथ नर सुर न वचती ॥ ९१ ॥ बळरामेशीं गोपमेळा । घेऊनि कृष्ण तेथें गेला । पाडूनि सुपक्व तालफळां । विचित्र खेळा खेळती ॥ ९२ ॥ ऐकोनि तयाचा सांचल[4] । क्षोभें खवळला रासभमेळ । मारावया रामगोपाळ । परम चपळ धांविला ॥ ९३ ॥ धेनुक भवंते घेऊनि फेरे । रामासि डसूं धांवे निकुरें । संमुख येऊनि विमुख फिरे । लत्ताप्रहारें ताडावया ॥ ९४ ॥ तंव तो रामें मागिला चरणीं । धरूनि भवंडूनि टाकिला गगनीं । पडतां तालवनाचे मूर्ध्नीं । पडिले भंगोनि तालतरु ॥ ९५ ॥ त्याचे अनेक बंधुवर्ग । गर्दभ क्षोभले पै सवेग । त्यांसि दाविला गगनमार्ग । दोघे अभंगबळशाली ॥ ९६ ॥ रासभदैत्य बंधुसहित । मारूनि जाले विजयवंत । तालकानन उपद्रवरहित । केलें सुफळित सुसेव्य ॥ ९७ ॥ बेडुकाभेणें पळती मुलें । येसणें[5] अद्भुत इहीं केलें । कैसें अघटित यांचेनि जालें । तुम्हीं देखिलें कीं ना हो ॥ ९८ ॥ ऐसें वदती एक आभीर[6] । हें ऐकोनि म्हणती अपर । रामकृष्णांचा प्रताप थोर । नंदकुमार न सजती हे ॥ ९९ ॥

प्रलंबं घातयित्वोग्रं बलेन बलशालिना । अमोचयद् व्रजपशून् गोपांश्चारण्यवह्नितः ॥ ११ ॥

प्रलंबनामा दैत्य कपटी । नटला संवगडियांचे नटीं । रामकृष्णांच्या हननासाठीं । हांव पोटीं धरूनी ॥ १०० ॥ द्वंद्वशः वांटूनि घेतां गडी । प्रलंबबळरामेंशीं जोडी । रामें डाव जिंकोनि प्रौढी । घेतली चढी त्या पृष्ठीं ॥ १ ॥ भांडीरवटाची लंघूनि सीमा । दैत्य घेऊनि चालिला व्योमा । कृष्णें चेतवुनी बळरामा । अंतकधामा[7] पाठविला ॥ २ ॥ बळरामाचा मुष्टिप्रहार । विद्युत्पतनाहूनि क्रूर । लागतां दैत्याचें शरीर । झालें शरीर शतचूर्ण ॥ ३ ॥ रामहस्तें प्रलंबहनन । कृष्ण करवी लीलेंकरून । अद्भुत कर्म हें कैसें कोण । काय म्हणोन विवरावें ॥ ४ ॥ गाई गोपाळ व्रजनिवासी । दावानळें जळतां निशीं । कृष्णें प्राशन करूनि त्यांसी[8] । समस्तांसि सोडविलें ॥ १०५ ॥ दावानळाचें करूनि पान । सगोपव्रजपशुमोक्षण । एवढें अद्भुत कर्म कोण । ईश्वरेंवीण करूं शके ॥ ६ ॥ लेंकुराचेनि हें कैसें होय । ऐसी कोणी न वदे सोय । अपर म्हणती हें केतुलें काय । महदाश्चर्य तें ऐका ॥ ७ ॥

आशीविषतमाहींद्रं दमित्वा विमदं ह्रदात् । प्रसह्योद्वास्य यमुनां चक्रेऽसौ निर्विषोदकाम् ॥ १२ ॥

विशाल विषाचा विषधर[9] । कालियनामा महाक्रूर । प्रतापें दमवूनि तो अहींद्र । यमुनेबाहीर

---

१ ताडाचें अरण्य. २ जनरहित. ३ जाण्यास कठिण. ४ चाहूल. ५ असें. ६ गौळी. ७ यमसदनास. ८ त्या दावानळास. ९ सर्प.

काढिला ॥ ८ ॥ यमुनाहृदीं तो विखार । चिरकाळ होता सपरिवार । त्यावरी करूनि बलात्कार । तेथूनि सत्वर दवडिला ॥ ९ ॥ विषवर्जित करूनि यमुना । सुसेव्य केली सकळजना । अद्भुतप्रताप कैसा ना * । षड्हायना बाळाचा ॥ ११० ॥ ऐसे मिळूनि गोप समस्त । कृष्णप्रताप अत्यद्भुत । प्रशंसूनि नंदा म्हणत । कृष्ण निश्चित परमात्मा ॥ ११ ॥

दुस्त्यजश्चानुरागोऽस्मिन् सर्वेषां नो व्रजौकसाम् । नंद ते तनयेऽस्मासु तस्याप्यौत्पत्तिकः कथम् ॥ १३ ॥

नंदा तव तनयाचे ठायीं । आम्हां व्रजौकसांचा पाहीं । प्रेमा अनावर सर्वदाही । सर्वां देहीं सर्वथा ॥ १२ ॥ ऐकणें स्पर्शणें देखणें । चाखणें अथवा आमोद[2] घेणें । बाह्यविषयक दृश्य गुणें । दुस्त्यज म्हणणें † सर्वीया ॥ १३ ॥ ऐसियाही योगवित्तम[3] । अभ्यासुनी शमदमोपरम[4] । सोडूनि देहाचें तादात्म्य । आत्माराम ते त्यजिती ॥ १४ ॥ ऐसा दुस्त्यज विषयाध्यास । त्यजिती साधूनि योगाभ्यास । परी कृष्णाचा प्रेमपाश । व्रजौकसांस दुस्त्यज ॥ ११५ ॥ बाहीरूनि भरिलें जळ । उपसूनि टाकूंये केवळ । परी अंतरझरा जो प्रबळ । तो निर्जळ न करवे ॥ १६ ॥ कृष्ण सबाह्य अभ्यंतरीं । भरूनि अनुराग उभारी । दुस्त्यज प्रेमा कृष्णावरी । त्या आवरी कै कोण ॥ १७ ॥ आम्हां व्रजौकसांच्या ठायीं । अनावर प्रेमा कृष्णाचाही । स्वाभाविकचि कैसा कांहीं । हें कोणाही न चोजवे ॥ १८ ॥ तस्मात्सर्वांचा श्रीकृष्ण आत्मा । ऐसा भाव गमतो आम्हां । मिथ्या दुस्त्यज सबाह्यप्रेमा । अतुलविक्रमा प्रकटी हा ॥ १९ ॥ ऐसे अवघे मिळोनि गोप । नंदापाशीं करिती जल्प । अद्भुत देखिला जो प्रताप । पुढती पशुप तो वदती ॥ १२० ॥

क्व सप्तहायनो बालः क्व महाद्रिविधारणम् । ततो नो जायते शंका व्रजनाथ तवाऽऽत्मजे ॥ १४ ॥

विस्मयामाजीं आनंदमय । होऊनि म्हणती शंकेसि ठाय । कैसा कोठूनि जाला काय । तो अभिप्राय अवधारीं ॥ २१ ॥ कोणीकडे नंदकुमर । सातां वर्षांचा लघुतर । कोणीकडे हा गिरिवर । महाथोर प्रचंड ॥ २२ ॥ ऐसिया गोवर्धनाचें धरणें । या योग्य नव्हे अघटितपणें । घडलें म्हणोनि आमुच्या मनें । शंका करणें यदर्थीं ॥ २३ ॥ नंदा तवात्मजाचे विषयीं । शंका उपजे आमुचे ठायीं । कीं हा गमे क्षीराब्धिशायी । पशुपालयीं अवतरला ॥ २४ ॥ एतद्विषयीं रहस्य गुज । कांहीं विदित असेल तुज । तें आमुचे श्रवणीं बीज । बोधूनि सहज उमजवीं ॥ १२५ ॥

श्रूयतां मे वचो गोपा व्येतु शंका च वोऽर्भके । एनं कुमारमुद्दिश्य गर्गो मे यदुवाच ह ॥ १५ ॥

ऐकोनि व्रजौकसांची काहणी । नंद आठवी गर्गवाणी । भावी वदला जे कृष्णकरणी । ते ते

**पाठभेद :—** * नाना ( मुंगीप्रत ); साना ( उमरखेडप्रत ). † सर्वथा ( मुंगीप्रत ), सर्विया ( उमरखेडप्रत ).

१ सहा वर्षांचा. २ वास. ३ योग जाणणाऱ्यांत श्रेष्ठ. ४ मनाची व बाह्येंद्रियांची विषयांपासून निवृत्ति—शम आणि दम, सुखदुःखादिकांनीं मनोवृत्ति न बदलणें हा उपरम.

नयनीं देखतसों ॥ २६ ॥ उपदेशरूप गर्गवचन । तदनुभ्यास कृष्णाचरण । असंभावनामळ सांडून । अंतःकरण विशुद्ध ॥ २७ ॥ असंभावनारहित नंद । स्वलब्ध एवं परमानंद । कृष्णविषयकतत्त्वावबोध[1] । बोधनीं प्रबुद्ध तो तेणें ॥ २८ ॥ जेणें चाखिली असे जे चवी । तो दुजयातें गोडी लावी । दधिपयकर्पासधवळिमा[2] जेंवि । नातरी आघवी सम भासे ॥ २९ ॥ युद्ध न देखतां जो नयनीं । परम पटुतर[3] पलायनीं । त्याची संग्रामशौर्यवाणी[4] । अंतःकरणीं ह्रीग्रस्त ॥ १३० ॥ तैसा नोहे व्रजनायक । जो कां जगज्जनकाचा जनक । तो श्रीकृष्ण म्हणवी तोक । ज्याचा सम्यक सप्रेमें ॥ ३१ ॥ तेणें गर्गोक्तिपरिशीलनें । कृष्णकर्मांचीं करितां मननें । पुढें प्रत्यक्ष देखूनि नयनें । असंभावने निरसिलें ॥ ३२ ॥ विगतसंशय नंदसुमति । कृष्णकर्मांच्या *भविष्यदुक्ति[5] । सांगे समस्त गोपांप्रति । गर्गें एकांतीं ज्या कथिल्या ॥ ३३ ॥ नंद म्हणतसे समस्त गोपां । सांडूनि शंकेच्या संकल्पा । ऐका गर्गमुनीच्या जल्पा । वदला प्रतापा कृष्णाच्या ॥ ३४ ॥ तुम्हीं ममार्भका विषयीं । सहसा शंका न कीजे कांहीं । या कुमारातें लक्षूनि पाहीं । भविष्यनवाई हे वदला ॥ १३५ ॥

वर्णास्त्रयः किलास्यासन् गृह्णतोऽनुयुगं तनूः । शुक्लो रक्तस्तथा पीत इदानीं कृष्णतां गतः ॥ १६ ॥

तीन वर्ण मत्पुत्राचे । गर्गें कथिले आपुले वाचे । विभाग म्हणाल कैसे त्याचे । युगायुगाचे पृथक्त्वें ॥ ३६ ॥ कृतयुगीं हा ¶शुक्लवर्ण । त्रेतायुगीं होय अरुण । द्वापरीं होय पीतवर्ण । आतां कृष्णत्व पावला ॥ ३७ ॥ हा एक गर्गाचा संकेत । यावरी कथिला जो वृत्तान्त । तोही ऐका सावचित्त । संशयरहित होउनी ॥ ३८ ॥

प्रागयं वसुदेवस्य क्वचिज्जातस्तवात्मजः । वासुदेव इति श्रीमानभिज्ञाः संप्रचक्षते ॥ १७ ॥

पूर्वी कोणे एके काळीं । तुझा आत्मज हा वनमाळी । जन्मला वसुदेवाचे कुळीं । विवेकशाली जाणती ॥ ३९ ॥ वासुदेव ऐसें नाम । श्रीसंपन्न[6] पुरुषोत्तम । अभिज्ञ जाणोनियां हें वर्म । तदनुक्रम शंसिती ॥ १४० ॥

बहूनि संति नामानि रूपाणि च सुतस्य ते । गुणकर्माणि रूपाणि तान्यहं वेद नो जनाः ॥ १८ ॥

आणिक गर्गें कथिलें मज । याच्या नामरूपाचें गुज । गुणकर्मानुसारें सहज । अधोक्षज-पडिपाडें ॥ ४१ ॥ तुझिया सुतांचीं बहुत नामें । बहुतें रूपें बहुविक्रमें । गुणात्मकें कित्येक कर्में । तदनुनियमें अधिरूढें ॥ ४२ ॥ सर्वकर्ता सर्वहर्ता । सर्वज्ञाता सर्वगोप्ता । निखिल ऐश्वर्याचा भोक्ता । मायानियंता मायिक ॥ ४३ ॥ सर्वसाक्षी विश्वपति । सर्वव्यापक परंज्योति[7] । अचल अमल

---

**पाठभेद :—*** भविष्योक्ति ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ¶ कृष्णवर्ण ( मुंगीप्रत ).

१ कृष्णाविषयीं खऱ्या गोष्टींचें ज्ञान. २ कापूस. ३ हुशार. ४ युद्धाविषयीं वीरश्रीचें भाषण. ५ भावी गोष्टी. ६ श्रीविष्णूसारखें. ७ उत्कृष्ट तेज ज्याचें तो.

†स्वसंविति । पुण्यकीर्ति परमात्मा ॥ ४४ ॥ उत्तमश्लोक पुण्यश्लोक । चिद्रूप शुद्धसत्त्वात्मक । पूर्णकाम निष्कलंक । रहितशोक स्वारामें[1] ॥ १४५ ॥ ऐशीं नामें गुणात्मकें । बहूनि म्हणिजती अनेकें । आतां कर्मरूपात्मकें । संकेतविवेकें अवधारीं ॥ ४६ ॥ शंखमर्दक वेदोद्धरण । सुरकैपंक्षी भूभारहरण । सूकर असुरनिबर्हण । सिंहवदन स्तंभज ॥ ४७ ॥ व्रती वर्णी बटुवामन । खंज खर्व कृतोपनयन । वेदाध्ययनपरायण । मनमोहन सुरसहाय ॥ ४८ ॥ याच्ञाछद्मीं बळिबंधन । त्रिविक्रम त्रिकालज्ञ । ब्रह्मांडभेदक भवभंजन । पदजलपावन विधिपूज्य ॥ ४९ ॥ क्षत्रकुलान्तक राक्षसारि । मधुसूदन श्रीमुरारि । वासुदेव वसुधाधारी । पूतनारि गोगोप्ता ॥ १५० ॥ नंदनंदन यशोदासुत । शकटभंजन शंकारहित । व्रजवेधक क्रीडासक्त । नवनवनीतभक्षक ॥ ५१ ॥ तृणावर्तप्रतापन । विश्वदर्शक कृतजृंभणें[5] । गोरसतस्कर गव्याशनें[6] । नाट्यनर्तन निगमात्मा ॥ ५२ ॥ बद्धोलूखल दामोदर । यमलोत्पाटक रिंगणपर[7] । गुह्यकोद्धर्ता श्रीधर । बृहत्कान्तारनिवासी ॥ ५३ ॥ बकारि वत्सासुरनिहंता । अघनिर्दलन गुह्यकगोप्ता । विरवनसंईड्य[8]* विधातृशास्ता । निगमनियमिता निर्वाण ॥ ५४ ॥ कालियमथन दावाग्निपानी । अनेकजंतूंचा अनुकरणी । ग्रीष्मरोचक वसंतगुणी । मुरलीगानी गगनांग ॥ १५५ ॥ गोपकुमारीचीरापहरण[9] । गोपीवासद वन्यासन । वन्यभूषक वन्याभरण । वन्याशन वनमाळी ॥ ५६ ॥ यज्ञपत्नीदत्तौदन । यज्वमोहक मखशंसन । वासवयज्ञ-निवारण । गोपगोधनशास्त्रात्मा ॥ ५७ ॥ गोद्विजगिरिवरयज्ञादेष्टा । गिरिवररूपी दत्ताभीष्टा । जातप्रत्ययवर्धकनिष्ठा । नाशक कष्टां दुष्टघ्न ॥ ५८ ॥ सुरेंद्रदर्पदलनकाम । अकाळवृष्टिकृतोपशम । गोवर्धनधर पुरुषोत्तम । मेघश्याम स्मरजनक ॥ ५९ ॥ वासवसंस्तुत वरुणपूज्य । गोपीमनसिजभंजन भज्य । अरिष्टघ्न गरुडध्वज । मयकात्मजमर्दन ॥ १६० ॥ केशिहंता नारदनुत । अक्रूरप्रियतम कृतैकांत । अक्रूरसंशयअपाकृत । विश्वरूपप्रदर्शक ॥ ६१ ॥ गोपीवियोगविरहजनक । मथुरागामी सहार्भक । राजमार्गरजकांतक । रम्यमाल्यक प्रियवरद ॥ ६२ ॥ कुब्जागंधानुलेपन । त्रिवक्रकुब्जा-ऋज्वंगकारण । मथुरामानिनीमनमोहन । अभिरंजन जगज्जनक ॥ ६३ ॥ कुवलयापीडगजभंजन । धनुर्यागविध्वंसन । मल्लक्रीडापरायण । मल्लमथन कंसारि ॥ ६४ ॥ ऐशीं नामें कर्मानुरूप । तुझिया कुमराचीं अमूप । नंदा वदोनि अल्प अल्प । तुज संक्षेप सुचविला ॥ १६५ ॥ मजही साकल्यें न कळती । तेथें येरांची केउती मति । ब्रह्मादिकां शतजन्मान्तीं । कथिलीं न वचती साकल्यें ॥ ६६ ॥ ऐसीं नामें वदला गर्ग । पुढती कथिला भविष्यमार्ग । तोही ऐकावा प्रसंग । धरूनि अभंगें विश्वास ॥ ६७ ॥

एष वः श्रेय आधास्यद्गोपगोकुलनंदनः । अनेन सर्वदुर्गाणि यूयमंजस्तरिष्यथ ॥ १९ ॥

तरी हा बाळक तुम्हां सकळां । गोपकुळा सहगोकुळा । भेटवील शुभमंगळा । सुखकल्लोळा

पाठभेद — † ससंविती ( मुंगीप्रत ); स्वसंविती ( उमरखेडप्रत ). * सविड्य ( मुंगीप्रत ).

१ आत्मस्वरूपज्ञ. २ आत्मानंदनिमग्न. ३ साह्यकारी. ४ पृथ्वी. ५ जांभई दिली ज्यानें तो. ६ दूध, दहीं, लोणीं इ. खाणारा. ७ रांगणारा. ८ ब्रह्मदेवानें स्तविलेला. ९ गोपींचीं वस्त्रें हरणारा. १० पूर्ण.

प्रकटुनी ॥ ६८ ॥ गोपगोकुलानंदक । निखिलमंगलाभिवर्धक । तुम्हां कारणें हा बाळक । ऐसी निष्टंक गर्गोक्ति* ॥ ६९ ॥ याच्या दर्शनें संस्पर्शनें । संभाषणें परिलालनें[१] । स्मरणें चिंतनें मानस-ध्यानें । तुम्हांसि विघ्नें न बाधिती ॥ १७० ॥ येणें करूनि सर्व दुर्गें[२] । तुम्ही निस्तराल सुगम मार्गें । ऐसें निज गुज कथिलें गर्गें । तें स्मरण जागे मम हृदयीं ॥ ७१ ॥ जातकर्मीं हें कथिलें होतें । तैसें तैसेंचि दिसोनि येतें । नित्य नूतनें श्रीकृष्णचरितें । अत्यद्भुतें प्रकटती ॥ ७२ ॥ सप्तसंवत्सरांचा बाळ । केंवि उचलुं शके अचळें । तैसा असंभावनारूप मळ । क्षाळी प्रांजळ गर्गोक्ति ॥ ७३ ॥ गर्गवाक्याच्या प्रकाशें । श्रीकृष्णपरमतत्त्व[३] ऐसें । जाणोनियां मम मानसें । विस्मयदशे सांडिलें ॥ ७४ ॥ यास्तव अघटित देखोनि कर्में । मानस कवळिलें न वचे भ्रमें । नारायणाशीं साम्यता गमे । तनुमनप्रेमें वेधक ॥ १७५ ॥

पुराऽनेन व्रजपते साधवो दस्युपीडिताः । अराजके रक्ष्यमाणा जिग्युर्दस्यून् समेधिताः ॥ २० ॥

गर्ग म्हणे गा नंदा पूर्वीं । अराजकी होती उर्वी । ठायीं ठायीं महागर्वी । दस्युं[४] सर्वीं सर्वत्र ॥ ७६ ॥ नसतां नृपाचा आधार । भूमे[५] पुंडें[६] पाळेगार[७] । प्रजापीडक दुष्ट चोर । जे भूभार भूपति ॥ ७७ ॥ एकच्छत्री सार्वभौम । नाहीं म्हणोनि प्रजांसि श्रम । साधु छळिती:दस्यु अधम । नीतिधर्म भंगूनी ॥ ७८ ॥ ते काळीं या तुझिया कुमरें । समस्त दस्यूंच्या संहारें । साधु रक्षिजती यशस्करें । ऐसीं उत्तरें गर्गाचीं ॥ ७९ ॥ तृणें खुरपूनि काढी माळी । जीवनें शिंपूनि धान्यें पाळी । तैसे दस्यु मारूनि समूळीं । साधु सांभाळी निजयोगें ॥ १८० ॥ झणें म्हणसी तूं व्रजपति । पूर्वीं याची ऐसी शक्ति । आतां पुढें ही तैसीच ख्याति । देखोनि चित्तीं उमजसी ॥ ८१ ॥ सूचनारूप कथिलें गुज । पुढें प्रकट कळेल तुज । आणि सभाग्य जे पुण्यपुंज । प्रेमें सहज या भजती ॥ ८२ ॥

य एतस्मिन् महाभागाः प्रीतिं कुर्वंति मानवाः । नारयोऽभिभवंत्येतान्विष्णुपक्षानिवासुराः ॥ २१ ॥

याच्या ठायीं प्रेमभरित । महासभाग्य कृतसुकृत । जे जे मानव प्रीतिवंत । त्यांतें अहितें[८] न बधिती ॥ ८३ ॥ गरुडा सन्निध ज्यांचा वास । काद्रवेयें[९] शिवों न शकती त्यांस । कां विष्णुपक्षेंगां[१०] देवांस । असुर निःशेष न नुधवती[११] ॥ ८४ ॥ सूर्यलोकीं ज्यांची वसति । ते नेणती सध्वान्तें[१२] राती । तेंवि कृष्णीं ज्यांची सप्रेम प्रीति । त्यांतें अराति मग कैंचे ॥ १८५ ॥

तस्मान्नंदकुमारोऽयं नारायणसमो गुणैः । श्रिया कीर्त्याऽनुभावेन न तत्कर्मसु विस्मयः ॥ २२ ॥

या कारणें नंदगोपां । अनंतगुणी सत्यसंकल्पां । तुझा कुमार हा त्रैलोक्यभूपा । साम्य

---

**पाठभेद**:--* ( ६९ ) वी ओवी मुंगी येथील पोथींत नाहीं.

१ लाड करण्यानें. २ पर्वत. ३ श्रीकृष्णाची खरी माहिती. ४ चोर. ५ भामटे. ६ जबरदस्तीनें लुटणारे. ७ छपून राहून वाटसरूंवर हल्ला करणारे. ८ शत्रु. ९ सर्प. १० पक्षांतील. ११ डोकें वर काढीत नाहींत. १२ काळोखी.

सोपाशिशु न म्हण ॥८६॥ नारायणाचे समान कान्ति । नारायणाचे समान कीर्ति । नारायणाचे समान धृति । तोचि श्रीपति किंबहुना ॥ ८७ ॥ नारायणाचि समान तेज । नारायणाचि समान पूज्य । किंबहुना हा गरुडध्वज । न मानिजे चोज तत्कर्मीं ॥ ८८ ॥ कर्म देखोनि असाधारण । नोहे विस्मयासि कारण । हा प्रत्यक्ष नारायण । गर्गभाषणविश्वासें ॥ ८९ ॥

इत्यद्धा मां समादिश्य गर्गे च स्वगृहं गते । मन्ये नारायणस्यांशं कृष्णमक्लिष्टकारिणम् ॥ २३ ॥

ऐसें प्रत्यक्ष गर्गें मज । भविष्य वर्तवूनि कथिलें गुज । ममान्तरीं तो प्रत्यय सहज । होतां बीज पडिपाडें ॥ १९० ॥ भविष्य कथूनि बरव्यापरी । गर्ग स्वगृहा गेलियावरी । नारायणांश माझा हरि । विश्वास अंतरीं धरिला म्यां ॥ ९१ ॥ पुढें वाढतां वाढतां सृष्टि । अक्लिष्ट[1] कर्में देखतां दृष्टी । निश्चय मानिला आपुल्या पोटीं[2] । हा जगजेठी वैकुंठ ॥ ९२ ॥ अचाट देखूनि कृष्णकरणी । विस्मय न वटे अंतःकरणीं । कां जे गर्गें कथिली काहाणी । तुम्हां ये क्षणीं ते वदलों ॥ ९३ ॥

इति नंदवचः —श्रुत्वा गर्गगीतं व्रजौकसः । दृष्टश्रुतानुभावास्तेकृष्णस्यामिततेजसः ॥
मुदिता नंदमानर्चुः कृष्णं च गतविस्मयाः ॥ २४ ॥

ऐसें नंदमुखें कथन । गर्गगीतातें परिसून । आनंदले बल्लवगण । म्हणती धन्य नंदातें ॥ ९४ ॥ नंदा तुझिया सुकृतासी । समता न करवे कोणासी । धन्य यशोदा सुकृतराशि । जे कृष्णासी प्रसवली ॥ १९५ ॥ जेणें इंद्र अपमानिला । लीलें गोवर्धन उचलिला । जळत दावानळ प्राशिला । तो हा झाला सुत तुमचा ॥ ९६ ॥ ब्रह्माण्डभुवनींचा प्रकाशदीप । निश्चळ शिवाचा अजस्र[3] जप । सनकादिकांचा शुद्धसंकल्प । निर्विकल्प जगदात्मा ॥ ९७ ॥ कमलामानसकंदर्पजनक[4] । भूतभावन[5]-भवबोधक । तो हा कृष्ण तुमचा तोक । भाग्यें वनौकें[6] देखतसों ॥ ९८ ॥ अचाट देखूनि कृष्णाचरणें । आम्ही विस्मित होतसों मनें । आतां गर्गोक्तीच्या श्रवणें । गतविस्मय जाहलों ॥ ९९ ॥ आतां न म्हणों या लेकरूं । पूर्णकाम हा परमेश्वरू । हृदयीं झाला साक्षात्कारू । *तुझ उपकार हा नंदा ॥ २०० ॥

देवे वर्षति यज्ञविप्लवरुषा वज्राश्मपर्षानिलैः ।
सीदत्पालपशुस्त्रि आत्मशरणं दृष्ट्वाऽनुकंप्युत्स्मयन् ॥
उत्पाट्यैककरेण शैलमबलो लीलोच्छिलींध्रं यथा ।
बिभ्रद्गोष्ठमपान् महेंद्रमदभित्प्रीयान्न इंद्रो गवाम् ॥ २५ ॥

ऐसें म्हणोनि बल्लवगण । कृष्णचरितवर्तमान । तें साकल्यें सूचवून । करिती स्तवन तें

पाठभेदः— * तुझा ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ अचाट. २ मोटीं. ३ नित्य. ४ लक्ष्मीच्या मनांत कामवासना उत्पन्न करणारा. ५ भूतें उत्पन्न करणारा. ६ वनांत राहणारे.

ऐका ॥ १ ॥ श्रीमन्मंगलानि भवंतु । गोवर्धनाख्यानवृत्तान्तु । एक्या श्लोकें नृपाकथित । सावचित्त परिसा तें ॥ २ ॥ महेंद्राचा मदभेदक । जो श्रीकृष्ण नंदतोक । त्यातें गोपवृद्धप्रमुख । म्हणती रक्षक हो आम्हां ॥ ३ ॥ जेणें मंजुळ कलभाषणीं । नंदादिकां प्रश्न करूनी । हेतुवाद प्रशंसूनी । इंद्रयज्ञीं पडखेळिलें[1] ॥ ४ ॥ करूनि सर्वां निरुत्तर । निषेधिला शक्राध्वर । गोद्विजाद्रियज्ञ सार । अत्यादरें करविला ॥ २०५ ॥ विशाळगोवर्धनाची मूर्ति । प्रकट देखोनियां समस्तीं । दृढविश्वास धरिला चित्तीं । इंद्राप्रति न गणूनी ॥ ६ ॥ तेणें इंद्र अपमानला । प्रळयरुद्रोपम[2] क्षोभला । व्रजविनाशा उदित झाला । आज्ञापिला मेघगण ॥ ७ ॥ प्रळयमेघ संवर्तक । सहित मरुद्गणांचें कटक । माजि दंभोलि[3] भयानक । निर्दयात्मक त्रिवर्ग ॥ ८ ॥ प्रळयजळाचे वृष्टिलोट । माजि वर्षाश्म§ पडती दाट । कल्पान्तविजूंचा कडकडाट । झडझडाट वायूचा ॥ ९ ॥ इत्यादिउपद्रवीं पीडित । गोप गोधनें स्त्रियादिसहित । परम दुःखें झालीं व्याप्त । केवळ अनाथसम गमती ॥ २१० ॥ इंद्र क्षोभला असतां ऐसी । दुःखावाप्ति व्रजौकसांसी । देखोनि सदय निजमानसीं । श्रीहृषीकेशी कळवळिला ॥ ११ ॥ आपणचि ज्यांचें कल्याणधाम । मजविण नेणती अभीष्टकाम । ऐसें जाणोनि पुरुषोत्तम । सदय सप्रेम द्रवला पैं ॥ १२ ॥ मीच व्रजांचे शिरीं नाथ । असतां दिसती हे अनाथ । यांच्या कैपक्षें सुरनाथ । करीन गर्वहत येकाळीं ॥ १३ ॥ ऐसी प्रौढी आविष्करूॅन[4] । गोवर्धनाद्रि उत्पाटून । करीं घेतला लीलेंकरून । पूर्णकारुण्यें व्रजांच्या ॥ १४ ॥ सप्तसंवत्सरांचा हरि । एक्या हातें धरिला गिरि । व्रज रक्षिलें सप्तरात्री । आणिली हारी[5] इंद्रातें ॥ २१५ ॥ लीलेंकरूनि जेंवि बाळक । उपडोनि करीं घे *छत्रांक । तेंवि धरिला नगनायक[6] । लज्जित †पाकप्रशास्ता[7] ॥ १६ ॥ ऐसें करूनि व्रजरक्षण । केलें महेंद्रमदभंजन । तो गाईचा इंद्र कृष्ण । पूर्ण शरण्य जो आम्हां ॥ १७ ॥ ऐसा अपार कृष्णमहिमा । देखोनि गोपांच्या हृदयपद्मा[8] । विस्मय गमला तो नृपोत्तमा । निरसी विदितात्मा व्रजपति ॥ १८ ॥ मग ते सावध होऊनि सर्व । म्हणती श्रीकृष्ण देवाधिदेव । जाणोनि इंद्रें त्यजिला गर्व । हें अपूर्व वर्तलें ॥ १९ ॥ विमानींहूनि पुष्पवृष्टि । इंद्रें करितां देखिली दृष्टी । आतां उतरूनि वसुधापृष्ठीं । कृष्णा वाक्पटीं स्तवील ॥ २२० ॥ पुढिले अध्यायीं ती कथा । इंद्र येऊनि कृष्णनाथा । व्योमगंगोदकें माथां । अभिषेचिता होईल ॥ २१ ॥ इत्यादिऐश्वर्यें अनंत । असो आम्हांवरी प्रीतिवंत । बल्लव सशुक उत्तरासुत । सूतही म्हणत तत्पंक्ती ॥ २२ ॥ तैसेचि श्रोते वक्ते पुढें । ज्यां हे कृष्णकथा आवडे । त्यांवरी हरीची प्रीति वाढे । वरद रोकडे गोपांचे ॥ २३ ॥ दशमीं सव्विसाव्यां माझारीं । दशमधार्म जो कां हरि । सव्विसावा तत्त्वनिर्धारीं । जो श्रीशौरि[9] जगदात्मा ॥ २४ ॥ चोव्वीसें[10] निरसूनि प्रतापेंशीं । त्या वेगळ्या मज आत्मांशासी । निवडूनि पंचविसाव्यासी । प्रकट प्रेमेंशीं आलिंगो ॥ २२५ ॥ भागवतींचें रहस्य । जोडूनि सप्रेम श्रीहरिदास्य । उभयकामनानैराश्य[11] ।

---

**पाठभेद**—§गारा. *छात्रांक. †पावक प्रशास्ता.

१ उठविले, उद्युक्त केलें. २ प्रलयकाळच्या शंकरासारखा. ३ वीज. ४ प्रकटून. ५ पराजय. ६ मोठा पर्वत. ७ पाकनामक दैत्यास मारणारा इंद्र. ८ भक्तीचें स्थान. ९ शूरनामक राजाच्या कुळांत उत्पन्न झालेला. १० चोव्वीस तत्त्वें. ११ इहामुत्रफलेच्छा.

उपजे वैरस्य भवभोगीं ॥ २६ ॥ तोंवरी नेहटावी वृत्ति । परतों नेदोनि मागौती । शुद्धसत्त्वात्मक सुकृती । त्यासीच हे स्थिति बाणेल ॥ २७ ॥ येरां ग्रंथोक्त ज्ञान कळे । विषयप्रवाह अनादि न वळे । स्वप्नवैभव देखे दुबळें । तेंवि आंधळे निजस्वरूपीं ॥ २८ ॥* न साधितां मनोजय । कैसेनि होय वासनाक्षय । शब्दज्ञान जें अप्रत्यय । तें न करी विलय भ्रमाचा ॥ २९ ॥ असो तुमचें जें शिकविलें । तुम्हांपाशींच निवेदिलें । न्यूनाधिक गेलें आलें । क्षमा केलें पाहिजे ॥ २३० ॥ अविद्याध्वांन्त-विध्वंसक[1] । भानुकुलोद्भव प्रतापार्क । एकनाथात्मा पुण्यश्लोक । स्मरणें विशोक जगत् कर्ता ॥ ३१ ॥ तत्पादाब्जसंभवामोद । उपलब्धात्मा चिदानंद । तेणें सर्वत्र स्वानंद । सज्जनषट्पद सेविती ॥ ३२ ॥ तेथ गोगोप्ता गोविंद । प्रत्यक्प्रवण[2]¶ करणवृंदें[3] । करूनि भोगवी स्वानंदें[4] । करी अगाधें[5] दयार्णवीं ॥ ३३ ॥ तें हें श्रीमद्भागवत । अठरासहस्र शुकनिर्मथित । परमहंस रमती जेथ । स्कंध त्यांत दशम हा ॥ ३४ ॥ त्यामाजि गोवर्धनाख्यान । शुकपरीक्षितिसंवाद गहन । नंदें गर्गोक्ति केल्या कथन । तो अध्याय पूर्ण सव्विसावा ॥ २३५ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्त्र्यां पारमहंस्यां संहितायां श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां षड्विंशति-तमोऽध्यायः ॥ २६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक २५ ॥ टीका ओव्या २३५ ॥ एवं संख्या ३६० ॥ शुभं भवतु ॥ ( सव्विसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १३२५७ ).

सव्विसावा अध्याय समाप्त.

पाठभेद :—* २८ वी ओवी येथील पोथींत नाहीं. ¶ प्रणव ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ अज्ञानरूप अंधकाराचा नाशक. २ जीवात्म्याकडे वळलेला. ३ इंद्रियसमूह. ४ आत्मस्वरूपानंद. ५ ज्याच्या तळास स्पर्श होत नाहीं तो, खोल.

कृष्णदयार्णवकृत

# ह रि व र दा

## अध्याय २७ वा

श्रीमद्गोविंदात्मने* नमः । कल्पनाकलुष[1]कलुषात्मकां† । आणूनि गोमतीशुद्धतटाका । नमो निर्मळ प्रक्षाळका । निष्कलंका गोविंदा ॥ १ ॥ वास्तव निजात्मक विस्मृति । ते बोलिजे आवरणशक्ति । प्रणवरूपें स्फुरणोत्पत्ति । विक्षेपशक्तिकल्पना ॥ २ ॥ जैसें‡ विशुद्ध निर्मळ भिंग । गगनगर्भासारिखें आंग । त्यासि मागें बैसतां रंग । पुढें सवेग प्रतिबिंबे ॥ ३ ॥ तेंवि अभेद-निजात्मविसरें । प्रपंचोन्मुख स्मरण पसरे । तो विक्षेप विश्वाकारें । प्रसवे विकारें बहु भेदां ॥ ४ ॥ तया भेदांचिये कुशी । सृष्टिपरंपरा जैशी तैसी । धाता यथापूर्व ऐसी । उत्तरोत्तर वेदोक्ति ॥ ५ ॥ पूर्वदिवशीं निद्रित¶ जाला । अपर दिवशीं तो चेइला । जेंवि तो विश्वाभास पहिला । करी गलबला मानूनी ॥ ६ ॥ जरी तो यथापूर्वचि असता । तरी काळ[2]व्यत्यय कैसेनि होता । बाल्य तारुण्य वृद्धता । क्षय पावता कैसेनी ॥ ७ ॥ कल्पना मात्र पहिली असे । येर क्षणभंगुर आभासे । नेणोनि अविद्याभ्रमें पिसे । जैसें तैसें भाविती ॥ ८ ॥ सुषुप्तिगर्भी देखिजे स्वप्न । करणसमुच्चया कल्पी मन । यथापूर्व कीं भिन्न भिन्न । कां नुमजून न विचारा ॥ ९ ॥ वर्षासारिखें गमे वर्ष । दिवसाऐसा वाटे दिवस । तोष रोष वृद्धि ह्रास[3] । हा विशेष कां नुमजे ॥ १० ॥ एवं मृगजलाचे डोहीं । गाधा[4]गाधा कोणे§ ठायीं । पारावार ना प्रवाहीं । ओघीं नाहीं मर्यादा ॥ ११ ॥ जितुका फेरा अधिक भंवे[5] । तितुकी भवंडी आंगीं रेवें[6] । तेणें चराचर आघवें । वाटे लाघवें भ्रमशील ॥ १२ ॥ तैसें अनादि अवसान । अनेककल्प कल्पनाभ्रमण । करितां भ्रमाक्त जीवचैतन्य । झालें मालिन तत्कलुषें ॥ १३ ॥ तिया कल्पनाकलुषात्मकां । देखूनि कारुण्यें देशिका । कळवळूनि सद्विवेका । प्रबोध

---

**पाठभेद :—** * मुंगीप्रतींत अध्यायाची सुरुवात पुढीलप्रमाणें केली आहे. श्रीगणेशाय नमः । श्रीमन्मंगलानि भवंतु । निर्विघ्नमस्तु ॥ † कलुषांतका ( मुंगीप्रत ). ‡ तैसेंचि ( मुंगीप्रत ). ¶ निद्रिस्त ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). § कवणे ( मुंगीप्रत ).

१ कल्पनारूपी पातकानें भ्रष्ट झालेले लोक. २ कालांत बदल. ३ अक्षय. ४ उथळ. ५ फिरे. ६ मुरे.

निका वोपिसी ॥ १४ ॥ विषयोन्मुख गोमतीतीर । मलिन मृदांशकर्दमाकार[1] । लंघूनि नेसी त्यां परपार । विशुद्ध उत्तरतीरातें ॥ १५ ॥ तेथ क्षाळूनि कल्पनामळ । प्रत्यगात्मत्वें[2] निर्मळ । दवडूनि वाच्यांशविटाळ । लक्ष्यांश[3] अमळ निवडिसी ॥ १६ ॥ यथापूर्व जैसी तैसी । पूर्वशुद्धता समरसीं । असिपदीं[5] ऐक्य करिसी । पुन्हा लेपा[6]सि न पवती ॥ १७ ॥ ऐसा अनादि मळक्षाळक । निर्विकारी निष्कलंक । तो तूं पूर्णत्वें देशिक । गोज्ञा[7]र्पक गोविंद ॥ १८ ॥ तुझा येस[8]णा कृतोपकार । उमजूं न शकती विधिहरशक्र । तेथ मानवी *कियन्मात्र । तव गुणस्तोत्र वदों शके ॥ १९ ॥ परंतु चंद्राच्या संमुखपणें । चंद्रकांताचें पाझरणें । तेंवि हें† स्तुतीचें बोलणें । तव प्रेरणे पासाव ॥ २० ॥ येऱ्हवीं गगना कायसी शिडी । सिंधुलंघना बाहुप्रौढी । काळ जिंकूनि पैलथडी । उभवी गुढी कैं कोण ॥ २१ ॥ यास्तव लाघवें गौरवें । तुझें रहस्य तुजचि ठावें । सप्रेमभजनें गौरवावें । येसणे हांवे वळगे जों ॥ २२ ॥ ऐसा जाणोनि अभिप्राव । दैविकी कृपादायपसाव[9]‡ । होतां प्रज्ञेचे अवयव । सर्व स्वयमेव टवटविले ॥ २३ ॥ आतां श्रीमद्भागवतीं । दशमस्कंधीं सविवसाव्यांतीं । पशुपीं नंदमुखें गर्गोक्ति । ऐकोनि श्रीपति जो स्तविला ॥ २४ ॥ त्या कृष्णाचा विजयप्रभव । देखूनि सुरसुरभि-वा[10]सव । येऊनि अभिषेचिती स्वयमेव । तो महोत्सव अवधारा ॥ २५ ॥

श्रीशुक उवाच — गोवर्धने धृते शैले आसाराद्रक्षिते व्रजे । गोलोकादाव्रजत्कृष्णं सुरभिः शक्र एव च ॥ १ ॥

शुक म्हणे गा कुरुपुंगवा । प्रथमभक्तीचिया गौरवा । जाणोनियां वासुदेवा । सप्रेम खेवीं[11] कवळिलें ॥ २६ ॥ हरिगुणपरमामृताचें पीक । सेवूं जाणसी तूंचि एक । नित्यनूतन अधिकाधिक । वक्तृत्वसुख मज तेणें ॥ २७ ॥ इंद्र आणि कामधेनु । येऊनि एकांतीं नमिती कृष्ण । त्यांची आगमनकारणें भिन्न । ऐकें श्रवणसौभाग्यें ॥ २८ ॥ कृष्णें धरूनि गोवर्धन । वारिलें स्वकृत दुर्मेघविघ्न । तेणें इंद्र लज्जायमान । भय पावोन पातला ॥ २९ ॥ कृष्णैश्वर्य अगाध । जाणोनि स्वकृत अपराध । क्षमापनीं होऊनि सिद्ध । आला विबुध चक्रप ॥ ३० ॥ आणि कोपल्याही निर्जरपति । कृष्णें रक्षिली निजसंतति । यास्तव कामदु[12]धा क्षिती । आली श्रीपतितोषार्थ ॥ ३१ ॥ एवं इंद्र स्वभयहरणा । सुरभि संतोषाभिवर्धना । कथिलें दोहींच्या आगमना । कुरुभूषणा पृथक्त्वें ॥ ३२ ॥ एकसमयीं दोन्ही आलीं । परंतु पृथक् स्तवितीं जालीं । दोंमाजि विज्ञापना पहिली । इंद्रें केली ते ऐका ॥ ३३ ॥

विविक्त उपसंगम्य व्रीडितः कृतहेलनः । पस्पर्श पादयोरेनं किरीटेनार्कवर्चसा ॥ २ ॥

**पाठभेद :—** * किमात्र ( उमरखेडप्रत ). क्रियन्मात्र ( मुंगीप्रत ). † ते वस्तु हे तिन्ने ( मुंगीप्रत ). ‡ पासाव ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ माती व चिखल यांनीं बुजून गेलेलें. २ जीवात्मस्वरूपज्ञानानें. ३ शब्दोच्चारानें जो अर्थ कळतो तो. ४ वास्तविक अर्थ गुप्त ठेवून अर्थांतर सांगणें. ५ तूं ब्रह्मस्वरूपच आहेस— असिपद. ६ मळ. ७ मनाचा प्रवर्तक. ८ असा. ९ कृपेचा लाभप्रसाद. १० इंद्र. ११ आलिंगनानें. १२ कामधेनु.

इंद्र एकांतीं येऊन । चुकवून प्राकृतजनांचे नयन । वंदिता झाला श्रीभगवान । लज्जायमान मानसें ॥ ३४ ॥ पात्रावरूनि उठविलें । तेंवि मख वर्जूनि अपमानिलें । स्वकृतशासन कांहीं न चले । विदर्प[1] केलें गिरिधरें ॥ ३५ ॥ उभय प्रकारें लज्जायमान । पावला होत्साता हेलन । भास्करभासुरमुकुटें[2] करून । वंदिले चरण कृष्णाचे ॥ ३६ ॥

दृष्टश्रुतानुभावोऽस्य कृष्णस्यामिततेजसः । नष्टत्रिलोकेशमद इंद्र आह कृतांजलिः ॥ ३ ॥

श्रुतिस्मृतिपुराणमाळा । कथितां महर्षींचा मेळा । कृष्णप्रताप विदित झाला । तो बोलिला श्रुतानुभव ॥ ३७ ॥ ब्रह्मादिप्रार्थनेपासून । यावद्गोवर्धनोद्धरण । अगाध हरिमहिमा देखोन । तो दृष्टमहिम्न[3] म्हणिजेत ॥ ३८ ॥ जैसा महिमा ऐकिला होता । तैसा जेणें प्रत्यक्षता । देखिला तो त्रिलोकीभर्ता । झाला स्तविता कृतांजलि ॥ ३९ ॥ श्रीकृष्णाचा ऊर्जितोदय । ऐकिला तैसाचि देखिला होय । जेणें तो हा अमरवर्य । वांछी अभय कृष्णाचें ॥ ४० ॥ त्रैलोक्याचें प्रभुत्वहर्ता । यज्ञ वारूनि अपमानिता । त्या कृष्णातें निर्जरभर्ता । झाला विनविता कृतांजलि ॥ ४१ ॥ ते श्लोकदशकें इंद्रस्तुति । ऐके शुकमुखें परीक्षिति । तिच्या श्रवणीं सावध श्रोतीं । अपत्योक्ति हे माझी ॥ ४२ ॥

इंद्र उवाच — विशुद्धसत्त्वं तव धाम शांतं तपोमयं ध्वस्तरजस्तमस्कम् ।
मायामयोऽयं गुणसंप्रवाहो न विद्यते तेऽग्रहणानुबंधः ॥ ४ ॥

प्रथम अपराधअंगीकरण[4] । परमकारुणिक श्रीभगवान । त्यासि शब्द न ठेवून । करी स्तवन चौं श्लोकीं ॥ ४३ ॥ निजौद्धत्य[5] तयावरी । एक्या श्लोकें निवेदन करी । तें क्षमावया सोढव्य[6] थोरी । वदे वैखरी श्लोकैकें ॥ ४४ ॥ त्यावरी दोश्लोकीं नमनोक्ति । स्तवी संबोधनीं श्रीपती । स्वापराधा[7]पहारार्थी* । करी विनंति †श्लोकैकें ॥ ४५ ॥ भगवदनुग्रहोपसंहरण । एका श्लोकें केलें कथन । एवं दहा श्लेकीं स्तवन । संक्रंदन जें वदला ॥ ४६ ॥ त्यामाजि हा प्रथम श्लोक । म्हणे अपराधी मी रंक । तूं परमात्मा उत्तम श्लोक । अपराधकलंक तुज नाहीं ॥ ४७ ॥ तूं सर्वांचा अंतरात्मा । नातळोनि भावा विषमा । कर्मानुरूप दंडिसी अधमा । हे तव गरिमा वास्तव ॥ ४८ ॥ दंड नव्हे हा अनुग्रह । मजवरी केला जी स्वयमेव । तुझे ठायीं भेदभाव । म्हणणें माव[8] अवघी हे§ ॥ ४९ ॥ कल्पनेचें अभ्र विरे । अव्याकृत अज्ञान मरे । त्यावरी विशुद्ध सत्त्व जें उरे । तें निर्धारें तव धाम[9] ॥ ५० ॥ ऐसिया विशुद्ध स्वरूपांत । न वसे भेदत्रयांची[10] मात । निमाले विजातिजातिस्वगत‡ ।

---

**पाठभेद :—** * स्वापराधोपसंहारार्थी ( मुंगीप्रत ). † चौश्लोकीं ( मुंगीप्रत ). § ही ओवी मुंगीप्रतींत ५३ ओवी नंतर आहे. ‡ विजातिस्वगत ( मुंगीप्रत ).

१ गर्वरहित. २ सूर्याप्रमाणें तेजस्वी मुकुटानें. ३ ज्यानें महिमा पाहिला तो. ४ अपराध कबूल करणें. ५ आपला उद्धटपणा. ६ सहन करण्याचें महत्त्व. ७ अपराध विनाकारण करूं इच्छिणारा. ८ खोटें. ९ स्थान. १० दोन पदार्थांतील भेद–विजातीय भेद; एकजातीय पदार्थांतील भेद सजाती भेद; एकाच पदार्थांतील अवयवांत जो भेद – स्वगतभेद.

म्हणोनि शांत बोलिजे ॥ ५१ ॥ जेंवि गगनाच्या अगाध डोहीं । ओघ तरंग लहरी नाहीं । तेथ प्रतिबिंब कैंचें काई । कोणे प्रवाहीं कांपेल ॥ ५२ ॥ ऐसें अखंडैकरस । शांत शाश्वत सावकाश । तपोमय स्वप्रकाश । निर्विशेष सर्वज्ञ ॥ ५३ ॥ सर्व नाहींच जयेठायीं । तेथ सर्वज्ञ म्हणणें काई । यालागिं रजस्तमांची‡ कांहीं । वार्ता तेही नुपलभे ॥ ५४ ॥ घटमठांचें आवरण । भंगोनि गेलिया नुसतें गगन । तेंवि रजतमविध्वंसन । प्रकाशमान तव धाम ॥ ५५ ॥ ऐसिया तव रूपाच्या ठाईं । शत्रु मित्र कैंचा काई । क्षोभकाक्षोभकतानवाई । कैंची कैंहीं अद्वैतीं ॥ ५६ ॥ तरी हें अवघेंचि आम्हांकडे । मायाभ्रमाचें गडद पडे । स्वयंभ अद्वैत असतां उघडें । भ्रमें नातुडे कल्पांतीं ॥ ५७ ॥ आवरणरूप पडली भ्रांति । विक्षेपरूपें विश्वस्फूर्ति । दृश्य प्रपंच आणिला व्यक्ति । गुणप्रवृत्ति-प्रवाहें ॥ ५८ ॥ तमें गडद पडलें मुळीं । विपरीतज्ञाना सत्त्व उजळी । तेणें विश्वाभिमान स्थूळीं । विषयकवळीं नाथिलें ॥ ५९ ॥ इष्टानिष्टमिश्रविषय¶ । हें त्रैगुण्यलोकत्रय । एवं भेदाचें प्राचुर्य । पदाभिमानें समविषम ॥ ६० ॥ आपण असे जिये पदीं । तेथील महत्त्वा संपादी । उच्चाभिलाषें आस्पदीं । नीच खेदीं अवंचत्वें ॥ ६१ ॥ ऐसा गुणांचा प्रवाह । तो हा संसार अनादि मोह । तुझ्या रूपीं *न त्यां रोहे[२] । हा निर्वाह निगमान्तीं ॥ ६२ ॥ ऐसा अज्ञानानुबंध । जेणें बांधिले विबुधबुध । तो तुज न बधी म्हणोनि विशुद्ध । रजतमध्वस्त तव धाम ॥ ६३ ॥ आम्ही अज्ञान-मोहग्रस्त । यास्तव वास्तवबोधा अस्त । पदाभिमानें अव्यवस्थ । जालों भ्रांत जगदीशा ॥ ६४ ॥ जाणत जाणत तुझा महिमा । करूनि विषादें अविवेकें[३]अमा । अवगणूनि तव पदपद्मा । व्रजीं दुरात्मा क्षोभलों ॥ ६५ ॥ जो तूं परमात्मा चिन्मात्र । त्या तुज मानूनि मानवीगात्र । निंद्य दुरुक्तीचें पात्र । केलें स्ववक्त्र म्यां दुष्टें ॥ ६६ ॥ विश्वोत्पत्ति अवन प्रळय । ज्या तव कटाक्षमात्रें होय । त्या तुजसहित व्रजाचा क्षय । करूं निर्दय प्रवर्तलों ॥ ६७ ॥ इत्यादि अनेक अपराधकोटी । कृपासमुद्रें घालिजे पोटीं । प्रथम श्लोकीं हे प्रार्थूनि गोठीं । पुन्हा वाक्पटी स्तवीतसे ॥ ६८ ॥

कुतो नु तद्धेतव ईश तत्कृता लोभादयो येऽबुधलिंगभावाः ।
तथाऽपि दंडं भगवान्बिभर्ति धर्मस्य गुप्त्यै खलनिग्रहाय ॥ ५ ॥

इंद्र म्हणे जी प्रणवप्रसवा[४] । विनति ऐकें वासुदेवा । अबुधचिह्नाचिया भावा । कैंचा रिगावा तुजमाजि ॥ ६९ ॥ मुळीं अज्ञानचि जरी नाहीं । तत्कार्य देहसंबंध तो काई । दोहीं वाचूनि तद्भाव पाहीं । कोण्हे ठायीं उमटती ॥ ७० ॥ कोण्या कारणास्तव हें म्हणसी । स्वामी ऐकें तरी येविशीं । अज्ञान कार्यकारणेंशीं । करी जयांसी निबद्ध ॥ ७१ ॥ मूळ अज्ञान तें कारण । तत्कार्य देहादि प्रपंच जाण । तदभिमानें आविष्करण । संबंध जाण या नांवें ॥ ७२ ॥ पुनःपुनः देहप्रभव । त्याचे हेतु लोभादि सर्व । तद्वर्जित तूं वासुदेव । परम तत्त्व परमात्मा ॥ ७३ ॥ तरी तूं म्हणसी ज्ञानियांपाशीं ।

पाठभेद :—‡ तमरजाची ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ¶ हृदय ( मुंगीप्रत ). * नित्या ( मुंगीप्रत ).

१ केव्हां. २ अंकुर. ३ अविचार हीच अंवस. ४ ब्रह्मरूप ज्यापासून उत्पन्न होतें तो.

स्थिति देखिजे लोभादिकांसी । तरी हें न घडे जी हृषीकेशी । मूर्खापाशीं ते वसती ॥ ७४ ॥ अबुध म्हणिजे ज्ञानेतर । आत्माविषयीं जे अचतुर । ज्यांसि प्रियतम हा संसार । दुःखागार सुख भासे ॥ ७५ ॥ तयांचिपाशीं हेतुत्रय । कामक्रोधलोभमय । अबुधलिंगसमुच्चय[1] । नांदती विषयरोचक ॥ ७६ ॥ हें नांदतां अभ्यंतरीं । स्वहितवार्ता कवण करी । मोक्षलक्ष्मीपासूनि दुरी । बळें संसारीं बुडविती ॥ ७७ ॥ क्रोध म्हणिजे अपूर्ण काम । कामु पुरतां उपजे प्रेम । लोभ ऐसें त्याचेंच नाम । अभिलाष अधम त्रिविध हा ॥ ७८ ॥ मुख्य एकचि अभिलाष । पूर्णापूर्ण रागद्वेष । होऊनि उपजविती आवेश । जन्म अशेष मग देती ॥ ७९ ॥ रजःसत्त्वांची जे प्रचुरता । स्वर्गकामना उपजवी चित्ता । ते संपादवी मखसुकृता । निष्कामता विसरवी ॥ ८० ॥ मग ते मीमांसक ज्ञानी । स्वर्गैश्वर्य संपादूनी । योग्य होती अधःपतनीं । अबुध म्हणोनि हे दशा ॥ ८१ ॥ रजस्तमांची जे प्रचुरता । दीर्घद्वेष उपजवी चित्ता । नेऊनि घाली अधःपाता । दुःखावर्तामाजिवडें ॥ ८२ ॥ स्वर्गीं नरकीं मृत्युलोकीं । एवं भ्रमिजे सकामुकीं । ऐसे अबुध जे अविवेकी । आत्मबोळखी अंतरती ॥ ८३ ॥ वेदत्रयीचे[3] पाठक । *विध्युक्त कृतविवेक । रागद्वेषसकामुक । ऐसे मूर्ख विचंबती[4] ॥ ८४ ॥ ऐसी वेदज्ञांची गति । †तेथ इतर प्राकृत अल्पमति । वृथा चातुर्य मिरविती । कामें ठकिजती सर्वत्र ॥ ८५ ॥ म्हणोनि अबुधलिंगभाव । लोभादि जे संकल्पप्रभव । ज्यांचे अंतरीं यांसि ठाव । त्यांचें वाव ज्ञातृत्व ॥ ८६ ॥ यालागीं रागद्वेषरहीत । निष्काम जे अभेदभक्त । तयांसि सुलभ तव एकांत । वृथा परमार्थ अबुधांचा ॥ ८७ ॥ जन्ममरणांचीं कारणें । तीं हीं कथिलीं अबुधचिन्हें । येथ शंका नारायणें । सहसा मनें न करावी ॥ ८८ ॥ मजमाजि नसता लोभासि ठाव । तरी कां भंगितों तुझा गर्व । तो येथींचा अभिप्राव । परिसें अपूर्व परेशा ॥ ८९ ॥ रागद्वेषादिअभिलाषशून्य । जऱ्ही तूं परेश श्रीभगवान । तथापि करिसी दंडधारण । साधुअवन खलदमना ॥ ९० ॥ म्हणसी मी जरी गोपसंतति । दंडधारणीं कैंची शक्ति । कोण दंड कवणाप्रति । माझ्या हातीं किमर्थ ॥ ९१ ॥ काय दंडासि कारण । म्यां दंडिले केव्हां कोण । ऐसें स्वामी सहसा न म्हण । तूं सर्वज्ञ कृपाळु ॥ ९२ ॥

पिता गुरुस्त्वं जगतामधीशो दुरत्ययः काल उपात्तदंडः ।
हिताय चेच्छातनुभिः समीहसे मानं विधुन्वञ्जगदीशमानिनाम् ॥ ६ ॥

लालनयोगें बहुत दोष । ताडनामाजि गुणविशेष । तदर्थ करितां हितोपदेश । स्वपुत्र शिष्य ताडावे ॥ ९३ ॥ तूं जगाचा वास्तव जनक । तरी दंड धरणें आवश्यक । प्रवृत्तिनिवृत्तिप्रबोधक । तूं देशिक[5] गोविंदा ॥ ९४ ॥ लोकत्रयात्मक तुझिया प्रजा । विश्वाधीश तूं गरुडध्वजा । अनुग्रहार्थ दंड तुझा । कल्याणबीजावर्धना ॥ ९५ ॥ एवं त्रिविध दंडकारणें । निरूपिलीं यथाज्ञानें । परी अलौकिकें तव शासनें । प्राकृतगुणें[6] नुपमती ॥ ९६ ॥ प्राकृत पिता क्षुब्धकाम । स्त्रीसंयोगें मैथुनाराम ।

**पाठभेदः—** * जे ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † तेथें ( मुंगीप्रत ).

१ अज्ञानाच्या चिन्हांचा समूह. २ अधिकपणा. ३ ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद. ४ दुःख पावती. ५ प्रपंच किंवा परमार्थ यांचा उपदेष्टा. ६ क्षुल्लक मनुष्याच्या गुणांशीं.

तत्प्रसंगें प्रजाजन्म । परी तें वर्म तो नेणे ॥ ९७ ॥ जननीजनकें अभीष्ट रमती । दैवयोगें प्रजोत्पत्ति । तेही तुझीच अगाध शक्ति । प्रजासंभूतिकारक ॥ ९८ ॥ अतर्क्य करिसी गर्भोद्भव । गर्भी निर्मूनि अवयव । अक्षत रक्षूनि मास नव । करिसी प्रसव कृपेनें ॥ ९९ ॥ पिता वेगळा भोगूनि रति । नेणे गर्भाची संभूति । तेथ तो रक्षील काय माती । चिंती श्रीपति सर्वार्थ ॥ १०० ॥ तुझेनि प्रजाचें जननावन । अचिंत्यैश्वर्य तूं भगवान । प्राकृतजन कें तुजसमान । कोण सज्ञान मानील ॥ १ ॥ प्राकृत गुरु विद्योपदेष्टे । बोधिती तदुचित कर्मनिष्ठे । फलप्रलोभें इष्टानिष्टें । दुःखें दुर्घटें वोपिती ॥ २ ॥ तुझा अनुग्रह ज्यांवरी घडे । पूर्ण विवेक त्यां उजेडे । तव पदभजनीं प्रेम वाढे । प्रपंचाकडे वैरस्य ॥ ३ ॥ अंतर्यामीं तूं उपदेष्टा । तैं उपलभे स्वरूपनिष्ठा । सहजचि वोहट पडे कष्टां । होय प्रतिष्ठा चित्सुखीं ॥ ४ ॥ जे काळीं जें जें होणें । तें तें तुझेनि अनुशासनें । प्राकृत भूपति आधि[1]शरणें* । तुझिये तुलने केंवि तुळती ॥ १०५ ॥ तूं काळात्मा अप्रमेय । तुझें शासन दुरत्यय[2] । कोणा लंघिलें नव जाय । तुझेनि होय यम यमिता[3] ॥ ६ ॥ तुझी अतर्क्य दंडधारणा । प्रकटी लीला-चरित्रगुणां । समीहँसे[4] म्हणिजे करुणा । चेष्टसी नाना अवतारें ॥ ७ ॥ तये अवतारलीले आंत । संहारिसी दैत्य दुष्कृत । धर्म स्थापूनि साधु स्वस्थ । रक्षूनि स्मयहत[5] सुर करिसी ॥ ८ ॥ आम्ही त्रिजगाचे नियंते । †वाहता पृथक्त्वें अहंते । तो मद भंगूनि निजांकितें । करूनि ‡सनाथें अनुग्रहिसी ॥ ९ ॥ लेंकुरें अज्ञानें आडरानीं । भरतां देखूनि कृपाळु जननी । दंडूनि सन्मार्गावरी आणी । आम्हांलागूनि तूं तैसा ॥ ११० ॥ दंड नव्हे हा अनुग्रह । बिभीषा[6] दावूनि प्रकटिसी स्नेह । तो तूं सच्चित्सुखविग्रह । करिसी निर्मोह दंडमिसें ॥ ११ ॥ हें कैसें गा म्हणसी तरी । यदर्थीं ऐकावें श्रीहरि । दंडें भंगूनि गर्वलहरि । सुखसागरीं नांदविसी ॥ १२ ॥

ये मद्विधाज्ञा जगदीशमानिनस्त्वां वीक्ष्य कालेऽभयमाशु तन्मदम् ।
हित्वाऽऽर्यमार्गं प्रभजंत्यपस्मया ईहाखलानामपि तेऽनुशासनम् ॥ ७ ॥

जे कां माद्दृश विधि हर सुर । स्वपदाभिमानें अज्ञानप्रचुर । तवैश्वर्य अगाधतर । देखोनि सत्वर नम्र[7] होती ॥ १३ ॥ कुंडामाजील दर्दुर । वरुणा होऊनि म्हणवी थोर । तेणें देखिलिया सागर । गर्व समग्र मग सांडी ॥ १४ ॥ कीं उदुंबरगर्भींचे जंतु । उदुंबरगर्भींच शक्तिमन्तु । गरुडाहूनि ब्रह्मांडांत । आपण विख्यात मानिती ॥ ११५ ॥ ते हे आम्ही स्वपदाभिमानी । जगदीश म्हणवूं आपले स्थानीं । तुझा देखोनि ऐश्वर्यतरणि । खद्योत होऊनि हारपों ॥ १६ ॥ सर्वांसही प्रळयकाळ । भयें कांपवी ग्रसनशीळ । त्यासी न गणूनि निर्भय प्रबळ । देखती केवळ तुज जेव्हां ॥ १७ ॥ मग सांडूनि अनार्यमार्ग । जो कां पृथक अहंतासंग । करूनि मदगर्वाचा भंग । भजती सवेग

**पाठभेद :**—* पणें ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † वाहती पृथगत्वें ( उमरखेडप्रत ); वाहता पृथक्त्वें ( मुंगीप्रत ). ‡ अनाथें ( मुंगीप्रत ).

१ मानसिक व्यथेनें घेरलेला. २ अनुलंध्य. ३ अधिकार चालविणारा. ४ कृपेनें कृत्यें करितोस. ५ गर्वहत. ६ दटावणी. ७ नम्र.

आर्यपथा ॥ १८ ॥ तो आर्यपथ म्हणसी कोण । जें कां अभेद तव पदभजन । अखिलमंगल निर्भय पूर्ण । जाणोनि मुनिजन आश्रयिती ॥ १९ ॥ मायाचक्रें काळें[1]कलनीं । माजी भ्रमती जीवश्रेणी । तेथें अजस्र तव पदभजनीं । निवटोनि मुनि भ्रमरहितें[2] ॥ १२० ॥ तयां संतत भजननिरतां- । साठीं अवतरसी भगवंता । लीलाचरणें भजनपथा । स्वधर्मसंस्था वाढविसी ॥ २१ ॥ धर्म *स्थापूनि दंडिसी दुष्टा । वोपिसी †साधूंतें अभीष्टा । स्वभक्तांच्या छेदूनि कष्टां । करिसी प्रतिष्ठा निजधामीं‡ ॥ २२ ॥ जे मादृश जगदीश मानी । पदाभिमानात्मक अज्ञानी । ऐसी तव लीला देखूनि । होती लाजोनि गतगर्व ॥ २३ ॥ मग ते अगर्व विगतमान । सबाह्य अभेद अनन्यशरण । सवेग आश्रयिती श्रीचरण । सप्रेमभजनसंस्कारें ॥ २४ ॥ ऐसी तुझी सहज लीला । न दंडूनि §दंडी कुटिला । झाडूनि दुर्मद वेगळा । भजनचित्कला प्रकाशी ॥ १२५ ॥ प्रळयकाळाहूनि कठिण । व्रजभंगार्थ म्यां केलें विघ्न । तुवां उचलूनि गोवर्धन । केलें भंजन विघ्नाचें ॥ २६ ॥ ‖प्रयीयमेघ संवर्तक । सहित मरुद्गणांचें कटक । माजि ↑दंभोलि[3] भयानक । दिनसप्तक वर्षतां ॥ २७ ॥ तुवां गोवर्धनातळवटीं । व्रज रक्षिला कृपादृष्टी । हें देखोनि आमुच्या पोटीं । शंका उफराटी उपजली ॥ २८ ॥ जाणोनि नेणोनि तव महिमान । म्यां दुर्जनें केलें विघ्न । तो अपराध क्षमापन । कीजे संपूर्ण प्रभुत्वें ॥ २९ ॥ या ¶श्लोकीं भगवंतासी । अपराध न लवोनि परिहारेशीं । आपली अर्हता[4] दंडासी । अंगीकारेंशीं स्तवियेलें ॥ १३० ॥ तथापि मी दंडार्ह जरी । क्षमासंपन्न तूं श्रीहरि । प्रभुत्वें अपराधक्षमा करीं । हें यावरी प्रार्थितसे ॥ ३१ ॥

स त्वं ममैश्वर्यमदप्लुतस्य कृतागसस्तेऽविदुषः प्रभावम् ।
क्षंतुं प्रभोऽथार्हसि मूढचेतसो मैवं पुनर्भून्मतिरीश मेऽसती ॥ ८ ॥

अल्प कुल्या[5] उचंबळती । क्षोभें सागरावरी लोटती । प्रभुत्वें तो अगाधस्थिति । अक्षोभवृत्ति गांभीर्यें ॥ ३२ ॥ तेंवि ऐश्वर्यमदें घूर्णितें[6] । विबुधपति तो मी अबुधवत्[7] । गर्वा चढोनि जें दुश्चरित । हें साहणें उचित प्रभुत्वें ॥ ३३ ॥ गर्वा चढोनि जें म्यां केलें । मूर्खाचरणामाजि तें पडलें । प्रभुत्वें पाहिजे क्षमा केलें । स्वजनवात्सल्यें प्रभुवर्यें ॥ ३४ ॥ चित्तासि मौढ्याचें[8] आवरण । नेणेचि विवेकविवरण । त्याचे विरुद्ध कर्माचरण । प्रभुत्वें संपूर्ण साहिजे ॥ १३५ ॥ सोढव्यशक्ति तुज- पासूनी । लाहोनि क्षमासंपन्न धरणि । त्या तुज अपराधक्षमापनीं । न लगे विनवणी गोविंदा ॥ ३६ ॥ परंतु एक विज्ञापना । सेवेसि कीजतसे सर्वज्ञा । ते देइजे अंकितगणा । मज अल्पज्ञा लागुनी ॥ ३७ ॥ अंतर्यामीं तूं प्रेरक । प्रेरिसी संकल्पमति विवेक । तरी हा असन्मतिकळंक । मज निष्टंक नुपजो कीं ॥ ३८ ॥ म्हणसी तूंचि सावध राहें । सर्वदा विचार विवरूनि पाहें । तरी मी कवळिलों

**पाठभेद** —* सं ( मुंगीप्रत ). † साधुत्वें ( मुंगीप्रत ). ‡ धर्मा ( मुंगीप्रत ). § दंडिशी ( मुंगीप्रत ). ‖ प्रलय ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ↑ दंभोळिया ( मुंगीप्रत ). ¶ चौश्लोकीं ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ कालव्यापार. २ भ्रमादिक नाहींसें करून. ३ वीज. ४ योग्यता. ५ पाण्याचा पाट. ६ भ्रमलेला. ७ मूर्खासारखा. ८ मूर्खपणाचें.

महामोहें । शक्ति न लाहें विवरणीं ॥ ३९ ॥ कनकबीज कां महामद्य । जैं सेवी सर्वज्ञ शास्त्रकोविद । तोही होऊनि बुद्धिमंद । यथेष्ट विरुद्ध आचरे ॥ १४० ॥ तैसें आसव[1] वासव[2]पद । मी सेवूनि झालों मंद । आत्मविचारीं केवळ अंध । कुमति[3]कोविद सगर्व ॥ ४१ ॥ सुरपूज्य मी विबुधपति । असदाचरणें अबुधमति । तेणें भोगीं भवविपत्ति । आतां श्रीपति हें न घडो ॥ ४२ ॥ अहल्येचा सकाम लोभ । धरूनि गौतमा आणिला क्षोभ । तेणें यातना झाल्या सुलभ । पुन्हा दुर्लभ शक्रत्व ॥ ४३ ॥ शिवगणांवरी क्रोध केला । तेणें *जलंधर निर्माण झाला । ते विपत्ति त्रैलोक्याला । भोगितां झाला प्रळयांत ॥ ४४ ॥ ऐशा कामक्रोधांच्या पीडा । उपजोनि विवेक करिती कुडा । मति पालटे त्याचिया भिडा । धरी रोकडा असत्पथ ॥ १४५ ॥ तये असन्मतीच्या गुणें । चिरकाळ जाजावलों[4]ही शीणें । †सर्वेचि विसरोनि मागील उणें । पुन्हा दुर्गुणें भांबावें ॥ ४६ ॥ विपत्ति भोगिली रावणाघरीं । बळीनें केलें पैं भिकारी । तारकासुरें दारोदारीं । गिरिकंदरीं फिरविलें ॥ ४७ ॥ ऐसें असन्मतीच्या गुणें । पुनः पुनः भोगीं उणें । †परंतु न राहें सावधपणें । कामादिदुर्गुणें कवळिलिया ॥ ४८ ॥ दैवें प्रभूशीं झाली भेटी । म्हणोनि आजि हे कथिली गोठी । सोडूनि हृदयांतील गांठी । दाविला दृष्टी हृद्रोग[5] ॥ ४९ ॥ सर्ववेत्ता तूं गोविंद । अंतरात्मा आनंदकंद । जाणोनि अकृत्रिम अनुवाद । प्रसीद[6] प्रसीद परेशा ॥ १५० ॥ पुन्हा असन्मति नुपजो मज । इतुकें प्रार्थनेमाजि गुज । प्रभूसि निवेदन केलें सहज । यावरी पदरज वांछीतसें ॥ ५१ ॥ महा अपराध अनयगुणें । केला तो कां क्षमा करणें । स्वामी सहसा ऐसें न म्हणें । मत्प्रार्थने परियेसीं ॥ ५२ ॥

तवावतारोऽयमधोक्षजेह स्वयंभराणामुरुभारजन्मनाम् ।
चमूपतीनामभवाय देव भवाय युष्मच्चरणानुवर्तिनाम् ॥ ९ ॥

पूर्वींहूनि प्रतिपाळिलें । कृपाधिकारीं नियोगिलें । तेणें अनार्य[7] प्रमादें[8] केलें । परी तें साहिलें पाहिजे ॥ ५३ ॥ घेऊनि अमरांचा कैवार । युगीं युगीं कृतावतार । धर्म स्थापूनि मारिसी असुर । निजकिंकर रक्षूनी ॥ ५४ ॥ हाही अवतार अधोक्षजा । येथ आमुच्या कल्याणकाजा । तोही वरदानुग्रह तुझा । बरवे वोजा मी जाणें ॥ १५५ ॥ ज्यांच्या भारें दाटली धरणि । ते दुरात्मे दुष्टाचरणी । प्रजापीडक ज्यांची करणी । त्यांच्या श्रेणी असंख्य ॥ ५६ ॥ आपण पृथ्वीसि भाररूप । होऊनि करिती अपार पाप । पुढें बोधूनि पापसंकल्प । भार अमूप प्रसवती ॥ ५७ ॥ वनीं पेटूनि एक काडी । पावका चेतवी निजांगवाढी । पुढें पुढें सहस्र कोडी । पेटवी परवडी[9] तृणशाखा ॥ ५८ ॥ तेणें प्रचंड दावानळ । माजे वनौकसांसि काळ । तैसे भूभार §भूपाळ । दुष्कृतकुळ

**पाठभेदः—** * जालंधर ( मुंगीप्रत ). † मुंगीप्रतींत ४६ व्या ओवींतील शेवटचे दोन चरण व ४८ व्या ओवींतील शेवटचे दोन चरण यांची अदलाबदल आहे. § रूप ( मुंगीप्रत ).

१ मद्य. २ इंद्रपद. ३ दुष्टशिरोमणि. ४ दुःख पावलों. ५ हृदयांतील दुःख. ६ प्रसन्न हो. ७ दुष्कृत्य. ८ चुकीनें ९ पुनः पुनः.

वाढविती ॥ ५९ ॥ त्यांच्या भारें दाटली धरणि । त्रास पावोनि दुष्टाचरणीं । ब्रह्म्यापाशीं त्यांची करणी । तिनें येऊनि निवेदिली ॥ १६० ॥ तेव्हां विधिहरसुरवर आम्हीं । येऊनि तुजला स्तविलें स्वामी । §तंव गौरविलें वरदनियमीं । तें हृत्पद्मीं मज स्मरतें ॥ ६१ ॥ तुझा येथ हा जो अवतार । उतरावया धरित्रीभार । मारावया दुष्ट दुष्कर । स्वपदानुचर रक्षावया ॥ ६२ ॥ तव चरणानुवर्ती गणा । माजील सर्वांहूनि मी उणा । प्रमादें आचरलों दौर्जन्या । तऱ्ही *स्वचरणा नुपेक्षीं[1] ॥ ६३ ॥ जऱ्ही अपत्यें दिधला त्रास । तथापि जनकें नेच्छिती नाश । मज जाणोनि निज औरस । अपराधास क्षमावें ॥ ६४ ॥ ऐसें विनवूनि बहुतांपरी । विनीत होऊनि नमस्कारी । ते हे नमनात्मक वैखरी । पौरंदरी[2] शुक वर्णी ॥ १६५ ॥

नमस्तुभ्यं भगवते पुरुषाय महात्मने । वासुदेवाय कृष्णाय सात्वतां पतये नमः ॥ १० ॥

अचिंत्यैश्वर्यसंपन्ना । नमो अनंतगुणपरिपूर्णा । तुजकारणें नमो कृष्णा । स्वभक्तकरुणा स्नेहाळा ॥ ६६ ॥ सर्वांतर्यामीं तूं पुरुष । अखिल कर्मांचा स्वयंभ साक्ष । माझे न गणावे गुणदोष । मी कृतागैस[3] वंदितसें ॥ ६७ ॥ म्हणसी पुरुष मी जीवात्मा । तरी हें न म्हणें पुरुषोत्तमा । सर्वव्यापी तूं महात्मा । इंद्रियग्रामा अगोचर[5] ॥ ६८ ॥ सर्वनिवासी वासुदेव । चराचरासि तुजमाजि ठाव । सर्व तुझेचि भावाभाव । नमो स्वयमेव स्वस्वरूपा ॥ ६९ ॥ सूर्यासंमुख करितां दृष्टि । सूर्य बिंबें दृष्टीपोटीं । तैसी तुजमाजि सकळ सृष्टि । सृष्टिपोटीं तूं अवघा ॥ १७० ॥ सात्वतपति[4] †भक्तपति । सुरनरपति यादवपति । प्रणतपाळक गोकुळपति । नमो गोपति गोऽगम्या ॥ ७१ ॥ यादवपति मी यादवां । समान ऐसें न मनीं देवा । जाणोनि भक्तांच्या सद्भावा । आविर्भावा तूं करिसी ॥ ७२ ॥

स्वच्छंदोपात्तदेहाय विशुद्धज्ञानमूर्तये । सर्वस्मै सर्वबीजाय सर्वभूतात्मने नमः ॥ ११ ॥

स्वकीयस्वजनच्छंदानुसार । देह धरिसी वारंवार । तेही विशुद्धज्ञानप्रचुर । नोहे सविकार-भूतमय ॥ ७३ ॥ नमो विशुद्धज्ञानमूर्ति । नमो विश्वकल्याणकीर्ति । नमो परतर परंज्योति । विश्वैसंवित्ति[6] तुज नमो ॥ ७४ ॥ मायेकरूनि सर्वरूपी । वास्तव अरूप विश्वव्यापी । अनादि-स्मरणाचा‡ संकल्पी । बीजजल्पीश्रुति गाती ॥ १७५ ॥ बीजशब्दें आदिकारण । सत्यसंकल्प मुख्य स्फुरण । त्या तुजकारणें माझें नमन । अनार्य पूर्ण क्षमावया ॥ ७६ ॥ सर्वभूतें तुझ्या ठायीं । होती जाती वर्तती पाहीं । तूं भूतात्मा तुजवीण कांहीं । वेगळें नाहीं उँर्वरित[7] ॥ ७७ ॥ तन्मात्रकें[8] कर्म करणें । ज्ञान चेष्टा कर्तृकरणें । जें अनार्य ¶एकदाचरणें । तें तुजविण भिन्न नसे ॥ ७८ ॥ एवं

पाठभेद :—§ तैं ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). * स्वशरणा ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † स्वभक्त ( मुंगीप्रत ). ‡ स्फुरणाच्या ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ¶ तदा ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ उपेक्षा करूं नका. २ इंद्राची. ३ ज्यानें अपराध केला आहे तो. ४ उपासकांचा स्वामी. ५ इंद्रियांस अगोचर. ६ सर्वज्ञ. ७ उरलेलें. ८ पंचज्ञानेंद्रियांचे सूक्ष्मांश.

**अभेद सर्वात्मका । तुज नमो जी विश्वव्यापका । आतां माझी अपराधशंका । जगन्नायका जाणोनी ॥ ७९ ॥**

मयेदं भगवन् गोष्ठनाशायासारवायुभिः । चेष्टितं विहते यज्ञे मानिना तीव्रमन्युना ॥ १२ ॥

**कृतापराध मी निश्चयात्मक । किमर्थ कैसा तें तूं ऐक । माझा वर्जिला विहित मख । प्रतिवार्षिक अनुष्ठिला ॥ १८० ॥ तेणें तीव्र चढला क्रोध । मानभंगें झालों अंध । मग म्यां अनुष्ठिलें विरुद्ध । तेंही प्रसिद्ध बोलतों ॥ ८१ ॥ षड्गुणैश्वर्यसंपन्ना । तुज न गणूनि जनार्दना । व्रजनाशार्थ प्रेरिलें घना । विद्युत्पतना अनिलेंशीं ॥ ८२ ॥ मानभंगें क्षुब्धचित्त । होऊनि मी जें दुश्चेष्टित । आचरलों तें इत्थंभूत । तुज समस्त निवेदिलें ॥ ८३ ॥ तथापि प्रभुत्वें अनुग्रह । मजवरी केला परमस्नेह । जेणें ध्वस्तमहामोह[1] । सप्रेमरोह[2] श्रीचरणीं ॥ ८४ ॥**

त्वयेशानुगृहीतोऽस्मि ध्वस्तस्तंभो हतोद्यमः । ईश्वरं गुरुमात्मानं त्वामहं शरणं गतः ॥ १३ ॥

**तुवां ईश्वरें अनुग्रहिलों । गर्वापासूनि ध्वस्त केलों । प्रभुत्वप्रतापें सांडवलों । मग उमजलों तव महिमा ॥ १८५ ॥ तूं न करितासि मानभंग । असता प्रताप जैं अभंग । तैं मग तव चरणीं अनुराग । कैसेनि सांग उपजता ॥ ८६ ॥ यालागिं स्वामी गरुडध्वजा । दंड नव्हे हा अनुग्रह तुझा । मजवरी करूनि बरवे वोजा । सहजी सहजा उमजविलों ॥ ८७ ॥ विश्वनियंता तूं ईश्वर । जगदात्मा तूं जगद्गुरु । शरणागत मी तव किंकर* । वारंवार वंदीतसें ॥ ८८ ॥ ऐसा इंद्रें विनयोत्तरीं । स्तविला जगदात्मा श्रीहरि । काय वदली शुकवैखरी । ते यावरी परियेसा ॥ ८९ ॥**

शुक उवाच — एवं संकीर्तितः कृष्णो मघोना भगवानमुम् । मेघगंभीरया वाचा प्रहसन्निदमब्रवीत् ॥ १४ ॥

**ऐसा इंद्रें चक्रपाणि । संप्रार्थिला करुणावचनीं । तो इंद्रातें हास्यवदनीं । मेघस्वनीं[3] बोलतसे ॥ १९० ॥**

श्रीभगवान् उवाच — मया तेऽकारि मघवन् मखभंगोऽनुगृह्णता । मदनुस्मृतये नित्यं मत्तस्येंद्रश्रिया भृशम् ॥ १५ ॥

**इंद्रश्रियेच्या मदेंकरून । तुज चढला जो पदाभिमान । त्याचें करावया निरसन । मखरोधन म्यां केलें ॥ ९१ ॥ अखंडैकमदनुस्मृति । जागवावया तुझ्या चित्तीं । मख रोधोनि गर्वोपहति । म्यां निश्चिती योजिली ॥ ९२ ॥ दंडरूपें अनुग्रहीता । त्या मज नोळखती तत्त्वता । त्यांची समस्त मदगर्वता । मी संहर्ता प्रतापें ॥ ९३ ॥**

---

**पाठभेद** — * किंकरु ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ ज्याचे अज्ञान नष्ट झाले तो. २ प्रेमांकुर. ३ मेघाप्रमाणें गंभीर शब्दानें.

मामैश्वर्यश्रीमदांधो दंडपाणिं न पश्यति । तं भ्रंशयामि संपद्भ्यो यस्य चेच्छाम्यनुग्रहम् ॥ १६ ॥

ऐश्वर्यश्रीमदें जो अंध । न मनी स्वैराचरण विशुद्ध । न पाहेचि विधिनिषेध । केवळ बद्ध देहात्मा ॥ ९४ ॥ देहअहंतेचिया भुली । विवेकसन्मति हारपली । विषयाचरणीं सरळी दिधली । नाहीं सूचली भयशंका ॥ १९५ ॥ ब्रह्मादिकांचिये मूर्ध्नि । मी नियंता दंडपाणि । श्रुतिस्मृतीच्या पाहोनि नयनीं । यथाशासनीं दंडिता ॥ ९६ ॥ अणूपासूनि सूक्ष्मतरें । शरीरें वोपीं कर्मानुसारें । ईश्वरपर्यंत लहानें थोरें । नीतिनिर्धारदंडिता ॥ ९७ ॥ माझ्या *दंडभयानें गगन । सच्छिद्र असोनि न गिळी पवन । अफाट वायु तो उदान प्राण । व्यान समान मित वाहे ॥ ९८ ॥ जितुका मारुत जिये ठायीं । विभागें नियमूनि स्थापिला देहीं । माझ्या दंडाभेणें कांहीं । अन्यप्रवाहीं तो न वचे ॥ ९९ ॥ सूर्य वाहे मितल्या[1] तापा । अग्नि शोखी परिमित आपा । आप विषामृतादिरूपा । मत्संकल्पा जग जोपी ॥ २०० ॥ मच्छासनें विश्वंभरा[2] । होऊनि भौतिकां[3] प्रसवे धरा । सृजनावन-प्रलयांतरा[4] । सचराचरा यमनियमीं ॥ १ ॥ जन्मस्थितिप्रळयकाळ । वर्ते ममाज्ञानियमशील । काळाचाही महाकाळ । मी गोपाळ गोगोप्ता ॥ २ ॥ तो मी लक्षूनि दंडपाणि । सुरवर तत्पर विधिपालनीं । जो मदांध विषयाचरणीं । न पाहे न गणी दंडभय ॥ ३ ॥ मग मी त्यावरी दंडधारी । क्षोभोनि कृपेनें अनुग्रह करीं । त्याची संपत्ति अवघी हरीं । वोपीं शरीरीं अनुस्मृति ॥ ४ ॥ ज्यासि अनुग्रह करूं इच्छीं । त्यासि न गोवीं विषयीं तुच्छीं । मद भंगूनि भजनीं स्वच्छीं । योजीं अनिच्छीं सत्संगीं ॥ २०५ ॥ श्रीमदांधा मदनुग्रह । हाचि दुर्लभतर पुण्याह । येरां कवळी महामोह । तेणें दुर्देह बहु धरिती ॥ ६ ॥ परम धन्य तूं संक्रंदन । पावतां मखभंगें अपमान । सत्त्वर सांडूनि पदाभिमान । मदंघ्रिभजन आदरिलें ॥ ७ ॥ दोन †मुहूर्त[5] वृक्षातळीं । पांथ राहतां मध्याह्नकाळीं । दुजा राहूं येतां जवळी । माजवी कळी प्राणान्त ॥ ८ ॥ होता स्वराज्यपदाभिमान । तुझा उतरला मत्कृपेंकरून । विनीत[6] होऊनि केलें स्तवन । झालों प्रसन्न मी तेणें ॥ ९ ॥

गम्यतां शक्र भद्रं वः क्रियतां मेऽनुशासनम् । स्थीयतां स्वाधिकारेषु युक्तैर्वः स्तंभवर्जितैः ॥ १७ ॥

आतां तुम्हांसि कल्याण असो । आपुलाली पदवी विलसो । पुन्हां विपत्तिसंशय नसो । भ्रांति न वसो पुढती हे ॥ २१० ॥ एका इंद्रा आज्ञा देणें । कृष्ण वदला कां बहुवचनें । ऐसा संशय श्रोतीं मनें । न लगे करणें ये ठायीं ॥ ११ ॥ कोणी एक अपराध करी । तया अनयाच्या परिहारीं । बहुतीं अनय घेऊनि पदरीं । चरणावरी घालिजे ॥ १२ ॥ तैसे वरुणादि दिग्पति । समस्तीं येऊनि कृष्णाप्रति । इंद्रापराधनिवृत्ति । मौनस्थिति वांछिली ॥ १३ ॥ त्यामाजि इंद्रें होऊनि शरण । अपराधाचें क्षमापन । करावया केलें स्तवन । शुकें संपूर्ण तें कथिलें ॥ १४ ॥

**पाठभेद** — * दंडाभेणें ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † मुहूर्तें ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ नियमित. २ पृथ्वी. ३ पंचभूतात्मक प्राणी. ४ उत्पत्ति-स्थिति प्रलय ह्या भेदानें. ५ चार घटका. ६ नम्र.

ऐशाच समस्तांचिया स्तुति । कथितां विस्तार होईल ग्रंथीं । मुमूर्षु[1] जाणोनि परीक्षिति । शुक संकेतीं बोलिला ॥ २१५ ॥ एकवाक्यें संबोधन । बहुवचनोक्ती आज्ञापन । हें मुनीचें चातुर्य पूर्ण । शास्त्रप्रवीण जाणती ॥ १६ ॥ अरे इंद्रा तुम्हीं समस्तीं । जावें म्हणतां तिहीं विनति । विनीती केली कृष्णाप्रति । ते हे श्रोतीं परिसिजे ॥ १७ ॥ येथूनि कोठें जावें स्वामी । जरी तूं म्हणसी स्वर्गधामीं । तेथ ऐसेचि क्रोधादिकामी । पुढती आम्ही जाजावों ॥ १८ ॥ हें ऐकोनि म्हणे हरी । मम शासना[2] वंदूनि शिरीं । तुम्ही वर्ततां निजाधिकारीं । पुन्हा षड्वैरि[3] न बाधिती* ॥ १९ ॥ मदनुशासनीं होऊनि युक्त । पृथगैश्वर्यें न होइजे मत्त । गर्वाहंकारवर्जित । स्मृति संतत राखावी ॥ २२० ॥ युक्त होऊनि इहीं लक्षणीं । सावध स्वपदसंरक्षणीं । पदीं वर्ततां अर्धक्षणीं । तुम्हां लागूनि न विसंबें ॥ २१ ॥

शुक उवाच — अथाऽऽह सुरभिः कृष्णमभिवंद्य मनस्विनी । स्वसंतानैरुपामंत्र्य गोपरूपिणमीश्वरम् ॥ १८ ॥

एवं अपराध करूनि क्षमा । इंद्रा धाडिलें अमरधामा । पुढें सुरभि कुरुसत्तमा । पुरुषोत्तमा स्तवीतसे ॥ २२ ॥ कृष्णें इंद्र आज्ञापिला । परी तो स्वधामा नाहीं गेला । कृष्णा अभिषेक पाहिजे केला । म्हणोनि राहिला तिष्ठत ॥ २३ ॥ इंद्रस्तुति संपल्यावरी । सुरभि कृष्णातें नमस्कारी । सहितस्वसंतानपरिवारीं । कृष्णा आमंत्री संबोधनीं ॥ २४ ॥ मनोऽनुकूला मनस्विनी[4] । स्तविती झाली †मधुरवचनीं । जो कां ईश्वर पूर्णपणीं । चक्रपाणि गोपरूपी ॥ २२५ ॥ तें सुरभिमुखींचें स्तवन । नृपा कथी व्यासनंदन । श्रोतीं होऊनि सावधान । कीजे श्रवण सद्भावें ॥ २६ ॥

सुरभिरुवाच — कृष्ण कृष्ण महायोगिन् विश्वात्मन् विश्वसंभव । भवता लोकनाथेन सनाथा वयमच्युत ॥ १९ ॥

प्रस्तुतें[5] स्मरोनि कृतोपकार । पुढें लक्षूनि भय दुस्तर । तेथ तुझाचि परमाधार । सूचनापर संबोधी ॥ २७ ॥ सुरभि म्हणे अगा श्रीकृष्णा । आमुच्या नुबगसी संरक्षणा । तुझ्या जाणोनि नाथपणा । न धरूं गणना भयाची ॥ २८ ॥ कृतयुगीं तूं शुक्लवर्ण । होऊनि नर[6]नारायण । कुढाविलें[7] तपोवन । कामादिविघ्न शमवूनी ॥ २९ ॥ निर्विघ्न तपाचा प्रताप । ब्रह्मांड करूनि निष्पाप । चराचर आनंदरूप । जिंकूनि कंदर्प नादविलें ॥ २३० ॥ धर्म संस्थापूनि पूर्ण । शांत दांत निरभिमान । तपश्चर्या विस्तारून । केलें पालन त्रिजगाचें ॥ ३१ ॥ त्रेतायुगीं त्रिपाद धर्म । त्रितीयभागें मलिन कर्म । रक्तवर्ण परशुराम । होऊनि संग्राम स्वीकेला ॥ ३२ ॥ ब्रह्मचर्य वेदाध्ययन । तपश्चर्यापरायण । परंतु धर्मार्थ असहिष्ण । महानिर्घृण समरंगीं ॥ ३३ ॥ इषुधिकार्मुकपरशुपाणि । होऊनि मारिल्या क्षत्रियश्रेणी । त्यांच्या रक्ताचे तर्पणीं । आब्रह्मभुवनीं सुख केलें ॥ ३४ ॥ तो तूं द्वापरीं पीतवर्ण । होऊनि शंसिलें हरिपूजन । धर्माधर्म समसमान । शकलें जाणोनि पृथुरूपें ॥ २३५ ॥

---

पाठभेद :— * न बाधिती ( मुंगीप्रत ). † मधुरां ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ आसन्नमरण. २ आज्ञा. ३ कामक्रोधादि सहा शत्रु. ४ चतुर. ५ ह्या वेळचे. ६ तप करणारे विष्णूचे [illegible] हेच पुढें कृष्णार्जुनरूपानें उत्पन्न झाले. ७ रक्षिलें.

आतां कळिकाळाचा उदय । यवन करिती धेनुक्षय । तेथ तुझेनि आम्ही निर्भय । हा अभिप्राय सूचिला ॥ ३६ ॥ भंगले धर्माचे तीन चरण । शेष उत्तरोत्तर होय क्षीण । ऐसें जाणोनि झालासि कृष्ण । धर्मपाळन करावया ॥ ३७ ॥ कृष्ण ऐशा संबोधनें । इत्यादि अभिप्रायसूचनें । केलें §म्हणोनियां व्याख्यानें । नृपाकारणें शुक बोधी ॥ ३८ ॥ शिलंगणींचें सोनें म्हणती । परी ते कोरडीच वदंती । येथ देखोन प्रतीति । यथार्थोक्ति स्तवितसे ॥ ३९ ॥ प्रबळ कोपला अमरपति । नाशावया गोसंतति । प्रळयवृष्टिविद्युत्पातीं । सप्तराती जाचिलें ॥ २४० ॥ परी ‖तां इंद्राचा अपमान । केला धरूनि गोवर्धन । गोगोपाळ गोकुळ पूर्ण । अभय देऊन रक्षिलें ॥ ४१ ॥ आमुचे शिरीं तूं असतां नाथ । आम्ही कळिकाळीं सनाथ । यवनभयाचा अनर्थ । तैं रक्षिता तेथ तूं आम्हां ॥ ४२ ॥ इंद्रवर्षणीं संरक्षिलें । आतां अंतर निर्भय झालें । यवनापासूनि भय बोलिलें । तें सूचविलें ये काळीं ॥ ४३ ॥ म्हणसी गौळी मी गोपाळ । भाविभूतादि त्रिकाळ । रक्षावया मज कैंचें बळ । तरी तूं केवळ महायोगी ॥ ४४ ॥ योगमायाअंगीकारें । गोवर्धन हा धरिला करें । फेडिलें इंद्रमदाचें वारें । लीलावतारें योगीशा ॥ २४५ ॥ वनीं प्रबळ दावानळ । उदेला धेनूसि प्रळयकाळ । तै झांकवूनि अक्षिगोळ[1] । प्रकटिली केवळ योगमाया ॥ ४६ ॥ नेत्र झांकूनि जंव उघडिती । मायालाघवें तीं[2] श्रीपति । नेलें भांडीरवनाप्रति । सुखविश्रांति गोगोपां ॥ ४७ ॥ योगमायेच्या अवलंबनीं । दावानळ तो प्राशिला वदनीं । हा तव महिमा स्मरोनि मनीं । योगी म्हणोनि संबोधूं ॥ ४८ ॥ पूर्वी केलें गोरक्षिता[3] । पुढील कासया वाहूं चिंता । ऐसें न म्हणें जगन्नाथा । तूं तत्त्वता विश्वात्मा ॥ ४९ ॥ अविधि देखूनि दुष्टाचरण । दुखवसी विश्वात्मा म्हणऊन । विश्वरूपी तूं भगवान । तव कल्याण त्रिजगेशीं ॥ २५० ॥ एक आंगींचा उपडे केश । देहवंता तो जाणवे क्लेश । तेंवि तूं जगदात्मा जगदीश । भोगिसी क्लेश जगद्रूपें ॥ ५१ ॥ स्वसंताना म्हणती आत्मा । तरी तूं जगज्जनक जगदात्मा[4] । विश्वसंभव ऐशिया नामा । उचित आम्हां संबोधणें ॥ ५२ ॥ पशुपक्ष्यादि जंतु सकळ । संततिरक्षणीं प्रयत्नशील । विश्वसंभव[5] तूं गोपाळ । पाळनशील[6] त्रिकाळीं ॥ ५३ ॥ विश्वसंभव त्रिजगज्जनक । म्हणसी ब्रह्मा रजात्मक । तरी तूं मायिक अमायिक* । ब्रह्म सम्यक श्रीकृष्ण† ॥ ५४ ॥ कृष्ण हें दुसरें संबोधन । हेतुगर्भ विशेषण । आम्रेडितार्थी व्याख्यान । येथ सज्ञान न करिती ॥२५५॥ भूवाचक शब्द कृषि । ‡णकार निवृत्ति प्रकाशी । एवं अन्वयव्यतिरेकेंशीं । ब्रह्म कृष्णासि श्रुति म्हणती ॥ ५६ ॥ कृषि म्हणिजे भूसत्तावाची । जेणें सन्मात्रता प्रपंचीं । ¶णकारें निवृत्ति विवर्ताची । ऐक्यवस्तूचि प्रकाशी ॥ ५७ ॥ एवं कृष्ण ऐसें स्मरण । प्रकाशी आपुलें ब्रह्मपण । ऐक्यें असिपदव्याख्यान । करी संपूर्ण सन्मात्र ॥ ५८ ॥ तो तूं परब्रह्म सर्वोत्तमा । न होसी विश्वाभिमानी

पाठभेद :— § म्हणो व्याख्याने ( मुंगीप्रत ); म्हणोनि व्याख्याने ( उमरखेडप्रत ). ‖ त्वां ( मुंगीप्रत ). * अमायिक मायिक ( मुंगीप्रत ). † श्रीकृष्णा ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡ येकार ( मुंगीप्रत ); नकार ( उमरखेडप्रत ). ¶ येकारें ( मुंगीप्रत ), नकारें ( उमरखेडप्रत ).

१ नेत्र. २ त्वां. ३ गोरक्षणास. ४ जगत् आत्मा ज्याचा तो. ५ विश्वाचा संभव ज्यापासून तो. ६ पवित्र स्वभावाचा.

ब्रह्मा । जननावनाप्ययादिकर्मा । अखिल गरिमा तुज योग्य ॥ ५९ ॥ तूं या लोकत्रयाचा नाथ । अक्षय अव्याहत अच्युत । तुझेनि प्रभुत्वें सनाथ । आम्ही समस्त सुरवर्या ॥ २६० ॥ पूर्वापरें इत्यादि वचनीं । अभयाश्रय सुचवूनी । संबोधूनि चक्रपाणि । पुढें विनवणी आदरिली ॥ ६१ ॥

त्वं नः परमकं दैवं त्वं न इंद्रो जगत्पते । भवाय भव गोविप्रदेवानां ये च साधवः ॥ २० ॥

सुरभि म्हणे* जगत्पति । कृपेनें आइकें आम्हुची विनति । तूं आम्हुची उपास्यमूर्ति । ब्रह्मांडवर्तिदेवता ॥ ६२ ॥ यालागीं आम्हुचें संप्रार्थन । सफळ करीं कृपेंकरून । आम्हुचें करावया रक्षण । सामर्थ्य पूर्ण तुजआंगीं ॥ ६३ ॥ रंकासि दिधल्या राज्यपदवी । तो प्रजांतें †भिक्षा लावी । यालागीं प्रतापी गोसांवी । प्रजा वोजावी निजतेजें ॥ ६४ ॥ तुवां इंद्राचा भंगिला गर्व । आम्हुची संतति रक्षिली सर्व । लीला प्रकटूनि हे अपूर्व । विरिंचि‡ शर्व तोषविले ॥ २६५ ॥ इंद्रादि समस्त ¶सुरवरगण । तुझिया चरणा §झालों शरण । आम्हुचें करावया कल्याण । इंद्रत्व पूर्ण स्वीकारीं ॥ ६६ ॥ साधु सुरवर ब्राह्मण धेनु । यांचा इंद्र तूं एथून । अभीष्टाभ्युदयकारण । तुझेनि जाण प्रभुत्वें ॥ ६७ ॥ सत्ता इंद्रत्व ‖अर्पावयासी । तुझे आंगीं कोठूनि म्हणसी । तरी ऐकावें इयेविशीं । हृषीकेशी सर्वज्ञा ॥ ६८ ॥

इंद्रं नस्त्वाभिषेक्ष्यामो ब्रह्मणा चोदिता वयम् । अवतीर्णोऽसि विश्वात्मन् भूमेर्भारापनुत्तये ॥ २१ ॥

आम्हां प्रेरिलें ब्रह्मदेवें । कीं इंद्रत्व तुजला द्यावें । तुवां लोकत्रय आघवें । संरक्षावें निजसत्ता ॥ ६९ ॥ आमचा इंद्र पुरंदर । म्हणसी परी तो परम क्रूर । करावयासि गोसंहार । अतिनिष्ठुर प्रवर्तला ॥ २७० ॥ पुरे त्याचें इंद्रपण । मारितां न शिणे गोब्राह्मण । दधीचीचें केलें हनन । ऐसा निर्घृण निर्लज्ज ॥ ७१ ॥ व्याघ्र जैसा पशुपाळक । अजाअविकाअवनीं वृक । तैसा हाही सुरनायक । संरक्षक त्रिजगाचा ॥ ७२ ॥ यालागीं तूं इंद्र होईं । स्वानंद ↑वरीं लोकत्रयीं । म्हणसी जरी मज योग्यता नाहीं । कीं मानवदेही म्हणोनी ॥ ७३ ॥ देवेंद्र तो देवयोनि । म्हणोनि मिरवे अमरभुवनीं । आम्ही गौळियें राहूं वनीं । कें मजलागुनी इंद्रत्व ॥ ७४ ॥ तरी ऐसें न म्हणें जनार्दना । तूं विश्वाच्या संरक्षणा । भूमिभाराच्या अपनैयना । मर्त्यभुवना आलासी ॥ २७५ ॥ जन्मलासि यादवकुळीं । लीलानाट्यें म्हणविसी गौळी । विधिहरप्रमुख सुरांचे मौळीं । तूं वनमाळी आभिपूज्य ॥ ७६ ॥ तूं इंद्राचा परम इंद्र । ईश्वराचा परमेश्वर । विधिहर सुरवर सर्वेश्वर । तुझा पार नेणती ॥ ७७ ॥ म्हणसी ईश्वराहूनि मी पूज्य । ऐसें रहस्य कळलें तुज । तरी इंद्रपदींचें

---

**पाठभेद :—** * जी ( मुंगीप्रत ). † शिक्षा ( मुंगीप्रत ). ‡ विरंची ( मुंगीप्रत ). ¶ स्मरवरगण ( मुंगीप्रत ). § झालें ( मुंगीप्रत ); जालो ( उमरखेडप्रत ). ‖ करावयासी ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ↑ भरी ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ सृष्टिस्थितिप्रलयादि. २ पहिली व पुढची. ३ ब्रह्मांडावर मुख्य. ४ समर्थ. ५ मार्गास लावावी. ६ कल्याणोत्कर्ष. ७ दधीची ऋषि. ह्यास मारून त्याच्या अस्थींचें वज्र केलें व दैत्यांचा नाश केला. ८ निर्दय. ९ दूर करण्यास.

सामान्य काज । कां पां मज निरूपिसी ॥ ७८ ॥ तरी तूं समर्थ सर्वेश्वर । विधिहर सुरवर सचराचर । यांचे पालनीं पटुतर । जाणोनि आधार वांछितसों ॥ ७९ ॥ तूं विश्वरूपी विश्वात्मक । जाणसी सर्वांचें सुखदुःख । भूभार उतरूनि सम्यक । रक्षिसी निष्टंक त्रिलोकी ॥ २८० ॥ भूभार उतरावया कारणें । तुवां यदुकुळीं अवतरणें । जाणोनियां हे रहस्यखुणे । मत्प्रार्थने स्वीकारीं ॥ ८१ ॥ ऐसा प्रार्थूनि श्रीपति । मान्य करविली विनीतविनति । पुढें सुरभि काय करिती । जाली तें श्रोतीं परिसिजे ॥ ८२ ॥

श्रीशुक उवाच — एवं कृष्णमुपामंत्र्य सुरभिः पयसाऽऽत्मनः । जलैश्चाकाशगंगाया ऐरावतकरोद्धृतैः ॥ २२ ॥

भारतभूपमाळिकामेरु । परमजिज्ञासु विचारचतुर । हरिगुणश्रवणीं अतिसादर । कुरुनरेंद्र परीक्षिति ॥ ८३ ॥ तयासि म्हणे बादरायणि । ब्रह्मयाचे आज्ञेवरूनी । सुरभि अभिषेकी चक्रपाणी । तें तूं श्रवणीं परियेसीं ॥ ८४ ॥ कृष्णासि करूनि विनीत विनति । कामधेनूनें परम निगुती । अभिषेकावयालागीं गोपति । केली आँयति संकल्पें ॥ २८५ ॥ सुधर्मादि ब्रह्मसभा । हारपती जयेच्या प्रभा । चिद्रत्नजडिताची स्वयंभा । सभा सुप्रभा निर्मिली ॥ ८६ ॥ सभेमाजि चौदा भुवनें । मुकुलित कार्येंशीं कारणें । निजाधिकारें वोळगणें । उपचारार्पणें वोळँगती ॥ ८७ ॥ सन्नद्ध सर्वही समृद्धि । घेऊनि राबती ऋद्धिसिद्धि । तेथ महर्षि यथाविधि । निगमप्रबोधीं सादर ॥ ८८ ॥ चिंतामणीच्या वेदिका । नभ गर्भौनि अमृतपुलिका । कल्पद्रुमाच्या वाटिका । सुखवर्धका श्रवताती ॥ ८९ ॥ जीवकार्ंयांहूनि तेजाळ । वितांँमणींचे बंबाळ । पूर्णचंद्राहूनि शीतल । व्योम-दुकूल सुखकारी ॥ २९० ॥ तया मंडपा मध्यभागीं । सिंहासन विचित्र रंगीं । नाना रत्नांची झगमगी । किरणीं भंगी भास्कराभा† ॥९१॥ तया सिंहासनावरी मवाळ । मृंदोळी हंसगर्ह्लोत्थ मृदुल । तेथ बैसवूनि गोपाळ । संभार सकळ स्थापिले ॥ ९२ ॥ पिशाचगणीं परिवारून । स्वयें पातला त्रिलोचन । श्रीकृष्णाचें अभिषेचन । प्रीती करून पहावया ॥ ९३ ॥ अष्टभैरव सावधान । अष्ट-दिग्भागीं संस्थापून । दुर्गाकार पिशाचसैन्य । घरटीकार वेताळ ॥ ९४ ॥ गणपति दुर्गा क्षेत्रपाळ । अधिदेहुंळी गणमंडळ । कनकवेत्रपाणि सकळ । विघ्नकल्लोळ भंगिती ॥ २९५ ॥ श्रीकृष्णाच्या नाम-स्मरणें । भंगोनि जाती महा विघ्नें । कल्याणभरित समस्त भुवनें । अभिषेचनें कृष्णाच्या ॥ ९६ ॥ शूल रोवूनि सभांगणीं । सादर तिष्ठे शूलपाणि । तेथ इतरां कोण गणीं । दास्याचरणीं सुरवरां ॥९७॥ कालभैरव उन्मत्त रुरु । कोळकपाळी भीषण अपर । बटुक रक्तांग आपदुद्धार । आणि भट्टार क दशदिशीं ॥९८॥ आपलालिया पिशाचगणीं । सालंकृत सहयोगिनी । सायुध मंडित निजाभरणीं ।

**पाठभेद** :— मुंगी व उमरखेडप्रतीत या ८९ व्या ओवींतील चरणांचा क्रम १, ३, २, ४ असा आहे † भास्करभा ( मुंगी व उमरखेडप्रत )

१ अति समर्थ. २ तीन लोक. ३ मनोनिग्रह. ४ सेविती. ५ तयार. ६ गुरुशुक्रांहून. ७ छतास लाविलेलीं रत्नें. ८ गिरदी, पद्य—' वोठंगणे मृदोळिया ' एकनाथ – रुक्मिणीस्वयंवर. ९ हंसवर्णाची गादी. १० उंबरठ्यामध्ये.

तिष्ठती स्थानीं आपुलाले ॥ ९९ ॥ भैरवापाठीं गुल्मांतरीं । नंद सुनंद पूर्वे द्वारीं । दक्षिणद्वारींचे अधिकारी । चंड प्रचंड सुभट ॥ ३०० ॥ बळ प्रबळ पश्चिम भागीं । सावध सन्नद्ध सर्वांगीं । भद्र सुभद्र *उत्तममार्गी । विष्णुनियोगीं तिष्ठती ॥ १ ॥ विष्णुचक्र तदंतरीं । निमेषमात्रें सहस्रवरी । मंडपाभंवतीं घरटी करी । सहस्रधारीं लखलखित ॥ २ ॥ ऐसिये सभामंडपस्थानीं । सुरभि आत्मपयें करूनी । इंद्र गंगाजळ आणूनी । आकाशवाहिनीसंभूत[1] ॥ ३ ॥ ऐरावतेंकरोद्धृत[2] । श्रीकृष्णातें अभिषेचित । तेथील वृत्तांत समस्त । ऐकें स्वस्थ भूपति ॥ ४ ॥ ब्रह्मयाचे प्रेरणेवरून । श्रीकृष्णातें अभिषेचन । तेणें इंद्र मनीं उद्विग्न । लज्जायमान वक्तृत्वीं ॥ ३०५ ॥ पूर्वापराधें संकुचित । कृष्णस्तवनें कांहीं स्वस्थ । तंव उद्योग देखे विधिप्रणीत । निजपदोपहत[3]संभ्रम हा ॥ ६ ॥ श्रीकृष्णाची अचिंत्य शक्ति । अगाधैश्वर्याची स्थिति । लक्षूनि मानी आपुल्या चित्तीं । स्वपदोपहति वोढवली ॥ ७ ॥ हें देखोनि देवर्षिगणीं । आश्वासूनि भिदुर[4]पाणि । रहस्य कथूनि त्याचिये कर्णीं । चिंतेपासूनि सोडविला ॥ ८ ॥

इंद्रः सुरर्षिभिः साकं नोदितो देवमातृभिः । अभ्यषिंचत दाशार्हं गोविंद इति चाभ्यधात् ॥ २३ ॥

देवमाता देवर्षि अदिति । इंद्रासि बोधिती एकांतीं । वृथा म्हणविसी विबुधपति । अबुध निश्चिती तूं एक ॥ ९ ॥ आजि ब्रह्मांडभांडोदरीं । परमामृताची आनंदलहरी । भोगीत असतां सचराचरीं । तूं कां अंतरीं सचिंत ॥ ३१० ॥ ब्रह्मयाचे आज्ञेवरून । इंद्रपदीं अभिषेचन । कृष्णासि करिती हें देखोन । सचिंत मन जरी तुझें ॥ ११ ॥ तरी तूं ऐकें इयेविशीं । ब्रह्मादिलोक रक्षावयासी । आश्रय अखिल ब्रह्मांडासी । जाणोनि कृष्णासि अभिषेचीं ॥ १२ ॥ अमरेंद्र दहनेंद्र शमनेंद्र[5] । राक्षसेंद्र यादवेंद्र । पवनेंद्र धनेंद्र रौद्रेंद्र[6] । ब्रह्मेंद्रादि अखिल जे ॥ १३ ॥ ऐसा सर्वेंद्रांचे शिरीं । ब्रह्मयाचे आज्ञेवरी । कृष्ण अभिषेचितां सुरीं । तूं कां अंतरीं सचिंत ॥ १४ ॥ येथ विधीच्या निदेशमात्रें । सचेत सुरवरांचीं गात्रें । कामधेनूनें संकल्पसूत्रें । चमत्कारें निर्मिलीं§ ॥ ३१५ ॥ यालागीं सत्वर सावध होयीं । कृष्णाभिषेकाभ्युदयीं । सर्वकार्यें ठायींच्या ठायीं । विनयतेशीं विनियोजीं ॥ १६ ॥ तैसाचि निर्मूनि अमरपति । क्षणें स्थापिल्या अमरावती । तूं तो पामर अल्पमति । केंवि विपत्ति निस्तरसी ॥ १७ ॥ ऐसा देवर्षिगणां सहित । देवमातरीं अमरनाथ । बोधितां झाला विषादरहित । सावध स्वस्थ हरिभजनीं ॥ १८ ॥ इंद्रें प्रेरितां अमरगण । दुंदुभिघोषें भरलें गगन । छत्रें चामरें आतपत्राण । सूर्यकिरण लाजविती ॥ १९ ॥ विचित्रवाजंत्रांच्या ध्वनि । गंधर्व गाती तानमानीं । अप्सरांच्या सुनर्तनीं । ताल धरिती किन्नरी ॥ ३२० ॥ सांडूनियां पूर्वबाळि[7] । सिद्धार्थ विखरूनियां स्थळीं । दिव्यदीपांच्या बंबाळीं । अंशुमाळी तटस्थ ॥ २१ ॥

---

**पाठभेद** :—* उत्तर ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). § मुंगीप्रतींत ३१५ व्या ओवीनंतर ३१७ वी व नंतर ३१६ वी आहे.

१ नदी. २ ऐरावतानें सोंडेतून आणलेलें. ३ आपल्या पदास विघ्न. ४ वज्र. ५ शमन यम. ६ रुद्रगणाचा इंद्र. ७ पांढऱ्या मोहऱ्या.

नवरत्नांच्या रंगवल्ली । सर्वतोभद्रें स्वस्तिकें वेली । सरस्वतीच्या करकौशल्यीं । विविधें रेखिलीं सर्वत्र ॥ २२ ॥ सुस्नात आणि शुचिमंत । सुरगुरूशीं अमरनाथ । संभार अवलोकुनी समस्त । मूळमंत्रें प्रोक्षिलें ॥ २३ ॥ गुरुत्रयातें अभिवंदून । गणपति भैरव संस्थापून । द्वारदेवता †संमानून । अभिषेचन आदरिलें ॥ २४ ॥ दिव्यकलशामृतपूर्ण । समयीं देता झाला वरुण । वामभागीं संक्रंदन । स्थापिता झाला साधार ॥ ३२५ ॥ दक्षिणभागीं पूजापात्रें । संस्थापिलीं यथासूत्रें । पृष्ठभागीं सक्रन्मात्रें । करक्षालना स्थापिलें ॥ २६ ॥ मुकुर[2] चामर छत्र व्यजनें । रत्नादि विविध नीरांजनें । अनेक सुमंगळ विविधभाजनें । दिग्विभागीं स्थापिलीं ॥ २७ ॥ पृष्ठ आणि पार्श्वे दोन्ही । हे सिंहासनाचे विभाग तीन्ही । तेथ द्रव्यांची आसांदनी[3] । ते सज्जनीं परिसिजे ॥ २८ ॥ हेमरत्नांचे षोडशकुंभ । यथोक्त द्रव्यें भरूनि शुभ । बिल्वफळेंशीं दिव्यप्रभ । पृष्ठीं स्वयंभ स्थापिले ॥ २९ ॥ षोडशमृत्तिका दक्षिणपार्श्वीं । पंचगव्यें उत्तरपार्श्वीं । या मार्गेंचि पृथग्द्रव्यीं । द्वितीय पंक्ति मांडिल्या ॥ ३३० ॥ सर्वौषधि सर्व फळें । सर्व बीजें सर्व दळें । सर्व पल्लव पुष्पें कमळें । अनुक्रममाळे स्थापिलीं ॥ ३१ ॥ भेरी मृदंग पणव शंख । ढक्का पटह तौर्यत्रिक । तंत विततं कांसोळिक । बिरुदें घोष निगमाचे ॥ ३२ ॥ महर्षिप्रमुख सन्निधानीं । स्वस्तिवाचन *संवादुनी । शांतिपाठ आशीर्वचनीं । अक्षता मूर्ध्नीं टाकिती ॥ ३३ ॥ न्यासविधि सारूनि श्रेष्ठ । आधारादि पूजूनि पीठ[4] । श्रीकृष्ण करूनि उपविष्ट । पादपूजा आदरिली ॥ ३४ ॥ औटकोटितीर्थजळीं । पूर्णकलश अंशुमाळी । स्वकरें वोती इंद्र क्षाळी । पदपल्लव कृष्णाचे ॥ ३३५ ॥ चंद्रें धौत श्वेत वसन । अर्पितां इंद्रें पुसिले चरण । हृदयीं नयनीं मुकुटीं धरून । संस्थापिले आसनीं ॥ ३६ ॥ श्वेतगंध रत्नपात्रीं । सादर अर्पणीं धरित्री । इंद्र श्रीकृष्णचरणावरी । लेपन करी जयघोषें ॥ ३७ ॥ परिमळद्रव्यें अश्विनीकुमार । समर्पिती बहुप्रकार । चरणांवरी उधळितां शक्र । सुगंधधूसर नभ जालें ॥ ३८ ॥ गगनें आणिलीं अनेक सुमनें । वसंतें अर्पिलीं सादरपणें । श्रीकृष्णचरणीं संक्रंदनें । सूक्तपठनें अर्पिलीं ॥ ३९ ॥ बिल्वपत्रें तुळसीदळें । विविध रत्नें मुक्ताफळें । त्वष्टृनिर्मितें सोज्वळें । वांकी वाळे नूपुरें ॥ ३४० ॥ पादांगुळिये चरणकमळीं । तोडरादि बिरुदावळि । अर्हंदशांगधूप जाळी । नाहं उजळी चित्प्रभा ॥ ४१ ॥ नैवेद्यपात्रें षड्रसपूर्णें । आणूनि प्रविष्ट केलीं वरुणें । शक्रें प्राणावदानपठनें[5] । कृष्णचरणीं अर्पिलीं ॥ ४२ ॥ कल्पद्रुमें आणिलीं फळें । चंद्रें तांबूल त्रयोदशमेळें । निधि[6][7] दक्षिणे उदीचीपाळें । प्रविष्ट केले हरिचरणीं ॥ ४३ ॥ इंद्रें अर्पूनि हें समस्त । नीराजनीं सावचित । चिद्रत्नदीप मंगल-भरित । नीराजित जयघोषें ॥ ४४ ॥ महर्षिविशुद्धमानसकमळीं । अनर्घ्य[8]रत्नीं मुक्ताफळीं । भरूनि पूर्णपुष्पांजलि । हरिपदयुगळीं अर्पिती ॥ ३४५ ॥ दुंदुभिवाजंत्रांचे गजर । वैतालिकांचे वीर्योच्चार । महर्षींचे मंत्रस्वर । जयजयकार अमरांचे ॥ ४६ ॥ एवं पुष्पांजाळि अर्पण । करूनि केलें प्रदक्षिण । स्तुतिस्तवन क्षमापन । अभिवादनपूर्वक ॥ ४७ ॥ पादपूजनानंतर । षोडशमृत्तिकासंस्कार ।

पाठभेदः— † सन्मानून ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). * संपादुनि ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ रेखांकित चक्रें. २ आरसा. ३ मांडणी. ४ आसन. ५ प्राणाहुति. ६ खजिने. ७ कुबेर. ८ अमूल्य.

पट्टाभिषेकीं प्रशस्ततर । ते निगमानुसार आदरिले ॥ ४८ ॥ पर्वताग्रमृत्तिका मेरु । घेऊनि अर्पणीं सादरु । कृष्णमस्तकीं अमरगुरु । करी संस्कारु तद्योगें ॥ ४९ ॥ §वैल्मीकमृत्तिका शेष अर्पी । कृष्णाकरणीं सुरगुरु लेपी । विष्णु वैकुंठभुवनींची वोपी । गुरु विलेपी हरिवदनीं ॥ ३५० ॥ शक्रें स्वभुवनींची वसुमती । समर्पिली गुरूचे हातीं । तेणें श्रीकृष्णकंठाप्रति । यथानिगुती चर्चिली ॥ ५१ ॥ पारमेष्ठ्यराज्यांगनींची । मृत्तिका कृष्णा हृदयीं चर्चीं । तैसीच ऐरावतदंतींची । दक्षिणभुजीं लेपिली ॥ ५२ ॥ यज्ञवाराहदंतोद्धृता । वामभुजीं चर्चिली त्वरिता । मानसादिसरोवरभूता । पृष्ठीभागीं लेपिली ॥ ५३ ॥ प्रयागादि सांगैमी मृदा । उदरीं चर्चिली श्रीमुकुंदा । अमैरतटिनी-उभयतटदा । उभयपार्श्वीं लेपिली ॥ ५४ ॥ अप्सरांगणभवा माती । रंभा अर्पी गुरूच्या हातीं । कृष्णचरणीं आणि हस्तीं । वाचस्पति विलेपी ॥ ३५५ ॥ पूर्वसागरींचा जळेश्वरु । वोपितां *पूर्वांगीं चर्चीं गुरु । पश्चिम सागरजा सत्वर । पश्चिमांगीं चर्चिली ॥ ५६ ॥ दक्षिणोत्तर उदधिभवा । उभयपार्श्वीं श्रीकेशवा । अर्पिली आणि मखसंभवा । विलेपिली सर्वांगीं ॥ ५७ ॥ पंचगव्यें आसादिलीं । कामधेनूनें तियें अर्पिलीं । तिहीं करूनि अभिषेचिली । मूर्ति सांवळी कृष्णाची ॥ ५८ ॥ पद्मगर्भींचें हंसोदक । चकोरनेत्रज कुमुदोदक । सोमकांतींचें चंद्रोदक । वर्षाँमोदक चतुर्थ ॥ ५९ ॥ नागलोकींचें भोगामृत । दिव्यक्षीराब्धिमथनोद्भूत । सोमबिंबींचें सोमामृत । परमामृत कूपेचें ॥ ३६० ॥ घृत दुग्ध दधि माहेय । इत्यादि गव्य चतुष्टय । माहेय तें म्हणसी काय । तरी गोशृंगतोय सपुच्छ ॥ ६१ ॥ पुष्परस पंकजरस । कदलीगर्भज कर्पूररस । मलयजादि सौरभ्यरस । एवं षोडश घट पूर्ण ॥ ६२ ॥ एक उदक एक रस । एक गव्य एक पीयूष । चौघे चौघे चारी चारी कलश । चहूंकडूनि सेचिती ॥ ६३ ॥ सनकादि चौघे ऊर्ध्वरेते । धरूनि चारी कुंभ हातें । पूर्वेकडूनि श्रीकृष्णातें अभिषेचिती सुमंत्रीं ॥ ६४ ॥ पुलस्त्य पुलह वशिष्ठ अत्रि । दक्षिणभागीं कृष्णगात्रीं । अभिषेचिती मगळमंत्रीं । यथासूत्रीं विध्युक्त ॥ ३६५ ॥ कश्यप भरद्वाज अंगिरा भृगु । श्रीकृष्णाचा पश्चिमभाग । दिव्यकलशीं यथासांग । अभिषेचिती शुभसूक्तीं ॥ ६६ ॥ विश्वामित्र जमदग्नि क्रतु । गौतम प्रमुख चौघे समर्थ । उत्तरभागीं आनंदभरित । अभिषेचिती कृष्णातें ॥ ६७ ॥ लोकालोकींचे लोकपाळ । सुदामा हिरण्यरोमा† जे सुशील । शंखपा केतुमान् निर्मल । हरिप्रेमळ सर्वस्वें ॥ ६८ ॥ कर्दममुनीचे नंदन । हे चौभागीं चौघे जन । कनक रत्नें धान्यें करून । कंजीं भगवान सेचिती ॥ ६९ ॥ मंदार नाहाणी सर्वां दळीं । कल्पद्रुम सर्वां फळीं । हरिचंदन पल्लवमेळीं । पुष्पीं सकळीं पारिजात ॥ ३७० ॥ संतान अर्पी सर्वबीजां । त्यानंतरें अधोक्षजा । अभ्यंग देती मुनींच्या भाजा । साध्वी विरजा सुरसरिता ॥ ७१ ॥ कस्तूर्यादि उद्वर्तन । करूनि मलापकर्षण । पंचामृतीं दिधलें स्नान । सूक्तपठनपूर्वक ॥ ७२ ॥ गंगा यमुना सरस्वती । पुण्यसरितांचिया मूर्ति । शुद्धोदकीं अभिषेचिती । सूक्तें पढती मुनिवर्य ॥ ७३ ॥ शक्र बृहस्पति आपण । करिती अंगप्रक्षाळण । कामधेनु स्वपयें

पाठभेद :—§ वाल्मीक ( मुंगीप्रत ) * सर्वांगीं ( मुंगीप्रत ). † शामा ( मुंगीप्रत ).

१ वारुळ. २ माती. ३ संगमावरील. ४ नदी. ५ वरुण. ६ मिळविलीं. ७ गारांचे पाणी. ८ सूर्यप्रकाशमर्यादा दाखविणारा पर्वत. ९ मळ घालविणें.

स्नपन[1] । करवी विधानपूर्वक ॥ ७४ ॥ आकाशगंगासंभव अंभें[2] । भरूनि हेमरत्नांचे कुंभ । स्वकरें धरूनि सुरेंद्रइभ[3] । पद्मनाभ अभिषेची ॥ ३७५ ॥ हेमरत्नीं कनकाभिषेक । पुष्पाभिषेक अमृताभिषेक । सारूनि बलिदानें अनेक । विविध द्रव्यें सांडिलीं ॥ ७६ ॥ नीराजनीं वाचस्पति । सहित समस्त मुनिवरपंक्ति । अक्षवर्णे पुरंध्री करिती । महासती पतिव्रता ॥ ७७ ॥ पुष्पांजालि समर्पणीं । रत्नपादुका अर्पी धरणि । इंद्रें लेववूनि त्या चरणीं । अंगमार्जनीं सादर ॥ ७८ ॥ क्षीरसागरें क्षीरोदक । अर्पूनि फेडिलें आर्द्रांशुक[4] । पूजूनि सिंहासन सम्यक । प्रतिष्ठासूक्तीं प्रतिष्ठिलें ॥ ७९ ॥ प्रतिष्ठासूक्तीं वाद्य-गजरीं । सुरवरांच्या जयजयकारीं । सुमुहूर्तीं श्रीमुरारि । सिंहासनीं बैसविला ॥ ३८० ॥ अमृतवृष्टि कनकवृष्टि । पुष्पवृष्टि §रात्नवृष्टि । सुरवर वर्षोनि पाहती दृष्टी । सुखसंतुष्टी हरिवदन ॥ ८१ ॥ अखिलब्रह्मांडपारिपालन । करावयासि सुरसंपूर्ण । कृष्णासि करिती ‖पदाभिषेचन । तेणें त्रिभुवन संतुष्ट ॥ ८२ ॥ देऊनि मधुपर्क शुद्धाचमन । अग्निधौत पीतवसन । द्वितीय करवुनी प्रावरण । पुन्हा आचमन अर्पिलें ॥ ८३ ॥ मग अर्पिलें ब्रह्मसूत्र[5] । न मनूनि अनुपनीत[6] नंदपुत्र । जाणोनि कमला-मंगलसूत्र । सर्वोपचार अर्पिती ॥ ८४ ॥ आब्रह्मसूचनासूत्रात्मक । चाळक जो कां यदुनायक । ब्रह्मसूत्रार्पणें त्या उदक । देती सम्यक आचमना ॥ ३८५ ॥ मुकुटकुंडलें वनमाळा । दिव्य मुद्रिका दशांगुळां । वीरकंकणें कटिमेखळा । केयूरांगदें लेवविलीं ॥ ८६ ॥ कंठीं मिरवे कौस्तुभमणि । ज्याचे उपमे भासुर तरणि । श्रीवत्स मिरवे हृदयस्थानीं । कल्याणखाणी द्विजवरद ॥ ८७ ॥ इत्यादि अर्पूनि विचित्राभरणां । विश्वकर्म्यानें केलें नमना । कृष्णा देऊनियां आचमना । दिव्य *विलेपना अर्पिती ॥ ८८ ॥ जी सौरभ्यगंधवती । होऊनि †वसंता धवळी क्षिति । दिव्य अनुलेपनें श्रीपति । तिलक रेखिती गुरुशक्र ॥ ८९ ॥ अक्षता लावूनि माणिक्यरंगीं । दिव्य चंदन लेपिला आंगीं । ‡वैधात्रवनोद्भवादि[7] वेगीं । आलीं प्रसंगीं प्रसूनें ॥ ३९० ॥ इंद्रें कृष्णासि समर्पिलीं । मुकुटीं कंठीं तुरंबिलीं । आपादमाळा विराजली । विविधांफुलीं अवतंस ॥ ९१ ॥ सुगंध द्रव्यें शेषभोग्यें । देवां दुर्लभ न्यूनभाग्यें । त्यांतही उत्तम कृष्णयोग्यें । देखती भाग्यें नासत्य[8] ॥ ९२ ॥ इंद्र उधळितां कृष्णावरी । सुगंध भरिला गगनोदरीं । तो अद्यापि सेविजे भ्रमरीं । भ्रमतां अंबरीं अवसंतीं[9] ॥ ९३ ॥ क्षीरसागरें वैजयंती । आपाद अर्पिली कृष्णाप्रति । जिच्या प्रकाशें शशीची कांति । म्लान भासती सकळंक ॥ ९४ ॥ मणिग्रीव नलकूबर । उभय भागीं चामरधर । अमृतस्रावी चंद्राकार । छत्रधारक जयंत[10] ॥ ३९५ ॥ दिव्यौषधींचा निर्यास[11] । वैष्णव दशांग धूपित वास । एकारती श्रीवर्चस[12] । दिव्य पोतास ¶उजळिलें ॥ ९६ ॥ विविध रत्नांच्या भाजनीं । अष्टधा पृथक् नीराजनीं । महर्षींच्या सुवासिनी । नीरांजिती कृष्णातें ॥ ९७ ॥ देऊनि कृष्णासि आचमन । सौमनस्य[13] सावधान ।

---

**पाठभेद** :—§ रत्न ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‖ पट्टाभिषेचन ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). * लेपना ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † वसतां ( मुंगीप्रत ). ‡ वैधातृ ( मुंगीप्रत ). ¶ उधळिला ( मुंगीप्रत ); उजाळिला ( उमरखेडप्रत ).

१ स्नान. २ उदक. ३ हत्ती. ४ ओलें वस्त्र. ५ यज्ञोपवीत. ६ मुंज न झालेला. ७ ब्रह्मदेवाच्या वनांतील. ८ अश्विनीकुमार. ९ वसंत नसतांहि. १० इंद्रपुत्र. ११ चीक. १२ शोभायमान कांतीची. १३ स्थिरमनस्क.

श्रीकृष्णासि दिधला क्षण । उपवेशनपूर्वक ॥ ९८ ॥ मंडपद्वारासि जवनिक । घालूनि वारिले सकळिक । महर्षींचा मंत्रघोक । तोही नावेक थांबविला ॥ ९९ ॥ अखंड दंडायमान ध्वनि । दिव्य दुंदुभि गाजतां गगनीं । इंद्रें भ्रूसंकेतें करूनी । त्या ते क्षणीं राहविल्या ॥ ४०० ॥ ऐसा निहूळ[1] निश्चळ । श्रीकृष्णाचा नैवेद्यकाळ । बाहेर सनकादि मंजुळ । नामें स्मरती ते काळीं ॥ १ ॥ मांडूनि दिव्य कनकपात्र । उत्तम दिव्यान्नें पवित्र । अन्नपूर्णा यथासूत्र । विपुलहस्तें[2] परिवेषी[3] ॥ २ ॥ लक्ष्मी अमृतकलश पूर्ण । आणूनि करी कृष्णार्पण । विविधरसपात्रें भरून । पाकशासन समर्पी ॥ ३ ॥ अदिति घाली आपोषणा । चित्रशिखंडी[4] मंत्रपठना । कृष्णें करूनियां आचमना । मग भोजना आदरिलें ॥ ४ ॥ धरा इंदिरा उभयभागीं । रत्नदंडीं विचित्ररंगीं । कृष्णा वीजिती तत्प्रसंगीं । उभय चामरें घेउनी ॥ ४०५ ॥ कृष्णासि रुचे सप्रेम गोडी । अन्नपूर्णा ते पदार्थ वाढी । पावक पक्वान्नपरवडी । लवेंडसवडी विस्तारी ॥ ६ ॥ धन्वंतरि स्वाद रुचवी । अनुक्रमें पदार्थ सुचवी । कृष्ण जाणे सप्रेम चवी । विविध चोजवी कौशल्यें ॥ ७ ॥ मध्यें मध्यें अमृतपान । स्वादु सुगंध शीतल वर्न[5] । शेवटीं दध्योदनपाचन । उत्तरापोषण अर्पिलें ॥ ८ ॥ पाचरत्नाचें गंडूषपात्र[6] । वरी झल्लरी जाळंधर । त्यामाजि प्रक्षाळी मुखकर । अर्पी नीर दुश्च्यवर्न[7] ॥ ९ ॥ मुखकरपदशोधनावास । सुरेज्य[8] अर्पी शशिप्रकाश । करोद्वर्तनसौरभ्यास । अश्विनीकुमार अर्पिती ॥ ४१० ॥ कल्पतरूचीं अमोघ फळें । अनुभवस्वादिष्ठ रसाळबहळें । अनेक परीचीं एके वेळे । आखंडलें समर्पिलीं ॥ ११ ॥ तांबूल अर्पी ओषधिनाथ[10] । तदुचित त्रयोदशद्रव्यान्वित । कुबेर जाणोनि भ्रूसंकेत । समर्पित दक्षिणा ॥ १२ ॥ मुकुंदकुंदनीलनाम । शंख मकर आणि कूर्म । अनंतपद्म महापद्म । पूर्ण हेमनवनिधि ॥ १३ ॥ ललामांचे[11] रत्नाकर । दक्षिणे अर्पी पुरंदर । उत्तरपूजनीं अलंकार । *त्वष्टृनिर्मित अर्पिले ॥ १४ ॥ दिव्य पांचही राजवसनें । समर्पिलीं सहस्रनयनें । ज्यांचे प्रभेचें चंडकिरणें । तेज मिरवणें ब्रह्मांडीं ॥ ४१५ ॥ मेरुप्रदत्त सिंहासनीं । शेषतूलिका[12] मृदु आस्तरणीं । अनेक सुमनांचिया श्रेणी । शय्या झांकूनि कौशल्यें ॥ १६ ॥ पूर्वपूजेचीं उपकरणें । विसर्जूनि संक्रंदनें । सिद्ध करूनि नीरांजनें । विसर्जिलें जवनिकें[13] ॥ १७ ॥ सिंहासनीं आरोहण । करिता झाला मधुसूदन । वाद्यघोषें भरलें गगन । बळि संपूर्ण सांडिल्या ॥ १८ ॥ रत्नखचित अभेद्यवर्मा[14] । सवेग लेववी विश्वकर्मा । क्षीरसागरें अम्लानपद्मा । हस्तपद्मीं अर्पिलें ॥ १९ ॥ अक्षय अमोघ सतूणबाण[15] । शार्ङ्गधनुष्य समीरण । अर्पूनि वंदी श्रीकृष्णचरण । राहे येऊन पार्षदीं[16] ॥ ४२० ॥ शंकरें समर्पिला शूळ । विष्णुसहस्रार[17] तेजाळ । दिव्यशक्ति वोपी अनळ । अमरपाळ निजवज्र ॥ २१ ॥ शर्मनें[18] स्वदंड अर्पिला । वरुणें पाश समर्पिला । कमंडलु आणि अक्षमाळा । ब्रह्मदेवें निवेदिली† ॥ २२ ॥ स्वप्रभेहुनी देदीप्यमान । सूर्यें उभविलें वितानें[19] । स्वयें धरून आतपत्राण । पार्षदगणीं ठाकला ॥ २३ ॥

---

**पाठभेदः**—* त्वष्टा ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † समर्पिली ( मुंगीप्रत ).

१ धिमा, मंद. २ उदार हातानें. ३ वाढी. ४ सप्तर्षि. ५ त्वरेनें. ६ उदक. ७ तस्त. ८ इंद्र. ९ बृहस्पति. १० चंद्र. ११ भूषणें. १२ शेष सर्पाची गादी. १३ पडदा. १४ कवच. १५ बाणांच्या भात्यासह. १६ सभासदांत. १७ विष्णूचें सहस्र आऱ्यांचें चक्र, सुदर्शन. १८ यम. १९ छत.

रत्नखचितमुष्टिभाग । कोश विचित्र अतिसुरंग । श्रीकृष्णा तो[†] नंदक खड्ग । कृतांत अर्पी स्वहस्तें ॥२४॥ अमृतस्रावी अभेद्यचर्म[१] । जें परिजतां परिहरी श्रम । काळें अर्पूनि पुरुषोत्तम । नमस्कारिला सप्रेमें ॥ ४२५ ॥ वरुणें अर्पिला पांचजन्य । जो निजघोषें लोपवी घन । दैत्यवनितांचे गर्भ पूर्ण । ज्याच्या घोषें खचताती ॥ २६ ॥ कुबेरें अर्पिली कौमोदकी । जे चित्रिली कनकोदकीं । शत्रुमर्दनीं सुदृढ निकी । देखतां धडकी अरिवर्गा ॥ २७ ॥ जवनशील गगनपंथें । वाढों नेदिती खगपतीतें । सहस्र अश्व नैर्ऋतीनाथें । श्रीकृष्णातें अर्पिले ॥ २८ ॥ तैशींच सर्वी स्वनामास्त्रें । कृष्णा अर्पिलीं रहस्यसूत्रें । रथ सन्नद्ध पवनमित्रें[२] । सशस्त्रास्त्रें अर्पिला ॥ २९ ॥ चंद्रें छत्रें चंद्राकार । कनकस्रावी । मनोहर । कृष्णासि अर्पिलीं सहस्र । सालंकार दूतेंशीं ॥ ४३० ॥ कामधेनूनें लक्षधेनु । कामदुघा ज्या स्वतुल्य सगुण । वंदूनियां श्रीकृष्णचरण । सालंकृता समर्पिल्या ॥ ३१ ॥ शिबिरें वितानें वस्त्रें दुर्गें । महदास्तरणें विविधरंगें । सोपस्करणें सदूत सांगें । वरुणें सवेगें अर्पिलीं ॥ ३२ ॥ हेमरत्नांचीं शिबिका[३]यानें । सदूत सालंकृत सवितानें । कृष्णा समर्पिलीं वैश्रवणें[४] । विनीतपणें प्रार्थूनी ॥ ३३ ॥ कश्यपें दिधला गरुडध्वज । विजयप्रकाशें तेजःपुंज । अमरनाथें सहस्रगज । जे गजराज लाजविती ॥ ३४ ॥ सूर्यें सहस्र श्यामकर्ण । सप्तमुखाहुनी जे जवेन[५] । रत्नाभरणीं सपल्याण[६] । केले अर्पण दूतेंशीं ॥ ४३५ ॥ रत्नें भरूनि हिमाचल । सहस्र आणूनियां क्रमेळ[७] । यावेगळे पदार्थ बहळ । अर्पी केवळ कृष्णातें ॥ ३६ ॥ मणिमय मुरली रत्नवेणु । बर्हिबर्ह वज्रविषाण । कर्वळयष्टि[८] कंबल कृष्ण । प्रिय म्हणोन हरि अर्पी ॥ ३७ ॥ विचित्र धातूंचे अंगराग । गुंजावतंस अतिसुरंग । तरुप्रवाळ सुमनें सुभग । गिरि हिमांगे[९] समर्पी ॥ ३८ ॥ ऐशा अनेक पदार्थश्रेणी । कृष्णा अर्पिल्या निर्जरगणीं । अवघे जयशब्दें गर्जोनी । लागती चरणीं कृष्णाच्या ॥ ३९ ॥ तेतीस देवताकुळें मोठीं । यालागीं म्हणिजे तेतीस कोटि । दशप्रयुतीं[१०] गणनागोठी । हे वृथा चावटी अबळांची ॥४४०॥ दिव्यैकादश[११] मध्यैकादश । अप्सु क्षितौ महिनैकादश । एवं अवघे देव त्रिदश । कोटि तेतीस या नांव ॥ ४१ ॥ एवं सर्वी आपुलालीं । कृष्णा ऐश्वर्यें समर्पिलीं । चरणसेवा संप्रार्थिली । विनयभावें बहुयत्नीं ॥ ४२ ॥ सहस्र सहस्र नमस्कार । घालूनि म्हणविती किंकर । अष्टवसु वेत्रधार । सेवेसि जुहार निवेदिती ॥ ४३ ॥ एवं ब्रह्मांड संपूर्ण । कृष्णचरणा अभिवंदून । निजवोळगें सावधान । आज्ञा वंदून कृष्णाची ॥ ४४ ॥ समस्त स्वर्गांचा अभिवेत्ता । जाणोनि निर्जरीं तत्त्वता । गोविंद या नामसंकेता । मुनिसंमतें स्थापिलें ॥ ४४५ ॥ धेनुगोप्ता धरणिगोप्ता । करणगोप्ता किरणगोप्ता । वेदगोप्ता वेधागोप्ता । वाङ्मयगोप्ता गोविंद ॥ ४६ ॥ एवं अखिलब्रह्मांडगोप्ता । गोइंद्र गोविंद तत्त्वता । दप्ता मारक बोधक सुप्तां । निववी तप्तां निजनामें ॥ ४७ ॥ ऐसा नामनिर्देश सुरीं । करूनि त्रहाटिल्या दिग्गजभेरी । दुंदुभिवाजंत्रांच्या गजरीं । चित्सुखलहरी जग भोगी ॥ ४८ ॥ औटकोटितीर्थोदक । स्वकरें आणी ग्रहनायक[१२] । महर्षींचा मंत्रघोक । पदजल सम्यक कृष्णाचें ॥४९॥

**पाठभेद :**—† ते ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ ढाल. २ अग्नि. ३ पालखी. ४ कुबेर. ५ वेगवान. ६ खोगिरासहित. ७ उंट. ८ हातांत धरण्याची काठी. ९ हिमवान् पर्वत. १० कोटि. ११ स्वर्गांतील अकरा. १२ सूर्य.

कामधेनूचें पयसेचन । पवित्र आकाशगंगाजीवन । ऐरावतीनें शुंडेकरून । केलें स्नपन कृष्णातें ॥ ४५० ॥ ते अद्यापि गोवर्धनीं । मानसीगंगा या अभिधानीं । तेथींच्या स्नानें पानें जनीं । कैवल्यभुवनीं समरसिजे ॥ ५१ ॥ तें सर्वांतें श्रीकृष्णतीर्थ । देता झाला अमरनाथ । कृष्णाज्ञेनें यथोचित । सुर समस्त पूजिले ॥ ५२ ॥ कृष्णकृष्णेति कृष्णेति । जे मज ऐसें नित्यशः स्मरती । नरकापासूनि तयांप्रति । मी श्रीपति उद्धर्ता ॥ ५३ ॥ ब्रह्मांडाचा अभ्युदय । अवघें कृष्णावतारकार्य । देऊनि सर्वां ऊर्जित अभय । त्रिजगीं विजय प्रकटिला ॥ ५४ ॥ विध्युक्त पूजूनि स्यंदन[1] । विविधबाळि समर्पून । कृष्णें केलें आरोहण । जाले सुरगण सन्नद्ध ॥ ४५५ ॥ मंडपाबाहीर पूर्वद्वारीं । मुहूर्तें निघतां कैटभारि । पूर्णकलश घेऊनि शिरीं । आल्या पुरंध्री शकुनार्थ ॥ ५६ ॥ विप्रकन्या सवत्सधेनु । सुस्नात सालंकृत द्विजगण । अक्षताकुशपुष्पें घेऊन । स्वस्तिवाचन पढताती ॥ ५७ ॥ उद्धृतदधिपयघृतभाजनें । संमुख दर्पणनिदर्शनें । अप्सरांचीं सुनर्तनें । मंगलगायनपूर्वक ॥ ५८ ॥ वाजंत्रांचा मंगल ध्वनि । घाव घातला निशाणीं[2] । स्वस्वभागीं सुरवरगणीं । सेना सज्जूनि आणिल्या ॥ ५९ ॥ अग्रभागीं सुरनायक । वरुण पार्ष्णिसंरक्षक । दक्षिणपक्षीं भूतांतक[3] । चाले कृतांत ससैन्य ॥ ४६० ॥ उत्तरपक्षीं अलकापति[4] । सहितस्वसैन्यसंपत्ति । गदामुद्गरशूलशक्ति । वीर गर्जती सावेश ॥ ६१ ॥ सुरेंद्राचे दक्षिणभागीं । मेषवाहन चतुःशृंगी[5] । स्वसेनेशीं कवची खड्गी । सिद्ध होऊनि चालिला ॥ ६२ ॥ निर्ऋति[6] घेऊनि राक्षसदळ । दिग्विभागें आपुलें स्थळ । रक्षूनि चाले पैं निश्चळ । प्रभुगोपाळ लक्षूनी ॥ ६३ ॥ वायव्यकोणीं जवनशील । कुरंगवर्णी तुरंग बहळ । महाविशाल अनिळदळ । सायुध चपळ चौताळे ॥ ६४ ॥ ईशान्यकोणीं ईश्वरसेना । घेऊनि समस्त पिशाचगणा । करिती भयानक गर्जना । शौर्यें कृष्णा सुचविती ॥ ४६५ ॥ छत्रें पल्लवध्वजनिशाणें । आतपत्राणें सूर्यपर्णें । रत्नदंडी कुंचे व्यजनें । ढळतां किरणें तळपती ॥ ६६ ॥ दाशार्ह म्हणिजे भक्तपति । गोविंदनामाची व्युत्पत्ति । अमरीं विविध केल्या स्तुति । भाट गर्जती जयघोषें ॥ ६७ ॥ सेनावलयविराजित[7] । सरथ सायुध रमाकांत । गोवर्धनाद्रिदक्षिणावर्त । परिक्रमित चालिला ॥ ६८ ॥ दिग्गजमाथां विशाल भेरी । ठोकितां सर्वत्र निरंतरीं । नादें ब्रह्मांडाभीतरी । स्वानंदलहरी उसळती ॥ ६९ ॥ ऐसी करूनि प्रदक्षिणा । येते झाले पूर्वस्थाना । पुन्हा सुरवर सांडूनि याना । श्रीकृष्णचरणा वंदिती ॥ ४७० ॥ यथाशक्ति यथामति । बद्धांजलि करिती स्तुति । चित्ररथादि तुंबुरुप्रभृति । सुस्वर गाती गंधर्व ॥ ७१ ॥

तत्रागतास्तुंबुरुनारदादयो गंधर्वविद्याधरसिद्धचारणाः ।
जगुर्यशो लोकमलापहं हरेः सुरांगनाः संननृतुर्मुदान्विताः ॥ २४ ॥

वरिष्ठ देवर्षि वैष्णव । नारदमुनि हें त्याचें नांव । नारद तुंबुरु हे गंधर्व । गायक अपूर्व सुरमान्य ॥ ७२ ॥ हाहाहूहूपर्वतप्रमुख । कुशल बृहत्सामगायक । रंगीं औडव खांडवप्रमुख ।

१ रथ. २ दुंदुभीवर. ३ यम. ४ कुबेर. ५ अग्नि. ६ निर्ऋतिदिशेचा स्वामी. ७ सेनेच्या मंडलानें शोभायमान.

स्वरकौतुकलास्यादि ॥ ७३ ॥ तेथ आले जे विद्याधर । चारण गुह्यक सिद्ध किन्नर । किंपुरुषसाध्य पुरःसर । रंगीं श्रीधर तोषविती ॥ ७४ ॥ श्रीहरीचीं अमल चरितें । जी श्रवणें पठनें हरिती दुरितें । स्मरणमात्रें करिती सरतें । परिचर्येतें हरिचरणीं ॥ ४७५ ॥ ऐसी लोकमलापहंतीं । यशें हरीचीं हरिजन गाती । सुरवनितांच्या अनेक पंक्ति । नृत्यें करिती अमराग्रीं ॥ ७६ ॥ *प्रम्रुलोचा नाम अप्सरा । स्वगणें सहित पुरंदरा । रंगीं रंजवी परमचतुरा । तानमानीं नर्तनीं ॥ ७७ ॥ अग्निमंडळीं अनुम्लोचा । नृत्या [3]शंकित उर्वशी जीच्या । स्वगणें सहित उच्चावेंचा । दावी नृत्याच्या कौशल्या ॥ ७८ ॥ यम अर्यमा चित्रगुप्त । स्वयूथेंशीं पुंजिकानृत्य । पहातां नटनाढ्यें विस्मित । रंगीं तटस्थ त्यां केलें ॥ ७९ ॥ विश्वाचीं नामें वराप्सरा । स्वगणें सहित नर्तनपरा । निर्ऋति चमूमाजि चतुरा । †र्वर्ष्मविकारा दर्शवी ॥ ४८० ॥ क्रतुस्थला स्वगणें सहित । वरुणापुढें करी नृत्य । चमूसहित प्रतीचीनाथ । रंजवीत वरलास्यें ॥ ८१ ॥ पवनवाहिनीमंडळाआंत । पूर्वचिती स्वगणें सहित । हावभाव कटाक्षयुक्त । रंगीं संगीत वोढवी ॥ ८२ ॥ कुबेरचक्रीं तिलोत्तमा । स्वर्गांगनांमाजि उत्तमा । गीतनर्तनीं निरसी श्रमा । कांति हेमासम जीची ॥ ८३ ॥ नामें अप्सरा जे मोहिनी । स्वसमुदायें परिवारूनी । ईशान रंजवी नर्तनीं । हरिगुणकथनीं कोविदा ॥ ८४ ॥ रंभा घृताची उर्वशी । मंजुघोषा आणि सुकेशी । सुरसा तरसा ‡कंदर्पशशी । रंगीं कृष्णासी रंजविती ॥ ४८५ ॥ एवं अप्सरासुनर्तनें । नारदादिसामगानें । वैष्णवांचीं हरिकीर्तनें । नामस्मरणें सर्वत्र ॥ ८६ ॥

तं तुष्टुवुर्देवनिकायकेतवो व्यवाकिरंश्चाद्भुतपुष्पवृष्टिभिः ।
लोकाः परां निर्वृतिमाप्नुवंस्त्रयो गावस्तदा गामनयन् पयोद्रुताम् ॥ २५ ॥

कृष्णाभिषेचनें समस्त । त्रिलोकी परमानंदभरित । गोविंदनामामृतें तृप्त । त्रितापरहित सुख भोगी ॥ ८७ ॥ आनंदसमृद्धिलक्षणें । तिहीं श्लोकीं बादरायणें । कथिलीं परीक्षितीकारणें । सावधमनें तें ऐका ॥ ८८ ॥ कृष्णाभिषेक पहावया नयनीं । गगनीं दाटल्या विमानश्रेणी । त्यामाजि श्रेष्ठ जे देवतागणीं । चक्रपाणि ते स्तविती ॥ ८९ ॥ निकाय म्हणिजे सुरसमुदाय । त्यांमाजि श्रेष्ठ जे ध्वज[6]प्राय । सहस्र सेनेंत दृश्य होय । केतु[7]न्यायें टळटळित ॥ ४९० ॥ तैसें विमानीं मुख्य मुख्य । पाहोनि कृष्णाभिषेकें कौतुक । अंतरीं दाटलें चित्सुख । स्तविती उत्सुक कृष्णातें ॥ ९१ ॥ स्वेदसर्वांगीं पाझरे । नेत्रीं आनंदबाष्प झरे । पुलकरोमांचित शरीरें । सप्रेमभरें कांपती ॥ ९२ ॥ शब्द विरोनि गेला वदनीं । सद्गदित कंठस्थानीं । स्वर जुमटती श्वास मूर्ध्नी-। माजीं रिघोनि कोंदला ॥ ९३ ॥ ते जिरविली सत्वावस्था । कृष्णस्वरूपीं जडली आस्था । यालागीं सावध करूनि चित्ता । पाहती तत्त्वता हरिवदन ॥ ९४ ॥ आपुलाल्या §पुष्पयानीं । बद्धांजलि ठेवूनि मूर्ध्नीं ।

---

**पाठभेदः**—* प्रम्लोचना ( मुंगीप्रत ); प्रम्लोचा ( उमरखेडप्रत ). † वर्ष्मी ( उमरखेडप्रत ). ‡ राशी ( मुंगीप्रत ); रासी ( उमरखेडप्रत ). § पुष्पक यानीं ( मुंगीप्रत ).

१ पापें. २ लोकांचें पाप हरणारें. ३ लज्जित. ४ अतिशय. ५ अंगविकार. ६ ज्यांत बहुतेक ध्वजच आहेत ते. ७ केतु म्हणजे ध्वज हे उंच असल्यामुळें सर्वांस दिसतात.

श्रीकृष्णातें स्तविती वदनीं । सरळा वाणी सुरवर्य ॥ ४९५ ॥ जयजय पुराणपुरुषोत्तमा । कमलामानसविश्रामधामा । जयजय अचिंत्यगुणगणग्रामा । जय जगदात्मा जगदीशा ॥९६ ॥ मन्मथमारक[1]मानससदना । ललनामानसवेधकवदना । शशिकरभंगुरसस्मितरदना । भवगजकदना कलुषारि ॥ ९७॥ जयजय कलिमळपरिहारका । पदजळपूता जडतारका । निजजनविपक्ष[2]संहारका । रक्षीं नरका पासाव ॥ ९८ ॥ ऐशा समस्तसुरवरगणीं । श्रीकृष्णाचे गुणवर्णनीं । प्रेमें ग्रथिल्या सुललित वाणी । अमोघ सुमनीं वर्षती ॥ ९९ ॥ नंदनवनीं चैत्रवनीं । मधुकाननीं वारुणवनीं । पिंगलवनीं गुह्यकवनीं । संभव सुमनीं वर्षती ॥ ५०० ॥ बिंदुसारसमानसभवें । माध्वीमाधववनसंभवें । ज्यांच्या सुवासें विखनसभवें[3] । भ्रमरभावें वेधिजे ॥ १ ॥ उमाविलासविश्रामवन । कमलाकंदर्पकानन । ब्रह्मयाचें वैधात्रवन* । वर्षती तद्गण तत्सुमनीं ॥ २ ॥ ऐशा अद्भुत सुमनवृष्टि । केल्या अमरीं श्रेष्ठश्रेष्ठीं । असंख्य कामधेनूंच्या थाटी । पयें भूपृष्ठीं भिजाविली ॥ ३ ॥ सहित व्रजींच्या समस्त धेनु । प्रेमें द्रवल्या आनंदोन । मोकळे चाऱ्ही स्रवती स्तन । भूति भिजोन पय वाहे ॥ ४ ॥ वृष्टिभरें वाहतां जळ । सरिता लोटती तुंबळ । तैसे दुग्धाचे कल्लोळ । वाहती केवळ भूपृष्ठीं ॥ ५०५ ॥ आपुला इंद्र झाला कृष्ण । जाणोनि संतुष्ट गोगण । परमानंदें द्रवला पूर्ण । तें व्याख्यान हें केलें ॥ ६ ॥ धरादेवी गोरूपिणी । आपुला इंद्र चक्रपाणि । जाणोनि तोषली अंतःकरणीं । पदार्थश्रेणी प्रसवली ॥ ७ ॥

नानारसौघाः सरितो वृक्षा आसन् मधुस्रवाः । अकृष्टपच्यौषधयो गिरयोऽबिभ्रदुन्मणीन् ॥ २६ ॥

मधुदुग्धादि इक्षुरस । ऐसे अनेक रसविशेष । वोघें वाहती बारा मास । सर्वां संतोष सर्वदा ॥ ८ ॥ दुग्धसरितांचिया कांठें । नवनीताचा कर्दम दाटे । इक्षुरसाच्या गंगातटें । वाळुवंटें शर्करेचीं ॥ ९ ॥ सर्व वृक्ष स्रवती मधु । कमलेसमान अवघ्या वधू । प्राणिमात्र झाले साधु । अगाध बोधु अबळांसी ॥ ५१० ॥ कुळबनांगरकर्षणाविणें । अमर्याद पिकती धान्यें । सर्व ऋतूंचीं फळें प्रसूनें । सुलभपणें सर्वत्र ॥ ११ ॥ ऊषरागिरिवरप्रस्तर[4]खडकें[5] । सर्वत्र धान्यसमृद्धि पिके । या वेगळीं धातुकनकें । रत्नें माणिक्यें गिरि स्रवती ॥ १२ ॥ धरा निर्धन नाहींच कोठें । परी कृष्णाचें ऐश्वर्य मोठें । पोटींचीं द्रव्यें रत्नसांठे । केलें प्रकट गिरिवरीं ॥ १३ ॥ ब्रह्मांडभुवनींचा चक्रवर्ती । जेथ क्रीडे तो श्रीपति । वैकुंठादिकसुरसंपत्ति । कां पां न येती त्या ठायां ॥ १४ ॥ सर्व तरुवर कल्पतरु । सर्व गिरिवर रत्नाकरु । सर्व वनचरनरकिन्नर । खेचर भूचर सुरसाध्य ॥ ५१५ ॥ पीयूषवाहिनी सरिता सर्व । सनकादिकां तो सुसेव्य ठाव । चिंतामणि जेथींचे ग्रांव । राबती अगर्व अणिमादि ॥ १६ ॥ शुकसारिका परस्परीं । सिद्धांतपूर्वपक्षोत्तरीं । संवादप्रबोधकुसरीं । मुक्ति चाऱ्ही

**पाठभेद :—** * वैधातृवन ( मुंगीप्रत ).

१ शंकराच्या मनांत राहणारा. २ शत्रु. ३ ब्रह्मदेव. ४ खाऱ्या जमिनी. ५ दगड.

नाचविती ॥ १७॥ उपनिषत्पाठें पारोंपत। घुमती सोहंबोधभरित। नाहं मम या बोधें नित्य। करिती नृत्य कलोंपी ॥ १८ ॥

कृष्णेऽभिषिक्त एतानि सत्त्वानि कुरुनंदन। निर्वैराण्यभवंस्तात क्रूराण्यपि निसर्गतः ॥ २७ ॥

ब्रह्मांडसाम्राज्यपट्टाभिषेक। कृष्णासि केला असतां देख। क्रूर प्राणीही सम्यक। निर्वैर निःशंक क्रीडती ॥ १९ ॥ धेनुव्याघ्र एके ठायीं। चाटिती बैसोनी शीतळ सायीं। अजाअविकांची नवाई। वर्तती सोयी वृकव्याघ्रां ॥ ५२० ॥ करी केसरी कुरंगें शुनक। खग पन्नग बिडाळें मूषक। निर्भय *घरीं जल पावक। काक कौशिकें निर्वैर ॥ २१ ॥ †इत्यादि अनेक निसर्गवैरें। टाकूनि सत्वें परस्परें। स्नेहें वर्तती सप्रेमभरें। इंद्र श्रीधर जालिया ॥ २२ ॥

इति गोगोकुलपतिं गोविंदमभिषिच्य सः। अनुज्ञातो ययौ शक्रो वृतो देवादिभिर्दिवम् ॥ २८ ॥

अभिषेककथोपसंहार। सुरभि आणि पुरंदर। विधिआज्ञेनें मुरलीधर। केला इंद्र देवेंशीं ॥ २३ ॥ गोशब्दार्थें समस्त स्वर्ग। गोकुलशब्दें गोगणवर्ग। यांतें वेत्ता अंतरंग। तो गोइंद्र गोविंद ॥ २४ ॥ ऐसी केली नामसंज्ञा। येथींचा अर्थ उमजे सुज्ञां। येरा प्राकृतां अल्पज्ञां। यदर्थीं प्रज्ञा न प्रकटे ॥ ५२५ ॥ एके रोमेंसि मुंगी डसे। ते त्वगिंद्रियासि जाणवे जैसें। तेचि इतरा देहीं स्पर्शे। तेणें न लँसे सुख दुःख ॥ २६ ॥ तैसें सर्वही स्वौपाधिक। ज्ञाते असती पृथक् पृथक्। कृष्ण जाणोनि सर्वात्मक। म्हणणें सम्यक गोविंद ॥ २७ ॥ ज्याचें ज्ञान जेथवरी। तो तेथवरी गोपन करी। जाणोनि सर्वज्ञ श्रीहरि। गोविंद गजरीं सुर गाती ॥ २८ ॥ शापविपत्ति जाणता भावी। तरी इंद्र अहल्या भोगिता केंवि। अल्पज्ञ म्हणोनि पडली गोवी। बुध गोसांवी गोविंद ॥ २९ ॥ शंकर भावी जरी जाणता। तरी भस्मासुरासि वर न देता। संकटीं पाळी अल्पज्ञता। सर्वज्ञ गोप्ता गोविंद ॥ ५३० ॥ भावी आपणा करिती कष्टी। ऐसी कळली असती गोष्टी। तरी शंखासुरादि असुरसृष्टि। सहसा पॅरमेष्ठी न सृजिता ॥ ३१ ॥ एवं विधिहरसंक्रंदन। स्वोपाधिपर्यंत अभिज्ञ। कृष्ण परमात्मा परिपूर्ण। त्रिकालज्ञ गोविंद ॥ ३२ ॥ पितरां भूतार्थ दर्शविला। वर्तमानार्थ प्रकट केला। भावी जाणोनि पांडवाला। उपाय सूचिला स्थळोस्थळीं ॥३३॥ नारदशाप गुह्यकांसी। भूतार्थ जाणोनि मानसीं। स्वयें उद्धरी यमलार्जुनांसी। हृषीकेशी सर्वज्ञ ॥ ३४ ॥ पूतनेचें वर्तमान। जाणोनि प्याला सगर स्तन। तीसि दिधलें सायुज्यसदन। एवं सर्वज्ञ गोविंद ॥ ५३५ ॥ एवं जाणोनि सर्वज्ञपति। ब्रह्मांडाची गोपनशक्ति। लक्षूनि श्रीकृष्णाचे

---

**पाठभेद :—*** धनि ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † मुंगी येथील पोथींत ' ऐसे सर्वही हर्षनिर्भर। स्वभीं नेणति आपपर ॥ सदा करिती जयजयकार ॥ ' असे चरण आहेत.

१ पारवे. २ मोर. ३ जवादी मांजर. ४ घुबड. ५ देवांनीं. ६ केंसाला. ७ न भासे. ८ आत्मसंबंधीं. ९ रक्षण. १० ब्रह्मा. ११ ज्ञाते. १२ मागील गोष्ट.

हातीं । नाथ समस्तीं स्वीकेला ।। ३६ ।। कृष्ण करूनि आपुला नाथ । विधिहरशक्रादि समस्त । होऊनि ऐश्वर्यें सनाथ । म्हणविती समर्थ तद्योगें ।। ३७ ।। मग करूनि जयजयकार । सर्वीं केला नमस्कार । तेथील अनुज्ञाप्रकार । सविस्तर परिसावा ।। ३८ ।। बद्धांजलि कृष्णाप्रति । आज्ञा मागतां सुरपति । कृष्णें कथिली रहस्ययुक्ति । निजएकांतीं नेऊनी ।। ३९ ।। जगत्रयाच्या परिपालना । अवतरलों हे जाणोनि सूचना । समयीं समयीं तदुपकरणा । वंदूनि आज्ञा अर्पिजे ।। ५४० ।। बाल-क्रीडेचा विनोद । जंववरी होय कंसवध । तंववरी निःशस्त्र मल्लयुद्ध । दैत्य विरुद्ध मारीन ।। ४१ ।। पुढें जरासंधेंशीं समर । होतां शस्त्रास्त्ररंहंवर[1] । तुवां पाठविजे सत्वर । संकेत मात्र जाणोनि ।।४२।। पुन्हा कालयवनाच्या समरीं । सिंधुगर्भीं नेतां पुरी । तेव्हां सर्वही सामग्री । सभा साजिरी आणावी ।। ४३ ।। आतां संभ्रम हा समस्त । दिव्यैश्वर्य पावो अस्त । गोपशैशवनाट्यें व्यस्त । मज प्रशस्त विचरणें[2] ।। ४४ ।। इतुका इंद्राशीं एकांत । करूनि मस्तकीं ठेविला हात । अंगीकारूनि तो संकेत । तेणें श्रीकांत वंदिला ।। ५४५ ।। समस्तांसि दिव्याभरणें । तांबूलादि दिव्य वसनें । दिव्य सुगंध अनुलेपनें । माळासुमनें समर्पिलीं ।। ४६ ।। सर्वीं साष्टांगनमनें केलीं । सुमनें हरिचरणीं गोविलीं । मूर्ति हृत्कमळीं ठेविली । मग आदरिलीं प्रयाणें ।। ४७ ।। ऐसा समस्त सुरांसहित । लब्धानुज्ञ[3]* अमरनाथ । गणगंधर्वीं परिवारित । जाता झाला निजधामा ।। ४८ ।। कामधेनुनिर्मित विभव । इच्छामात्रें लोपलें सर्व । स्वधामा गेले समस्त देव । श्रीवासुदेव वंदूनी ।। ४९ ।। यथापूर्व गोवर्धन । यमुना गोकुल वृंदावन । धेनु गोप गोपी स्वजन । मानिती स्वप्नसंभ्रम[4] तो ।। ५५० ।। मुळीं विस्तार न दिसे इतुका । ज्ञणें अल्पज्ञ घेती शंका । ज्यांसि अनुक्रम हा ठावुका । ते या विवेका जाणती ।। ५१ ।। नोहे निराधार वैखरी । पहावें नारदपांचरात्रीं[5] । मानसपद्धती माझारी । सविस्तारीं उत्सव हा ।। ५२ ।। वाखाणितां दशमस्कंध । पांचरात्रेंशीं संबंध । सहसा न मनावा विरुद्ध । ऐका प्रसिद्ध उपपत्ति ।। ५३ ।। †राम रावण मारूनि रणीं । सुरनरउरगां साम्राज्यसदनीं । बिभीषण लंके संस्थापूनी । सीता आणुनी नृप जाला ।। ५४ ।। इतुकें संकेतें रामायण । ज्यांसी सविस्तर पूर्वीं श्रवण । याचिवरूनी त्यां उमजे खुण । येरां निरूपण शतकोटी ।। ५५५ ।। समरांगण कां द्विजतर्पण । एका शब्दें होय कथन । तेंचि कथितां विस्तारून । वाढे व्याख्यान बहु फार ।। ५६ ।। योद्धे भोक्ते पदार्थनांवें । प्रेरणअर्पणविधान बरवें । कथितां निर्मूळ कैंवि म्हणावें । तें जाणावें तज्जनित ।। ५७ ।। श्रोता परीक्षिति मरणोन्मुख । जाणोनि संकेतें वदला शुक । जैं श्रोते वक्ते स्वस्थ सविवेक । तैं टीका सम्यक् कां न कीजे ।। ५८ ।। श्रोते सर्वज्ञ समर्थ । तेथ परिहार हा किमर्थ । एवं टीका हे यथार्थ । पूर्ण परमार्थ हरिवरें ।। ५९ ।। ऐसा कथूनि कृष्णाभिषेक । परीक्षितीसि म्हणे शुक । कृष्णलीला अपूर्व ऐक । स्वस्थ नावेक होउनी ।। ५६० ।। राया असार हा संसार । यामाजि नवविधभजन सार । त्याही साराचें निजसार । कीर्तनश्रवण हरीचें ।। ६१ ।। तें फावलें आम्हां

पाठभेदः—* ज्ञा ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † रामें ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ रथ. २ फिरणें. ३ ज्यास परवानगी मिळाली तो. ४ स्वप्नांतील खेळ. ५ हा एक वैष्णवांचा प्रकार.

तुम्हां । या भाग्यासि नाहीं सीमा । *तेथ ज्यांचा निःसीम प्रेमा । पुरुषोत्तमा प्रियतम तो ॥ ६२ ॥ यावरी कथा वक्ष्यमाण[1] । †नंद अकाळीं करितां स्नान । वरुणें नेला तो बांधोन । कृष्णें जाऊन सोडविला ॥ ६३ ॥ ऐशी देखूनि अद्भुत शक्ति । बल्लवीं प्रार्थितां कृष्णाप्रति । वैकुंठदर्शनाची प्राप्ति । करी श्रीपति तयांतें ॥ ६४ ॥ तये कथेचिया श्रवणा । श्रोतीं सावध कीजे ‡मनना । सप्रेम-श्रवणीं गुंततां ¶मना । समस्त विघ्ना उपशमन ॥ ५६५ ॥ ब्रह्मांडसाम्राज्यसिंहासनीं । एकनाथ सर्वां मूर्ध्नि । चिदानंदें विजयध्वनि । स्वानंद गगनीं न समाये ॥ ६६ ॥ §पट्टाभिषिक्तगोविंदाव्हा[2] । ऐकोनि संतोष सर्वीं सर्वां । करितां सप्रेम ‖रसवर्षावा । दयार्णवातें सुखभरतें ॥ ६७ ॥ ऐशी श्रीमद्भागवतीं । अठरासहस्र संहितागणती । दशमस्कंधीं नृपाप्रति । शुकभारती[3] निरूपी ॥ ६८ ॥ तो हा अध्याय सत्ताविसावा । भोगिजे स्वसत्ताविसांवा । हृदयीं स्मरोनि चोव्विसावा । दयार्णवा अनुलक्षें ॥ ६९ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायाममरेंद्रहरब्रह्मेंद्रसाम्राज्यगोविंदपट्टाभिषेको↓ नाम सप्तविंशतितमोऽध्यायः ॥ २७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक २८ ॥ टीका ५६९ ॥ एवंसंख्या ५९६ ॥ ( सत्ताविसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १३८५४ ).

सत्ताविसावा अध्याय समाप्त.

---

**पाठभेद :**—* जेथ ( उमरखेडप्रत ). † नंदे ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡ मना ( मुंगीप्रत ). ¶ जना ( मुंगीप्रत ) § पट्टाभिषेक गोविंद अव्हा ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‖ सुख ( मुंगीप्रत ). ↓ पट्टाभिषेक वर्णनो नाम ( मुंगीप्रत ).

१ पुढे सांगावयाची. २ नाम. ३ शुकाचार्यांची वाणी.

कृष्णदयार्णवकृत

# ह रि व र दा

## अध्याय २८ वा

श्रीगोविंदात्मने नमः । गोविंदा जी अंतरंगा । अंतर्बाह्य[1]रहितलिंगा । लिंगवर्जिता भेदभंगा । नमो अभंगा सन्मात्रा ॥ १ ॥ गोशब्दार्थें बोलिजे स्वर्ग । तो शुद्धसुकृतसुखविभाग । येर प्राकृत दुःख भोग । प्रसवे अस्वर्ग्य[2] असुकृत ॥ २ ॥ महादैत्यांच्या आगमनीं । स्वर्गौकसां होय पळणी । परस्परें समरांगणीं । झोंटधरणी[3] भीडती ॥ ३ ॥ हाहाकार पराजय । होतां वैभव दुःखमय । यालागीं शुद्धसुकृतालय । स्वर्ग होय तव धाम ॥ ४ ॥ तो सच्चित्सुखात्मा अभिन्न । अंतरंग श्रीभगवान । वरीवर्तित्व[4]संबोधन । जी म्हणोन सूचिलें ॥ ५ ॥ स्वर्ग आणि स्वर्गवासी । भिन्न म्हणोनि पतन त्यांसी । तूं सच्चित्सुखघनराशि । भेदग्रासी अभिन्न ॥ ६ ॥ एकरसाचें तूं लिंग । तेथ कैंचे सबाह्यभाग । मिथ्या अविद्याकल्पनायोग । तो बहिरंग भवबोध ॥ ७ ॥ मोतीं फोडोनि डांक देणें । विशेष श्लाघ्यता तद्भूषणें । किंवा शोभे अखंडपणें । हें विवरणें मतिमंतीं ॥ ८ ॥ माया-जनित रूप नाम । गुणमयी हें मायेसि नाम । गुणचिह्नांचा अनुक्रम । भवसंभ्रम अवघा हा ॥ ९ ॥ चिह्न म्हणिजे गुणांचें लिंग । गुणविनाशें पावे भंग । अगुण अगोचर अभंग । नित्य निःसंग निर्मल तूं ॥ १० ॥ एवं वर्तसी सन्मात्रपणें । तिये तव प्राप्तीकारणें । विविधापरींचीं विधिसाधनें । शास्त्रें पुराणें प्रशंसिती ॥ ११ ॥ घेतां तयांचा मागोवा । अधिका अधिका पडे गोवा । मग श्रुतीनें तुझा धांवा । केला कणवा अबळांच्या ॥ १२ ॥ अबळें अनाथें भाविकें । भ्रमलीं दृश्यें काल्पनिकें । नोहे बाह्य हें ठावुकें । अंतर्विवेकें सांडवलीं ॥ १३ ॥ ऐसियांची ये काकुलती । तुझा धांवा करिती श्रुति । तैं तूं गुणांची घेऊनि बुंथी[5] । धरिसी व्यक्ति गुरुवर्या ॥ १४ ॥ मग ते तुझिया चरणसेवा । लाहती अभेदसन्मात्र ठेवा । सभाग्य म्हणोनि येरां हेवा । भवीं निर्दैवां प्रयत्नें ॥ १५ ॥ ऐसियां

१ आंत किंवा बाहेर ज्यास चिह्नें नाहींत तो. २ स्वर्गप्राप्तीला साधनभूत नव्हे तो. ३ युद्धांत एकमेकांचे अंगास झोंबून केस धरणें. ४ नित्य अस्तित्व. ५ बुरखा.

दुर्लभ तुझी प्राप्ति । सदैवभाग्यें संमुख होती । त्यां तूं बोधूनि निजात्मयुक्ति । बाह्यप्रवृत्ति सांडविसी ॥ १६ ॥ ते निजात्मयुक्तिबळें । निःशेष छेदूनि अविद्यामूळें । सांडितां कल्पनेचे उमाळे । एके वेळे हारपती ॥ १७ ॥ मग सबाह्य भेदरहित । भोगिती अद्वैतपद अच्युत । तो तूं आम्हां करुणावंत । निज एकांत बोधिसी ॥ १८ ॥ तंव सद्गुरु म्हणती असो । या स्तवनाचा पैं अतिसो[1] । आज्ञापिले कार्यीं वसो । आन नुमैसो[2] तव प्रज्ञा ॥ १९ ॥ ब्रह्मांडसाम्राज्यपट्टाभिषेक । अमरीं कृष्णासि सम्यक । करितां देखोनि नंदप्रमुख । पशुप सकळिक तोषले ॥ २० ॥ नंदनंदन नोहे हरि । ज्याच्या ऐश्वर्याची थोरी । वंदिजे ब्रह्मादि निर्जरीं । तो व्रजपुरीं गोगोप्ता ॥ २१ ॥ इतुकी सत्ताविसाव्यांमाजीं । कथा कथिली नृपसमाजीं । यावरी काय वर्तलें व्रजीं । जें गदितें[3] मुखाब्जीं शुकाचे ॥ २२ ॥ त्याची उपलवूनियां टीका । प्रकट परिसवीं भाविकां । हरिगुणश्रवणें अक्षयसुखा । पाववीं लोकां हरिवरें ॥ २३ ॥ ऐसी आज्ञा सद्गुरुवदनीं । निघतां सवेग धरूनि मूर्ध्नीं । श्रीपद हृत्कमळीं चिंतूनी । केली व्याख्यानीं प्रवृत्ति ॥ २४ ॥ मग म्हणें जी देशिकोत्तमा । अखिल अविकार तूं विश्वात्मा । श्रोतृत्व वक्तृत्व उभयप्रेमा-। माजि स्वधामा अवतरवीं ॥ २५ ॥ इतुक्या भांडवलाचेनि बळें । प्रज्ञा व्याख्यानीं पाल्हाळे । प्रमेयच्छाये सुशीतळे । श्रवणसोहळे प्रेमळां ॥ २६ ॥ यावरी अठ्ठाविसाव्यामाजीं । अल्पद्वादशीसाधनकाजीं । यमुनाजीवनीं नंद सहजीं । स्नान करितां निशिगर्भीं ॥ २७॥ ते जाणूनि आसुरी वेळा । वरुणदूतीं नंद नेला । कृष्णें जाऊनि तो आणिला । तैं कृष्ण पूजिला वरुणानें ॥ २८ ॥ नंदें स्वजना इतुकें कथितां । तिहीं प्रार्थिलें कृष्णनाथा । जाणोनि त्यांचिया मनोरथा । दावी तत्वता वैकुंठ ॥ २९ ॥ इतुकी कथा ये अध्यायीं । श्रवणद्वारें हृदयालयीं । सांठवितां शेषशायी । होणें कायी उरलेंसे ॥ ३० ॥ ते कथेच्या निरूपणीं । शुक म्हणे कुरुकुळतरणि । सावध होऊनियां श्रवणीं । ऐकें करणी कृष्णाची ॥ ३१ ॥

श्रीशुक उवाच—एकादश्यां निराहारः समभ्यर्च्य जनार्दनम् ।
स्नातुं नंदस्तु कालिंद्यां द्वादश्यां जलमाविशत् ॥ १ ॥

सम्यक उचलूनि गोवर्धन । केला स्ववश संक्रंदन । आतां करूनि नंदमोक्षण । स्ववश वरुण हरि करी ॥ ३२ ॥ नंद वसूचा अवतार । विष्णुभजनीं प्रेमादर । तेणें हरिदिनें[4] निराहार । नेला साचार व्रतनियमें ॥ ३३ ॥ प्रातर्विधि शौचाचरण । स्नानसंध्या सुरार्चन । नित्याह्निक संपादून । *हरिपूजनव्रतांग ॥ ३४ ॥ महामहोत्साहगजरीं । अभ्यर्चूनि कैटभारि । द्विजजनसज्जनसपरिवारीं । हरिजागरीं निशा क्रमिली ॥ ३५ ॥ कळामात्र[5] तिथीची व्याप्ति । अरुणोदयीं द्वादशी होती । म्हणोनि सादर पारणार्थी । ब्राह्मणपंक्तिपूर्वक ॥ ३६ ॥ स्नानसंध्या औपासन । विष्णुपूजन पंचमहायज्ञ । द्विजार्चनादि करितां जाण । तिथिलंघन झणें घडे ॥ ३७ ॥ म्हणोनि शास्त्राचेनि बळें ।

---

**पाठभेद :—*** करी ( मुंगीप्रत ).

१ अतिशय ( = सद्‌गुण ). २ न जाणो. ३ बोललेले. ४ एकादशीचा दिवस. ५ तिथीचा सोळावा भाग.

समय जाणोनियां व्रजपाळें । यमुनेमाजीं आसुरी वेळे । अतिचापल्यें प्रवेशला ॥ ३८ ॥ तंव वरुणाचे असुरगण । गुह्यक यक्ष राक्षस जाण । त्रिविध करिती जळरक्षण । वंदूनि शासन वरुणाचें ॥ ३९ ॥

तं गृहीत्वाऽनयद्भृत्यो वरुणस्यासुरोंऽतिकम् । अविज्ञायाऽऽसुरीं वेलां प्रविष्टमुदकं निशि ॥ २ ॥

त्या वरुणभृत्यें[१] अकस्मात । जळीं नंदातें धरूनि त्वरित । आसुरी सभेसि केला प्राप्त । तिहीं वृत्तांत विवरिला ॥ ४० ॥ नेणोनि शास्त्रनिर्दिष्ट काळा । मानूनि सामान्य आसुरी वेळा । दूतें वृथा नंद आणिला । आम्हां दंडिला हा न वचे ॥ ४१ ॥ मग बांधूनि वरुणपाशीं । नंद अर्पिला वरुणापाशीं । तेणें ऐकोनि वृत्तांतासी । निजमानसीं विवरिलें ॥ ४२ ॥ नंदाचिये सोडवणे । येथ कृष्णाचें घडेल येणें । सफळ भाग्य माझें तेणें । तरी हें जिणें धन्यतर ॥ ४३ ॥ वरुणें इतुकें विवरूनि मनीं । नंद निवांत ठेविला भुवनीं । आतां येईल चक्रपाणि । मार्ग नयनीं लक्षितसे ॥ ४४ ॥ तंव येरीकडे बल्लवगण । नंदें यमुनेसि करितां स्नान । प्रथम केलें निमज्जन[२] । उन्मज्जन[३] न देखती ॥ ४५ ॥ तेणें घाबिरे झाले पोटीं । अंग टाकिती वाळवंटीं । एक धांविले उठाउठीं । करिती वाक्पटीं महाशंख ॥ ४६ ॥

चुक्रुशुस्तमपश्यंतः कृष्ण रामेतिगोपकाः । भगवांस्तदुपश्रुत्य पितरं वरुणाहृतम् ॥ ३ ॥

व्रजीं ऐकोनि हाहाकार । यशोदा रोहिणी सपरिवार । आणि बल्लव लहान थोर । व्रज समग्र गजबजिला ॥ ४७ ॥ एक पिटिती ललाटें । एक शंख करिती नेटें । एक हृदयीं घालती गोटे । धरूनि पोटें विलपती ॥ ४८ ॥ ऐसा सशोक व्रजींचा जन । नधरतें[४] पातला यमुनापुलिन । जेथ नंद झाला निमग्न । तेथ धुंडून पाहती ॥ ४९ ॥ कितिएक बुडिया देती जळीं । निमग्न होऊनि शोधिती तळीं । कितिएक धीवर शर्फरजाळीं[५] । घालूनि घरँडुळी[६] घेताती ॥ ५० ॥ एक म्हणती व्रजनायका । आम्हां वोपोनि महाशोका । तूं गेलासि कवण्या लोका । स्त्रियां बाळकां सांडूनी ॥ ५१ ॥ करूनि निर्जला एकादशी । हरिजागरीं सारिली निशी । उशीर झाला पारण्यासी । कां पां नयेसी व्रतस्था ॥ ५२ ॥ ब्राह्मण पूर्वीं आमंत्रिले । तेही परम क्षुधित झाले । तटस्थ पंक्तीसी बैसले । हें कां न कळे तुजलागीं ॥ ५३ ॥ गोठणीं गाई हुंबरती । लेकुरें वांसुरें आक्रंदती । गोपी आक्रोशें विलपती । कोठें व्रजपति गेलासी ॥ ५४ ॥ यशोदा म्हणे नंदराया । मोकळा केशीं झाडीन पायां । रुसोनि न वचें आणिका ठायां । आमुची माया सांडूनी ॥ ५५ ॥ रामकृष्णांची आवडी । न विसंबसी तूं अर्ध घडी । आजि कां केली अनावडी । देऊनि बुडी यमुनेंत ॥ ५६ ॥ क्षुधा लागली उभयबाळां । लोटली पारणियाची वेळा । धांवूनि येईं उतावेळा । परम स्नेहाळा व्रजपते ॥ ५७ ॥ ऐसे विलपती व्रजींचे जन । तंव उपनंद आणि बृहद्भान । सुनंदसुभद्रादि वृषभान । तिहीं श्रीकृष्ण प्रार्थिला ॥ ५८ ॥ एक विनविती संकर्षणा । एक म्हणती स्वामी कृष्णा । लोकत्रयाचा तूं राणा ।

---

१ वरुणदूतानें. २ बुडी मारणें. ३ वर येणें. ४ त्वरित. ५ माशांच्या जाळीं. ६ झाडा.

विदित सर्वज्ञा तुज अवघें ॥ ५९ ॥ तूं व्रजाचा नाथ शिरीं । असतां बाधी शोकलहरी । इंद्र वर्षतां धरूनि गिरि । तां व्रजपुरी वांचविली ॥ ६० ॥ आजि येथ नंदाविणें । समस्त विलपती दीनवदनें । कळवळूनियां अनाथकरुणें । करीं धावणें कृपाळा ॥ ६१ ॥ ऐसें प्रार्थितां गोपगण । तें ऐकोनि श्रीभगवान् । षड्गुणैश्वर्यसंपन्न । करुणापूर्ण कळवळिला ॥ ६२ ॥ जरी घेतली पशुपबुंथी । तऱ्ही अचिंत्यैश्वर्यशक्ति । सर्वज्ञ विवरूनि पाहे चित्तीं । तंव देखिली भक्ति वरुणाची ॥ ६३ ॥ आपुल्या दर्शनाचिया आर्तीं[2] । वरुणें नेलें नंदाप्रति । ऐसें जाणोनियां श्रीपति । मानी विनति पशुपांची ॥ ६४ ॥ देऊनि स्वजना अभयदान । यमुनेजळीं प्रवेशोन । सवेग *ठाकिलें वरुणभुवन । वरुण देखोन हरिखेला ॥ ६५ ॥

तदंतिकं गतो राजन् स्वानामभयदो विभुः । प्राप्तं वीक्ष्य हृषीकेशं लोकपालः सपर्यया ॥
महत्या पूजयित्वाऽऽह तद्दर्शनमहोत्सवः ॥ ४ ॥

विभु म्हणिजे ऐश्वर्यवंत । स्वसामर्थ्यें सर्वगत । भूजळअनळा[3]निळनभांत । रिघतां संतत निर्भय तो ॥ ६६ ॥ व्रजीं ठेवूनि बळरामासी । आपण गेला वरुणापाशीं । वरुणें देखूनि श्रीकृष्णाशीं । साष्टांगेंशीं वंदिला ॥ ६७ ॥ बैसवूनियां सिंहासनीं । दिव्योपचार सिद्ध करूनी । परमानंदें †निर्भर[4] मनीं । कृष्णार्चनीं प्रवर्तला ॥ ६८ ॥ शाण्णव वाद्यांचा गजर । गंधर्व गाती साम सुस्वर । तान आलापिती किन्नर । ताल धरिती किंपुरुष[5] ॥ ६९ ॥ रंभा मोहिनी सुकेशा । मेनका उर्वशी मंजुघोषा । घृताची तिलोत्तमा सुवेशा । अमरवेशा नाचती ॥ ७० ॥ मखरें तोरणें दीपमाळा । रत्नमय रंगवल्ली सोज्वळा । सन्निध घेऊनि महर्षिपाळा । परम सोहळा मांडिला ॥ ७१ ॥ हेमरत्नांचे भाजनीं । श्रीकृष्णांघ्रि[6] प्रक्षाळूनी । वरुणें सपत्नीकें वंदुनी । दिव्यासनीं प्रतिष्ठिलें ॥ ७२ ॥ दिव्यपरिमळविलेपनें । वरुणभुवनींचीं दिव्य सुमनें । ज्यांच्या सुगंधें सुरवरघ्राणें । मानिती पारणें जन्माचें ॥ ७३ ॥ मृगमदबिडालसंभवमद । अनर्घ्य सुमनांचे आमोद[7] । सौरभ्यद्रव्यें अनेक विशद । तिहीं श्रीपद पूजिलें ॥ ७४ ॥ धूप दीप नैवेद्य नाना । फलतांबूलादि दक्षिणा । करूनि वेदोक्त नीराजना[8] । मंत्रप्रसूना अर्पिलें ॥ ७५ ॥ नमनें करूनि साष्टांग । परिमळ द्रव्यें सांगोपांग । देऊनि कृष्णासि अभ्यंग । पुसिलें अंग शुभवसनीं ॥ ७६ ॥ अग्निधौत[9] पीतांबरें । रत्नाभरणें मनोहरें । समर्पिलीं परमादरें । सलिलेश्वरें[10] श्रीरंगा ॥ ७७ ॥ रत्नपादुका अर्पूनि चरणीं । बैसवूनियां दिव्यासनीं । मृगमदकेशरहरिचंदनीं । तिलक रेखिले दिव्यांगीं ॥ ७८ ॥ दिव्यसुमनांचिया माळा । आपाद वैजयंती गळां । सुगंधद्रव्यें परिमळउधळा । वरुणें गोपाळा अर्पिलीं[11] ॥ ७९ ॥ धूप दीप एकारती । अनेकनैवेद्यनिष्पत्ति । समर्पूनि कृष्णाप्रति । उत्तरापोषणा अर्पिलें ॥ ८० ॥ फल तांबूल सुदक्षिणा । पुष्पांजलि नीराजना ।

**पाठभेद :--** * टाकिले ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † निर्भय ( मुंगीप्रत ).

१ त्वां. २ उत्कंठेनें. ३ अग्नि व वायु. ४ पूर्ण. ५ अश्वमुखाचे देवविशेष. ६ श्रीकृष्णाचे पाय. ७ सुवास. ८ आरती. ९ अग्नीप्रमाणें स्वच्छ. १० जलाधीश वरुण. ११ ठेविलें.

स्तुतिस्तवनें प्रदक्षिणा । अनेक प्रणति दंडवतें ॥ ८१ ॥ कृष्णदर्शनमहोत्सव । आंगीं आनंदाविर्भावें । बद्धांजलि पैं स्वयमेव । वासुदेव स्तवितसे ॥ ८२ ॥

वरुण उवाच —— अद्य मे निभृतो देहोऽद्यैवार्थोऽधिगतः प्रभो । त्वत्पादभाजो भगवन्नवापुः पारमध्वनः ॥ ५ ॥

वरुण म्हणे विभो समर्था । तवानुग्रह माझिये माथां । तेणें पावलों सकळ अर्था । तें यथार्थ परियेसीं ॥ ८३ ॥ आजीच देह धरिला सत्य । कीं तव पदभजन झालें प्राप्त । भजनाविण जें जीवित । तें अपवित्र *प्रेतापरी ॥ ८४ ॥ षड्गुणैश्वर्यसंपन्न । तो तूं सुलभ आजि भगवान । तेणें त्रिजगीं धन्य मान्य । झालों संपूर्णविभुत्वें ॥ ८५ ॥ सर्वरत्नाकरांचा पति । कुबेरा तुल्य मत्संपत्ति । असतां दारिद्र्य माझे चित्तीं । न पवे विश्रांति ऐश्वर्यें ॥ ८६ ॥ आजि संपूर्णमनोरथ । जे कीं झालों अधिगतार्थ । सफलसाधनसंपत्तिवंत । परम पुरुषार्थ पावलों ॥ ८७ ॥ आजि साधनीं कृतार्थता । अर्थें संतृप्ति मनोरथा । आजि साफल्य मम जीविता । तुझेनि भगवंता पदभजनें ॥ ८८ ॥ पूर्णासि अपूं ऐसी वस्तु । पाहतां प्रज्ञा पावे अस्तु । यालागीं मौनें निवांत । माझें दंडवत तव चरणा ॥ ८९ ॥

नमस्तुभ्यं भगवते ब्रह्मणे परमात्मने । न यत्र श्रूयते माया लोकसृष्टिविकल्पना ॥ ६ ॥

म्यां जें केलें दंडवत । तो अभिप्राय इत्थंभूत । कायावाचामनेंसहित । अर्पिलों निवांत तव चरणीं ॥ ९० ॥ अचिंत्यैश्वर्य अनंत । निरतिशयें सामर्थ्यवंत । तो तूं परिपूर्ण भगवंत । भावें दंडवत तुज माझें ॥ ९१ ॥ यालागीं भावें करूनि नमन । केलें आत्मनिवेदन । सबाह्य व्यापक तूं सर्वज्ञ । अंतर जाणोन तुष्टसी ॥ ९२ ॥ भगवत्पदाचा उच्चार । पृथगैश्वर्यपरिहार । करूनि नमिला कमलावर । स्वगतोद्गार अवधारा ॥ ९३ ॥ ब्रह्मणे म्हणोनि केलें नमन । कीं ब्रह्म बृहत्वें परिपूर्ण । अखिलांडात्मकाधिष्ठान । तें मी अभिन्न सहजेंची ॥ ९४ ॥ जरी तूं पूर्वींच अभिन्न मजशीं । तरी कायसा नमन करिसी । ऐसें न म्हणावें हृषीकेशी । प्रार्थनेशीं अवधारीं ॥ ९५ ॥ मळिनसत्त्वाचें आवरण । तद्गतदेवतात्मा मी वरुण । तूं परमात्मा परिपूर्ण । §मायावरणवर्जित ॥ ९६ ॥ जया स्वरूपाचे ठायीं । गुणत्रयाची वार्ता कांहीं । उपनिषदर्थें ऐकिली नाहीं । मा कैंची गुणमयी भवभ्रांति ॥ ९७ ॥ सृजनाप्ययादि घडामोडी । प्रणवाकारें दावी प्रौढी । ते मूळमायाही बापुडी । न लभे सवडी तुजमाजीं ॥ ९८ ॥ म्हणोनि कायावाचामनें । वित्तें जीवितें अर्थें प्राणें । छेदूनि पृथग्विकल्पने । अंगीकरणें निजशरणा ॥ ९९ ॥ इत्यादि करूनि अभिवंदना । यावरी कथी स्वदौर्जन्या । विश्वव्यापका जगज्जीवना । भाकी करुणा क्षमापनीं ॥ १०० ॥

---

**पाठभेद** — * प्रेत ज्यापरी ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). § मायाआवरण ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ आनंदाची उत्पत्ति. २ समुद्रांचा. ३ ज्याचे मनोरथ सफल झाले तो. ४ आपलें सर्वस्व ईश्वराधीन करणें. ५ रजस्तमांनीं दूषित सत्त्व. ६ ब्रह्मस्वरूपाकारानें.

अजानता मामकेन मूढेनाकार्यवेदिना । आनीतोऽयं तव पिता तद्भवान् क्षंतुमर्हति ॥ ७ ॥

**न जाणोनि माझिया भृत्यें । तुझा जनक आणिला येथें । एवढा ममापराध समर्थें । क्षमा सर्वार्थें करावा ॥ १ ॥ काय न जाणोनि जरी हें पुससी । तरी ऐकावें इयेविशीं । ब्रह्मयाची[१] आज्ञा जैशी । ते तुजपाशीं कथीतसें ॥ २ ॥ यक्ष राक्षस सृजिता* द्रुहिणा* । तिहीं प्रार्थिलें क्षुधापहरणा । तो आज्ञापी जळरक्षणा । आत्मपोषणा तद्योगें ॥ ३ ॥ मज दिधलें जलाधिपत्य । म्हणोनि केले माझे भृत्य । येरवीं आसुरी प्रकृतिमंत । जात्या दैत्य महाक्रूर ॥ ४ ॥ पूर्वरात्रीचा प्रहर एक । अपरनाडिका[२]पंचक । या वेगळी निशी सम्यक । मरुद्गण निष्टंक रक्षिती ॥ १०५ ॥ ऐसी नियत जाणोनि रजनी । जळीं प्रवेशों नये कोण्ही । प्रवेशती त्यां महाविघ्नीं । आसुरीं मद्गणीं त्रासिजे ॥ ६ ॥ ऐसी सर्वत्र सामान्याज्ञा । विशेष कथिलें विधिविधाना । तें तूं ऐकें जनार्दना । शंभुशासना[३] व्रतनियमीं ॥ ७ ॥**

( व्रतं विधानोक्तम् ) ' कलार्धा द्वादशीं दृष्ट्वा निशीथादूर्ध्वमेव हि ।
आमध्याह्नाः क्रियाः सर्वाः कर्तव्याः शंभुशासनात ॥ '

**शंभु सप्रेम वैष्णव व्रती । अनुल्लंघ्य तच्छासन त्रिजगतीं । अस्मदादिकां सर्वांप्रति । मान्य निश्चिती शिवाज्ञा ॥ ८ ॥ सोळावा जो तिथीचा अंश । कळा ऐसें बोलिजे त्यास । तदर्धही द्वादशीस्पर्श । व्रतविशेष तो काळ ॥ ९ ॥ ऐशिये संधी पारणा पडे । तेव्हां नित्याह्निक कैसें घडे । ऐसें जाणोनि सांकडें । चंद्रचूडें नियमिलें ॥ ११० ॥ मध्यरात्रीं नाम निशीथ । ते टाकूनि निशी उर्वरित । मध्याह्नावधि क्रिया ज्या नित्य । त्या ते रात्रीं साराव्या ॥ ११ ॥ तेथींचें काळ आकर्षण । संक्षेपत: कर्माचरण । ते सांगतासिद्धि पूर्ण । करिती तपोधन तपोलोकीं ॥ १२ ॥ ऐसें असतां द्वादशी लंघी । तो आतुडे अघनिदाघीं[४] । म्हणोनि नंद यमुनावोघीं । यथोक्तकाळीं प्रवेशला ॥ १३ ॥ हें नेणोनि मम किंकरें । आसुरें नंद आणिला निकरें । आसुरी वेळा या संस्कारें । शास्त्रविचारें नुमजोनी ॥ १४ ॥ न विचारितां आसुरगणें । अपराध केला मूढपणें । त्या अपराधें मजकारणें । करुणापूर्णें नुबगिजे ॥ ११५ ॥ तूं तव करुणेचा सागर । आम्हां जाणोनि स्वकिंकर । क्षमा करणें हा विचार । योग्य साचार तुजलागीं ॥ १६ ॥**

गोविंद नीयतामेष पिता ते पितृवत्सल । ममाप्यनुग्रहं कृष्ण कर्तुमर्हस्यशेषदृक् ॥ ८ ॥

**नव्हां म्हणसी मम किंकर । तरी तूं जैं झालासि गवेंद्र‡ । तैचि अस्मदादि सर्व अमर । झालों अनुचर गोविंद ॥ १७ ॥ गोविंद ऐसिया नामोच्चारें । इतुकें सूचिलें सर्वेश्वरें । जें अभिषेककाळीं स्थापिलें शक्रें । संबोधूनि त्या नामें ॥ १८ ॥ मग काढूनि वारुणीमाया । पाशमोचन**

**पाठभेद** :— *सृजितो द्रुहिण ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡ गोइंद्र ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ ब्रह्मा. २ दुसऱ्या प्रहराच्या पांच घटिका. ३ शंकराची आज्ञा. ४ पापरूप तापानें.

करूनियां । नंद अर्पिला जनकप्रिया । परम सदया कृष्णातें ॥ १९ ॥ पितृवत्सल तूं अनंता । तरी या नेइजे आपुल्या ताता । विश्वद्रष्टा विश्वगोप्ता । तूं तत्त्वता अशेषदृक्[1] ॥ १२० ॥ ममापराधस्वकारण* । जाणसी सर्वद्रष्टा म्हणोन । यालागीं नुपेक्षीं स्वपादशरण । सनाथ[2] वरुण तव दास्यें ॥ २१ ॥ पश्चिमदिशेचा अधिकार । देऊनि केलें †यादसेश्वर[3] । किंकराचा नीच किंकर । वरुण साचार मानावा ॥ २२ ॥ ऐसा प्रार्थूनि बहुतां परी । वारंवार नमस्कारी । नंद अर्पूनि उत्साहगजरीं । श्रीमुरारि बोळविला ॥ २३ ॥

श्रीशुक उवाच — एवं प्रसादितः कृष्णो भगवानीश्वरेश्वरः ।
आदायागात्स्वपितरं बंधूनां चावहन् मुदम् ॥ ९ ॥

परीक्षितीसी शुक भगवान । म्हणे ऐसा वरुणें कृष्ण । केला होत्साता प्रसन्न । नंद घेवोन पैं आला ॥ २४ ॥ अगाधैश्वर्यें भगवान । ईश्वराचा जो परम इन[4] । तेणें निजजनक आणून । बंधु स्वजन तोषविले ॥ १२५ ॥ गोप गोपिका लहानें थोरें । नंदा भेटलीं आनंदगजरें । होतीं सशोकक्षुधातुरें । नेत्रचकोरें टवटविलीं ॥ २६ ॥ सर्वीं सारोनि पारणा । मग बैसवूनि गोपगणा । वरुणें जैसें पूजिलें कृष्णा । करी कथना त्यापाशीं ॥ २७ ॥

नंदस्त्वतींद्रियं दृष्ट्वा लोकपालं महोदयम् । कृष्णे च सन्नतिं तेषां ज्ञातिभ्यो विस्मितोऽब्रवीत् ॥ १० ॥

कदापि मानुषीं इंद्रियां । गोचर नव्हे जे सपर्या[5] । वरुणें केली माझिया तनया । वाङ्मनःकाया अर्पूनी ॥ २८ ॥ त्या वरुणाचा महोदय । भाग्यवैभव सांगों काय । तोही श्रीकृष्णाचे पाय । वंदी विनयपूर्वक ॥ २९ ॥ जैसे उगवले कोटितरणि । श्वेतपीतादि विचित्र किरणीं । भित्तिप्रदेशीं[6] पटांगणीं । शोभती मणिप्रभाढ्य ॥ १३० ॥ रत्नें भूषणें अलंकार । पदार्थश्रेणी नारी नर । विस्तीर्ण सभेचा शृंगार । पर्यायोत्तरें[7] सुचेना ॥ ३१ ॥ गव्य षड्रस सर्वां विदित । उपमा वदतां बोधे चित्त । तैसें न बोधे परमामृत । कीं तें अविदित म्हणोनियां ॥ ३२ ॥ आमुचीं प्राकृत मानुषीं करणें । मर्त्यविभवीं विचक्षणें । लोकपाळश्रीकरणगणें । केंवि उमाणे प्राकृतां ॥ ३३ ॥ वरुणलोकींचा महोदय । आम्हां मानवां अतींद्रिय । म्यां देखिलें परमाश्चर्य । लागतां सोय कृष्णाची ॥३४॥ वरुणलोकीं कृष्णागमन । होतांचि जाले दिव्य नयन । ऐश्वर्येंशीं वरुणभुवन । जालों देखोन विस्मितात्मा ॥ १३५ ॥ तेथ वरुण सिंहासनीं । शक्र जैसा निर्जरगणीं । तो हा श्रीकृष्णाचे चरणीं । विनीत होऊनि लागला ॥ ३६ ॥ तेणें केलें कृष्णार्चन । दिव्योपचारसमर्पण । तें सांगतां वाचेसि मौन । उपमाविहीन म्हणोनी ॥ ३७ ॥ एवं कृष्ण नव्हे बाळ । अथवा न म्हणवे गोपाळ ।

**पाठभेद :—** * ममापराधकारण ( मुंगीप्रत ); ममापराधसकारण ( उमरखेडप्रत ). † यादवेश्वर ( मुंगीप्रत ); यादसेश्वर ( उमरखेडप्रत ).

१ सर्वसाक्षी. २ समर्थ. ३ जलाचरांचा स्वामी. ४ स्वामी. ५ पूजा. ६ भिंतीवर. ७ क्रमेंकरून बोलणें. ८ मोक्ष.

स्वसामर्थ्यें महाप्रबळ । त्रैलोक्यपाळ गमतसे ॥ ३८ ॥ हें ऐकोनि सकळ गोप । म्हणती कृष्ण वैकुंठदीप । पूर्णब्रह्म अरूपेरूप । म्हणवी पशुपसुत आपणा ॥ ३९ ॥

ते त्वौत्सुक्यधियो राजन् मत्वा गोपास्तमीश्वरम् । अपि नः स्वगतिं सूक्ष्मामुपाधास्यदधीश्वरः ॥ ११ ॥

शुक म्हणे गा मात्स्यीवत्सा । ऐकोनि नंदवाक्यां स्वच्छां । समस्त गोपांतें उत्कट इच्छा । वांछिजे अच्छांपदलाभा ॥ १४० ॥ उतावीळ सप्रेमळ । उत्सुकमति गोप सकळ । कृष्णस्वधाम जें जें निर्मळ । आम्हां तें स्थळ दावो कां ॥ ४१ ॥ कृष्ण केवळ परमेश्वर । भाग्यें आम्हांसि सुलभतर । झाला असतां कैवल्यसार । आम्हां साचार वोपील ॥ ४२ ॥ अचिंत्यऐश्वर्याची शक्ति । नश्वर न मागावें याप्रति । आम्हां करावी स्वपदप्राप्ति । हा संकल्प चित्तीं गोपांचे ॥ ४३ ॥ बैसल्या सुरतरुतळवटीं । कां पां पर³जावी नरोटी । परमसाम्राज्यैश्वर्यमुकुटीं । बैसोनि सृष्टी न असावें ॥ ४४ ॥ कीं परमामृताच्या सागरीं । कांजी पिऊनियां चूळ भरी । भोगिजे दैन्यांची सामग्री । कां अमृतलहरी न पियावी ॥ १४५ ॥ ईश्वरेश्वराचा स्वामी । कृष्ण जाणूनियांही आम्ही । सरते न हों जरी परब्रह्मीं । तरी भवभ्रमीं अनुगुंडूं ॥ ४६ ॥ नेणोनि राखविलीं गोधनें । गोरस विकूनि जोडिलीं धनें । कृष्णमहिमा देखोनि नयनें । कैवल्य नमगणें कां पां या ॥ ४७ ॥ ऐसा गोपांचा संकल्प । विश्वद्रष्टा कंदर्पबाप । जाणोनि तत्सिद्धीचा दीप । ससाक्षेप प्रकाशी ॥ ४८ ॥

इति स्वानां स भगवान् विज्ञानाखिलदृक् स्वयम् । संकल्पसिद्धेय तेषां कृपयैतदचिंतयत् ॥ १२ ॥

मग स्वजनाचिये कृपेकरून । कळवळूनियां श्रीभगवान । हृदयीं चिंतिता झाला पूर्ण । अभीष्टकारण तयांचें ॥ ४९ ॥

जनो वै लोक एतस्मिन्नविद्याकामकर्मभिः । उच्चावचासु गतिषु न वेद स्वां गतिं भ्रमन् ॥ १४ ॥

आपुल्या चित्तीं म्हणे कृष्ण । येथ मृत्यूलोकींचा हा जन । अविद्याकामकर्मेंकरून । बद्ध होऊन परिभ्रमे ॥ १५० ॥ वास्तव विसरूनि आत्मस्थिति । देहाद्यहंममप्रतीति । पूर्वसंस्कारें पावे व्यक्ति । संकल्पप्रवृत्ति तेथुनी ॥ ५१ ॥ मग तो संकल्पप्रभव काम । विषयाध्यासें वाढवी प्रेम । तदुपलब्धीचा उद्यम । त्रिविध कर्म विस्तारी ॥ ५२ ॥ सात्त्विककर्में सुकृताचरण । तें स्वर्गादि उच्चगतिकारण । तामसकर्में दुष्कृताचरण । तें कारण नरकाचें ॥ ५३ ॥ रजोऽभिलाषें कर्माचरण । तें सुखदुःखांचें होय भाजन । देवतिर्यगादि मनुष्यपण । या गति जाण उच्चावच ॥ ५४ ॥ उच्चावच त्रिविधा गति । याच्या विविध प्रकृतिविकृति । लक्षचौऱ्यांशींपर्यंत जाती । त्यामाजि व्यक्ति बहुफार ॥ १५५ ॥ ऐशा उच्चावच गति । अविद्याकामकर्मप्रवृत्ति । येथींचा लोक भ्रमतां भ्रांति ।

---

१ अव्यक्तस्वरूप. २ निर्मळ. ३ हातीं धरावी. ४ दीनपणाची. ५ गुरफटून जाऊं. ६ देहादिकांच्या अहंभावानें जी इच्छा, तीपासून घडणारीं कर्में. ७ सात्त्विक, राजस, तामस.

निजात्मगति अनोळख ॥ ५६ ॥ म्हणोनि मर्त्यलोकींच्या जना । प्राप्ति दुर्लभ कैवल्यसदना । तरी या पशुपां मदेकशरणां निजात्मभुवना दाविजे ॥ ५७ ॥

इति संचित्य भगवान् महाकारुणिको हरिः । दर्शयामास लोकं स्वं गोपानां तमसः परम् ॥ १५ ॥

ऐसें विचारूनियां मनीं । अनंतैश्वर्याची खाणी । तो श्रीभगवान्करुणावचनीं । स्वजनालागूनि कळवळिला ॥ ५८ ॥ महाकरुणेचा सागर । तो श्रीहरि जगदाधार । स्वकीय लोक तमसःपर । दावी साचार पशुपांतें ॥ ५९ ॥ लंघूनि प्रकृतीचा अंधार । गुणात्मकां जो अगोचर । ज्यातें नुजळिती शशिभास्कर । तमसःपर परब्रह्म ॥ १६० ॥

सत्यं ज्ञानमनंतं यद् ब्रह्मज्योतिः सनातनम् । यद्धि पश्यंति मुनयो गुणापाये समाहिताः ॥ १६ ॥

जे कां प्रकृतीहूनि पर । देहात्मकां केंवि गोचर । देहावच्छन्न[1]* विधि हर सुर । त्या अगोचर जें धाम ॥ ६१ ॥ सत्यस्वरूप सन्मात्र ब्रह्म । ज्यावरी अध्यारोप असद्भ्रम । माया ऐसें जयासि नाम । कैवल्यधाम तद्रहित ॥ ६२ ॥ नेतिमुखें शोधितां श्रुति । अवशिष्ट अबाधित[2] जे स्थिति । असोनि न फवे करणांप्रति । ते निश्चिती सन्मात्र ॥६३॥ माया असत्य बाध्यमान । सत्य सन्मात्र सनातन[3] । ज्ञान म्हणिजे चैतन्यघन । येर अज्ञान जड मूढ ॥६४॥ जडा अजडत्वें वर्तवी । मिथ्या सत्यत्वें प्रवर्तवी । स्वसान्निध्यें उठवाठेवी । गोवूनि उगवी तें ज्ञान ॥१६५॥ अनंत म्हणिजे अपरिच्छिन्न[4] । दिक्कालादिव्यवस्थाशून्य । अंतवर्जित अनंत पूर्ण । अमृत म्हणोन श्रुति गाती ॥६६॥ कालत्रयीं अबाधित । शुद्ध शाश्वत जें संतत । बृहत् म्हणिजे अपरिमित । इत्थंभूत परब्रह्म ॥६७॥ मननशील जे कां मुनि । इंद्रियग्रामातें नियमूनी । शमदमसंपन्न एकासनीं । गुणशोधनीं प्रवर्तले ॥ ६८ ॥ ज्योति म्हणिजे स्वसंवेद्य । स्वप्रकाश[5] अचल आद्य । अक्षय अच्छेद्य अभेद्य । वंद्य स्वानंद सर्वगत ॥ ६९ ॥ नेत्रद्वारें विश्वाभास । विश्वाभिमानें चिदावेश । स्फुरोनि वाढला देहाध्यास । तो निःशेष शोधिती ॥ १७० ॥ बाह्य दृश्य भौतिकमेळ‡ । पिंडब्रह्मांड सारिखें स्थूळ । विषयरूप जड केवळ । इंद्रियमेळ जें रुचवी ॥ ७१ ॥ लक्षचौऱ्यांशीमाजि जे जीव । एकमेकांचे जे अवयव । अवघ्राणार्थ धरिती हांव । तो आविर्भाव गंधाचा ॥ ७२ ॥ पृथ्वी संपूर्ण गंधवती । भूतमात्रीं तदाविष्कृति । परस्परें गंधाप्रति । प्राणवृत्ति संघटे ॥ ७३ ॥ एका ठायीं गंधरूपें । एका वेधी घ्राणस्वरूपें । ऐसी पृथ्वी विविधा कल्पें । विषयप्रतापें उभारी ॥ ७४ ॥ तैसेचि समस्त देहभास । एकमेकांचे होती रस । रसरसज्ञा एक जलांश । हा †दृश्यांश माजवी ॥ १७५ ॥ तेज तैसेंच सर्वां देहीं । रूप चक्षु द्विविध पाहीं । होऊनि दृश्याच्या प्रवाहीं । बाह्यविषयां उभारी ॥ ७६ ॥ सर्वदेहीं सदागति[6] । त्वक्स्पर्शातें आणी व्यक्ति ।

**पाठभेद :—** *देहावच्छिन्न ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡गोळ ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). †दृश्य भास ( मुंगीप्रत ).

१ देहानें आच्छादित. २ अखंड. ३ नित्य असणारें. ४ दिशा, देश व काल ह्यांच्या मर्यादा ज्यास नाहींत तो. ५ स्वयंप्रकाश. ६ वायु.

परस्परें विषयासक्ति । बाह्यप्रवृत्ति प्रकाशी ॥ ७७ ॥ तैसेंचि सर्वांघटीं गगन । परस्परें शब्दश्रवण । होऊनि विषयां साचपण । दावी भवभान नाथिलें ॥ ७८ ॥ नेत्रीं प्रकाशे विश्वाकार । विश्वाभिमानें आविष्कार । आकारमात्रका ते साचार । प्रथम चरण प्रणवाचा ॥ ७९ ॥ इतुकें प्रकाशी जागृद्वस्था । तिचा निरास करूनि पुरता । फिरूनि इंद्रियां विषयासक्तां । निजएकांतामाजिवडें ॥ १८० ॥ घ्राण उपरतविलें त्रिकूटीं । रसना मुरडूनि लाविली श्रीहटीं । नयन गोवूनियां गोल्हांटीं । औटपीठीं प्रवेशिलें ॥ ८१ ॥ पुण्यगिरीमाजि वारा । भरतां त्वगिंद्रिया निवारा । भ्रमरगुंफेमाजि थारा । श्रवणपसारा साठवणें ॥ ८२ ॥ ब्रह्मरंध्रीं ठेवितां मन । झालें स्वतःसिद्ध उन्मन । स्थूळीं मोडतां जागृतिभान । विषयस्मरण मग कोण्हा ॥ ८३ ॥ ऐसा आकारमात्रशोध । करूनि दृश्या केला बाध । उपरमें करणां लावूनि वेध । प्रवृत्तिबोध* तद्योगें ॥ ८४ ॥ ब्रह्माग्नीचे तुटती ज्वाळ । तेंवि जे कल्पनाकल्लोळ । तेणें प्राण प्रवाहशील । इंद्रियें सकळ टवटविती ॥ १८५ ॥ तेजें कल्पना अशेष । उदानवायु कंठदेश । वसवी अभिमान तैजस[3] । याचा निरास आदरिला ॥ ८६ ॥ त्रिकूटीं नहटूनि लावितां घ्राण । दार्ढ्यें स्थिरावतां आसन । आधार सोडूनि अपान । स्वाधिष्ठांनीं समरसे ॥ ८७ ॥ आधारशक्तीसि होतां चळ । गुदेंद्रिय सोडी आपुलें स्थळ । शिश्नेंद्रियांसी करूनि मेळ । होय पांगुळ क्षरणत्वा ॥ ८८ ॥ अस्ता जातां गगनींचा तरणि । असतां दृष्टि न दिसे नयनीं । तेंवि उपरमतां ज्ञानकरणीं । होय वोहटणी कर्मेंद्रिया ॥ ८९ ॥ श्रीहटीं स्थिरावितां रसना । शिश्नेंद्रिय ये स्वाधिष्ठाना । अपान समरसे समाना । सांडी क्षरणा समत्वें ॥ १९० ॥ चक्षु गोल्हांटीं पवाडे । तैं पादेंद्रियाचें मेट पडे । समानें सहित ऊर्ध्व चढे । प्रवेश निवाडे अनाहतीं ॥ ९१ ॥ औटपीठाच्या आंगणीं । नेत्रीं उजळे अमोघ तरणि । तैं प्राणापाना होऊनि मिळणी । रिघती उदानीं पादेंद्रियें ॥ ९२ ॥ त्वगिंद्रिय टाकी पुण्यगिरि । तैं पाणींद्रिय विशुद्ध अंतरीं । प्राणचतुष्टयीं एकसरी । ग्रंथि साजिरी चहूं करणां ॥ ९३ ॥ येथूनि उदान बहिर्मार्गें । चारी घेऊनि गगनीं रिगे । व्यान आकर्षूनि ने वेगें । तेव्हां मागें स्थूल पडे ॥ ९४ ॥ प्रारब्धक्षयाच्या प्रसंगें । लिंगशरीरप्राणादिवर्गें । सहित विवश होऊनि निगे । तैं भंगे मागें स्थूल तनु ॥ १९५ ॥ तैं न चुकतां जन्ममरण । उच्चावचा गतिभ्रमण । नाभ्यासितां प्राणिगण । जनन मरण पावती ॥ ९६ ॥ उदान जेव्हां अभ्यासकर्में । विशुद्ध सांडूनि उपरमे । द्विदळीं व्यानासमागमें । वागिंद्रियें समरसे ॥ ९७ ॥ भ्रमरगुंफेच्या पोकळी- । माजीं श्रवणेंद्रियांच्या मेळीं । दशविध प्राण करणजाळीं । त्याची मोकळी येकवटे ॥ ९८ ॥ सहस्रदळीं मनोन्मनीं । अवघीं सांठवती जाऊनी । तेव्हां पिंड बाह्यज्ञानीं । विमुखपणीं अचेष्ट ॥ ९९ ॥ मनामाजीं अहंता चित्त । कल्पना साक्षिबुद्धिसहित । ज्यातें म्हणती भेद स्वगत । उरे उर्वरित ते ठायीं ॥ २०० ॥ लयविक्षेपभेदां तया । आतुडविती दुःखालया । गुरुभजनें त्यां चुकवूनियां । स्थाना तुरीया टाकावें ॥ १ ॥ गुरुभक्तीच्या

*पाठभेद — रोधे ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ प्राणवायु राहण्याचें ठिकाण. २ एक महाकारणस्थान; त्रिकूट, श्रीहट, गोल्हाट व औटपीठ हीं चार स्थानें आहेत. ३ लिंगशरीराभिमानी आत्मा.

प्रसादबळें । तुर्येमाजि साधक मिळे । नातरी लयें तमीं मावळे । कां भवीं कोसळे विक्षेपें ॥ २ ॥ विक्षेपाचें अधिष्ठान । उपकारमात्रा विपरीतज्ञान । विरूढवी तैजसाभिमान । कल्पूनि स्वप्नअवस्था ॥ ३ ॥ निसरडा विक्षेप चुकवूनि ऐसा । मकारतमाचा कडेवसा । लयात्मक जो सुषुप्तिफांसा । प्राज्ञोसरिसा निरसूनी ॥ ४ ॥ ब्रह्मरंध्री ब्रह्माकार । तुरीयत्वें वृत्तिपदर । अर्धमात्रा ध्वनीचा गजर । प्रत्यगात्मा उर्वरित ॥ २०५ ॥ ब्रह्मावबोधें स्थिरावतां । ध्वनि समरसे *नामापरता । शुद्धलक्ष्यांशीं ऐक्यता । निरसे वार्ता भेदाची ॥ ६ ॥ ऐसियापरी समाहित । गुण निजरसें वृत्तिरहित । तेंचि सत्य ज्ञानानंत । पाहती संतत मद्धाम ॥ ७ ॥ रजोगुणेंशीं स्थूलतनु । सत्त्वें लिंगदेह निरसून । लंघूनि तमेंशीं कारण । ब्रह्मनिर्वाण टाकिती ॥ ८ ॥ तें या गौळियां वनौकसां । पहावया उपजला धिंवसा । भाग्यें जोडलों यां कुवांसा । तरी कृपेनें आशा पुरवीन ॥ ९ ॥ साधनें नसती यांचे पदरीं । मी परमात्मा असतां शिरीं । कायसी योगांची अवसरी । तमःपरपारीं न्यावया ॥ २१० ॥ यांचिया अनंत सुकृतगुणें । घरीं परब्रह्म खेळणें । तरी यां मद्धाम दिव्य नयनें । कृपाळुपणें दावीन ॥ ११ ॥ ऐसें विवरूनि मानसीं । समस्तां बल्लवां हृषीकेशी । नेऊनि ब्रह्महृदाशीं‡ । दाखवीं त्यांसी निजधाम ॥ १२ ॥

ते तु ब्रह्महृदं नीता मग्नाः कृष्णेन चोद्धृताः । ददृशुर्ब्रह्मणो लोकं यत्राक्रूरोऽध्यगात् पुरा ॥ १७ ॥

येथ ब्रह्महृदपदव्याख्यान । द्विविध श्रोतीं कीजे श्रवण । एक ब्रह्म सनातन । अपर गौण यमुनेंत ॥ १३ ॥ जें परब्रह्म अचिंत्यानंद । अगाध म्हणोनि बोलिजे हृद । तेथ निमग्न बल्लववृंद । केला स्वानंदसुखलाभें ॥ १४ ॥ दृश्यापासूनि प्रत्यगात्मत्व । त्रिगुणें सहित विशुद्ध सत्व । निरसूनि केवळ सन्मात्रत्व । सुख स्वयमेव त्यां केलें ॥ २१५ ॥ कृष्णें कृपेनें अवलोकून । प्राणेंद्रियेंशीं अंतःकरण । कार्यें करणीं उपरमोन । केलें निमग्न परब्रह्मीं ॥ १६ ॥ ऐसा कृष्णें बल्लवगण । ब्रह्महृदीं केला निमग्न । तेथ साक्षित्वादि भेदभान । गेलें हारपोन दृश्येंशीं ॥ १७ ॥ तेथ स्वानंदाच्या समरस डोहीं । भोक्तृप्रत्यया ठाव नाहीं । मा विशेष विज्ञान कैंचें कायी । कोणे ठायीं नाथिलें ॥ १८ ॥ एवं होतां ब्रह्माकार । शुद्धसत्त्वादि प्रणवांकुर । विरोनि पूर्ण निर्विकार । ब्रह्म साचार एकरस ॥ १९ ॥ ब्रह्महृदीं केले मग्न । त्यांचें केलें हें व्याख्यान । तुशब्दार्थें पुन्हां कृष्ण । करी व्युत्थान तेथुनी ॥ २२० ॥ सद्गुरु जैसा शक्तिपात । करूनि पुन्हा तुरीये आंत । आणूनि साक्षित्वा भेटवीत । भेद स्वगत जागवूनी ॥ २१ ॥ मग त्या अनुभूत सुखानुभवें । त्रिताप सांडूनि जीव निवे । काय कैसें शब्द न फवे । परी हेलावे आनंद ॥ २२ ॥ तैसा ब्रह्महृदीं मग्न । कृष्णें केला बल्लवगण । पुन्हा त्याचें उद्धरण । करून स्वभुवन दाविलें ॥ २३ ॥ परब्रह्मचि ब्रह्मलोक । नोहे हिरण्यगर्भात्मक । जें कां विशुद्ध वैकुंठाख्य । कृष्ण सम्यक त्यां दावी ॥ २४ ॥ स्वगत माया अंतःपाती । केवळ

**पाठभेद** :— * नभापरता ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡ ब्रह्महृदापाशीं ( मुंगीप्रत ).

१ प्रतिबिंब. २ कारणशरीराभिमानी आत्मा. ३ धैर्य. ४ आश्रय, पद्य—परतो भक्तीचा कुवासा । भवग्राहिकया आशा । बांधतसे धिवसा । स्तुतीलागीं. —ज्ञानप्रबोध. ५ थोरी. ६ जीवात्मत्व. ७ ब्रह्मदेवासंबंधी.

चिन्मात्रैक जे दीप्ति । ते वैकुंठदर्शनावाप्ति । बल्लवांप्रति हरि करी ॥ २२५ ॥ पूर्वार्धें हा मुख्यार्थ कथिला । यावरी गौणार्थ वाखाणिला । ध्वनितार्थ जो श्रीशुक वदला । तो परिसिला पाहिजे ॥ २६ ॥ बल्लव ब्रह्मीं निमग्न केले । पुढती कृष्णें उद्धरिले । मग ब्रह्मलोकातें दाखविलें । हें अघटित ऐकिलें म्हणाल ॥ २७ ॥ तरी पुरा म्हणिजे पूर्वीं सर्व । जेथ मग्न केले बल्लव । तेथ अक्रूर नामा यादव । देखे स्वयमेव ब्रह्मलोक ॥२८॥ पुरा यत्र यमुनाप्रांतीं । नेले ब्रह्महूदाप्रति । *मग केले ब्रह्मस्थिति । दाविला पुढती ब्रह्मलोक ॥ २९ ॥ चकारें द्वितीयान्वयकृत । †यत्राक्रूरोऽध्यगात् । म्हणिजे अक्रूरेंही त्याचि हूदांत । देखिला समस्त ब्रह्मलोक ॥ २३० ॥ ब्रह्मीं निमग्न झालियावरी । लोकदर्शनीं कायसी थोरी । ऐसी आशंका कीजेल चतुरीं । ते यावरी परिसोत ॥ ३१ ॥ कृष्णा-निमित्त अक्रूरासी । स्नेह झळंबतां मानसीं । तेणें तन्मोहपरिहारासी । ‡स्वैश्वर्यासी प्रकटिलें ॥ ३२ ॥ कृष्णानिमित्त कळवळा कैसा । अध्यायीं एकोनचत्वारिंशा । निरूपिजेल तो परियेसा । येथ अल्पसा कथिजेल ॥ ३३ ॥ व्रजीं कृष्णाचें अद्भुत कर्म । ऐकोनि कंसासी होती श्रम । अक्रूर प्रेषूनि¶ कृष्ण राम । आणवी स्वधाम दावावया ॥ ३४ ॥ धनुर्यागाचें करूनि मिष । दोघां वधावें हें रहस्य । न प्रकटूनि व्रजपुरास । अक्रूरास पाठविलें ॥ २३५ ॥ तेणें घेऊनि येतेकाळीं । रथीं देखोनि रामवनमाळी । झणें मेरूनि मल्ल बळी । बाळें कोवळीं वधी कंस ॥ ३६ ॥ कृष्ण लावण्याची राशि । कृष्ण प्रियतम त्रैलोक्यासी । मी पापात्मा या बाळासी । काळापाशीं नेतसें ॥ ३७ ॥ ऐसा मानसीं करूनि तर्क । म्हणे मज होतील घोरनरक । विश्वासघाताचा संपर्क । घडतां पुण्यार्क लोपेल ॥ ३८ ॥ कृष्णानिमित्त अंतःकरणीं । ऐसा अक्रूर कळवळूनी । ब्रह्महूदीं यमुनावनीं । स्नानालागूनि रिघाला ॥ ३९ ॥ कृष्ण जाणोनि हें अंतरीं । निरसावया मोहलहरी । निमज्जतां जलांतरीं । प्रकट-करी निज महिमा ॥२४०॥ हें आख्यान पुढें असे । येथ आशंकापरिहारवशें । कथिलें श्रोतयां मानसें । निमित्त कैसें उमजावया ॥ ४१ ॥ कृत्य§ असतां निमित्तभूत । कायसी साधनांची मात । अक्रूर पावला अकस्मात । जें अप्राप्त सुरवर्यां ॥ ४२ ॥ एवं पुढें अक्रूरासी । कृष्णें प्रकटिलें ऐश्वर्यासी । पूर्वीं तेचि हूदीं गोपांसी । स्वलोकांसी दाखविलें ॥ ४३ ॥ यमुनेमाजीं होऊनि मग्न । नंदें देखिलें वरुणभुवन । गोपांपाशीं करितां कथन । तिहीं श्रीकृष्ण विनविला ॥ ४४ ॥ त्यांसि प्रत्यय बाणावया । यमुनेमाजीं नेलें तयां । ब्रह्महूदीं कौरववर्या । वैकुंठनिलया दावी त्यां ॥ २४५ ॥ चिन्मात्रै[3] ‖प्रकृतिअंतःपाती । अचिंत्यैश्वर्यें श्रीपती । करूनि स्वलोकां अभिव्यक्ति । गोपांप्रति दाखविलें ॥४६॥ जया वैकुंठामाझारी । सर्वां समान स्वानंदलहरी । कल्पतरु दारोदारीं । घरोघरीं महर्द्धि↓ ॥४७॥ ताप-त्रयाची वार्ता नाहीं । विषयप्रलोभ कैंचा कायी । पूर्णकाम सर्वां ठायीं । सर्वां नवायी प्रेमाची ॥४८॥

पाठभेद :— * मग्न ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). † तत्र अक्रूरोपि अध्यगात् ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‡ स्वऐश्वर्याशीं ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ¶ प्रेरोनी ( मुंगीप्रत ); प्रेरूनि ( उमरखेडप्रत ). § कृष्ण ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ). ‖ प्रवृत्ति ( मुंगीप्रत ). ↓ महासिद्धि ( मुंगीप्रत ); महागिद्धि ( उ. प्र. )

१ ज्यामुळें अक्रूरानें ब्रह्महूद पाहिला. २ वैकुंठभुवनाला. ३ प्रकृतीच्या ठायीं असणार सन्मात्र म्हणजे ब्रह्मरूप. ४. श्रीकृष्ण. ५ स्पष्टीकरण.

कमलेसमान सर्व नारी । पुरुष कमनीय जैसे हरि । शंखचक्राब्जगदाधारी । पीतांबरीं भूषाढ्य ॥४९॥ जेथींचे प्रौकाररत्नमणि । तेजें लोपिती कोटि तरणि । जागृत्स्वप्नादि अवस्था तीन्ही । नेणती कोण्ही जे लोकीं ॥ २५० ॥ नवयौवनें सर्वां आंगीं । सर्वदा संपन्न सर्वभोगीं । नुठे कल्पना वाउगी । सर्व हरिरंगीं संतुष्ट ॥ ५१ ॥ परमामृताची सरिता सैरे । सच्चिदानंद सर्वां स्फुरे । सामान्य-विशेषाच्या पदरें । लाहनें थोरें नातळती ॥ ५२ ॥ यूनं युवति सकामुक । कीं स्तन्यालागीं जेंवि बाळक । तैसा प्रेमा नैसर्गिक । निजाधिकारीं सर्वांचा ॥ ५३ ॥ जैशा घृताचिया कणिका । भिन्न दिसोनि एकात्मका । तेंवि अभेद प्रेमा जेथींच्या लोकां । जगत्पाळकासान्निध्यें ॥ ५४ ॥ शिवविरिंचि-शक्रादि अमर । त्यांसि दर्शन दुर्लभतर । बृहत्सामें पक्षी सुस्वर । गाती वनचर हरिप्रेमें ॥ २५५ ॥ जेथें मूर्तिमंत श्रुति । सगुण निर्गुण प्रतिपादिती । अगाध जाणोनि अभेदभक्ति । मौनावती सलज्ज ॥५६॥ जेथ मुक्ति वाहती पाणी । अपवर्गातें न पुसे कोण्ही । अभेदभक्तीची शिराणी । सर्वांलागूनि हरि-प्रेमें ॥ ५७ ॥ देवभक्तां अभ्यंतरीं । भक्त देवा आंतबाहेरी । ऐसा प्रेमा परस्परीं । सर्वोपचारीं सर्वत्र ॥ ५८ ॥ नाहीं उदय अस्तमान । नाहीं करणजनित ज्ञान । नेत्र गात्र प्राण घ्राण । नेणें स्पंदनें जे लोकीं ॥ ५९ ॥ तेथ कैंची कालोत्पत्ति । दिग्विभाग दिवसरती‡ । जेथींच्या सुखा नाहीं च्युति । अच्युतगति ज्या नांव ॥ २६० ॥ ऐसें बल्लवां दिव्यनयनीं । स्वधाम दावी चक्रपाणि । हें अघटित न म्हणिजे कोण्ही । अतर्क्य करणी कृष्णाची ॥ ६१ ॥ अचिंत्यैश्वर्यसंपन्ना । घडे अघटित संभावना । येरा विरिंच्यादि सामान्यां । असंभावना म्हणों ये ॥ ६२ ॥ वत्साहरणीं ब्रह्मयातें । अचिंत्यैश्वर्य रमाकांतें । प्रकटिलें तें संभावनेतें । जाणे निरुतें विरंचि ॥ ६३ ॥ येथ येरांची काय गणना । कोण पुसे प्राकृतां जनां । कृष्णमहिमेची संभावना । वितर्क अनुमाना कवळाव्या ॥ ६४ ॥ म्हणोनि भगवंतीं सर्व घडे । शुकें कथिलें तें नव्हे कुडें । श्रोतीं न मनूनि वांकुडें । ऐकिजे पुढें हरिचरिता ॥ २६५ ॥ पुढें तैसेचि यमुनेआंत । ब्रह्महृदीं रमाकांत । अक्रूरा ऐश्वर्य अचिंत्य । बोधी एकांत प्रकटूनी ॥ ६६ ॥ नंदादि गोप देखोनि ऐसें । निर्भर जाले उत्कटें तोषें । कोण कोडें काय कैसें । भेद मानसें विसरले ॥ ६७ ॥

नंदादयस्तु तं दृष्ट्वा परमानंदनिर्वृताः । कृष्णं च तत्र च्छंदोभिः स्तूयमानं सुविस्मिताः ॥ १८ ॥

स्वऐश्वर्यें चक्रपाणि । सालंकृत पार्षदगणीं । विराजमान सिंहासनीं । वैकुंठभुवनीं श्रुति स्तविती ॥ ६८ ॥ हें देखोनि नंदादिक । विस्मित म्हणती एका एक । आम्ही मानूं निज बाळक । परी हा निष्टंक परमात्मा ॥ ६९ ॥ कृष्ण ईश्वरा परमेश्वरु । आम्ही मानूं निज लेकरुं । आजि हरला मोहांधकारू । चमत्कार जाणोनि ॥ २७० ॥ ऐसे विस्मित अवघे गोप । म्हणती कृष्ण कैवल्य-

पाठभेद :— ‡ रातीं ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ तट. २ वाहे. ३ तरुण. ४ आवड. ५ चलन. ६ अमर्याद.

दीप । तंव कृष्णें ऐश्वर्या करूनि लोप । आणिले पशुप देहभावा ॥ ७१ ॥ मग ते व्रजपुराभीतरीं । गोप गोपीं परस्परीं । कृष्णैश्वर्याची थोरी । बहुधा वैखरी वर्णिती ॥ ७२ ॥ कृष्ण केवळ परब्रह्म । कृष्णें दाविलें वैकुंठधाम । कृष्णा स्तविती सुरसत्तम । कृष्ण सप्रेम श्रुति गाती ॥७३॥ कृष्ण वरुणलोका गेला । वरुणें श्रीकृष्ण पूजिला । नंद सन्मानें सोडविला । प्रेमें स्तविला गोविंद ॥ ७४ ॥ इंद्र वर्षतां शिळाधारीं । गोवर्धन धरिला करीं । तळीं वांचविली व्रजपुरी । सप्तरात्री श्रीकृष्णें ॥ २७५ ॥ इंद्रादि अमरीं पूजिला कृष्ण । कृष्णें केलें दावाग्निपान । कृष्णें केलें कालियमथन । हें वदला महिमान मुनिवर्य[1] ॥ ७६ ॥ ऐसे गोपीगोपगण । विस्मयें वर्णिती श्रीकृष्णगुण । पशुपांसमान नोहे कृष्ण । म्हणती भगवान् प्रत्यक्ष ॥ ७७ ॥ ऐसा निश्चय बाणल्यावरी । वैष्णवी माया प्रकटी हरि । मोहें झळंबूनि अंतरीं । पूर्विल्यापरी मानिती ॥ ७८ ॥ नंदानयनें[2] वैकुंठदर्शन । ये अध्यायीं केलें कथन । पुढें रासार्थ गोपीभाषण । अंतर्धान[3] हरि करी ॥ ७९ ॥ ऐसें भागवत महापुराण । परमहंसाची संहिता पूर्ण । अष्टादशसहस्र विस्तीर्ण । नोहे कथन प्रवृत्तीचें[4] ॥ २८० ॥ ते भागवतींचा दशमस्कंध । कृष्णबाळलीला अगाध । शुकपरीक्षितिसंवाद । अध्याय विशद अठ्ठाविसावा ॥ ८१ ॥ एकनाथाची चरणधूळी । चिदानंद[5] चार्चितां भाळीं । वर्षला स्वानंदरसकल्लोळीं । ते घेतली नव्हाळी गोविंदें ॥ ८२ ॥ गोविंदाचें श्रीपादजळ । जगत्पूज्य पावन अमळ । तेणें दयार्णव केवळ । भरला निश्चल निजबोधें ॥ ८३ ॥ येथ श्रवणें मननें निदिध्यासें[6] । जे सेविती प्रेमोत्कर्षें । साक्षात्कारें त्यां गोपां ऐसें । स्वधाम संतोषें हरि दावी ॥ ८४ ॥* इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां वरुणलोकान्नंदानयनवैकुंठदर्शनं नामाष्टाविंशतितमोऽध्यायः‡ ॥ २८॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक ॥ १८ ॥ टीकाओव्या ॥ २८४ ॥ एवंसंख्या ॥ ३०२ ॥ ( अठ्ठाविसावा अध्याय मिळून एकूण ओवीसंख्या १४१५६ ).

अठ्ठाविसावा अध्याय समाप्त.

---

**पाठभेद :—** *श्रीमद्भागवत दशमस्कंध । टीका हरिवरद अगाध । दयार्णवकृत परम विशुद्ध । अध्यायप्रसिद्ध अष्टविंशति ॥ ८५ ॥ ( मुंगीप्रत ). ‡साधारणे नभः शुक्ले, दशम्यां भौमवासरे । सुरेज्ये सिंहसंप्राप्ते बिडौज नगरे स्थलं ॥ १ ॥ ( मुंगीप्रत व उमरखेडप्रत ).

१ शुकाचार्य. २ नंदास आणणें. ३ गुप्त होणें. ४ संसारमार्गांतील गोष्टीचें. ५ चिदानंदस्वामी. ६ वारंवार चिंतनानें.

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

[ श्रीमद्भागवत दशमस्कंधावरील टीका ]

## खंड ४ था

( अध्याय २९ ते ३७ )

अंतरीं असोनि निजात्मरत । बाह्यप्रवृत्ति कर्मासक्त ।।
नाशीं नेदितां परमार्थ । जनहितार्थ वर्तावें ।।

— हरिवरदा, ३३-४५१

: संपादक :

रामचन्द्र चिन्तामण ढेरे

विजयादशमी : शके १८८०

मूल्य ६ रुपये

# प्रस्तावना

**यदि हरिस्मरणे सरसं मनः यदि विलासकलासु कुतूहलम् ।**
**मधुरकोमलकान्तपदावलीं शृणु दयार्णवकाव्यकृतिं तदा ॥**

## ‘ हरिवरदे ’चा जयजयकार :

इ. स. १८९१ मध्यें ‘ हरिवरदा ’ ही कृष्णदयार्णवकृत दशम-टीका श्री. तेंडुलकरांनीं पोथीच्या स्वरूपांत छापून प्रसिद्ध केली आणि त्यानंतर एक - दोन दशकांच्या अवधींत भावे – पांगारकर – आजगांवकर या त्रयीनें कृष्णदयार्णव आणि त्यांचें साहित्य यांचा स्थूल परिचय मराठी वाचकांना करून दिला. त्यानंतर कांहीं काळानें ‘ हरिवरदे ’ची छापील पोथी हस्तलिखिताइतकीच दुष्प्राप्य झाली. केवळ ‘ महाराष्ट्र - सारस्वतां ’तील रसाळ परिचयावरच वाचकांना आणि अभ्यासकांना दयार्णवांविषयींची जिज्ञासा भागवावी लागे. इ. स. १९३४ मध्यें भा. इ. सं. मंडळाच्या पुरस्कृत – ग्रंथमालेंतून ‘ हरिवरदें ’तील ‘ वेदस्तुति ’ हें प्रकरण आणि दयार्णवांची कांहीं स्फुट कविता एकत्र प्रसिद्ध झाली. या प्रकाशनांतील स्फुट कवितेमुळें ‘ हरिवरदा ’–कार दयार्णवांच्या भावजीवनावर प्रकाश पडूं शकत होता, तरीहि ‘ हरिवरदा ’च उपेक्षित व अज्ञात राहिल्यामुळें या संग्राहाचा व्हावा तसा बोल-बाला झाला नाहीं. पुढें इ. स. १९४७ मध्यें श्री. दयार्णव कोपर्डेकर यांनीं आपल्या पित्याच्या ‘ हरिवदा ’ - प्रीतीचें प्रतीक म्हणून ‘ हरिवरदेंतील कांहीं वेंचे ’ प्रसिद्ध केले. हें छोटें प्रकाशन म्हणजे श्री. कोपर्डेकरांच्या महासंकल्पाचा अंकुरच होता, असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण त्यानंतर आठच वर्षांनीं त्यांनीं ‘ हरिवरदे ’चें प्रचंड प्रकाशन अंगावर घेतलें आणि जून १९५५ मध्यें दोनशें पृष्ठांचा प्रथम खंड प्रसिद्ध केला. या खंडाचें संपादन साक्षेपी संशोधक श्री. शं. ना. जोशी यांनीं सर्वांगपरिपूर्ण केलें आहे. त्यानंतर लागोपाठ दुसरा आणि तिसरा खंड बाहेर पडला. या दोन्ही खंडांचें संपादन संस्कृत विद्येचे अभ्यासक डॉ. वसंतराव राहूरकर यांनीं केलें आहे. या तीन खंडांत समग्र ग्रंथाचा एक - तृतीयांश भाग ( सु. १४००० ओव्या ) समाविष्ट झाला आहे. केवळ दोन वर्षांच्या अल्पावधींत प्रकाशकांनीं ज्या तळमळीनें आणि चिकाटीनें हें विराट् प्रकाशनकार्य पार पाडलें, ज्या नानाविध अडचणींना तोंड दिलें आणि ‘ हरिवरदे ’चें स्वयंभू मूल्य पुनःप्रतिष्ठित करण्यासाठीं जो स्वार्थत्याग केला, तो खरोखरच स्पृहणीय आहे. प्राचीन मराठी वाङ्मयाला अशा निष्ठेचे प्रकाशक लाभले, तरच प्रतिक्षणीं अंधारांत लुप्त होत चाललेल्या त्या वाग्भांडाराचें संरक्षण होऊं शकेल.

या तीन खंडांच्या प्रकाशनामुळें ‘ हरिवरदे ’चें अन्तर्बाह्य वैभव आतां सर्वपरिचित झालें आहे. सर्वसाधारण जिज्ञासू वाचक, भागवत संप्रदायाचे जाणते अनुयायी व उपदेशक आणि विद्यापीठांतील व्यासंगी अभ्यासक या सर्वांना ‘ हरिवरदे ’च्या सामर्थ्याची व सौंदर्याची यथार्थ जाणीव झाली आहे. श्री. ज. स. करंदीकर, श्री. न. शे. पोहनेरकर, म. म. दत्तो वामन पोतदार, श्री. चिं. ग. कर्वे, श्री. सोनोपंत दांडेकर, श्री. धुंडामहाराज, लोकनायक अणे, इत्यादि ख्यातनाम व्यक्तींनीं ‘ हरिवरदे ’चा मुक्तकंठानें जयजयकार केला आहे. दैनिकांच्या आणि नियत-कालिकांच्या स्तंभांतून सर्वसाधारण मराठी वाचकांपर्यंत या ग्रंथ-राजाची कीर्ति आतां पोंचली आहे. पुणें व मुंबई विद्यापीठांच्या पदव्युत्तर अभ्यासक्रमांत पाठ्यपुस्तक म्हणून या ग्रंथाच्या प्रथम खंडाचा समावेश झाला आहे. अशा स्थितींत या ग्रंथाची नव्यानें मलावण करण्याची आवश्यकता उरलेली नाहीं. ‘ हरिवरदे ’चा एक रसिक वाचक या नात्यानेंच मी हें संपादकीय लिहीत आहें. पहिल्या तीन खंडांच्या संपादकांनीं दयार्णव आणि त्यांचा महा-ग्रंथ यांविषयीं व्यासंगपूर्ण प्रस्तावना लिहून वाट रुळवून ठेवलेली आहे. त्यामुळें माझें काम सोपें झालें आहे. त्या रुळलेल्या वाटेनें दयार्णवांच्या काव्यवाटिकेंत प्रवेश करायचा आणि तेथील सुगंधी फुलोरा लुटून दयार्णवांची वाक्पूजा बांधायची, एवढेंच माझें काम उरलें आहे.

## भागवताचें साम्राज्य :

दयार्णवांनीं ज्या ग्रंथाच्या चिन्तनांत आणि विवरणांत सारी हयात घालविली, त्या श्रीमद्भागवताच्या माधुरीनें सारी मध्य-युगीन भारतीय साधना भारावून गेली होती. व्यासांच्या नांवांत स्वतःचें नामविलोपन करणारा भागवताचा कर्ता हा खास एक महापुरुष असला पाहिजे. त्याचें नांव पुसलें आहे – पण कर्तृत्व चिरन्तन आहे. क्रान्तिकारी विचार स्वयंतेजानें कसा प्रसृत होतो, कसें परिवर्तन घडवितो आणि युगायुगावर कसा प्रभाव गाजवितो,

याचें एक उत्कृष्ट गमक भागवताच्या रूपानें आपल्यापुढें आहे. भारतीय लोकधर्मांची प्रस्थानत्रयी समजल्या जाणाऱ्या रामायण – भारत – भागवत या त्रयीपैकीं भागवताच्या कर्त्याविषयीं मला कांकणभर अधिक आदर वाटतो. भागवतकारानें वैष्णवधर्माला चैतन्याची एक अक्षय्य थाळी निर्माण करून दिली आहे. त्यानें रामायण - महाभारताला आपल्या सांस्कृतिक पुनरुत्थानाच्या कार्यांत मांडलिकासारखें राबविलें आहे. अथांग करुणा, सत्यदर्शी प्रज्ञा, अतलस्पर्शी सृजनशक्ति, उदार समन्वयदृष्टि आणि दुर्दमनीय ध्येयनिष्ठा या गुणांच्या बळावर भागवतकारानें भारताच्या सांस्कृतिक इतिहासांत आपलें स्थान अढळ बनविलें आहे.

टीकासंपत्तीच्या दृष्टीनेंहि भागवत हे सर्व पुराणसाहित्यांत अग्रगण्य आहे. श्रीधरस्वामींच्या पूर्वी हनुमदाचार्य, शंकराचार्य व चित्सुखाचार्य यांच्या भागवत – टीका असल्याचा उल्लेख आढळतो. श्रीधरस्वामींच्या 'भावार्थदीपिका' या अद्वैतपर टीकेनें भागवताचें वैभव खूपच वाढविलें. त्यानंतर विभिन्न तत्त्वप्रणालींच्या अनेक टीका भागवतावर होत राहिल्या. विशिष्टाद्वैत प्रणालींतील सुदर्शनसूरींची 'शुकपक्षीया' व वीरराघवांची 'भागवतचन्द्रिका', द्वैतप्रणालींतील विजयध्वजांची 'पदरत्नावली', पुष्टिमार्गांतील वल्लभाचार्यांची 'सुबोधिनी', निम्बार्क मतांतील शुकदेवाचार्यांचा 'सिद्धान्तप्रदीप' आणि चैतन्य संप्रदायांतील सनातन गोस्वामींची 'बृहद्वैष्णवतोषिणी', जीवगोस्वामींचा 'क्रमसंदर्भ', विश्वनाथ चक्रवर्तींची 'सारार्थदर्शिनी' व श्रीहरीचें 'हरिभक्तिरसायन' या संस्कृत टीका विशेष प्रसिद्ध आहेत.

मध्ययुगीन भक्तिसरितेची मूलप्रेरणा श्रीमद्भागवतांत असल्यामुळें भारतीय लोकभाषांत भागवताधारें प्रचंड ग्रंथरचना होत राहिली. किंबहुना सर्व मध्ययुगीन भक्तिसाहित्याचें सत्त्वपोषण श्रीमद्भागवतानें केलें आहे वल्लभाचार्य आणि त्यांच्या परंपरेंतील सूरदास-नंददासादि अष्टछाप कवि हे भागवतांतील कृष्णलीलेनें वेडावलेले होते. अष्टछाप कवींनीं भागवताच्या आधारें हिंदी कृष्णकाव्य रंगवून टाकलें आहे. महाप्रभु चैतन्य यांचें तर श्रीमद्भागवत हें जणुं हृदयच होतें. कविराज कृष्णदासांचा 'चैतन्यचरितामृत' हा बंगाली ग्रंथ आणि बंगालींतील सर्व वैष्णवपद-संभार भागवताच्याच प्रेरणेंतून फुललेला आहे. महाप्रभु चैतन्यांपासून स्फूर्ति घेतलेल्या जगन्नाथदासानें भागवतावर टीका लिहूनच ओरिसांतील भक्तिपरंपरेचें भरणपोषण केलें. आसामच्या सांस्कृतिक परंपरेचा आद्य शिल्पकार शंकरदेव याला भागवतानेंच संजीवनी दिली होती. कानडीचा चाटु विठ्ठलनाथ आणि तेलगूचा पोतन्न या भागवतभाष्यकारांनीं दक्षिणेंतील लोकमानसावर अमिट प्रभाव गाजविला आहे.

**श्रीमद्भागवत आणि मराठी भक्तिपरंपरा :**

या भागवताच्या साम्राज्याचा समस्त आणि व्यस्त अशा उभयविध पद्धतींनीं अभ्यास व्हावयास हवा. मध्ययुगीन भक्तिसरितेचा प्रवाह द्रविडभूमीनंतर महाराष्ट्रांतच प्रथम वाहूं लागला आणि या मराठी प्रवाहाच्या समृद्धीला भागवतानेंच प्राधान्यानें साह्य केलें. माझ्या कल्पनेप्रमाणें भारतीय लोकभाषांतील भागवताश्रयी रचनेचा अग्रमान मराठीला द्यावा लागेल. रामदेवराव यादवाच्या राजसभेंतील पंडित बोपदेव याने भागवतावर चार संस्कृत ग्रंथ लिहिले आहेत. बोपदेवाच्या 'मुक्ताफल' या ग्रंथाची प्रतिष्ठा महाप्रभु चैतन्यांच्या परंपरेत एक प्रमाणग्रंथ म्हणून आहे. बोपदेवाच्या या ग्रंथावर स्वतः हेमाद्रि पंडिताने 'कैवल्यदीपिका' नामक टीका लिहिली आहे. ज्ञानेश्वरांच्यापूर्वी गोदातीरावर नांदणाऱ्या महानुभाव संप्रदायांतील अनेक प्रतिभावंत कवींना आणि विचारकांना भागवतानें भारावून टाकले होतें. आद्य मराठी कवयित्री महदंबा हिचें काव्यजीवन भागवतानेंच पोसलें होतें. ज्या ग्रंथांत 'पुराण-गगनांतील चंद्राचें चांदणें फुललें आहे' तो भास्करभटाचा 'उद्धवगीता' हा ग्रंथ (इ. स. १३०८) भागवताच्या एकादशस्कंधावरील टीकास्वरूप आहे. नामदेवाचा पहिला शिष्य परिसा भागवत हा भागवतावर नित्य प्रवचनें करीत पंढरपुरांत कालक्रमणा करीत असे. ज्ञानेश्वरांनीं विश्वामित्रालाहि वांकुल्या दाखवीत जी वाङ्मयीन प्रतिसृष्टि निर्माण केली, ती गीताटीकेच्या स्वरूपाची असली तरी तिची भावसघनता तर्कप्रवण गीतेनें दिलेली नसून भावसमृद्ध भागवतानेंच दिलेली आहे. त्यानंतर 'गीता आणि भागवत' हे मराठी भक्तिपरंपरेचे दोन आधारस्तंभ बनले. 'गीता भागवत करावें श्रवण' ही साधकाची पहिली वाटचाल मानली गेली. महानुभावीयांची भागवताश्रयी प्रचंड रचना सोडली, तरी बहिरा जातवेदाची 'बहिरवी' ही दशम-टीका, नाथांचें 'चतुःश्लोकी भागवत' आणि एकादशटीका, जनी-जनार्दनांचा 'निर्विकल्प', रमावल्लभदासांचा 'दशकनिर्धार', शिवकल्याणांची अंशतः उपलब्ध झालेली प्रचंड दशम-टीका, जयरामस्वामींची दशम-टीका, शिवरामस्वामींची एकादश-टीका, सामराजाची दशम-टीका, श्रीधरस्वामींचा 'हरिविजय', कृष्णदयार्णवांची 'हरिवरदा', मोरोपंतांचें मंत्रभागवत, ज्योतिपंत भागवतांच्या ओवीबद्ध व अभंगबद्ध अशा दोन टीका, माधवात्मजाची दशम-टीका, गंगाधराची एकादशेतर स्कंधांवरील टीका, श्यामराजाची 'हरिचरित्र' ही दशम-टीका, जनपंडिताचें 'लीलाभागवत', कृष्णदास सामाची भागवत-टीका, श्यामाराध्याची द्वितीय व दशमस्कंधावरील टीका, इत्यादि अनेक प्रसिद्ध-अप्रसिद्ध मराठी भागवत-टीका आहेत. यांशिवाय कृष्णचरित्रांतील विविध प्रसंगांवर झालेलीं शेंकडों आख्यानें, बाळ-

क्रीडेसारख्या प्रसंगांवरील संतांची अभंगरचना, रुक्मिणी-स्वयंवरावरील पन्नासांवर काव्यकृति आणि भागवतांतील भक्ति-विवेचनानें रंगलेलें समग्र मराठी भक्तिकाव्य यांचें ओझरतें निरीक्षण केलें तरी भागवतानें मराठी भक्तिपरंपरा आणि प्राचीन मराठी साहित्य कसें व्यापून टाकलें आहे, याची कल्पना येते. प्राचीन मराठींत समग्र भागवत मात्र कुणींहि अवतीर्ण केलें नाहीं. प्राचीन मराठीला भक्तीची प्रेरणा जरी भागवतानें दिली असली, तरी साहित्यिक प्रेरणा प्राधान्यानें रामायण-महाभारतानें दिलेली आहे, हें विशेषत्वानें लक्षांत घ्यावयास हवें. मराठी भक्तिपरंपरेवरील आणि प्राचीन मराठी साहित्यावरील या भागवतप्रभावाचें सूक्ष्म अध्ययन अखिल भारतीय भक्तिसाधनेच्या पार्श्वभूमीवर कुणा विशेषज्ञानें केलें, तर तें प्राचीन मराठी साहित्याचा पिंड समजून घ्यायला उपकारक ठरेल. जेव्हां अशा अध्ययनासाठीं कुणी प्रवृत्त होईल, तेव्हां त्याला दयार्णवांच्या ‘ हरिवरदे ’त प्रदीर्घ काळ लक्ष घालावें लागेल, एवढें मात्र निश्चित आहे.

### भागवताश्रयी मराठी कवितेंत ‘ हरिवरदे ’चें स्थान :

भागवताश्रयी मराठी कवितेच्या संभारांत दयार्णवांच्या ‘ हरिवरदे ’ पूर्वीचे नांव घेण्याजोगे ग्रंथ म्हणजे भास्करभटाची ‘ उद्धवगीता ’, बहिरा जातवेदाची ‘ बहिरवी ’, एकनाथांची एकादश-टीका आणि शिवकल्याणांची दशम-टीका हे चार ग्रंथ होत. यांपैकीं भास्करभटाचा पिंड विदग्ध संस्कृत कवीसारखा असल्यामुळें त्याचा ग्रंथ एखाद्या संगमरवरी शिल्पासारखा झाला आहे. या केवळ ८२७ ओव्यांच्या लघुटीकेंत भास्करभटानें शब्दांची ‘ कोरीव ’ कला प्रकर्षानें दाखविली आहे. परंतु भावविचारांचा समृद्ध आविष्कार, कथनशीलतेचा धारावाही प्रवाह आणि भक्तीच्या तत्त्वज्ञानाचा प्रपंच त्यांत व्यापक प्रमाणावर आढळत नाहीं. शिवाय महाराष्ट्रांतील जनसाधारणाला अप्रिय वाटणाऱ्या महानुभाव संप्रदायांतील तो ग्रंथ असल्यामुळे त्याची प्रतिष्ठा सांप्रदायिकांतच केवळ राहिली.

बहिरा जातवेदाची ‘ बहिरवी ’ वा ‘ भैरवी ’ ही दशमस्कंधावरील पहिली मराठी टीका. या अप्रकाशित टीकेची ओवीसंख्या २५८०६ आहे. ही टीका आणि शिवकल्याणांची दशम-टीका या दोन पूर्ववर्ती टीका दयार्णवांच्या अध्ययनकक्षेंत आल्या होत्या कीं नाहीं, हे निश्चयानें सांगतां येत नाहीं. शिवकल्याण हे दशम-टीकेंत अर्थातच बहिरा जातवेदाहून अधिक समर्थ ठरले आहेत. ते ज्ञानेश्वरांच्या परंपरेंतले एक थोर चिंतक होते. अमृतानुभवासारख्या ग्रंथांतील निगूढ आशय सुस्पष्ट करण्याचे सामर्थ्य त्यांनीं आपल्या ‘ नित्यानंदैक्य-दीपिके ’त दाखविलें आहे. त्यांची दशमटीका म्हणे सव्वा लाख ओव्यांची आहे. परंतु त्यांतील केवळ कृष्णजन्मपंचाध्यायी, रासपंचाध्यायी आणि वेदस्तुति एवढे तीनच भाग प्रसिद्ध झाले आहेत. सर्व ग्रंथ उपलब्ध झालेला नाहीं. प्रकाशित भागावरून या टीकेचें जें स्वरूप जाणवतें, तें प्रत्येक पदाच्या सुस्पष्ट विवरणासारखें आहे. शिवकल्याण स्वतंत्रपणें कथा सांगत नाहींत; प्रत्येक ओवी मूळ श्लोकांतील पदांच्या अनुषंगानें, संदर्भांचे धागेदोरे जुळवीत लिहिलेली आहे. त्यामुळें सर्वसाधारण मराठी वाचकांना भागवताची गोडी सरळ सरळ चाखतां येणें अशक्य आहे. भागवतकारांचा आशय उत्तम प्रकारें समजावून घ्यायला पढीक वाचकांना सोपें जावें, असें या ग्रंथाचें स्वरूप आहे.

नाथांची एकादश-टीका हेंच आपण ‘ मराठी भागवत ’ समजतों. नाथांचा संस्कृत विद्येचा व्यासंग, ज्ञानेश्वरांचें हृद्गत समजावून घेण्याचा त्यांनीं केलेला विराट् प्रयत्न, जनार्दनस्वामींसारख्या गुरूचा त्यांना लाभलेला संजीवक सहवास, त्यांची प्रदीर्घ भक्तिसाधना, त्यांच्या विश्वाकार जीवनाच्या अनुभूति आणि लोकोद्धाराची आत्यंतिक प्रेरणा या सर्व गोष्टींमुळें त्यांच्या एकादश-टीकेला स्वाभाविकच सर्वोच्च स्थान लाभलें. मराठी भागवत-परंपरेचा तो एक प्रमाणग्रंथ मानला जातो. एक महान् संत म्हणून नाथांची जी मराठी लोकमानसांत प्रतिष्ठा आहे, तिचाहि त्यांच्या ग्रंथाच्या प्रसिद्धींत वांटा आहेच. भागवताच्या दशम-स्कंधाचें आणि एकादशस्कंधाचें स्वरूप कांहींसें भिन्न असल्यामुळे नाथांची टीका आणि दयार्णवांची टीका यांची तुलना करतां येणार नाहीं. दशमाचें स्वरूप कथाप्रधान आहे, तर एकादशाचें स्वरूप विचार-प्रधान आहे. उपदेश हा नाथांचा हेतु आहे, तर लीलानुवाद हा दयार्णवांचा हेतु आहे. नाथांची वृत्ति जन-शिक्षणाची आहे, तर दयार्णवांची वृत्ति कांहींशी आत्मरंजनाची आहे. विषयाच्या निवडींत आणि विषय हाताळण्याच्या हेतूंत भिन्नता असली, तरी दयार्णव हेहि ‘ महाभागवत ’ असल्यानें त्यांनीं आपल्या परमगुरूचा वारसा समृद्ध केला आहे. नाथांच्या रक्त-वंशांत मुक्तेश्वरानें त्यांच्या कविभूमिकेचा वारसा समृद्ध केला, तर नाथांच्या पारमार्थिक वंशांत दयार्णवांनीं भक्ति आणि काव्य या दोहोंचा संगम साधून त्यांत आपल्या प्रज्ञेची सरस्वती मिसळून दिली.

‘ हरिवरदा ’ ही दशम-टीका असल्यामुळें तींत प्राधान्यानें कृष्णचरित्र असलें तरी ग्रंथकारानें भक्तीच्या विवेचनाची एकहि संधि वायां जाऊं दिली नाहीं. स्वतः ग्रंथकार श्रीकृष्णाचा अनन्य-भक्त आहे, त्यानें भागवताचें आणि भागवतानुषंगी संस्कृत ग्रंथांचें प्रदीर्घ चिंतन केलें आहे; तत्त्वज्ञानाच्या सर्व प्रणालींशीं त्याचा उत्तम परिचय आहे; सारा भारतवर्ष त्यानें उघड्या डोळ्यांनीं पाहिला आहे; अनेक व्यथा-वेदना व भलेबुरे अनुभव

आपल्या संग्रहीं सांठविले आहेत; सरस्वती त्याच्या जिव्हाग्रीं नर्तन करीत आहे आणि संगीत त्याच्या हृदयाच्या प्रत्येक स्पंदनाबरोबर ताल धरीत आहे. त्याचमुळें अत्यंत आत्मविश्वासानें लिहिलेल्या या ग्रंथांत ग्रंथकाराच्या साधनेचें, सखोल अध्ययनाचें आणि व्यापक अनुभवांचें दर्शन घडतें. भाषा संस्कृतप्रचुर आणि प्रगल्भ असूनहि तिच्यांत जयदेवाच्या अष्टपद्यांसारखें संगीत आहे. अनुप्रासांचीं पैंजणें पायांत बांधून दयार्णवांची सरस्वती जणुं कृष्णमूर्तीपुढें पूजानृत्य करीत आहे, असा भास होतो. प्रत्येक पदाचें विश्लेषण करतांना भाषा, तत्त्वज्ञान आणि काव्य या तिन्ही क्षेत्रांतील सामर्थ्य ग्रंथकारानें दाखविलें आहे. ज्ञानेश्वर आणि एकनाथ यांच्या वाणीवर पोसलेली दयार्णवांची प्रतिभा स्वयंतेजानें रसरसलेली आहे. दयार्णवांच्या शरिराच्या वार्धक्यानें त्यांच्या प्रतिभासौंदर्याच्या नव्हाळीला तिळमात्रहि उतार पडलेला नाहीं. अशा या भागवत-परंपरेच्या थोर शिल्पकाराचा खरा परिचय दोन शतकांनंतर साऱ्या महाराष्ट्राला घडत आहे. 'विद्यावतां भागवते परीक्षा' अशी भागवताविषयींची म्हण आहे. भागवताश्रयी मराठी कवितेंत हे वचन यथार्थतेनें 'हरिवरदे'लाच लावतां येईल, असें मला वाटतें. भावना, कल्पना आणि विचार या त्रिविध मनोव्यापारांना फुलवील-झुलवील, असें 'हरिवरदे'चें अन्तर्बाह्य स्वरूप आहे. संस्कृत भाषेंतील सौंदर्य, संगीत (Rhythm) आणि अर्थसघनता हे गुण दयार्णवांच्या मराठी भाषेंत समृद्ध होऊन प्रकटले आहेत आणि तरीहि त्यांच्या संस्कृतप्रचुर भाषेंतील प्रवाहिता व प्रसाद तिळमात्र ढळलेली नाहींत. श्रीधराचें अनलंकृत साधें कथाकथन आणि मोरोपंतांची अनैसर्गिक क्लिष्टता या दोन टोकांपासून दूर राहून प्रसाद आणि प्रज्ञाविलास यांचें हृदयंगम संमेलन दयार्णवांनीं साधलें आहे. शब्दचमत्कृतीचा मोह त्यांना नाहीं. 'हरिवरदे'च्या ओवीओवींत आढळणारें प्रासाचें प्राबल्य अर्थव्यक्तीची वा भाषाप्रवाहाची कुठेंहि हानि करीत नाहीं. प्रासाच्या मोहासाठीं अर्थहानि वा अनौचित्य पत्करल्याचें एकहि उदाहरण या महाग्रंथांत आढळणार नाहीं. या ग्रंथाचें डोळसपणें एक वाचन करणारा जाणता वाचक अशी मुक्त मनानें ग्वाही देईल कीं, भागवताश्रयी मराठी कवितेंत एकादशस्कंधावरील सर्वोच्च टीका जशी नाथांची आहे, तशी दशमस्कंधावरील सर्वोच्च टीका दयार्णवांची आहे. दयार्णवांच्या या टीकेची तुलना केवळ नाथभागवताशींच होऊं शकते. परंतु तशी तुलना करणें प्रत्यक्ष दयार्णवांच्या आत्म्यालाच रुचणार नाहीं. एकनाथ हे त्यांचे परमश्रद्धास्थान आहे. 'हरिवरदें'त जेव्हां रुक्मिणीस्वयंवर वाखाणण्याचा प्रसंग आला, तेव्हां दयार्णवांनीं नाथांचा अधिक्षेप होऊं नये, म्हणून लेखणी थांबविली आणि नाथांचें 'रुक्मिणी स्वयंवर' आपल्या ग्रंथांत जसेंच्या तसें स्वीकारलें.

**श्रीकृष्णदयार्णव : कांहीं नवी माहिती :**

दयार्णवांचें जीवन, गुरुपरंपरा आणि साहित्य यांविषयींचें अधिक संशोधन व्हावयास हवें. पैठणच्या परिसरांतच हें संशोधन होणें शक्य आहे. मराठवाडा साहित्य परिषद् आणि एकनाथ संशोधन मंदिर या स्थानिक संस्थांकडून अशा संशोधनाची अपेक्षा करणें अयोग्य ठरणार नाहीं. श्री. पोहनेरकरांनीं या दिशेनें प्रयत्न सुरू केला असल्यामुळें नजीकच्या भविष्यकाळांत दयार्णवविषयक माहितींत मोलाची भर पडेल, अशी आशा करावयास हरकत नाहीं. मीं गेल्या चार-सहा महिन्यांत शोध घेऊन जी नवी माहिती संकलित केली आहे, ती खालीं संक्षेपानें नोंदवीत आहें. प्रारंभीं संशोधकांच्या सोयीसाठीं दयार्णवचरित्रांतील प्रमुख घटनांची शकावलीहि देत आहें.

- श. १५९६ (वैशाख शु. ३)–जन्म.
- श. १५९७–मातेचा मृत्यु.
- श. १६०१–मौंजीबंधन.
- श. १६०४–विवाह आणि पित्याचा मृत्यु.
- श. १६१७ (श्रावण व. ८)–आंबेजोगाई येथें सद्गुरूची प्राप्ति.
- श. १६१९-२१–गुरूंच्यासह उत्तर मानस-यात्रा.
- श. १६२५-२६– ,, दाक्षिणयात्रा.
- श. १६२७-२८–दीड वर्ष पुरश्चरण.
- श. १६२९–द्वारावती-यात्रा.
- श. १६३२–प्रथम पत्नीचा मृत्यु.
- श. १६३३–द्वितीय विवाह.
- श. १६४०–महाव्याधीचा उद्भव.
- श. १६४९–नाथांनीं स्वप्नांत ग्रंथरचनेचा आदेश दिला.
- श. १६५१–गोविंदगुरूंचें निर्याण.
- श. १६५६ (श्रावण व. ८)–'हरिवरदे'चा पूर्वार्ध समाप्त व महाव्याधीचा उपशम.
- श. १६५६ (कार्तिक)–उत्तरार्ध-प्रारंभ.
- श. १६६२ (मार्गशीर्ष शु. ५)–महानिर्याण.
- श. १६६५ (मार्गशीर्ष शु. ५)–उत्तमश्लोकांकडून ग्रंथसमाप्ति.

१. दयार्णवांच्या गुरुपरंपरेपैकीं आजेगुरु स्वानंदस्वामी आणि दयार्णव एकाच कुल-गोत्रांतील पुरुष. त्यांचें नांव रघुनाथ बापूजी दिवाकर. संभाजीकालीन कागदपत्रांत त्यांचें नांव 'राघोस्वानंद बापूजी दिवाकर, चिमणगांवकर' असें आढळतें. ते संभाजीच्या कारकीर्दीच्या अखेरीपर्यंत रायगडावर दफ्तरदार होते. मावजी-पारसनिसांनीं संपादिलेल्या 'सनदापत्रें' या संग्रहांत पृ. ५८-६६ वर एका सनदेंत त्यांची वंशावळ आलेली आहे. संभाजीच्या

वधानतर त्यांनीं रायगड सोडला आणि कांहीं काळ फलटण येथें निवास केला. त्यांना कृष्णाजी नामक एक पुत्र होता. हा मुलगा जाणता झाल्यावर ते चिमणगांवला गेले. दयार्णवांचें कोपड्यांहून आंबेजोगाईला झालेलें स्थलांतर स्वानंदांच्या प्रेरणेनेंच सहेतुकपणें झालें असावें. कारण दयार्णव हे त्यांचे गोत्रज; कोपडें आणि चिमणगांव यांतील अंतरहि विशेष नाहीं आणि गोविंदस्वामींना त्यांनींच पूर्वी आंबेजोगाईस पाठविलें होतें. म्हणजे दयार्णवांना आंबेजोगाईस लाभलेला गोविंदगुरूंचा उपदेश ही स्वानंद-नियोजित गोष्ट होय, असें वाटतें.

२. गोविंदगुरूंच्याविषयीं मध्वमुनीश्वरांच्या कवितासंग्रहांत (पृ. १५२) खालील उल्लेख आला आहे :

**महाभारताचा अर्थ केला विशद ।**
**चौधरी गोविंद दीक्षित जी ॥**

हें गोविंदगुरूंचें ' महाभारत ' आणि त्यांचे सुपुत्र शिवदीक्षित यांचें ' मंत्रभागवत ' ( ह. व. ५०. १३ ) या दोन ग्रंथांचा शोध घेतला पाहिजे.

३. दयार्णवांच्या शिष्यपरंपरेपैकीं सनातनांचा मुंगी येथील मठ आजहि सुस्थितींत आहे. या मठाची परंपरा कृष्णदयार्णव–सनातन–परमानंद–गोविंद–नरहरि–रंगनाथ अशी आहे. रंगनाथ हे विद्यमान मठाधिपति आहेत. गोविंद–नरहरि–रंगनाथ हे तीन पुरुष पिता-पुत्रपरंपरेनें मठाधीश झालेले आहेत. मठांत सनातन व परमानंद यांच्या समाधि आहेत. समाधि-शिळांवर कोरलेले समाधि-शक अनुक्रमें श. १७१६ व श. १७७७ असे आहेत. मठांतील ग्रंथसंभार प्रचंड असून मठाधीशांनीं त्याची व्यवस्था उत्तम ठेवली आहे. सनातनांचा श. १६९९ मधील ' ज्ञानामृत ' ( ओवीसंख्या ३१९ ) हा ग्रंथ व अनेकविध स्फुट रचना मठांत आहे. सनातनशिष्य युधिष्ठिर यांचाहि ' योगसार ' (ओव्या ३९७) हा ग्रंथ तेथें आहे. ' हरिवरदे ' चें बरेंच लेखन या मठांत झालें.

४. पैठण आणि मुंगी येथें जीर्ण वाडांत दयार्णवांची विपुल स्फुट रचना आहे. दयार्णवांच्या वैयक्तिक साधनेवर व भाव-जीवनावर प्रकाश टाकण्यास या रचनेचा उपयोग होईल. दयार्णवांच्या लघुग्रंथांपैकीं ' तन्मयानंदबोध ' ( श. १६२० ) या ग्रंथाची एक प्रत मुंगी मठांत व एक प्रत उमरखेड येथील श्री. अ. गं. जोशी यांच्या संग्रहीं आहे. हा ग्रंथ आजवरच्या समजुती-प्रमाणें ओवीबद्ध नसून रामदासांच्या ' मनाच्या श्लोकां ' प्रमाणें भुजंगप्रयात वृत्तांतील ३२७ श्लोकांचा आहे. यांत उपदेशपर अशीं अष्टकें व दशकें आहेत. लहानपणीं कृष्णेच्या कांठीं निवास असतांना दयार्णवांच्या मनावर जे समर्थवाणीचे प्रत्यक्ष संस्कार घडले असतील, त्यांचे पडसाद या ग्रंथांत दिसून येतात. या ग्रंथाप्रमाणेंच श्लोकबद्ध असा ' चिन्मयानदबोध ' नामक नवा लघुग्रंथ मुंगी मठांत सुरक्षित आहे. आजवर दयार्णवांच्या नांवावर नोंदविला गेलेला ' दत्तजननोत्साहवर्णन ' हा लघुग्रंथ दयार्णवकृत नसून उत्तमश्लोककृत आहे. दयार्णवांची सर्व स्फुट कविता शक्य तितक्या लौकर संशोधून-संग्रहून एकत्र प्रासिद्ध झाली पाहिजे. हरिवरदा-काराचें आंतरिक जीवन समजून घ्यायला तिचा उपयोग होईल.

५. दयार्णवांच्या परंपरेतील सोळा शिष्यांच्या मठांपैकीं महाराष्ट्रांतील मठ पांच होते. आज या पांच मठांपैकीं केवळ उमरखेड ( उत्तमश्लोक ) आणि मुंगी ( सनातन ) हे दोनच मठ अस्तित्वांत आहेत. उमरखेड मठाचे आद्य पुरुष उत्तमश्लोक हे दयार्णवांचे प्रधानशिष्य, हरिवरदेचे ' लेखक ' आणि पूर्तिकार होत. त्यांचा काळ श. १६३१–१७०८ असा आहे. श. १६४९ मध्यें त्यांना दयार्णवांचा उपदेश लाभला. ' प्रबोधसार ' ( श. १६८२ ), ' प्राकृत सप्तशती ' ( श. १६९० ) आणि ' दत्तजननोत्साहवर्णन ' हे तीन ग्रंथ त्यांनीं लिहिले आहेत. त्यांचें चरित्र, परंपरा आणि साहित्य यांविषयींचें विशेष संशोधन श्री. अ. गं. जोशी ( उमरखेड ) यांनीं चालविलें आहे.

बीड, जामखेड आणि औदुंबर येथील मठ आज अस्तित्वांत नाहींत, असें समजतें.

### चतुर्थ खंडाचें स्वरूप :

या खंडांत २९ ते ३७ असे ९ अध्याय समाविष्ट झाले आहेत. या ९ अध्यायांत ३२७ संस्कृत श्लोकांवर ३२१८ ओव्या टीका लिहिलेली आहे. म्हणजे दयार्णवांनीं व्यास-वाणीचा दसपट विस्तार केला आहे. या नऊ अध्यायांपैकीं पहिले पांच अध्याय ( अ. २९–३३ ) रासक्रीडाविषयक असून पुढील ३४ ते ३७ या चार अध्यायांत अरिष्टासुर-व्योमासुर-वधासारखीं कांहीं आख्यानें आलेलीं आहेत. ३७ व्या अध्यायाअखेर श्रीकृष्णाच्या विक्रमांची अज्ञातावस्था संपत आहे. पुढें त्याची अक्रूराशीं भेट होईल आणि कंसाशीं प्रत्यक्ष दोन हात करण्याचा प्रसंग येईल. तो सर्व रोमांचकारी वृत्तान्त पुढील खंडांत समाविष्ट होणार आहे. पुढील खंडांत समग्र ग्रंथाचा पूर्वार्धहि समाप्त होणार आहे.

### रासपंचाध्यायी :

या खंडांतील ' रासपंचाध्यायी ' भागवताच्या रचना-काळा-पासून आजपर्यंत वादविषय बनलेली आहे. प्रत्यक्ष भागवतकारा-नींच परीक्षितीच्या मुखानें रासक्रीडेच्या औचित्याविषयीं शंका उपस्थित केली आहे आणि शुकमुखानें त्या शंकेचें समर्थन करण्या-चा प्रयत्न केला आहे. हें समर्थन वाचूनहि विवेकबुद्धीचें समाधान होत नाहीं. शुकप्रणीत समर्थनाचें स्वरूप असें आहे : १. सर्वभक्षक अग्नीप्रमाणें तेजस्वी पुरुषांना निंद्य कर्मांचा लेप

लागत नाहीं. २. अचिंत्यैश्वर्यशक्तिमान् असा परमेश्वरच हें कर्म आचरूं शकतो. त्याच्या अन्य अद्‌भुत लीलांचें जसें आपण अनुकरण करणें अशक्य आहे, तसें हें कर्महि अनुसरणें इष्ट नव्हे. ३. तेजस्वी पुरुषांचीं वचनें फक्त प्रमाण मानावयाचीं असतात. त्या वचनांना अनुरूप ठरेल तेवढाच आचार अनुकरणीय मानावयाचा, अन्य नाहीं. ४. श्रीकृष्णासारख्या पुरुषांना कोठलीहि फलाशा नसल्यामुळें त्यांना पापपुण्याचा संस्पर्श होणें शक्य नाहीं. ५. गोपी, गोप आणि सर्व चराचर सृष्टींत परमात्मा भरलेला असल्यानें भोग्य गोपी आणि भोक्ता श्रीकृष्ण असा स्थूल विचार येथें करूं नये. ही केवळ परमात्म्याची लीला आहे.

षड्‌विकार हे परमात्मप्राप्तीला सर्वथा बाधक आहेत आणि काम हा तर 'आघविया दोषांचा रावो' आहे. अशा स्थितींत कामभावनेच्या उत्कटतेनें गोपींना परमेश्वर प्राप्त झाला, हें कसें शक्य आहे? – ही या प्रकरणींची मूलभूत शंका. गोपींनीं एक वेळ अज्ञानानें श्रीकृष्णाविषयीं कामभावना बाळगणें शक्य आहे. परंतु कामाच्या उत्कटतेने प्रभुपदांचें सान्निध्य प्राप्त केल्याबरोबर त्यांचा काम जळून जावयास हवा होता – पुढील कामलीलांची खरोखर आवश्यकताच नव्हती. प्रभु अचिंत्यैश्वर्यशक्तिमान् आहे, हें सर्वथा सत्य आहे. त्याच्या विराट् कृत्यांचें अनुकरण मानवांना अशक्य आहे, हेंहि खरें आहे. परंतु भागवतकारांनीं ज्या अद्‌भुत लीलांचा हवाला दिला आहे, त्या सर्व लीला प्रभूच्या अवतार-हेतूंशीं सुसंगत आहेत. धर्माचें प्रतिष्ठापन आणि अधर्माचें खंडन या अवतारहेतूला अनुरूपच त्या सर्व अद्‌भुत लीला आहेत. परंतु या रासलीलेनें प्रभूच्या अवतारहेतूंना कशी पुष्टि मिळते, तें कळत नाहीं.

भागवतकारांच्या या सैल समर्थनांतून वाट काढण्यासाठीं मराठी संतांनीं नवाच विचार पुढें मांडला आहे. मराठी संतांच्या विवेकबुद्धीला रासलीला खटकत असावी, असें संतसाहित्याच्या सूक्ष्म पाहणींतून आढळून येतें. त्यासाठीं त्यांनीं रासलीलेचा अर्थ आध्यात्मिक रूपकाच्या भिंगांतून लावण्याचा प्रयत्न केला आहे. कुठें गोपी या ऋचा मानल्या आहेत, तर कुठें गोपींना 'सद्‌वृत्ती'चें प्रतीक मानलें आहे. सर्व भारतीय संतांप्रमाणेंच मराठी संतांनाहि भागवत आणि भागवतांतर्गत श्रीकृष्णचरित्र परमश्रद्धेय वाटत होतें. परंतु उत्तर भारतीय संतांप्रमाणें मराठी संतांनीं वैयक्तिक साधनेसाठीं गोपीभावाचा अंगीकार मुळींच केला नाहीं. भागवतांतील रासक्रीडेच्या प्रभावांतून उत्तर भारतांतील अनेक संतांनीं आपल्या जीवनांत शृंगारिक भावबंध निर्माण केला आणि सोळाव्या शतकांत वृंदावनांत जणुं पुनः एकदां रासोत्सव साजरा केला. महाराष्ट्रांत असें एकहि उदाहरण घडलें नाहीं. मराठी भक्तिसाधनेंत भावविव्हलतेऐवजीं विवेकनिष्ठेचें अधिष्ठान सुदृढ होतें. त्याचमुळें भागवताश्रयी मराठी कविता ही केवळ प्रभुलीलानुवादाच्या स्वरूपाची आहे – विशेषतः रासक्रीडाविषयक मराठी काव्य हें वस्तुनिष्ठ ( Objective ) भूमिकेवरचें वाटतें. संतांच्या जीवनसाधनेशीं त्याचा प्रत्यक्ष आत्मीय संबंध संभवत नाहीं.

हरिवरदा-कार श्रीकृष्णदयार्णवहि या मराठी पिंडाला अपवाद नाहींत. वास्तविक भागवतटीकेच्या रचनेपूर्वी त्यांनीं ज्या वेळीं उत्तर भारताची यात्रा केली, त्या वेळीं मधुराभक्तीच्या महापुराच्या खुणा उत्तर भारतांत जागोजाग जाग्या होत्या. दयार्णवांच्या या उत्तरयात्रेपूर्वी १०० वर्षें वृंदावनांत तर चैतन्यप्रणीत मधुराभक्तीचें एक महापीठच निर्माण झालें होतें. दयार्णव वृंदावनीं गेले होते; तेथील कृष्णलीलासंबंधित स्थळांचें त्यांनीं आस्थेनें दर्शन घेतलें होतें आणि वृंदावनाशीं निगडित अशा भागवतबाह्य कथांचेहि अध्ययन केलें होतें ( ह. व. ३३.३००–३०१ ). परंतु तरीहि त्यांनीं स्वतःसाठीं मधुरासाधनेचा स्वीकार केला नाहीं.

'हरिवरदा' ही दशमस्कंधावरील श्लोकशः टीका असल्यामुळें दयार्णवांनीं भागवतकारांच्याच समर्थनाचा अनुकार केला आहे. मागें ८ व्या अध्यायांतील ३१ व्या श्लोकावर ( द्वितीय खंड ) व्याख्यान लिहितांनाच दयार्णवांनीं या चर्चेचा उपन्यास केला होता. दयार्णव रासक्रीडेला कामक्रीडा न मानतां कामविजयक्रीडा मानतात.

**एवं आपण आपुले ठायीं । सुरतक्रीडा शेषशायी ।**
**करूनि प्रवर्ते मन्मथविजयीं । ते ये नवायीं कथेची ॥**
**तेचि शृंगारकथामिषें । पंचाध्यायीं रासरसें ।**
**अध्यात्मपर निवृत्तिदशे । आणूनि विशेषें उमजा हे ॥**

— ह. व. २९.६७–६८

याचा अर्थ असा कीं, दयार्णवांच्या मतें रासक्रीडा ही शृंगारकथेच्या स्वरूपांत वर्णिलेली परमात्म्याची 'आत्मरति' आहे. आत्मप्रीतीचें सुख लुटण्यासाठींच जणुं तो द्विधा झाला आहे.

स्थूल दृष्टीनें रासक्रीडेविषयीं मतप्रदर्शन करतांना दयार्णव पुढील गोष्टीवर विशेष भर देतात : कात्यायनी व्रताच्या वेळीं श्रीकृष्णानें जें आश्वासन दिलें होतें, त्या ऋणांतून मुक्त होण्यासाठींच भक्तवत्सल कृष्णाने गोपींसह रासक्रीडा केली. परंतु भक्ताच्या परमार्थबाधक इच्छांचीहि पूर्ति प्रभूनें करावी, हें मनाला पटत नाहीं. मुलाविषयीं नितान्त वात्सल्य असणाऱ्या माउलीनें मुलाच्या उन्मार्गी वृत्तींचें पोषण करणें कितपत इष्ट ठरेल? त्यांत मुलाचें हित तर नाहींच, परंतु आईच्या वात्सल्याचाहि तो यथार्थ गौरव ठरणार नाहीं.

कोणताहि मनोविकार परमात्म्याकडे वळविला, त्या विकाराचा भोगविषय जर परमात्मा बनविला, तर त्या विकाराचें विकार-

पण परिसाच्या भेटीस जाणाऱ्या लोहाप्रमाणें गळून पडतें, असा एक विचार या बाबतींत मांडला जातो. "**अमृत सेवितां मरणकामा। नोपी आत्मा मृत्यूतें॥**" (२९·१६२) असें दयार्णवांनीं स्पष्टीकरण दिलें आहे.

हीं सर्व स्पष्टीकरणें आणि समर्थनें एक वेळ मान्य केलीं, तरी गोपी-कृष्णाच्या कामक्रीडेच्या तपशीलवार वर्णनाचें प्रयोजन अनावश्यक आणि अनिष्ट वाटतें. परंतु भागवताश्रयी ग्रंथरचना करणाऱ्या इतर एकनाथादि कवींप्रमाणेंच दयार्णवांचें या बाबतींतील म्हणणें असें आहे कीं —

**ऐसियां विषयसक्तांप्रति। होआवया निजगुणश्रवणीं रति।**
**त्यांसि प्रियतम जे रसवृत्ति। ते श्रीपति आचरला॥**
**रासक्रीडा शृंगाररसिकां। श्रवणीं आकर्षी कामुकां।**
**मानस वेधतां हरिगुणसुखा। विषयआंवाका हारपे॥**

दुर्दैवानें दयार्णवादि संतकवींचा हा विश्वास यथार्थ ठरला नाहीं. ज्यांनीं कांहीं पूर्वसाधना करून सर्वेंद्रियांच्या आंगणांत विवेकाची राबणी सुरू केली होती, तेच अलिप्तपणें वा रहस्योद्ग्राही दृष्टीनें रासलीला वर्णूं शकले. परंतु रासलीला ऐकून कुणी हरिगुणसुखाची गोडी चाखण्यास प्रवृत्त झाला असेल, असें वाटत नाहीं. उलट गोपी-कृष्णाच्या नांवांची ढाल करून विषयासक्तीचें पोषण करण्याचा प्रयत्न मात्र अनेक शृंगारी कवींनीं केला. पेशवाईच्या काळांत तर 'इष्काचा बहर' लुटण्यासाठीं तमाशाच्या फडांतहि गोपी-कृष्णाचें माध्यम सर्रास वापरलें गेलें. म्हणूनच रासक्रीडेच्या बाबतींत दयार्णवांचा इशारा आहे—

**ईश्वराचें वाक्यचि सत्य। त्यांतहि वर्णाश्रमें नियमित।**
**तेंचि आचरावें निश्चित। सहसा सत्कृत नाचारिजे॥**
**एवं वर्णाश्रमासि जो अनुकूल। तोचि ईश्वराचारही प्रांजळ।**
**येर जो ऐश्वर्य बहळ। तो मनुजीं केवळ नाचरिजे॥**
**यास्तव ईश्वरीं जें आज्ञापिलें। तितुकेंचि मानवीं आचरतां भलें।**
**येर त्याचें करितां केलें। नाशे जोडलें कल्याण॥**

— ३३·३७२, ३७९, ३८०

## दयार्णवांचें काव्यवैभव :

पहिल्या तीन खंडांप्रमाणेंच याहि खंडांत दयार्णवांचें काव्यवैभव उतास आलें आहे. रासक्रीडेसारखा काव्यानुकूल विषय हाताळतांना दयार्णवांनीं ललितरम्य शब्दयोजना आणि भावरम्य कल्पना यांचा सर्वत्र वापर केला आहे. शरदांतील रात्रींचें सौंदर्य, गोपींचें सौंदर्य, त्यांची कृष्णासक्ति आणि तज्जन्य विरहवेदना, त्यांचा स्त्री-सुलभ मत्सर आणि रासलीलेंतील त्यांची उन्मुक्तावस्था हीं सर्वच चित्रणें दयार्णवांनीं बहारदार केलीं आहेत. कृष्णरूपाचें वर्णन करतांना तर त्यांचें भक्तहृदय आवेगानें ओसंडूं लागतें. एखाद्या उत्फुल्ल पुष्पवाटिकेंत प्रवेशल्यावर जसा सौंदर्याचा तरतमभाव ठरवितां येत नाहीं, तीच अवस्था दयार्णवांच्या काव्योद्यानांत प्रवेशल्यावर होते. प्रासांच्या पैंजणांची रुणझुण तर ओवीओवींत आहे. नादानुकारी प्रासयुक्त रचना त्यांच्या प्रतिचरणांत येते आणि त्यांत अर्थसघनता वा चित्रसंपन्नता ठोस भरलेली असते.

**कोण्ही गोपी गोदोहनीं। बैसल्या जानुधृतभाजनीं।**
**स्तननिष्पीडनीं हस्त दोन्ही। जवें तळपती अधोर्ध्व॥**

— २९·१०५

असें चित्र, मुळांत आधार नसतां, ते सहजलीलेनें एका ओवींत चितारूं शकतात.

**कन्या आवडती दूरदेशीं। माता बोळवी सासुरियासी।**
**मग ते आठवे निजमानसीं। मोहें पिशी तद्वेधें॥**
**अवचित भासे दृष्टीपुढें। स्वप्नीं संवादीं पवाडे॥**
**तिचें बोलणें कानीं पडे। म्हणोनि वावडे पाहावया॥**
**मुखें आळवूं जाय सुनां। तंव तिचेंचि नांव ये वदना।**
**खातां जेवितां प्राशितां जीवना। विसर पडेना तियेचा॥**

— २९·३९८–४००

असें भावरम्य चित्र, स्त्रीहृदयाचा ठाव घेऊन, जेव्हां दयार्णव चितारतात, तेव्हां त्यांच्या सहृदयतेनें रसिक भारावून जातो विरही गोपींचें वर्णन करतांना—

**पहातां उघडीं दिसतीं बुबुळें। आकर्ण कुरंगीसदृश डोळे।**
**ढळमळां स्रवतीं सशोक जळें। अचळ मौळें जैंवि घनीं॥**

— २९·४१४

असें त्यांच्या अश्रुसिक्त नयनांचें वर्णन केलें आहे. या ओवींतील अखेरच्या चरणांत सहज वापरलेली प्रतिमा हृदयंगम आहे.

श्रीकृष्णलीलेसारखा विषय, एकाशिवराम व शिवदीक्षित चौधरी यांच्यासारख्या मर्मज्ञ श्रोत्यांचा समूह आणि दयार्णवांसारखा कृष्णप्रीतीनें रंगून गेलेला वक्ता असा त्रिवेणी-संगम झाल्यामुळें काव्याचें प्रयागतीर्थ निर्माण न झालें तरच नवल!

**आवडतयाची कहाणी। वाखाणितां न पुरे धणी।**
**श्रवणीं सादर होतां कोणी। न पुरे शिराणी कथनाची॥**

— २९·३९५

अशी दयार्णवांची अनावर अवस्था झाली आहे. अशा अवस्थेंत वर्ण्य विषयाच्या अंगप्रत्यंगांतून काव्यसौंदर्य ओसंडत राहिल्याशिवाय कसें राहील? त्या सौंदर्याच्या आस्वादनांत प्रस्तावनालेखकाच्या मध्यस्थीची जरुरी नाहीं. मधुलोलुप मिलिंदांना-

मकरंदाचा ठावठिकाणा अन्य कुणीं सांगावा लागत नाहीं.

**दयार्णवांचें ज्ञान-विज्ञान :**

दयार्णवांच्या प्रचंड शास्त्राध्ययनाची आणि सूक्ष्म व्यवहार-निरीक्षणाची कल्पना वाचकांना गेल्या तीन खंडांवरून आलेलीच आहे.

**दशमस्कंधाचें व्याख्यान । भाषाबद्ध निरूपण ।**
**प्रेमळ भक्त जे अव्युत्पन्न । त्यांतें श्रवण करावया ॥**

— ३५·१३

अशा प्रकारें अव्युत्पन्नांसाठीं जरी हें 'भाषाबद्धनिरूपण' दयार्णवांनीं आरंभिलें असलें, तरी तें त्यांना केवळ कथा सांगण्यासाठीं नसून 'व्युत्पन्न' बनविण्यासाठीं आहे असें सहज दिसून येईल. या खंडांतील अध्यायांचें वर वर निरीक्षण केलें, तरी या गोष्टीचें प्रत्यंतर येईल. 'हरिवरदे'च्या एका समीक्षकानें म्हटल्याप्रमाणें दयार्णव वाचकांना एकाच वेळीं काव्यानंद, ज्ञानानंद आणि भक्त्यानंद अशा त्रिविध आनंदांचा लाभ घडवितात. उत्तम-श्लोकांनींहि या ग्रंथाविषयीं असाच अभिप्राय व्यक्त केला आहे–

**जियेचेनि श्रवणें पढणें । बहु हर्षिजे विद्वज्जनें ।**
**कृतार्थ होइजे मुमुक्षुगणें । विषयी जनें सुखाविजे ॥**

— सप्तशती, १·४५

अध्यायांच्या उपक्रम-उपसंहारांत, विशेषतः उपक्रमांत दयार्णवांनीं गुरुवंदनाबरोबर साधनातत्त्वांचा आणि दार्शनिक मूल्यांचा जो प्रपंच केला आहे, तो त्यांच्या ठाशीव तत्त्वविवेचनाचा पुरावा आहे. २९ व्या अध्यायाच्या मंगलाचरणांत मानवेतर योनींशीं तुलना करून नरदेहाचा महिमा पटविल्यावर साधकाच्या वृत्ति-विकासाचा आराखडा त्यांनीं सहा ओव्यांत ( २९·२४–२९ ) सुस्पष्टपणें रेखाटला आहे आणि —

**गुरुपदभजकां मोक्षासाठीं । न लगे साधनीं आटाआटी ।**
**करूनि साधनांची पाउटी । साधनां मुकुटीं गुरुभक्ति ॥**

— २९·३०

असा गुरुमहिमा उद्घोषिला आहे. ३१ व्या अध्यायाच्या मंगलाचरणांत परमार्थविरत ज्ञानाची हजेरी घेतांना अनेक शास्त्र-कलांचा उल्लेख आला आहे आणि ३२ व्या अध्यायारंभीं—

**ज्याच्या दर्शनें परमोल्हास । कैवल्यसुखापरिस विशेष ।**
**तो गोपीमानसराजहंस । नमूं निगमेश गोविंद ॥**
**जैन मीमांसा पातंजल । सांख्य वैशेषिकादि सकळ ।**
**तव दर्शनाविण अकुशल । दर्शनें केवळ अदर्शनें ॥**

अशा शब्दांत शास्त्राध्ययनाला परमार्थाची बैठक नसेल, तर तें सर्व व्यर्थ असल्याची जाणीव दिली आहे. गोपींच्या व्यथे-विषयीं, एक भक्त म्हणून दयार्णवांना स्वाभाविकच सहानुकंपा आहे. या सहानुकंपेमुळें संपूर्ण रासक्रीडेचा विषय हाताळतांना जागोजाग भक्तिविज्ञानाचीं अंगोपांगें त्यांनीं सहृदयतेनें हाताळलीं आहेत. कृष्णगायनानें मत्त झालेल्या गोपींची मन्मथ-वृद्धि सांगतांना—

**कीं विष्णुस्मरणे सुकृतवृद्धि । गुरुपदभजनें वाढे बुद्धि ।**
**तैसी कंदर्पा प्रवृद्धि । होय निरवधि त्या गानें ॥** (२८·८४)

अशीं उपमेदाखल सहज साधनामूल्यें वापरलीं जातात. ३७ व्या अध्यायाच्या आरंभीं वर्णिलेलें नमन-माहात्म्यहि चिंतनीय आहे. 'तें बृहदारण्यींचें भगवद्गान' (२९·९२), लोकेऽस्मिन् द्विविधा निष्ठा । ज्ञानें सांख्यांची प्रतिष्ठा ।' (२९·३४२), 'मथुरा-माहात्म्यीं हें आख्यान ।' ( ३३·३०१ ) असे ग्रंथसंदर्भ विवे-चनाच्या ओवांत जागोजाग दिसून येतील.

व्याकरण आणि शब्दसंभार या बाबतींत दयार्णवांचा विशेष आहे. शब्दांचें व्युत्पादन आणि पदपरिस्फोट करतांना त्यांच्या भाषाप्रभुत्वाचा प्रकर्ष दिसून येतो. दयार्णवांच्या भाषावैशिष्ट्यांचा आणि शब्दयोजनेचा अभ्यास स्वतंत्रपणेंच करावयास हवा. या प्रस्तावनेच्या अल्प मर्यादेंत त्या वैशिष्ट्यांचें स्थूल दर्शन घडविणेंहि शक्य नाहीं.

तत्त्वज्ञान, व्याकरण, काव्यशास्त्र यांशिवाय विविध वृक्षवेली, विविध स्वभावाचीं नि आचारांचीं माणसें, त्यांचे वेश, दाग-दागिने, अन्नप्रकार, त्यांचे भले-बुरे व्यवहार, नृत्य-संगीतादि कला यांविषयींचें सूक्ष्म निरीक्षण दयार्णवांच्या काव्यांत प्रसंगानुसार व्यक्त झालें आहे. २९ व्या अध्यायांत ३०५ ते ३३१ या ओव्यांत जारवृत्तीच्या व्यक्तींचें जें भयंकर दर्शन दयार्णवांनीं घडविलें आहे, तें पाहून त्यांच्या निरीक्षणव्याप्तीनें आपण आश्चर्यमूढ होतों. या जारिणीच्या चित्रणांत दयार्णवांचा कामशास्त्राचा व्यासंगहि सूचित होत आहे. रासक्रीडेच्या निमित्तानें त्यांनीं हा कामविज्ञानाचा व्यासंग अनेक ठिकाणीं प्रकट केला आहे ( २९·३१६–३१७, २९·६५८-६८ इत्यादि ). 'धर्माविरुद्धः कामोऽस्मि' या गीता-कारांच्या उक्तीचें दयार्णवांना भान असावें, असें मानायला जागा आहे. गार्हस्थ्यजीवनांतील कामाचें धर्म्य स्थान आणि त्यासाठीं कामानुशासनाची आवश्यकता दयार्णव प्रतिपादितात, हें पाहून आजचा वाचक त्यांच्याविषयीं सादर कुतूहल व्यक्त केल्याशिवाय राहणार नाहीं. कामविज्ञानाच्या उपेक्षेविषयीं दयार्णव खंत व्यक्त करतांना म्हणतात—

**इत्यादि क्रीडा सविस्तर । कंदर्परहस्यशास्त्रानुसार ।**
**सुभगशिक्षित नारीनर । दुर्लभतर त्रैलोक्यीं ॥** ( २९·६६३ )

ही जी दयार्णवांची निकोप जीवनदृष्टि आहे, ती त्यांना समकालीन परिस्थितीविषयींहि जागरूक ठेवते. कदाचित् बाल-पणीं समर्थांचे संस्कार घडल्यामुळें असेल, परंतु समर्थांच्या खालो-खाल परिस्थितीचा विचार करणारा दयार्णवांशिवाय अन्य

प्राचीन कवि आढळणार नाहीं. या खंडांतहि त्यांची ही जाणीव तीव्रपणें प्रकटली आहे : पोटासाठीं विद्येचा विकरा करणारे पढीक पंडित (२९·३५७), ऋणकोला छळणारे धनिक (२९·३६४–३७७), विषयपूर्तीसाठीं शिष्यांना नाडणारे दांभिक गुरु (३१·९–३३), प्रपंचाचा बोजवारा उडालेले बहुसंख्य प्रवाहपतित जन (२९·३४९–३५५), परस्त्रीद्रव्यापहरण आणि निरपराधसाधुच्छलन करणारे दुर्जन (३५·१५०), उर्दू भाषा आणि लिपि यांचा स्वीकार करून म्लेंच्छांच्या सेवेंत रमणारे लाचार व स्वधर्मच्युत ब्राह्मण (३६·१७–१९), विप्रमंडळीचें अस्तित्व न साहणारे उन्मत्त म्लेंच्छ (३६·३८), इत्यादि अनेक प्रकारच्या लोकांचें निरीक्षण आणि त्यांच्या अनिष्ट आचरणांविषयींचा संताप त्यांनीं व्यक्त केला आहे. समाजाचें गुरुत्व ज्या वर्णाकडे आहे, त्याचें लाचार पतन पाहून तर दयार्णव अत्यंत उद्विग्न होतात—

**त्याहूनि मळहारक बरा । मूर्खपणें तो निंदसुरा ।**
**येऱ्हवीं करील जरी स्वविचारा । तरी संसारा जिंतील ॥**
**च्यारी घटिका मळापहरणीं । उरला काळ स्वाधीनपणीं ।**
**सप्रेम नाम स्मरेल वाणी । तरी दुर्योनि चुकवील ॥**

—२९·३६०–६१

या ओव्यांत त्यांनीं स्वधर्मच्युत ब्राह्मणाहून भक्तिपरायण भंग्याला अधिक श्रेष्ठ म्हटलें आहे.

दयार्णवांच्या या निकोप जीवनदृष्टींतूनच त्यांच्या कर्मयोगी सफल जीवनाची उभारणी झालेली आहे. त्यांनीं जीवनांत खूप सोसलें आहे, प्रतिकूल परिस्थितीमुळें त्यांना अनेकदां प्रपंचाची सांड-मांड करावी लागली आहे, तिरस्करणीय व्याधीच्या शारीरिक व मानसिक वेदना त्यांनीं धीरोदात्तपणें साहिल्या आहेत, जीवनसाफल्याच्या शिखराजवळ पावलें पडत असतांना प्राप्त झालेलें गुरुविरहाचें दारुण दुःख नीलकंठाच्या सामर्थ्यानें गिळलें आहे आणि ते बळीच्या माथ्यावर पाय देऊन तीन पावलांत विश्व व्यापणाऱ्या वामनाप्रमाणें त्रिविध तापांना तुडवून जीवन-सिद्धीच्या गौरीशंकरावर उभे राहिले आहेत. अशा या कर्मयोग्याचा तुम्हां-आम्हांला संदेश आहे—

**अंतरीं असोनि निजात्मरत । बाह्यप्रवृत्ति कर्मासक्त ।**
**नाशीं नेदितां परमार्थ । जनहितार्थ वर्तावें ॥**

—३३.४५१

**ऋणभार :**

अशा थोर संतकवीचें वाग्भांडार महाराष्ट्रापुढें खुलें करतांना प्रकाशकांनीं दयार्णवांची पूजा बांधण्याची संधि देऊन मला उपकृत केलें आहे. 'हरिवरदा' हा ग्रंथ श्री. कोपर्डेकरांचा जसा वांशिक वारसा आहे, तसाच तो साऱ्या महाराष्ट्राचा साहित्यिक आणि पारमार्थिक वारसा आहे. म्हणूनच या ग्रंथाच्या प्रकाशन-व्ययासाठीं मराठी जनतेनें अनन्त हस्तांनीं सहाय्य करावयास हवें. विशेषतः जाणते भक्तिपरायण लोक आणि साहित्यप्रेमी वाचक व साहित्याभ्यासक यांनीं 'हरिवरदे'च्या प्रकाशनांत सक्रिय वांटा उचलणें कर्तव्यप्राप्त आहे, असें मला वाटतें. या कार्याचा भार श्री. कोपर्डेकरांनीं उचलून मराठी वाचकांची जी सेवा केली आहे, त्याबद्दल सर्वांतर्फे मी त्यांचा आभारी आहें. तसेंच या ग्रंथाच्या संपादन-प्रकाशनांत मार्गदर्शन, प्रोत्साहन व संदर्भसाह्य देणारे डॉ. वसंतराव राहूरकर, श्री. धुंडामहाराज, श्री. रंगनाथ नरहर नाईक (मुंगी) आणि श्री. अ. गं. जोशी (उमरखेड) यांचाहि मी कृतज्ञ आहें. 'हरिवरदे'च्या मुद्रणसौंदर्याचे वांटेकरी श्री. श्री. ज. गानू हे अत्यंत आत्मीय भावनेनें मुद्रणाचें काम करीत असल्यानें आभाराच्या उपचारानें त्यांच्याविषयीं परकेपणा व्यक्त करणें मला इष्ट वाटत नाहीं. शेवटीं, हें पवित्र कार्य अव्याहतपणें चालू रहावें आणि सर्वांच्या सहकारानें सिद्धीला जावें, यासाठीं मी दयार्णवांच्याच शब्दांत प्रभूची प्रार्थना करतों—

**"आपुले कृपेचा जोगवा । देऊनि पदभजनीं जागवा !"**

विजयादशमी :
२१ ऑक्टोबर १९५८

**— रामचंद्र चिंतामण ढेरे**

# कृष्णदयार्णवकृत ‘ हरिवरदा ’ ( खंड ४ था )

## अ नु क्र म णि का





**चार खंडांची ओवी-संख्या १७३७३**

* * * * *

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय २९ वा

श्रीकृष्णस्वामिने नमः ॥ कैवल्यसुखाचें पारणें । प्रणता जयाच्या पादस्मरणें । तो गोविंद सद्गुरु अंतःकरणें । सप्रेमध्यानें कवळिला ॥ १ ॥ स्वस्वरूपाच्या विमुखपणें । जीवा कैवल्यसुख नेणणें । बाह्यविषयांचेनि भानें । संतत शिणणें सुखलाभा ॥ २ ॥ लक्षचौऱ्यांशीं योनींप्रति । वाहतां विषयांची सुखावाप्ति । इच्छूनि भवोद्भवें भरती* । दुःखदुर्गतीमाजिवडे ॥ ३ ॥ सर्वयोनींमाजि ज्ञान । सांचलेंसूचकध्वनिबोधन । तैसेंचि स्पर्श तें वेदन† । खेद मोदन परस्परें ॥ ४ ॥ तैसेचि सर्वांठायीं चक्षु । रूपमात्र शकती लक्षूं । जातिविषयें सुखोत्कर्षु । क्लेशविशेषभय बोधें ॥ ५ ॥ तैसीच नैसर्गिक रसना । जातिवैशिष्ट्यें रसज्ञा‡ । जाणे आणि अवघ्राणा । घ्राणकोविद निसर्गें ॥ ६ ॥ आहार निद्रा भय मैथुन । सर्वेंद्रियीं इतुकेंचि ज्ञान । भूत भविष्य वर्तमान । पाप पुण्य¶ अनोळख ॥ ७ ॥ इहामुष्मिक पारावार । वेदशास्त्र कुलाचार । वृत्ति व्यवसाय अहंकार । दीर्घतर संग्रह ॥ ८ ॥ इत्यादि बोध नाहीं त्यांसी । विमुख तुरीयेच्या प्रवेशीं । जागृतिस्वप्नसुषुप्तींपाशीं । निबद्ध जालीं गुणकर्में ॥ ९ ॥ सर्पीं नेत्रेंचि ऐकावें । पश्वादी घ्राणें§ वोळखावें । मयूरीं नेत्रेंचि रमावें । पदीं सेवावें उद्भिज्जें ॥ १० ॥ ऐसिया अनेक योनीप्रती । विपरीत अनेक इंद्रियवृत्ति । नैसर्गिक विषयप्रवृत्ति । साधनसंपत्ति त्यां कैंची ॥ ११ ॥ बहुत पशु होऊनि एक । आदरें घेती काय श्रवणसुख । वक्ता बैसवूनि सम्मुख‖ । ज्ञाता सम्यक पशुवर्य ॥ १२ ॥ जाणोनि आयुर्दायविशेष । सर्प न करिती योगाभ्यास । चिरायु क्रमिती गगनास । परी यात्रा वायस न

पाठभेद :— * मरती ( मुं. आणि उ. ). † संवेदन ( मुं. आणि उ. ). ‡ रसज्ञाना ( मुं. आणि उ. ). ¶ पापपुण्य ( मुं. ). § घ्राणेंचि ( मुं. ). ‖ सन्मुख ( मुं. आणि उ. ).

१ चाहूल. २ पशु इत्यादिकांनीं. ३ तरुगुल्मादिकांनीं.

करिती ॥ १३ ॥ हस्तपादादिसंपन्न । म्हणोनि रीसवानरगण । न करिती वेदशास्त्रपठण । कर्माचरण श्रौतादि ॥ १४ ॥ एवमादि सर्वजाति । तुरीयबोधेंचिं वर्तती । अनुपरमें तुरीयस्थिति । दुर्लभ त्यांप्रति सर्वत्र ॥ १५ ॥ म्हणोनि न खंडे जन्ममरण । आणि न वाढेचि क्रियमाण । प्रारब्ध मात्र होय क्षीण । वर्ष्मपतनपर्यंत ॥ १६ ॥ ऐसे अनेक जन्म घेतां । वेंचिती आगळ्या संचिता । पापपुण्या ये तुल्यता । तैं लाभे तत्त्वता नरदेह ॥ १७ ॥ ऐसा नरदेह अवचट जोडे । तेथही विषयसुखाचे चाडे । कर्माचरण करूनि कुडें* । भोगिती बापुडे दुर्योनि ॥ १८ ॥ लाहोनियां नरदेह सार । निर्दय हिंसक ढीवर । निषादादि परमक्रूर । पुन्हा अघोर नारकी ॥ १९ ॥ एक तृणकाष्ठा छेदक । एक कृपीवळ भूकर्षक । शिल्पिक नापिक कारुक । वार्धुषिक नटकादि ॥ २० ॥ पोषिती व्याघ्र सर्प वृश्चिक । काढिती अमंगल मूत्रनरक । ऐसे व्यवसाय अनेक । दुर्विवेक पोटार्थ ॥ २१ ॥ जन्मापासूनि मरणवरी । विषयांवेगळी गोष्टी† दुसरी । नुमजों देतां षड्विकारीं । ज्यां षड्वैरि जाचिती ॥ २२ ॥ ऐशा नरदेहाचिया प्राप्ति । लाहोनि वृथा नरका जाति । त्यांसि दुर्लभ तव पदप्रणति । ते भवभ्रांतिवरपडे[४] ॥ २३ ॥ दुर्लभ नरदेहाची प्राप्ति । त्याहूनि दुर्लभ सत्संगति । तेथही दुर्लभ सत्प्रवृत्ति । जे दे रति सत्संगीं ॥ २४ ॥ सत्संगतीं वेधतां मन । प्रवृत्ति निवृत्ति होय श्रवण । सारासार कळतां पूर्ण । करी प्रयत्न सारार्थ ॥ २५ ॥ तेव्हां असारीं होय विरत । सप्रेमनिष्कामभजनीं रत । सारांश जाणोनि निजात्मस्वार्थ । अतंद्रितें[५] शमषट्कीं ॥ २६ ॥ इत्यादि साधनीं भगवान । द्रवे कारुण्यें कळवळून । तेव्हां सद्गुरुसन्निधान । करूनि भजन प्रमोदें§ ॥ २७ ॥ भगवत्प्रसादजनितभक्ति । तरीच निर्विघ्न गुरुपदरति । येरां मृगजलाचिये स्थिती । बाह्यप्रवृत्ति नाथिली ॥ २८ ॥ एवं भगवद्वरदप्रणतां । कैवल्यपारणें गुरुपदभक्तां । अनेककल्प योनि भ्रमतां । जोडे अवचितां सुखलाभ ॥ २९ ॥ गुरुपदभजकां मोक्षासाठीं । न लगे साधनीं आटाआटी । करूनि साधनांची पांउटी[६] । साधनांमुकुटीं गुरुभक्ति ॥ ३० ॥ यालागीं प्रणतीं चरणस्मरण । करितां कैवल्यसुख संपूर्ण । भोगूनि निववितो ते निजशरण↑ । मिथ्या भवभान उमजवूनी ॥ ३१ ॥ तो गोमतीआनंदकंद । मजमाजि नांदे श्रीगोविंद । सबाह्य सप्रेम ध्यानानंद । अनन्य अभेद प्रकटला ॥ ३२ ॥ आतां वक्ता आणि वदविता । एकात्मतेची लाहती‖ सत्ता । तथापि श्रीचरणा-परौता । लाभ तत्वता मज नुमँसो[७] ॥ ३३ ॥ ऐसें ऐकोनि अभेद स्तवन । वशी करूनि अंतःकरण । कृपेनें दिधली आठवण । ग्रंथ निर्माण करावया ॥ ३४ ॥ अठ्ठाविसाव्या अध्यायांतीं । वैकुंठदर्शन गोपांप्रति । देऊनि पुढती पूर्वस्थिति । यथाप्रवृत्ति आणिले ॥ ३५ ॥ यावरी गोपींच्या वरोत्तीर्णा‡ । कामक्रीडाविडंबना । देऊनि¶ करील मन्मथमथना । त्रैलोक्यराणा तें ऐका ॥ ३६ ॥ आतां एकोणतिसावा । अध्याय आरंभिला बरवा । येथूनि रासरसाब्धिहेलावा । तेतिसावापर्यंत ॥ ३७ ॥ या अध्यायीं कृष्णगीता । ऐकोनि गोपी विरहतप्ता । वनीं वनमाळी संप्राप्ता । तेणें धर्मता

पाठभेद :— *पुढें ( उ. ). †गोष्टी ( उ. ). §प्रेमा दे ( मुं. आणि उ. ). ↑निजजनशरण ( मुं. ). ‖लाहोनी ( मुं. ) ‡वरदोत्तीर्णा ( मुं. आणि उ. ). ¶दाऊन ( उ. ).

१ देहपात. २ चुकून, विरळा. ३ वाईट. ४ वरपडे = स्वाधीन. ५ आलस्यरहित. ६ पायरी. ७ न समजो.

वारिल्या ॥ ३८ ॥ तिहीं प्रत्युक्तिभाषण । अभेदप्रेमा दर्शवून । सूचिलें दुस्त्यज भगवच्चरण । मग झाला§ रमोन हरि गुप्त ॥ ३९ ॥ इतुकी कथा ये अध्यायीं । परिसे परीक्षिति प्रायोपशायी[1] । मुनिनिर्वाणसुखनवायी । नृपा ये ठायीं निरूपी ॥ ४० ॥

श्रीशुक उवाच— भगवानपि ता रात्रीः शरदोत्फुल्लमल्लिकाः । वीक्ष्य रंतुं मनश्चक्रे योगमायामुपाश्रितः ॥ १ ॥

हेमंतीं गोपीव्रताचरण । करूनि कात्यायनीपूजन । लाधल्या जें हरिवरदान । तें संपूर्ण करावया ॥ ४१ ॥ शरच्छर्वरी[2] शशिभायुक्त[3] । कुंज सँकूजित[4] कुसुमित । गोपीसुकृतोदय संप्राप्त । जाणोनि प्रकटित रतिरंगा ॥ ४२ ॥ किंवा गोपी बाल्यवयसा । फेडून लेती यौवनदशा । तोंवरी केली काळप्रतीक्षा । होतां त्या निशा संप्राप्त ॥ ४३ ॥ षड्गुणैश्वर्यसंपन्न । असतांही श्रीभगवान । कां पां काळप्रतीक्षण । केलें म्हणोन शंकला* ॥ ४४ ॥ योगमाया अंगीकारी । काय पां करूं न शके हरि । तो कां काळप्रतीक्षा करी । ह्मणें अंतरीं हें माना ॥ ४५ ॥ अकाळीं वनश्री प्रकटितां । बाल्या फेडूनि तारुण्य देतां । तत्काळ गोपीमनोरथा । काय पुरवितां अशक्य ॥ ४६ ॥ तरी ऐकावें इये विशीं । अशक्य नाहीं भगवंतासी । परी भक्तांच्या सुकृतराशि । येती उदयासि तें लाभ ॥ ४७ ॥ गोपी तोषवूनि वरदानें । यज्ञपत्न्यांचीं† उत्कटपुण्यें । त्यांच्या सप्रेम स्नेहबंधनें । पूर्ण कारुण्यें कळवळिला ॥ ४८ ॥ काम असतां कृष्णाआंगीं । तरी अनुकूलवयस्का तन्वंगीं[5] । करूनि रमता स्वेच्छाभोगीं । तेचि प्रसंगीं उताविळा ॥ ४९ ॥ पूर्णकाम परमेश्वर । सप्रेम स्वजनाचें अंतर । जाणोनि क्रीडे तदनुसार । नानावतार नटनाट्यें ॥ ५० ॥ जाणोनि स्वभक्त-मनोगता । स्वलीला प्रकटी बालचरिता । येरवीं कंस संहारितां । दुर्घटता त्या कोण ॥ ५१ ॥ हिरण्यकशिपुनिर्दाळणा । स्तंभीं प्रकटवी आपणा । तो येथ कंससंहरणा । समरांगणा समर्थ¶ ॥ ५२ ॥ परंतु भक्ताचें वालभ । जाणोनि झाला पशुपडिंभ । अमरां दुर्लभ पंकजनाभ । तो क्रीडे स्वयंभ सुलभत्वें ॥ ५३ ॥ गोपीचीरापहरणकाळीं । भावूनि निजवयसा कोंवळीं । यथाकाळें श्रीवनमाळी । कंदर्पकेलिप्रद हो कां ॥ ५४ ॥ जाणोनि त्यांच्या अभिवांछिता । काळप्रतीक्षा झाला करिता । येऱ्हवीं जो मायाभर्ता । त्या भगवंता न अशक्य ॥ ५५ ॥ गोपीमनोऽनुकूला रात्री । शरदुत्फुल्ल-मल्लिकापत्रीं । श्रीभगवंत लक्षूनि नेत्रीं । तच्चरित्रीं प्रवर्तला ॥ ५६ ॥ योगमायेच्या अवलंबें । अभीष्टविभव आणूनि शोभे । रतिरहस्य पंकजनाभें । मनासिजक्षोभें मनीं धरिलें ॥ ५७ ॥ हरिहरब्रह्मादि जिंकूनि कामें । कंदर्प दाटला दर्पभ्रमें । तो येथ जिंकूनि रासक्रमें । विजयसंभ्रमें हरि वर्ते ॥ ५८ ॥ रासमंडळा जो मंडन । होऊनि कंदर्पदर्पखंडन । करी आखंडलस्मयदंडन[6] । पवनकृशानुवरुणेशीं[7] ॥ ५९ ॥ येथ शंका कीजेल श्रोतां । परदारविनोद केला असतां । कंदर्प-

---

**पाठभेद :**— § जाला ( उ. ). * शंकाल ( मुं. आणि उ. ). † यज्वपत्न्यांचीं ( उ. ) ¶ असमर्थ ( मुं. आणि उ. )

१ संन्यासग्रहणपूर्वक अन्नत्याग. २ शरदृतूंतील रात्री. ३ चंद्रप्रकाशयुक्त. ४ पक्ष्यांच्या मधुर शब्दांनीं युक्त. ५ सुंदरी. ६ इंद्राच्या गर्वाचें खंडन. ७ अग्नि.

विजयाची योग्यता । श्रीभगवंता न शोभे ॥ ६० ॥ परस्त्रीविनोदें करून । कंदर्पजयाचें श्लाघ्यपण। भासे विपरीत कर्माचरण । न शोभे गौण भगवंतीं ॥ ६१ ॥ ऐसी शंका ह्मणें माना । योगमाया-अवलंबना । करूनि नाट्यक्रीडा नाना । आत्मारामचि अभिरमे ॥ ६२॥ 'योगमायामुपाश्रितः'। भावार्थ याचि पदाआंतौता[1] । जों न शिवोनि परयोषिता । झाला रमता स्वाराम ॥ ६३ ॥ 'आत्मारामोऽप्यरीरमत' । वक्ष्यमाणोक्ति हें संमत । साक्षान्मन्मथाचा मन्मथ । परस्त्री किमर्थ ते ठायीं ॥ ६४ ॥ जयाच्या स्वरूपा मन्मथ भाळे । द्वैत निवटूनि मावळे । तेथ परस्त्रीसुखसोहळे । म्हणतां काळें मुख नोहें ॥ ६५ ॥ तस्माद्रासक्रीडाविडंबन । कामविजयप्रख्यापन । तेथींचें तत्त्व इतुकें पूर्ण । सकारण जाणिजे ॥ ६६ ॥ एवं आपण आपुले ठायीं । सुरतक्रीडा शेषशायी । करूनि प्रवर्ते मन्मथविजयीं । ते ये नवायी कथेची ॥ ६७ ॥ तेंचि शृंगारकथामिषें । पंचाध्यायीं रासरसें । अध्यात्मपरनिवृत्तिदशे । आणूनि विशेषें उमजा हें ॥६८॥ भगवत्प्रतिश्रुतां[2] ज्या रजनी । मनोऽनुकूला स्मरक्रीडनीं । त्या दो श्लोकीं श्रीशुक वर्णी । श्रोतीं सुकर्णी परिसाव्या ॥ ६९ ॥

तदोडुराजः ककुभः करैर्मुखं प्राच्या विलिंपन्नरुणेन शंतमैः ।
स चर्षणीनामुदगाच्छुचो मृजन् प्रियः प्रियाया इव दीर्घदर्शनः ॥ २ ॥

योगमायाविभवें हरि । स्वेच्छा वनश्री अनुकूल करी । पंचभूतें सशर्वरी । कोणे परी तें ऐका ॥ ७० ॥ जाणोनि गोपींचा स्मरोदय । वनीं राहूनि* वनजाप्रिय[3] । तत्प्रीतीस्तव अत्रितनय[4]। प्रकट होय प्राग्भागीं ॥ ७१ ॥ उडुगणेंशीं विराजित । ऐंद्रीदिङ्नायिकाकांत[6] । जेंवि चिरकाळें प्रिय संप्राप्त । संल्लालित ललनांगा ॥ ७२ ॥ कुंकुमरंगें मुख विलिपी । करलालनें विरहा लोपी । तेंवि अरुणभा[7] मयंक[8] वोपी । लावण्यरूपी दिग्वदनीं ॥७३॥ शीतल शंतम[8] सुखतमकरीं । उदयरागें कुंकुमापरी । प्राचीदिग्वदना शृंगारी । स्वभा पसरी सर्वांगीं ॥ ७४ ॥ सर्वजनाची† तापलाग्नि । शीतळ करीं परिहारूनी । ऐसा उडुपति उदेला गगनीं । प्रीतीकरूनि कृष्णाचे ॥ ७५ ॥

दृष्ट्वा कुमुद्वंतमखंडमंडलं रमाननाभं नवकुंकुमारुणम् ।
वनं च तत्कोमलगोभिरंजितं जगौ कलं वामदृशां मनोहरम् ॥ ३ ॥

जें कृष्णाचें निजमानस । आनंदमय मयंकवेष । घेऊनि उगवे प्राक्ककुभेस‡ । धवळी आकाश स्वतेजें ॥ ७६ ॥ कुमुदें निजोदयें विकसित । करी म्हणोनि तो कुमुद्वंत । कमलावदना समान कांत । अखंडित प्रकाशला ॥ ७७ ॥ अखंडमंडल[9] जैवातृक । अरुण नवकुंकुमकिंजल्क । तैसा

---

**पाठभेद :**— ओवी क्र. ६५ व ६६ या ओव्या मुंगी व उमरखेड प्रतींत उलट क्रमानें आहेत. * वाहूनि (मुं.). † जगाची (मुं.). ‡ प्रागूकुंकुमेप (मुं.).

१ पदांतील. २ कृष्णानें कबूल केलेल्या. ३ वनमाला ज्याला प्रिय तो. ४ चंद्र. ५ पूर्वेस. ६ पूर्वदिशारूप स्त्रीचा पति. ७ तांबडी कांति. ८ अतिसुखकारक. ९ पूर्णमंडल.

अरुणप्रभात्मक । रजनीनायक नभोगर्भी । ॥ ७८ ॥ त्यातें लक्षूनि कमलारमण । कोमल तत्कर-प्रभेकरून । रंजित देखोनि वनजीवन । आदरी गायन गोगोप्ता ॥ ७९ ॥ तें गायन म्हणाल कैसें । सुधा लाजवी माधुर्यरसें । श्रवणमात्रें वधूमानसें । बळें नेतसे हरूनिया ॥ ८० ॥ कामाक्तनेत्रा वामदृशा[१] । श्रवणमात्रें केल्या पिशा । वनीं पहावया परेशा । धांवती कैशा तें ऐका ॥ ८१ ॥

निशम्य गीतं तदनंगवर्धनं व्रजस्त्रियः कृष्णगृहीतमानसाः ।
आजग्मुरन्योन्यमलक्षितोद्यमाः स यत्र कांतो जवलोलकुंडलाः ॥ ४ ॥

सुमनोहर भगवद्गान । सबाह्यानंगोद्दीपन । स्थावरजंगमीं स्मर मोदन । पावे ऐकोन अभिवृद्धि ॥ ८२ ॥ घृतादिसेचनें* पावक वाढे । कां मर्मस्पर्शें क्रोध चढे । कीं गंधगुणपाशें आसुडे† । कुसुमाकडे रोलंबें[२] ॥ ८३ ॥ कीं विष्णुस्मरणें सुकृतवृद्धि । गुरुपदभजनें वाढे बुद्धि । तैसी कंदर्पा प्रवृद्धि । होय निरवधि ज्या गानें ॥ ८४ ॥ ते प्रवृद्धि म्हणाल कैशी । अल्प सूचनें सुज्ञापाशीं‡ । येरां मूर्खां प्राकृतांशीं । हृदयस्फोटेंशीं नुमजवे ॥ ८५ ॥ ज्याचे पदरीं निष्क[३] एक । तो सहस्र निष्क होय कामुक । सहस्र निष्कीं सर्वात्मक¶ । वांछी कनक अभिवृद्धि ॥ ८६ ॥ धनिक वांछी भूपमान । मानी वांछी भूपासन । सार्वभौमत्व जें असपत्न[४] । भूपसामान्य कामिती ॥ ८७ ॥ सार्वभौम स्वाराज्यता । §तो अभिलाषी वैराज्यता । §पारमेष्ठ्यादि साम्राज्यता । सांडूनि परता स्मर वाढे ॥ ८८ ॥ परी तीं नश्वर अवघीं सुखें । पुढती तितुकींच भोगिजे दुःखें । विषयकामीं इहामुष्मिकें । ठकती अल्पकें फळलोभें ॥ ८९ ॥ याहूनि विशेष वाढे काम । तें वांछिती अक्षय्य धाम । स्वसंवेद्य आत्माराम । विषयसंभ्रमवैरस्यें ॥ ९० ॥ ऐसे सनकादि आत्मरत । त्यांहूनि वाढे जैं मन्मथ । तैं भगवत्प्रेमा अत्यद्भुत । सबाह्य संतत वांछिती ॥ ९१ ॥ तें बृहदारण्यींचें भगवद्गान । पूर्वोक्त अनंगप्रवर्द्धन । उपनिषत्श्रुतिरूप होतां श्रवण । साधनसंपन्न वेधल्या ॥ ९२ ॥ साधनसंपन्न म्हणाल कैशा । कृष्णप्रगृहीतमानसा । व्रजास्त्रिया त्या भवसुख-विरसा । कृष्णपरेशा कामिती ॥ ९३ ॥ कात्यायन्यादिव्रताचरणें । रजतम क्षाळूनि शोधिलीं मनें । गृहीं वर्त्ततीं हरिआज्ञेनें । परी संलग्न ध्यानें हरिरूपीं ॥ ९४ ॥ हरिवराचा‖ उदयकाळ । भगवद्गायन तदनुकूल । ऐकोनि झाल्या विरहाकुळ । धांवती विह्वल हरिप्रेमें ॥ ९५ ॥ करणें विसरली प्रवृत्ति । कृष्णगानें हरिल्या स्मृति । पडली भवभानीं विस्मृति । झाली उपरति मानसा ॥ ९६ ॥ नेणती पाउल पडलें कोठें । नादमार्गें धांवती नेटें । श्रवणीं कुंडलें लखलखाटें । तरळतां उमटे विद्युच्छटा[५] ॥ ९७ ॥ विजनीं निकुंजीं जो कां कांत । रमारमणीयएकांत । त्याप्रति जात्या झाल्या त्वरित । कळों नेदित परस्परें ॥ ९८ ॥ विषयसुरतीं सपत्नभावें । रमतां त्रास

पाठभेदः— * सिंचनें ( मुं. ). † आंतुडे ( उ. ). ‡ सूचउ प्रज्ञापाति ( उ. ). ¶ खर्वात्मक ( मुं. आणि उ. ). § या दोन चरणांचा उलट क्रम ( उ. ). ‖ हरिवरदाचा ( उ. ).

१ स्त्रिया. २ भ्रमर. ३ एक सोन्याचें नाणें. ४ शत्रुरहित. ५ विजेचा प्रकाश.

पावल्या जीवें । यालागीं परस्परें न होतां ठावें । घेती धांवे परपुरुषीं ॥ ९९ ॥ पूर्वाज्ञेनें त्रैवर्गिक । करितां कृत्यें प्रापंचिक । कृष्णगायनें सम्यक । झाल्या प्रत्यक्[1]प्रवण त्या ॥ १०० ॥ कृष्णगीतें हरितां मन । कर्म मानिती जैसें वमन । भणगा जोडल्या भद्रासन[2] । मग त्या कोरान्न जेंवि न रुचे ॥ १ ॥ 'यदहरेव विरजेत्[3] । तदहरेव प्रव्रजेत्[4]' । जेव्हां हरिरत झालें चित्त । तैं संन्यस्त त्रैवर्ग्य[5] ॥ २ ॥ अंतर रमतां अंतरंगा । मग तें विसरे सर्वसंगा । असोनि नेणे अंगीं अंगा । भोगी अनंगा समरसें ॥ ३ ॥ जितुकें जालें जें जें कृत्य । तें तितुकेंचि टाकूनि त्वरित । गोपी धांवती काननांत । कमलाकांतसुरतेच्छें§ ॥ ४ ॥

दुहंत्योऽभिययुः काश्चिद्दोहं हित्वा समुत्सुकाः । पयोऽधिश्रित्य संयावमनुद्वास्यापरा ययुः ॥ ५ ॥

कोण्ही गोपी गोदहनीं । बैसल्या जानुधृतभाजनीं[6] । स्तननिष्पीडनीं हस्त दोन्ही । जवें तळपती अधोर्ध्व ॥ १०५ ॥ श्रवणीं भरलें हरिगायन । तेणें वेधिलें अंतःकरण । सवेग होतां मन उन्मन । प्रवृत्तिभान विसरल्या ॥ ६ ॥ पुढें दोहन करणें ठेलें । नेणती पात्र रितें भरलें । नवचे चुल्हीवरी ठेविलें । चित्ता कर्षिलें हरिगानें ॥ ७ ॥ दोह विसरोनि घेती धांवा । गानध्वनीचा लक्षूनि अध्वा[7] । सवेग ठाकिती वासुदेवा । कोण्ही गोवा नाठवतां ॥ ८ ॥ कोण्ही गोधूमकण-कंडना । करूनि बैसल्या असतां पचना । सुपक्क चुल्लिस्थ[8] नुतारितां अन्ना । करिती धावना ध्वनिमार्गें ॥ ९ ॥ अध्यात्मपरिभाषायोजना । अपरपर्यायव्याख्याना । निरूपितां ग्रंथरचना । नटके गगना विस्तारें ॥ ११० ॥ यालागीं पदार्थप्रकाश मात्र । ग्रथनीं जाणिजे सूचनासूत्र । शंकापरिहारीं सर्वत्र । विशेष वक्त्र वावरे ॥ ११ ॥

परिवेषयंत्यस्तद्धित्वा पाययंत्यः शिशून्पयः । शुश्रूषंत्यः पतीन्काश्चिदश्नंत्योऽपास्य भोजनम् ॥ ६ ॥

भोक्तयांच्या बैसल्या पंक्ति । त्यांसि वाढितां गोपयुवति । कृष्णगीतें हरिल्या स्मृति । त्यागूनि जाती तत्कर्मे ॥ १२ ॥ पय पाजितां निजलेंकरें । गायनीं रमलीं अभ्यंतरें । टाकूनि धांवत्या झाल्या त्वरें । प्रेम बावरें हरिवेधें ॥ १३ ॥ सुखशेजारीं असे* भर्त्ता । तत्सेवनीं ज्या अभिरता† । तिहीं ऐकतां कृष्णगीता । टाकूनि स्वकांता धांविल्या ॥ १४ ॥ रुचतां कृष्णध्वनीची गोडी । कांत न रुचती जैसीं मडीं । उन्मन मानसें जालीं वेडीं । बाह्यपरवडी[9] विसरलीं ॥ ११५ ॥ एकी भोजना बैसल्या ताटीं । कोण्ही जेविल्या अर्धपोटीं । कोण्ही ग्रास मोडिले बोटीं । कोण्ही वोठीं स्पर्शिले ॥ १६ ॥ तंव कृष्णाचें मधुर गान । श्रवणमार्गें झडपी मन । सर्वे¶ विसरल्या देहभान । टाकूनि भोजन धाविन्नल्या ॥ १७ ॥ लागतां कृष्णगीताची गोडी । रसना विसरली रसपरवडी । भोज्यभोजनभोक्तृत्व सोडी । वेधें आवडी उपरमे ॥ १८ ॥

---

पाठभेद :-- § सुरतेछा ( उ. ). * असतां ( उ. ). † अभिरमतां ( मुं. ), अभिमता ( उ. ). ¶ सवेग ( उ. ).

१ आत्मस्वरूपाभिमुख. २ रार्जासिंहासन. ३ जेव्हां विरक्ति उपजेल. ४ तेव्हां संन्यास घ्यावा. ५ धर्मार्थकामासंबंधीं. ६ गुडघ्यांवर चरवी ठेवून. ७ मार्ग. ८ चुलीवरील. ९ बाह्यप्रीति.

लिंपंत्यः प्रमृजंत्योऽन्या अंजंत्यः काश्च लोचने । व्यत्यस्तवस्त्राभरणाः काश्चित्कृष्णांतिकं ययुः ॥ ७ ॥

एकीं सारावितां गृहाजिरें[1] । वेधिल्या कृष्णगीतस्वरें । धांवत्या जाल्या तैशाच करें । स्मृति न स्मरे । तनुभावा[2] ॥ १९ ॥ डोई चिकटली जाणोनि नारी । कृष्णमृत्तिका मर्दिती शिरीं । तंव कृष्णगीताची माधुरी । भरे अंतरीं वेधक ॥१२०॥ कृष्णगीतें हरितां मना । तनु न स्मरती नग्नानग्ना । मृत्तिका लेपिली कचकुचवदना । धांवती वना ध्वनिपंथें ॥ २१ ॥ कित्तेक अभ्यंगीं स्नेहाक्ता[3] । उद्वर्त्तनीं उद्वर्तितां । नग्नाअनग्ना तद्‌द्रव्यलिप्ता । भूषणरहिता धांवती ॥ २२ ॥ अंजनवार्तिका[4]‡ घेऊनि करीं । अंजन रेखिलें अर्धनेत्रीं । तंव कृष्णगीत मानसा हरी । भुलल्या नारी तद्वेधें ॥ २३ ॥ अंजनशलाका[4] तैसीच हस्तीं । सांडूनि हंसगति गजगति । पवनवेगें धांवती पंथीं । विवशस्मृति[5] देहभावीं ॥ २४ ॥ एकी नेसणी पांघुरल्या । एकी प्रावरणें नेसल्या । एकीं विपरीत भूषा केल्या । हस्तपादादि अवयवीं ॥ १२५ ॥ एकीं मेखळा घातल्या कंठीं । कंठभूषणें मणगटीं । चरणांगुळीं एकांची दाटी । घालिती मुकुटीं वेणिके* ॥ २६ ॥ एकीं पुष्पें घातिलीं मुखीं । तांबूल तुरंबिलें मस्तकीं । करणाभरणीअनोळखी[6] । श्रीकृष्णसुखीं स्मृति रमली ॥ २७ ॥ पंकजगंधा वाहे पवन तेणें मार्गें भ्रमरागमन । तेंवि ऐकोन कृष्णगान । करिती धावन तत्पथें ॥ २८ ॥ एवं तनुमनभावीं विवशा । कृष्णगायनवेधवशा । कृष्णापाशीं मीनल्या कैशा । भवदुराशा तुरवुनी ॥ २९ ॥ ऐशा विवश धावतां नारी । कोण्ही निषेधक नव्हते घरीं । ऐसा संदेह धरूनि चतुरीं । शंका अंतरीं हें न कीजे ॥ १३० ॥ बाह्य कृष्णार्थ करितां कर्म । अंतर वेधी तद्‌गुणप्रेम । वेधे विह्वळ इंद्रियग्राम । तैं कर्मसंभ्रम व्यत्यस्त[7] ॥ ३१ ॥ कृष्णभजनीं विपरीतता । कृष्णप्रेम त्यां सांगतां । गोपी वेधूनि कृष्णगीता । विवशसंकेता सूचिलें ॥ ३२ ॥ कृष्णभजनीं ज्या सस्निग्धा । त्यांसि विघ्नाची न बाधी बाधा । यालागीं गोपींच्या निषेधा । कोण्हा निरोधा न करवे ॥ ३३ ॥

ता वार्यमाणाः पतिभिः पितृभिर्भ्रातृबंधुभिः । गोविंदापहृतात्मानो न न्यवर्तंत मोहिताः ॥ ८ ॥

इहामुत्रीं ज्या विरक्तमना । भवसुखसंमान† मानिती वमना । त्यांसि निषेध करवे कोणा । आप्तां स्वजनां कां इतरां ॥ ३४ ॥ आकाश तुटोनि पडल्यावरी । विरोनि ठिकऱ्या होय धरित्री[8] । कां उपडोनि गडबडां लोटल्या गिरि । विरक्त अंतरीं न डंडळिती[9] ॥१३५॥ लोटतां प्रळयसिंधुजळ । कीं वरी पडतां वज्रकल्लोळ । कोपें खवळतां कृतांत काळ । विरक्त निश्चळ निर्मम ॥ ३६ ॥ देहस्मृतीचें अस्तमान । कोण सांभाळी प्रपंचभान । मान अपमान कीं सम्मान↑ । इत्यादि ज्ञान कोण§ मनी§ ॥ ३७ ॥ गोपी हरिरंगीं होऊनि‖ सक्ता‖ । इहामुष्मिकीं ज्या विरक्ता । विवश

**पाठभेद :—** ‡ – वटिका( मुं. व उ. ) * वेणिये ( उ. ). †–समान ( उ. ). ↑ सन्मान ( उ. ). §तें कोण्हा ( उ. ) ‖ अनुरक्ता ( उ. ).

१ गृहासमोरच्या आंगणें. २ देहभाव. ३ अंगास तेल ज्यांनीं लाविलें आहे त्या. ४ डोळ्यांत काजळ घालण्याची काडी ५ पराधीन स्मृति ज्यांची त्या. ६ अवयव आणि अलंकार यांची अनोळख. ७ विपरीत. ८ पृथ्वीवर. ९ चळती.

भुलोनि कृष्णगीता । वना धांवत निशिगर्भीं ॥ ३८ ॥ गृहासक्तीची सबळ काठी[1] । घेऊनि भर्तार लागती पाठीं । त्यांस न गणितां देऊनि पाठीं । दाटोदाटीं निघाल्या ॥ ३९ ॥ मातापितरें अतिसवेग । शीळभंगभयाची डांगें । घेऊनि पाठीं करिती लाग । पळती आंग चुकवुनी ॥ १४० ॥ बंधु लोकलज्जेच्या दोरें । कवळोनि बांधों धांवती निकरें । कृष्णानुरक्ता सप्रेमभरें । निजनिर्धारें धांवती ॥ ४१ ॥ गोत्राभिमानें[2] भ्रातृगण । वृत्तिक्षेत्रादि धान्यधन । इत्यादि रज्जूंचें बंधन । त्या रोधन करूं पाहती ॥ ४२ ॥ परी त्या उमरडूनि[3] तयांसी । गोपकांता कांतारासी । सप्रेमवेधें कृष्णापाशीं । धांवती निशी न गणूनी ॥ ४३ ॥ पैशून्यादि[4] मर्मस्पर्श । कुटिलोक्तीचे घालूनि पाश । बांधों पाहती¶ सुहृद अशेष । परी त्या उदास नावरती ॥ ४४ ॥ स्नेहपाशें कुमरी कुमरें । बांधों धांवती अभ्यंतरें । परी त्या लोटूनि ममतासूत्रें । बलात्कारें निघाल्या ॥ १४५ ॥ इत्यादि सर्व ईषणात्यागें । सवेग धांवती त्या विरागें । ममता लोभ§ घालूनि मागें । श्रीरंगरंगें रंगल्या ॥ ४६ ॥ गोपी जेवीं सुपक्कदळें । झगटतां श्रीकृष्णगीतानिळें । सोडूनि द्रुमाचीं डाहाळे‡ कुळें । निर्मम चपळें वावडती[5] ॥ ४७ ॥ कीं भास्करोदयीं अंडजगण[6] । प्रपंचद्रुमींचें सांडूनि स्थान । हरिसुखचारा अभिलक्षून । करिती धावन निःशंका ॥ ४८ ॥ ऐशा निराट[7] गोपनारी । भगवान्निरत विरता† घरीं । भरल्या निशीगर्भी कांतारीं । मधुरस्वरीं गुंतोनी[8] ॥ ४९ ॥ गीतध्वनीचा लक्षूनि मार्ग । हरिप्राप्तीचा करिती लाग । भवसुखवैरस्यें अभंग । श्रीरंगसंगसकामा ॥ १५० ॥ राया अपूर्व याहीवरी । परिसें हरिविरहाची थोरी । एकी बल्लवीं‖ बळात्कारीं । गृहामाझारीं कोंडिल्या ॥ ५१ ॥

अंतर्गृहगताः काश्चिद्गोप्योऽलब्धविनिर्गमाः । कृष्णं तद्भावनायुक्ता दध्युर्मीलितलोचनाः ॥ ९ ॥

कृष्णप्रेमासक्त रामा । परी कोंडल्या माजि धामा । न हालती* हरिगीतवर्त्मा[9] । कीं निबद्ध कर्मामाजिवड्या ॥ ५२ ॥ बृहदारण्यीं हरिनिश्वसित । उपनिषच्छ्रुतिरूप[10] कृष्णगीत । ज्यांसि नव्हेचि श्रवणागत । अलब्ध पथ यालागीं ॥ ५३ ॥ निरुद्ध प्रारब्धकर्मधामीं । कोंडूनि ठेल्या इंद्रियग्रामीं । परी प्रेमा अभंग निष्कामकामीं । मेघश्यामीं जयांचा ॥ ५४ ॥ श्रवण न होतां साधनपथ । विरक्तिनिर्गम कैंचा प्राप्त । यालागीं कोंडल्या प्राक्तनांत । परी आसक्त हरिरूपीं ॥ १५५ ॥ मेघश्याम भगवन्मूर्ति । प्रतीतिगोचर जैसी होती । निरतिशयें ते चिंतूनि चित्तीं । ध्यानस्थिति कवळिली ॥ ५६ ॥ मग त्या अर्धोन्मीलितदृष्टि । तुरीयेपोटीं बाह्यसृष्टीं । सांठवूनियां उठाउठीं । ते केली पेठी[11] चित्स्वरूपीं ॥ ५७ ॥ अचिंत्यैश्वर्यभगवान । त्याचें लागतां तीव्र ध्यान । निर्गुण हो का अथवा सगुण । दृढभवबंधनच्छेदक तें ॥ ५८ ॥

---

**पाठभेद :—** ¶ धांवती ( उ. ). § मोह ( उ. ). ‡ डाहाळि ( उ. ). † विरहात ( मुं. ). ‖ उमरखेड प्रतीमध्यें हा शब्द नाहीं. * न लाहती ( उ. व मुं. ).

१ काठी. २ कुलाभिमान. ३ न जुमानून. ४ दोष काढणे. ५ उडून जाती. ६ पक्षिसमूह. ७ निर्भय. ८ आवड. ९ मार्ग. १० श्रुति. ११ स्थिर.

दुःसहप्रेष्ठविरहतीव्रतापधुताशुभाः । ध्यानप्राप्ताच्युताश्लेषनिर्वृत्या क्षीणमंगलाः ॥ १० ॥
तमेव परमात्मानं जारबुद्ध्याऽपि संगताः । जहुर्गुणमयं देहं सद्यः प्रक्षीणबंधनाः ॥ ११ ॥

**तीव्रध्यानें भगवन्निरता । कृष्णसुखीं ज्या† संप्राप्ता । देहादित्रिगुणात्मक अहंता । त्यागूनि निर्मुक्ता त्या जाल्या ॥ ५९ ॥ आशंकाद्वय येथें स्फुरे । श्लोकद्वयें तें परिसंहरे‡ । क्षणैक निश्चळ अभ्यंतरें । तीं उत्तरें परिसावीं ॥१६०॥ जारबुद्धी सगुणप्रेम । धरूनि भजतां पुरुषोत्तम । त्यांसि कैसें कैवल्यधाम । निर्गुण परब्रह्म नुमजतां ॥ ६१ ॥ येथ समर्थ वस्तुमहिमा । पंगिस्त[१] नोहे ज्ञानधर्मा । अमृत सेवितां मरणकामा । नोपी* आत्मा मृत्यूतें ॥ ६२ ॥ संचित प्रारब्ध आणि क्रियमाण । त्रिविध कर्म जें पापपुण्य । भोगें न होतां पुरतें क्षीण । गुणबंधन केंवि तुटे ॥ ६३ ॥ निष्कामकर्में चरमदेहीं[२] । सविराम अपरोक्षज्ञानें पाहीं । देहअहंता विरतां नाहीं । संचित आणि क्रियमाण ॥ ६४ ॥ संचितनाशें ज्ञानोदयें । क्रियमाणही अहंतालयें । भोगावेगळा प्रारब्धक्षय । कोण्या अन्वयें बोलिला ॥ १६५ ॥ प्रारब्धक्षय जाला नसतां । शुभाशुभ सुखदुःख न भोगितां । कैंची गुणबंधा क्षीणता । बंधनिर्मुक्तता केंवि वदा ॥ ६६ ॥ न साहती क्लेश बहळ । यालागीं दुःखभोगीं काळ । बहुत लागे तये वेळे । विरहें केवळ भोगिले ॥ ६७ ॥ प्रियतमभगवद्विरहक्षोभें । तिहीं सर्वां§ जाळिलें उभें । कोटियुगांचीं निमेषगर्भें । गगनें‖ अशुभें भोगिलीं ॥ ६८ ॥ सप्रेमभगवत्तनुचिंतनें । सुख भोगितां तदालिंगनें । त्रिविधें सुकृतात्मकबंधनें । तीं तत्क्षणें तूटलीं ॥ ६९ ॥ विरहजदुःखाश्लेषसुख । गोपी भगवद्ध्यानोन्मुख । भोगूनि देह त्रिगुणात्मक । तिहीं सम्यक त्यागिलें ॥१७०॥ एवं गुणबंधनिर्मुक्ता । निर्विकार सप्रेमभरिता । कृष्णस्वरूपीं सायुज्यता । निजएकांता पावल्या ॥ ७१ ॥ ऐसें ऐकतां निरूपण । संशयवातें दोलायमान । नृपाचें मानसैंपंकज[३] पूर्ण । झालें म्हणोन पुसतसे ॥ ७२ ॥**

राजोवाच :— कृष्णं विदुः परं कांतं न तु ब्रह्मतया मुने । गुणप्रवाहोपरमस्तासां गुणधियां कथम् ॥ १२ ॥

**राजा म्हणे जी वाशिष्ठप्रवैंरा[४] । बादरायणि परम चतुरा । मानसैंवनजा संशयवारा । अल्पमोंळसा[५] झगटला ॥ ७३ ॥ तेणें वक्तृत्वस्वातीघन । वर्षत असतां तव मुखगगन । चंचलतेस्तव अमृतकण । जाती विखरोन न थरतां ॥ ७४ ॥ प्रश्न ऐकोनि मर्मोदित । निवांत कीजे संशयवात । तेणें वक्तृत्व अमृतावाप्त । पूर्ण संतृप्त होईन ॥ १७५ ॥ तरी पतिपुत्रादि जगद्ब्रह्म । भावनामात्र भेदभ्रम । तितुकेन प्राणी भोगिती कर्म । अज्ञानरजतमसंवलितँ[६] ॥ ७६ ॥ अज्ञानरूपअविद्यावरण । वास्तव ज्ञानें न होतां क्षीण । मोक्ष न पवती प्राणिगण । हा निश्चय पूर्ण वेदांतीं ॥ ७७ ॥ तेंवि अज्ञाना पशुपजाया । परम लावण्य श्रीकृष्णकाया । देखोनि भाळल्या रमावया । नेणोनि अव्यया परब्रह्मा ॥ ७८ ॥ परम सुंदर हा परपुरुष । कृष्ण नेणोनि श्रीपरेश । जारबुद्धी विषयाभिलाष ।**

---

**पाठभेद :—** † त्या ( उ. ). ‡ परिहेरे ( उ. ). * नापी ( मुं. ). § सर्वांग ( मुं. व उ. ). ‖ गणनें ( मुं. व उ. ).

१ पराधीन. २ शेवटच्या देहांत. ३ मनोरूप कमळ. ४ वसिष्ठकुलांत श्रेष्ठ. ५ थोडासा. ६ वेष्टित.

धरितां गुणपाश कां तुटले ॥ ७९ ॥ पतिपुत्रादिप्रपंचभजनें । मोक्ष न पविजे प्राणिगणें । जारबुद्धी कृष्णध्यानें । केंवि बंधनें निर्मुक्त ॥ १८० ॥ जारबुद्धि विषयप्रवाहीं । कामासक्ता कृष्णदेहीं । त्यांच्या विषयवासना कैशा पाहीं । विषयापासूनि निरसल्या ॥ ८१ ॥ इतुके शंकेच्या निरसना । केली स्वामीसि प्रार्थना । निःसंशय निरूपणा । करितां श्रवणा सुख वाटे ॥ ८२ ॥

श्रीशुक उवाच :— उक्तं पुरस्तादेतत्ते चैद्यः सिद्धिं यथागतः । द्विषन्नपि हृषीकेशं किमुताधोक्षजप्रियाः ॥ १३ ॥

शुक म्हणे गा कुरुपुंगवा । तुवां प्रश्न केला बरवा । निरूपिजेल तो पर्यंसावा । वसों नेदावा संशय ॥ ८३ ॥ 'तव पुरस्तात् मया एतदुक्तं' । राया तुजपुढें हें म्यां कथिलें । कोण्या एक्या योगें भलें । कृष्णीं मानस संलग्न जालें । तरी फावलें अमृतत्व ॥ ८४ ॥ परमद्वेषें शिशुपाळाचें । कृष्णीं मानस जडलें साचें । तेंचि कारण अमृतत्वाचें । सिद्धी गेलें त्यालागीं ॥ १८५ ॥ द्वेषित होत्साताही चैद्य[1] । हृषीकेशातें ध्यातां सत्य । अपवर्ग लाधला अनवद्य[2] । मा गोपी वंद्य कां नव्हती ॥ ८६ ॥ जारबुद्धि या सप्रेमभावें । अधोक्षजीं रंगल्या जीवें । असतां कैवल्य कां न लभावें । येथ संशय संभवे कोण पां ॥ ८७ ॥ पतिपुत्रादि जगद्ब्रह्म । ते अविद्यासंवृत[3] गुणसंभ्रम । मनःकल्पित करणानुक्रम । विषयीं सुखतम प्रतिभासे ॥ ८८ ॥ कृष्ण केवळ हृषीकेश । हृषीकसमुच्चयाचा ईश । अनावृत जो उत्तम पुरुष । निर्विशेष परब्रह्म ॥ ८९ ॥ योगमायाअंगीकारें । नटला स्वजनप्रेमानुसारें । तथापि कोण्हाही प्रकारें । सन्निधिमात्रें मोक्षद ॥ १९० ॥ शिवब्रह्मादि जो अक्षगण । ज्याहूनि अर्वाक् तयांचें* ज्ञान । यालागीं अधोक्षज हें अभिधान । विपश्चिज्जन बोलती ॥ ९१ ॥ येथ गोपींचा विशेष कायी । हो कां कोण्ही मनुष्यदेही । त्याच्या कल्याणार्थ पाहीं । सगुण निर्गुण तनुनाट्य ॥ ९२ ॥

नृणां निःश्रेयसार्थाय व्यक्तिर्भगवतो नृप । अव्ययस्याप्रमेयस्य निर्गुणस्य गुणात्मनः ॥ १४ ॥

अविद्याअनावृत भगवत्तनु । येर संवृत अवघा जनु । तो जन व्हावया निरावरण । भगवद्भजन द्योतिलें[4] ॥ ९३ ॥ गुणनियंता श्रीभगवंत । येर अवघे गुणसंवृत । भगवद्भजनें होती मुक्त । हा इत्थंभूत सदुपाय ॥ ९४ ॥ गुणसंवृता जनाप्रति । भजनालागीं भगवन्मूर्ति । निर्गुणाची सगुण व्यक्ति । जे श्रुतिस्मृतिनिर्दिष्ट ॥ १९५ ॥ श्यामराजीवलोचन । पद्मायताक्ष मयंकवदन । चतुर्बाहु[5] आजानुपीन । सरळ सोज्वळ सुकांत ॥ ९६ ॥ मुकुट कुंडलें मेखळा । श्रीवत्स कौस्तुभ आपादमाळा । केयूरांगदें बाहुयुगळां । कंबुकटकें मुद्रिका ॥ ९७ ॥ विद्युद्भासुर पीतांबर । कांसे कसिला मनोहर । चरणीं बिरुदांचा तोडर । वांकी वाळे नूपुरें ॥ ९८ ॥ रातोत्पलनिभ चरणतळें । सामुद्रिकें सोज्वळ सफळें । घोटीव† वर्तुळ सुतेजाळें । नखशशिकळा सपीयूषा ॥ ९९ ॥ कंजारि-

पाठभेद :— *जयांचें ( उ. ). †घोटी ( उ. ).
१ चेदिदेशाचा राजा शिशुपाल. २ निर्दोष. ३ वेष्टिलेलीं. ४ प्रकटिलें. ५ कमल, चक्र, शंख, गदा.

कंबुकौमोदकी । आयुधें शोभती चौहस्तकीं । निषंगशार्ङ्गनंदकप्रमुखीं । विराजमान विश्वदृक् ॥ २०० ॥ वस्त्राभरणीं सालंकृत । करुणावत्सल कमलान्वित । सपार्षद सोपस्कृत । विभूतियुक्त विदितात्मा ॥ १ ॥ अप्रमेय जो निर्गुण । त्याची व्यक्ति ऐसी सगुण । भजतां भंगी अविद्यावरण । विशुद्धज्ञान‡ प्रकाशी ॥ २ ॥ स्वजनमोक्षणाकारणें । राया निर्गुणा सगुण होणें । येरवीं असतां पूर्णपणें । भव निस्तरणें दुर्घट पैं ॥ ३ ॥ पार्थिवादिभगवद्व्यक्ति[2] । करूनि भक्त जे जे भजती । त्यांसि अक्षय सायुज्य मुक्ति । मा कृष्णचिन्मूर्ति परब्रह्म ॥ ४ ॥ गोपी केवळ अमरांगना । वंदूनि विरंचीची आज्ञा । बल्लवी होऊनि मर्त्यभुवना । भगवत्तोषणा पातल्या ॥ २०५ ॥ म्हणोनियां त्या पुरुषोत्तमा । नैसर्गिक लाहोनि प्रेमा । जारभावें वांछिती कामा । आत्मारामा अमराद्या ॥ ६ ॥ कां तेंवि† चिन्मात्र तनूच्या ठायीं । शत्रुषट्कात्मकप्रेमें पाहीं । हृदय निबद्ध केलें जिहीं । त्या लवलाहीं तन्मयता ॥ ७ ॥ म्हणोनि प्राकृत देहधारी । तैसा नव्हे हा निर्विकारी । त्याची§ मूर्ति अभ्यंतरीं । कोण्या प्रकारीं संचरतां ॥ ८ ॥

कामं क्रोधं भयं स्नेहमैक्यं सौहृदमेव च । नित्यं हरौ विदधतो यांति तन्मयतां हि ते ॥ १५ ॥

काम म्हणिजे विषयाभिलाषें । आसक्ति धरितां दृढमानसें । अचिंत्यवस्तुसामर्थ्यवशें । सायुज्य आपैसें घरें[3]निघें ॥ ९ ॥ हो कां कोण्ही एक काम । कामूनि भजतां मेघश्याम । परमपुरुषार्थ होय सुगम । जडतां प्रेम भगवंतीं ॥ २१० ॥ जारविरहकामासक्ति । केवळ प्रेमाची अभिव्यक्ति । गोपी तदर्थ अमरयुवति । ब्रह्मवरोक्तीं* अवतरल्या ॥ ११ ॥ क्रोधावेशें भगवन्मूर्ति । कवळूनि राहे अविसर स्मृति । मग त्यां कैंची पुनरावृत्ति । भवनिर्मुक्ति न मगतां ॥ १२ ॥ तृणजळु कां भिंगुरटी । भयें सदैव चिंतितां पोटीं । तद्रूपता उठाउठीं । लाहे गोठी हे तैसी ॥ १३ ॥ भगवद्भयें मानस वेधे । तैं निजसुरेंचि‖ सांडिजे भेदें । मग अक्षय कैवल्य साधे । हें कां शब्दें शंसावें ॥ १४ ॥ पुत्रादि कोणा एका स्नेहें । भगवद्विग्रह कवळितां मोहें । मग त्या अपवर्ग अपैता नोहे । हें बोलों न लाहे विनिर्गमें[4] ¶ ॥ २१५ ॥ तैसाचि संबंध कोण्ही एक । होऊनि भगवंतीं पडतां ऐक्य । तो तेव्हांचि उत्तमश्लोक । होय चित्सुख सामरस्यें ॥ १६ ॥ अथवा उच्चनीचयोनि । कोणी एक जन्मोनि प्राणी । निःसीम प्रेमा भगवद्भजनीं । तैं निर्वाणीं समरसता ॥ १७ ॥ इत्यादि कोण्ही एक्या भावीं । अजस्र[5] प्रेमा वासुदेवीं । जडतां तन्मयता पावावी । हे अचिंत्य दैवी योगशक्तिᵀ ॥ १८ ॥

न चैवं विस्मयः कार्यो भवता भगवत्यजे । योगेश्वरेश्वरे कृष्णे यत एतद्विमुच्यते ॥ १६ ॥

---

**पाठभेद :**— ‡ विज्ञान ( उ. ). † जे ( उ. ). § याचि ( उ. ). * –वरदोक्ती ( मुं. व उ. ). ‖ निदसुरे ( उ. ). ¶ विधिनिगमें ( मुं. व उ. ). ᵀ योगमाया ( उ. ).

१ बाणांचा भाता. २ मृत्तिका इत्यादि वस्तूंची केलेली भगवन्मूर्ति. ३ घरचेंच, आपण होऊन घरांत घुसून नांदणारें. ‘ घर रिघोनि वरिला शांति तया । ’ ( ज्ञा. ). ४ बाहेर जाणें. ५ नित्य; दृढ.

यदर्थीं विस्मय न कीजे तुवां । कृष्णा परेशा देवाधिदेवा ॥ १९ ॥ ऐक्यभावें भजतां जीवां । मोक्ष न मनावा अघटित ॥ २२० ॥ कीं अचिंत्यैश्वर्यपरिपूर्ण । योगेश्वरांचा ईश्वर पूर्ण । याच्या सन्निधिमात्रें जन । तृणपाषाणही उद्धरती ॥ २१ ॥ गोपिकांचा विस्मय किती । कृष्णसान्निध्यें सर्वजाति । स्थावरजंगमां पावल्या मुक्ति । पुढें उद्धरती तत्स्मरणें ॥ २२ ॥ येरीकडे* न घडे ऐसा । विस्मय उचित कौरवेशा । तो येथ श्रीकृष्णीं सहसा । विस्मयावेशा असंभव ॥ २३ ॥ ऐसी कृष्णाची अगाधशक्ति । शुकें बोधिली रायाप्रति । करूनि आशंकानिवृत्ति । निरूपी पुढती हरिलीला ॥ २४ ॥

ता दृष्ट्वांऽतिकमायाता भगवान्व्रजयोषितः । अवदद्वदतां श्रेष्ठो वाचःपेशैर्विमोहयन् ॥ १७ ॥

भूतभविष्यद्वर्तमान । सर्व हृद्गत अभीष्टाभिज्ञ । निकट गोपी येतां देखोन । बोले वचन विमोहक ॥ २२५ ॥ सर्व बोलकियांमाजि श्रेष्ठ । सत्यलोकपति वरिष्ठ । तो ज्यापुढें नुघंली[१] वोष्ठ । अतिलघिष्ठ म्हणवीतसे ॥ २६ ॥ तो वक्त्यां चूडामणि । विश्वविमोहक चक्रपाणि । सकौतुका बोलोनि वाणी । गोपरमणी विमोही ॥ २७ ॥ त्या भगवदुक्तीचें निरूपण । दहा श्लोकीं शुक-भगवान । वाखाणील तें भाषा कथन । श्रोते सुज्ञ परिसोत‡ ॥ २८ ॥

श्रीभगवानुवाच :— स्वागतं वो महाभागाः प्रियं किं करवाणि वः ।
व्रजस्यानामयं कच्चिद्ब्रूताऽगमनकारणम् ॥ १८ ॥

अकस्मात निकटवर्ती[२] । वनीं देखोनि गोपयुवति । परमाश्चर्यें तयां प्रति । बोले श्रीपति सास्मित ॥ २९ ॥ अहो तुम्ही सभाग्य रमणी । सुखरूप आला कीं पथ§ क्रमूनी§ । सफळ यात्रा मद्दर्शनीं । अंतःकरणीं काय इच्छा ॥ २३० ॥ अकस्मात गोपी सकळा । नधरत येथें धावोनि आलां । तरी कुशल आहे कीं गोकुळा । सहित सकळां गोगोपां ॥ ३१ ॥ अस्ताव्यस्त विस्मृततनु । धाविलां कोण्या भयेंकरून । तुम्हांसि देखोनि माझें मन । भयें उद्विग्न बहु झालें ॥ ३२ ॥ धांवतां धापां दाटलीं पोटें । श्वास न लोटें नासापुटें । नकळे पाऊल पडिलें कोठें । अतिजैविष्ठें[३] उद्योगें ॥ ३३ ॥ आगमनाचें कारण बोला । परमप्रियकर काय तुम्हांला । तुमची अभीष्टवांछा मजला । सांगा काय करूं तें ॥ ३४ ॥ यावरि मंदस्मिताननां । सलज्जापांगी मृगलोचना । देखोनि त्यांच्या मनमोहना । त्रैलोक्यराणा बोलतसे ॥ २३५ ॥

रजन्येषा घोररूपा घोरसत्त्वनिषेविता । प्रतियात व्रजं नेह स्थेयं स्त्रीभिः सुमध्यमाः ॥ १९ ॥

अहो तुम्ही वामदृशा[४] । भ्रमरकांतिसदृशकेशा । परम घोर विपिनीं निशा । ईमाजी कैशा

पाठभेद :— * येरि घडे ( उ. ). ‡ परिसतु ( उ. ). § पथाक्रमणिं ( उ. ).

१ उघडीत नाहीं. २ समीप असलेला. ३ मोठ्या वेगाचा. ४ सुंदर नेत्रांच्या ( स्त्रिया ).

पातलां ॥ ३६ ॥ रीस व्याघ्र वृक सूकर । सर्प वृश्चिक प्राणी क्रूर । घोर रजनी भयंकर । वनसंचार कां केला ॥ ३७ ॥ भीरु[1] ऐसें स्त्रियांचें नाम । आणि येसेंणें वन दुर्गम । विशेष रजनी घोरतम । किमर्थ उद्यम हा येथें ॥ ३८ ॥ तथापि आलां केलें बरवें । आतां मद्वाक्य मानावें । व्रजाप्रति परतोनि जावें । वनीं न वसावें वनितांहीं ॥ ३९ ॥ तुम्ही नधरत पातलां वना । तेणें हृद्रोग जाकळी स्वजनां । ते हुडकिती स्थानें नाना । म्हणोनि स्वस्थाना जा वेगीं ॥ २४० ॥

मातरः पितरः पुत्राः भ्रातरः पतयश्च वः । विचिन्वंती ह्यपश्यंतो मा कृध्वं बंधुसाध्वसम् ॥ २० ॥

तुमचे माता पितर पुत्र । बंधु भर्त्तार इष्टमित्र । सक्लेश धुंडिती सर्वत्र । श्रमाचें पात्र त्यां न कीजे ॥ ४१ ॥ वनीं उपवनीं यमुनापुलिनीं । गुहागह्वरीं दुर्गमस्थानीं । धुंडितां श्रमित होइजे स्वजनीं । तुम्हां लागूनि अनुचित हें ॥ ४२ ॥

दृष्टं वनं कुसुमितं राकेशकररंजितम् । यमुनाऽनिललीलैजत्तरुपल्लवशोभितम् ॥ २१ ॥

ऐसें ऐकोनि भगवद्वचन । कोपें स्पर्शिलें त्यांचें मन । मग त्या करूनि तिर्यग्वदन । सचकितनयन विलोकिती ॥ ४३ ॥ ऐसें इंगित देखोनि हरि । म्हणे तुमचिये अभ्यंतरीं । पहावी काननकौतुकपरी । म्हणोनि रात्रीं जरी आलां ॥ ४४ ॥ तरी देखिलें कीं हें वन । सुपुष्पित शोभायमान । विशेष पूर्णशशांकैकिरण[3] । मंडित शोभन सुरुचिर ॥ २४५ ॥ यमुनासलिलावरून अनिळ । सीतळ सुखतम अतिमंजुळ । तेणें तरुपल्लव चंचळ । दावी झळाळ शशिज्योत्स्ना ॥ ४६ ॥ ऐशिये शोभाढ्य कांतारीं । सुखरुचिरता नेत्रद्वारीं । पाहतां फावली स्वानंदलहरी । इतर संसारी नेणती ॥ ४७ ॥ यालागीं तुम्ही धन्यतमा । पाहोनि वनश्रीविश्रामा । तोषलां आतां जाऊनि धामा । यथोक्तकर्मा आचरिजे ॥ ४८ ॥

तद्यात मा चिरं गोष्ठं शुश्रूषध्वं पतीन्सतीः । क्रंदंति वत्सा बालाश्च तान्पाययत दुह्यत ॥ २२ ॥

आतां क्षणभरी येथ न वसा । जाइजे सत्वर निज निवासा । कीजे स्वपतींची शुश्रूषा । स्वजन संतोषा पावविजे ॥ ४९ ॥ लेंकुरें वासुरें आक्रंदती । तान्हपा गाई हुंबरती । तुम्ही जाऊनि सदनाप्रति । त्यांसि विश्रांति अर्पावी ॥ २५० ॥ लेंकुरा देऊनि स्तनपानें । गोवत्सांचीं समाधानें । शीघ्र करावीं पयदोहनें । साधुआचरण साध्वी हो । ५१ ॥ इत्यादि वचनें गोपिकांतें । प्रबोधूनियां रमाकांतें । पुढतीं त्यांच्या इंगितातें[4] । मन्मथतातें[5] निराखिलें ॥ ५२ ॥

अथवा मदभिस्नेहाद्भवत्यो यंत्रिताशयाः । आगता ह्युपपन्नं वः प्रीयंते मयि जंतवः ॥ २३ ॥

---

१ भित्री. २ एवढें. ३ पूर्ण चंद्राच्या किरणांनीं शोभायमान. ४ मनोगत. ५ मदनपिता श्रीकृष्णानें.

तंव त्या क्षुब्धा मनोरथभंगें । पहाती सेर्ष्य§ वक्रापांगें । जाणोनि त्यांच्या मानसाजोगें । वचन श्रीरंगें बोलिलें ॥ ५३ ॥ त्याचा अभिप्राय कळल्या वरी । म्हणे तुम्ही स्नेहाळ नारी । माझ्या ठायीं मानसदोरी । बळें गुंतोनि कर्षिलां ॥ ५४ ॥ जेंवि सरिता निस्तरणारा । अभीष्ट जाणें हें परपारा । परी तो वाऱ्हणियाच्या बळात्कारा । सरितापुरा वशवर्ती ॥ २५५ ॥ कां सर्वां प्रियतम तारुण्य । तदर्थ करितां ही कारुण्य । परी बळिष्ठ काळाचें नैर्घृण्य । दे दाटून जारठ्य ॥ ५६ ॥ तेंवि साध्वी हो स्वधर्मासक्ता । सदाचारें गृहीं वर्ततां । माझ्या ठायीं गुंतल्या चित्ता । मद्वश होत्सात्या पातलां ॥ ५७ ॥ जैसा कोण्ही साधुनर । त्यांसि होतां भूतसंचार । तन्नियंत्रित दुर्विकार । नानाप्रकार जेंवि करी ॥ ५८ ॥ ऐकोनि गायना माझिया । तुम्ही सुभगा यंत्रिताशया । वना आलां हें आश्चर्या । कारण प्राया न मनीं मी ॥ ५९ ॥ येथ आलां हें उत्तम केलें । परस्परें विलोकन घडलें । दर्शनाचें सुख पावलें । तुम्हांतें माझें मज तुमचें ॥ २६० ॥ माझ्या ठायीं जंतुमात्र । प्रियत्वें भजताती सर्वत्र । तुम्ही केवळ मत्प्रेमपात्र । हें प्रेम विचित्र नैसर्ग्य ॥ ६१ ॥ असो माझ्या ठायीं प्रेमा । धरूनि उबगलां स्वजनधामा । तोक्म[1]ा रुक्म[2]ा वर्ष्मलला[3]मा । त्यजिलें शर्मा वैषयिकां[4] ॥ ६२ ॥ तें मज प्रिय झालें सर्वही । हे वेधकता माझ्याचि ठायीं । यदर्थीं तुमचा अपराध नाहीं । परी रहस्य कांहीं परिसावें ॥ ६३ ॥ माझ्या ठायीं विश्वासतां । मी जरी न कथीं तुमच्या हिता । तरी दोषवैषम्य[5] माझिये माथां । यालागीं तत्त्वता कथितसें ॥ ६४ ॥ जेणें इहलोक प्रशस्त । परलोकही अव्याहत । तो जो स्वधर्म तुमचा उचित । निगमप्रणीत अवधारा ॥ २६५ ॥ जें कां स्त्रियांसि विहिताचरण । भोगमोक्षांचें साधन । तिहीं श्लोकीं श्रीभगवान । करी व्याख्यान तें ऐका ॥ ६६ ॥

भर्तुः शुश्रूषणं स्त्रीणां परो धर्मो ह्यमायया । तद्बंधूनां च कल्याण्यः प्रजानां चानुपोषणम् ॥ २४ ॥

तयांसि ऐका वो म्हणे हरि । पतिव्रता ज्या पवित्र नारी । त्यांसि पतिसेवन संसारीं । उत्कृष्टधर्म नियमिला ॥ ६७ ॥ ते पतिशुश्रूषा म्हणाल कैसी । नोहे मायिका जारिणी ऐसी । रक्षूनि भर्तृ*मानसासी । ज्या परपुरुषीं विचरती ॥ ६८ ॥ पतिमानसरक्षणासाठीं । वरिवरी वदती रुचिरा गोष्टी† । परपुरुषाचा प्रेमा पोटीं । दुष्टा कपटी दुश्चरिता ॥ ६९ ॥ सौभाग्यद्रव्यें सुभूषिता । वस्त्राभरणीं सालंकृता । भर्तारअभिरंजनीं मात्र निरता । सप्रेमसुरता परपुरुषीं ॥ २७० ॥ तैशा न होती साध्वी नारी । सबाह्य विशुद्ध सदाचारी । भगवद्बुद्धि निजभर्तारीं । ज्या संसारीं अभिरमती ॥ ७१ ॥ त्या ईश्वराच्या ऐश्वर्यशक्ति । कीं शुद्धसत्त्वाच्या सन्मय मूर्ति । कीं सत्यज्ञानामृताच्या व्यक्ति । ज्या शुभ सती अमायिका ॥ ७२ ॥ तयाच्या व्रताचरणानुसार । साध्वी स्त्रियांहीं स्वभर्तार । निष्कापट्यें अतितत्पर । सत्य साचार भजावा ॥ ७३ ॥ ऐसा भर्तृशुश्रूषणें‡ ।

---

**पाठभेद :**— § सेर्षा ( उ. ). * भर्त्तार- ( उ. ). † गोठी ( उ. ). ‡ भर्त्तार- ( उ. ).

१ पल्लवादि अंकुर. २ स्वर्ण. ३ शरीरावरील दागिने. ४ विषयसंबंधी. ५ दोषाधिक्य.

उत्कृष्ट धर्म स्त्रीकारणें । आज्ञापिला नारायणें । वेदवचनें विख्यात ॥ ७४ ॥ सासू श्वसुर देवर भावें । तत्पितृव्यादि आघवे । परिचैर्येनें तोषवावे । भर्तारसेवे अनुलक्ष्यें ॥ २७५ ॥ दासदासी प्रजापोष्यें । लालन पोषण सुखसंतोषें । करितां न शिविजे हर्षामर्षें । स्त्रियांसि उत्कर्षें हा धर्म ॥ ७६ ॥ तुम्ही ऐका वो कल्याणी । भर्तार न म्हणावा दुर्गुणी । साम्य मानूनि नारायणीं । व्रताचरणीं तोषविजे ॥ ७७ ॥

दुःशीलो दुर्भगो वृद्धो जडो रोग्यधनोऽपि वा । पतिः स्त्रीभिर्न हातव्यो लोकेप्सुभिरपातकी ॥ २५ ॥

शील ज्याचें परम दुष्ट । पदोपदीं पाववी कष्ट । क्रूर कर्कश जो कनिष्ठ । तऱ्ही तो वरिष्ठ नारीसी ॥ ७८ ॥ दुर्भग दुर्दैव भिकारी । कवडी नाहीं ज्याचे पदरीं । अन्नवस्त्राविण संसारीं । विकळगात्री क्षुत्क्षाम ॥ ७९ ॥ विजवर तिजवर चतुर्थ वृद्ध । विश्व देखूनि मानी विरुद्ध । परुषभाँषणी परम क्रुद्ध । संततिसंबंध सापत्न्य ॥ २८० ॥ बैसतां उठतां अपान वाजे । विकळेंद्रियत्वें न धरी लाजे । वयोवैषम्यें भर्ता न सजे । तथापि भजे सुपूज्य ॥ ८१ ॥ खोकी वोकी क्षणक्षणा । बोले दुरुक्ति चणचणा । ऐकोनि पिशुनाची प्रेरणा । करी ताडना मात्सर्यें ॥ ८२ ॥ थुंके मुते हागे घरीं । लांछन लावूनि छळना करी । ऐसा जाची परोपरी । कां परदारी कुटिलात्मा ॥ ८३ ॥ तथापि पतिव्रतेसि तो पूज्य । निष्कापट्यें परम भज्य । सदन दाही तऱ्ही यज्य* । जेंवि कां साज्य हविर्भोक्ता ॥ ८४ ॥ कां जड जैसा मृत्पिंडमात्र । परंतु भासे सचेतनगात्र । करणज्ञानासि अपात्र । दारुयंत्र चेष्टतां ॥ २८५ ॥ कीं अंधापुढें चित्रकथा । करितां त्यासि अनभिज्ञता । कां बधिरागानीं उपजे† आस्था । जे श्रवणें अर्था न फवोनी‡ ॥ ८६ ॥ असो करणज्ञानविकळ । जातमात्र जैसें बाळ । जऱ्ही अवयव दिसती चपळ । परी ते विकळ व्यवहारीं ॥ ८७ ॥ कीं जागृतचि सुषुप्तिग्रस्त । तैसा प्रज्ञाप्रकाशीं अस्त । पिशाच मूर्च्छित भ्रांतोन्मत्त । असतां कांत ऐसाही ॥ ८८ ॥ नुपेक्षिजे पतिव्रता । सेविजे मानूनि रमाभर्ता । अंतरीं वैषम्य नुपजतां । सायुज्यता ते लाहे ॥ ८९ ॥ अथवा रोगें परमरुग्ण । कुपथ्यशील व्यसनीं मलिन । उपँदंशादि गँद दारुण । सन्निधान करितां दे ॥ २९० ॥ तऱ्ही तो स्वतनूचिये परी । उपचारिजे व्रतस्था नारी । कां जो निर्धन सर्वोपरी । अनुपकारी गुदरोम ॥ ९१ ॥ अर्थधन पदार्थधन । चर्महर्म्यधान्यधन । यशोविद्यातपोधन । जो निर्धन सुकृतादि ॥ ९२ ॥ ऐसा निर्धन केवळ भर्ता । म्हणोनि न टाकिजे पतिव्रता । निष्कापट्यप्रेमें भजतां । परमपुरुषार्था लाहिजे ॥ ९३ ॥ ज्या वांछिती उत्तमगति । पतिव्रता ज्या सुभगा सती । इत्यादि दुर्गुणीं युक्त पति । तऱ्ही त्यांप्रति अत्याज्य ॥ ९४ ॥ परंतु न व्हावा पातकी । ज्ञातिभ्रष्ट बहिष्कृत लोकीं । पतित जाणोनि वर्णात्मकीं । घटस्फोटें त्यागिला ॥ २९५ ॥

---

**पाठभेद :—** * सज्य ( उ. ). † नुपजे ( उ. ). ‡ न पवोनि ( उ. ).

१ दीर. २ त्यांचे चुलते. ३ सेवेनें. ४ कठोर भाषण करणारा. ५ स्त्रीला. ६ घृतयुक्त होमद्रव्य खाणारा अग्नि. ७ गरमी. ८ रोग.

स्वर्णस्तेयी[1] सुरापानी[2] । गुरुतल्पग[3] विप्रहननी[4] । न कंटाळे मातृगमनीं । तत्सौजन्यीं[5] महापापी ।।९६।। इत्यादि महापातकीं लिप्त । जाणोनि केला जो बहिष्कृत । पतिव्रतेसि भर्ता त्यक्त । येर अत्यक्त उपदोषी ।। ९७ ।। विषयबुद्धी पतितोषण । यदर्थीं पुंश्चळीच विचक्षण । निरभिलाषें तनुवाङ्मन । निर्वाणभजन सतीचें ।। ९८ ।। काया न चोरी दास्याचरणीं । पतिनिंदा नायके कानीं । सेर्ष्या क्षुब्ध न पाहे नयनीं । न वदे वाणी गुणदोष ।। ९९ ।। बाहीं जलधीचें लंघन । किंवा पायीं वळघिजे गगन । वदनीं मेरूचें चर्वण । हें अघटितघटन हो शके ।। ३०० ।। परंतु भर्ताराची आज्ञा । लंघनीं युगांत जीच्या प्राणा । अवस्थात्रयीं जे पतिविना । अन्यचिंतना न स्पर्शे ।। १ ।। सत्पुत्र सच्छिष्य कां पतिव्रता । सद्गुरु पिता अथवा भर्ता । इत्यादि नियमीं सप्रेमता । पावती भजतां अपवर्ग ।। २ ।। म्हणोनि तुम्ही कल्पनाकामा§ । आपुलाल्या जाऊनि सद्मा । मदुक्तिसाम्य न करूनि छद्मा । भाविजे पद्माप्रियभर्ता ।। ३ ।। कुलस्त्रियेसी उपपति करणें । अनुपयोगी बहुतां गुणें । कृष्ण निरोपी गोपींकारणें । विशदलक्षणें तीं ऐका ।। ४ ।।

अस्वर्ग्यमयशस्यं च फल्गु कृच्छ्रं भयावहम् । जुगुप्सितं च सर्वत्र औपपत्यं कुलस्त्रियः ।। २६ ।।

न प्रबोधी सत्यहित । कपटी दुरात्मा तो निश्चित । त्याहूनि तरुवरांशीं एकांत । करितां प्राप्त सुखलाभ ।। ३०५ ।। म्हणोनि श्रीकृष्ण जगद्गुरु । बोधी यथार्थ शास्त्रविचारु । त्यासि प्राकृत जे म्हणती जार । नरक अघोर त्या होती ।। ६ ।। उपपती[6]पासूनि सुख भोगणें । औपपत्य हें त्यांतें म्हणणें । स्वर्गसुकृतापासूनि च्यवणें । तें या कारणें अस्वर्ग्य ।। ७ ।। जगीं इहलोकीं छीथू घडे । पूर्वजमाळा नरकीं पडे । गोत्रसुहृदादिकां नवडे । वदनाकडे न पाहती ।। ८ ।। उपपति जो जारपुरुष । त्यासि करावया संतोष । अहोरात्र तनुसंक्लेश । करितां यश नुपलभे ।। ९ ।। जारपुरुषाचे मातापितर । स्वजन सुहृद जाया श्वसुर । क्रूरभावें करिती वैर । परी जार समोर त्यां न वदे ।। ३१० ।। परस्परें न शकती पाहों । धणीवरी[7] एकांतीं न लाहती राहों । विश्वशत्रुत्वें हृदयीं भेवो[8] । भुजगां[9] भुजंगा[10] सारिखा ।। ११ ।। आवडती गोष्टी सांगावया । उमसू[11] न लाहे जाया* । भयें सर्व जगाचिया । मिळणी ठाया न लभती ।। १२ ।। सांदीकोंदीमाजि रातीं । सर्वां वंचूनि कैतववृत्ती[12] । सभय मिळणी उपदंपती† । अथवा दूतीप्रसंगें ।। १३ ।। अल्प अवकाश सांपडे । सांचल[13] होतां सुरत विघडे । अभीष्टसुखावाप्ति न घडे । सान्निध्य थोडें बहुक्लेशीं ।। १४ ।। कैंची शय्या सुमनोहर । सदीप[14] एकांत मंदिर । गीत तांबूल अन्योपचार । भाषणीं चोर परस्परें ।।३१५।। दर्शन स्पर्शन गुह्यभाषण । मिथः[15] अवयवनिरीक्षण । नीवीमोक्षणें[16] कुचमर्दन । चुंबनालिंगन अष्टधा ।। १६ ।। सुरतीं पूर्वांगें हीं अष्ट । उत्तर मैथुनादिकें अष्ट‡ । अंगलालन दशनदंष्ट[17] । न घडे

**पाठभेद :**— § कल्याणकामा ( मुं. व उ. ). * जारजाया ( मुं. व उ. ). † भलती ( मुं. ). ‡ ही स्पष्ट ( मुं. व उ. ).

१ सोनें चोरणारा. २ मद्य पिणारा. ३ गुरुस्त्रीगमन करणारा. ४ ब्रह्महत्या करणारा. ५ त्यांच्या साधुत्वाविषयीं. ६ जार पुरुष. ७ यथेच्छ. ८ भय. ९ जाराला. १० सापासारखा. ११ वेळ. १२ कपटानें. १३ चाहूल. १४ दीपयुक्त. १५ परस्पर. १६ गांठ सोडणे. १७ दंतक्षतें करणें.

यथेष्ट जारत्वें ॥ १७ ॥ फल्गु म्हणिजे तुच्छप्राय । फावलें तितुकें भोगिलें जाय । तितुक्यासाठीं सोसणें घाय । करितां उपाय मिळणीचे ॥ १८ ॥ ध्वांक्ष[1] जैसा गृहस्थद्वारीं । त्यक्तबळीचें भक्षण करी । मार्जारश्वानादिभय अंतरीं । जार त्यापरी साशंक ॥ १९ ॥ जारिणी जालिया गरोदर । जार न करी गर्भसंस्कार । भयें उद्विग्न उभयांतर । दोहदोपचार[2] मग कैंचे ॥ ३२० ॥ प्रवासीं अथवा परलोकवासीं । वियोग असतां भर्तारासीं । नारी रमोनि जारपुरुषीं । धरी गर्भासी दैवबळें ॥ २१ ॥ सती प्रयत्नीं साक्षेप गर्भ । शिणतां तयेसी तो दुर्लभ । स्वैरिणी[3] चुकवितां अलभ्यलाभ । एनस[4]कोंभ उदया ये ॥ २२ ॥ जैंहुनी गर्भ राहे पोटीं । तैंहुनी उभयतां हिंपुटीं । जुगुप्सितत्वें[6] प्राणसंकटीं । होती कष्टी विश्वभयें ॥ २३ ॥ वदों न शकती कोण्हापाशीं । पुसों न लाहती उपायासी । विंचुवें खादल्या चोराऐसीं । निजमानसीं मिडकती ॥ २४ ॥ उभयतांचें सौजन्य तुटे । वदती परस्परें वोखटें । कर्म वोडवलें म्हणती खोटें । दुर्घट खोटें आठवलें ॥ ३२५ ॥ ऐसीं शिणती परस्परीं । तेथ डोहळ्यांची कवण परी । स्रावपतनादिप्रकारीं । यत्नें अंतरीं झुरताती ॥ २६ ॥ स्रावपतनकर्मीं[7] प्रवीणा । कुंटिणी जारिणी वैद्यां निपुणा । शेकमूळिका भेषजें नाना । नवस नवसिती षष्ठिके ॥ २७ ॥ डोहळ्यांची ऐशी रीती । श्रमतां जैं होय गर्भोपहति । तैं त्या पापें नरकावाप्ति । यालागीं म्हणती अस्वर्ग्य ॥ २८ ॥ श्रमतां पतनकर्मा* न घडे । तैं लौकिक सोहळा वाढे । डोहळे प्रकट चहूंकडे । वाद्यघोषें नृपदंडें ॥ २९ ॥ दीर्घताडन बीभत्सवपन[8] । रासभयान[9] पण्यभ्रमणें । शकृन्मूत्रपुरीषसेचनें[10] । पादत्राणस्रक्[11]भूषा ॥ ३३० ॥ औपपत्य हें पातित्य । सर्वीं सर्वत्र जुगुप्सित । कुलस्त्रियांसि नोहे उचित । म्हणे भगवंत गोपींतें ॥ ३१ ॥ श्रोतीं आक्षेप केला येथ । अवंचक कृष्णाचा परमार्थ । तो काय हा विषयस्वार्थ । भोगें कृतार्थ नरनारी ॥ ३२ ॥ तरी हे न कीजे येथ शंका । कृष्ण न बोधी विषय निका । येथींचा गूढार्थ ठावुका । होय त्या विवेका अवधारा ॥ ३३ ॥ स्वर्ग म्हणिजे सुकृतफळ । तें निर्विषय सुख केवळ । विषयसुखीं दुःख बहळ । स्वर्गीं नरकीं समसाम्य ॥ ३४ ॥ हृदयस्थ निजात्मा मुख्यपति । स्वर्गसुखद तेथींची रति । बाह्य समस्त येर उपपति । हो कां भूपति सुर सिद्ध ॥ ३३५ ॥ प्रथम पति मरोनि गेला । द्वितीय गांधर्वविवाह केला । त्यासि म्हणती निजदादुला । चाळिती पहिला विधिवाद ॥ ३६ ॥ चोरूनि रमतां म्हणती जार । गांधर्वविवाहीं उजागर । एवं भलतैसा संसार । म्हणती चतुर चालों द्या ॥ ३७ ॥ विभांडकानें धर्मपत्नी । कोण्या सूत्रें पाणिग्रहणीं । केव्हां परिणिली होती हरिणी । जेथ शृंगमुनि जन्मविला ॥ ३८ ॥ किंवा वासवी[12] पराशरें । कैं परिणिली विधिविचारें । जीचे जठरींच्या व्यासकुमरें । त्रिजग सारें धवळिलें ॥ ३९ ॥ मैत्रावरुणि[13] वशिष्ठागस्ति । कोठें गर्गाची उत्पत्ति । सौभरिमुनिची संतति । कोणती सती करगृहीता ॥ ३४० ॥ एवं यथार्थ भगवदुक्ति ।

**पाठभेद :—** * पतनगर्भा ( मुं. व उ. ).

१ कावळा. २ डोहाळे पुरविण्याचे प्रकार. ३ जारिणी. ४ पापाचा अंकुर. ५ खिन्न. ६ निंद्यत्वामुळें. ७ गर्भपाताच्या क्रियेमध्यें. ८ डोक्याचे पाट काढणें. ९ गाढवावर बसवून बाजारांतून फिरविणें. १० अंगावर मलमूत्रादि शिंपणें. ११ वहाणांच्या माळा घालून भूषविणें. १२ सत्यवती. १३ मित्रावरुणांचे पुत्र.

ब्रह्मजिज्ञासा मुख्यश्रुति । तदनुष्ठानीं नाहीं शक्ति । धर्मप्रवृत्ति त्यां कथिली ॥ ४१ ॥ ‘ लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा ’ । ज्ञानें सांख्यांची प्रतिष्ठा । विषयासक्तां कर्मचेष्टा । कथिला गोमटा कर्मयोग ॥४२॥ आत्मपतीचें न फवे सुख । म्हणोनि बाह्य हें औपपतिक । गांधर्वविवाह परी चोख । विषयात्मक विध्युक्त ॥ ४३ ॥ अभेद भोगितां आत्मरति । द्वैतबोधाची उपशांति । द्वैतावेगळी अपयशोऽवाप्ति । कोण्हाप्रति तें सांगा ॥ ४४ ॥ येरां सुरनरां विषयासिद्धि । साधितां युद्धीं अथवा वादीं । जय पराजय सर्वां बाधी । द्वैत उपाधीमाजिवडा ॥ ३४५ ॥ फल्गु म्हणिजे तुच्छ अल्प । तें हें विषयसुखचि स्वल्प । याज्ञिक श्रुतीचा करूनि जल्प । यज्ञें त्रिविष्टप[1] आश्रयिती ॥४६॥ तेथ न पुरतां विषय असोसी । पुन्हा पचती गर्भवासीं । स्वर्ग्य कीं अस्वर्ग्य म्हणिजे यासी । एवं विषयांसि तुच्छत्व ॥४७॥ कृच्छ्र म्हणिजे कष्टें साध्य । तें विषयसुखचि दुराराध्य । याचा अनुभव सर्वां प्रसिद्ध न लगे प्रबोध करावा ॥४८॥ बाइल मिळतां संतोष वाटे । संसार करितां अपान फाटे । विषय मानूनि गोमटे । दुःखें दुर्घटें भोगिती ॥ ४९ ॥ जाया जोडली उर्वशीऐसी । परी उकरडां रमतां नये तिशीं । म्हणोनि करितां मंदिरासी । बहुतां क्लेशीं जांचिजे ॥ ३५० ॥ जातीं उखळें मुसळें खुंटे । सुपें टोपली पाटे परोटे । झाडणी केरसुण्या खराटे । भिंती दारवंटे कवाडें ॥ ५१ ॥ एवं अल्प सुखासाठीं । ऐशा अपार दुःखकोटी । क्षुधे तृषेची जांचणी मोठी । दुर्लभ गोठी मिळणीची ॥ ५२ ॥ यात्रा वाणिज्य सेवामिसें । रोषें तोषें दोषें प्रवासें । रोगें दारिद्र्यें† विद्याभ्यासें । वियोग आपैसे[2] ठाकती ॥ ५३ ॥ आपण स्त्रियेचा म्हणवी स्वामी । पोटार्थ विकूनि घे आणिके धामीं । मग तो देहपति आपुलें सद्मीं । दास्यकर्मीं प्रवर्तवी ॥ ५४ ॥ स्त्रियेचा म्हणवी स्वयें दादुला[3] । आपण येरांची बाइल[4] झाला । पोटें ऐसा विटंब केला । निर्लज्जाला सुख वाटे ॥ ३५५ ॥ याहूनि धन्य तिर्यग्योनि । विषय भोगिती स्वाधीनपणीं । कोणाअधीन न होती कोण्ही । भूजलगगनीं स्वच्छंदें ॥ ५६ ॥ नरदेहींच्या विशेष ज्ञानें । कळतां वेदशास्त्रपुराणें । पोटासाठीं विकोनि घेणें । बाइल होणें आणिकांची ॥ ५७ ॥ पुरुषा पैढियंती अंतुरी । ते पोष्यांची[5] धुर धरी । तेंवि सर्व कार्यें जो आवरी । तो सेवकाशिरीं प्रधान ॥ ५८ ॥ प्राधान्याचें महत्त्व आलें । भूषण मिरवी येणें बोले । पोटासाठीं आयुष्य गेलें । विकोनि घेतलें हें न कळे ॥ ५९ ॥ त्याहूनि मळहारक[6] बरा । मूर्खपणें तो निदसुरा । येऱ्हवीं करील जरी स्वविचारा । तरि संसारा जिंतील ॥ ३६० ॥ च्यारी घटिका मलापहरणीं । उरला काळ स्वाधीनपणीं । सप्रेम नाम स्मरेल वाणी । तरि दुर्योनि चुकवील ॥ ६१ ॥ त्याहूनि गौण प्राधान्य कर्म । शरीरवाङ्मन अविश्राम* । अहोरात्र सम विषम । प्रपंच अधम उपसावा ॥ ६२ ॥ एवं स्वहिताची बोहरी । विषयस्वार्थें केली पुरी । त्या विषयार्थ झुरे अंतरीं । विपत्ति पदरीं बहुसाल ॥ ६३ ॥ करितां बहुतांचें न्यून पूर्ण । छिद्र लक्षून ते करिती विघ्न । कारागार दीर्घ ताडन । धनापहरण दुर्दशा ॥ ६४ ॥ धनिक म्हणती सधन आम्ही । स्वतंत्र धनसदनाचे स्वामी ।

---

पाठभेद :— † दरिद्रें ( उ. ). * अविश्रम ( उ. ).

१ स्वर्ग. २ आपोआप. ३ प्रिय. ४ स्त्री. ५ पोसण्यास योग्य. ६ राखरांगोळी.

संपन्न संतति हेमीं धामीं । ललनाललामीं सुख भोगूं ॥ ३६५ ॥ धनाचा करितां त्या आयव्यय । होय आयुष्याचा क्षय । राजिक दैविक गोत्रज भय । दस्युस्तेयैंनृपदंडें ॥ ६६ ॥ देवैंढीलाभें करूनि खत । हातीचें देऊनि देखत देखत । रडों लागती विख्यात । खत दुखवत क्षणक्षणा ॥ ६७ ॥ पुढील मुदती भंगोनि गेली । खतें वेदना बहुत केली । रागें चुलीस पाणी घाली । धरणी घेतली तद्द्वारीं ॥ ६८ ॥ रोगी चंडिकेचिये द्वारीं । उपासपारणीं जैसा करी । तैसा अधमर्णोचिये घरीं । बैसे निर्धारीं खतेर्लों ॥ ६९ ॥ वेसीस बांधिजे म्हणती दुःख । तैसे भवंते मिळती लोक । निळे पाय काळें मुख । सांगोनि विवेक करा म्हणती ॥ ३७० ॥ श्यांस शेळी लक्षांस गाय । एक सांगती हा उपाय । मुळीं मुदलासी* नाहीं ठाय । तेथ व्याज काय पाहतां ॥ ७१ ॥ ऐसी ऐकतां पंचाइती । क्षोभें भडका उपजे चित्तीं । तंव एक बोलती पक्षपाती । नृपाप्रति हें कथिजे ॥ ७२ ॥ राया वोपूनि चतुर्थ भाग । सँवृद्धि द्रव्य गणूनि सांग । घेईजे हा उपाय चांग । करिती दीर्घ प्रयत्न ॥ ७३ ॥ तंव ते राजद्वारींचे जन । देखोनि सधन उत्तर्मर्ण† । लांच मागती निर्भर्त्सून । करिती छलन न देतां ॥ ७४ ॥ एवं सधनाचिये पाठीं । ऐशा अनेक दुःखकोटी । केउती विषयसुखाची गोठी । सर्वदा पोटीं धनचिंता ॥ ३७५ ॥ असत्यवादी कळींचे जन । धन बुडविती विश्वासून । जन्मांतरीं त्यांचें श्वान । होऊनि ऋण मग घेती ॥ ७६ ॥ पश्चादि दासी स्त्री बाळक । अधमर्णांचे होती धनिक । भूनिक्षेपावरी पन्नकें । होती अचुक धनलोभें ॥ ७७ ॥ एवं विषयाची सामग्री । सुखार्थ भुलवूनि घाली घोरीं । यातना जन्मजन्मांतरीं । कैंची संसारीं मग सुटिका ॥ ७८ ॥ म्हणाल स्त्रियांसि कथिला धर्म । पुरुषाचें कां घेतां नाम । तरी ज्यांसि कामाचा संभ्रम । त्या सर्वही सकाम कामिनी ॥ ७९ ॥ पुरुष निःसंग उदासीन । निर्विकार निरभिमान । निष्प्रपंच स्वरत पूर्ण । नित्य निर्गुण निष्काम ॥ ३८० ॥ येर अवघीच प्रकृति । तदंश अनेक अविद्याव्यक्ति । कामिनी म्हणून कामासक्ति । निजात्मरति त्यां कैंची ॥ ८१ ॥ म्हणोनि जुगुप्सित औपपतिक । सांडूनि बाह्यविषयसुख । पुरुष सेविजे अंतर्मुखें । ऐसा विवेक हरि बोधी ॥ ८२ ॥ तो मी पुरुष अभ्यंतरीं । दुष्प्राप असतां प्रेमा भारी । सगुण सुलभत्वें संसारीं । घडे व्यवहारीं अवज्ञा ॥ ८३ ॥ म्हणोनि गोपींसी म्हणे हरि । परतोनि जावें आपुले घरीं । स्वकांत सेवितां शास्त्रनिर्धारीं । प्रेमा मजवरी असों द्या ॥ ८४ ॥

श्रवणाद्दर्शनाद्ध्यानान्मयि भावोऽनुकीर्तनात् । न तथा सन्निकर्षेण प्रतियात ततो गृहान् ॥ २७ ॥

अचिंत्यैश्वर्यगुणकीर्तनें । विविधावतारीं विविधाचरणें । माझीं पुण्यश्रवणकीर्तनें । अंतःकरणें विवरितां ॥ ३८५ ॥ श्रवण करितां माझी कीर्ति । मद्रूपीं उपरम पावे वृत्ति । सहजचि विवर्ता

पाठभेद :— * मुदलासीच ( उ. ). † उत्तमवर्ण ( मुं. व उ. ).

१ प्राप्ति व खर्च. २ शत्रु. ३ चोर. ४ दिढीच्या व्याजानें. ५ कर्ज घेणारा. ६ सावकार. ७ सव्याज ८ कर्ज देणारा ( धनिक ). ९ भूमीत पुरून ठेविलेलें द्रव्य. १० साप. ११ निंद्य. १२ जार पुरुषाचा समागम करणें. १३ आत्मस्वरूप.

निवृत्ति । चित्सुखावाप्ति अनायासें ॥ ८६ ॥ सगुण निर्गुण मद्दर्शन । हृदयीं ठसावतांचि पूर्ण । उडोनि जाय प्रपंचभान । नयनीं चिद्घन प्रकाशे ॥ ८७ ॥ जिकडे जिकडे फांके दृष्टि । तिकडे तिकडे सच्चित्सुखाची वृष्टि । अधोर्ध्व सभोंवता पाठीं* । सुखसंतुष्टी मी प्रकटें ॥ ८८ ॥ मजवीण भिन्न असावें कांहीं । तरी त्याचें दर्शन घडावें कहीं । दृश्यकल्पना नाथिली पाहीं । मनाच्या ठायीं प्रतिभासे ॥ ८९ ॥ मी अद्वैतसुखाची खाणी । जिहीं विश्वासें रंगोनि श्रवणीं । प्रेमा धरिला मद्दर्शनीं । त्यांचे नयनीं प्रकाशें ॥ ३९० ॥ मद्दर्शनें† उठाउठीं । ध्यानानंद उथळे‡ पोटीं । माझी सगुणमूर्ति गोमटी । प्रकटे सृष्टी सबाह्य ॥ ९१ ॥ श्याम राजीवलोचन । ठाणमाण गुणलक्षण । रूपरेखा लावण्यपूर्ण । वेधें तनु मन पालटी ॥ ९२ ॥ देह होय स्तब्धीभूत । चित्त चैतन्यीं विरोनि जात । तैं मग अक्षय सुख एकांत । होय संप्राप्त अबला हो ॥ ९३ ॥ विशेष काय सांगूं गोठी । वास्तव माझें आस्तिक्य पोटीं । सप्रेम बाणल्या तेंचि वोठीं । कीर्त्तनपरिपाटीं विस्तारे ॥ ९४ ॥ आवडतयाची काहणी वाखाणितां न पुरे धणी । श्रवणीं सादर होतां कोण्ही । न पुरे शिराणी कथनाची ॥ ३९५ ॥ कृष्ण ऐकावा पाहावा । सालंकृत सहावयवा । माजि उभा ठाके आठवा । जो आठवा देवकीचा ॥ ९६ ॥ सालंकृत ठाणठकारें । आठवे तैसा ध्यानीं भरे । ध्यानसुखाच्या आविष्कारें । विषयीं झांसुरे तद्वेधें ॥ ९७ ॥ कन्या आवडती दूरदेशीं । माता बोळवी सासुरियासी । मग ते आठवे निजमानसीं । मोहें पिशी तद्वेधें ॥ ९८ ॥ अवचित भासे दृष्टीपुढें । स्वप्नीं संवादीं पवाडे । तिचें बोलणें कानीं पडे । म्हणोनि वावडे पाहावया ॥ ९९ ॥ मुखें आळवूं जाय सुना । तंव तिचेंचि नांव|| ये वदना । खातां जेवितां प्राशितां जीवना । विसर पडेना तियेचा ॥ ४०० ॥ तैसी असतां सान्निधानीं । अवस्थाभूत नोहे जननी । पढियें प्रेम दृष्टांतकथनीं । घातलें श्रवणीं प्राकृत ॥ १ ॥ आत्मप्रियत्वें विश्वप्रिय । तें वेधकत्व कथिजे काय । तो जगदात्मा मी स्वयें । अर्पैतां होय सप्रेमें ॥ २ ॥ सन्निधानें तैसा§ न फवे । यालागीं परतोनि गृहा जावें । श्रवणें ध्यानें सप्रेमभावें । मज चिंतावें हृत्कमळीं ॥ ३ ॥ तृषिता धेनु गंगातटीं । बळें मुरडितां मारूनि काठी । कीं भणगाँ उठवी¶ बैसल्या ताटीं । त्याहूनि कष्टी वधू होती ॥ ४ ॥

श्रीशुक उवाच :— इति विप्रियमाकर्ण्य गोप्यो गोविंदभाषितम् ।
विषण्णा भग्नसंकल्पाश्चिंतामापुर्दुरत्ययाम् ॥ २८ ॥

श्रुतिस्मृत्यर्थधर्मवचनें । कृष्णप्राप्तीसि करिती विघ्नें । तें विषतुल्य ऐकोनि मनें । दुस्तर चिंता पावलीं ॥ ४०५ ॥ स्वमुखें गोविंदें निर्गदिलें । परतोनि सदना जाणें कथिलें । वियोगदुःख दुणाविलें । तेणें मानस भंगलें गोपींचें ॥ ६ ॥ भंगोनि गेला मनोरथ । दुस्तर चिंता जाली

पाठभेद :— * पोटीं ( मुं. व उ. ). † मद्दर्शनिं ( उ. ). ‡ उलथे ( उ. ). || नाम ( उ. ). § ऐसा ( उ. ). ¶ उठाविजे ( उ. ).

१ मिथ्या. २ आवड. ३ विरक्ति पावे. ४ प्रवेश करी. ५ धांवे. ६ स्वाधीन, अनुकूल. ७ भिकाऱ्याला. ८ सांगितलें.

प्राप्त । करपद अवयव जाले श्लथ। निश्चेष्टित तनुभाव ॥ ७ ॥ सखेद त्यांचीं तनुलक्षणें । शुकें परीक्षितीकारणें । कथिलीं तैसीं ऐका मनें । सावधपणें श्रोते हो ॥ ८ ॥

कृत्वा मुखान्यव शुचः श्वसनेन शुष्यद्बिंबाधराणि चरणेन भुवं लिखंत्यः ।
अस्रैरुपात्तमषिभिः कुचकुंकुमानि तस्थुर्मृजंत्य उरुदुःखभराः स्म तूष्णीम् ॥ २९ ॥

मोडली आनंदाची हावें । स्मृति विसरली शरीरभाव । विकळ इंद्रियांचा गांव । भीरु स्वभाव उमटले‡ ॥ ९ ॥ प्रतिकूळ उत्तरीं अभ्यंतर । तापतां श्वास सांडिती तीव्र । त्यांचिये वाफे बिंबाधर । परम सकुमार वाळले ॥४१०॥ परम कोमळ गोपीहृदयें । कृष्णीं सस्निग्ध नवनीतप्रायें । विरहतापें द्रवतां वाहे* । चक्षुप्रवाहें बाष्पांबु ॥ ११ ॥ तें अप्रतीकार सकज्जल । वक्षःस्थळीं सशोक जळ । सकुंकुम कुचमंडळ । पडतां केवळ क्षाळलें ॥ १२ ॥ अंगकांति पांडुरवर्ण । शोकें गौरता जाली लीन । त्रिवेणी ऐसी हृदयावरून । असितअरुणश्वेतौघीं ॥ १३ ॥ पहातां उघडीं दिसतीं बुबुळें । आकर्ण कुरंगीसदृश डोळे । ढळमळां स्रवती सशोक जळें । अचळमौळें जेंवि घनीं ॥ १४ ॥ स्तिमितदृष्टि झाल्या नयनीं । अपांग मूर्च्छित मानसग्लानि । विमुखरूपाभिज्ञत्वगुणीं । प्रतिमापाषाणीं समसाम्य ॥ ४१५ ॥ चरणांगुष्ठें भूतळीं रेखा । विस्मृतीमाजी वोढिती देखा । जाणों आयुष्या करूनि लेखा । अवशिष्ट घटिका मोजिती ॥ १६ ॥ मेरूपासूनि ज्यांचा भार । ऐसिया दुःखाचे डोंगर । खचोनि पडले अनावर । त्यांहूनि सुभर सक्लेश ॥ १७ ॥ ऐशा ठकल्या मुहूर्तमात्र । प्रेमसंरंभा प्रजागर । तेणें परिमार्जूनि नेत्र । उदिता उत्तर द्यावया ॥ १८ ॥

प्रेष्ठं प्रियेतरमिव प्रतिभाषमाणं कृष्णं तदर्थविनिवर्तितसर्वकामाः ॥
नेत्रे विमृज्य रुदितोपहते स्म किंचित्संरंभगद्गदगिरोऽब्रुवतानुरक्ताः ॥ ३० ॥

शुक म्हणे गा परीक्षिति । किमर्थ गोपींची सकोपवृत्ति । झाली म्हणसी तरी तुजप्रति । कथितों निगुती तें ऐक ॥ १९ ॥ ज्याचे प्राप्तीलागीं आम्ही । विरक्ता जालों सर्वकामीं । सांडूनि सुत धन सदन स्वामी । चरणपद्मीं अनुरक्ता ॥ ४२० ॥ ऐसा प्रियतम आम्हांसि कृष्ण । करितां अप्रिय संभाषण । तेणें मानस जालें उष्ण । करिती स्फुंदन सद्गदिता ॥ २१ ॥ आदरीं देखून अनादर । अमर्ष उंधवूं पाहे शिर । परी कृष्णीं रंगलें अभ्यंतर । तें निष्ठुर हो न शकें ॥ २२ ॥ सव्रीडदंपतीबुझावणी । करूं येती शेजारणी । दुःखे क्रोधोर्मि तेंवि उशिणी । अंतःकरणीं ऊठिली ॥ २३ ॥ जेणें भंगे प्रेमलाभ । तैसा सैराटें न करी क्षोभ । वाढवी प्रेमाचें वालभ । म्हणिजे संरंभ तो कोप ॥ २४ ॥ तैसिया कोपें सकोपिष्ठा । नेत्र पुसूनि सद्गदकंठा । विरहें लज्जा

पाठभेद :— ‡ उमलें ( उ. ). * होये ( उ. ).

१ शिथिल. २ भरतें; इच्छा. ३ निवारणोपायरहित. ४ काळा, तांबडा, पांढरा ओघ जिचा ती. ५ पर्वतशिखरें. ६ चकित; मंद. ७ गणना. ८ क्रोध. ९ डोकें वर काढूं पाहे. १० सलज्ज. ११ समजावणी. १२ स्वच्छंद.

विसरूनि धीटा । बोलती प्रेष्ठा कृष्णाशीं ।। ४२५ ।। ज्या भाषणें उपजे हर्ष । विरोनि जाय क्रोधावेश । भाषणरूपें तें पीयूष । येर सदोष विषतुल्य ॥ २६ ॥ ऐसें भाषण जयापाशीं । त्रिजगत्प्रियतम मानी त्यासी । वृथा जल्पूनि गुणदोषांसी । मूर्खां जगेंशीं वैरस्य ।। २७ ।। तैशा नव्हती व्रजकामिनी । श्रुतिमनोज्ञप्रियभाषिणी । प्रेमा प्रकटूनि अंतःकरणीं । सकोप कृष्णीं अनुरक्ता ।। २८ ।।

गोप्य ऊचुः — मैवं विभोऽर्हति भवान्गदितुं नृशंसं संत्यज्य सर्वविषयांस्तव पादमूलम् ॥
भक्ता भजस्व दुरवग्रह मा त्यजाऽस्मान्देवो यथादिपुरुषो भजते मुमुक्षून् ॥ ३१ ॥

गोपी म्हणती विभो समर्था । शास्त्रवादार्थें* क्रूरता । बोलावया तुज योग्यता । नाहीं सर्वथा विचारीं ।। २९ ।। योग्यता नाहीं कां म्हणसी जरी । यदर्थ कारण तूं अवधारीं । एकां निकटीं एकां दुरी । हे अयोग्य परी तुजपाशीं ।। ४३० ।। जैसे मुमुक्षु मागिले । साधनसंपन्न विरक्त भले । तुज आदिपुरुषातें सप्रेम भजले । ते नाहीं उपेक्षिले तैं तेणें ।। ३१ ।। जाणोनि मुमुक्षूंचें प्रेम । त्यां तैसाचि पुरुषोत्तम । भजता जाला यथाकाम । तरी आम्हां हें विषम कां वदसी ।। ३२ ।। आम्ही तैसिये परिपाटीं । सर्व विषयासि देऊनि पाठी । घातली तव चरणासीं गांठी । भवराहाटी विसरूनी ।। ३३ ।। आम्ही जाणोनि निजांघ्रिभक्ता । पतिसुतधनादि आश्रम-त्यक्ता । अनन्य एकांत अनुरक्ता । तुज हे वक्रता अयोग्य ।। ३४ ।। जेंवि जळाच्या सन्निधानें । द्रवत्वा भजिजेत असतां लवणें । जळें वारूनि काठिण्य देणें । तैं तें उणें कोणासी ।। ४३५ ।। यालागीं जाणूनि अभ्यंतर । आमुचा करीं अंगीकार । न होईं न भजोनि निष्ठुर । शास्त्रविचार-प्रवक्ता ।। ३६ ।। दुरवग्रहा हे स्वच्छंदा । आमुचा अव्हेर न करीं कदा । आम्ही तुझिया पदार-विंदा । शरण मुकुंदा सर्वस्वें ।। ३७ ।। जाणोनि स्वकीयांचा छंद । तैसा क्रीडसी तूं स्वच्छंद । हें विसरूनि आपुलें बिरुद । कां विधिवाद जल्पसी ।। ३८ ।। करूनि आज्ञेचा अव्हेर । उल्लंघूनि शास्त्राचार । म्हणसी† कां बोलतां प्रेमादर । तरी तो विचार अवधारीं ।। ३९ ।।

यत्पत्यपत्यसुहृदामनुवृत्तिरंग स्त्रीणां स्वधर्म इति धर्मविदा त्वयोक्तम् ॥
अस्त्वेवमेतदुपदेशपदे त्वयीशे प्रेष्ठो भवांस्तनुभृतां किल बंधुरात्मा ॥ ३२ ॥

पति अपत्य सुहृद स्वजन । यांचें जें कां अनुवर्त्तन । हा स्वधर्म स्त्रियांलागुन । विनोदवचन हें मुख्य ।। ४४० ।। आपुले कंठीं असोनि माणि । अबळां चाळविजे दर्पणीं । तेंवि तूं शास्त्रार्थ-अनुशासनीं । आम्हांलागुनि बोधिसी ।। ४१ ।। वस्तु चोरूनि ठेविजे घरीं । माग घालिजे जेंवि डोंगरीं । कीं फळें असतां शाखेवरी । जलांतरीं प्रलोभिजे ।। ४२ ।। ऐसा करूनियां उपहास ।

पाठभेद :— * –वेदार्थे. † हा शब्द उमरखेड प्रतींत नाहीं.

१ अनुक्रमानें. २ अत्यंत निष्ठुर भाषण करणारा. ३ पदवी; प्रतिज्ञा. ४ अनुसरणें ५ थट्टेचें भाषण. ६ धर्मशास्त्राचे नियम. ७ भ्रम पावावें.

करिसी स्वधर्म उपदेश । तो अवघाचि फळादेश । घडो आम्हांस तुझ्या ठायीं ॥ ४३ ॥ धर्मोपदेशें धर्माचरण । तेणें फळ जें अवगम्यमान । तें तुझ्या ठायींच प्रतीयमान । असो उपदेशविषयत्वें ॥४४॥ उपदेशाचें जें कां स्थान । उपदेशपद हें त्या अभिधान । मज म्हणावया काय कारण । तरी तें वचन अवधारीं ॥ ४४५ ॥ ज्ञानें करूनि अवगम्यमान । तें एक ईश्वरत्वाचि जाण । वांचूनि प्राकृत प्रपंच गौण । उपदेशस्थान घडेना ॥ ४६ ॥ यथाशास्त्र धर्माचरण । पतिपुत्रादि अनुसेवन । तेणें ईश्वर संतोषोन । वैराग्यज्ञान प्रकाशी ॥ ४७ ॥ वैराग्य म्हणिजे भवनिवृत्ति । ज्ञानें ईश्वरतत्त्वा-वाप्ति । आम्हांसि जाली ते तव प्राप्ति । कां पां श्रीपति परताविशी ॥ ४८ ॥ म्हणसी ब्रह्मांडीं ईश्वर । मी तो नंदगोपाचा कुमर । तरी तूं आत्मा निर्विकार । सबाह्याभ्यंतर व्यापक ॥ ४९ ॥ सर्वां सर्वत्र आत्मयाविण । भोग्यमात्रासि भोक्ता कवण । तो तूं ईश्वर श्रीभगवान । तुझेनि भवमान प्रतिभासे ॥ ४५० ॥ मी आत्मा जरी केंवि म्हणसी । तरी तूं प्रियतम सर्वस्वेंशीं । आत्मप्रियत्वें प्रपंचासी । प्रिय मानूनि कवळिजे ॥ ५१ ॥ पति अपत्यें बंधु श्वशुर । सुहृद स्वजन माता-पितर । धनें गोधनें वृत्ति क्षेत्र । प्रिय सर्वत्र आत्मत्वें ॥ ५२ ॥ आत्मराहित्यें सर्वोपचार । प्रियतम अथवा उपदेशपर । होती तैं मग शास्त्राचार । धर्म साचार प्रबोधी ॥ ५३ ॥ तरी हें आत्मत्वींच आघवें । सर्वप्रियत्व आविर्भवे । विपरीतज्ञानें मग विषयीं फावे । कां तें मावे[1] झगविसी* ॥५४॥ विंशतिवराटिकापरिमित[2] । त्यांची एक काकिनी[3] होत । त्या काकिनी सार्धशत[4] । रजतमुद्रेंत[5] सांठवती ॥ ४५५ ॥ रजतमुद्रा षोडशमान । स्वर्णनिष्क त्या अभिधान । तो हस्तगत असतां जाण । वृथा प्राधान्य वराटिकां ॥ ५६ ॥ तेंवि तूं आत्मा श्रेष्ठतम । आम्ही लाधलों अवाप्तकाम[6] । पतिपुत्रादि वर्णाश्रम । अक्षय स्वधाम तूं यांचें ॥ ५७ ॥ तुजमाजि हें अवघें सुख । पतिपुत्रादि जे पृथक् पृथक् । भ्रमें भावूनि विषयात्मक । रमती मूर्ख भवभानी ॥ ५८ ॥ आम्हांसि उपदेशाचें स्थान । तो तूं श्रीकृष्ण भगवान । त्या तुझ्या ठायींच हें असो पूर्ण । मायिक भिन्न नुपदेशीं ॥ ५९ ॥ अथवा उपदेष्टा तूं असतां । उपदेशार्थ शरणागता । आम्ही होऊनि तुज हें पुसतां । तूं धर्मवक्ता हें बोधीं ॥४६०॥ तृषित असतां जळाजवळी । त्याचे हातीं देइजे कुदळी । खनन बोधिजे तये काळीं । तेंवि वनमाळी हें वदसी ॥ ६१ ॥ तरी हें असो तुझ्याचि ठायीं । जळ सांडूनि न खणूं भुई । तूं उपदेष्टा नव्हसी कांहीं । आत्मा हृदयीं सर्वगत ॥ ६२ ॥ आमुच्या कामाचें अधिष्ठान । आणि कामोपलब्धि जेथें पूर्ण । तो उभयत्र तूं एक कृष्ण । न करीं बोधन उपहासें ॥ ६३ ॥ अथवा शाखेवरूनि चंद्ररेखा । प्रबुद्ध जेंवि दाविती मूर्खां । तेंवि पतिपुत्रभावें तें ऐका । भजिजे व्यापका ईश्वर ॥ ६४ ॥ ईश्वर ऐसें पतीचें नाम । ठेवूनि धरिजे स्वधर्मप्रेम । तेथ वास्तव ईश्वर अनुभवगम्य । फावल्या कर्म कां कथिजे ॥ ४६५ ॥ म्हणसी देहवंतासि हा बोध । स्वधर्माचरणाचि अविरुद्ध । तरी कर्मफळ आत्मा अगाध । जंव तूं प्रसिद्ध न फवसी तों ॥ ६६ ॥

---

पाठभेद :— * झकविशी ( मुं. व उ. ).

१ मायेनें. २ कवडी. ३ दमडी. ४ दीडशें. ५ रुपया. ६ संपन्नमनोरथ.

असान्निध्य नृपाचें असतां । राजा मानूनि भजिजे दूतां । ते भूपपदवी चढल्या हाता । दूता मान्यता कोण कोठें ॥ ६७ ॥ तुझेनि मुखें उपदिश्यमान । पतिपुत्रादि जें अनुसेवन । तेंथ ईश्वर असतां अधिष्ठान । ईश्वरभजन तें तें कीं ॥ ६८ ॥ ईश्वररूपा अधिष्ठाना । वांचूनि पतिपुत्रादि-व्यक्ति भिन्ना । पृथक सत्तत्त्वें वर्तमाना । भजनीय कोठें कोणत्या ॥ ६९ ॥ पेरिला उगवला जोंधळा शेतीं । जोंधळा मानूनि त्या कराबोडा¶ भजती । तेथील धान्य चढल्या हातीं । कडबा जोपिती कोण कोठें ॥ ४७० ॥ तेंवि ईश्वर तूं आत्मा प्रेष्ठ । असोनि कथिसी स्वधर्मकष्ट । ते तुझ्या ठायींच अभीष्ट । सफळ संतुष्ट असोत ॥ ७१ ॥ तूं जें कथिसी धर्माचरण । त्या धर्म-शास्त्रादि अखिलाभिज्ञ* । निगमगर्भ दृढ विवरून । तुजवांचून न भजती ॥ ७२ ॥

कुर्वंति हि त्वयि रतिं कुशलाः स्व आत्मन्नित्यप्रिये पतिसुतादिभिरार्तिदैः किम् ।
तन्नः प्रसीद परमेश्वर मा स्म छिंद्या आशां भृतां त्वयि चिरादरविंदनेत्र ॥ ३३ ॥

नित्य निर्विकार निष्टंक । प्रियतम आत्मा निरुपाधिक । अगाध अक्षय सच्चित्सुख । विमळ विशोक वितृष्ण ॥ ७३ ॥ तुज† आत्मयाचिये ठायीं । कुशल भजती आपुल्या हृदयीं । पतिपुत्रादि दुःखडोहीं । मोहप्रवाहीं न पडोनी ॥ ७४ ॥ पशुपतिपुत्रधनादिकें । दुःखपरंपराप्रापकें । वांचूनि जोडसी त्यागें एकें । हें नायकों मुखें शिष्टांच्या ॥ ४७५ ॥ उतरावया‡ महापूर । कीजे नावेचा अंगीकार । पुन्हा नाव न त्यजितां तीर । विश्रांतिकर न जोडे ॥ ७६ ॥ तेंवि भवाब्धिनिस्तरणीं । प्रवृत्ति वेदोक्तधर्माचरणीं । तत्फळविरक्ति अमृतदानीं । प्रवृत्ति त्यागूनि आश्रयिजे ॥ ७७ ॥ ईषणात्यागेंवीण तत्त्वता । तें अमृतत्व न चढे हाता । यालागीं त्यागूनि तो भवगुंता । जालों अनुरक्ता तव चरणीं ॥ ७८ ॥ आतां प्रसीद शरणागतां । तूंतें भजलों भवविरक्ता । परमेश्वरा पूर्ण-भरिता । नुपेक्षीं तत्त्वता वंचूनी ॥ ७९ ॥ पद्मनेत्रा तव पदपद्मीं । चिरकाळ आशा धरिली आम्हीं । ते तूं निराशा न करीं स्वामी । स्वधर्मनियमीं चालवूनी§ ॥ ४८० ॥ मद्वाक्याची करूनि अवज्ञा । म्हणसी कैशा मदेकशरणा । यदर्थीं ऐकावें सर्वज्ञा । आज्ञालंघना कारण जें ॥ ८१ ॥ परतोनि जावें व्रजाप्रति । तों हें आज्ञापिलें श्रीपति । चित्तचतुष्टय[३] आपुल्या हातीं । निजात्मशक्ति हरूनियां ॥ ८२ ॥

चित्तं सुखेन भवताऽपहृतं गृहेषु यन्निर्विशत्युत करावपि गृह्यकृत्ये ।
पादौ पदं न चलतस्तव पादमूलाद्यामः कथं व्रजमथो करवाम किं वा ॥ ३४ ॥

यावत्काळ आमुचें चित्त । पतिपुत्रादिगृहासक्त । होऊनि सप्रेम विषयीं निरत । प्रपंचकृत्य संपादी ॥ ८३ ॥ तें तव गानें अंतःकरण । विषयीं वैरस्य पावून । होऊनि ठेलें प्रत्यक्[४]प्रवण । न वचे

पाठभेद :— ¶ करवडा ( उ. ). * अखिळ अभिज्ञ ( उ. ). † ह्या तुज ( उ. ). ‡ उत्तरावया ( उ. ). § चाळउनि ( उ. ).

१ कडबा. २ त्वां. ३ मन, बुद्धि, चित्त, अहंकार. ४ आत्मस्वरूपाभिमुख.

तो न परतवितां ॥ ८४ ॥ व्यान सांडूनि निवडली वृत्ति । ते कैं प्रकटे श्रवणाप्रति । संविंत्ती[1]वांचूनि भारती । शब्दग्रहणार्थी अनोळख ॥ ४८५ ॥ तुजमाजि विरतां अंतःकरण । सहज समरसीं चैतन्य* । प्रपंचस्फूर्तीसि रितें गगन । कैंचें शून्य सच्छिद्र ॥ ८६ ॥ समानवायूमाजूनि[2] चपळ । संकल्प-विकल्पांचें स्थळ । निवडूनि मानस केवळ । हरिलें तत्काळ स्ववेधें ॥ ८७ ॥ मना समाना विघडतां । तैं कैं त्वचेसि स्पर्शज्ञता । त्यागादानी[3] हातोपातीं[4] । पाणींद्रिय न प्रवर्त्ते ॥ ८८ ॥ मानस तव वेधें उन्मन । असंकल्पें चांचल्यहीन । तैं मग कैंचा पृथक्पवन । शब्दस्पर्शन द्विगुणत्वें ॥ ८९ ॥ निजगानवेधें† तुवां धिषणा । हरिली सांडवूनि‡ उदाना । चक्षु मुकले रूपग्रहणा । मग कें चरणां संचरण¶ ॥ ४९० ॥ विपरीत बोधा निश्चयकर्त्ती । तुजमाजि रता§ मनीषावृत्ति । दहन पचन प्रकाश-शक्ति । कैंची भूतीं तेजस्त्वें ॥ ९१ ॥ ऐकोनि तुझें मधुरगीत । प्राणामाजूनि निवडे‖ चित्त । तुजमाजि होऊनि एकीभूत । जालें निश्चित चिन्मात्र↓ ॥ ९२ ॥ प्राणा चित्ता विघडणी होतां । कैंची रसनेसि रसज्ञता । रसाभिलाषेंविण उपस्था । रतिलालसता स्फुरेना ॥ ९३ ॥ चित्त चैतन्यीं होतां लीन । भूतीं दृश्य कैंचें जीवन । सीतळ पातळ रसाळ सृजन । जलप्लावनक्लेदन[5]पटुतर** ॥९४॥ अपानामाजूनि अहंता । वेधें तव गायनीं मुरतां । घ्राणीं नुरेचि जिघ्रता । कैंची क्षरता पार्थूतें[6] ॥९५॥ सूत्रांतमत्वें[7] अहंकार । वेढूनि वागवी जो शरीर । देहात्मभावें धुरंधर । तो अविकार जालिया ॥९६॥ कैंची पृथ्वी कैंचा गंध । कैंचा आधेयआधारबोध[8] । सबाह्य अभेद परमानंद । श्रीगोविंद परिपूर्ण ॥ ९७ ॥ आमुचीं प्रवृत्तीसहीत करणें । तुवां हरिलीं अंतःकरणें । आतां फिरोनि जावें कोणें । धर्माचरणें करावया ॥ ९८ ॥ बागदोरें[9]†† हातीं धरूनी । अश्वा सोडी मोकळेपणीं । तैं तो प्रवर्त्ते भंवता भ्रमणीं । परी दुरी प्रयाणीं असमर्थ ॥ ९९ ॥ कीं नाव खुंटोनि ऐले झाडीं‡‡ । पार जावया पाणी तोडी । तैं त्या न टके पैलथडी । कीं हरितां घोडीं रथ न चले ॥ ५०० ॥ तेंवि हरूनि करणनिचयां[10] । आज्ञापिसी सदना जावया । आज्ञापाळणा लंघनकार्या । कोण यदुवर्या समर्थ ॥ १ ॥ तुझिया पादमूळापासून । इंद्रियग्रामें न थरे भिन्न । यावरी आम्हां कर्तव्य कोण । तें विवरून प्रबोधीं ॥ २ ॥ म्हणसी तुमची जे असोसी । सांगा जैसी असेल तैसी । तरी ऐकावें हृशीकेशी । उत्साहेंशीं सांगतसों ॥ ३ ॥

सिंचांग नस्त्वदधरामृतपूरकेण हासावलोककलगीतजहृच्छयाग्निम् ।
नो चेद्वयं विरहजाग्न्युपयुक्तदेहा ध्यानेन याम पदयोः पदवीं सखे ते ॥ ३५ ॥

इंद्रियग्राम रिक्त पडिला । तव विग्रहीं गोगणें जडला । यालागिं आमुचा आवडला ।

पाठभेद :— * चैतन्यघन ( मुं. व उ. ). † निजगुणवेधें ( मुं. ). ‡ सांडूनि ( उ. ). ¶ संशरण ( उ. ). § विरता ( मुं. व उ. ). ‖ निवडलें ( उ. ). ↓ तन्मात्र ( उ. ). ** प्लावनक्लेदनपटुतर ( उ. ). †† बागदोरे ( उ. ). ‡‡ सांडी.

१ ज्ञान. २ मधून. ३ टाकणें किंवा घेणें. ४ एकाच्या हातांतून दुसऱ्याच्या हातांत अशा क्रमानें. ५ बुडविणें व ओलें करणें. ६ पश्चिमद्वार. ७ पदार्थांचें सूक्ष्मस्वरूप व परमात्मस्वरूप यांत सर्व भूतें, सूत्रांत जसे मणि तशीं ओविलेलीं आहेत, म्हणून परमात्मा सूत्रात्मा होय. ८ वस्तु व तिचा आधार यांचें ज्ञान. ९ लगाम. १० इंद्रियगण.

पाहिजे घडला मनोरथ ॥ ४ ॥ हे अंग कोमल आमंत्रणें । गोपी म्हणती कृष्णाकारणें । श्रवणद्वारें तुझिये गानें । अंतःकरणें क्षोभविलीं ॥५०५॥ अग्नियंत्राचे कर्णी अनळ । स्पर्शतां उसळे यंत्रगोळ । तेंवि विवश विरहिणीमेळ । गानश्रवणें उसळलों ॥ ६ ॥ येथ तव तनुसन्निधानें । श्रवणकाळीं केलगायनें । सविलासकटाक्षमोक्षणें । स्मितावलोकनें करूनियां ॥ ७ ॥ हृच्छय म्हणिजे मदनानळ । हृदयीं प्रज्वळला केवळ । तेणें आमुचे शरीरगोळ । तापले विंगळपडिपौडें ॥ ८ ॥ ते तूं अधरामृतें शिंपीं । प्राणप्रदान आमुतें वोपीं । हृच्छयाग्नीचा दाह लोपीं । कृपेनें जोपीं स्मरलतिका ॥ ९ ॥ नातरी वियोगविरहानळ । आणि हृच्छयाग्नीचा ज्वाळ । उभय ताप होऊनि प्रबळ । शरीरें केवळ प्रज्वळितें ॥५१०॥ सांख्याभ्यासें ज्ञानानळ । अभ्यासक्रमें योगाग्निज्वाळ । मूर्धा† भेदूनि† ध्यानशीळ† । पावती केवळ कैवल्य ॥ ११ ॥ स्मरविरहाग्निदग्धा तेंवि । ध्यानें तव चरणाची पदवी । सखया पावूं सप्रेमभावीं । आमुच्या जीवीं निश्चय हा ॥ १२ ॥ म्हणसी आहेत तुमचे पति । तुम्ही जाऊनि तयांप्रति । स्वेच्छा रमूनि अधरामृतीं । कीजे शांति स्मरतापा ॥ १३ ॥

यर्ह्यंबुजाक्ष तव पादतलं रमाया दत्तक्षणं क्वचिदरण्यजनप्रियस्य ।
अस्प्राक्ष्म तत्प्रभृति नान्यसमक्षमंग स्थातुं त्वयाऽभिरमिता बत पारयामः ॥ ३६ ॥

तरी ऐकें गा अंबुजनयना । तुझिया पदतलावलोकना । अनंत वेळां लाहूनि जनना । रमलों नाना स्वपतींशीं ॥ १४ ॥ जन्हीं भोगिले संसारपति । विषयाभासें न मने तृप्ति । तव पदपल्लवदर्शनावाप्ति । भाग्यें युवति लाधलों ॥५१५॥ येन्हवीं तुझें श्रीपादकमळ । कमलाउत्सौकक केवळ । तेंही क्वचित कोण्हे वेळ । सर्वकाळ अप्राप्य ॥ १६ ॥ रमेसि नियमूनि दिधला क्षण । तोचि क्षणीं ते पदसेवन । करूनि मानी आपणा धन्य । पदाब्जेक्षणसौभाग्यें ॥ १७ ॥ तो तूं कोण्हा एक्या योगें । भूभारनिरसनप्रसंगें । अनंतजन्मींच्या सुकृतभाग्यें । प्रिय सर्वांगें वनचरां ॥ १८ ॥ नादसुखें वेधती कोण्ही । कोण्ही लक्ष्यें लक्षिती नयनीं । कोण्ही मानसीं ध्याती ध्यानीं । कोण्ही वदनीं यश गाती ॥ १९ ॥ ऐसे ऐकैक वेगळ्या आंगीं । भजन आकळिती सप्रेममार्गीं । येथ अरण्यजना सर्वांगीं । निःसंगसंगी प्रियतम तूं ॥ ५२० ॥ ऐसिया अरण्यजनप्रिया । देखत्या जालों तुझिया पायां । जरी क्वचित्सुकृतक्रिया । आल्या* उदया क्षणमात्र ॥ २१ ॥ क्षणमात्रही तव पदतळां । देखत्या जालों सप्रेमळा । आणि तुवां आमुच्या हृदयकमळां । निज इंगितीं रमविलें ॥ २२ ॥ तुझिया गानें संभाषणें । भ्रूविक्षेपनिरीक्षणें । सविलास अपांगमोक्षणें । अभेद रमणें अनुभविलें ॥ २३ ॥ सुरतस्मरण रतिकीर्तन । सहचरक्रीडा गुह्य भाषण । ईक्षण संकल्प उद्योग पूर्ण । क्रिया आचरण आठवें ॥ २४ ॥ सुरत भूमिका इया अष्ट । सप्तधा रमविलों आम्ही स्पष्ट । तेणें जालों ज्या संतुष्ट । त्या नेंचखों कष्ट भवभोग ॥ ५२५ ॥ जेव्हां भोगिलें तवांघ्रिसुख ।

---

**पाठभेद** :— †मुर्धाभेदनीधात्रानिळ ( मुं. ). * अल्पा ( उ. )

१ तोफ. २ मधुर गायनानें. ३ इंगळाइतके. ४ लक्ष्मीला उत्सुक करणारें ५ पदकमलाचें दर्शन हें सुदैव. ६ न सेवूं.

तैंहूनि भवसुखीं जालों विमुख। देहबुद्धीचा मोडूनि अंक[1]। विषया सम्मुख न ठाकों ॥ २६ ॥ सहस्रदळींचें अमृतपान। प्राशिलें लाहोनि राकारमण[2]। ते केंवि सेविती स्वाधिष्ठान। पुढती परतोन प्रियत्वें ॥ २७ ॥ तेंवि तुच्छ जे विषयाभास। ते काय पुरविती आमुची आस। यालागीं सापेक्ष[3] रमा ज्यास। अधरामृतास त्या पार्जी ॥ २८ ॥ तव पदसौभाग्य[4] अति विचित्र। ब्रह्मादि सभाग्य सुर सर्वत्र। अपेक्षेचे होती पात्र। त्यांमाजि किंमात्र वधूगणही ॥ २९ ॥

श्रीर्यत्पदांबुजरजश्चकमे तुलस्या लब्ध्वापि वक्षसि पदं किल भृत्यजुष्टम्।
यस्याः स्ववीक्षणकृतेऽन्यसुरप्रयासस्तद्वद्वयं च तव पादरजः प्रपन्नाः ॥ ३७ ॥

तुझिया वक्षःस्थळाच्या ठायीं। सापत्नभावरहित पाहीं। स्थानसंपन्न असतांही। पुन्हां लक्ष्मीही सकाम ॥ ५३० ॥ तुळसी सेवी चरणकमळ। तिसी पदरज लाभले अमळ। लक्ष्मी म्हणे मज वक्षःस्थळ। न रुचे केवळ कोरडें ॥ ३१ ॥ शोकें मेला दशरथ पिता। हृदय न द्रवेचि तत्त्वता। अनागसें[5] वनीं त्यजिली कांता। परम कठिनता हृत्कमळीं ॥ ३२ ॥ सीता आक्रंदे नानापरी। हृदय न द्रवेचि तिळभरी। देवकीवसुदेव कारागारीं। त्यागूनि कांतारीं क्रीडतसे ॥ ३३ ॥ भवविरक्त शरणागत। देखोनि त्यांचा होय आप्त। त्यांच्या पोष्याचा आक्रांत। देखोनि हृदयांत द्रवेना ॥ ३४ ॥ ऐसें कठोर हृदयस्थान। मज जोडलें असपत्न[6]। तुळसी सेविजे श्रीचरण। अक्षय-कल्याण ज्यां योगें ॥ ५३५ ॥ चरणशौचोद्भवा गंगा। भुवनत्रयाघनिदाघभंगा[7]। कलिमलमथनीं पीयूषौघा। सुकृतामोघा प्रसविती ॥ ३६ ॥ पदरज वंदिती सुरवर। हृदयीं ब्राह्मणलत्ताप्रहार। पादार्चनें तुळसी सधर[8]। मज हें कठोर हृत्कमळ ॥ ३७ ॥ ऐसी लक्ष्मी हृदयवासा। विटोनि तुळसीशीं सापत्न्यईर्ष्या। चाळी सकाम पदरजलेशा। परमपुरुषा ज्या तुझिया ॥ ३८ ॥ समस्त-देवकीं† सेविलें असतां। परी न पवेचि जे सामान्यता। ऐसी अमोघ सौभाग्यता। तव पदरजा-आंतौती ॥ ३९ ॥ पदरजवाहिनी सरित्प्रवरा। सेव्य चराचर नीचतरां। तथापि वरिष्ठां विधिहरसुरां। कल्याणसारा स्पृहणीय ॥ ५४० ॥ ना तरी जीवन मशकादि सर्व। सेविती लहान थोर जीव। म्हणोनि न पवेचि गौणत्व। वरगौरव अमृतत्वें ॥ ४१ ॥ तेंवि पदरज सर्व सेवकीं। सेविलें अभीष्टार्थकामुकीं। उणीव न पडे गौरवाविखीं*। स्वसुखोद्रेकीं अगाध ॥ ४२ ॥ नर सुर मुनिवर पुरंदर[9]। दैत्य दानव विधिशंकर। ब्रह्मांडवासी लहानथोर। तपश्चर्यापर सर्वदा ॥ ४३ ॥ म्हणसी सुकृता जैं सीग चढे। तैं कृपेनें आम्हांकडे। अल्प ही लक्ष्मीची दृष्टि पडे। ऐसें जोडे कैं भाग्य ॥ ४४ ॥ म्हणोनि तयाचे प्रयास। इच्छूनि जयेचा कटाक्ष। सर्वी सर्वत्र सर्वांस। ते श्रीही सापेक्ष पदरजा ॥ ५४५ ॥ तैशाच आम्हीही रानटा। जात्या गौणा अबळा घुरटा। परंतु तव

---

**पाठभेद :—** † सेवकीं ( मुं. व उ. ) * गौरवामुखीं ( उ. ).

१ खूण. २ चंद्र. ३ उत्कंठायुक्त. ४ –सौंदर्य. ५ निष्पाप, निर्दोष. ६ ज्यास दुसरा हक्क सांगणारा नाहीं तें. ७ त्रिभुवनाचें पाप हाच ग्रीष्म, त्याचा नाश. ८ आश्रययुक्त. ९ इंद्र.

पदरजलंपटा । झालों अदृष्टाचेनि बळें ॥ ४६ ॥ आम्हां तव पदशरणागतां । तव गायनें मन्मथ-तप्तां । नुपेक्षूनियां कमलाकांता । करीं सनाथा निजदास्यें ॥ ४७ ॥

तन्नः प्रसीद वृजिनार्दन तेऽङ्घ्रिमूलं प्राप्ता विसृज्य वसतीस्त्वदुपासनाशा ।
त्वत्सुंदरस्मितनिरीक्षणतीव्रकामतप्तात्मनां पुरुषभूषण देहि दास्यम् ॥ ३८ ॥

वृजिनार्दन[1] या संबोधनें । संबोधिती मृदुभाषणें । कीं हें नाम यथार्थ करणें । आमुचें हरणें दुर्वृजिन ॥ ४८ ॥ ऐकोनि क्लेशनाशन नामा । आम्ही विरहिणी सकामा[†] । टाकूनि आलों तव पदपद्मा । तस्मात् आम्हां नुपेक्षीं ॥ ४९ ॥ जैसे तापत्रयसंतप्त । योगी संसारी विरक्त । त्यागूनि येती गृहधनसुत । आम्ही तद्वत पातलों ॥ ५५० ॥ तव दास्याची धरूनि आशा । पतिपुत्रालय-धनादि पाशां[2] । खंडूनि आलिया उपहासा । न करूनि दास्या देइजे ॥ ५१ ॥ कोणें बोलाविलें तुम्हां । जरी तूं म्हणसी नरललामा[3] । तरी तुझिया सुंदर श्रीमुखपद्मा । पाहतां आम्हां स्मर जाळी ॥ ५२ ॥ जया मुखकमळाच्या ठायीं । सुंदर सस्मित ईक्षण पाहीं । पाहतां कामाग्नीची खाई । आमुच्या देहीं प्रज्वळली ॥ ५३ ॥ यास्तव तुझें चरणमूळ । टाकूनि आलों उताविळ । तूं सर्वज्ञ श्रीगोपाळ । हरिसी* तळमळ* निजदास्यें ॥ ५४ ॥ दास्यार्पणें आश्वासून । आमुचें मानस निववीं पूर्ण । वृजिनार्दन हें अभिधान । यथार्थ करूनि मिरवावें ॥ ५५५ ॥ म्हणसी आपुलालिये सदनीं । पतिसेवनें गृहस्वामिनी । त्या किमर्थ दास्याचरणीं । दासी होऊनि प्रवर्त्ततां ॥ ५६ ॥

वीक्ष्यालकावृतमुखं तव कुंडलश्रीगंडस्थलाधरसुधं हसितावलोकम् ।
दत्ताभयं च भुजदंडयुगं विलोक्य वक्षः श्रियैकरमणं च भवाम दास्यः ॥ ३९ ॥

तरी ऐकें गा भुवनैकपाळा । लवण सान्निध्य पावतां जळा । जेंवि न रखवे मर्यादवेळा । इच्छी एकवळों[4] द्रवोनी ॥ ५७ ॥ हो कां धातूमाजि कठिन । स्वकांताचें[5] सन्निधान । होतां लोह वेधें पूर्ण । चंचळ होऊन अनुसरे ॥ ५८ ॥ कठोर पाषाणाची जाति । परी सोमदर्शनें सोमकांतीं । द्रवोनि होय जलोत्पत्ति । हे स्वयंभस्थिति नैसर्गिक ॥ ५९ ॥ तेंवि आम्ही पतिव्रता । स्वाश्रमीं स्वधर्मनिरता । ऐकोनि तुझिया वेणुगीता । झालों विरक्ता भवभानीं ॥५६०॥ वेणुध्वनि पडतां श्रवणीं । तेणें मानस आकर्षूनी । तीव्रवेधें आणिलें वनीं । तव दर्शनीं मेळविलें ॥ ६१ ॥ भ्रमरभासुर[6] चाचर कुरळ । निडळीं[7] श्रवणीं कुंतळ कुटिल । कुंडलमंडित गंडस्थळ । श्रीमुखकमळ तद्युक्त ॥ ६२ ॥ भ्रू व्यंकटा विलासचलिता । त्रपाद्योतक अपांगसहिता । अधरसुधेशीं मंद-स्मिता । पाहतां चित्ता नुरणूक[8] ॥ ६३ ॥ व्रजजनासि अभयदान । करूनि धरिला गोवर्धन ।

पाठभेद :— † सक्लमा ( उ. ). * करी सीतळ ( उ. ).

१ पापनाशक. २ पति, पुत्र, गृह, धन इत्यादिकांचे पाश. ३ पुरुषश्रेष्ठा. ४ ऐक्य, समरसता. ५ लोहचुंबकाचे. ६ भुंग्यासारखे काळेभोर. ७ मस्तकावर. ८ अभाव; लय.

अमरां निर्भयता वोपून । केलें मथन क्षीरोदा ॥ ६४ ॥ कीं गजेंद्राची देखोनि ग्लानि । अभया उदित सायुधपाणि । कीं रसातळा जातां धरणी । अभयदानी जे बाहु ॥५६५॥ ऐसें तुझें भुजदंड-युगळ । विस्तीर्ण सुपीन वक्षःस्थळ । कमलारतिरसजननस्थळ[1] । देखोनि विव्हळ पैं आम्ही ॥६६॥ सुंदर अवयव सालंकृत । सत्रप[2] गायन स्मित इंगित[3] । देखोनि भावी आमुचें चित्त । दासी समस्त व्हावया ॥ ६७ ॥ औपपत्य जुगुप्सित । म्हणोनि निंदिसी जारसुरत । यदर्थीं ऐकें आमुचें गदित । इत्थंभूत विवरूनी ॥ ६८ ॥

का स्त्र्यंग ते कलपदामृतवेणुगीतसंमोहितार्यचरितान्न चरेत्त्रिलोक्याम् ।
त्रैलोक्यसौभगमिदं च निरीक्ष्य रूपं यद्गोद्विजद्रुममृगाः पुलकान्यबिभ्रन् ॥ ४० ॥

कोमलसंबोधनें म्हणती अंग । तुझें वेणुगीत ऐकोनि सांग । नोहे कोणाचा व्रतभंग । श्रवणीं अनुराग उपजोनी ॥ ६९ ॥ षड्ज ऋषभ आणि गांधार । मध्यम पंचम धैवत स्वर । निषादांत मंद्रतार । मानप्रकार त्रिवसनें ॥५७०॥ स्वरकंपितें मूर्च्छनाभेदें । वेणुगीतामृतकलपदें । तालबद्ध संगीत छंदें । हास्यविनोदें विन्यासें ॥ ७१ ॥ न भुलोनि कोणती पतिव्रता । राहे रक्षूनि आर्यचरिता । ऐसी न सृजीच विधाता । जे तव गीता न भाळे ॥ ७२ ॥ भूमि सकाम रोमांचित । द्यौ[4] द्रवोनि अमृत स्रवत । समस्त सरिता प्रवाहरहित । पवनीं स्तिमित चंचलता ॥७३॥ भानुबृहद्भानूंची[5] प्रभा । दाहकपणें न चढे क्षोभा । स्वद्योतकता दावी शोभा । गगनगर्भा-आंतौती ॥ ७४ ॥ स्वाराज्यवैराज्यादि पदें । सांडूनि लक्ष्मी येथेंचि नांदे । ह्रीही[6] विलसे कटाक्ष-मोदें । सांडूनि नुसधें रौद्रत्व ॥ ५७५ ॥ बुद्धि बोधली नादसुखा । परतोनि नोहे विधिसम्मुखा । ज्योत्स्ना रंगली मुखमयंका । अधरपीयूखा भाळोनी ॥ ७६ ॥ अमोघ कंदर्पाची कांति । सर्वात्मकत्वें भाळली रति । क्षमादयाशांतिप्रभृति । तरळताती पदपद्मीं ॥ ७७ ॥ निर्जर मुनिवर गोप सकळ । त्यांच्या पत्न्या आम्ही केवळ । हरिपदलाभा भूमंडळ । ब्रह्मवरें पावलों ॥ ७८ ॥ आतां त्रिजगीं कोण वधु । तव गायनें न पवोनि वेधु । अचल आर्यव्रतस्था शुद्धु । दावी सावधु भवभानी ॥ ७९ ॥ मदनमोहना भुलल्या कांता । हें आश्चर्य नव्हे कीं तत्त्वता । पुरुष सकाम वेणुगीता । भुलले तत्त्वता स्थिरचर ॥ ५८० ॥ त्रैलोक्यसौभाग्यनिधान[7] । तें लक्षूनि तव लावण्य । धेनु वृषभ ऊर्ध्ववदन । पुच्छें वाहून तटस्थ ॥ ८१ ॥ पुरुषप्रकृति पक्षिजाति । वेणुगायनें तटस्थ-वृत्ति । भासती लिखितचित्राकृति । वेधकशक्ति हे तुझी ॥ ८२ ॥ वीरुध[8]§ तरुवर वल्लरी । सर्व वेधलीं वनांतरीं । टवकारलीं पुष्पीं पत्रीं । सप्रेमधारीं द्रवताती ॥ ८३ ॥ कुरंगेंसहित कुरंगीगण । पसरूनि सुंदर विशाळ नयन । प्राशन करिती तव लावण्य । सबाह्य विसरून तनुभावा ॥ ८४ ॥

---

**पाठभेद :—** § विरुद्ध ( मुं. ).

१ लक्ष्मीच्या मनांत प्रीतिरस उत्पन्न करणारें स्थान. २ सलज्ज. ३ बोलणें. ४ स्वर्ग. ५ सूर्य व अग्नि यांची. ६ लज्जा. ७ त्रिभुवनाच्या सौंदर्याचा जनक. ८ वेली.

अजा अविके व्याघ्र वृक । मशक शशक सर्प वृश्चिक । तरस ऱ्हीस कपि जंबुक । सात्त्विकाष्टक प्रकटिती ॥ ५८५ ॥ जेणें तव रूपद्योतना । प्रकटे ऐसिया ऐकोनि गाना । ताटस्थ्य त्रिजगाच्या तनुमना । किमुत अंगना विरहिणी ॥ ८६ ॥ आतां निश्चय हाचि हरि । दोष न ठेवूनियां शिरीं । इतुकी प्रार्थना मान्य करीं । जाणोनि किंकरी व्रजललना ॥ ८७ ॥

व्यक्तं भवान्व्रजभयार्तिहरोऽभिजातो देवो यथाऽदिपुरुषः सुरलोकगोप्ता ।
तन्नो निधेहि करपंकजमार्तबंधो तप्तस्तनेषु च शिरःसु च किंकरीणाम् ॥ ४१ ॥

जैसा आदिपुरुष भगवान । सुरलोकाचें करी गोपन । तो तूं येथ व्रजरक्षण । दुःखनिरसन करावया ॥ ८८ ॥ व्रजींच्या समस्त जनांप्रति । जितुकीं दुःखें प्राप्त होती । त्यांची करावया निवृत्ति । तुझा श्रीपति अवतार ॥ ८९ ॥ नाना संकटांचिये काळीं । आदिपुरुष सुरमंडळीं । सुरसंकल्पें करूनि केली । कृपेनें पाळी निजशरणां ॥ ५९० ॥ तो तूं येथ सर्वांपरी । व्रजजनार्तिहर्त्ता हरि । असतां आम्ही तव किंकरी । मन्मथशरीं जाचतसों ॥ ९१ ॥ आर्ति हरूनि तोष करणें । आर्त्तबंधु या अभिधानें । गोपी करिती विज्ञापनें । अभीष्टप्रार्थने सुचवूनी ॥ ९२ ॥ स्मरसंतप्ता तव किंकरी । निजकरपद्मा आमुचे शिरीं । ठेवूनि निववीं स्मरातुरी । उदास न करीं विज्ञप्ति ॥ ९३ ॥ स्तनीं आननीं आपादमौळीं । मर्दी चुंबीं आणि कुरवाळीं । आपुल्या शंतमपाणिकमळीं । श्रीवनमाळी सर्वज्ञा ॥ ९४ ॥ आम्हां किंकरींचिये शिरीं । कृपेनें स्पर्शें अमृतकरीं । जेंवि शशांक सुधाधारीं । चकोरांवरी अभिवर्षे ॥ ५९५ ॥ तव गानश्रवणें कामाग्नि दीप्त । तेणें सर्वांग जालें व्याप्त । करसरोजें कुच संतप्त । निववीं त्वरित पुंभांवें ॥ ९६ ॥ कुरुपुंगवा बादरायणि । म्हणे समस्तव्रजकामिनी । कृष्णा कथिती मन्मथग्लानि । बहुतां वदनीं बहुविधा ॥ ९७ ॥

श्रीशुक उवाचः— इति विक्लवितं तासां श्रुत्वा योगेश्वरेश्वरः ।
प्रहस्य सदयं गोपीरात्मारामोऽप्यरीरमत् ॥ ४२ ॥

तया गोपींचें विक्लवित । एका वदनें इत्थंभूत । कथनीं साकल्यें असमर्थ । तस्मात्संकेत बोलिलों ॥ ९८ ॥ कृष्णवेधें करणगति । आचरों न शकेच प्रवृत्ति । यालागीं तिहीं केली विनति । परवशमतिवैकल्यें ॥ ९९ ॥ परतोनि जा हें आज्ञापिलें । चित्त श्रीकृष्णीं गुंतलें । आज्ञाभंगें शरीर ठेलें । या वैकल्यें विक्लवित ॥ ६०० ॥ वेणुश्रवणें कामज्वर । लावण्यवेधें अस्वतंत्र । निषेध ऐकोनि विरहातुर । विकळ अंतरें जल्पती ॥ १ ॥ कृष्णवेधें न शकती जाऊं । आज्ञाभंगें न शकती राहूं । तथापि अभीष्टाभिप्रायो । वदल्या स्वमेव विक्लवें* ॥ २ ॥ त्या गोपींचें विक्लवित ।

पाठभेदः— * विफलत्वें ( मुं. ).

१ सुखदायक करकमळानें. २ पुरुषत्वेंकरून. ३ व्याकुलता. ४ इंद्रियव्यापार. ५ पराधीन जी बुद्धि तिच्या विकलतेमुळें.

एकोनि श्रीकृष्ण रमाकांत । हास्य करूनि आनंदभरित । स्वयें रमवीत गोपींतें ॥ ३ ॥ एकला कृष्ण बहुत गोपी । ह्मणें कोण्हाचें मानस कल्पी । तरी तो परमात्मा विश्वव्यापी । योगेश्वरांचा ईश्वर ॥ ४ ॥ योगी योगसिद्धीच्या बळें । भोगिती ऐश्वर्यसोहळे । श्रीकृष्ण योगें मायापटलें । निर्मी स्वलीले ब्रह्मांडें ॥ ६०५ ॥ परिपूर्णत्वें आत्माराम । तेथ कैंचा विषयकाम । जाणोनि गोपी-मानसधर्म । रमता झाला स्वच्छंदें ॥ ६ ॥ प्रतिबिंबेंशीं बालक क्रीडे । तेंवि बल्लवींमाजिवडे । आत्मप्रियत्व प्रकटूनि फुडें । क्रीडे निवाडे जगदात्मा ॥ ७ ॥

ताभिः समेताभिरुदारचेष्टितः प्रियेक्षणोत्फुल्लमुखीभिरच्युतः ।
उदारहासद्विजकुंददीधितिर्व्यरोचतैणांक इवोडुभिर्वृतः ॥ ४३ ॥

भवीं विरक्ता स्वपादनिरता । गोपी जाणोनि नान्यासक्ता[३] । प्रेमोत्कर्षें श्रीअच्युता । आली द्रवता कारुण्यें ॥ ८ ॥ मग धर्मधुरीणतेचा पट । ठेवूनि जैसा स्मरलंपट । उदारहासावलोकें वाट । प्रकटीं औद्धट¶ भौजंगी[४] ॥ ९ ॥ सांडूनि प्रशस्त मोकळी दृष्टि । स्मराक्त सस्मित वक्र भृकुटी । जाणोनि गोपी यथेष्ट तुष्टि । कृष्ण जगजेठी वेष्टिती ॥ ६१० ॥ सर्वावस्था सर्वां देहीं । सर्वकाळ सर्वांविषयीं । आत्मप्रियत्वें भवाच्या ठायीं । प्राणी सर्वही अभिरमती ॥ ११ ॥ तो प्रियतम आत्माचि वास्तव । लीलालालस[५] वासुदेव । सास्मित ईक्षिता गोपी सर्व । उत्फुल्ल अवयवीं टवटविल्या ॥ १२ ॥ राकाग्लौदर्शनें[६] ग्लानि । सांडूनि उत्फुल्लिता कुमुदिनी । तेंवि गोपी प्रसन्नवदनीं । कृष्णा वेष्ठूनि तिष्ठल्या ॥ १३ ॥ *जैसा उडुपति उडुगणभारीं । मंडित मिरवे गगनोदरीं । तैशा गोपी फुल्लार-वक्त्रीं । वेष्टिती रात्रीं हरिगात्रा ॥ १४ ॥ मन्मथमिश्रित उदार हास्य । करितां कमलामानसहंस । दशनदीधितींचा§ प्रकाश । जेंवि कुमुदांस शरदिंदु ॥ ६१५ ॥ भवविरक्ता आत्ममिळणी । आल्या तिहींशीं चक्रपाणि । चटुल चेष्टा उदार करणी । शोभता जाला रतिरंगीं ॥ १६ ॥ अच्युतप्रताप अच्युतरति । अच्युतैश्वर्य अच्युतशक्ति । यालागीं अच्युत हे शुकोक्ति । जाणोनि श्रीपति अस्खलित ॥ १७ ॥ ऊर्ध्वरेता पूर्णकाम । विषयास्पृष्ट आत्माराम । तोही पुरवी अभीष्ट प्रेम । स्वजनाभिराम होऊनि ॥ १८ ॥ त्या गोपींशीं रतिरंजन । करीत होत्साता श्रीकृष्ण । कैसा क्रीडे तें व्याख्यान । नृपालागून शुक सांगे ॥ १९ ॥

उपगीयमान उद्गायन्वनिताशतयूथपः । मालां बिभ्रद्वैजयंतीं व्यचरन्मंडयन्वनम् ॥ ४४ ॥

गोपी लावण्यललितवामा । कृष्णरतिरंगीं सकामा । अभीष्ट सुरतें पूर्णकामा । नधरत प्रेमा हरि गाती ॥६२०॥ षड्ज ऋषभ आणि गांधार । कंठहृदयनाभिस्वर । ज्यांच्या गानें अनंग[७] स्मर । करी संचार सर्वांगीं ॥ २१ ॥ कित्तेक गोपी यशें गाती । कित्तेक लावर्ण्यललितोक्ति[८] । कित्तेक

---

पाठभेदः -- ¶ उद्धट ( मुं. ). * ६१४ वी ओवी मुंगी प्रतींत नाहीं. § --दीतीचा ( उ. ).

१ खरे. २ प्रवृत्त होई. ३ आपणांवांचून दुसऱ्या ठिकाणीं आसक्त नाहींत त्या. ४ आवेश. ५ लीला करण्याविषयीं उत्सुक. ६ पूर्णिमेचें चांदणें. ७ अंगरहित, मदन. ८ अर्थसौंदर्यानें शोभायमान असें बोलणें.

चाटुचटुलोक्ति* । हरिइंगितीं व्युत्पन्ना ॥ २२ ॥ रसाळ वेणूद्गायन । करीत होत्साता श्रीकृष्ण । गोपीगान अनुलक्षण† । अमृतासमान स्मररुचिर ॥ २३ ॥ कृष्णगायनीं गोपीगान । मिश्रित सुस्वर तानमान । लास्यमूर्च्छनारागज्ञान । भाव दावून प्रकटिती ॥ २४ ॥ कृष्णावेगळें दुसरें नाहीं । ऐसा एकांत साधिला तिहीं । कृष्ण लेऊनि आपुल्या देहीं । शंका कांहीं न ठेविली ॥ ६२५ ॥ मग निःशंक निरभिमानें । कृष्णमयचि गोपीगानें । कृष्णीं विरोनि गेलीं मनें । तनुक्रीडनें तदधीन ॥ २६ ॥ ऐसीं अनेक गोपीशतें । त्यांमाजि यूथप श्रीकृष्ण तेथें । नानाविलासमन्मथ-चरितें । बहुविध सुरतें विचरतसे ॥ २७ ॥ अम्लान उत्फुल्ल वैजयंती । कंठीं मिरवीतसे श्रीपति । सादृश्यगर्भित हे शुकोक्ति । विशद श्रोतीं परिसावी ॥ २८ ॥ हेमोत्पलिनी वैजयंती । तेंवि गोपींच्या आननपंक्ति । प्रशस्त फुल्लारविंदाकृति । मघमाघितातीं सप्रेमें ॥ २९ ॥ कीं वैजयंतीसी लावूनि कर । गोपी निबिडमाळाकार । कृष्णासभोंवता प्राकार । प्रेमें सादर स्मररसिका ॥ ६३० ॥ वैजयंती धरिलीं करीं । त्यांची कृष्णाभंवतीं भवरी । त्याच्या स्कंधावरूनि येरी । वनिताचक्रीं हरि गाती ॥ ३१ ॥ एकी सांडूनि सापत्नभावा । तळवट घेती चरणसेवा । समरसें करिती माजी रिगावा । मग केशवा कवळिती ॥ ३२ ॥ एकी करितां मंडपघसणी§ । अवसर न फवे‡ कृष्ण-मिळणीं । मग त्या हरिरूप प्राशूनी नयनीं । स्वेच्छा ध्यानीं कवळिती ॥ ३३ ॥ तंव तें सप्रेमध्यान भरे । बाहीर अंतरींचें अवतरे । बाह्य भीतरीं भेद न सरे । मग एकसरें हरिसुरत ॥ ३४ ॥ एवं श्रीकृष्णरति लालसा । नवयौवना विगतक्लेशा । अवघ्या सप्रेम सुरतरसा । भोगिती डोळसा वनगर्भीं ॥ ६३५ ॥ एवं त्रिजगासी मंडन । करूनियां तें क्रीडावन । स्वयें क्रीडे श्रीभगवान । वनीं जीवनीं उभयत्र ॥ ३६ ॥ वनीं म्हणिजे यमुनातटीं । निबिडनिकुंजीं तरुवरथाटीं । जीवनीं म्हणिजे वाळवंटीं । जळानिकटीं मृदुपुलिनीं ॥ ३७ ॥

नद्याः पुलिनमाविश्य गोपीभिर्हिमवालुकम् । रेमे तत्तरलानंदकुमुदानंदवायुना ॥ ४५ ॥

नृत्य गीत हास विलास । गोपींसहित परमपुरुष । वनीं क्रीडतां परमोल्हास । पावोनि पुलिनीं प्रवेशला ॥ ३८ ॥ यमुनापुलिनीं रम्य मृदुळ । जेथ शर्करा सुशीतळ । मंदानिळें कुमुदें तरळ । परिमळबहळ जे ठायीं ॥ ३९ ॥ यमुनाजळीं । कुमुदावळी । तरळ डोलती मंदानिळीं । तया वायूनें पुलिनपाळीं । तुहिनाचळीं[३] उपमूं ये ॥ ६४० ॥ गंधर्वसुरसिद्धकिन्नरीं । अंगनांसहित मन्मथ-समरीं । सुगंध शीतळ वनोदरीं । जेंवि हिमगिरीमाजि रमिजे ॥ ४१ ॥ तैसा पुलिनीं प्रवेशोन । गोपींसहित मनमोहन । रमता झाला आनंदोन । लब्धानंद सप्रेमें ॥ ४२ ॥ तिये क्रीडेचीं इंगितें । चाटुचटुल रतिचेष्टितें । कामशास्त्रोक्त कामतातें । दाविलीं उचितें विचरोनी ॥ ४३ ॥ तीं नृपातें बादरायणि । ऊर्ध्वरेताही सप्रेम वर्णी । जेणें भंगती कलिमलश्रेणी । परिसा श्रवणीं तें आतां ॥ ४४ ॥

**पाठभेद :—** * चाटुल चटुल गती ( उ. ). † अनुलक्षून ( उ. ) § मुड्डुपघसणी ( उ. ). ‡ न मिळे ( उ. ).

१ प्रेमाने मिथ्या भाषण. २ समूहाचा नायक. ३ हिमाचल.

बाहुप्रसारपरिरंभकरालकोरुनीवीस्तनालभननर्मनखाग्रपातैः ।
क्ष्वेल्याऽवलोकहसितैर्व्रजसुंदरीणामुत्तंभयन्नतिपतिं रमयांचकार ॥ ४६ ॥

फेडूनि सव्रीड भेदपदर । बाहु पसरूनि स्मरनिर्भर । श्रीकृष्ण कंदर्पकेलिचतुर । बल्लवीनिकर आलिंगी ॥ ६४५ ॥ अस्ताव्यस्त वसनाभरणीं । कृष्णीं मिनल्या ज्या विरहिणी । सालंकृता रतिरंगणीं । कृष्णेक्षणीं त्या जाल्या ॥ ४६ ॥ कुसुमग्रथित कबराभरणीं[1] । मंडित मौळें सलंब वेणी । मलयजकर्दमविलेपनीं । अंगयष्टि मघमघिती ॥ ४७ ॥ मंदारमाल्यग्रथित माळा । रुळती बल्लववनितागळां । मन्मथवल्ली फुलल्या बहळा । तेंवि पुंजाळा लावण्यें ॥ ४८ ॥ भुजंगभोगोपम[2] भुज सरळ । पसरोनि परस्परें लंवाळ । गोपी आणि श्रीगोपाळ । क्रीडाशील रतिरसिक ॥ ४९ ॥ निर्द्वंद्वही[3] द्वंद्वीभूत । अंगनांशीं अनंगतात । कामकौशल्यें उल्हासयुक्त । आळंगीत सप्रेमें ॥ ६५० ॥ तया आलिंगनामाझारी । बल्लवींच्या अभ्यंतरीं । उठती परमानंदलहरी । निर्विकारी हरिसुरतें ॥५१॥ बाहुप्रसरण स्मरोत्कर्षें । संकेत दावितां परमपुरुषें । तैशाच गोपी स्वबाहुपाशें । कवळिती तोषें श्रीकृष्णतनु ॥ ५२ ॥ कृष्णालिंगनीं पडतां मिठी । सुटली हृदयींची द्वैतगांठी । अद्वयसुखें भरली सृष्टि । रमली दृष्टि श्रीकृष्णीं ॥ ५३ ॥ आब्रह्मस्तंभपर्यंत । अभेदकृष्णस्वानंदभरित । सुखसंभ्रमें क्रीडासक्त । दिसती विभक्त अविभक्ता ॥ ५४ ॥ आज्यशर्करापयादि मिष्ट । जिह्वे सुखद आणि स्वादिष्ट । परी तिक्त कटूवम्ल पटु[4] रामटें । अशनीं अभीष्ट रोचकें ॥ ६५५ ॥ इत्यादि उपचार सूपशास्त्रीं[5] । मनुजादिकां विधानसूत्रीं[6] । येर तिर्यक पश्वादि हिंस्री । तृणादि गात्रीं तोषिजे ॥५६॥ तेंवि पश्वादि सर्व योनि । सकाम प्रवर्तती मैथुनीं । परी मनुष्यादि सुरवरांलागुनी । स्मरानुशासनीं प्रवृत्ति ॥ ५७ ॥ तेथ कामशास्त्रशिक्षिता युक्ति । वरिष्ठ उत्तम प्रशस्त रति । लिंगसांघट्यमात्रें प्राकृतीं । तिर्यग्जाती समरसिजे* ॥ ५८ ॥ कृष्ण स्वयमेव शास्त्रयोनि । सुरवनिता या व्रजकामिनी । यालागीं यथोक्त क्रीडाचरणीं । स्मरालागूनि अनुशिक्षी ॥ ५९ ॥ बाहुप्रसरण आलिंगन । वेणीग्रहण मुखचुंबन । पाणिग्रहण कुचमर्दन । नीवीमोक्षण संस्पर्श ॥६६०॥ विमुक्तकंचुकी विगतनीवी । करलालन सर्वावयवीं । हनुगल्लोरुकरपल्लवी । सस्मितभावीं परिहसिती ॥ ६१ ॥ मंजुळ कोमळ विनोदवचनीं । कुचादिनखाग्रपरिपातनीं । सादर अवयवनिरीक्षणीं । अधरपानीं स्मितवक्त्रीं ॥ ६२ ॥ इत्यादि क्रीडा सविस्तर । कंदर्परहस्यशास्त्रानुसार । सुभगशिक्षित नारीनर । दुर्लभतर त्रैलोक्यीं ॥६३॥ एवं शास्त्रोक्त सौभाग्यरति । भाग्यें भोगिती नर सुकृति । श्वानसूकरगोखरजाति । तेंवि रमती पामरें ॥ ६४ ॥ सुमनें तांबूल चंदन । धूपदीप खाद्यपान । कुंजकुसुमितवितानशयन[7] । कामोद्दीपन संपत्ति ॥ ६६५ ॥ वाद्यगीत नर्तनकळा । आनंदनिर्भर वनिता सकळा । अनीर्ष्यरतिसुख सोहळा । श्रीगोपाळा सान्निध्यें ॥ ६६ ॥ कामशास्त्राचीं उदाहरणें । देऊनि पदशः व्याख्यान करणें । केवळ

---

**पाठभेद :--** * समरमिजे ( उ. ).

१ वेणींतील अलंकार. २ सर्पाच्या शरीरासारखे. ३ शीत व उष्ण, सुख व दुःख इत्यादि द्वंद्वांनीं रहित. ४ हिंग. ५ पाकशास्त्र. ६ क्रियेचे नियम. ७ पुष्पकुंजांतील छतानें युक्त शय्या.

स्त्रैण्यांचीं कारणें । ग्रंथीं गौणें न वदावीं ॥ ६७ ॥ येर सज्जनां संकेतमात्र । सूत्रप्राय वदलें वक्त्र । वृथा किमर्थ कामशास्त्र । येथ समग्र वाखाणूं ॥ ६८ ॥ बाहुप्रसरण आलिंगन । कचकुचकरऊरुस्पर्शन । नीवीमोक्षण नखाग्रपातन । हास्य ईक्षण नेर्मोक्ति ॥ ६९ ॥ इत्यादि क्रीडा करूनि हरि । व्रजललनांचे अभ्यंतरीं । रमवी रतिपति प्रदीप्त करी । लावण्यलहरी लालित्यें ॥ ६७० ॥ हरिवल्लभा बल्लवललना । सप्रेमळा स्वपदशरणा । रमविता जाला त्रैलोक्यराणा । स्वैराचरणा प्रकटूनी ॥ ७१ ॥

एवं भगवत: कृष्णाल्लब्धमाना महात्मनः । आत्मानं मेनिरे स्त्रीणां मानिन्योऽभ्यधिकं भुवि ॥ ४७ ॥

एवं म्हणिजे ऐशिये परी । महात्मा जो कृष्णावतारी । त्या भगवंतापासूनि नारी । महत्त्व-थोरी पावल्या ॥ ७२ ॥ जीव तितुके मनाधीन । तें मन वर्ते ज्या अधीन । त्याशींच महात्मा अभिधान । तो श्रीकृष्ण भगवंत ॥ ७३ ॥ षड्गुणैश्वर्यसंपन्न । कृष्णपरमात्मा मनमोहन । सुरतीं श्रीकृष्णापासून । पावल्या बहुमान व्रजललना ॥ ७४ ॥ लोकत्रयीं ज्या श्रेष्ठ वनिता । त्यांहून आपण महत्त्ववंता । भूमंडळीं त्या बल्लवकांता । कृष्णाभिरमिता मानिती ॥ ६७५ ॥ श्रीकृष्णसुरतीं लब्धमाना । इतुकेन वाढतां अभिमाना । कळलें हृदयस्था श्रीकृष्णा । तन्नाशना आरंभी ॥ ७६ ॥ भगवत्प्राप्तिही जालियावरी । अभिमानाश्रित साही वैरी । करूनि प्राप्तीची बोहरी । बळें संसारीं बुडविती ॥ ७७ ॥ यालागीं निजात्मशरणागता । कृष्ण कैवारी रक्षिता । भंगोनि अरिवर्गा दुष्कृता । साधी स्वहिता स्वजनांच्या ॥ ७८ ॥

तासां तत्सौभगमदं वीक्ष्यमानं च केशवः । प्रशमाय प्रसादाय तत्रैवांतरधीयत ॥ ४८ ॥

होतां भवसुखीं विरक्ति । सप्रेम भगवंतीं अनुरक्ति । अनुतापरूप विरहास्थिति । कृष्णप्राप्ति-सापेक्षें ॥ ७९ ॥ तंववरी श्रवण कीर्तन स्मरण । यथादृष्ट रूपलावण्य । प्रियतम वेधक मूर्तिध्यान । तत्पदसेवन अभीष्ट ॥ ६८० ॥ मानसीं क्रीडा अभ्यर्चन । आभिवादन प्रसादन । स्निग्ध सप्रेम दास्या-चरण । सख्य सौजन्य अभिलसित ॥ ८१ ॥ इत्यादि देखोनि कारुण्यता । कृपें वोळल्या प्राणनाथा । आत्मनिवेदनाची आस्था । अत्यंत चित्तामाजिवेडी ॥ ८२ ॥ विरहभूमिकेआंतौती । साधनदशा हे बाणली होती । त्यासि जोडतां श्रीकृष्णसुरतीं । चित्सुखावाप्ति अवगमली ॥ ८३ ॥ मग विसरल्या पूर्वस्थिति । मानिली सौभाग्यें उन्नति* । आपणा ऐशा सभाग्ययुवति । नाहींत म्हणती त्रिजगांत ॥ ८४ ॥ विसरल्या विरहविरक्ति पहिली । न म्हणती कृष्णें कृपा केली । लावण्य गर्वाचिये भुलीं । कृष्णीं मानिली स्त्रैणता ॥ ६८५ ॥ आम्ही वरिष्ठा उत्तम गुणी । सालंकृता

पाठभेद :— * सौभाग्यउन्नति ( उ. )

१ विषयलंपटतेचीं. २ थट्टेचीं भाषणें. ३ प्राप्त झाली प्रतिष्ठा ज्यांस त्या. ४ नाश, हानि, राखरांगोळी. ५ इच्छित. ६ ज्ञानसुखाची प्राप्ति. ७ प्राप्त झाली. ८ विषयासक्ति.

लावण्यखाणी । विलासशृंगाररसवाहिनी । मृगांकवदनी मृगनयना ॥८६॥ आमुचे आंगीं तारुण्यभर । विशेष चातुर्य शृंगार । इत्यादि सौभाग्यें श्रीधर । आम्ही सत्वर वश केला ॥ ८७ ॥ कृष्ण भुलला आमुच्या गुणां । आम्हीच सुभगा वरांगना । येर त्रिजगीं दुर्भगा हीना । काय गणना तयांची ॥८८॥ कृष्ण झाला आम्हाधीन । आतां आम्हीच मान्य धन्य। आम्हांपुढें त्रिजग तृण । ऐसा अभिमान मानसीं ॥ ८९ ॥ सौभाग्याचा चढला मद । भोगितां कृष्ण सुरतानंद । तेणें वाढला उन्माद । म्हणती मुकुंद वश केला ॥ ६९० ॥ ऐसा अभिमान मानिती मनीं । उदेला जाणोनि चक्रपाणि । प्रवर्ते त्यांचिया कल्याणीं । मदोपशमनीं मानेशीं ॥ ९१ ॥त्यांचिया आंगींचा सौभाग्य-मद । कृष्ण भुलविला हा अभिमान विशद । तो प्रशमूनि श्रीमुकुंद । पूर्ण प्रसाद करावया ॥ ९२ ॥ म्हणे आपुल्या सन्निधानें । गोपी कवळिल्या मदाभिमानें । पुढती विरहोद्दीपनें । प्रशम करणें मदमाना ॥ ९३ ॥ लक्षूनि विरहाचें कारण । वेष्टित असतां वनितागण । तेथेंचि पावला अंतर्धान। पूर्ण प्रसाद* होआवया ॥ ९४ ॥ माझिये सुरतीं समरस मिळणी । भिनल्या असतां व्रजकामिनी । स्वसाक्षित्वें यांलागूनी । मदाभिमान झगटला ॥ ६९५ ॥ जेंवि समरसीं योगप्रवीण । साक्षित्वभेदें उरतां भिन्न । लयविक्षेपें विपरीतज्ञान । सच्चित्सुखघन अंतरवी ॥ ९६ ॥ भरोनि दृश्याचे काननीं। करण वदनें करोनि ग्लानी । स्थिरचरविषया पुसती वचनीं । सच्चित्सुखघन जगदात्मा ॥ ९७ ॥ गोपी मदाभिमानाविष्टा । वियोगविरहें पावती कष्टा । काननीं होऊनि प्रविष्टा । आत्माभीष्टा हुडकिती ॥ ९८ ॥ स्थिरजंगमां पुसतां वनीं । त्रास पावती करितां ग्लानि । पुन्हां उपराति धरूनि मनीं । यमुनापुलिनीं स्थिर होती ॥ ९९ ॥ तेथ करितां गुणकीर्तन । विशुद्ध निर्मद निरभिमान । जालिया होती सुखसंपन्न । निजात्मदर्शन लाहोनी ॥ ७०० ॥ ऐसी अनुकंपा श्रीहरि । लक्षूनियां अभ्यंतरीं । प्रसादार्थ वनितानिकरीं । अंतर्धाना पावला ॥ १ ॥ इतुकी लीला ये अध्यायीं । ललनालालस शेषशायी । विचरला तें श्रवणालयीं । परीक्षितीच्या शुक वदला ॥ २ ॥ पुढिले अध्यायीं गोपिका । वनीं हुडकिती मनसिजजनका । विरहप्रेमामृतरस निका । सावध ऐका साधक हो ॥ ३ ॥ श्रीमत्प्रतिष्ठानवासिनी । एकनाथा एकाभिधानी । भवरोगिया आरोग्यदानी। साधकजननी जगदंबा ॥ ४ ॥ चिदानंदाचें दर्शन । दिवि स्वानंदें उजळून । गोविंदकृपाजोगवादान। करूनि दिवटा मज केलें ॥ ७०५ ॥ गोविंदसद्गुरुचरणसेवा । कृपेनें वोळला नवार्णवा । तिणें स्वबोधें दयार्णवा । माजि वैभवा भरियेलें ॥ ६ ॥ स्वानंददिवीचा प्रकाश । करूनि ग्रंथार्थाचें मिस । गुरुकृपेचा पूर्ण तोष। श्रोतयांस प्रकाशला ॥७॥ दिविप्रकाशीं स्नेहें जळे । जन्ममरणाची पीडा टळे। निजात्मवैभवरेखा उजळे। नाथिलें वितुळे भवदैन्य ॥ ८ ॥ द्वैतदुर्गेची वोंवाळणी । करूनि अद्वैतसाम्राज्यसदनीं । स्वानंद भोगिजे श्रोतेजनीं । हे विनवणी दिवट्याची ॥ ९ ॥ आपुले कृपेचा

पाठभेदः-- * प्रसन्न ( मुं. व उ. )

१ विलास व शृंगार यांची नदी २ चंद्रमुखी. ३ रूपाचा गर्व. ४ मूर्च्छनामुषुप्तींमधील अज्ञान. ५ मदनपिता श्रीकृष्ण. ६ दीप. ७ तेल, पक्षीं–विषयप्रेम. ८ मिथ्या.

जोगवा । देऊनि पदभजनीं जागवा । सरेतें कीजे दयार्णवा । संतां संदैवां हे विनति ॥ ७१० ॥ इति श्रीमद्भागवत । अठरा सहस्र श्रुतिनिर्मथित । परमहंसीं श्रुतोधीत । कैवल्यामृत ज्या श्रवणें ॥ ११ ॥ तयांतील स्कंध हा दशम । शुकपरीक्षितीसंवाद सुगम । रासक्रीडा उपक्रम । अध्याय उत्तम ऊनत्रिंश ॥ ७१२ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां रासोपक्रमे कृष्णगोपिकासंवाद-सुरतवर्णनं नामैकोनत्रिंशतमोऽध्यायः । श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक ४८ ॥ ओवीसंख्या ७१२ ॥ एवं संख्या ७६० ॥ ( एकोणतिसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १४८६८ ).

एकोणतिसावा अध्याय समाप्त.

१ कृतकृत्य, पावन. २ भाग्यवान. ३ वेदांचे मंथन करून काढिलेला साराश. ४ तपस्येकरितां ज्यानें इंद्रियनिग्रह केला आहे अशा संन्याशानें. ५ श्रवण केलेली व पठण केलेली. ६ मोक्षरूप अमृत. ७ आरंभ.

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय ३० वा

श्रीकृष्णपरमात्मने नमः। सच्चित्सुखकरवरकरपद्मा। पद्माप्रियतममानससद्मा ॥ श्रीगोविंदा स्वसंविद्मा। छेदक छद्मा छंदज्ञा ॥ १ ॥ मौळ स्पर्शतां पद्मकरें। पूर्ण सच्चिदानंद अवतरे। विषयशर्मिकगरिमा हरे। मति मोहरे पदभजनीं ॥२॥ अभेदभक्तिसुखाची गोडी। ब्रह्मानंदाच्या पडिपाडीं। तुकितां प्रणतीं अनावडी। केली रोकडी भक्तीपुढें ॥ ३ ॥ असतां ब्रह्मसुख संचलें। मिथ्या विवर्ते आच्छादिलें। गुरुपदभजनें उदया आलें। पोटीं जन्मलें भक्तीचे ॥ ४ ॥ परिस लोहाचें करी सोनें। तें केंवि तुके त्याचिये तुळणे। ब्रह्मत्व जोडे गुरुपदभजनें। तें केंवि करणें तत्तुल्य ॥ ५ ॥ अभेदपदभजनाची गोडी। देखोनि ऐक्याची मोडिली घडी। अभेदप्रेमा चढोवढीं। उभवूनि गुढी रूढविला ॥ ६ ॥ ऐसी कमला निज हृत्कमळीं। कमलदलाक्ष प्रेमें कवळी। तीं वधूवरें सप्रेमशाली। आनंदबहळीं तुज ध्याती ॥ ७ ॥ पद्माप्रियतममानससद्मीं। निश्चळ निवास तुमचा स्वामि। म्हणोनि त्यांतें अबोध* ऊर्मि। कोण्हे कर्मीं न स्पर्शे ॥ ८ ॥ गुरुपदभजनीं सप्रेम रति। म्हणोनि अवाप्त ज्ञानशक्ति। करितां त्रिजगाची संस्थिति। ज्या भवभ्रांति न स्पर्शे ॥ ९ ॥ ज्याच्या पदभजनीं हा महिमा। तो गोगोप्ता गोविंदनामा। स्मरणमात्रें कैवल्यधामा। स्वसंविद्मा स्वबोधें ॥ १० ॥ मायाच्छद्मच्छेदनशीला। छंदोभिज्ञा प्रणतपाळा। छंदोमया गोगोपाळा। करिसी स्वलीला नटनाट्यें ॥ ११ ॥ बहुधा नाट्यें बहु अवतारीं। तव कृत कथिती† ग्रंथांतरीं। येथ महाराष्ट्र मम वैखरी। दशमावरी प्रवर्त्तली ॥ १२ ॥ त्यामाजि हा रासोत्सव। गोपी परिसोनि मुरलीरव। वनीं स्वेच्छा वासुदेव।

पाठभेद :— * अभेद ( उ. ). † ग्रथिता ( मुं. )

१ शाश्वत आनंद देणारा वर देणारें करकमल ज्याचें तो. २ विष्णूचें मानस हेंच सद्म म्हणजे गृह ज्याचें तो सद्गुरु. ३ आत्मज्ञानसंपन्न. ४ विषयसुखाचें महत्त्व. ५ साम्यतेनें, बरोबरीनें. ६ वेदज्ञ.

भोगितां गर्वे उदेला ॥ १३ ॥ तो जाणोनि सर्वज्ञ हरि । स्वजनसुखदविग्रहधारी । अनुग्रहार्थ मद परिहरी । होऊनि सत्वरी तिरोहित[1] ॥ १४ ॥ जेंवि सद्गुरु शक्तिपात । करूनि सच्छिष्याचें चित्त । झालें जाणोनि निजात्मरत । पुन्हा जागृत भवीं करी ॥ १५ ॥ मग त्या न रुचोनि भवभान । अनुभूतसुखीं वेधे मन । विसरोनि देहादिप्रवृत्तिस्मरण । करी गवेषण[2] तच्छंदें ॥ १६ ॥ तेंवि कृष्णसुखाची गोडी । गोपी चाखतां गर्वें गुढी । उभवूनि केली विघडाविघडी । झाडोझाडीं मग फिरती ॥ १७ ॥ बाल उन्मत्त कां पिशाच । देहस्मृतीचा भंगोनि माचें[3] । अनियत करणें[4] करितां नाच । गोपी तैशाच हरिवेधीं ॥ १८ ॥ विरहतप्ता त्या गोपिकांहीं । विरक्त होऊनि देहीं गेहीं । हरि हुडकिला वनाचे ठायीं । तिसाव्या अध्यायीं हे कथा ॥ १९ ॥ शुक म्हणे गा कुरुवरिष्ठा । जोडलें न जिरे मदगर्विष्ठा । भगवत्प्राप्ति विना कष्टां । केंवि अभीष्टा भेटवी ॥ २० ॥

श्रीशुक उवाच :—अंतर्हिते भगवति सहसैव व्रजांगनाः । अतप्यंस्तमचक्षाणाः करिण्य इव यूथपम् ॥ १ ॥

तेंवि गोपी भगवत्संग । लाहतां मदगर्वाचा योग । अंतर्धान अंतरंग । करी श्रीरंग जाणोनि ॥ २१ ॥ अकस्मात अंतर्धान । पावला असतां जनार्दन । गोपी विरहतापें करून । करिती गवेषण संतप्ता ॥ २२ ॥ मधुमासींच्या मधुतर शाखा । करिणी भक्षूनि मिथुनोन्मुखा । इच्छूनि अभीष्ट मन्मथसुखा । निजनायका वेष्टिती ॥ २३ ॥ त्यांतील जैसा यूथपति । वनीं अंतरतां विहार-वृत्ति । विरहतप्ता त्या हुडकिती । तेंवि व्रजयुवति कृष्णातें ॥ २४ ॥ शक्तिपातोत्थित जैसा शिष्य । देहादिभवभानीं वैरस्य । पावोनि अभीष्ट सामरस्य । लाहे अवश्य विनिमयता ॥ २५ ॥ कीटकी जैसी भिंगुरटी । ध्यानतादात्म्यें तनु पालटी । तेंवि कोहंता उफराटी । वळे उलटी सोहंतें ॥ २६ ॥ हरिसुखभुक्ता तेंवि ललना । प्रेष्ठ पावतां अंतर्धाना । वेधें करितां तीव्र ध्याना । ज्ञप्तितादात्म्यें[5] पालटल्या ॥ २७ ॥

गत्यानुरागस्मितविभ्रमेक्षितैर्मनोरमालापविहारविभ्रमैः ।
आक्षिप्तचित्ताः प्रमदा रमापतेस्तास्ता विचेष्टा जगृहुस्तदात्मिकाः ॥ २ ॥

भगवंताचे पदविन्यास । लाक्षितां असाम्य गमती हंस । जडतां तीव्रध्याना ध्यास । पावे मानस तन्मयता ॥ २८ ॥ चंद्रापासूनि चकोरनयनां— । पर्यंत पीयूषरसाचा पान्हा । तेंवि इंगितेंसहित ध्याना । वेधक तनुमना अनुराग ॥ २९ ॥ सस्निग्ध तान्हुलें आणि जननी । सकाम कामुक आणि कामिनी । गुरुशिष्यांचा अभेदभजनीं । अवंचकपणीं अनुराग ॥ ३० ॥ सूर्यदर्शनें पद्मिनी । कां शशांकोदयीं कुमुदिनी । तैसी सानुरागनिरीक्षणीं । मिथा विकसित स्मितवक्त्रें ॥ ३१ ॥ कटाक्ष-विक्षेपमनोहर । सानुरागविलासपर । मधुरगायन आलाप रुचिर । क्रीडाविहार स्मरवृद्धि ॥ ३२ ॥

१ गुप्त. २ शोध. ३ आश्रय; मंच, नृत्यपीठ ( Stage ). ४ अवयवांनीं, इंद्रियांनीं. ५ चेतनेच्या योगानें जी कृष्णस्वरूपता तिणेंकरून.

इत्यादि रमारमणइंगितें । हरितां व्रजरमणींचीं चित्तें । तादात्म्य पावोनि त्या चेष्टांतें । घेत्या झाल्या शिक्षितवत् ॥ ३३ ॥ वादककौशल्य वाजंतरीं । कीं बिंबींचे विकार दर्पती मुकुरीं । तेंवि तादात्म्य-वेधनिर्भरीं । गोपीशरीरीं हरिचेष्टा ॥ ३४ ॥ हरितादात्म्यें हरिइंगितें । घेऊनि हरिपण आपणांतें । भावूनि विसरल्या पूर्वावस्थे । भजती स्मृतीतें कृष्णत्वें ॥ ३५ ॥ कोहं विसरोनि सोहंबोधें । प्रत्यक्चैतन्यें स्वरूपवेधें । वेंठतां मिथ्यात्वें विवर्तरोधें । फावे नुसधें एकत्व ॥ ३६ ॥ तेंवि गोपिका कृष्णात्मका । कृष्णानुराग लाहतां निका । करिती तच्चेष्टा एकैका । व्रजनायका भावूनी ॥ ३७ ॥

गतिस्मितप्रेक्षणभाषणादिषु प्रियाः प्रियस्य प्रतिरूढमूर्तयः ।
असावहं त्वित्यबलास्तदात्मिका न्यवेदिषुः कृष्णविहारविभ्रमाः ॥ ३ ॥

केवळ कृष्णइंगितेंसहित । आपण होऊनि मूर्तिमंत । एकीमेकीतें सांगत । मी नंदसुत म्हणोनी ॥ ३८ ॥ कृष्णाचिये चालती चाली । कृष्णमधुरता बोलती बोलीं । कृष्णकृपेच्या न्याहाळीं । न्याहाळिती त्या तादात्म्यें ॥ ३९ ॥ हास्यवक्त्रें विभ्रमापांग । कृष्णमयचि ज्यांचें सांग । कृष्णा ऐसा स्वजनानुराग । एवं अव्यंग हरिचेष्टा ॥ ४० ॥ ऐशा गोपी हरिमय जाल्या । वेधें तनुभावा विसरल्या । पूर्वस्मृतीसी अंतरल्या । मग संचरल्या वनांतरीं ॥ ४१ ॥

गायंत्य उच्चैरमुमेव संहता विचिक्युरुन्मत्तकवद्वनाद्वनम् ।
पप्रच्छुराकाशवदंतरं बहिर्भूतेषु संतं पुरुषं वनस्पतीन् ॥ ४ ॥

कृष्णविरहें भ्रमिता अबळा । सबाह्य प्रवृत्ति मार्गीं बरळा । उच्चस्वरीं श्रीगोपाळा । गाती वेल्हाळा निर्लज्ज ॥ ४२ ॥ कृष्णविरहें भ्रमिताचिये परी । रात्रीं भरल्या वनांतरीं । आलापूनि उच्चस्वरीं । श्रीमुरारि हुडकिती ॥ ४३ ॥ ग्रहपिशाचभ्रमोपहत । मदिरामदें जेंवि उन्मत्त । तैशा फिरती वनाआंत । तीं चिह्नें समस्त अवधारा ॥ ४४ ॥ कृष्णा म्हणोनि उच्चस्वरीं । हाका मारिती वनान्तरीं । धांवती उन्मत्ताचिये परी । घोर कांतारीं हरिवेधें ॥ ४५ ॥ वनें लंघूनि वनाप्रति । विखुरल्या सैराट वनीं भरती* । हरिगुण उच्चस्वरीं गाती । बोल्खी देती नामाची ॥ ४६ ॥ ये गा अघबळसंहर्त्तिया । ये गा गोवर्धनधर्त्तया । ये गा स्वजना सुखकर्त्तया । परिहर्त्तया उपसर्गा ॥ ४७ ॥ पूतनास्तनगरप्राशनकरणा । ये गा गोपींचीरापहरणा । ये गा यमला-र्जुनोद्धरणा । दुर्घटहरणा दुरितारि ॥ ४८ ॥ ये गा मुरलीवादनशीला । ये गा ललनालालनलोला । ये गा प्रमदामानसकमला । अळिउळप्रार्य अभिरमका ॥ ४९ ॥ ऐशा गाती अनेक परी । धुंडित होत्सात्या कांतारीं । पुसती विरुद्ध द्रुमवल्लरी । सबाह्याभ्यंतरीं नांदतया ॥ ५० ॥ अंतर्बाह्य जैसें

**पाठभेद :—** * भ्रमति ( मुं. ).

१ प्रतिबिंबित होतात. २ आत्मस्वरूपज्ञानानें व्यापिलें असतां. ३ आत्मज्ञान. ४ व्यापिलें असतां. ५ दृश्यभासाच्या प्रतिकारानें. ६ दृष्टीनें. ७ गोपींचीं वस्त्रें हरणारा. ८ भुंग्यासारखा.

गगन । तैसा भूतीं जो परिपूर्ण । पुसती वनस्पतींलागून । जातां श्रीकृष्ण देखिला ॥ ५१ ॥ त्या गोपींच्या उन्मत्त रीति । स्थावरजंगमीं ज्या प्रश्नोक्ति । श्लोकनवकें[1] वदल्या युवति । तें सावध श्रोतीं परिसिजे ॥ ५२ ॥

गोप्य ऊचुः — दृष्टो वः कच्चिदश्वत्थ प्लक्ष न्यग्रोध नो मनः । नंदसूनुर्गतो हृत्वा प्रेमहासावलोकनैः ॥ ५ ॥

पिंपरी म्हणिजे प्लक्षतरु । वट अश्वत्थ थोर थोर । उच्चपणें दूरद्रष्टोर[2] । म्हणोनि श्रीधर त्यां पुसती ॥ ५३ ॥ अगा अश्वत्था प्लक्षा वटा । आमुच्या चित्ताचा चोरटा । कृष्ण जातां इया वाटा । तुम्हांसि अवचटा आढळला ॥ ५४ ॥ आकर्षूनि मुरलीगानें । वनीं आणूनि सन्निधानें । प्रेमहासावलोकनें । आमुचीं मनें हरतिलीं ॥ ५५ ॥ गायनरूप घालूनि फांसा । तेणें आकर्षिलें वनवासा* । शस्त्रासमान विलोकहासा । प्रेरूनि मानसा चोरिलें ॥ ५६ ॥ तो आमुचा सर्वस्वहर्ता । तुम्हीं देखिला असेल जातां । क्षणें असेल अर्ता पर्ता । त्याची वार्ता सांगा हो ॥ ५७ ॥ ऐशा पुसोनि पुढें जाती । तंव देखिल्या पुष्पजाती । विरहाकुळा बल्लवयुवति । त्यांतें पुसती हरिवार्ता ॥ ५८ ॥

कच्चित्कुरबकाशोकनागपुन्नागचंपकाः । रामानुजो मानिनीनां गतो दर्पहरस्मितः ॥ ६ ॥

आपुल्या कुसुमामोददानें । श्रांतां विश्रांति अर्पणें । महानुभावांचीं[3] आचरणें । उदारपणें वागविती ॥ ५९ ॥ म्हणोनि तरुवरां पुण्यशीलां । कृष्णपदवी[4] पुसती अबळा । चंपकादि वृक्षमेळा । संबोधिती पृथक्त्वें ॥ ६० ॥ श्वेतरक्तपीतादिक । चतुर्विधकुसुमांचे कुरबकें[5] । श्वेत रक्त द्विविधाशोक । आणि चंपक कनकाभें[6] ॥ ६१ ॥ नाग पुन्नाग पाटळ । इत्यादि पुष्पतरूंचा मेळ । त्यांसि पुसती उताविळ । तुम्हीं गोपाळ देखिला हो ॥ ६२ ॥ बळरामाचा अनुज हरि । स्मितईक्षणें ललनान्तरीं । रिघोनि सदर्प मानस हरि । तो कांतारीं देखिला ॥ ६३ ॥ तुम्ही सदय परोपकारी । उदार सत्पुरुषाचे परी । त्याविण आम्ही दुःखिता नारी । वार्ता तऱ्ही वदा त्याची ॥ ६४ ॥ ऐशा पुसोनि तरुवरांसी । पुढें शोधितां श्रीकृष्णासी । तंव ते वनीं कल्याणराशि । देखिली तुळसी हरिप्रिया ॥ ६५ ॥

कच्चित्तुलसि कल्याणि गोविंदचरणप्रिये । सह त्वाऽलिकुलैर्बिभ्रद्दृष्टस्तेऽतिप्रियोऽच्युतः ॥ ७ ॥

गोपी म्हणती अवो तुळसी । गोविंदाच्या श्रीचरणासीं । परम प्रियतम सुकृतराशी । तुज अहर्निशी न विसंबे ॥ ६६ ॥ वनमाळांसह वैजयंती । हृत्पद्मस्था पद्मा सती । त्याहूनि विशेष तुजवरी प्रीति । तुज एकांतीं न विसंबे ॥६७॥ तूतें प्रियतम श्रीअच्युत । अळिकुळमाळाअभिवेष्टित ।

पाठभेदः — * मानसा ( मुं. ).

१ नऊ श्लोकांनीं. २ दूरची वस्तु पाहणारे. ३ उदार हृदयाच्या लोकांचीं. ४ कृष्णाचा मार्ग. ५ गुच्छ. ६ सुवर्णसदृश.

पावन सुरभि गंधासक्त । धरितो अभिरत होत्साता ॥ ६८ ॥ त्या कृष्णाची सांगें शुद्धि[1] । आम्हुची हरूनि मानसबुद्धि । देखिला असे* काननसंधीं । तरी दावीं त्रिशुद्धी तो आम्हां ॥ ६९ ॥

मालत्यदर्शि वः कच्चिन्मल्लिके जाति यूथिके । प्रीतिं वो जनयन्यातः करस्पर्शेन माधवः ॥ ८ ॥

नम्रा गुणाढ्या ज्या युवति । नंदनंदन त्यां वशवर्ती । गुणसंपन्ना मालती जाति । देखोनि पुसती गोपिका ॥ ७० ॥ गुणसंपन्ना सुगंधगुणी । नम्रा तनुलाघवें करूनी । यालागीं यांहीं चक्रपाणि । असेल नयनीं देखिला ॥ ७१ ॥ मालती जाती नामीं दोहीं । वल्ली गुल्म भेद पाहीं । भाषा नामें बोलिजे जाई । त्यांसि लवलाहीं हरि पुसती ॥ ७२ ॥ मल्लिका आणि जे यूथिका । आबई जुई नामात्मका । त्यांतें पुसती व्रजनायका । असे ठावुका तरी सांगा ॥ ७३ ॥ तुम्हां स्पर्शोनि शंतमें करीं । प्रीति प्रकटोनि अंतरीं । जातां देखिला असेल हरि । तरी झडकरी सांगा हो ॥ ७४ ॥ दीन दयाळ फळाढ्य तरु । सर्वप्राणितर्पणपर[3] । ज्यांचा सर्वांवरी उपकार । म्हणोनि श्रीधर यां विदित ॥ ७५ ॥

चूतप्रियालपनसासनकोविदारजंब्वर्कबिल्वबकुलाम्रकदंबनीपाः ।
येऽन्ये परार्थभवका यमुनोपकूलाः शंसंतु कृष्णपदवीं रहितात्मनां नः ॥ ९ ॥

चूत आम्र दोन्ही जाति । काळवैशिष्ट्यें बोलिजती । एक हेमंतीं मुहुरती । आम्र शिशिरीं सर्वत्र ॥ ७६ ॥ चूताम्राचे जातिभेद । तैसेचि कदंब नीप विशद । लंब वर्तुळ पर्णी बोध । रक्त-श्वेतप्रभेदीं ॥ ७७ ॥ अहो आम्र अहो चूत । अहो कदंब नीप समस्त । अहो बकुल पारियात । अहो श्लेष्मांत[4] कोविदार[5] ॥ ७८ ॥ जंबु बिल्वादि आमलकी । चारी बोरी भल्लातकी[6] । ताल तमाल केतकी । हरीतकी[7] खर्जूरी ॥ ७९ ॥ करंज कुटज अर्सन[8] पनस । तिंतिणी गोस्तनी[9] पलाश[10] । पिचु-मंदादि[11] चंदनास । पुसती परेश व्रजललना ॥ ८० ॥ कारी कर्वंदी कमठी । अंजन धामोडे धायटी । शाल्मली[12] आरग्वध[13] मर्कटी[14] । राजादनीं[15] पुसताती ॥ ८१ ॥ जितुके यमुनेसमीप द्रुम । जैसे दयाळ मुनिसत्तम । परोपकारार्थ ज्यांचे जन्म । वर्णाश्रम तीर्थाश्रित ॥ ८२ ॥ पत्रें पुष्पें फळें मूळें । काष्ठ त्वचा अग्र कोवळे । न वंचिती कोण्हा काळें । छाये शीतळे निववीती ॥ ८३ ॥ वृष्टि आतप वात शीत । सर्व साहती जेंवि व्रतस्थ । ऐसे जे परोपकारार्थ । जन्म धरूनि राहिले ॥ ८४ ॥ परदुःख हरूनि सुखी करिती । म्हणोनि गोपिका त्यांतें पुसती । विरहतप्ता आम्ही युवति । कोण्ही श्रीपती सांगों कां ॥ ८५ ॥ कृष्णें मानस हिरोनि नेलें । हृदयशून्य आम्हांसि केलें । कोण्ही असेल त्या देखिलें ।

पाठभेद :—* असेल ( मुं. )

१ शोध. २ अत्यंत कल्याणकारक. ३ सर्व प्राण्यांस तृप्त करण्याविषयीं दक्ष. ४ भोंकरीचें झाड. ५ कांचनाचें झाड. ६ बिबवा. ७ हिरडा. ८ आसणाचें झाड. ९ द्राक्षी. १० पळस. ११ निंब. १२ सांवरी. १३ बाव्ह्याचें झाड. १४ मोठा करंज. १५ रांजणीचें झाड.

तरी संवेग कथिलें पाहिजे ॥ ८६ ॥ दुःख हिरोनि सुखी करणें। कैवल्य साधे या साधनें। यालागिं कृष्णपदवीकथनें। आमुचे† प्राणे न वचतां ॥ ८७ ॥ कृष्ण गेला कोणे वाटे। सूचिजे चालवूनि¶ सूक्ष्म फांटे। तुम्ही सदय स्नेहाळ मोठे। तरी सांगा कोठें हरि गेला ॥ ८८ ॥ ऐशी द्रुमांतें करूनि ग्लानि। पुढें चालिल्या विरहिणी। तृणीं टवटवीत देखोनि धरणी। तयेलागूनि प्रशंसिती ॥ ८९ ॥

किं ते कृतं क्षिति तपो बत केशवांघ्रिस्पर्शोत्सवोत्पुलकितांगरुहैर्विभासि।
अप्यंघ्रिसंभव उरुक्रमविक्रमाद्वा आहो वराहवपुषः परिरम्भणेन ॥ १० ॥

अवो धरित्री सांगें गुज। कोण तपश्चर्या घडली तुज। जेणें कृष्णाचे पदरज। तुजला सहज लाभले ॥ ९० ॥ तेणें केशवांघ्रिस्पर्शें। तूं मिरवसी हर्षोत्कर्षें। रोमांचिता तृणविशेषें। परमोल्हासें मंडित ॥ ९१ ॥ उत्कट तपांचें ऐसें फळ। श्रीकृष्णाचें चरणकमळ। स्पर्शोत्साहें आनंद-बहळ। तूं निर्मळ भाससी ॥ ९२ ॥ अहो हा उत्साह येचि काळीं। वृंदावनीं श्रीवनमाळी। क्रीडतां स्पर्शोनि श्रीचरणकमळीं। तुज वेल्हाळी जोडला ॥ ९३ ॥ तूं विस्तीर्ण वसुंधरा। वृंदावनादि वन-संचारा। क्रीडतां एकदेशी या श्रीधरा। पदाधिकारा लाधलीसी ॥ ९४ ॥ तया पुण्याचें हें फळ। भोगिसी स्पर्शानंदबहळ। किंवा निखिल ब्रह्मांडगोळ। त्रिविक्रमें[1] आक्रमिता ॥ ९५ ॥ तैं साकल्यें सन्निधान। स्पर्शले सर्वांगीं श्रीचरण। तेणें उत्साहयुक्त पूर्ण। प्रेमरोमांच वाहसी ॥ ९६ ॥ अथवा त्याहूनि पूर्वीं सुभगें। आलिंगितां वराहें[2]भोगें। कृपेनें स्पर्शिलीं सर्वांगें। अद्यापि तद्योगें सोत्साह ॥ ९७ ॥ एवं तुझिया तपोराशि। अमोघ अक्षय निश्चयेंशीं। प्रत्यवतारीं हरिचरणांसी। तूं भोगिसी सौभाग्यें ॥ ९८ ॥ आम्ही अल्पका मंदभाग्या। चरणस्पर्शासि अयोग्या। सप्रेम श्रीकृष्णासी भोग्या। मां कैसेनि अभाग्या हों शकों ॥ ९९ ॥ म्हणोनि सुभगे धरादेवी। सांगोनि श्रीकृष्णाची पदवी[3]। निजात्मवल्लभ हरि भेटवीं। स्वसुखीं निववीं संतप्ता ॥ १०० ॥ परोपकारा-एवढें पुण्य। त्रिजगीं दुसरें नाहीं जाण। म्हणोनि श्रीकृष्णाचे चरण। दावूनि उपकार तूं घेईं ॥१॥ ऐशा पुसोनि धरणीप्रति। वनीं विरहिणी हरि शोधिती। तंव हरिणींची देखोनि पंक्ति। त्यांतें पुसती तें ऐका ॥ २ ॥

अप्येणपत्न्युपगतः प्रिययेह गात्रैस्तन्वन्दृशां सखि सुनिर्वृतिमच्युतो वः।
कांतांगसंगकुचकुंकुमरंजितायाः कुंदस्रजः कुलपतेरिह वाति गंधः ॥ ११ ॥

अहो ऐका कुरंगिणी। तुम्ही सभाग्या कुरंगपत्नी[4]। तुम्हांसमीप सहकामिनी। कृष्ण येऊनि गेला कीं ॥ ३ ॥ तुम्हांसि जालें हरिदर्शन। आम्हीं वोळखिलें तुमचें चिह्न। जें पूर्णानंदनिर्भर मन। दिसती नयन संतुष्ट ॥ ४ ॥ तें हरिदर्शन म्हणाल कैसें। सुंदरीच्या रतिविलासें। ज्याचें

पाठभेद :— † आमुतें ( उ. ). ¶ चाळउनि ( उ. ).

१ वामनानें. २ वराहावताराच्या शरीरानें. ३ मार्ग. ४ हरिणस्त्रिया.

सर्वांग चिह्नित दिसे । शोभाविशेषमंडित ॥ १०५ ॥ श्यामतमाललावण्यरसिक । आजानुबाहु मुख शशांक । हृदयीं वधूकुचकुंकुमांक । कज्जलांक गंडयुगीं ॥ ६ ॥ विरंगें अधर वधूनिपीत । परिवेष्टित कटिपट पीत । मदनमोहन मंदस्मित । ललनाभुक्त शुभेंस्रग्वी ॥ ७ ॥ ज्याचे कंठींचे कुंदमाळे । कांताअंगसंगाचे वेळे । मिळतां उभय वक्षःस्थळें । कुंकुम लागलें कुचांचें ॥ ८ ॥ तेणें रंगली लोहीतें वर्णे । सकेशराशी* सुगंध पूर्ण । घ्राणा होतसे अवघ्राण । कीं समीप कृष्ण गमतसे ॥ ९ ॥ शास्त्र-वक्ता सर्वज्ञ मूर्ति । नामें बोलिजे तो कुळपति । कामशास्त्राचे व्युत्पत्ति । गोपी म्हणती कृष्णातें ॥११०॥ एवं कृष्णाचिये गळां । कुचकुंकुमाक्त कुंदमाळा । भावूनि तयेचिया परिमळा । पुसती अबळा हरिणींतें ॥ ११ ॥ कुरंगिणी† हो तुमच्या नेत्रां । मदनमोहना स्वकीयगात्रा । दावूनि केलें आनंदपात्रा । तुमची तनुयात्रा धन्यतम ॥ १२ ॥ कुरंगनयना कुरंगींप्रति । ऐशा पुसोनि पुढें जाती । फळल्या‡ फळपुष्पीं द्रुमयाति । वितर्क करिती त्यां पाहतां ॥ १३ ॥

बाहुं प्रियांस उपधाय गृहीतपद्मो रामानुजस्तुलसिकालिकुलैर्मदांधैः ।
अन्वीयमान इह वस्तरवः प्रणामं किं वाऽभिनंदति चरन्प्रणयावलोकैः ॥ १२ ॥

सफळ तरु हो सभाग्य तुम्ही । वनीं देखोनि आमुचा स्वामी । विनीत त्याचिये पादपद्मीं । अर्चाधर्मी‖ अनुसरला ॥ १४ ॥ श्रेष्ठ आलिया सदनाप्रति । गृहस्थ पूजिती यथासंपत्ति । कीं उपायनें घेऊनि हातीं । नृपा वंदिती जेंवि प्रजा ॥ ११५ ॥ तेंवि आपुलया पुष्पीं फळीं । समीप येतांचि श्रीवनमाळी । पूजा अर्पिली चरणकमळीं । सुकृतबहळीं सज्जन हो ॥ १६ ॥ तो बळ-रामाचा धाकुटा बंधु । मदनमोहन लावण्यसिंधु । रतिरहस्यें लावूनि वेधू । गेला व्रजवधू वधूनियां ॥ १७ ॥ वधिल्या बरवें एक्या घायीं । आम्हां न वधूनि वधिलें पाहीं । प्राण असतांही विह्वळ देहीं । हरिली सर्वही मनबुद्धि ॥ १८ ॥ बाहु ठेवूनि वनितास्कंधीं । पद्मधारक कौशल्यो-दधि । मधुप वेधले तुळसीगंधीं । तिहीं मदांधीं अनुयायी ॥ १९ ॥ सुगंधतुळसीमाळा गळां । गंधासक्त भ्रमरमेळा । तयां मदांधां आलिउळां । समान काळा अनुयायी ॥ १२० ॥ तुळसीगंधा-सक्त भ्रमर । जैसे मदांध विवशतर । कामिनीकंठीं घालूनि कर । उभय परतंत्र अनुगामी ॥२१॥ मधुपां अनुलक्ष्यें मधुपति । उभयतां समानशील पथीं । येतां देखोनि विनयभक्ति । तुम्ही श्रीपति पूजिला ॥ २२ ॥ पुष्पफळोत्करेंशीं मौळी । तुम्ही ठेवितां चरणकमळीं । कृष्णकृपेच्या न्याहाळीं । सुखसुकाळीं डुल्लतसां ॥ २३ ॥ ऐसा वनितास्कंधासक्त । पद्मधारक श्रीअच्युत । द्रुम हो सांगा कोठें स्थित । देह संतप्त त्यासाठीं ॥ २४ ॥ ऐशा प्रार्थूनि वृक्षांप्रति । कृष्णपदवी अनुलक्षिती । तंव लतावेष्टित वनस्पति । देखोनि बोलती तें ऐका ॥ १२५ ॥

---

**पाठभेद :—** * सकेशरा ( उ. ). † कुरंगी ( उ. ). ‡ लवल्या ( मुं. व उ. ). ‖ अचर्नधर्मी ( उ. )

१ फिकट. २ सुंदर माळा धारण करणारा. ३ तांबडा. ४ कल्पून. ५ आयुष्य, जीवन-यापन. ६ नजराणे. ७ चातुर्याचा समुद्र. ८ अतिशय पराधीन. ९ अनुयायी. १० कृष्णाचा मार्ग. ११ वृक्ष.

पृच्छतेमा लता बाहूनप्यालिष्टा वनस्पतेः । नूनं तत्करजस्पृष्टा बिभ्रत्युत्पुलकान्यहो ॥ १३ ॥

तंव कोणी एका बल्लवी म्हणती । ऐका सखिया हो समस्ती । सम्मुख लता ज्या या दिसती । श्रीकृष्णसंगति यां घडली ॥ २६ ॥ बहुतेक कृष्ण स्पर्शला यांसी । म्हणोनि सानंदा मानसीं । यास्तव कृष्ण यांजपाशीं । निश्चयेंशीं हुडकावा ॥ २७ ॥ आम्ही दुर्भगा¹ विरहाकुळा । लता सौभाग्यसुकृतबहळा² । कांतसंगतिसुखसोहळा । प्रेमें गोपाळा भोगिती ॥ २८ ॥ पति सन्निध असतां आम्हां । पाहणें दुर्घट मेघश्यामा । द्रुमालिंगनीं लतांचा प्रेमा । हरिसंगमा अनुकूल ॥ २९ ॥ पाति लतांचे तरुवर । त्यांचे बाहु शाखाभार । त्यांसि वेष्टूनि लतांकुर । प्रेमें श्रीधर कवळिती ॥ १३० ॥ कृष्णा क्षेमें³ देती लता । तेणें डोलती उभयता । क्षोभ नुपजे पतींच्या चित्ता । सभाग्यता हे यांची ॥ ३१ ॥ म्हणाल कृष्ण यां भेटला । केंवि तुम्हांसि जाणूं आला । जिहीं चिन्हीं वोळखिला । त्या चिह्नांला परियेसा ॥ ३२ ॥ कृष्णनखें आमुचे कुच । स्पर्शतां जेंवि येती रोमांच । तेंवि उत्पुलकिता⁴† लतां सत्वच⁵ । दिसती साच सानुरागा ॥ ३३ ॥ आपुलाल्या पति-सन्निधि । दुर्लभ क्रीडतां हे सुखवृद्धि । यालागिं श्रीकृष्ण अमृतोदधि । यांहीं त्रिशुद्धि भोगिला ॥ ३४ ॥ अहो ऐसा करूनि खेद । म्हणती केवढें भाग्य मंद । कृष्णीं रमतां न वंटे मोद । द्रुमांसमान पशुपांसी⁶ ॥ १३५ ॥ शुक म्हणे गा परीक्षिति । कथिली गोपींची उन्मत्तवृत्ति । आतां वस्तुसामर्थ्यशक्ति । तनुविस्मृति तादात्म्यें ॥ ३६ ॥ आंगींची विसरल्या कामिनीपणें । कृष्ण-स्मृतीचें लेइल्या लेणें । कृष्णाविर्भावें⁷ बोलणें । कृष्णाचरणें अवधारा ॥ ३७ ॥

इत्युन्मत्तवचो गोप्यः कृष्णान्वेषणकातराः । लीलाभगवतस्तास्ता ह्यनुचक्रुस्तदात्मिकाः ॥ १४ ॥

कृष्णान्वेषणाचे⁸ चाडे । सप्रेमवेधें मानस वेडें । होऊनि उन्मत्तापडिपाडें⁹ । पुसती पुढें भेटलिया ॥ ३८ ॥ वृक्षवल्ली लता द्रुमा । पुष्पपादपा¹⁰ गुल्मा¹¹ रामा¹² । मृगमानिनी वल्लरीयुग्मा । मेघश्यामा त्या पुसती ॥ ३९ ॥ एवं उन्मत्ताचिये परी । स्थिरजंगमां पुसतां हरि । तादात्म्य-वेधाचिये भरीं । कृष्णानुकारीं बरळती ॥ १४० ॥ जन्मादारभ्य ज्या ज्या लीला । कृष्ण होऊनि त्या त्या सकळा । स्वयें अनुकरती वेल्हाळा । त्या तूं नृपाळा अवधारीं ॥ ४१ ॥ चौं श्लोकीं तें अनुकरण । कीजेल शुकोक्तिविवरण । पुढें चौं श्लोकीं व्याख्यान । कथिजेल पूर्ण तन्मयता ॥ ४२ ॥ पुढती अनुकारचेष्टाकथन । एका श्लोकें अनुकरून । पुढें भूमीं उमटले चरण । बरळती लक्षून व्रजललना ॥ ४३ ॥

कस्याश्चित्पूतनायंत्याः कृष्णायंत्यपिबत्स्तनम् । तोकायित्वा रुदत्यन्या पदाऽहन् शकटीयताम् ॥ १५ ॥

**पाठभेद :—** † उत्फुल्लिता ( मुं. ).

१ दुर्दैवी. २ विशेष पुण्यशील. ३ आलिंगन. ४ रोमांचित. ५ त्वचायुक्त. ६ गोपांना. ७ शरीरांत होणारा कृष्णसंचार. ८ कृष्णाचा शोध. ९ उन्मत्तसदृश. १० पुष्पवृक्ष. ११ झुडपें. १२ सुंदरी.

असो त्यांमाजि अनुकार आतां । प्रथम परिसें धरित्रीकांता । पूतनारूपें बल्लववनिता । कोण्ही एकी अवगल्या ॥ ४४ ॥ कृष्णरूपें अवगल्या एकी । मौनें निद्रिता* मंचकीं । पूतनारूपिणी येऊनि तवकीं । उचलूनि चूचुकीं लाविती ॥ १४५ ॥ प्राणासगट प्याला स्तन । म्हणूनि अनुकरती क्रंदून । पसरूनिया करपदवदन । गतप्राण म्हणविती ॥ ४६ ॥ एकी बाळकरूपें रुद्‌ना । करूनि झाडिती कोमळ चरणां । एकी शकटाकार पतना । तन्निघातें पावती ॥ ४७ ॥

दैत्यायित्वा जहारान्यामेका कृष्णार्भभावनाम् । रिंगयामास काप्यंघ्री कर्षती घोषनिःस्वनैः ॥ १६ ॥

एकी गोपी नंदकुमर–। रूपें होती क्रीडापर । एकी चक्रवाताकार । गगनीं सत्वर उडविती ॥ ४८ ॥ गुरुतर सलंब कंठीं कृष्ण । होऊनि उत्पतनीं असहिष्णु । तेणें होऊनि गतप्राण । अधःपतन अनुकरती ॥ ४९ ॥ एकी कृष्णत्वें बाळभावें । रिंगणाकार घेती धांवे । चपळ जानुघर्षणा सवें । रशनीं नुपूरें गर्जती ॥ १५० ॥ घंटा किंकिणी वांकी वाळे । गर्जतां छंदें चपळ चौताळे । ऐसे कृष्णाचे बाळलीले । प्रज्ञाबळें अनुकरती ॥ ५१ ॥ चपळ पळतां जानुघर्षणीं । एकी सवेग कटिकर्षणीं । वोढूनि घेती आकर्षूनी । जाती पळोनि चपळांगी ॥ ५२ ॥

कृष्णरामायिते द्वे तु गोपायंत्यश्च काश्चन । वत्सायतीं हंति चान्या तत्रैका तु बकायतीम् ॥ १७ ॥

एकी कृष्णाचे अनुकार । दावूनि म्हणवी नंदकिशोर । एकी म्हणवी रोहिणीकुमर । रामानुकार दावूनी ॥ ५३ ॥ कित्तेकी जालिया सवंगडे । भोंवतें कृष्णा मागें पुढें । एकी वत्सासुराचेनि पाडें । कैतवक्रीडे अनुकरती ॥ ५४ ॥ वत्सासुराचा केला वध । तैसे अनुकार दाविती विशद । एकी बकाकार प्रसिद्ध । तैशाच तद्वध अनुकरती ॥ १५५ ॥

आहूय दूरगा यद्वत्कृष्णस्तमनुकुर्वतीम् । वेणुं क्वणंतीं क्रीडंतीमन्याः शंसंति साध्विति ॥ १८ ॥

धेनुरूपें दूरतरा । एकी अवगती व्रजसुंदरा । एकी वाहोनि वेणुस्वरा । घालिती कुकारा§ कृष्णत्वें ॥ ५६ ॥ कृष्णवेणूचिया क्वणिता । दूरस्थ धेनु तृणासक्ता । ऐकोनि धांवती जेंवि त्वरिता । तद्वत वनिता अनुकरती ॥ ५७ ॥ सप्तस्वरांचिया भंगी । वेणुक्वणितें विविधा रंगीं । दाविती कृष्णाचिया मार्गीं† । अन्या चांगीं प्रशंसिती ॥ ५८ ॥ तालबद्ध मानउत्तरें । तेथ सुष्ठुत्व आविष्कारें । धन्य भला‡ या उत्तरें । चमत्कारें शंसिती ॥ ५९ ॥

कस्यांचित्स्वभुजं न्यस्य चलंत्याहापरानु । कृष्णोऽहं पश्यत गतिं ललितामिति तन्मनाः ॥ १९ ॥

---

**पाठभेद :—** *निद्रिस्ता ( उ. ). § कुकुरा ( उ. ). † मागिं ( उ. ). ‡ लाभ ( उ. ). ओवी क्र. ५६ मुंगी-प्रतींत नाहीं.
१ भासल्या. २ आवेशानें. ३ उडण्यास. ४ असमर्थ. ५ मंडलाकार. ६ कमरपट्टा. ७ धागऱ्या. ८ कपटाचा खेळ.

भूषामंडित बाहु खांदा । ठेवूनि एकीच्या एक प्रमदा । कृष्णाववोधें वदती शब्दा । विन्यास-भेदा दावुनी ॥ १६० ॥ पहा गे व्रजींच्या समस्त युवति । स्वयें कृष्ण मी माझी गति । न येचि मयूरां हंसांप्रति । लाजोनि ठाती गजगमना ॥ ६१ ॥ म्हणोनि डोलविती सुंदर आंगें । ललित पाउलें ठेविती चांगें । अमंद ना मंद वेगें । गमनें सुभगें शोभविती ॥ ६२ ॥ जेंवि शिल्पिकाचिये मती–। माजि अवतरे अव्यक्त मूर्ति । तो जेंवि आणूनि दावी व्यक्ति । नाना आकृति लेख्यादि[1] ॥६३॥ नाना अध्वर्यूंची प्रज्ञा । तादात्म्ययोगें कवळीं यज्ञा । किंवा सांख्य समष्टिभाना । व्यतिरेकान्वय-पूर्वक ॥ ६४ ॥ कीं ध्याननिष्ठांचें मानस । क्षीराब्धि श्वेतद्वीप अशेष । गुणोपकरणें भूषा वेष । पावे अभ्यासतादात्म्यें ॥ १६५ ॥ तैशा तन्मना व्रजांगना । कृष्ण होऊनि ललितगमना । चालोनि दाविती तें तव मना । कुरुभूषणा कळलें कीं ॥ ६६ ॥

मा भैष्ट वातवर्षाभ्यां तत्त्राणं विहितं मया । इत्युक्त्वैकेन हस्तेन यतंत्युन्निदधेंऽबरम् ॥ २० ॥

तंव एकी म्हणे बल्लववनिता । भेऊं नका हो वृष्टिवाता । मी तयाच्या निवारणार्था । आलों तत्त्वता गिरिधर ॥ ६७ ॥ निर्भय स्थान म्यां निर्मिलें । ते तुम्हीं पाहिजे आश्रयिलें । ऐसें म्हणोनि उचालिलें । पाठी*वस्त्र गिरिभावें ॥ ६८ ॥ यत्नपूर्वक सत्वर । दावूनि गोवर्द्धनानुकार । लावूनियां एक कर । उत्तरीयांबर उचालिलें ॥ ६९ ॥

आरुह्यैका पदाक्रम्य शिरस्याहापरां नृप । दुष्ट हे गच्छ जातोऽहं खलानां ननु दंडधृक् ॥ २१ ॥

तंव कालियमथनानुकारा । दावूनि बोले एकी दारा† । एक्या पायें दडपूनि शिरा । करें पुंसारा[2] धरूनियां ॥ १७० ॥ म्हणे रे दुष्टा कालिय फणी । रमणकद्वीपा‡ जाय येथुनी । जन्मलों मी चक्रपाणि । खळनिग्रहणीं[3] जाणावें ॥ ७१ ॥ ऐशी अपरांगनेप्रति । दावूनि कालियमथनानुकृति । तेथ आणिका गोपींप्रति । जाली वदती पैं एकी ॥ ७२ ॥

तत्रैकोवाच हे गोपा दावाग्निं पश्यतोल्बणम् । चक्षुंष्याश्वपिदध्वं वो विधास्ये क्षेममंजसा ॥ २२ ॥

अरे गोप हो हा दावाग्नि । महाउल्बण[4] पेटला वनीं । तुम्हीं माझिये आज्ञेकरूनी । सवेग लोचनें झांकावीं ॥ ७३ ॥ तुमचें करीन मी रक्षण । म्हणोनि अनुकरती दावाग्निपान । तंव एकी दामोदर होऊन । उलूखलबंधन[5] अनुकरे ॥ ७४ ॥

बद्धाऽन्यया स्रजा काचित्तन्वी तत्र उलूखले । भीता सुदृक्पिधायास्यं भेजे भीतिविडंबनम् ॥ २३ ॥

---

**पाठभेद :—** * शाठी ( उ. ). † सुंदरा ( मुं. ). ‡ रमणद्वीपा ( उ. ).

१ चित्रादि. २ शेंपूट. ३ दुष्टांच्या शासनार्थ. ४ प्रचंड. ५ उखळास बांधणें.

एकी भावूनि दामोदरा। अन्या यशोदा सुंदरा। अवगोनि[1] होय शासनपरा। त्या अनुकारा परियेसा॥ १७५॥ स्वयें प्रवर्ते दधिमंथनीं। येरी कृष्णत्वें लागे स्तनीं। दुग्ध उततां देखोनि नयनीं। धांवे टाकोनि अतृप्त॥ ७६॥ कृष्ण मंथनभाण्डें फोडी। सवेंचि धांवोनि शिंकीं तोडी। यशोदा धरूं धांवे तांतडी। लवडसवडी येरु पळे॥ ७७॥ पुष्पमाळेनें नंददारा। उखळीं बांधी दामोदरा। ऐसिया दाविती अनुकारा। भयविकारा प्रकटिती॥ ७८॥ पळतां यशोदा धरिला हरि। तेणें भयभीत अंतरीं। दोन्ही हात लावूनि वक्त्रीं। पाहे नेत्रीं भयाकुळ॥ ७९॥ म्हणे यशोदा शिंपुटी मारी। यास्तव वामकर आड धरी। ऐसिया भयाच्या अनुकारीं। बल्लवनारी अनुकरती॥ १८०॥

एवं कृष्णं पृच्छमाना वृंदावनलतास्तरून्। व्यचक्षत वनोद्देशे पदानि परमात्मनः॥ २४॥

ऐसिया कृष्णगवेषणीं[2]। फिरत फिरतां वनोपवनीं। पुन्हा पातल्या वृंदावनीं। यदृच्छे[3]करूनि श्रमभरिता॥ ८१॥ वृंदावनींच्या नाना लतिका। जाती मल्लिका मालतिका। कुंद मोगरे सेवंतिका। लवंगवल्लिका शतपत्री[4]॥८२॥ पाठा[5]* त्रायंती[6]। वैकंकती[7]। शंखिनी[8] हिरण्या गरुत्मंती[9]। गजकर्णिका क्षौद्रा यूथी[10]। मधुमालती डिंडिका॥ ८३॥ ऐशा अनेक वल्लीलता। गुल्मप्रमुख जाति बहुता। त्यांसि पुसती मन्मथजनिता। विरहभ्रांता व्रजललना॥ ८४॥ नाग पुन्नाग अर्जुन। चंदन चंपक रातांजन। नीप करंज राजादन। कुंजराशन न्यग्रोधें[11]॥ १८५॥ देवदार कोविदारें[12]। चूत पारियातक मंदारें[13]। पनस पलाश पारिभद्रें[14]। बीजपूरें[15] प्लक्षादि[16]॥ ८६॥ ऐशा अनेक तरुवरलता। पुढें भेटती वनीं फिरतां। त्यांतें पुसती स्मरमोहिता। प्रमुदित वार्ता कृष्णाची॥ ८७॥ भूमीशीं उमटलीं पाउलें। भाग्यें दुर्लभ दर्शन झालें। तेथेंचि त्यांचें मन गुंतलें। तेंही विवरिलें तें ऐका॥ ८८॥ तव आकस्मात वनप्रदेशीं। सोज्वळ भूमि शर्करे ऐशी। तेथें कृष्णाच्या पदांकाशीं। चंद्रप्रकाशीं देखती॥ ८९॥

पदानि व्यक्तमेतानि नंदसूनोर्महात्मनः। लक्ष्यंते हि ध्वजांभोजवज्रांकुशयवादिभिः॥ २५॥

महांत† जे कां ब्रह्मादिक। त्यांहूनि महत्त्वें अधिक। तो महात्मा नंदतोक। त्याचे पदांक हे व्यक्त॥ १९०॥ ध्वजाब्जयवांकुश देखिले। ऊर्ध्व रेखा वज्राथिले। इत्यादि चिह्नीं उपलक्षिले। व्यक्त पाउलें कृष्णाचीं॥ ९१॥ तेचि घेवोनि कृष्णपदवी। गोपी विरहिणी आर्तभावीं। त्यांची जिज्ञासा[17] आघवी। व्यक्त परिसावी चतुरांहीं॥ ९२॥

तैस्तैः पदैस्तत्पदवीमन्विच्छंत्योऽग्रतोबलाः। वध्वाः पदैः सुपृक्तानि विलोक्यार्ताः समब्रुवन्॥ २६॥

---

**पाठभेद :—** * पाग (उ.) † महात्मे (मुं.)

१ जाणून. २ कृष्णाच्या शोधांत. ३ स्वेच्छेने. ४ कमळवल्ली. ५ पहाडमूळ. ६, ७, ८, ९ वनस्पतिविशेष. १० जुईचें झाड. ११ पिंपळ. १२ कांचन. १३ पारंग्याचें झाड. १४ निंब. १५ महाळुंग. १६ अश्वत्थ. १७ जाणण्याची इच्छा.

ऐशीं कृष्णपदें विविक्तें। ध्वजांकुशादिसुचिह्नितें। तिहीं करूनि तत्पदवीतें। गिंवसीत चालती पुढें पुढें ॥ ९३ ॥ तंव अकस्मात कृष्णपदां-। माजि वधूचीं पाउलें प्रमदा। देखूनि झालिया मन्मथ-क्षुब्धा। करिती अनुवादा ते काळीं ॥ ९४ ॥ कृष्णवियोगें विरहग्रस्ता। सापत्नभावें विशेष आर्ता। होउनि करिती वितर्कवार्ता। श्रवण श्रोतां तें कीजे ॥ १९५ ॥

कस्याः पदानि चैतानि याताया नंदसूनुना। अंसन्यस्तप्रकोष्ठायाः करेणोः करिणा यथा ॥ २७ ॥

कोणे स्त्रियेचीं इयें पाउलें। भूषाचिह्नित दशांगुळें। कृष्णें नेली जातिये वेळे। कीं जिचें आगळें वालभ ॥ ९६ ॥ श्रीकृष्णाचे स्कंधदेशीं। स्थापूनि बाहुप्रकोष्ठासी। हस्तिनी जैसी मदगजासी। स्कंधीं शुंडा स्थापूनी* ॥ ९७ ॥ अंसन्यस्तबाहु तैशी। श्रीकृष्णाच्या पदविन्यासीं। मिश्रपावलीं चाले सरिशी। गति‡ गमकेशी† गजगमना ॥ ९८ ॥ आम्ही केतकीकंटकपत्रा। समान झालों क्लेशपात्रा। कृष्णभ्रमरें भोगिलें गात्रा। पुष्पमात्रासम तीच्या ॥ ९९ ॥ तस्मात् तीच्या सुकृतराशि। समता न करवे निर्जरांशीं। म्हणूनि प्रियतम श्रीधराशीं। कीं त्यासरिसी विहरतसे ॥ २०० ॥

अनयाऽराधितो नूनं भगवान्हरिरीश्वरः। यन्नो विहाय गोविंदः प्रीतो यामनयद्रहः ॥ २८ ॥

राधा म्हणिजे हे त्रिशुद्धि। कृष्णाराधनाची संसिद्धि। मूर्तिमंत हे यथाविधि। भोगी गुण-निधि हरिप्रेमें ॥ १ ॥ राध साध हे दोन्ही धातु। संसिद्धी विषयीं व्याकरणप्रणीत। राधो ऐसा प्रवर्तत। हिंसाविषयीं धात्वर्थ ॥ २ ॥ तस्मात्संसिद्धिरूपराधा। भगवत्प्रेमाकार जे मुग्धा। यास्तव बाहु ठेवूनि खांदा। श्रीगोविंदासवें विचरे ॥ ३ ॥ परम निश्चयेंशीं इणें। संतोष केला हरिकारणें। करूनि तीव्र अनुष्ठानें। व्रताचरणें तपश्चर्या ॥ ४ ॥ जो कां ईश्वराचा ईश्वर। पूर्णब्रह्म सर्वेश्वर। आराधिला तो मुरलीधर। भजनीं तत्पर होउनि ॥ २०५ ॥ यास्तव सांडूनि अवघ्या जणी। आम्ही अतप्तस्का विरहिणी। इशींच नेतो चक्रपाणि। एकांत स्थानीं प्रियभावें ॥ ६ ॥

धन्या अहो अमी आल्यो गोविंदांघ्र्यब्जरेणवः। यान्ब्रह्मेशो रमा देवी दधुर्मूर्ध्न्यघनुत्तये ॥ २९ ॥

ऐका सख्या हो एकी म्हणती। परमाश्चर्य मानूनि चित्तीं। कृष्णांघ्रिकमळस्पर्शें माती। धन्य त्रिजगतीं आम्हांहूनि ॥ ७ ॥ गोविंदपदाब्जरेणु धन्य। कमला कमळोद्भव ईशान। कृष्णप्राप्ति अभि-वांछून। ज्यातें धरिती निजमौळीं ॥ ८ ॥ रजतमादि अघनिवृत्ति। न होतां दुर्लभ भगवत्प्राप्ति। यालागीं हरिपदकमळींची माती। मुकुटीं धरिती अघशमना ॥ ९ ॥ धन्य हे गोविंदपदाब्जरेणु।

पाठभेद :— * वाहुनि ( मुं. ). ‡ मती ( उ. ). † गमनेशीं ( मुं. ).

१ स्पष्ट. २ शोधीत. ३ कोपराच्या खालचा भाग. ४ खांद्यावर जिने हात टेविला ती. ५ गमक म्हणजे दृष्टांत होण्यासारखी. ६ तपस्या केली नाहीं ज्यांनीं त्या. ७ ब्रह्मदेव. ८ पापनिवारण.

ज्यातें रमादि ब्रह्मेशानु । अघनाशनार्थ मुकुटीं धरून । आनंदती हृत्कमळीं ॥ २१० ॥ चरणसेवनाचेनि मिसें । रमेसि लाभलें भाग्यविशेषें । त्रिभुवन मोजितां पदविन्यासें । दैवें विखनेसें पूजिलें* ॥ ११ ॥ तेचि गोविंदपादोद्भवा । त्रिजगत्पावनीं अगाधविभवा । स्वयंभ मुकुटीं धरितां भैवा† । पदरज‡ ठेवा लाधला ॥ १२ ॥ विधिहरकमले अलभ्यप्राप्ति । तेथ इतरांचा केवीं किती । अहो आश्चर्य दैवगति । आम्हां संप्राप्ति हरिपद तें ॥ १३ ॥ अनेक सुकृतें वैकुंठ । न टके करितां तपादि कष्ट । भाग्यें जोडल्या गरुडपृष्ठ । मग होय प्रविष्ट अक्लेशें ॥ १४ ॥ तेंवि हे श्रीकृष्णपदाब्जरेणु । आम्हां जोडलें भाग्येंकरून । यांच्या अभिषेकें जनार्दन । विधिहरां समान पावों गे ॥ २१५ ॥ हरिप्राप्तीचें द्वार मुख्य । हरिपदधूळीचा अभिषेक । येणें श्रीकृष्णाचें ऐक्य । घडतां अशक्य न मनावें ॥ १६ ॥ ऐसा ऐकोनि निर्धार । पदाब्जरेणुवंदनपर । होतां आणिकी गोपी क्रूर । वदल्या उत्तर तें ऐका ॥ १७ ॥

तस्या अमूनि नः क्षोभं कुर्वंत्युच्चैः पदानि यत् । यैकापहृत्य गोपीनां रहो भुंक्तेऽच्युताधरम् ॥ ३० ॥

कृष्णपदाब्जधूळि मौळीं । वंदिती विरंचिरमांशूळी । आम्हांसि सुलभ ते ये काळीं । म्हणोनि भूतळीं न्याहाळिती ॥ १८ ॥ तंव ते लागिं नीचीं इयें पदें । कृष्णपदाब्जामाजि विशदें । पाहतां आमुचें हृदय खेदें । विरहविषादें झडपिलें ॥ १९ ॥ पाहतां श्रीकृष्णपदाब्जरेणु । तंव त्यांमाजि मिश्रित तीचे चरण । देखतां क्षोभाचें कारण । काय म्हणोन तें ऐका ॥ २२० ॥ आम्हां समस्तां गोपिकांचा । जीवनकंद जो कां साचा । तो अधरोष्ठ अच्युताचा । एकली एकांतीं ते प्राशी ॥२१॥ समस्त गोपींचें जीवन । श्रीकृष्णाचें अधरपान । एकली एकांतीं नेऊन । भोगी संपूर्ण स्वच्छंदें ॥ २२ ॥ कृष्णांघ्रिमाजि तिचीं पदें । आमुचे दृष्टी पडतां विशदें । चित्तें क्षोभविती विरहविषादें । दुःख नुसधें वाढविती ॥ २३ ॥ कृष्णचरणकमळींचे रेणु । वंदिती रमा विरंचि ईशान । आम्हां आनंद तो न फवोन । दुःख दारुण सापत्न्यें ॥ २४ ॥ यालागीं तिचीं पदें नसतीं । ऐसिया कृष्णपदाची प्राप्ति । लाहों तैं वंदों माती । सुखविश्रांतिकारणें ॥ २२५ ॥ ऐसा सापत्न्यवितर्क । करूनि अमिश्र हरिपदांक । हुडकिती तो भावार्थ अचुक । वदला शुक तीं श्लोकीं ॥ २६ ॥

न लक्ष्यंते पदान्यत्र तस्या नूनं तृणांकुरैः । खिद्यत्सुजातांघ्रितलामुन्निन्ये प्रेयसीं प्रियः ॥ ३१ ॥

ऐशीं कृष्णपदें केवळ । गोपी हुडकिती विरहाकुळ । तंव ध्वजांकुशादि वज्रमेळ । चिह्नित कोमळ हरिचरण ॥ २७ ॥ प्रमदाचरणचिह्नारहित । श्रीकृष्णाचीं पदें व्यक्त । देखोनि गोपी हृदयाआंत । वितर्क करिती तें ऐका ॥ २८ ॥ अहो या कृष्णाचीं पाउलें । ध्वजांकुशीं उपलक्षिलें ।

पाठभेद :— * मोजिते. † भावा. ‡ अगाध.

१ ब्रह्मदेवानें. २ भागीरथी. ३ शंकराला. ४ पाड. ५ कृष्ण. ६ ब्रह्मदेव, लक्ष्मी व शंकर. ७ लहान. ८ न सांपडून. ९ पाहिलीं. ( अनेकवचनाबद्दल एकवचन हें कवीचें निरंकुशत्व. )

प्रमदापदारहित भलें । भाग्यें जोडलें वंदूं या ॥ २९ ॥ तंव एकी म्हणती ते काय झाली । जे कृष्णाचा अधर प्याली । वनीं असती जरी टाकिली* । तरी आम्हां भेटली न वचती ॥ २३० ॥ तीचीं सुकुमार चरणकमळें । तृणांकुरीं सखेदबहळें । जाणोनि कारुण्यें गोपाळें । स्कंधदेशीं ते धरिली ॥ ३१ ॥ म्हणे तिचिया चरणारविंदा । तीक्ष्ण तृणांकुर करिती भेदा । म्हणोनि खांदा वाहिली प्रमदा । परम मुकुंदा प्रियतम जे ॥ ३२ ॥ ऐसा ललनेचा लंपट । करूनि सर्वांसि दृष्टि-कपट । जिणें भुलविला पीतापट । पाडूनि विपटें आम्हांशीं ॥ ३३ ॥ कडे खांदा वाहे मुग्धा । तेचि प्रियतम गोविंदा । वृथा अवघ्या आम्ही प्रमदा । विरहखेदा वरपडलों ॥ ३४ ॥

इमान्यधिकमग्नानि पदानि वहतो वधूम् । गोप्यः पश्यत कृष्णस्य भाराक्रांतस्य कामिनः ॥ ३२ ॥

एक म्हणती खरें गे खरें । पदें कृष्णाचीं परम सुभरें[3] । खांदां वाहिली तिचेनि भारें । भूमी निष्ठुरें रुतलीं गे ॥ २३५ ॥ कामासक्त पहा गे हरि । कडे घेऊनि प्रियसुंदरी । चाले त्याच्या पाउलांवरी । आम्हीं निर्धारीं तर्किलें ॥ ३६ ॥

अत्रावरोपिता काता पुष्पहेतोर्महात्मना । अत्र प्रसूनावचयः प्रियार्थे प्रेयसा कृतः ।
प्रपदाक्रमणे एते पश्यताऽसकले पदे ॥ ३३ ॥

तंव एकी म्हणती पहा गे येथें । देखोनि सुपुष्पिता वल्लीतें । पुष्पासाठीं वल्लभेतें । भूमीवरतें उतरिलें ॥ ३७ ॥ आत्मा म्हणिजे ज्याचा काय । विराट्रूपी[4] ब्रह्मांडमय । ऐसे ब्रह्मांडसमुच्चय । परमाणुप्राय रोमकूपीं[5] ॥ ३८ ॥ कीं मानवी नाट्यें नंदसूनु । जो गोपाकृति गोमटी तनु । तेही वंदिती ब्रह्मेशानु । आत्मा महान् यास्तव ही ॥ ३९ ॥ अथवा आत्मा म्हणिजे मन । सत्यसंकल्पा अधिष्ठान । प्रकृतिपुरुषां जन्मस्थान । तो श्रीभगवान महात्मा ॥ २४० ॥ प्रणवबीजाचे अंकुर । जेथें विरढोनि उपसंहार । पावन असतांही निर्विकार । तो हा श्रीधरा महात्मा ॥ ४१ ॥ येवढें महत्त्व विसरोनि येणें । कान्तेअधीन कां वो होणें । तिचें मानस संरक्षणें । छंदें वर्तणें तयेच्या ॥ ४२ ॥ लता देखोन बहळपुष्पा । सुमनीं भरावया सुंदर खोपा[6] । झोंबतां वल्लरी कां पादपा । नाहीं त्रपा[7] या आली ॥ ४३ ॥ स्त्रियेचें प्रेम रक्षावया । येथ वेंचिलें कुसुमनिचया[8] । भूमीं प्रपदें[9] रोवूनियां । पुष्पफांदिया वोढिल्या ॥ ४४ ॥ पहा गे येथ चवड्यावरी । टांचा न लवितां धरित्रीवरी । उभा ठाकूनि श्रीमुरारि । झोंबे तरुवरीं सुमनार्थ ॥ २४५ ॥ श्रमूनि प्रसूनें[10] वेंचिलीं । तिहीं प्रियेची वोटी भरिली । आंगीं झाडें वोरबडलीं । तत्प्रेमभुली तें न गणी† ॥ ४६ ॥ कमलकोमलपाणिकमळें । तळवा मर्दितां शंका कमळे[11] । कुंकुमाक्तें कुचकुड्मलें । परममृदुलें मर्दितसे ॥ ४७ ॥ ज्याची कोमळ

पाठभेद :— *ठाकली ( उ. ) †गणती ( उ. )

१ वाकडें. २ प्रविष्ट झालों. ३ परिपुष्ट. ४ जगत्स्वरूपी. ५ शरीरावरील केसांचें उत्पत्तिस्थान. ६ बुचडा. ७ लज्जा. ८ पुष्पांचा समुदाय. ९ पायाचें अग्र. १० पुष्पें. ११ लक्ष्मीला.

अंगयष्टि । निबर न्यैहारें‡ रुपती दृष्टि । तो येथ ललनालंपट कष्टी । झोंबे काष्ठीं सुमनार्थ ॥ ४८ ॥ नेणें पीतांबर फाटला । न म्हणे कंठींचा कौस्तुभ तुटला । चरणीं कंटकही नेहटला । प्रेमें भुलला न विचारी ॥ ४९ ॥ धन्य धन्य ते सुंदरी । जिणें प्रेमें भुलविला हरि । आम्ही वृथा विरहातुरी । भ्रमों कांतारीं निशिगर्भीं ॥ २५० ॥ ऐशा वदती विरहाकुला । पुढें कांतारीं रिघती अबला । तंव कांहीं कौतुक देखोनि डोळां । मिनल्या सकळा ते ठायीं ॥ ५१ ॥

केशप्रसाधनं त्वत्र कामिन्याः कामिना कृतम् । तानि चूडयता कांतामुपविष्टमिह ध्रुवम् ॥ ३४ ॥

उभयभागीं कृष्णपदें । सामुद्रिकें मंडित विशदें । प्रमदापाउलें तयांमध्यें । जोडलीं दिसती भूभागीं ॥ ५२ ॥ तियें दावूनि परस्परीं । एकीमेकींतें म्हणती नारी । पहा गे येथें बैसोनि हरि । माथा विंचरी प्रियेचा ॥ ५३ ॥ जानूंमध्यें आपणा पुढां । तिसी बैसवूनि सकाम भिडा । कुरळ केशांचा उकली बुचडा । केला वेडा कंदर्पें ॥ ५४ ॥ तिचे विंचरोनियां केश । सुगंध सुमनांचे विशेष । गुंफूनियां वेणीकेश । खोपा विशेष शोभविला ॥ २५५ ॥ श्वेतारक्तगुच्छहारी । भांगीं माणिक्यमुक्तांपरी । कर्णप्रदेशीं कर्णिकारीं । केतकीपत्रीं द्विभाग ॥ ५६ ॥ कुंद मोगरे चंद्रकांति । चामीकराभ[3] पंकजद्युति । यूथिका द्विपत्री* मालती । खोपा निगुती रचिला गे ॥ ५७ ॥ कामलंपटें श्रीकृष्णानें । येथ बैसोनि वानरासनें । कामिनीकेशप्रसाधनें[4] । अढळ निजमनें जाणा गे ॥ ५८ ॥ ऐसी कामुकाविडंबना । स्वयें अनुकरे त्रैलोक्यराणा । गोपीविरहोक्तिव्याख्याना । मिसें तत्कथना त्या केलें ॥ ५९ ॥

श्रीशुक उवाच :— रेमे तया चात्मरत आत्मारामोऽप्यखंडितः ।
कामिनां दर्शयन्दैन्यं स्त्रीणां चैव दुरात्मताम् ॥ ३५ ॥

शुक म्हणे गा महाराजा । कुरुकुळकोटीरलैलामतेजा । श्रवणप्रेमें गरुडध्वजा । हृदयांभोजा रंगविलें ॥ २६० ॥ सूर्य जैसा स्वप्रकाश । मिडगणप्रभेची न पाहे वास[8] । तेंवि आत्माराम हृषीकेश । स्वसंतुष्ट आत्मरत ॥ ६१ ॥ सूर्यप्रकाशीं मिडगणादिकां । तेंवि सौख्या विषयात्मका । ज्याचेनि आस्तिक्यें आवांकां । विषयकामुकां भुलवावया ॥ ६२ ॥ विषयसुखाचा आभासमात्र । देखोनि दुःखाचें होती पात्र । तैसा नोहे जो स्वतंत्र । अखंड अजस्र सुखधाम ॥ ६३ ॥ तोही स्त्रैण§ कामुकांची । कुटिलाकारता जे मनाची । ते दैन्यावस्था क्रीडोनि साची । करूनि दावी कामुकां ॥ ६४ ॥ आणि स्त्रियाही ज्या जारिणी । केवळ कुतर्कांचिया खाणी । त्यांचें दैन्य चक्रपाणि । लीलाचरणीं प्रकटीतसे ॥ २६५ ॥ येऱ्हवीं तयांची† रूपवयसा । नेत्रकटाक्षभ्रामकदशा ।

---

**पाठभेद :—** ‡ निहारे ( उ. ) * अतपत्री ( मुं. ), शतपत्री ( उ. ) § स्त्रैण्यां ( उ. ). † स्त्रियांची ( उ. )

१ दृष्टीनें. २ एक प्रकारचें फूल. ३ सुवर्णासारखे तेजस्वी. ४ स्त्रीची केशरचना - भूषा. ५ विषयी जनांच्या कृति. ६ कुरुकुळाच्या मुकुटरत्नाचें तेज. ७ वाट. ८ धैर्य.

भुलवूं न शके श्रीपरेशा । नाव्यासरिसा क्रीडे तो ॥ ६६ ॥ आतां स्त्रियांचें दुरात्मकत्व । कामासक्ति मोहकत्व । पुरुषा भुलवूनि दास्यत्व । वरिष्ठत्वें करविती ॥ ६७ ॥

इत्येवं दर्शयंत्यस्ताश्चेरुर्गोप्यो विचेतसः । यां गोपीमनयत्कृष्णो विहायान्याः स्त्रियो वने ॥ ३६ ॥

कामी गुंतलाचि पाहिजे । जारिणीचें तो होय खाजें । बळें सांडूनिया लाजे । नीच काजें करविती ॥ ६८ ॥ असो ऐसिया त्या विरहिणी । नानावितर्कीं श्रीकृष्णकरणी । दाविती भावूनि अंतःकरणीं । वनीं उपवनीं हुडकितां ॥ ६९ ॥ चित्तें गुंतलीं कृष्णापासीं । विचेतसा[1] त्या लावण्यराशि । काननीं भ्रमती जैसीं पिशीं । देहभावासि विसरूनी ॥ २७० ॥ झाडीं खोडीं अरडी दरडी । धांवती सैराट जैशीं वेडीं । रमली गोविंदीं आवडी । वितर्कपरवडी तच्छंदें ॥७१॥ असो ऐसा गोपिकांचा । अभेदभक्तिप्रेमा साचा । यावरी महिमा अभिमानाचा । किंचित् वाचा शुक वर्णी ॥ ७२ ॥ सांडूनि समस्त व्रजकामिनी । एकली प्रियतम ललना वनीं । घेऊनि गेला चक्रपाणि । लावण्यखाणी रतिरसिका ॥ ७३ ॥ बाहु ठेवूनियां खांदां । संलग्न होउनि श्रीमुकुंदा । पदोपदीं विचरतां प्रमदा । कृष्णें प्रमोदा पावविली ॥ ७४ ॥ चरणीं रुतती तृणांकुर* । ललनालालस भयकांतार । स्कंधीं वाहे मुरलीधर । जे कां सुंदर बहुमानें ॥ २७५ ॥ जे उतरूनि पृथ्वीवरी । उभा ठाकूनि प्रपदांवरी । पुष्पें वेंचूनि श्रीमुरारी । अत्यादरीं दे जीतें ॥ ७६ ॥ जिचें स्वकरीं श्रीभगवान । करी केशप्रसाधन । विविधा कुसुमीं मौळग्रथन[2] । वेणिकारचन कौशल्यें ॥ ७७ ॥ मुकुराकार[3] आपुले नयनीं । लावण्य उमाणी चक्रपाणि । झाली तन्मानें मानिनी । प्रमदागुणीं स्मयरूढा[4] ॥ ७८ ॥

सा च मेने तदाऽऽत्मानं वरिष्ठं सर्वयोषिताम् । हित्वा गोपीः कामयाना मामसौ भजते प्रियः ॥ ३७ ॥

ऐसी बहुधा सम्मानिली । पाहिजे विनयभावा भजली । परी ते उचितातें विसरली । गर्वें फुगली[5] उफराटी ॥ ७९ ॥ पतिव्रता ज्या साध्वी रामा । क्रीडती जाणोनि कांतकामा । वाढवूनिया विनयधर्मा । दास्यकर्मा अनुसरती ॥ २८० ॥ जैसी श्यामाकमंजरी[6] । उभारितांही बळात्कारीं । सहसा आंगीं ताठा न धरी । पुन्हा स्वीकारी नम्रत्व ॥ ८१ ॥ तैसें नोहे बजरीकणिस[7] । ताठे कुलटेसम[8] विशेष । शुद्ध नम्रत्वें उजळी यश । नित्य निर्दोष पतिव्रता ॥ ८२ ॥ जारिणीपासूनि ऐसें न घडे । सम्मानितां ते गर्वा चढे । कामिक नाचवी आपणां पुढें । करूनि वेडे तृणप्राय ॥ ८३ ॥ जेंवि कां द्रव्याचेनि बळें । धनिक राबविती आपुलीं कुळें । तेंवि गोवूनि कामकळे । कामिक मोकळे नाचाविती ॥ ८४ ॥ विद्यादानें राबवी शिष्यां । वेतनें स्वामी

**पाठभेद :—** * तरुवर ( उ. ).

१ अंतःकरणरहित, विमनस्क. २ मस्तकीं गुंफणें. ३ आरशासमान. ४ अनुभवी, मोजी. ५ गर्वास चढलेली. ६ सांव्याची लोंबी. ७ बाजरीचें कणीस. ८ जारिणीसारखे.

राबवी दासां । तैशा कामिनी कामुकां पुरुषां । कामसुखाशा नाचविती ॥ २८५ ॥† नेत्र मुरडोनि दाविती रुसणें । बळेंचि कुंथूनि काढिती दुखणें । ईर्ष्यारोषें गर्वें फुगणें । न्यून उपसणें पिशुनैापे॥ ८६ ॥ प्रेमें अर्पितां न घेती अन्न । अव्हेरिती अर्पिलें वसन । न करवे म्हणती पदाभिगमन । अळुमोळ वचन न साहती ॥ ८७ ॥ जंव जंव दाविती त्या विकार । तंव तंव कामिक मर्कटाकार । त्यांच्या छंदें नर्तनपर । अन्य विचार विसरोनी ॥ ८८ ॥ तिचेंचि वालभ वाढवी वाडें । तिची मोडूं न शके भीड । तिचे ठायीं विश्वास दृढ । वाटे अवघड तीसाठीं ॥ ८९ ॥ मायबापादि आप्तकोटी । त्यांतें न गणी तृणासाठीं । कोणी प्रियेची मोडितां गोठी । क्षोभे पोटीं अनिवार ॥ २९० ॥ क्षणक्षणा प्रियेचें वदन । पाहोनि जीवाचें उतरी लोण । येरी मानी तृणासमान । डिंगॅर करूनि राबवी ॥ ९१ ॥ तैसी श्रीकृष्णलालनें ललना । चढली लावण्यें अभिमाना । येरी समान मानूनि तृणा । भावी आपणा श्रेष्ठत्व ॥ ९२ ॥ भूस टाकूनि घेती कण । कीं मृगांग टाकूनि कस्तूरीग्रहण । कीं कंटक सांडूनि सेविती सुमन । घेती सुज्ञ गुणलाभें ॥ ९३ ॥ तैशा समस्त रानटा गोपी । कृष्णें सांडूनि विगुणा विरूपी । मद्गुणलावण्यकंदर्पकल्पीं । कृष्ण प्रतापी तापविला ॥ ९४ ॥ कुवलॅयगंधीं चंर्चरीक । वेधे नागस्वरें पन्नक । चकोरा वेधी जैवातृॅक । मत्कामुक हरि तैसा ॥ २९५ ॥ तस्मात् माझिये सुकुमारते । गुणलावण्यचातुर्यतें । अगाध जाणोनि श्रीअनंतें । वनिताशतें उपेक्षिलीं ॥ ९६ ॥ कृष्ण भुलविला गुणलावण्या । त्रिभुवनीं एक मी वरांगना । स्कंधीं वाहे समान सुमना । सुगंधव्याजें स्रग्रूपी ॥ ९७ ॥ जंववरी अम्लानता असे सुमनीं । तंववरी भजिजे गुणज्ञजनीं । तेंवि माझिये सुकुमारगुणीं । चक्रपाणि वशवर्ती ॥ ९८ ॥ माझें कुशल सुकुमारपण । असतां कृष्ण मज अधीन । माझें उल्लंघूं न शके* वचन । धरिला अभिमान सुभगत्वें ॥ ९९ ॥ कृष्ण-सम्मानें सगर्वा । चढली प्रमदा गुणस्वभावा । काय बोलिली श्रीकेशवा । कुरुपुंगवा तें ऐक ॥ ३०० ॥

ततो गत्वा वनोद्देशं दृप्ता केशवमब्रवीत् । न पारयेऽहं चलितुं नय मां यत्र ते मनः ॥ ३८ ॥

आपुलया हातें सुगंध सुमनीं । कृष्णें जिची गुंफिली वेणी । जे रमविली बहुतां गुणीं । सम्मानूनि सुभगत्वें ॥ १ ॥ त्यानंतरें ते सगर्व ललना । वनप्रदेशीं करूनि गमना । श्रीकृष्णातें बोले वचना । वॅराभिमाना दाखवूनी ॥ २ ॥ पुढें न चलवे मजकारणें । जेथें आवडी धरिजे मनें । तेथें स्कंधीं वाहूनि नेणें । लालसपणें मत्प्रेमें ॥ ३ ॥ येथूनि चालों न शकें पुढां । खांदीं वाहून प्रेमचाडा । तुझें मानस सुखसुरवॅाडा । वांछी तिकडे मज नेईं ॥ ४ ॥ कामिक जाणोनि चढली डोई । मग म्हणे चालों न शकें भुई । मना मानेल तेथें नेईं । खांदां घेईं प्रियमानें ॥ ३०५ ॥ तंव तो असंग आत्माराम । अखंड अजस्र पूर्णकाम । जाणोनि वनितास्मयॅसंभ्रम । पावे उपरम तें ऐका ॥ ६ ॥

पाठभेद :— † मुंगीप्रतींत २८५ ही ओवी नाहीं. * नुलंघूं शके ( उ. )

१ चहाडखोराप्रमाणें. २ अल्प. ३ अधिक. ४ दास. ५ कमलाच्या सुवासानें. ६ भुंगा. ७ चंद्र. ८ माळेच्या रूपानें. ९ सौंदर्यामुळें. १० मोठ्या गर्वाला. ११ सुखवृद्धि. १२ स्त्रीचा गर्वभ्रम.

एवमुक्तः प्रियामाह स्कंध आरुह्यतामिति । ततश्चांतर्दधे कृष्णः सा वधूरन्वतप्यत ॥ ३९ ॥

प्रमादप्रणीत प्रमदावाणी । बोलोनि बोधिला चक्रपाणी । मग तो प्रियतम प्रेमवचनीं । स्कंधारोहणीं प्रवर्तवी ॥ ७ ॥ देखोनि वशवर्ती वनमाळी । खांदीं घ्यावया बैसला तळीं । मग ते सगर्वा वेल्हाळी । पदाब्ज उचली आरोहण ॥ ८ ॥ मौळ कवळूनि दोहीं करीं । बैसों जातां स्कंधावरी । तंव अंतर्धान पावे हरि । राहे सुंदरी चवकेली ॥ ९ ॥ दाही दिशा निरखी डोळां । कोठें न देखे गोपाळा । म्हणे म्यां परम अपराध केला । हरि हरविला हातींचा ॥ ३१० ॥ जाणोनि वशवर्ती श्रीकृष्ण । करूं इच्छीं स्कंधारोहण । विनयभावें न भजे चरण । ऐसी अज्ञान निर्दैवें ॥ ११ ॥ हातींचा हारविला चिंतामणि । गर्वा चढोनि पडलें वनीं । आतां माझा अपराध न गणीं । कृपें विरहिणी वांचवीं ॥ १२ ॥ तुझिया अधरामृताची रुचि । निधानलक्ष्मी लावण्याची । दुर्लभ जाणोनि कमला शोची । गर्वें हातींची ते गेली ॥ १३ ॥ ऐसा पावूनियां अनुताप । आंगीं प्रज्वळला कंदर्प । आठवूनि मन्मथबाप । करी विलाप तें ऐका ॥ १४ ॥

हा नाथ रमण प्रेष्ठ क्वासि क्वासि महाभुज । दास्यास्ते कृपणाया मे सखे दर्शय सन्निधिम् ॥ ४० ॥

लावण्यगुणा भुलला कृष्ण । वाढला होता जो अभिमान । कृष्णें पावोन अंतर्धान । केलें निरसन तयाचें ॥ ३१५ ॥ अखंड असंग[1] निजात्मरत । ललनालाघवीं अनावृत । कामिनीकामीं अनासक्त । नित्य निर्मुक्त श्रीकृष्ण ॥ १६ ॥ शशांक बिंबला दिसतां जळीं । धीवरा नाकर्षवे तो जाळीं । तैसा नाकळवे वनमाळी । कंदर्पकेलि कुलटांतें[2] ॥ १७ ॥ अनासक्तता प्रकटूनि ऐसी । गुप्त होतांचि श्रीकृष्णासी । कामिनी स्फुंदे उकसाबुकसीं । दीर्घस्वरेंशीं आक्रंदे ॥ १८ ॥ हाहाःकारें आक्रंदोनी । दीर्घविलापें करी ग्लानि । अश्रुधारा स्रवती नयनीं । मनीं स्मरोनि हरिचरिता ॥ १९ ॥ कोठें आहेसि प्राणनाथा । प्राणवल्लभा देईं सुरता । मजला सांडूनि न वचे परता । मम दुश्चरिता नाठवीं ॥ ३२० ॥ माझिया परमप्रियतम इष्टा । तव वियोगें पावलें कष्टा । तुज म्यां नेणोनि स्वसंतुष्टा । केल्या चेष्टा[5] त्या विसरें ॥ २१ ॥ सरल सुपीन[6] सलंब भुज । प्रेमालिंगनीं आनंदभोज[7] । अधर चुंबूनी मकरध्वज । हृदयकंज[8] प्रकाशीं ॥ २२ ॥ पाहातां तुझिया आननचंद्रा । स्वानंदभरितें स्मरसमुद्रा । विकासित होय मानसमुद्रा । सौभाग्यभद्रा सम लाभे ॥ २३ ॥ तुजवीण दीना मी तव दासी । कोठें सांडून मज गेलासी । एकली विलपें मी वनवासी । सन्निधानासि मज देईं ॥ २४ ॥ दावीं आपुलें सन्निधान । माझें नाठवीं गर्हिताचरण । करूं इच्छिलें स्कंधारोहण । तें उद्धतपण विसरिजे ॥ ३२५ ॥ केशीं झाडीन मी तव चरण । बाहीं देईन आलिंगन । अधरामृताचें देऊन पान । वांचवीं प्राण जाताती । ॥ २६ ॥ ऐसे विलाप नानापरी । करूनि रुदतां दीर्घस्वरीं । तंव पातल्या सख्या येरी । वनीं श्रीहरि गिंवसितिया ॥ २७ ॥

१ अविचारानें रचलेली. २ गांगरलेली. ३ विषयांनीं न जिंकलेला. ४ जारिणींस. ५ क्रिया. ६ अत्यंत पुष्ट. ७ आनंदाचा अधिकपणा. ८ हृदयकमळ.

अन्विच्छंत्यो भगवतो मार्गं गोप्यो विदूरतः । ददृशुः प्रियविश्लेषमोहितां दुःखितां सखीम् ॥ ४१ ॥

ध्वजांकुशादि चिह्नीं विशद । भूमीं उमटले जे हरिपद । तदनुलक्षें करिती शोध । प्रमदा प्रसिद्ध स्मरतप्ता ॥ २८ ॥ ऐशा हरिमार्गातें अबला । पहात असतां विरहविकळा । तव दुरून देखिली डोळां । सखी व्याकुळा स्मरबाणें ॥ २९ ॥ प्रियतमाचें आलिंगन । लाहोनि विसरली देहभान । करितां मर्यादालंघन । गेला त्यागून वनवासीं ॥ ३३० ॥ कृष्णप्राप्ति हातींची गेली । निजसखियांची विघडणी झाली । जळावेगळी मासोळी । तेंवि तळमळी हरिविरहें ॥ ३१ ॥ तिचें ऐकोन आक्रंदन । सवेग आलिया धांवोन । दुःखवरंपडी देखोन । प्रश्नसंभाषण आदरिलें ॥ ३२ ॥ वनीं अवघ्या सांडूनि वधू । घेऊनि गेला तुज गोविंदु । कोठें हरविला आनंदकंदु । केंवि हा खेदु तुज झाला ॥ ३३ ॥ मग ते सखियांप्रति बोले । मज गोविंदें सम्मानिलें । खांदां वाहोनि आणिलें । विविध दाविलें रतिलास्य ॥ ३४ ॥ महीं उतरूनि ठायीं ठायीं । विचित्र वनश्री दाविली पाहीं । पुन्हां उचलूनि दोहीं बाहीं । ने लवलाही स्वैरत्वें ॥ ३३५ ॥ माझिया मौलग्रथनासाठीं । सुमनें वेंचूनि भरिली वोटीं । अंघ्रीं घेऊनि आपणानिकटीं । ग्रथिली गोमटी वेणिका ॥ ३६ ॥ पुन्हां घेवोनि कडिये खांदां । केली कंदर्पकेली विविधा । प्रमदास्वभावें म्यां प्रमादा । करूनि गोविंदा अवगणिलें ॥ ३७ ॥ माझिया लावण्या भुलला हरि । म्हणोनि गर्वा चढलें भारीं । वनीं सांडूनि अवघ्या नारी । वाहे कंधरीं मज प्रेमें ॥ ३८ ॥ मी एकचि जगीं लावण्यराशि । म्हणूनि आवडे श्रीकृष्णासी । कृष्ण भुलला सौंदर्यासी । म्यां हृषीकेशी वश केला ॥ ३९ ॥ कृष्ण जाला मज अधीन । ऐसा धरिला म्यां अभिमान । चालों न शके मी येथून । खांदां वाहून ने म्हणतां ॥ ३४० ॥ खांदां बैसावया मज बाहे । स्कंधारोहणा उचलितां पाहें । तेथाचि गुप्त झाला माये । दुःखें लाँहेसम मिडकें ॥ ४१ ॥ श्रीकृष्णाचें आलिंगन । आठवे कृष्णाचें चुंबन । सप्रेम अपांग मोक्षण । सादर निरीक्षण आठवे ॥ ४२ ॥ श्रीकृष्णाच्या गुह्य गोष्टी । स्मरविलासें सस्निग्ध दृष्टि । रसिकलालनें स्मरोनि पोटीं । होतें कष्टी सखिया हो ॥ ४३ ॥

तया कथितमाकर्ण्य मानप्राप्तिं च माधवात् । अवमानं च दौरात्म्याद्विस्मयं परमं ययुः ॥ ४२ ॥

तिचें ऐकोनि बोलणें । कीं जे सम्मानिली विशेष कृष्णें । म्हणोनि फुगतां मदाभिमानें । पुन्हां अवमानें विघडली ॥ ४४ ॥ अगे या श्रीकृष्णचरणासाठीं । विधिहरप्रमुख विरक्त दृष्टि । दुर्घट तपश्चर्येच्या कष्टीं । शिणतां भेटी दुर्लभ त्यां ॥ ३४५ ॥ दैवें त्याची प्राप्ति घडली । दुर्दृष्टें गर्वा चढली । पुन्हा अभिमानें विघडली । संकटीं पडली हरिविरहें ॥ ४६ ॥ याचें लाघव न कळे कोण्हा । नये विश्वासों याचिया गुणां । चढली मूर्खत्वें अभिमाना । आतां रुदना करीतसे ॥ ४७ ॥ निष्काम करिती हरिकीर्तन । जाय तयांपें धावोन । सांडूनि लक्ष्मीसह सुखशयन । सनकादिभाषणें

१ दुःखांत प्रविष्ट झालेली. २ चूक. ३ गळ्यांत. ४ लाहीप्रमाणें ( तप्त खापरांतील ). ५ तळमळत्यें. ६ दुर्दैवानें. ७ त्यांपाशीं.

सांडूनी ॥ ४८ ॥ हरिकीर्तनामाजि नाचे । वंदी अणुरेणु तेथींचे । शेषाप्रति रहस्य याचें । लक्ष्मी वाचे पुसतसे ॥ ४९ ॥ सर्वां सांडूनि स्वयें हरि । निष्काम भक्तांचे कीर्तनगजरीं । नाचे उडे नानापरी । कोण्या विचारीं हें नुमजे ॥ ३५० ॥ ऐकोनि म्हणे फणिनायक । रहस्य जननीये आइक । कृष्ण निजजनपरीक्षक । नमनिं जे निष्टंक वशवर्ती ॥ ५१ ॥ स्वयें नीचा करी नमन । कीं जो विश्वात्मा आपण । धरितां अंगलेगीं अभिमान । मग त्या चरण न दाखवी ॥ ५२ ॥ यालागीं ज्यातें तो सम्मानी । त्यांस जायिजे लोटांगणीं । तरीच अधिकार पदसेवनीं । येऱ्हवीं हानी तत्काळ ॥ ५३ ॥ हरिकिंकराचे किंकर । त्याहून आपण नीचतर । होऊनि त्यांचे चरणीं शिर । ठेवितां अधिकार दास्यत्वा ॥ ५४ ॥ हें ऐकोनि कमला देवी । हरिजनांचे चरण सेवी । यास्तव त्रिजगाचा गोसांवी । हृदयीं ठेवी सप्रेमें ॥ ३५५ ॥ जे कां अर्धांगनिवासिनी । येथवरी तियेची कडसैणी । तेथ हे अभिमानें मानिनी । स्कंधारोहिणीं प्रवर्तली ॥ ५६ ॥ यास्तव हातींचा हारविला हरि । भोगी विरहें दुःखलहरी । सुरपद दवडूनि भवसागरीं । याज्ञिकांपरी हे जाचे ॥ ५७ ॥ दुरात्मत्वें पावली नाडें । आणि त्या कृष्णाचें कैवाड । ऐकोनि परमविस्मयारूढ । म्हणती अवघड हरिप्राप्ति ॥ ५८ ॥ ऐशा समदुःखें तन्वंगी । तयेसि घेऊनि आपणासंगीं । पुन्हा वनगर्भीं शाङ्र्गी । रिघोनि वेगीं हुडकिती ॥ ५९ ॥

ततोऽविशन्वनं चंद्रज्योत्स्ना यावद्विभाव्यते । तमः प्रविष्टमालक्ष्य ततो निववृतुः हरेः ॥ ४३ ॥

तये सहित रिघाल्या वनीं । जंववरी शशिभांमंडित रजनी । पडतां तमाची गवसणी । हरिहुडकणी सांडिली ॥ ३६० ॥ त्यानंतरें हरिशोधन । सांडूनि पुन्हां सेविलें पुलिन । तेथ विसरोनि देहभान* । करिती गायन हरिविरहें ॥ ६१ ॥

तन्मनस्कास्तदालापास्तद्विचेष्टास्तदात्मिकाः । तद्गुणानेव गायंत्यो नात्मागाराणि सस्मरुः ॥ ४४ ॥

श्रीकृष्णाच्या विरहध्यानें । तदाकार झालीं मनें । तेथ नुमटती प्रपंचभानें । तद्गुणगानें तन्मयता ॥ ६२ ॥ उन्मत्त जैसे बरळताती । तैशा विवश हरिगुण गाती । अनुभविली जे हरिसंगति । तैशा चेष्टती तन्मय त्या ॥ ६३ ॥ कृष्णगानें कृष्णध्यानें । कृष्णसुरतसन्निधानें । कृष्णाकार झालीं मनें । प्रपंचभानें सांडवलीं ॥ ६४ ॥ कृष्णध्यानाचिया वेधें । भेदा विसरल्या कृष्णावबोधें । कृष्ण होऊनि कृष्णच्छंदें । प्रेम नुसधें वावरे ॥ ३६५ ॥ तया प्रेमाची अवस्था । ग्रंथीं नयेचि वाखाणितां । विरंचीपर्यंत बुद्धिमंता । नाहीं योग्यता तत्कथनीं ॥ ६६ ॥ तैसाचि प्रेमळ कोण्ही एक । हरिपदलालस हरिकामुक । भोगूं शकेल तद्रससुख । कथनीं मूक परि तोही ॥ ६७ ॥ श्रीकृष्णाची विरहदशा । अनिर्वाच्य कुरुनरेशा । अनुभवगम्य तन्मानसा । येरा भरवसा

पाठभेद :— * देहाभिमान.

१ समागमांत. २ धनी. ३ कसास लावणें; परीक्षा. ४ हानि. ५ कपट. ६ चंद्रप्रकाशानें शोभित. ७ श्रीकृष्णाचा शोध.

न करवे ॥ ६८ ॥ असो ऐशा पुलिनीं रामा । पतिसुतसदनासह विरामा । वेधें तन्मय मेघश्यामा । भावूनि आत्मा गुण गाती ॥ ६९ ॥ त्यांची सप्रेम तन्मयता । कथिली न वचेचि तत्वता । यालागिं हरिगुणकीर्तनवार्ता । ऐकें गीता गोपींच्या ॥ ३७० ॥ कुरुपुंगवा तुझेनि प्रश्नें । मजही तैसेंच केलें कृष्णें । इतुकें म्हणतां स्मृतींचें ठाणें । उठोनि नयनें जळ लोटे ॥ ७१ ॥ हृदयीं प्रेमसुखाची जोडी । फावतां रोमांच उभविती गुढी[1] । कंठ दाटोनि श्वास कोंडी । पडली बोबडी वाचेसी ॥ ७२ ॥ जेंवि कां प्रेमामृताची गार । संवादवायु कृष्णाकार । स्पर्शें होऊं पाहे नीर । तेंवि पाझर स्वेदाचे ॥ ७३ ॥ परागपरमाणूंची मांदी । मिरवे जैसी फुल्लारविंदी । पुलकउभारा तैसा स्वेदीं । रोमांच संधि टवटविला ॥ ७४ ॥ रावणहननीं भूकंपन । होतां सुराद्रि[2] करी धुनन[3] । तेंवि विरतां अहंभान । तनुकंपन सुखलाभें ॥ ३७५ ॥ आनंदाब्धीचे हेलावे । तैसे उठती स्फुंदनयावे[4] । एवं सात्विक अष्टभावें । श्रीशुकदेवें आथिला ॥ ७६ ॥ जेणें वेषें बिंब नटे । प्रतिबिंबही तैसेंचि वेंठे । अष्टभावीं स्वसुखीं पैठें[5] । केलें नेटें तेंवि नृपा ॥ ७७ ॥ रासक्रीडेच्या विनोदें । गोपी आथिल्या परमानंदें । स्तिमित झालीं खेचरवृंदें । विधिही न वदे गतसमया ॥ ७८ ॥ तैसेचि श्रोते वक्ते दोन्ही । अष्टभावीं सुख भोगूनी । पुन्हा स्मृतीतें आलिंगोनी । श्रवणीं कथनीं प्रवर्तले ॥ ७९ ॥ मग बादरायणि म्हणे राया । गोपी हरिविरहें तन्मया । धनसुत सदनें विसरोनियां । गुण गावया प्रवर्तल्या ॥ ३८० ॥

पुनः पुलिनमागत्य कालिंद्याः कृष्णभावनाः । समवेता जगुः कृष्णं तदागमनकांक्षिताः ॥ ४५ ॥

पूर्वीं कालिंदीच्या पुलिनीं । अभीष्ट भोगिला चक्रपाणि । पुढती त्याचि स्थळा येऊनी । कृष्णभावनीं[6] तन्मनस्का[7] ॥ ८१ ॥ कृष्णाकार कृष्णवेधें । भक्तसुखाच्या अवबोधें । कृष्ण गाती भेदावरोधें । श्रीकृष्णपदें वांछिती ॥ ८२ ॥ वांछिती कृष्णाचें आगमन । समस्त मिळोनि गाती कृष्ण । वसवूनि कालिंदीचें पुलिन । भोगिला भगवान जेथ पूर्वीं ॥ ८३ ॥ येथूनि पुढें गोपीगीत । एकतिसाव्या अध्यायांत । कथिजेल तेथ देऊनि चित्त । श्रोतीं निवांत परिसावें ॥ ८४ ॥ एकोणतिसावा भवविरक्ति । श्रवणवेधें हरिपदप्राप्ति । ईर्षणात्यागें[8] भगवद्रति । सुखविश्रांति भोगिली ॥ ३८५ ॥ पुन्हा उपलब्ध सुखाचा मद । धरितां अंतरला गोविंद । तदन्वेषणप्रकार विशद । तादात्म्यवेध तिसावा ॥ ८६ ॥ भूतमात्रीं भगवत्प्रेमा । विपरीतविवर्तरोधोपरमा* । लाहतां साफल्य केलिया श्रमा । हे येथ गरिमा जाणावी ॥ ८७ ॥ येथवरी अधिकार चढल्या पूर्ण । न लगे अन्यत्र मग साधन । निर्लज्ज करावें हरिकीर्तन । तन्मय होऊन तद्वेधें ॥ ८८ ॥ तेचि गोपीगीतमिसें । पुढें कथिजेल राया परिसें । जेथ रमिजे परमहंसें । ऐसें व्यासें निगदिलें ॥ ८९ ॥ उत्तरजामाताचे[9]

पाठभेद :—* –बोधोपरमा ( मुं. व उ. ).

१ रोमांच उभे राहणें. २ मेरुपर्वत. ३ कांपणें. ४ रडण्याचा अनावर वेग जो त्याचा उदय. ५ स्थिर. ६ श्रीकृष्णध्यानी. ७ त्याच्या ठिकाणीं मन ज्यांचें त्या. ८ स्त्रीपुत्रादिकांच्या ठायीं आस्था. ९ परीक्षिति.

श्रवणीं । इतुकें घालूनि बादरायणि । गोपीगीतनिरूपणीं । सावध येथूनि म्हणतसे ॥ ३९० ॥ प्रतिष्ठानवाळवंट । गौतमी[1]रूपें यमुनातट । अभेद एकात्म वैकुंठ । एकनिष्ठ क्रीडतसे ॥ ९१ ॥ तेथ चिदानंद मुरलीगीतें । स्वानंदवेधें गोपीचित्तें । विषयत्यागें गोविंदातें । विरहतप्तें समरसलीं ॥ ९२ ॥ तेथ लाहूनि गोविंदरति । शुद्ध[2]सत्वें अहंकृति । धरितां अंतरिली अनुभूति । विरहावर्ती परिभ्रमण ॥ ९३ ॥ भुक्तसुखाचा न पडे विसर । गोड न वटे भवसागर । तेव्हां जालिया कीर्तनपर । कृष्णदयार्णव जाणोनी ॥ ९४ ॥ तें हें श्रीमद्भागवत । अठरा सहस्र मूळ गणित । परमहंस जेथ निरत । स्कंध त्यांत दशम हा ॥ ३९५ ॥ शुकपरीक्षितिसंवाद गहन । गोपिकांहीं हरिशोधन । केलें तें हें निरूपण । अध्याय संपूर्ण तिसावा ॥ ९६ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां भगदन्वेषणं नाम त्रिंशतितमोऽध्यायः ॥ ३० ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक ४५ ॥ टीकासंख्या ३९६ ॥ एवं संख्या ॥ ४४१ ॥ ( तिसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १५३०९ ).

तिसावा अध्याय समाप्त.

१ गोदावरी. २ रज-तम ज्यांत मिसळले नाहींत तें.

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय ३१ वा

श्रीमद्गोविंदात्मने नमः। ज्याचिया[†] ध्यानसुखाची चवी। अभेद आत्मावबोधा रुचवी। इहामुष्मिक संकोचवी। प्रज्ञा नाचवी परमार्थीं ॥ १ ॥ कोटिजन्मींचें निष्काम पुण्य। तेणें ईश्वर संतोषोन। करी सद्गुरूचें दर्शन। तैं प्रेमा गहन तद्भजनीं ॥ २ ॥ ईश्वरप्रसादें उपलब्ध। गुरुदर्शनें मनासि वेध। लागतां अभेद आत्मावबोध। रुचतां निषेध भवभाना ॥ ३ ॥ शुक्तिरजताचा लाभ दुरी। देखोनि कल्पना अलंकारीं। उठती भवस्वर्गांचे परी। त्याची बोहरी[१] तद्ग्रहणीं ॥ ४ ॥ शुक्तिशकलें[२] घेतां हातीं। उडोनि जाय रजतभ्रान्ति। भूषणसंकल्प न रुचती। तेंवि निवृत्ति भवस्वर्गा ॥ ५ ॥ सद्गुरूचें मूर्तिदर्शन। होतां सप्रेम ठसावे ध्यान। तेणें स्वसुखसमाधान। अन्य साधन मग न रुचे ॥ ६ ॥ सगुणसद्गुरुध्यानवेधें। प्रज्ञा वोसंडे[३] परमानंदें। मग ते दृश्याचे खणोनि कांदे[*]। सदा स्वानंदें अवतरे ॥ ७ ॥ सद्गुरुध्यानसुखाची गोडी। अभेद आत्मावबोध उघडी। इहामुष्मिका होय झाडी। विक्षेपें झांपडी समवेत ॥ ८ ॥ ईश्वरानुग्रहें सद्गुरु प्राप्त। न होतां येर जे संसारग्रस्त। रुचवूं न शकती स्वबोधामृत। काय निमित्त तें ऐका ॥ ९ ॥ विषयलोभार्थ बराडी। जेथ देखे अर्थजोडी। तेथ जे दात्याची आवडी। तैसाचि भरडी परमार्थ ॥ १० ॥ दाता देखोनि विलासिया। कामशास्त्रचि बोधावया। उक्ति अनेका ग्रंथींचिया। हाऊनियां प्रतिपादी ॥ ११ ॥ यामळकुळार्णवतन्त्रें नाना। धुंडूनि काढी अनुकूल वचना। आणिकां[§] तेथ बोलों देना। करी भर्त्सना[||] तोंडबळें ॥ १२ ॥ तेथ विषयांध यजमान। मानी तयासीच सर्वज्ञ। तों तो वसवसी जैसें श्वान। कोणी विद्वान येतांचि ॥ १३ ॥ जरी त्या आवडे

पाठभेद :— † ज्यासि (उ.). * खादे (मुं.). § आणि (उ.). || निर्भर्छना (उ.).

१ राखरांगोळी. २ शिंपीचे तुकडे. ३ भरून वाहूं लागले. ४ अज्ञान.

उपासना । तरी वाढवी बहुकामना । अभिचारिका पद्धति नाना । तद्गतज्ञाना प्रबोधी ॥ १४ ॥ दावी प्रत्यक्ष चमत्कार । म्हणे देवतासामर्थ्य अपार । तदर्थ करी प्रयोगपर । जाणोनि अधिकार तयाचा ॥ १५ ॥ यजमान गीतनाट्यादिरसिक । असतां प्रबोधी तौर्यत्रिकें । संगीतशास्त्राचा विवेक । सनाटक अलंकार ॥ १६ ॥ पिंगळादि नानाछंदें । तानमानें गद्यपद्यें । वेधूनि इत्यादि विनोदें । वेंची समुद्रें वयवित्त ॥ १७ ॥ दाता जाणोनि साबरपर । भूत प्रेत पिशाच अघोर । साधनविधानें विविध मंत्र । दावूनि तत्पर प्रबोधी ॥ १८ ॥ धनावाप्तीसी साभिलाष । यजमान देखोनि विशेष । कपिंजळादि* वादींचे दंश । बोधी अशेष अहैतुक ॥ १९ ॥ वल्लीत्वगग्रमूळिकाकाष्ठीं । दरद पारद पाषाण कुंटी‡ । कल्कक्षारभस्मादि वटी । धातुपालटीं प्रलोभी ॥ २० ॥ कीं नाना अंजनें पंचाक्षरी । पायाळ देवगणी¶ नरनारी । धनें काढवी मध्यरात्रीं । कीं स्वर्णाकर्षण उपदेशी ॥ २१ ॥ गुटिका चूर्णे रक्षालेप । दृष्टिबंधनें तिलक धूप । भुररी कपटें कायाकल्प । बोधितां पाप न म्हणती ॥ २२ ॥ एवं धनुर्वेद आयुर्वेद । गांधर्व शांभव ज्योतिर्वेद । नानापरीक्षा शिल्पकोविद । कारिती प्रबोध यजमाना ॥ २३ ॥ सूपशास्त्रींची योग्यता । कळा चौसष्टी चातुर्यता । पूर्वमीमांसा प्रबोधितां§ । दानीं आस्था सकाम ॥ २४ ॥ निष्काम भूतदयेची जोडी । तेथ वेंचूं नावडे कवडी । फळाभिलाषें सकाम गोडी । ते दानपैरवडी प्रबोधिती ॥ २५ ॥ एवं आपुल्या पोटासाठीं । मनधरणीच्या बोधूनि गोठी‖ । वयवित्ताची करिती लुटी । दोघे शेवटीं नारकी ॥ २६ ॥ जैसे पोटार्थ भिकारी । श्वापदें शिक्षिती नानापरी । जें जें सत्व ज्या विकारीं । नाचे तैसें नाचविती ॥ २७ ॥ शुक सारिका बोलविती । पन्नग नागस्वरें डोलविती । व्याघ्र प्रयासें चालविती । अश्व खेळविती कौतुकें ॥ २८ ॥ मर्कटा शिक्षिती बहुविकारीं । वृषभ नाचविती अंगावरी । जे शिक्षेचे जे अधिकारी । त्यां ते प्रकारीं शिक्षिती ॥ २९ ॥ एवं यजमानाची प्रीति । जाणोनि पंडित प्रबोधिती । ते यजमान श्वापदपंक्ति । शिक्षक↓ पोटार्थी उभयत्र ॥ ३० ॥ अनन्यप्रेमें सच्छिष्य जडे । तरी त्या लावी प्रपंचाकडे । जें जें आपणा सुख आवडे । तें† त्या कुडे उपपादी ॥ ३१ ॥ निष्काम विरक्त देखोन । त्याचें करी निर्भर्त्सन । निर्दैव⊤ दारिद्री मूर्ख म्हणोन । करी हेळण दुर्वाक्यें ॥ ३२ ॥ ऐसियांचिया प्रबोधनें । कैसेनि चुकती जन्ममरणें । दावूनि मानुष्य हें पेखणें । होती पाहुणे निरयांचे ॥ ३३ ॥ ईश्वरानुग्रहें सद्गुरु प्राप्त । अपरोक्षज्ञान प्रबोधादित्य । उदयो न करी जो यथार्थ । व्यर्थ प्राकृत तंव अवघे ॥ ३४ ॥§§ तो हा गोविंद गोकुळपति । वृत्तिरूपा गोपयुवति । आत्मवेधें भवनिवृत्ति । करूनि परमार्थी लाजविल्या ॥ ३५ ॥ ये अध्यायीं तेचि कथा । वनीं हुडकितां कृष्णनाथा । गोपी पावोनि विरहव्यथा । आल्या श्रमिता पुलिनातें ॥ ३६ ॥

**पाठभेद :—** * कपिंपिजलादि ( मुं. व उ. ). ‡ कुटी ( मुं. ). ¶ देवगुणी ( मुं. व उ. ). § प्रतिबोधिता ( मुं. ) ‖ गोष्टि ( उ. ). ↓ शिक्षित ( मुं. ). † ते ते त्याकडे ( मुं. ). ⊤ मूर्ख दरिद्रि म्हणोन ( मुं. ). §§ ३४ वी ओवी ( मुं. ) : ईश्वरानुग्रहे सद्गुरु प्राप्त । न होतां येर जे संसारग्रस्त । अपरोक्षज्ञानप्रबोधादित्य । उदयो न करी प्राकृत तो ॥ ३४ ॥

१ जारण-मारण. २ नृत्य, गीत, वाद्य. ३ छंदःशास्त्राचा कर्ता. ४ शंख (?). ५ पारा. ६ मनःशिळा. ७ दानाची प्रतिष्ठा. ८ नरकाचे वांटेकरी. ९ काथ्याकूट. १० नरकाचे.

संग्रहभाषाछंद* ॥

निराशा पुढती गोपी पातल्या पुलिनाप्रति । गाती कृष्णानुलक्षें त्या कृष्णागमन वांछिती ॥ १ ॥

चंद्रप्रभा होती जेथवरी । तंववरी हुडकूनि वनाभीतरी । तमःप्रचुरवृक्षान्तरीं[1] । अप्राप्त हरि जाणोनि ॥ ३७ ॥ फिरोनि पुढती यमुनापुलिना । येऊनि समस्त पशुपांगना । कृष्णवेधें करिती गायना । कुरुभूषणा तें ऐकें ॥ ३८ ॥

सुमुखवृत्तमिदम् ॥ नमन ॥

नमुनि सद्गुरू गोपिनायका । विरहिणी व्रजीं गाति बायका ।
कथिन ते कथा प्राकृतें खरी । जशिच हे शुकाचार्यवैखरी ॥ १ ॥

गोप्य ऊचुः — जयति तेऽधिकं जन्मना व्रजः श्रयत इंदिरा शश्वदत्र हि ।
दयित दृश्यतां दिक्षु तावकास्त्वयि धृतासवस्त्वा विचिन्वते ॥ १ ॥

समश्लोकी ॥

उपजणं तुझें प्राप्त गोकुळीं । वसत इंदिरा ऊर्जितागळी ।
प्रकट हो सख्या धुंडितों दिशा । असु विगुंतले जाहलों पिशा ॥ १ ॥

ध्रुवपद ॥

हरि दयार्णवा प्रेमगौरवा । प्रकट हो सख्या तोष† दे जिवा ॥

गोपी म्हणती जी प्रियतमा । तुझिये जन्में करूनि महिमा । ऊर्जित नंदव्रजाची गरिमा । उत्कृष्ट आम्हां दिसतसे ॥ ३९ ॥ तुझिया जन्मास्तव वनमाळी । कमळा[2] सर्वस्वें ये स्थळीं । स्वऐश्वर्यें व्रजमंडळीं । शोभाबहळीं वर्त्तसे ॥ ४० ॥ तस्मात् तुझिया जन्में करून । प्राणिमात्र व्रजींचे जन । ऊर्जित विजयश्रीसंपन्न । नित्य निमग्न स्वानंदीं ॥ ४१ ॥ व्रजीं जन्मतां श्रीमुकुंद । सर्व भोगिती परमानंद । तेथ तावक[3] गोपीवृंद । पावतो खेद तव विरहें ॥ ४२ ॥ तावकी कैशा म्हणसी जाण । तरी त्वदर्थ धरूनि प्राण । लाहोनि विधीचें वरदान । गोपी होऊन जन्मलों ॥ ४३ ॥ तुझ्या ठायीं धरूनि प्रीति । तव प्रिय करावयाची आर्ति । आम्ही जन्मलों हें श्रीपति । विदित तुजप्रति सर्वज्ञा ॥ ४४ ॥ यास्तव जन्माचि पासून । तुझ्या ठायीं धारिले प्राण । तुजविण प्रियतम नेणों आन । निजसुख संपूर्ण तूं आमुचें ॥ ४५ ॥ बाळपणींची तुझी गोठी । ऐकोनि हांव उपजे पोटीं ।

---

पाठभेद :— * संग्रहभाषा श्लोकछंद ( उ. ). † प्रेम ( उ. ).

१ अंधकार बहुत ज्यांत अशा वृक्षांमध्ये. २ लक्ष्मी. ३ तुझा.

जे दोहीं बाहीं तुझ्या कंठीं । घालूनि मिठी कवळावें ॥ ४६ ॥ विशेष झालिया दर्शन । मधुमक्षिकाकार नयन । नुठती तव तनूपासून । तनुमनप्राण वेधती ॥ ४७ ॥ भाग्यें स्पर्श जेव्हां घडे । तैं मन्मथसुखाची खाणी उघडे । चुंबनालिंगनाचेनि पाडें । तुकितां नावडे कैवल्य ॥ ४८ ॥ दर्शन स्पर्शन संस्तोभन । ऐसें वेधी[1] तनुवाङ्मन । वियोगीं त्वन्निष्ठ आमुचे प्राण । अन्यचिंतन विसरले ॥ ४९ ॥ एवं जन्मापासूनि आमुचें । तनुमनप्राण जीवित साचें । तुझेनि छंदें सदैव नाचे । दुसरें न रुचे* प्रिय कांहीं ॥ ५० ॥ जन्मादारभ्य जेंवि कुमुदिनी । ग्लौ[2] लक्षितां न पवे ग्लानि । किंवा यावज्जन्म§ पद्मिनी । भोगी दिनमणि तन्निष्ठ ॥ ५१ ॥ आम्ही त्वयिधृतासवा[3]† तशा । जन्मादारभ्य श्रीपरेशा । ज्यां दिवसांची धरूनि आशा । त्या या निशा संप्राप्ता[4] ॥ ५२ ॥ लांगलकर्षणादारभ्य[5] कष्ट । धान्यपचनादि वाढिलें ताट । तें पळवितां हृदयस्फोट । तैसी चटपट हे आम्हां ॥ ५३ ॥ तुझेनि जन्में व्रजसमग्र । असतां आनंदनिर्भर । तावक वधूगण विरहातुर । तूतें गह्वर हुडकीतसे ॥ ५४ ॥ तुझेनि जन्में सुखसागरीं । निमग्न असतां चराचरीं । आम्ही तावकी विरहातुरी । दुःखलहरी भोगितसों ॥ ५५ ॥ चोष्य[6]खाद्यादि पदार्थ जेंवि । दशनव्यापारें रसना सेवी । तेणें आपादतनु टवटवी । परी न फवे ते चवी दशनांतें ॥ ५६ ॥ तैसें न करूनि जनार्दना । करी आमुची संभावना । नातरी आमुच्या करितां हनना । अघ सर्वज्ञा तव माथां ॥ ५७ ॥ आपणा प्रकट दावूनि नयनीं । आमुची निरसीं मनसिज[7]ग्लानि । सदयहृदया आमुचे हननीं । काय म्हणोनि प्रवर्तसी ॥ ५८ ॥ अधोर्ध्व आग्नेय पश्चिमभागीं । दक्षिण उत्तर दिङ्मार्गीं । तुजचि पाहों जी सर्वांगीं । बाह्यांतरंगीं अखंड ॥ ५९ ॥ ऐसा वधूगण तवासक्त । जाणोनि मारणें हें अनुचित । मारणें कैसें म्हणसी येथ । तरी तें यथार्थ अवधारीं ॥ ६० ॥ विरहविवश सर्व ललना । जैसी आवडी जिचिया मना । ते ते तैसी करी जल्पना । पृथक्सूचना सर्वत्र ॥ ६१ ॥ त्यांमाजि एकी आभीर[8]वनिता । आंगीं लावूनि हिंसकता । प्रतिपादिती त्या श्लोकार्था । धरित्रीनाथा शुक सांगे ॥ ६२ ॥

शरदुदाशये साधुजातसत्सरसिजोदरश्रीमुषा दृशा ।
सुरतनाथ तेऽशुल्कदासिका वरद निघ्नतो नेह किं वधः ॥ २ ॥

सरसिजें शरत्काळिंचीं तळां । विकसितें तयांतिल चित्कळा ।
हरुनि माखिल्या नेत्रमार्गणें । फुकट किंकरी हे न मारणें ॥ २ ॥ हरिदया०

शरत्काळींच्या उदकाशया । माजि सद्गुणसमुच्चया । सहित विकासितां कुशेशयां[9] । अरुणकोमळ जे लक्ष्मी ॥ ६३ ॥ अन्य ऋतूंचीं तडागअंभें‡ । संभव सरसिरुहगतगर्भें[10] । शरत्समसाम्य

पाठभेद :— *वचे ( उ. ). §यावज्जीव ( उ. ). †–सर्वा तैशा ( मुं. ). ‡तटाकअंभें. ( उ. ).

१ चिंती. २ चंद्र. ३ तुझ्या ठिकाणीं प्राण ज्यांचे अशा. ४ येऊन पोंचल्या. ५ नांगर ओढण्यापासून. ६ चोखून खाण्याचा पदार्थ. ७ कामसंताप. ८ गोपिका. ९ कमळें. १० रक्तकमळ.

श्री न शोभे । वरवालभें साधुत्व ॥ ६४ ॥ ते श्री हरूनि तव लोचनें । आम्ही विरहिणी कटाक्षबाणें । विंधितां हनना काय उणें । कीं शस्त्राविणें हा वध नोहे ॥ ६५ ॥ प्रेष्ठ अभीष्ट सुरतनाथा । वरदा निरशी मन्मथव्यथा । फुकट दासी तव पदप्राप्ता । आम्ही समस्ता-विरहिणी ॥ ६६ ॥ शरत्-सरसिजलक्ष्मीहरणें । तद्भासादृशकटाक्षबाणें । फुकट दासी कां वधितां प्राणें । तुज हीं दूषणें न लगती ॥ ६७ ॥ कीं यासि वध म्हणों नये । शस्त्रासारिखे न दिसती घाये[1] । परी मारणें मंत्र-प्रयोगप्राय । अक्षत प्रळय होतसे ॥ ६८ ॥ रसाळ स्वादिष्ट शुभ पक्कान्नें । भोक्ता सेवितां प्रियतम-पणें । मरण पावे दृग्दूषणें† । स्मराक्त नयनें हें तैसें ॥ ६९ ॥ मोल न वेचितां किंकरी । आम्ही अनुकूळ मन्मथसमरीं । असतां विंधूनि लोचनशरीं । नव्हे श्रीहरि वध काय ॥ ७० ॥ जरी तुज मारणें होतें आम्हां । तरी कासया मेघश्यामा । बहुधा निरसूनिया दुर्गमा । रक्षणकामा आंगविलें ॥ ७१ ॥ मागें रक्षूनि बहु संकटीं । स्मराक्तदृग्बाणांची वृष्टि । करितां पशुघ्ना परिपाटि । पोसून शेवटीं पशुहनना ॥ ७२ ॥ म्यां कैं कोण्हां रक्षिलें म्हणसी । तरी तें गोविंदा परियेसी । विदित मर्त्यां अमर्त्यांसी । तें तुजपाशीं निवेदितों ॥ ७३ ॥

विषजलाप्ययाद्व्यालराक्षसाद्वर्षमारुताद्वैद्युतानलात् ।
वृषमयात्मजाद्विश्वतोभयादृषभ ते वयं रक्षिता मुहुः ॥ ३ ॥

विषजलें क्षया पावतेक्षणीं । अघअरिष्टकां वातवर्षणीं ॥
मयसुतादिकां पासुनी अम्हां । जिवविणें तुझें व्यर्थ काय मा ॥ ३ ॥ हरिदया०

ऋषभ ऐसें संबोधन । श्रेष्ठत्वाचें प्रशंसन । कीं जें अंगीकृताचें हनन । श्रेष्ठांपासून न घडावें ॥ ७४ ॥ तुझें श्रेष्ठत्व म्हणसी कैसें । निजकृपाकटाक्षपीयूषें । ब्रह्मांडपाळणीं अनायासें । पटुतर ऐसें श्रुति गाती ॥ ७५ ॥ कालियविषाक्तयमुनावारि[3] । प्राशितां गोगोपां बोहरी[4] । त्याच्या शोकें हे व्रजपुरी । प्रळयपरवरीं¶ प्रविष्ट ॥ ७६ ॥ तेव्हां कृपावलोकामृतें । जीवविलीं समस्तें प्राणियें मृतें । विदित तव यश हें त्रिजगातें । कीं आमुतें ना म्हणसी ॥ ७७ ॥ वत्सें वत्सप अघासुरें । बकानुजें राक्षसें क्रूरें । गिळिलें त्यांच्या शोकभरें । समग्र व्रजपुरें संहरतां ॥ ७८ ॥ तुवां फोडून अघाचा घसा । व्रजवत्सपां वत्सांसरिसा । कृपाकटाक्षपीयूषरसा । वर्षोनि आपैसा वांचविला ॥ ७९ ॥ वनीं गिळितां वडवानळा । प्राशून वांचविलें गोकुळा । इंद्र वर्षतां प्रळयजळा । धरिलें अचळा कारुण्यें ॥ ८० ॥ विद्युत्पात जळ अचाट । माजि जलगारा घनदाट । तेणें व्रजपुर पावतां कष्ट । तुवां उद्भट गिरि धरिला ॥ ८१ ॥ अरिष्टनामा वृषभासुर । व्योम* मयासुराचा कुमर । त्यांचा करूनिया संहार । अक्षत व्रजपुर रक्षिलें ॥ ८२ ॥ कृष्णविरहें विवशवाणी । हरियश

---

**पाठभेद :**— † दृग्भूषणें ( उ. ). ¶ परिवारीं ( मुं. ). * जो ( मुं. ).

१ आघात, घाव. २ श्रेष्ठ. ३ कालियाविष मिसळलें आहे ज्यांत असें पाणी. ४ नाश.

गाती व्रजकामिनी । भूतभविष्यद्वर्तमानीं तृणावर्त्तादि व्योमांत† ॥ ८३ ॥ रासक्रीडेच्या प्रसंगीं । वृषभासुरा श्रीकृष्ण भंगी । ऐसिया महाविघ्नीं अनेगीं । कृपेनें वेगीं रक्षिलें ॥ ८४ ॥ ऐसिया प्रळयीं वांचिवणें¶ । आजि मारावें कटाक्षबाणें । ऋषभ येणें संबोधनें । कीं न लवीं हें उणें श्रेष्ठत्वा ॥ ८५ ॥ वारंवार संरक्षिलें । शेखीं कटाक्षबाणें वधिलें । हेंही यशाचिया माजि पडिलें । तरी मिरविलें पाहिजे ॥ ८६ ॥ स्वगृहीं त्रिजगा पाहुणेर । कुटुंबालागीं निराहार । तेंवि विश्वअवनार्थ तवावतार । स्वभक्तनिकर¹ उपेक्षूनी ॥ ८७ ॥ तरी हें अनुचित जगदात्मया । जरी म्हणसी तूं नंदजाया । स्वभक्त म्हणोनि तोषवावया । आलों निलया तयेच्या ॥ ८८ ॥ अनपत्य² नंदनारी । म्हणोनि चिंती मज अंतरीं । यास्तव जन्मोनि तिचे उदरीं । केलें दूरी वंध्यत्व ॥ ८९ ॥ ऐसें न म्हणावें श्रीपति । वृत्तांत विदित आम्हांप्रति । विरिंचीनें केली विनति । तैं तूं क्षितीं अवतरसी ॥ ९० ॥

न खलु गोपिकानंदनो भवानखिलदेहिनामंतरात्मदृक् ।
विखनसार्थितो विश्वगुप्तये सख उदेयिवान्सात्वतां कुले ॥ ४ ॥

नव्हसि गोपिकातोषदायक । हृदयसाक्षि तूं विश्वनायक ।
विनवितां विधी विश्वरक्षणीं । यदुकुळीं तुझें जन्म ते क्षणीं ॥ ४ ॥ हरिदया०

सख्या निश्चयेंशीं तूं पाहीं । यशोदानंदन† नव्हसी कांहीं । विश्वात्मा तूं सर्वां देहीं । बुद्धिसाक्षी विश्वदृक्³ ॥ ९१ ॥ म्हणसी बुद्धिसाक्षी जो विश्वदृक् । तो व्यापक सर्वात्मक । मी गोरक्ष नंदतोक⁴ । सगुण पृथक् परिच्छिन्न⁵ ॥ ९२ ॥ यदर्थीं ऐकें पुरुषोत्तमा । विश्वपाळणाकारणें ब्रह्मा । तुज प्रार्थूनि मेघश्यामा । धरवी जन्मा यदुकुळीं ॥ ९३ ॥ ते ब्रह्मयाची मानूनि विनति । विश्वपाळणार्थ श्रीपति । यदुकुळीं जन्मलासि निश्चितीं । आम्हांप्रति विदित हें ॥ ९४ ॥ जरी तां* विश्व प्रतिपाळणें । तरी आम्हांसीच कां संहारणें । नेत्रकटाक्षें कामबाणें । कवण्या गुणें हें सांग ॥ ९५ ॥ न दाखवूनियां विषमभेदा । स्वभक्तपाळक आनंदकंदा । पुरवीं मनोरथा चतुर्विधा । चतुःश्लोकोक्तां⁶ परिसोनी ॥ ९६ ॥ मस्तकीं ठेवीं पद्मकर । जीववीं दावूनि वदनचंद्र । चरणें मर्दीं पयोधर । देईं अधरामृतपान ॥ ९७ ॥

विरचिताभयं वृष्णिधुर्य ते चरणमीयुषां संसृतेर्भयात् ।
करसरोरुहं कांत कामदं शिरसि धेहि नः श्रीकरगृहम् ॥ ५ ॥

शरण संसृतिभ्याडें⁷ जे अले । अभय श्रीकरें त्यांसि वोपिलें ॥
परिणिली हरी ज्या करें रमा । धरिं शिरीं तया पाणि शंतमा ॥ ५ ॥ हरिदया०

पाठभेद :— † वेदांत ( मुं. ). ¶ वांचविणें ( मुं. ). † –नंदनचि ( उ. ). * त्वा ( मुं. )

१ स्वभक्तांचा समुदाय. २ अपत्यहीन. ३ सर्व पहाणारा. ४ नंदाचें मूल. ५ व्याप्त. ६ चार श्लोकांमध्यें सांगितलेला. ७ संसारास भ्यालेले.

प्रथम प्रार्थना निजकर शिरसा । ठेवीं म्हणोनि तुज परेशा । प्रार्थितसों तो शंतम कैसा । पद्म हस्त हें अवधारीं ॥ ९८ ॥ वृष्णिवरिष्ठा परिसें वहिलें । जे संसारीं* भय पावले । ते तव चरणा शरण आले । श्रमित झाले म्हणोनी ॥ ९९ ॥ पचतां विष्ठेच्या दार्थरीं । विसंचितां षड्विकारीं । तापत्रयाग्नीमाझारीं । बळें षड्वैरि भाजितां ॥ १०० ॥ स्वर्गीं नरकीं मानवलोकीं । भ्रमतां पचतां कुंभपाकीं । मरमरू उपजतां योनिमुखीं । जे भवदुःखीं भयभीत ॥ १ ॥† बुडतां सांपडे जेंवि उथळ‡ । क्षुधिता अन्न तृषिता जळ । तेंवि त्यां सत्संगें तव पदकमळ । निर्भय स्थळ सांपडलें ॥ २ ॥ पुन्हा संसृति लागेल पाठीं । ऐसिया भयास्तव सदृढ मिठी । घालूनि अभेदप्रेमा पोटीं । धरूनि मुकुटीं पद धरिले ॥ ३ ॥ तयां संसारशत्रुभीतां । जाणोनि स्वचरणशरण-प्राप्तां । होसी ज्या हस्तें अभयदाता । तो पद्मकर माथां धरीं आमुचे ॥ ४ ॥ आणि दैत्यीं त्रासितां सुरवर । समरीं होऊनि पराजयपर । करिती कारुण्यें नामोच्चार । तैं त्यां वरद कर कामद जो ॥१०५॥ कीं स्वभक्तांचे अनेक काम । पुरविता जो कल्पद्रुम । आमुचे शिरीं पाणिपद्म । ठेवीं शंतम श्रीकांता ॥ ६ ॥ तैसीच कमला चंचळपणें । सर्वत्र शिणतां विश्रांति नेणे । तयेसि हृदयीं निश्चळ करणें । पाणिग्रहणें ज्या हस्तें ॥ ७ ॥ शैर्मद तें करसरोरुह । आमुचे माथां करूनि स्नेह । ठेवूनि निरसीं दुस्तर विरह । निःसंदेह सुख वोपीं ॥ ८ ॥

व्रजजनार्तिहन्वीर योषितां निजजनस्मयध्वंसनस्मित ।
भज सखे भवत्किंकरीः स्म नो जलरुहाननं चारु दर्शय ॥ ६ ॥

व्रजविपत्ति तूं नाशितां हरी । स्वजनगर्व जो सस्मितें हरी ।
प्रकटवीं सख्या किंकरी अम्हां । कुमुदकानना वक्त्रचन्द्रमा ॥ ६ ॥ हरिदया०

तंव आणिखी म्हणती व्रजयोषिता । स्वभक्ताचा तूं गर्वहर्ता । व्रजजनदुःखाचा निहंता । आमुचा तत्त्वता प्राणसखा ॥ ९ ॥ दीक्षित स्मरयज्वा तूं चतुर । म्हणोनि संबोधन हे वीर । तुझ्या किंकरी विरहातुर । वदन फुल्लार दावीं आम्हां ॥ ११० ॥ ईषन्मात्र हास्यवदन । करूनि करिसी स्मयभंजन । योषितांचें नवल कोण । तैं गर्वापहरण विधिहरां ॥ ११ ॥ तव किंकरी प्रार्थितों तुज । आमुचे कामने सरिसा भज । परम सुंदर वदनांबुज । दावीं सहज जगदीशा ॥ १२ ॥ आम्हां योषितांचा अंगीकार । करूनि मस्तकीं ठेवीं कर । दावीं वदनांबुज सुंदर । करुणाउत्तर परिसोनी ॥ १३ ॥ तंव आणिखी म्हणती करुणानिधि । अवघड न मगों तुज त्रिशुद्धी । स्वजनासमान आमुचा आँधि । करुणानिधि छेदावा ॥ १४ ॥

**पाठभेद :—** * संशृति–( मुं. ). † १०१ ही ओवी मुंगी-प्रतींत नाहीं. ‡ उतळ ( उ. ).

१ थरांत, ढिगांत. २ विकार पावतां. ३ सुखदायक. ४ हस्तकमल. ५ कामशांत्यर्थ ... णारा.
६ गर्वाचा नाश. ७ मनोव्यथा.



प्रणतदेहिनां पापकर्षणं तृणचरानुगं श्रीनिकेतनम्।
फणिफणार्पितं ते पदांबुजं वृणु कुचेषु नः कृंधि हृच्छयम् ॥ ७ ॥

पशुपथीं वनीं जाति जीं पदें । जगदघांतकें इंदिरास्पदें ।
फणिफणांवरी रम्य नर्त्तकें । कुचयुगीं धरीं कामकृंतकें ॥ ७ ॥ हरिदया०

**प्रणतजनाहूनि विशेष । आम्ही न मगों तुज निःशेष । सहजस्वभावें निजशरणास । जें निर्दोष पद करिती ॥ ११५ ॥ कृपेकरूनि गोपाळणीं । तूं जैं प्रवर्त्तसी चक्रपाणि । तैं तृणचरांमागें वनीं । चालतां चरणीं कारुण्यें ॥ १६ ॥ तेथ उधळती जे पदरज । भाग्यें ज्यातें स्पर्शती सहज । त्यांचा भंगिती पापपुंज । तैं ते अधोक्षजमय होती ॥ १७ ॥ यामाजि तुझें वेंचे काय । सहज स्वभावें लागतां पाय । चराचराचें कल्मष जाय । भास्करोदयें तम जैसें ॥ १८ ॥ हें व्हावया काय कारण । विश्वश्रियेचें चरणीं स्थान । सुरसरितेचें जन्मभुवन । ऐश्वर्यदान अघहरणें ॥ १९ ॥ तें पद आमुच्या स्तनावरी । ठेवूनि मर्दीं शंकरवैरि । जरी तो म्हणसी बाळिष्ठ भारी । तरी अवधारीं श्रीरमणा ॥ १२० ॥ कालियफणी दुर्मददर्प । चरणीं मर्दिला सप्रताप । तेथ बापुडा वधूकंदर्प । पदप्रक्षेप सहावया ॥ २१ ॥ म्हणसी कामें जिंकिलें त्रिजग । त्याचा चरणें न घडे भंग । तो कामविजयाचा प्रसंग । वर्त्ते सांग तव चरणीं ॥ २२ ॥ तव पदपंकज केवळ रथ । विजयोर्जित केतुसहित । कंदर्पमदगज मदोन्मत्त । तद्दमनार्थ अंकुश ॥ २३ ॥ निर्दयकंदर्पगिरि कठोर । भंगावया चरणीं वज्र । मन्मथ चंचळ भ्रमराकार । पद्म फुल्लार वेधक त्या ॥ २४ ॥ स्मरानिवासें दे अपयश । यशदव† त्या करी नाश । मन्मथोदयें अगाध दोष । गंगा* निःशेष ते नाशी ॥ १२५ ॥ ऐशी मन्मथजयसामग्री । तव पदकमळीं लक्षूनि पुरी । आम्ही प्रार्थूं विरहातुरी । कुचीं क्षणभरी पद ठेवीं ॥ २६ ॥ इत्यादि ऐश्वर्यमंडितपद§ । आमुचे कुचीं ठेवूनि विशद । कामशत्रूचा करीं छेद । वोपीं आनंद दासींतें ॥ २७ ॥ कुचसंज्ञा हे रतिगौरवें । साधकीं हृत्पंकज लक्षावें । हृदयीं पदाब्ज स्थिर व्हावें‡ । येणें भावें वधूग्लानि ॥ २८ ॥ तंव एकी म्हणती मन्मथशरीं । मरोनि पडिलों स्मरपंजरीं । अधरामृतें त्वां झडकरीं । निजकिंकरीं जीववाव्या ॥ २९ ॥**

मधुरया गिरा वल्गुवाक्यया बुधमनोज्ञया पुष्करेक्षण।
विधिकरीरिमा वीर मुह्यतीरधरसीधुनाप्याययस्व नः ॥ ८ ॥

मधुर उत्तरें पंडितप्रियें । कमललोचना बोलसी स्वयें ॥
अनुचरी तिहीं व्याकुळा हरी । अधरअमृतें प्राण मोहरीं ॥ ८ ॥ हरिदया० ॥

---

**पाठभेदः**— † यशदयव ( उ. ). * गमति ( मुं. ). §-मंडणपद ( उ. ). ‡ स्थिरावें ( उ. ).

१ जगत्पापनाशक. २ लक्ष्मीनिवासस्थानें. ३ कामच्छेदक. ४ शंकर शत्रु ज्याचा तो मदन. ५ मदन हाच मत्त गज. ६ यश हाच वणवा. ७ वांचव.

फुल्लारपुंडरीकनयना । म्हणसी किमर्थ पावलां मरणा । तुझिये वाणीच्या मधुरपणा । समस्त अंगना मोहग्रस्ता ॥ १३० ॥ कैसी मधुर म्हणसी गिरा । सुंदर वाक्यांचा उभारा । जीच्या ठायीं प्रकटोनि खरा । भुलवी चतुरां विपश्चितां ॥ ३१ ॥ शुकप्रमुखमहर्षिमांदी । वैरोचनीच्यां[1] मख-संसदीं[2] । वल्गु[3]वाक्याच्या प्रबंधीं । सुखसंवादीं भुलविली ॥ ३२ ॥ सकळज्ञानियांच्या जो मुकुटीं । हंसविग्रहें तो परमेष्ठी । वल्गु[3]वाक्यप्रबोधपाठीं । सदसद्ग्रांठी उगाविली ॥ ३३ ॥ कमला भुलोनि मृदुभाषणा । किंकरी होऊन सेवी चरणा । ऐसी वाणी बुधमनोज्ञा । तिणें अंगना बोधिल्या* ॥ ३४ ॥ मोहग्रस्ता तव किंकरी । विरहें जर्जर मन्मथशरीं । अधरामृतपानें झडकरी । जीववीं श्रीहरि स्मरतप्ता ॥ १३५ ॥ आम्हांसि तुझिया विरहें करून । निश्चयेंशींच आलें मरण । परी जे करविती कथामृतपान । तेंही संपूर्ण चालविलें ॥ ३६ ॥ तें कथामृत म्हणसी कैसें । नव्हे शतमख[4]भाग्या† ऐसें । त्याहूनि अनंतगुणविशेषें । पुण्योत्कर्षें संप्राप्त ॥ ३७ ॥

तव कथामृतं तप्तजीवनं कविभिरीडितं कल्मषापहम् ।
श्रवणमंगलं श्रीमदाततं भुवि गृणंति ते भूरिदा जनाः ॥ ९ ॥

तव कथासुधा तप्त वांचवी । अघहरा कवी वर्णिती चवी ॥
श्रवणमंगला श्रीमदाकुला । कथक देति भू भूरि सोहळा ॥ ९ ॥ हरिदया०

स्वर्गसुधेहूनि आगळें । कथामृत हें कैसेनि कळे । तरी जें शुकें प्रज्ञाबळें । तुकिलें स्वलीले संवादीं ॥ ३८ ॥ तव गुणमहिमेची जे‡ कथा । तेंचि परमामृत तत्त्वता । म्हणसी यदर्थीं हेतु कोणता । तो तत्त्वता अवधारीं ॥ ३९ ॥ सुधा स्वर्गस्थ पिती अमर । ते तप्त त्रितापीं शतमख[5]प्रवर । कथामृत हें त्रितापहर । निववी सत्वर संतप्तां ॥ १४० ॥ आणि ब्रह्मनिष्ठ सनकादि जे जे । तिहीं तव कथामृतातें स्तविजे । अमृतासहित आमुष्मिका जे । वांत[6]वोजे मानिती ॥ ४१ ॥ स्वर्गामृतें पातक पोषे । मुख्य अमरेंद्र अहल्यादोषें । लिप्त झाला कामावेशें । मा इतर कायसे सुरसाध्य ॥ ४२ ॥ कथापीयूष कल्मषहरणीं । समर्थ जैसा तमोहर तरणि । कीं अघौघहंत्री मंदाकिनी । जे हरिचरणीं जन्मली ॥ ४३ ॥ अमृतपानें अमरांप्रति । पुण्यक्षयें स्वर्गच्युति । कल्मषवृद्धि भवदुर्मति । पुनरावृत्तिप्रद होय ॥ ४४ ॥ अमृतपानें अनंग वाढे । अप्सरासुरतीं मग पवाडे । कृतसुकृता हानि घडे । कर्म उघडे तैं तें कीं ॥ १४५ ॥ श्रवणें कथामृतपान करितां । भंग होय आ[8]कल्पदुरिता । अविद्याकामकर्मांची वार्ता । निरसी तत्त्वता निःशेष ॥ ४६ ॥ अविद्याकामकर्मां जैं क्षय । तैं कैवल्यामृत स्वयेंचि होय । परी सुरा[9]सहोदरा ऐसें नोहे । पुन्हा भवभयप्रद हें कीं ॥ ४७ ॥ श्रवणमात्रें

---

पाठभेद :— * मोहिल्या ( मुं. ), वेधिल्या ( उ. ). † –भोग्या ( उ. ). ‡ हे ( उ. ).

१ बलीच्या. २ यज्ञमंडपांत. ३ मधुर. ४ इंद्राच्या ऐश्वर्यासारखें. ५ इंद्रादि. ६ वमनासारखें. ७ शिरे. ८ कल्पपर्यंत केलेलीं पापें. ९ सुरेचें भावंड अमृत.

मंगलकारी । बुडतां तारी भवदुस्तरीं । पामर मोक्षश्रियेतें वरी । श्रवणाधिकारी झालिया ॥ ४८ ॥ कथामृत पडतां अळुमाळ श्रवणीं । वाढवी अक्षय मंगळश्रेणी । अमंगळकाळिमळप्रक्षाळूनी । बैसवी मूर्ध्नीं अमरांचे ॥ ४९ ॥ अमरामृताचें होतां श्रवण । असुरनिर्जरीं मांडिला प्रयत्न । तेणें त्रिजगा उद्देलें विघ्न । क्षीराब्धिमथनप्रसंगें ॥१५०॥ ज्याचा उदय होतां विशद । असुरां सुरां जे कलहमद । प्रथम राहूनें घेतां स्वाद । मौळच्छेद पावला ॥ ५१ ॥ अद्यापि मीमांसेचें कथन । सकामयाज्ञिका होतां श्रवण । हांवे भरूनि करिती यज्ञ । अप्सरामैथुन वांछूनी ॥५२॥ एवं अविद्याकामकर्मबुद्धी । अमरामृतामाजि हे सिद्धि । कथामृत छेदी भयोपाधि । परमानंदीं समरसवी ॥ ५३ ॥ श्रीमत्पदाचें व्याख्यान । अमरामृत श्रीसंपन्न । तो श्रीमदमादक पूर्ण । स्वदौर्जन्य विस्तारी ॥ ५४ ॥ कथामृताची कैसी शोभा । प्रकटे शांतिक्षमेची प्रभा । चाखवी स्वानंदाचा गाभा । कीर्ति स्वलाभा विस्तारी ॥ १५५ ॥ ऐसें कथामृत भूतळीं । विस्तारिती जे कीर्तनशाळी । अनुग्रहरूपें सप्रेमळीं । श्रोतृमंडळीं प्रबोधिती ॥ ५६ ॥ ते भूतळींचे कल्पतरु । तुकितां बहुधा ते उदार । अमरद्रुमदाता नश्वर‡ । अक्षयईश्वर हे करिती ॥ ५७ ॥ ज्याच्या कथामृतश्रवणपानें । पामरें मोक्षश्रीसंपन्नें । होती त्यांतें* निर्जर नमनें । करिती स्तवनें विधिहरही ॥ ५८ ॥ अनंतकल्पीं दानें बहळ । करूनि तोषविला घननीळ । त्या सुकृतें कीर्तनशील । सप्रेमळ हरिजन ते ॥ ५९ ॥ कथामृताच्या अनुग्रहें करून । त्रिजगीं तेचि वदान्य मान्य । मा प्रत्यक्ष ज्यांसि घडे दर्शन । ते जन धन्य कें§ पुनः ॥१६०॥ यास्तव आतां प्रकट होईं । आम्हां प्रत्यक्ष दर्शन देईं । आनंदनिर्भर आमुच्या ठायीं । सुरतनवाई विस्तारीं ॥ ६१ ॥ जरी म्हणसी तूं मत्कथाश्रवणें । फावती समस्त सुखकल्याणें । तरी तुम्हींही कथामृतश्रवणपानें । अभीष्ट भोगणें रतिलास्य ॥ ६२ ॥ किमर्थ वाढवीं दर्शनीं हांव । ऐसा स्वामि न धरीं भाव । तव विलासें कामोद्भव । आमुचे जीव जाचितसे ॥ ६३ ॥ कथाश्रवणें त्याचें शमन । न घडे म्हणोनि तव दर्शन । इच्छितसों तरी कृपा करून । प्रकट होऊनि निववावें ॥ ६४ ॥ ते मद्विलास म्हणसी कैसे । कथिले न वचती जे विखनसें । संकेतार्थ अळुमाळसें । वदतां परेशें परिसावें ॥ १६५ ॥

प्रहसितं प्रिय प्रेमवीक्षणं विहरणं च ते ध्यानमंगलम् ।
रहसि संविदो या हृदिस्पृशः कुहक नो मनः क्षोभयंति हि ॥ १० ॥

हसित पाहणें प्रेमउत्सहें । विचरणें तुझें ध्यानभाग्य हें ॥
झुरतसों मनीं एकल्या घरीं । स्मरभरें मनें क्षोभवी शरीं ॥ १० ॥ हरिदया०

भो भो प्रियतमा शार्ङ्गी† । विलासरसिकता तुझ्या आंगीं । एकांत रतिरंगप्रसंगीं । ज्या ज्या

---

पाठभेद :— ‡ नैश्वर ( उ. ). * ज्ञाते ( मुं. ). § किं ( उ. ). † शारङ्गी ( मुं. ).

१ कल्पवृक्ष. २ उदारमनस्क. ३ ब्रह्मदेवानें.

लिंगीं विहरसी ॥ ६६ ॥ स्मित प्रहासित† मंदस्मित । हास्यप्रभेद ऐसे बहुत । स्निग्धास्निग्ध विशद मुदित । सूचक संकेत वदनींचे ॥ ६७ ॥ प्रेमापांग करुणापांग‡ । व्रीडाक्रीडाबिभीषापांग । कटाक्षमोक्ष ऐसे अनेग । दाविसी अनंगक्षोभक ॥ ६८ ॥ ओष्ठमुद्रा विविधापरी । अर्धमुकुलित अर्धप्रसरी । व्यात्तें आकुंचित आवर्त्ताकारीं । बहुप्रकारीं स्मररसिका ॥ ६९ ॥ अर्ध अधर ऊर्ध्व-दशनीं । धरूनि विंधिसी कटाक्षबाणीं । तरल कपोल भ्रूकंपनीं । आमुच्या मनीं ते कडतरती ॥१७०॥ आजानु¶ चंचल पाणियुगळ । नाभि गंभीर नितंब पृथुल[3] । हंसविन्यासें चरणकमळ । तव गति मंगळ ध्यानस्था§ ॥ ७१ ॥ ठाणमाणगुणलक्षण । रूपरेखा रसिकध्यान । कोटिमन्मथ कुरवंडून । तव लावण्य निरखिजे ॥ ७२ ॥ ध्यान योगियां मंगळप्रद । सविलास तव सौंदर्य हें विशद । आमुचे हृदयीं स्मरउद्बोध । करी प्रसिद्ध कपटिया ॥ ७३ ॥ एकांतविलाससभेच्या ठायीं । कुशल-विलासिनी कवळूनि बाहीं । चुंबनकुचालिंगनीं कांहीं । संकेतनर्मोक्ति ज्या वदसी ॥ ७४ ॥ त्या आमुच्या हृदयाप्रति । स्मरणमात्रें क्षोभविती । स्मरवेदना न साहती । माघमाँ सेगवांपरी ॥ १७५ ॥ माघमानामें वृश्चिकमाता । सेगवनाम तिच्या अपत्यां । उदरांतूनि ते देती व्यथा । तेंवि हृदयीं स्मरतां नर्मोक्ति ॥ ७६ ॥ ऐसी कथूनि विरहग्लानि । पुढती म्हणती चक्रपाणी । तुझ्या ठायीं आत्मार्पणीं । आम्ही विरहिणी अनुरक्ता ॥ ७७ ॥ ऐसें असतां तूं आमुशीं । कां हें कपट आचरशीं । श्लोकयुग्में तदुक्तीसी । शुक नृपासि निवेदी ॥ ७८ ॥

चलसि यद्व्रजाच्चारयन्पशून्नलिनसुंदरं नाथ ते पदम् ।
शिलतृणांकुरैः सीदतीति नः कलिलतां मनः कांत गच्छति ॥ ११ ॥

पशु चरावया नेसि जैं वनीं । पद मृदु तुझे पंकजाहुनी ॥
तिखट दर्भ हे रूतती झणीं । विकळता भरे आमुचे मनीं ॥ ११ ॥ हरिदया०

तुजनिमित्त आमुच्या चित्तीं । उर्षसि[6] प्रदोषीं वेदना उठती । कोण्या प्रकारें त्या तुजप्रति । ऐकें श्रीपति कथितसों ॥ ७९ ॥ भो नाथ हें संबोधन । कीं तुजविण अनाथ प्रमदागण । झाला ऐसें जाणोनि पूर्ण । प्रकटे सघृण[7] होऊनी ॥ १८० ॥ चारावया गोधनासी । जेव्हां व्रजींहूनि कानना जासी । तैं उषःकाळापासूनि क्लेशीं । निजमानसीं जाचतसों ॥ ८१ ॥ तव पदनलिनामळसुंदर । करितां तत्पदीं वनसंचार । यवसंपोटरें तृणांकुर । तीक्ष्णतर झणें रुतती ॥ ८२ ॥ तेणें वेदना होती पदां । या काकुलती दिवस समुदा* । आमुचें चित्त पावे खेदा । सुखप्रदा‖ तुजसाठीं ॥ ८३ ॥ तुज तंव आमुचें स्मरण नाहीं । वनीं स्वानंदें चारिसी गाई । परी आम्हां विसर न पडे कांहीं । आपुले हृदयीं झुरतसों ॥ ८४ ॥ कीं तव चरणां रुतती खडे । तिखट दर्भाचे अगरेंडे । मंजऱ्या

पाठभेद :—† प्रसीत ( मुं. ). ‡ रुचिरापांग ( मुं. ). ¶ जानु ( मुं. ). § ध्यानाढ्ये ( मुं ). * मुदा ( मुं. ). ‖ सुरतप्रदा ( मुं. व उ. ).

१ भय. २ विस्तृत. ३ विशाल. ४ कर्कटी. ५ कर्कटीचीं अपत्यें. ६ पहांटे. ७ सदय. ८ तृणाचीं कुसवें. ९ शेंडा.

**कणिशादि जबेडें । झणें बोरबडे‡ म्हणोनि ॥ १८५ ॥ परम सुकुमार तुझे चरण । त्या तळीं आंथरूं आपुला प्राण । वेदनाभयें सखेद सघृण । दिन संपूर्ण क्रमितसों ॥ ८६ ॥ चित्त गुंततां तुझे चरणीं । अव्यावस्त कर्माचरणीं । आम्ही संसारीं सासुरवासिनी । भोगूं जाचणी तद्योगें ॥८७॥ सासुसासरे भावे देर । विकळ देखोनि कर्माचार । करिती जाचणी अपार । तें नेणें अंतर तव वेधें ॥ ८८ ॥ ते जाचणीहूनि कोटिगुणें । तुझिये चरणीं रुतती तृणें । या काकुळती चित्त शिणे । विश्रांति नेणे अणुमात्र ॥ ८९ ॥ उदयापासून अस्तमान- । पर्यंत करितां पदचिंतन । ऐसें सचिंत आमुचें मन । पुनरागमन जंव देखों ॥ १९० ॥**

दिनपरिक्षये नीलकुंतलैर्वनरुहाननं बिभ्रदावृतम् ।
घनरजस्वलं दर्शयन्मुहुर्मनसि नः स्मरं वीर यच्छसि ॥ १२ ॥

उतरतां दिना कुंतळीं घना । परिस गोरजीं व्याप्त¶ आनना ॥
घडि घडीं विभो दावुनी अम्हां । मनिं मनोजें तूं देसि सत्तमा§ ॥ १२ ॥ हरिदया०

**सर्वां किरणीं अंशुमाळी । परिक्षय पावतां अस्ताचळीं । घेऊनि गोगोपमंडळी । व्रजाजवळी जैं येसी ॥ ९१ ॥ कमलासारिखें फुल्लारमान । आम्हांसि दावूनि निजानन । आमुचे हृदयीं मनसिजबाण । अर्पिसी संपूर्ण तद्योगें ॥ ९२ ॥ कमलसादृश्य कैसें वदनीं । उपमासाहित्य कथी शुकमुनि । तें परिसिजे विचक्षणीं । हरिगुणश्रवणीं रसिकांहीं ॥ ९३ ॥ आनन आवृत नीलकुंतळीं । वनरुह आवृत भ्रमरावळी । वदन धूसर गोरजबहळीं । परागधूळी जैलरुह पैं ॥ ९४ ॥ निशिदिनीं संकोच विकाश पावे । पंचबाणाच्या मार्गणभावें । यास्तव स्मरक्षोभक जाणावें । निजमार्दवें वनरुह पैं ॥ १९५ ॥ तैसें श्रीमुख वारंवार । दावूनि सप्रेम विलासपर । आमुचे हृदयीं क्षोभवी स्मर । तेणें जर्जर होतसों ॥ ९६ ॥ वदनमात्र दावूनि नित्य । आमुचा क्षोभविसी मन्मथ । परंतु देऊनि निजैकांत । मनसिज शांत न करिशी* ॥ ९७ ॥ ऐसा कपटी तूं तत्त्वतां । आम्ही अनन्य तव पदनिरता । आतां सांडूनि कापट्यता† । पुरवी आस्था द्विविध हे ॥ ९८ ॥ श्लोकद्वयें द्विविध विनति । गोपी श्रीकृष्णातें करिती । शुक निवेदी परीक्षिती । ते येथ श्रोतीं परिसावी ॥ ९९ ॥**

प्रणतकामदं पद्मजार्चितं धरणिमंडनं ध्येयमापदि ।
चरणपंकजं शंतमं च ते रमण नः स्तनेष्वर्पयाधिहन् ॥ १३ ॥

शरणतोषकें कंजजार्चितें । अर्पदि ध्येय जीं भूमिमंडितें ।
सुखतमें तुझीं रम्य पाउलें । स्तनिं धरीं अम्हां सर्व पावलें ॥ १३ ॥ हरिदया०

---

**पाठभेद :—** ‡वरबडे (उ.). ¶प्राप्त (मुं.). §त्यासमा (मुं.). *न करिसी तूं (मुं.). †कापद्यता (उ.).
१ कुटिल केशांनीं. २ काम. ३ कमळ. ४ बाण. ५ ब्रह्मदेवानें पूजित. ६ संकटांत.

आधिहरण या संबोधना। करूनि सूचिती विरहशमना। रमणसंबोधनें ललना। पूर्वक्रीडना जाणविती ॥ २०० ॥ भो भो रमणा तव पदपद्म । जेथ कमलेचें सदैव सद्म । स्तनीं ठेवूनि तें शंतम। हृच्छयछद्म छेदावें ॥ १ ॥ जें पदपद्म श्रीपद्मजें। अज्ञानाधिहरणाच्या काजें। भूमि मोजितां वामनें द्विजें। सप्रेमवोजे अर्चिलें ॥ २ ॥ गगनीं झुगारितां पाषाण। जितुका ऊर्ध्व करी गमन। तितुकेंचि पुन्हा पावे पतन। एवं समान सुखदुःख ॥ ३ ॥ तैसें इहामुत्र समस्त। समान सुखदुःखांतें देत। जाणोनि झाले जे विरक्त। दुःखातीत व्हावया ॥ ४ ॥ तयां प्रणतां अक्षय सुख। निःशेष निरसूनियां दुःख। भजनमात्रें नमनात्मक। जें दायक पदपद्म ॥ २०५ ॥ ऐसें प्रणतपूर्णकाम। कारक जें तव चरणपद्म। आमुचे स्तनीं तें शंतम। ठेवीं प्रियतम भो रमणा ॥ ६ ॥ मधुकैटभ मर्दूनि दोन्ही। जे कां मेदोद्भवा[1] मेदिनी। वामनें स्वपदें आच्छादुनी। केली धरणि पवित्र ॥ ७ ॥ कीं गयासुराचे मस्तकीं स्थिर। कीं मर्दितां लवणासुर। कीं भस्मा[2] छळितां नर्त्तनपर। पदफुल्लार भू भोगी ॥ ८ ॥ कीं अमृत वाढितां समुद्रमथनीं। पदविन्यासें मंडित धरणि। कीं क्षत्रकुळाच्या निर्दळणीं। कर्कश ठाणीं रणरंगीं ॥ ९ ॥ किंवा दंडकारण्यीं फिरतां। कीं वत्सें गाई संरक्षितां। हरूनि समस्त दुर्भर§व्यथा। धरणिमंडन पद झालें ॥ २१० ॥ तैसेंच आमुच्या स्तनावरी। पदाब्ज ठेवूनि हृच्छय[3] हरीं। इतुकी प्रार्थना श्रीहरि। अंगीकारीं बटकींची ॥ ११ ॥ प्राप्त होतां विपत्ति नाना। पदाब्ज ध्याती तन्निरसना। त्यांच्या करिसी विपत्तिहरणा। शंतम चरणां ध्यातांचि ॥ १२ ॥ प्रणतजनांचे कामप्रद। पद्मजें अर्चिले परमवंद्य। धरणिमंडन आनंदकंद। स्तनीं तें सुखद पद ठेवीं ॥ १३ ॥ द्विविध विनति जे बोलिली। त्यांमाजि प्रथम निरूपिली। आतां दुसरी याञ्चा केली। ते परिसिली पाहिजे ॥ १४ ॥

सुरतवर्द्धनं शोकनाशनं स्वरितवेणुना सुष्ठु चुंबितम्।
इतररागविस्मारणं नृणां वितर वीर नस्तेऽधरामृतम् ॥ १४ ॥

सुरत वाढवी शोक खंडुनी। स्वरितें[4]वेणुनें चुंबितेक्षणीं।
इतर आवडी सांडवी जना। अधरपान तें वोपि चुंबना ॥ १४ ॥ हरिदया०

कामसमरीं अजिंक धीर। म्हणोनि संबोधिती हे वीर। तुझें अधरामृत मधुरतर। तें सत्वर दे आम्हां ॥ २१५ ॥ अधरपानें सुरत वाढे। अरिवर्गेंशीं शोक बुडे। तें अधरामृत आम्हां आवडे। पाजीं रोकडें प्राणेशा ॥ १६ ॥ सप्तस्वरीं तानमानीं। वेणु चुंबी पूरि[5]तेक्षणीं। अधरामृतोद्भव मधुर ध्वनि। प्रसरे गगनीं जे काळीं ॥ १७ ॥ सर्वांसि अधरामृताचें पान। फावे होतां वेणुश्रवण। तेणें इहामुष्मिक सुखलावण्य। फिकें जाणोनि विसरवी ॥ १८ ॥ मृत्युलोकींच्या‖ नरांप्रति। दुर्लभ इहामुष्मिक सुखसंपत्ति। वेणुश्रवणीं त्यां घडतां रति। पडे विस्मृति भवभानीं ॥ १९ ॥

**पाठभेद :—** § दुर्धर ( मुं. ) ‖ मर्त्यलोकींच्या ( उ. ).

१ मेदापासून उत्पन्न झालेली. २ भस्मासुर. ३ मदन. ४ स्वरयुक्त वेणूनें. ५ मुखवायूनें पूर्ण करिते वेळीं.

**मशकापासूनि ब्रह्मावरी । जितुकी विषयसुखाची थोरी । ते विसरवी क्षणाभीतरी । अधरमाधुरी वेणुमयी ॥ २२० ॥ परमहंस झाले खग । सिद्ध गंधर्व जाले भृंग । अधरसुधाश्रवणानुराग । धरूनि कुरंग मुनि झाले ॥ २१ ॥ ऐसें तुझें अधरामृत । आम्हां देईं रतिसंमत । इतुका जाणवूनि वृत्तांत । कथिती संतत ऐकाग्र्य† ॥ २२ ॥ जंववरी तुझी न घडे भेटी । असतां साम्राज्यसुखाचे पोटीं‡ । तंव त्या अवघ्या दुःखकोटी । दुर्लभ गोठी स्वसुखाची ॥ २३ ॥ ऐसें जाणोनि वीतरागें । सर्वसंगाचा करिती त्याग । अवलंबूनि हंसमार्गें । तव संयोग साधिती ॥ २४ ॥ तैशाचि आम्ही प्रपंचविसरें । तुझ्या ठायीं सप्रेमभरें । फिरतों अनुरागें कांतारें । कीं हें श्रीधरें नोणिजे ॥ २२५ ॥ अनन्यशरण आपणासाठीं । जाणोनि निष्ठुरता हे गोमटी* । सदया कैसी धरवे पोटीं । अघटित गोठी हे वाटे ॥ २६ ॥ अनन्यशरणत्वाचें कथन । करिती दों श्लोकीं विवरण । त्याचि माजि निष्ठुरपण । विस्मय पावोन शंसिती ॥ २७ ॥**

अटति यद्भवानह्नि काननं त्रुटिर्युगायते त्वामपश्यताम् ।
कुटिलकुंतलं श्रीमुखं च ते जड उदीक्षतां पक्ष्मकृद्दृशाम् ॥ १५ ॥

फिरसि तूं हरी काननें दिवा । त्रुटि युगापरी जाय तेधवां ॥
मुख निरीक्षितां शापितों विधी । करित पापण्या व्यर्थ मंदधी ॥ १५ ॥ हरिदया०

**धेनूमागें वृंदावनीं । प्रभाते जातां चक्रपाणि । तेव्हां त्वन्निष्ठ जे जे प्राणी । त्यांची ग्लानि‖ गणवेना ॥ २८ ॥ तूतें न पाहतां नयनीं । पळार्ध थोर युगाहुनी । लोटतां दाटती दुःखश्रेणी । हृदयें फुटोनि उलताती ॥ २९ ॥ तूतें न पाहतां ऐसे दुःखी । पुढती भाग्यें निशामुखीं । येतां देखोनि प्रेमोत्सुकीं । होती सुखी तें ऐक ॥ २३० ॥ आकर्णनयनांच्या शेवटीं । भ्रमरभासुर-कुंतलदाटी । कंदर्पकार्मुकाकार भृकुटी । स्मरशरसुटी अपांग ॥ ३१ ॥ शशिसह अश्विनी नक्षत्र । तैसा वदनसुधाकर । पाहतां उचलले ठाती↑ नेत्र । जेंवि कां चित्र अनिमेष ॥ ३२ ॥ पाहतां चिरकाळ न पुरे धणी । तरळतां अल्पही पक्ष्मणी । तेव्हां विरिंचीलागुनी । जड मूढ म्हणोनि दूषिती ॥ ३३ ॥ ऊर्ध्व पक्ष्मणीयुक्तनयन । किमर्थ सृजिता झाला द्रुहिण । सादर पाहतां श्रीकृष्ण-वदन । मध्य व्यवधान करिताती ॥ ३४ ॥ सादर पाहतां तृषिता नयना । प्राशूनि हृदयीं आणितां कृष्णा । धणी न पुरेचि सहसा जाणा¶ । सुरकामनापडिपाडें§ ॥ २३५ ॥ तव मुख-निरीक्षणीं जें सुख । त्यासम न तुकेचि पीयूख । ज्याचे सहोदर केवळ विख । जें कां शतमख-क्षयकारी ॥ ३६ ॥ ऐशा तव विग्रहासक्ता । आम्ही विरहिणी मन्मथतप्ता । सांडूनि स्वजन माता पिता । आलों अच्युता तुजप्रति ॥ ३७ ॥**

**पाठभेद :—** † एकाग्र ( मुं. ), एकाग्र्य ( उ. ). ‡ साम्राज्याचा पिटीं ( मुं. ), साम्राज्यसुखाचे पाटीं ( उ. ). * मोठी ( मुं. व उ. ) ‖ ग्ला ( उ. ). ↑ओठगति ( मुं. ) ¶ जना ( मुं. ). § सुखकामनापडिपाडें ( उ. ).

१ एकाग्रता. २ विषयासक्तिरहित. ३ संन्याशाचा मार्ग. ४ क्षण. ५ मदनाच्या धनुष्यासारखें. ६ मदनाच्या शराचें मोक्षण. ७ पापण्या. ८ पडदा. ९ शंभर यज्ञांचा नाश करणारें. १० शरीराच्या ठिकाणीं आसक्त.

पतिसुतान्वयभ्रातृबांधवानतिविलंध्य तेऽन्त्यच्युतागताः ।
गतिविदस्तवोद्गीतमोहिताः कितव योषितः कस्त्यजेन्निशि ॥ १६ ॥

सुतपती कुळें बंधु लंधुनी । तुज निमित्त रे पातलों वनां ॥
गति अभिज्ञ तो गीतसंभ्रमीं । कपटि कां वधू टाकिता तमीं ॥ १६ ॥ हरिदया०

गोपी म्हणती भो अच्युत । ज्यातें तव पद झाले प्राप्त । तो जन पुन्हा नव्हे च्युत । आब्रह्म भुवनांत जेंवि होय ॥ ३८ ॥ आम्हीं संप्राप्त ते तव पद । आणि वियोगें हा देसी खेद । म्हणसी कांहीं अधिकारभेद । तरी तूं विशद अवधारीं ॥ ३९ ॥ देहाभिमानेंशीं त्यजिले पति । सहित धनसदनादि संपत्ति । पुत्रममता धरूनि चित्तीं । गोत्राप्रति उबगलों[1] ॥ २४० ॥ बंधु स्वजन सहोदर । देवैर[2] भावे सासु श्वशुर । करूनि सर्वांचा अव्हेर । वृत्ति क्षेत्र उपेक्षिलें ॥ ४१ ॥ सांडूनि सर्वत्र* अभिमान । उल्लंघूनि विधिविधान । आम्हीं सेविले तुझे चरण । अच्युत जाणोन विश्वासें ॥ ४२ ॥ येथूनि आम्ही च्यवलों[3]† जरी । तैं अच्युतत्वाची कवण थोरी । पूर्वापर हें कथिजे जरी । तरी तूं श्रीहरि सर्वज्ञ ॥ ४३ ॥ कैसें आमुचें पूर्वाचरण । भक्ति विरक्ति सप्रेमभजन । चरणां सन्निध आगमन । तूं गति अभिज्ञ जाणसी ॥ ४४ ॥ म्हणसी कां पां उदास झाला । किमर्थ मत्पदा शरण आलां । यदर्थीं तुवाचि वेध केला । तोही कथिला जातसे ॥ २४५ ॥ गीत-जाणत्या तुझिया गीतें । उत्कृष्ट बोधें वेधिलीं चित्तें । तेणें सांडूनि प्रपंचातें । आम्हीं वनातें सेविलें ॥ ४६ ॥ बृहदारण्यीं श्रुतिगायन । कीं वृन्दावनींचें वेणुगान । तेणें वेधलें आमुचें मन । मग तव चरण आश्रयिलें ॥ ४७ ॥ गीतवेत्त्या आम्ही नारी । उद्गीत म्हणिजे सर्वां उपरि । विवरूनि विरक्तीची थोरी । आम्ही संसारीं विरमलों ॥ ४८ ॥ ब्रह्मादिस्थावरान्त विषय । गीतें केले वान्तप्राय । यास्तव धरूनि तव पदसोय । वरिले पाय सप्रेमीं ॥ ४९ ॥ ऐशिया आम्ही पदैकैं-निरता[4] । अनन्यशरणा व्रजयोषिता । दुर्घटें लंघूनि पदसंप्राप्ता । निशि संमता कोण त्यजी ॥२५०॥ अरे कपट्या कितवा[5] शठा । पुरता मायावी तूं कुरठा । जाणोनि वनिता पदलम्पटा । तूं उफराटा उपेक्षिसी ॥ ५१ ॥ शरत्काळींची सचन्द्र रजनी । एकांत सुपुष्पित काननीं । सुंदरी चतुरा वशवर्तिनी । त्यां तुजविण कोण्ही न टकिती† ॥ ५२ ॥ विषयविरक्त आत्माराम । तो तूं एकाचि निष्कामकाम । येर कोण्ही वधूसंगम । स्ववश सकाम न टकिती ॥ ५३ ॥ तरी मज जाणोनि उदास । कासया धरितां माझी आस । ऐसें म्हणसी तरी रहस्य । आमुचें अशेष अवधारीं ॥५४॥ पूर्णकाम तूं निजात्मरमण । म्हणोनि निःसंग उदासीन । जासी विरहिणी उपेक्षून । आमुचें मरण न चुके कीं ॥ २५५ ॥ तव गानवेधें विरहज्वर । तेणें व्यापिलें अभ्यंतर । त्वद्दर्शनें त्यां उपचार ।

पाठभेदः— * सर्वही ( मुं. ). † चवलों ( उ. ). † न टकि कीं ( उ. ).

१ कंटाळलों. २ दीर. ३ भ्रष्ट झालों. ४ केवळ पदभक्तीविषयीं रत झालेल्या. ५ हे धूर्ता.

भेषजसार रतिलास्य ॥ ५६ ॥ पुन्हा वियोग पांचवा झाला । तेणें देहभाव समूळ गेला । विरहज्वरें क्षोभ केला । धुंडूं वैद्याला स्मररुग्णीं ॥ ५७ ॥ तरी सद्वैद्या सदय होईं । स्मरतप्तांतें रतिरस देईं । मृता जीववूनि सुकृत घेईं । स्वयशनवाई हे मिरवीं ॥ ५८ ॥ हृद्रोगाचें विकारकथन । आणि चिकित्सामृताचें जें स्थान । वदती श्लोकद्वयें करून । तें व्याख्यान अवधारा ॥ ५९ ॥

रहसि संविदं हृच्छयोदयं प्रहसिताननं प्रेमवीक्षणम् ।
बृहदुरः श्रियो वीक्ष्य धाम ते मुहुरतिस्पृहा मुह्यते मनः ॥ १७ ॥

पीडितकाम एकांतमंदिरीं । स्मितविलोकनें तृप्त सुंदरी ॥
उरविशालभा लक्षुनी मना । कवाळिजे असी होय वासना ॥ १७ ॥ हरिदया०

तुझिया विलासरासिका उक्ति । चाटु चटुलें संकेतरीति । हृदयीं आठवितां एकांतीं । क्षोभे चित्तीं कंदर्प ॥ २६० ॥ तेव्हां तुझें हास्यवदन । सविलास कटाक्ष मन्मथबाण । विंधूनि वेधिसी तनुमनप्राण । तें सप्रेमवीक्षण आठवे ॥ ६१ ॥ मलयजचर्चित बाहुयुगळ । सालंकृत सुपीन सरळ । उर विशाळ लक्ष्मीबहळ । उदर वर्तुळ तनुमध्य ॥ ६२ ॥ इत्यादि समस्त अवयवस्मृति । आलिंगनार्थ क्षोभे वृत्ति । वारंवार स्पृहा चित्तीं । मोहावर्त्तीं मन भ्रमवी ॥ ६३ ॥ बळें विसर पाडितां न पडे । मूर्ति सालंकृत दृष्टीपुढें । दिसतां सुरतीं हांव वाढे । कवळूं आवडे सप्रेमें ॥ ६४ ॥

व्रजवनौकसां व्यक्तिरंग ते वृजिनहन्त्र्यलं विश्वमंगलम् ।
त्यज मनाक् नस्त्वत्स्पृहात्मनां स्वजनहृद्रुजां यन्निषूदनम् ॥ १८ ॥

व्रजजना तुझी मूर्ति सौख्यदा । सकळ संकटें भंगि आपदा ॥
कृपणता त्यजीं दावि मन्मथें । स्वरत जाळिलों भंगि ते व्यथे ॥ १८ ॥ हरिदया०

व्रजवनीं जयांचीं निकेतें[५] । व्रजवनौकस म्हणिजे त्यांतें । तयां समस्तां प्राणियांतें । प्रियतम वर्त्ते तव व्यक्ति ॥ २६५ ॥ कोमलामंत्रणें[६] म्हणती अंग[७] । तुझी व्यक्ति हे लावण्यसुभग । व्रजजनवृजिनां[८] करी भंग । कृपापांगमोक्षणें ॥ ६६ ॥ सर्व प्रकारें मंगलरूपा । तुझी व्यक्ति हे मन्मथबापा । विशेष आम्हांवरी अनुकंपा[९] । करूनि कंदर्पा परिहरीं ॥ ६७ ॥ हे तव व्यक्ति विश्वमंगल । आम्हां हृच्छय अमंगल । जाळी क्षोभोनि विरहानळ । तो तां* शीतळ करावा ॥ ६८ ॥ आमुच्या मानसा†माझारी । आलिंगनाची स्पृहा भारी । म्हणोनि कार्पण्य परतें करीं । अल्पही धरीं परती ते ॥६९॥

**पाठभेद :—** * त्वां ( मुं. ). † मना ( मुं. ).

१ कामरोगानें ग्रस्त. २ आनंदकारक. ३ सुंदर. ४ चंदनचर्चित. ५ घरें. ६ लाडक्या शब्दांनीं हाक मारणें. ७ अरे. ८ पातकास. ९ दया.

आतां कार्पण्य न करूनि कांहीं । ईषन्मात्रही कृपेनें पाहीं । हृच्छयरोग आमुचे हृदयीं । भेषैज देईं तच्छमना ॥ २७० ॥ दुर्धर हृच्छय जेणें नाशे । तुजपाशीं तें औषध असे । देऊं जाणसी परमरहस्यें । व्रीडाविशेषें वदों न शकों ॥ ७१ ॥ कथिला सनिदान हृच्छयोदय । तच्छमनाचा जो उपाय । भेषजप्रयोगसाधनकार्य । गूढ अभिप्राय सूचिला ॥ ७२ ॥ औत्सुक्यें हे वदल्या गोठी । तंव गमला कृष्णचि पातला निकटीं । वोरैसें रुदन स्फुंदन कंठीं । सप्रेम पोटीं भयभीता ॥ ७३ ॥ भयें कवळूनियां बोलती । प्रियतम कारुण्य काकुलती । ते गोपींची सप्रेम उक्ति । परिसे नृपति शुक सांगे ॥ ७४ ॥

यत्ते सुजात चरणांबुरुहं स्तनेषु भीताः शनैः प्रिय दधीमहि कर्कशेषु ।
तेनाटवीमटसि तद्व्यथते न किंस्वित्कूर्पादिभिर्भ्रमति धीर्भवदायुषां नः ॥ १९ ॥

तव पदांबुजें चूचुंकावरी । हळुच ठेवितां भीतसों हरि ॥
फिरसि काननें त्या पदीं कसा । क्षतभयें बहु जीव हा पिसा ॥ १९ ॥ हरिदया०*

प्रियतमा तुझीं सुकुमार पदें । उपमे असाम्य† तुळितां‡ कुमुदें । स्तनीं मर्दितां मानसमोदें । भरतां खेदें झळंबतसों ॥ २७५ ॥ आंगीं नववयसेचा भर । तेणें आमुचे कुच कठोर । तव पद कुमुदाहूनि सुकुमार । मर्दितां अपार भय मानूं ॥ ७६ ॥ हळुहळु¶ स्तनमंडळीं । मवाळ पदतळ श्रीवनमाळी । स्पर्शूनि भोगूं सुखनवाळी । मर्दनकाळीं श्रमभीता ॥ ७७ ॥ काननें फिरसी तयां चरणें । नांगीकारूनि पादत्राणें । कृपाळुपणें पशुरक्षणें । पूर्णकारुण्यें जगदीशा ॥ ७८ ॥ तेव्हां कंटक चुंबिती§ चरणीं । खडे रुतती कठोर धरणी‖ । क्षतवेदना तिखटां तृणीं । हें अंतःकरणीं भय आम्हां ॥ ७९ ॥ कांटे खडे तृणांकुर । ठेंचा लागती कठोर । फांटे वोरबडती निर्बंर । धांवतां सत्वर गोपृष्ठीं ॥ २८० ॥ सम विषम पाऊल पडे । कोठें अवचके कोठें खडे↓ । सर्प विंचुवादि रगडतां किडे । स्पर्शे रोकडे श्रमकर जे ॥ ८१ ॥ ऐशा अनेक वेदना । होत असतीच तुझिया चरणा । विहारभरें तूं न धारिसी गणना । परी आमुच्या मना जाकळिती ॥ ८२ ॥ तुझिया चरणांतें गवसणी । जीवाप्राणांची चक्रपाणि । करूनि सचिंत अंतःकरणीं । आम्ही सदनीं दिन कंठूं ॥ ८३ ॥ सायंकाळीं अक्षत चरण । देखतां आयुर्ष्याभिवर्धन । जैसें मत्स्यातें जीवन । तवावलोकन तेंवि आम्हां ॥ ८४ ॥ प्रभातेपासून सायंकाळ । वनीं फिरसी अवघा वेळ । आमुची बुद्धि श्रमें व्याकुळ । आयुष्य केवळ तूं आमुचें ॥ २८५ ॥ ऐसिया गोपी कृष्णात्मका । विरहें पावोनि परम दुःखा । न लभोनियां यदुनायका । युगसम घटिका लोटिती ॥ ८६ ॥ एवं अध्यायसमाप्ति ।

**पाठभेद** :—*हरिदयार्णवा प्रेमगौरवा । प्रगट हो सख्या तोष दे जिवा ॥ (मुं.) †आसार (मुं.) ‡ तुकिता (मुं. व उ.) ¶ मग (उ.) § चुबकति (मुं.) ‖ चरणीं (उ.) ↓ खरडे (उ.).

१ औषध. २ निदानासह. ३ स्नेहानें बाहेर फुटणें. ४ स्तनाचें अग्र. ५ न अंगीकारून. ६ जून, कठिण. ७ व्याकुळ करतात. ८ आयुष्य वाढणें.

**गोपिका विरहें सखेद रुदती । हें ऐकोनि सूचिलें श्रोतीं । त्यां येथ श्रीपति भेटविजे ॥ ८७ ॥ तरी अध्यायीं वक्ष्यमाण । परीक्षितीतें शुक भगवान । म्हणे राया यापरी जाण । करिती रुदन गोपिका ॥ ८८ ॥**

श्रीशुक उवाच:—इति गोप्यः प्रगायंत्यः प्रलपंत्यश्च चित्रधा ।
रुरुदुः सुस्वरं राजन्कृष्णदर्शनलालसाः ॥ २० ॥

हरिगुणा अशा गाति सुंदरी । विलपती वनीं त्या परोपरी ॥
रडति गोपिका सुस्वरें धिटा । हरिविलोकना लागिं लंपटा ॥ २० ॥ हरिदया०

**ऐशा गोपी हरिगुणगान । करितां स्मरतां भगवद्ध्यान । स्फुंदन विलाप मांडिलें रुदन । कृष्णदर्शन वांछूनी ॥ ८९ ॥ अनुभूत हरिगुण सुस्वर गाती । विरहें सखेद त्या विलपती । कृष्ण-दर्शना लालसवृत्ति[1] । सांगे भूपती शुकयोगी ॥ २९० ॥ ऐशा बहुधा शोकाकुळा । जाणोनि कृपेचा कोंवळा । करुणा आली त्या घननीळा । प्रकट झाला त्यामाजी ॥ ९१ ॥**

तासामाविरभूच्छौरिः स्मयमानमुखांबुजः ।
पीतांबरधरः स्रग्वी साक्षान्मन्मथमन्मथः ॥ २१ ॥

प्रकट जाहला त्यांमध्यें हरी । हसित ईक्षिल्या गोपसुंदरी ॥
वसनें[2] पीवळें माळ साजिरी । स्मरचि तो दयासिंधुवैखरी ॥ २१ ॥ हरिदया०

**जो कां शूरसेनाचा नातु । शौरिनामें श्रीअनंतु । वदनांबुजें हास्य करितु । गोपीआंतु प्रकटला ॥ ९२ ॥ नवघनभासुरसोज्वळकांति । कंठीं मिरवी वैजयंती । किरीटकुंडलांची दीप्ति । कुंतलमंडितगंडयुगीं ॥ ९३ ॥ माथां मयूरबर्हस्तबक । मृगमदकुंकुमाभिश्रिततिलक । तरळ अपांग सरळ नासिक । कुंदरदन शशिवदन ॥ ९४ ॥ प्रवाळाधर मंदस्मित । आजानुबाहु भूषान्वित । नववनमाळाकौस्तुभयुक्त । मुरलीमंडित करकमळ ॥ २९५ ॥ विद्युद्भासुर पीतांबर । मेखळे क्षुद्र-घंटिकागजर । चरणीं बिरुदांचा तोडर[3] । वांकी नूपुर रुणझुणती ॥ ९६ ॥ मन्मथ मोही नारीनर । त्या मन्मथासही मोहकर । ऐसा सुंदर सालंकार । देखिला श्रीधर गोपींहीं ॥ ९७ ॥ कृष्णदर्शनें परमोत्साहो । गोपी पावल्या तो अध्यावो । ऐकावया सावध राहो । सभाग्य समुदावो श्रोत्यांचा ॥ ९८ ॥ अखिलात्मा जो एकनाथ । चक्रवर्ती भेदरहित । अहंशत्रु सेनेसहित । मर्दूनि मिरवत सुखासनीं ॥ ९९ ॥ श्रवणसुखाचें अन्नसत्र । मुमुक्षुश्रोत्यांलागीं स्वतंत्र । चिदानंदाचें वाढितां पात्र । स्वानंद सर्वत्र भोगिती ॥३००॥ गोविंदाच्या नामस्मरणें । होय भवभणगां[4] पारणें ।**

१ उत्सुकतेची वृत्ति. २ वस्त्र. ३ तोडा. ४ संसारांतील भिकाऱ्यांस.

श्रवणसुखाच्या अगाधपणें । दयार्णव होणें मग तेहीं[1] ॥ १ ॥ तें हें श्रीमद्भागवत । अठरा सहस्र संहितागणित । परमहंसाचा एकांत । शुक समर्थ निरूपी ॥ २ ॥ श्रोता परीक्षिति सावध । त्यामाजि हा दशमस्कंध । गोपीगीत कथिलें विशद । जें श्रवणें मोक्षद श्रोतयां ॥ ३ ॥ दयार्णवाची हे विनवणी । न्यून पूर्ण ग्रंथश्रवणीं । आवडेल* संपादूनी । शुद्ध शोधूनि सांवरिजे ॥ ४ ॥ मी जें वदलों बाळपणें । जीर्ण जाणोनि वृद्धगणनें । मानाल तरी उभयचिह्नें । समसमानें झांकावीं ॥ ३०५॥ बाळ चिवडी विष्ठामूत्र । नग्न झांकलें नेणे गात्र । तेथ मातेचे सदय नेत्र । ते सर्वत्र सांवरिती ॥ ६ ॥ तैसेंच जाणा वृद्धपण । अनावर मळमूत्रांचें क्षरण । देखतां शरीर उघडें नग्न । सदय सज्जन जेवंकिती[2] ॥ ७ ॥ एवं दोहींपरी माझी । विनति संतांचे समाजीं । न्यून पूर्ण ग्रंथीची वांजी[3] । तुमचे माथां मी नेणें ॥ ८ ॥ मी अकिंचैन[4] देऊं काय । भावें तुमचे वंदिले पाय । सांभाळावें जननीन्यायें[5] । सदयहृदय मज बाळा ॥ ३०९ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां गोपीगीतकथनं नामैकत्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३१ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ मूल श्लोक २१ ॥ भाषा श्लोक २१ ॥ ओवीसंख्या ३०९ ॥ एवं संख्या ३५१ ॥ ( एकतिसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १५६१८ ).

एकतिसावा अध्याय समाप्त.

---

**पाठभेद :—** * आढळेल ते ( मुं. ), आडळेल ते ( उ. ).

१ त्यांनीं. २ झांकिती. ३ बोभाट, अपवाद. ४ निर्धन. ५ आईच्या पद्धतीनें.

कृष्णदयार्वणकृत

# ह रि व र दा

## अध्याय ३२ वा

श्रीपरब्रह्मणे नमः। ज्याच्या दर्शनें परमोल्लास। कैवल्यसुखापरिस विशेष। तो गोपीमानसराजहंस। नमूं निर्गमेश गोविंद ॥ १ ॥ जैन मीमांसा पातंजल। सांख्यवैशेषिकादि सकळ। तव दर्शनावीण अकुशल। दर्शनें केवळ अदर्शनें ॥ २ ॥ पूर्वपक्षेंशीं सिद्धांत। हो कां उत्तमांगही वेदांत। तव दर्शनेंवीण असमर्थ। संसारध्वांतें निरसावया ॥ ३ ॥ कैवल्यसुखा तो सर्वगत। भरलें अनुस्यूत संतत। असतां कल्पनाभ्रमें भ्रांत। दुःखावर्ते जग भोगी ॥ ४ ॥ कोणें कैवल्य हिरोनि नेलें। किंवा कोठें रितें भरलें। न्यून पूर्ण हिरवें पिकलें। नाहीं ऐकिलें कें कोण्हीं ॥ ५ ॥ संतत सर्वगत असोनि कायें। जीव जाचती तापत्रयें। जन्ममरणांचे सोसितां घायें। न फवे मायेमाजिवडें ॥ ६ ॥ विसरे नृपातें भद्रासनी-। हुनि सुषुप्ति पांगरूनी। व्याघ्रादिभयाची कणकणी। घालोनि गहनीं भोगविजे ॥ ७ ॥ तैं त्या असोनि भद्रपीठ। निरसूं न शकेचि भय दुर्घट। येथ जागरप्रद जो इष्ट। तो वरिष्ठ सुखदाता ॥ ८ ॥ यालागीं न होतां सद्गुरुभेटी। वेदांतादिशास्त्रकोटी। जैशा बोसणतयाच्या गोठी। वदतां बोठी अनोळख ॥ ९ ॥ तस्मात् श्रीसद्गुरूच्या दर्शनें। वेदशास्त्रांचें साचार जिणें। मोक्षलक्ष्मी अहेवपणें। मिरवी भूषणें स्वसुखाचीं ॥ १० ॥ गोशब्दार्थें निगमनिकर। तत्संवितीं जे आविकार। तीचें मानससरोवर। हंस साचार तूं येथें* ॥ ११ ॥ तस्माद्गोपीहृदयमराळ। तो तूं निगमात्मा निगमपाळ। गोविंदनिगमेश केवळ। नमन आविकळ सप्रेमें ॥ १२ ॥ भेदवर्जित प्रेमोद्रेक। हाचि भजनविशेख। अखंडदर्शनात्मक सुख। प्रकट एक उभयत्र ॥ १३ ॥ ऐसें करितां अभेद स्तवन। सद्गुरु सच्चिदानंदघन। स्वसत्ता आकर्षूनियां मन।

---

**पाठभेद**:— *तेथें (मुं. व उ.).

१ वेदांचा स्वामी. २ मस्तक. ३ संसाररूप अंधकार. ४ सिंहासन.

दिधलें स्मरण ग्रंथाचें ॥ १४ ॥ कृष्णवियोगें विरहाभिभूता । गोपी हुडकितां जाल्या श्रांता । तिहीं पुलिनीं गाइलें गीता । ते गतकथा संपली ॥ १५ ॥ यावरी तयां रुदितां प्रति । कैसा भेटला श्रीपति । तद्दर्शनें हर्षावाप्ति । कैशा युवति पावल्या ॥ १६ ॥ तो वाखाणी बत्तिसावा । गोपी आणि वासुदेवा । जो मिळणीचा स्वानंदठेवा । श्रवणें विसांवा सर्वांसी ॥ १७ ॥ ऐसें सद्गुरु संवेदनें[1] । प्रेरितां प्रज्ञा लाहोनि मन । निरूपी दयार्णवाचें वदन । भाषाव्याख्यान हरिवरद ॥ १८ ॥ गताध्यायीं गायनरूपी । विरहविलाप करिती गोपी । सप्रेम जाणोनि विश्वव्यापी । तत्संकल्पीं कळवळिला ॥ १९ ॥

श्रीशुक उवाच :— इति गोप्यः प्रगायंत्यः प्रलपंत्यश्च चित्रधा ।
रुरुदुः सुस्वरं राजन्कृष्णदर्शनलालसाः ॥ १ ॥

अलंकारार्थ पूर्विलाध्यायीं । श्लोकद्वयें कथिलें पाहीं । पुन्हा प्रारंभीं ये अध्यायीं । तें युग्मकही आदरिलें ॥ २० ॥ शुक म्हणे गा मात्स्यीरमणा । ऐशा पुलिनीं बल्लवललना । कृष्णवेधें विचित्रगाना । करिती रुदना विवशत्वें ॥ २१ ॥ देवतासंचारें झाड वाजे । तेंवि बल्लवी विवश म्हणिजे । येथ गायनविकार जे जे । श्रीकृष्णतेजें प्रस्फुरित ॥ २२ ॥ राग हिंगुळ मालकौशिक । मेघमल्हार दीपक । दारापुत्रेंशीं[2] भैरवप्रमुख । गाती सम्यक बल्लवी ॥ २३ ॥ शुकें कथिलें सुमुखवृत्त । परी त्या विचित्रछंदें बहुत । पद्यें प्रबंध सुस्वरगीत । तालसंगीत गुणमिश्र ॥ २४ ॥ कीं तें जाणों विरहगान । कीं गोपींचें आर्तरुदन । कीं तें श्रीकृष्णगुणकीर्तन । वेधी तनुमन श्रुतिपठनें* ॥ २५ ॥ हृदयीं कृष्णदर्शनआर्ति । येर विवश तनुमनस्मृति । सर्वव्यापी सर्वज्ञमूर्ति । जाणोनि चित्तीं कळवळिला ॥ २६ ॥

तासामाविरभूच्छौरिः स्मयमानमुखांबुजः । पीतांबरधरः स्रग्वी साक्षान्मन्मथमन्मथः ॥ २ ॥

प्रेमा उरवूनि आयासपरा । आदर न होतां पाठिमोरा । विवशवृत्ति श्रमनिर्भरा । वेधें श्रीधरा जाकळिलें ॥ २७ ॥ मग त्या बल्लवी सप्रेम रुदिता । सांत्वनार्थ क्लेशनिहंता । प्रकट झाला मन्मथजनिता । अकस्मात त्यांमाजी ॥ २८ ॥ रातोत्पलदलपदतलमृदुल । इंद्रोत्पलनिभ तनुभा[3] सुनील । घोंटी† वर्तुळ सकोमळ । अंगुळें केवळ नवकळिका ॥ २९ ॥ गुल्फप्रांतीं वांकी वाळे । अंदूनूपुरध्वनि सुताळें । गर्जताती सोहंमेळे । बिरुदमाळे समवेत ॥ ३० ॥ शरणागतां अभयंकर । निजपदभजकां वज्रपंजर । नामस्मरणें भवकुंजर । भंगी तोडर पदपद्मीं ॥ ३१ ॥ नाभीपासूनि गुल्फवरी । चंचल चपल चमत्कारीं । शोभा विचित्र पीतांबरीं । वरी साजिरी मेखळा ॥ ३२ ॥ अनेकभक्तजनांच्या व्यक्ति । सहित चरित्रें अवतारपंक्ति । मेखळे खेवणी[4] वोप देती । क्षुद्रघंटिका

पाठभेद :— * श्रीपठनें ( मुं. ). † घोटें ( उ. ).

१ अनुभवज्ञान. २ गायनांतील रागांच्या स्त्रिया व पुत्र यांसह. ३ देहकांति. ४ कोंदण.

किंकिणी ॥ ३३ ॥ मेखळामध्यमणीची प्रभा । उंमाणी हृदयींच्या कौस्तुभा । मध्येंलोहींव पंकजनाभा । त्रिजगद्गर्भा रजरंगें ॥ ३४ ॥ रोमराजी कोमलतर । जे शोभवी बय किशोर । वैजयंती वैडूर्यहार । वनशृंगार त्या उपरी ॥ ३५ ॥ श्रीवत्सांकित वक्षःस्थळ । कमलानिवासनिकेत अमळ । अनर्घ्य-मौक्तिकमणींची माळ । कंठीं झळाळ दावितसे ॥ ३६ ॥ बाहु सुपीन सोज्वळ सरळ । कूर्परमणिबंध करतळ । सुरेख सामुद्रिकादिमेळ । नख वर्तुळ रत्नाभें ॥ ३७ ॥ केयूरांगदें बाहुवटीं । जडित कटकें द्वयमणगटीं । रत्नजडित मुद्रिकादाटी । दोहीं बोटीं मिरवतसे ॥ ३८ ॥ उदार हनुवटी गंडयुगळ । कंबुकंठ जो निगममूळ । अधरपल्लव सकोमळ । नासिका सरळ जलजाक्ष ॥ ३९ ॥ नयन आकर्ण श्रवणशोभा । कुंतलमंडित कुंडलप्रभा । ललाटपट्टिकेचिया गर्भा । भावी भासुर भागवत ॥ ४० ॥ मयूरबर्हवलयवळित । चंचच्चामीकरमंडित । विचित्रप्रभावैडूर्यजडित । मुकुट मिरवे* मस्तकीं ॥ ४१ ॥ गुंजावतंस सुरंगसुमनें । कर्णीं कर्णिकारें विद्रुमारुणें । दशनदीप्तीचें चांदिणें । स्मित भाषणें फांकतसे ॥ ४२ ॥ केशरमृगमदचंदनतिलक । माणिक्यरंगीं अक्षतसुरेख । दक्षिणगल्लीं अंजनांक । दृक्संपर्कभयहरणा ॥ ४३ ॥ तांबूलचर्चित सृक्किणीभागें । अधर रसना दशन सुरंग । साग्र रसाळ कार्मुक चांग । मिरवी सांग वामकरीं ॥ ४४ ॥ सपूर तगटी पटप्रवारण । दाक्षिणहस्तीं लीलेंकरून । धरिलें पंच कुसुमबाण । जनमोहन जगदात्मा ॥ ४५ ॥ कामिनी वेधती काममार्गणें । कीं मानिनी मन्मथबाणें । कंदर्पकोटि तेंवि भुलवणें । कटाक्षमोक्षणें ज्याचेनी ॥ ४६ ॥ रसाळ रस जैं रसना चरे । तैं कामना कामिकां स्फुरे । सुरतरहस्यें मन्मथ विचरे । तैं रुचिकरें रतिलास्यें ॥ ४७ ॥ तो जगज्जीवन त्रिजगद्भर्त्ता । रस रसज्ञा रससंवेत्ता । कंदर्पकोटीतें भुलविता । मन्मथजनिता वनमाळी ॥ ४८ ॥ मदनदाहक जो मदनारि । तो भुलविला प्रमदाकारीं । नटोनि निमिषामाझारी । थैथैकारीं नाचविला ॥ ४९ ॥ साक्षान्मन्मथाचा मन्मथ । तो प्रमदाप्रणयप्रणतनाथ । प्रकट झाला अकस्मात । वधूकुमुदांत शशी पूर्ण ॥ ५० ॥ कृष्णदर्शनीं गोपिकांसी । अद्भुत उत्साह जो मानसीं । कोंदला तो नृपापाशीं । आनंदेंशीं शुक सांगे ॥ ५१ ॥

तं विलोक्यागतं प्रेष्ठं प्रीत्युत्फुल्लदृशोऽबलाः । उत्तस्थुर्युगपत्सर्वास्तन्वः प्राणमिवागतम् ॥ ३ ॥

प्रकर्षेंकरूनि जो कां इष्ट । तो एक आत्मा सुखसंतुष्ट । म्हणोनि त्यातें बोलिजे प्रेष्ठ । गोपी तन्निष्ठ सप्रेमें ॥ ५२ ॥ परमप्रेष्ठ श्रीकृष्णातें । गोपी चिंतितां सप्रेमचित्तें । अवचित देखोनि उत्फुल्लितें । झालीं सनेत्र मुखकमळें ॥ ५३ ॥ युगपत् म्हणिजे एके क्षणीं । अवघ्या उठिल्या खडबडोनी । जैशा तनु प्राणागमनीं । चेतना लाहोनि टवटविती ॥ ५४ ॥ चंद्र प्रकटतां कुमुदिनी । कीं सूर्यदर्शनीं पद्मिनी । कीं गजयूथपाच्या आगमनीं । मत्त करिणी प्रोल्लसिता ॥ ५५ ॥ तैशा

पाठभेदः— * मिरवत ( उ. ).

१ तुलना करी. २ मध्यभागीं आरक्तता. ३ रत्नकांति. ४ कमलनयन. ५ चकचकीत सुवर्णानें शोभायमान. ६ पोंवळ्याप्रमाणें लाल कर्णिकाराचीं फुलें. ७ दांतांची झळाळी. ८ उजव्या गालावर. ९ काजळाचा तिलक. १० दृष्ट लागण्याचें भय दूर करण्यासाठीं. ११ ओष्ठप्रांत.

उल्हासभरें अबळा । जाऊनि कवळिती तमाळनीळा । पृथगावयवीं गोपी सकळा । तें भूपाळा अवधारीं ॥ ५६ ॥

काचित्करांबुजं शौरेर्जगृहेंऽजलिना मुदा । काचिद्दधार तद्बाहुमंसे चंदनभूषितम् ॥ ४ ॥

उल्हास संभ्रमाच्या भरें । कोण्ही एकी प्रेमादरें । कृष्णकराब्ज उभयकरें । धरिती सत्वर स्मितवक्त्रा ॥ ५७ ॥ बद्धांजलि द्वयकरतळ । माजि कवळिती हरिकरकमळ । वदन करूनियां अळिउळ । प्रेमविह्वळ चुंबिती ॥ ५८ ॥ प्रेमसुभरें कोण्ही प्रमदा । चंदनचर्चितशुभमकरंदा । सहित श्रीकृष्णबाहु खांदा । धरूनि मोदा पावती ॥ ५९ ॥

काचिदंजलिनागृह्णात्तन्वी तांबूलचर्वितम् । एका तदंघ्रिकमलं संतप्तस्तनयोरधात् ॥ ५ ॥

बद्धांजलिकराब्ज[2]युगळा । वोढवूनि[3] एकी वेल्हाळा । चर्वित हरिमुखींच्या तांबूला । घेती झाली सप्रेमें ॥ ६० ॥ मनसिजतापें स्तन संतप्त । हृदयीं कठोर व्यथाभूत । एकी तन्वी तच्छमनार्थ । शंतम धरित पदकंज[4] ॥ ६१ ॥ हृच्छयरूपी[5] हृद्भव[6] गर[7] । जाची केवळ शमनाकार[8] । हरिपदकंज शीतळतर । धरितां सत्वर त्या शमवी ॥ ६२ ॥ एकी उतावीळिया बाळा । वक्षीं स्पर्शिती हरिकरकमळा । एकी चुंबिती वदनोत्पळा । पादाब्जयुगळा पैं एकी ॥ ६३ ॥* एकी हरिभुज आपुले खांदा । चंदनचर्चित धरिती मुग्धा । चर्वित† तांबूल एकी प्रमदा । घेऊनि मोदा पावती ॥ ६४ ॥ ऐसिया निकट संघट्टनीं । मिनल्या औत्सुक्यें विरहिणी । प्रेमसंभ्रमें संतोषूनि । हरिमुख नयनीं निराखिती ॥ ६५ ॥

एका भ्रुकुटिमाबध्य प्रेमसंरंभविह्वला । घ्नंतीवैक्षत्कटाक्षेपैः संदष्टदशनच्छदा ॥ ६ ॥

प्रीतिप्रचुर क्रोधोद्गम । प्रेमसंरंभ तयासि नाम । तेणें विह्वळ हृदयपद्म । पाहे सकाम अपांगीं ॥ ६६ ॥ ऊर्ध्वदर्शनीं[9] अधर दष्ट । आकर्ण भ्रुकुटी कार्मुक[10]कृष्ट । कटाक्षविक्षेप स्मरशरतिखट‡ । मारी उद्धटें[11] ईक्षणीं ॥ ६७ ॥ ललनालोचनकटाक्षबाण । रतिरसरासिक वयसा तरुण । स्मरसमरंगीं साहे कोण । तो एक श्रीकृष्ण स्मरविजयी ॥ ६८ ॥ धीर वीर जे रणचत्वारीं । मृगेंद्र मर्दिती¶ बाहुप्रहारीं । तेही ललनालोचनशरीं । क्षणामाझारीं भंगती ॥ ६९ ॥ योषिताआसव मादकपणें । तुकितां योषिता बहुतां गुणें । आगळी कीजे मादकस्मरणें । येर अवघ्राणें जरी तीव्र ॥ ७० ॥

---

**पाठभेद :--** * ओवी क्र. ६३ व ६४ यांचा क्रम मुंगी प्रतींत उलटा आहे. † चर्चित ( उ. ) ‡ कटाक्ष शरसम तिखट ( मुं. ) ¶ जे ( मुं. )

१ अतिप्रेमानें. २ करकमळांची ओंजळ. ३ पुढें करून. ४ पदकमल. ५ कामरूपी. ६ हृदयांत उत्पन्न होणारें. ७ विष. ८ यमासारखें. ९ वरच्या दांतांनीं. १० धनुष्य. ११ आवेशानें.

वामदृशांचे कटाक्षबाण । विलासमंडित सस्मितठाण । अवयवईक्षण प्रियभाषण । घडतां कोण स्मरजेता ॥ ७१ ॥ काम जाळूनि स्मरांतक । म्हणवी प्रतापें त्र्यंबक । तो शबरीनें केला रंक । वनीं निःशंक स्मरवेधें ॥ ७२ ॥ आबद्ध भ्रूकुटी कुटिलापांगीं । सुबद्धठाणीं स्मरसमरंगीं । कटाक्ष-बाणीं यूनाआंगीं[1] । जंव तन्वंगी न विंधी ॥ ७३ ॥ तंववरी कामजयाच्या गोठी । करिती नर सुर योगी हठी । ललनालोचनसायकवृष्टि । हर परमेष्ठी न साहती ॥ ७४ ॥ ऐसिया असंख्य बल्लवेंवामा । रतिरसरसिका क्षोभक कामा । जिंकूं न शकती मेघश्यामा । कीं तो परमात्मा स्वात्मरत ॥ ७५ ॥ तदुपरी एकी आभीरंवनिता । कृष्ण जाणोनि मन्मथजेता । चकोरवृत्ति हृच्छयव्यथा । शमवी तत्त्वता तें ऐका ॥ ७६ ॥

अपराऽनिमिषद्दृग्भ्यां जुषाणां तन्मुखांबुजम् । आपीतमपि नातृप्यत्संतस्तच्चरणं यथा ॥ ७ ॥

कृष्ण नाकळे सकामयोगें । म्हणोनि आकळी लोचनमार्गें । निमेषवर्जित सानुरागें । बद्धापांगें ऐकाग्र्यें ॥ ७७ ॥ पूर्णशरदिंदु चकोरें । लक्षिती अनिमेषें नीहारें । निवती वेधामृततुषारें । प्रेमसुभरें रसपुष्टि ॥ ७८ ॥ कृष्णवदनेंदु तैसा नयनीं । अनिमेष प्राशितां मानिनी । चिरकाळेंही तृप्ति न मनीं । तनुवाग्मनीं ताटस्थ्यें ॥ ७९ ॥ तैसे सज्जन हरिपदकंज । हृदयीं ध्याती तेजःपुंज । नित्यनूतन सुखाची वोज । नाचवी भोजँ अविसंबें ॥ ८० ॥ असो हे लक्षयोगाची* कळा । तंव एकी बल्लवी ध्यानकुशला । आपाद श्रीकृष्ण लक्षूनि डोळा । आणी हृत्कमळा सप्रेमें ॥ ८१ ॥

तं काचिन्नेत्ररंध्रेण हृदिकृत्य निमील्य च । पुलकांग्युपगुह्याऽऽस्ते योगीवाऽऽनंदसंप्लुता ॥ ८ ॥

मग बैसोनि एकांतीं । हृदयीं पाहूनि श्रीकृष्णमूर्ति । आलिंगूनिया स्वसुखस्थिती । भोगी विश्रांति पूर्णत्वें ॥ ८२ ॥ पूर्णविश्रांतीची ठेव । सबाह्य उमटती अष्टभाव । स्वेद रोमांच पुलकोद्भव । बाष्पादि सर्व सुखचिह्नें ॥ ८३ ॥ जैसे योगी आनंदकंद । चिंतिती हृत्कमळीं गोविंद । अमृतो-दधीमाजि ते बिंद । होती अभेद सुखलाभें ॥ ८४ ॥ असो गोपींची ऐशी हांव । पृथगाकारें वासुदेव । कवळिला तो कथिता भाव । अपार अर्थांव प्रेमाब्धि ॥ ८५ ॥ आतां समुच्चयात्मक रीति । शुक निवेदी रायाप्रति । समस्ताही बल्लवयुवति । देखोनि श्रीपति हरिखेल्या ॥ ८६ ॥

सर्वास्ताः केशवालोकपरमोत्सवनिर्वृताः । जहुर्विरहजं तापं प्राज्ञं प्राप्य यथा जनाः ॥ ९ ॥

केशव म्हणिजे क्लेशनाशन । अभीष्ट प्रेष्ठ प्राणांहून । त्याचें होतांचि दर्शन । सर्व वधूजन निवाला ॥ ८७ ॥ परमोत्साहें निर्भर मनीं । झाल्या त्यागून विरहग्लानि‡ । जैसे प्राज्ञांतें पावोनि ।

---

**पाठभेद :—** * लक्षयोगीयाची ( मुं. ). ‡ विपयग्लानि ( मुं. ).

१ तरुणाच्या शरीरावर. २ बाण. ३ गोपस्त्री. ४ आवड, इच्छा. ५ रोमांच उत्पन्न होणें. ६ अथांग.

ताप सांडूनि जन निवती ॥ ८८ ॥ कोण प्राज्ञ कैसे जन । ऐका त्रिविध हें लक्षण । मुमुक्षु जे ईश्वर प्राज्ञ । त्यांतें पावोनि श्रम त्यजिती ॥ ८९ ॥ जीवत्वभेदें वियोगविरहें । अनादिअविद्याभ्रम-प्रवाहें । संतप्त तापत्रयाच्या दाहें । ते लवलाहें सांडिती ॥ ९० ॥ शुद्ध सात्त्विकां हे प्राज्ञभेटी↑ । राजसाची ऐका गोठी । अहंममपदरा देऊनि गांठीं । संसारखुंटीं निबद्ध जे ॥ ९१ ॥ मी सबळ तरुण लावण्यरूप । माझी माय माझा बाप । माझें कुळशीळ प्रताप । वृत्ति अमूप पैं माझी ॥ ९२ ॥ माझी विद्या अव्याहत[१] । माझें द्रव्य अपरिमित । माझी यशकीर्ति विख्यात । ऐश्वर्य ऊर्जित[२] पैं माझें ॥ ९३ ॥ ऐसा ऐश्वर्यसंपदामदें । नाचों लागे ममताछंदें । तंव काळवैगुण्यप्रारब्धें[३] । सर्वोचि खेदें जाजावे ॥ ९४ ॥ द्रव्यहानि स्वजनशोक । मानभंग होतां दुःख । शिणे जाजावे बहुतेक । न वटे सुख संसारीं ॥ ९५ ॥ त्यासि प्राज्ञ ब्रह्मनिष्ठ गुरु । भेटतां बोधी भव नश्वर* । इहामुत्र असाचार । कळतां विरागपर[४] होय ॥ ९६ ॥ विवेकसुविचारपरिपाटीं । साधनसंपत्ति लावी पाठीं । व्यतिरेकान्वयबोधें तुष्टि । दुःखराहटी पारुषवी ॥ ९७ ॥ सविश्वासें दृढ† निष्ठा । भंगूनि अनादि अनुभूत कष्टां । स्वानंदभुवनीं करी प्रतिष्ठा । योनिसंकटा निरसूनी ॥ ९८ ॥ आतां तामस मूढ जन । खेचर भूचर जलचर पूर्ण । सुषुप्तिकालीं पावती प्राज्ञ । द्वय§ अभिमानें लययोगें ॥ ९९ ॥ विक्षेपगर्भी द्वंवद्व केली । तितुकी तेथ लया गेली । प्रचुर आनंदावाप्ति झाली । प्राज्ञसंगें त्या जैसी ॥ १०० ॥ केशवदर्शनें गोपी तैशा । पावल्या परमानंदोत्कर्षा । विरहजनिता तापलेशा । त्यजिलें मानसामाजूनी ॥ १ ॥ ऐसा संतुष्ट बल्लवीगण । वेष्टित श्रेष्ठतम भगवान । तिष्ठतसे त्या उपमा कोण । व्यासनंदन अनुवादे ॥ २ ॥

ताभिर्विधूतशोकाभिर्भगवानच्युतो वृतः । व्यरोचताधिकं तात पुरुषः शक्तिभिर्यथा ॥ १० ॥

साधनसंपत्तिपूर्वक । निर्धूत सर्वाशय सम्यक । त्या गोपिका विधूतशोक । जैसें कनकपुट शुद्ध ॥ ३ ॥ कीं जहदजहल्लक्षणायोगें । शबलवाच्यांशपरित्यागें । शुद्धलक्ष्यांश सांख्यमार्गें । प्रत्यगात्मत्वें निवडती ॥ ४ ॥ तैसिया पावोनि अनंता । समस्त गोपी शोकविगता । तिहीं वेष्टित मन्मथजनिता । शोभे सविता जेंवि किरणीं ॥ १०५ ॥ किंवा वेष्टित षोडशकला । शोभा आगळी शशिमंडळा । कीं सजीववेष्टित अमरपाळा । शोभे स्वलीला पुरुहूत ॥ ६ ॥ कीं परमात्मा चित्प्रकृति । आचिंत्यैश्वर्य अनंतशक्ति । मंडित मिरवी अगाध व्याप्ति । तैसा श्रीपति शोभतसे ॥ ७ ॥ किंवा उपासकपुरुषभक्ती- । पूर्वक ज्ञानबळादि शक्ति- । संपन्न आणि जेंवि अभिव्यक्ति । यथापद्धति औपास्या ॥ ८ ॥ किंवा कुंकुमतिलक निडळीं । पदकरकंठीं श्रवणीं मौळीं । भूषणीं मिरवे सौभाग्य-शाली । तेंवि वनमाळी वधूयुक्त ॥ ९ ॥ किंवा प्रकृतिविकृतिसहित । चतुर्विंशतितत्त्वान्वित‖ ।

पाठभेद :— ↑ प्रज्ञाभेटी ( मुं. ). * नैश्वरु ( मुं. ). निश्वर ( उ. ). † सदृढ ( मुं. व उ. ). § अद्वय ( मुं. ). ‖ –तत्त्वासहित ( मुं. ).

१ अकुंठित. २ बलवान्. ३ काळाचा विपरीतपणा व प्रारब्ध यांनीं. ४ वैराग्ययुक्त.

**जीवचैतन्य विग्रहवंत । विद्यामंडित ज्यापरी ॥ ११० ॥ विधूत[1]शोक गोपींमाजि । प्रेमोत्फुल्लित नयनांबुजीं । कृष्ण मिरवे जेंवि पंकजीं । केशरराजीमाजि भ्रमर ॥ ११ ॥ ऐसा विशेषें कोणे ठायीं । गोपीवेष्टित शेषशायी । मिरवला तें व्याख्यान† दोहीं । श्लोकीं श्रोतीं परिसावें ॥ १२ ॥**

ताः समादाय कालिंद्या निर्विश्य पुलिनं विभुः । विकसत्कुंदमंदारसुरभ्यनिलषट्पदम् ॥ ११ ॥

शरच्चंद्रांसुसंदोहध्वस्तदोषातमः शिवम् । कृष्णाया हस्ततरलाचितकोमलवालुकम् ॥ १२ ॥

**महापूरप्रवाहघृष्ट । तें बोलिजे वाळुवंट । जेथूनि दृष्ट जळाचा पाट । महानदीतट तेथवरी ॥ १३ ॥ जें कां सदैव प्रावृट्काळीं । निमग्न राहे सरिज्जळीं[2]§ । शरत्समयीं प्रवाहाजवळी । मृदुळ स्थळीं पुलिनाख्य ॥ १४ ॥ पूर्वीं गोपिका पूरपुलिनीं । रुदती गाती विरहग्लानि । कृष्ण तयांसि घेऊनी । सरित्पुलिनीं पातला ॥ ११५ ॥ दोघी स्त्रियांसि एक कांत । तेथ सापत्नता आकांत । विभु श्रीकृष्ण समर्थ । रमवी समस्त एकात्मा‡ ॥ १६ ॥ कृष्णें आणिल्या जया पुलिना । ऐका तयाच्या गुणलक्षणा । जाणोनि नृपाच्या आगमना । दासी शयना जेंवि रची ॥ १७ ॥ तेंवि यमुने सप्रेमभरें । तरळतरंगहस्तां[3]कारें । पुलिन सुखशयनप्रकारें । रचिलें सादर* मृदुतर ॥ १८ ॥ जाणोनि स्वामीचा विलास । वसंत शोभवी काननास । कुंदकल्प द्रुमादि अशेष । पुष्पीं विकास सौरभ्यें ॥ १९ ॥ तया कुसुमित काननावरून । मंद सुगंध झुळुके पवन । तया पंथें भ्रमरगण । कुमुदोदरीं रुणझुणिती‖ ॥ १२० ॥ शरच्चंद्रींचे संपूर्ण किरण । निशिगर्भींचें तमोपहरण । करिती तेणें शोभायमान । मिरवी कल्याण शर्वरी[4] ॥ २१ ॥ इत्यादि गुणीं गुणसंपन्न । रम्य मृदुल जाणोनि पुलिन । वधूगणवेष्टित मधुसूदन । तेथ संपूर्ण शोभला ॥ २२ ॥ पूर्विलाहूनि वसंतीं वन । सभूषा अंजितें[5] युवतिनयन । किंवा साम्राज्यश्रीसंपन्न । शोभे संपूर्ण भूपत्व ॥ २३ ॥ स्वरत सप्रेम गोपीगण । वेष्टित तैसा मधुसूदन । शोभता झाला अमृतकिरण[6] । मिथा[7] मंडन उडुवलयीं[8] ॥ २४ ॥ जीवनें टवटविती काननें । कीं मनुजादि अन्नपानें । तेंवि चित्प्रभा समस्त भुवनें । एक्या श्रीकृष्णें शोभती ॥ १२५ ॥ त्या कृष्णाची अधिकतर । गोपीवेष्टित लक्ष्मी रुचिर । वर्णितां वर्णपंक्तींचे भार । न पवे पार वाक्पतिही[9] ॥ २६ ॥ परंतु गोपींचा उत्साह । कृष्णप्रेमा निःसंदेह । एकाग्र करूनि वृत्तिसमूह । श्रवणप्रवाह सांठविजे ॥ २७ ॥**

तद्दर्शनाह्लादविधूतहृद्रुजो मनोरथांतं श्रुतयो यथा ययुः ॥
स्वैरुत्तरीयैः कुचकुंकुमांकितैरचीक्लृपन्नासनमात्मबंधवे ॥ १३ ॥

**कृष्णदर्शनें परमाह्लाद । पावला संपूर्ण बल्लवीवृंद । तेणें पुलिनशोभा विशद । उत्साहप्रद**

---

**पाठभेद :—** †ते व्याख्या ( उ. ). §सरिताजळीं ( मुं. व उ. ). ‡एकात्मता ( मुं. व उ. ). * साजिरें ( उ. ). ‖ रुणझुणी ( उ. ).

१ शोकरहित. २ नदीच्या उदकांत. ३ चपल असे लाटारूपी हस्त. ४ रात्र. ५ काजळानें माखलेले. ६ चंद्र. ७ परस्पर. ८ नक्षत्रपुंजांत. ९ बृहस्पति.

त्यां झाली ॥ २८ ॥ विरहकाळीं तींचि पुलिनें । भासत होतीं सम श्मशानें । कृष्णावाप्तितोषांजनें । सुखनिधानें प्रकटलीं ॥ २९ ॥ विरहदुःखाचा हृद्रोग । मनामाजील पावला भंग । पूर्णचंद्रींचा लांछनडाग । निघतां सुधांग[1] शशी जैसा ॥ १३० ॥ हृद्रोगविगता[2] तैशा युवति । मनोरथाची पावल्या शांति । संकल्पविकल्पातीतवृत्ति । तैंवि शोभती पूर्णत्वें ॥ ३१ ॥ जेंवि कां श्रुतीचा समुदाय । कर्मकांडीं साधनोपाय । लक्षूनि जैसा सकाम होय । निजात्मप्रत्यय न फवोनी ॥ ३२ ॥ तेथ साधनें अतिदुर्घट । आत्मलाभार्थ मानिलीं इष्ट । तया काम्यकष्टांचा शेवट । आत्मा स्पष्ट अवगमतां ॥ ३३ ॥ ज्ञानकांडीं निजात्मप्राप्ति । लाहूनि निष्काम झाल्या श्रुति । कृष्णदर्शनें गोपयुवति । तैंवि विश्रांति लाभल्या ॥ ३४ ॥ वृद्धकाळीं पतिव्रता । धनसुतऐश्वर्यसंप्राप्ता । तथापि प्राणप्रियत्वें भर्ता । भजे तत्त्वता सप्रेमें ॥ १३५ ॥ तैंवि अत्मोपलब्धा श्रुति । सप्रपंचभेदनिवृत्ति* । झालियाही निजात्मरति । सप्रेमभक्ति अनुरक्ता ॥ ३६ ॥ त्या येथ गोपिका कृष्णागमनें । हृद्रोगवर्जित समाधानें । पावल्या असतां पूर्णपणें । सप्रेमभजनीं अनुसरल्या ॥ ३७ ॥ अंतर्यामीं परमानंदु । तोचि श्रीकृष्ण आत्मबंधु । त्याकारणें गोपीवृंदु । भजता झाला आह्लादें ॥ ३८ ॥ फेडूनि उत्तरीयें वसनें । आसनें रचिती त्याकारणें । कुचकुंकुमाचीं ज्यांवरी चिह्नें । तीं सर्वज्ञें स्वीकेलीं ॥ ३९ ॥

तत्रोपविष्टो भगवान्स ईश्वरो योगेश्वरांतर्हृदि कल्पितासनः ॥
चकास गोपीपरिषद्गतोर्चितस्त्रैलोक्यलक्ष्म्यैकपदं वपुर्दधत् ॥ १४ ॥

गोपीदत्तोत्तरीयासनीं । अचिंत्यैश्वर्यसुखाची खाणी । तो बैसला पंकजपाणि† । प्रेमा जाणोनि गोपींचा ॥ १४० ॥ योगियांमाजि थोर थोर‖ । कपिलप्रमुख विरिंचि हर । हृदयांबुजीं बैसकार[3] । ध्यानीं एकाग्र कल्पिती ॥ ४१ ॥ तो हा येथ यमुनापुलिनीं ॥ गोपीप्रेमाच्या सम्मानीं‡ । अर्चिला असतां अंतःकरणीं । आनंदोनि क्रीडतसे ॥ ४२ ॥ विश्वश्रियेचें लावण्य । त्रैलोक्यमंजूपागर्भीं[4] पूर्ण । ठेविलें होतें तें काढून । एकला लेऊन मिरवला ॥ ४३ ॥ त्रैलोक्याच्या लावण्यराशि । लेऊनि लक्ष्मी सौंदर्येशीं । झाली कृष्णरूपीं मिराशी[5] । तैसें वपूशीं धरियेलें ॥ ४४ ॥ ऐसा पावोनि गोपीसभा । तिहीं पूजितां पंकजनाभा । त्रिजगच्छ्रीची लावण्यशोभा । तो कंदर्पगाभा नट धरिला ॥ १४५ ॥

सभाजयित्वा तमनंगदीपनं सहासलीलेक्षणविभ्रमभ्रुवा ।
संस्पर्शनेनांककृतांघ्रिहस्तयोः संस्तुत्य ईषत्कुपिता बभाषिरे ॥ १५ ॥

ऐसा उत्तरीयवसनासनीं[6] । पूजूनि सस्निग्ध मृदुभाषणीं । सम्मानिला पंकजपाणि । यमुना-

---

पाठभेद :— * -भेदवृत्ति ( मुं ). † चक्रपाणि ( मुं. व उ. ). ‖ जे का थोर ( मुं. ). ‡ सन्मानीं ( मुं. ).

१ अमृतमय शरीराचा. २ मनोव्यथारहित. ३ बसणारा. ४ त्रैलोक्य हीच पेटी तिच्या पोटांत. ५ वतनदार. ६ अंगावरील वस्त्र हेंच आसन.

पुलिनीं गोपींहीं ॥ ४६ ॥ श्रीपद अंकावरी धरून । करिती करकमळें मर्दन । जैसी कमला मर्दी चरण । अंकीं§ ठेवून विष्णूचे ॥ ४७ ॥ तैसे चरण अंकावरी । धरूनि सादर वामकरीं । दक्षिणपाणि भ्रमरापरी । चंचळ करूनि मार्दिती ॥ ४८ ॥ उभय हस्तांचे स्पर्शनीं । सम्यक्प्रकारें चक्रपाणि । स्पर्शोनियां नानास्तवनीं । स्तविती वदनीं सस्मिता ॥ ४९ ॥ कामकौशल्यविलासचतुरा ॥ भो भो लावण्यरत्नाकरा । गोपीमानसपंकजभ्रमरा । श्रीसुखकरा रतिरसिका ॥ १५० ॥ जय जय कंदर्पोद्दीपना । जय जय अमोघनवयौवना । जय जय मानिनीमानसहरणा । जगज्जीवना जगन्मया ॥ ५१ ॥ वनितायौवनवनभृंगारा । विरहप्रदा खादिरांगारा[1] । प्रमदावदनपद्माकरा । सम भास्करा प्रकाशका ॥ ५२ ॥ गोपीनयनचकोरचंद्रा । अगाध अक्षयसौख्यसमुद्रा* । ऐशा विकसित मानसमुद्रा । स्तवनीं यदुवीरा तोषविती ॥ ५३ ॥ शुष्केंधनीं[2] इंधनाशन[3] । बळेंचि चेतवी प्रभंजन[4] । तेंवि जो अनंगोद्दीपन । लीलावलोकनप्रसंगें ॥ ५४ ॥ तया कृष्णातें गोपनारी । स्तवनीं स्तवोनि नानापरी । चरण चुरिती ये अवसरीं । सकोप कुसरी बोलती ॥ १५५ ॥ कोपामाजि प्रेमोत्कर्ष । कोपकैवाडें[5] वधिती तोष । त्रिविध† प्रश्नाचें करूनि मिष । भाषणीं ईश तोषविती ॥ ५६ ॥ सकोप म्हणाल कैशा कळल्या । हास्यकटाक्षमोक्षणलीला । विभ्रमविलासें उपलक्षिल्या । प्रेमकोपिष्ठा म्हणोनि ॥ ५७ ॥ वक्र भ्रुकुटीं सूची कोपा । स्मितवक्त्रें तो भासे सोपा । ऐसिया प्रेमसंरंभरूपा । प्रश्नीं विकल्पा जल्पती ॥ ५८ ॥ यावरी त्यांची वक्रता । परमचातुर्यकौशल्यता‡ । प्रश्नलाघवें मन्मथताता । छळूं पाहती तद्वदन ॥ ५९ ॥ कृष्ण मानुनि अकृतज्ञ । त्याच्या वचनें त्या दूषण । ठेवावया करिती प्रश्न । हेतु लपवून गूढत्वें ॥ १६० ॥ लौकिकप्रवृत्तीची गोठी‖ । त्रिविध प्रश्नाच्या परिपाठी । निरोपूं जातां ठेवूं¶ कुटी । हा हेतु§ पोटीं तयांचे ॥ ६१ ॥

गोप्य ऊचुः — भजतोऽनुभजंत्येक एक एतद्विपर्ययम् ।
नो भयांश्च भजंत्येक एतन्नो ब्रूहि साधु भोः ॥ १६ ॥

गोपी म्हणती चक्रपाणि । त्रैलोक्यचातुर्यचूडामणि । आमुचा प्रश्न वाखाणूनी । त्रिविध विवरूनि बोधावा ॥ ६२ ॥ त्रिविध प्रश्न कैसा कोण । त्याचीं रूपें भिन्न भिन्न । जया करितां त्रिविध जन । एक असोन म्हणवीतसे ॥ ६३ ॥ एक इच्छूनि प्रत्युपकार । करिती भजनाचा आदर । त्या भजकांसि भजनपर । होती अपर परस्परें ॥ ६४ ॥ एक न भजतयातें भजती । प्रत्युपकार नापेक्षिती । एक भजतयातेंही न भजती । ऐसी पंक्ति त्रिविधांची ॥ १६५ ॥ भो भो चतुरा जगदीश्वरा । या तिघांमाजि कोण तो बरा । साधु साधुत्वें निर्धारा । आणूनि श्रीधरा बोलवा ॥ ६६ ॥ हें ऐकोनि सर्वज्ञनाथ । जाणोनि प्रश्नाचा गुह्यार्थ । बोले प्रत्युत्तर यथार्थ । स्वार्थ परमार्थ

**पाठभेद** :— § कंठीं ( मुं. ). * अक्षयी सुखमुद्रा ( उ. ). † विविध (उ.). ‡ कौशलता (मुं.). ‖ गोष्टी (मुं.). ¶ ठेवुनि ( मुं. ). § हेत (मुं.).

१ खैराच्या लांकडांचा अग्नि. २ शुष्क काष्ठादिकांनीं. ३ अग्नि. ४ सोसाट्याचा वारा. ५ कोपाच्या अंगीकारानें.

प्रकटूनी ॥ ६७ ॥ ते भगवन्मुखीची प्रश्नव्याख्या । सावध ऐकें कौरवमुख्या । पूर्णचंद्रींची जेंवि अभिख्या[*] । आप्यायका त्रिजगातें ॥ ६८ ॥

श्रीभगवान् उवाच — मिथो भजांति ये सख्यः स्वार्थैकांतोद्यमा हि ते ।
न तत्र सौहृदं धर्मः स्वार्थार्थं तद्धि नान्यथा ॥ १७ ॥

प्रथम प्रश्नाचें उत्तर । ऐका सख्या हो सादर । प्रत्युपकारीं भजनपर । तें यदुवीर वाखाणी ॥ ६९ ॥ प्रत्युपकार लक्षूनि दृष्टि । भजनादर विशेष पोटीं । हे रजोगुणाची राहटी । सकळसृष्टिप्रवर्तक[†] ॥१७०॥ कृष्ण म्हणे गोपिकांसी । सख्या हो ऐका रहस्यासी । सकाम लक्षूनि निजस्वार्थासी[‡] । येरयेरांसि उपकरती[¶] ॥ ७१ ॥ तें परमार्थ सहसा भजन नोहे । स्वार्थमूळचि उघड होय । अविद्याजनित मोहप्रवाहें । मिथ्या होय फळसिद्धि ॥ ७२ ॥ गृहस्थ यज्ञें भजती सुरां । सुरवर भजती वृष्टिद्वारा । भजनादर हा परस्परां । स्वार्थवर्धक उभयत्र ॥ ७३ ॥ जल अर्पूनि द्रुमामूळीं । निशिदिनीं वना भजती माळी । तें वन दुभतां पुष्पीं फळीं । भजले समूळीं आपणातें ॥ ७४ ॥ धेनूसि भजती अर्पूनि तृण । देखुनी दुग्धाचें उपकरण । भजन नव्हे तो उद्यम जाण । स्वार्थसाधन परस्परें ॥१७५॥ नरनारींचा मिथा[§] काम । मिथा[T] वार्धुषणेंसंभ्रम । ना तें सौहार्द ना तो धर्म । स्वार्थोद्यम आन नोहे ॥ ७६ ॥ परस्परें स्नेहें स्नेह । रूढविती तेणें वाढे मोह । येणेंचि प्रौढजनसमूह । प्रीतिवर्धक रजोगुणें ॥ ७७ ॥ परस्परें द्वेष वाढे । तेथ शत्रुत्वें भजन घडे । परार्थ मानूनि आपणाकडे । करिती कुडें अवघे ते ॥ ७८ ॥ परस्परें राग द्वेष । धरिती भजनाचा आवेश । ते परार्थ नोहे आपणास । ऐसें परेश प्रतिपादी ॥ ७९ ॥ तेथ क्षणिक सुखावाप्ति । नोहे सुहृद्भावप्रीति । ना ते धर्मतत्त्वप्रतीति । स्वार्थसंपत्ति अवघी ते ॥ १८० ॥ आतां ऐका द्वितीय प्रश्न । न भजतयां जे भजती जाण । ते जन केवळ सत्त्वसंपन्न । सुहृत्स्वजन[‡‡] धर्मात्मे ॥ ८१ ॥

भजंत्यभजतो ये वै करुणाः पितरो यथा । धर्मो निरपवादोऽत्र सौहृदं च सुमध्यमाः ॥ १८ ॥

तयां माजि दोनी कोटी । एक कारुण्यें सदयदृष्टि । दुजे स्नेहाळ समूहसृष्टि । ऐका राहटी दोहींची ॥ ८२ ॥ स्नेहदृष्टि मातापितरें । भजती प्रजांतें अत्यादरें । तैसे सर्वत्र करुणाभरें । भूतमात्रीं कळवळिती ॥ ८३ ॥ भूतमात्रांचें कल्याण । ज्यांसि मुख्यार्थ इतुकाचि जाण । यावेगळें[§§] अणुप्रमाण । प्रत्युपकरण नेच्छिती ॥ ८४ ॥ द्वितीय केवळ मातापितर । होऊनि चाळिती जगासि मैत्र । अणुसम नेच्छिती प्रत्युपकार । हृदयीं अपार स्नेहाळ ॥ १८५ ॥ संततीसाठीं नवस नाना ।

---

**पाठभेद :—** * अभिव्याख्या ( मुं. ) † प्रवर्द्धक ( मुं. व उ. ) ‡ स्वार्थासी ( मुं. ) ¶ उपकारिती ( मुं. ) § मिथ्या ( मुं. ) T मिथ्या ( मुं. ) ‡‡ सज्जन ( उ. ) §§ त्यावेगळें ( उ. )

१ शोभा. २ तृप्तिदायक. ३ परस्परांस. ४ स्वार्थ हेंच मूलकारण ज्यास तें. ५ व्याज देण्याघेण्याचा संबंध. ६ उपकाराची परतफेड.

गर्भ वाहतां सोसिती शिणा । प्रसूतिवेदना सहपोषणा । मूत्रमेहनें[1] सोशिती ॥ ८६ ॥ देवी गोवर दुःखश्रेणी । सोशितां निद्रा नेणती नयनीं । प्रत्युपकार न इच्छूनी । तत्कल्याणीं स्नेहाळें ॥ ८७ ॥ त्यांमाजि प्रथम धर्ममूर्ति । द्वितीय स्नेहाचीच व्यक्ति[2] । एवं धर्मकामपुरुषार्थी । म्हणे श्रीपति ते दोघे ॥ ८८ ॥ धर्मनिष्ठा सुहृद्भाव । दोघांमाजी वर्त्ते सदैव । निरपवाद हा अभिप्राव । वासुदेव वाखाणी ॥ ८९ ॥ आतां तृतीय प्रश्नोत्तर । भजतयां न भजती जे कां अपर । त्यांचा चतुर्विध अधिकार । वर्णी श्रीधर तो ऐका ॥ १९० ॥

भजतोऽपि न वै केचिद्भजंत्यभजतः कुतः । आत्मारामा ह्याप्तकामा अकृतज्ञा गुरुद्रुहः ॥ १९ ॥

जे भजतयांसीच न भजती । ते अभजतया केंवि भजती । जनका पितृत्वें न मानिती । ते कें मानिती पितृव्या[3] ॥ ९१ ॥ कृष्णसर्प दावानळी- । हूनि काढितांही स्नेहाळीं । तत्काळ झोंबे मर्मस्थळीं । केंवि कळवळी तो इतरां ॥ ९२ ॥ किंवा अग्निसेवनीं निरत । निष्ठापूर्वक स्मार्त श्रौत । त्यांतें न रक्षी मानूनि आप्त । जेंवि प्रज्वलित पावक ॥ ९३ ॥ अदृष्टकर्मफळ कर्त्ता लाहो । परी आपणा भजकां न धरी स्नेहो । तो इतरांचा न करी दाहो । हा कें मोहो कल्पावा ॥ ९४ ॥ ऐसें द्विविध कृतोपकार । करिती विसरोनियां अपकार । परी ते पृथक्त्वें* अधिकार । जाणती चतुर चतुर्विध ॥ १९५ ॥ अग्निदृष्टांत जाणिजे विविध† । दृष्टादृष्टार्थीं फलदाफलद । एक आत्माराम प्रसिद्ध । दुजा विशद आप्तकाम ॥ ९६ ॥ निर्विकल्प समाधिस्थ । स्वस्वरूपानंदीं स्वस्थ । त्यासि भजती संसारग्रस्त । ते अनाथ तद्भजना ॥ ९७ ॥ ते भजकातें न प्रार्थिती । भजल्या सत्कारही न करिती । परी ते खांकर[4] म्हणों न येती । उद्भिज्जपंक्ति[5]§ सुरविटप[6] ॥९८॥ त्यांसि भजतां न दिसे फळ । वाटती कृतघ्नचि केवळ । परि ते भजकांची कामना सफळ । अक्षय अमळ सुखलाभें ॥ ९९ ॥ उपासकांसि जैसा अग्नि । तुष्टे अदृष्टफळप्रदानीं । परी न रक्षी प्रज्वळलेनी । प्रत्युपकरणीं स्निग्धत्वें ॥ २०० ॥ आतां द्वितीय आप्तकाम । अग्नि इंधनार्थ सकाम । होऊनि न चाळी स्नेहधर्म । भजनीं प्रेम तेंवि न धरी ॥ १ ॥ विषयार्पणें भजती लोक । परी तो नोहे तत्कामुक । प्रत्युपकारें त्या सम्मुख । नोहे निष्टंक अनपेक्ष ॥ २ ॥ आतां सर्पदृष्टांतरीती । एक कृतघ्न क्रूरजाति । केवळ दुर्जन खळ दुर्मति । कृतघ्नवृत्ति जो दुरात्मा ॥ ३ ॥ ऐका सख्या हो म्हणे कृष्ण । मूढजाति सर्प कृतघ्न । म्हणोनि तो उपकृति न जाणोन । करी विघ्न भजकातें ॥ ४ ॥ तैसा जो कां मूढमति । कृतघ्न दुरात्मा क्रूरवृत्ति । कृतोपकार नाठवे चित्तीं । सँद्य[7] निघातीं प्रवर्ते ॥ २०५ ॥ याहूनि दुसरा जो कां दुष्ट । प्रवृत्तिज्ञान जाणोनि स्पष्ट । परम निष्ठुर कृतघ्न शठ । कठिण पापिष्ठ गुरुद्रोही ॥ ६ ॥ गुरु म्हणिजे जननीजनक । कीं संकटीं जे प्राणरक्षक । हितोपदेष्टे उपकारक । कां जे पोषक सर्वस्वें ॥ ७ ॥ विद्योपदेष्टे हितोपदेष्टे । कृपाकटाक्षें सर्वाभीष्टें । जे इच्छिती ते गुरुत्वनिष्टे ।

---

**पाठभेद :**— * प्रथगत्वे ( मुं. ). † त्रिविध ( उ. ). § उद्भिद्यपंक्ति ( उ. )

१ मूत्रस्राव. २ मूर्ति. ३ चुलत्याला. ४ पाने झडलेला वृक्ष. ५ वनस्पतींची पंक्ति. ६ कल्पवृक्ष. ७ तत्काळ.

कथिती स्रष्टे शास्त्रज्ञ ॥ ८ ॥ ऐसिया गुरूतें* जे द्रोहिती । त्यांचा उपकार नाठविती । केवळ कृतघ्न पापमूर्ति । ते कें भजती इतरांतें ॥ ९ ॥ गुरूचा द्वेष धरिती मनीं । गुरूची निंदा वदती वदनीं । गुरूची करिती कार्यहानि† । ते कृतघ्न दुर्योनीं जांचती ॥२१०॥ त्यांच्या दर्शनें संस्पर्शनें । एकत्रवासें संभाषणें । पुण्यशीळांचीं नाशती§ पुण्यें । सर्व दूषणें संक्रमती‡ ॥११॥ ऐसीं प्रश्नप्रत्युत्तरें । विवरूनि कथितां नंदकुमरें । भ्रूसंकेतें वक्रनेत्रें । गोपी परस्परें । खुणाविती ॥ १२ ॥ हें देखोनि विधीचा जनक । सवेग हृदयीं करूनि तर्क । गोपीप्रश्नांचा विवेक । मनीं निष्टंक समजला ॥ १३ ॥ सकळप्रश्नांच्या शेवटीं । गुरुद्रोही कृतघ्नां मुकुटीं । त्याची भजवरी आणूनि कुंटी । गोपी भ्रुकुटी खुणाविती ॥ १४ ॥ परस्परें हास्यवदनें । नेत्रें सूचिती न वदोनि¶ वचनें । हे जाणोनि वधूंचीं चिह्नें । काय श्रीकृष्णें बोलिलें‖ ॥ २१५ ॥

नाहं तु सख्यो भजतोऽपि जंतून्भजाम्यमीषामनुवृत्तिवृत्तये ।
यथाऽधनो लब्धधने विनष्टे तच्चिंतयाऽन्यन्निभृतो न वेद ॥ २० ॥

अवो सख्या हो कथिलया जना । माजि एकही मी नोहे जाणा । तुम्ही माझी त्यां माजि गणना । न कीजे नयना↓ खुणावुनी ॥ १६ ॥ मी भजकांसि करुणावंत । परम सुहृद परम आप्त । भजकां न भजे तो वृत्तांत । ऐका निवांत वनिता हो ॥ १७ ॥ प्रेम पोखूनि भजकांप्रति । वियोगें घालीं विरहावर्तीं । या माजि कृपेची अभिव्यक्ति । तुमच्या चित्तीं तें नुमजे ॥ १८ ॥ कृपणा जैसी धनाची प्राप्ति । होऊनि हातींचें जाय पुढती । तैं त्या धनचिंतेची व्याप्ति । विषयप्रवृत्ति विसरवी ॥ १९ ॥ होऊनि ठाके तैंT धनापिसें । जागृति स्वप्नीं धनचि भासे । विसरे क्षुधा तृषा मानसें । मा येर कायसे उपचार ॥ २२० ॥ तो धनाविण नेणे कांहीं । तेंवि ध्यान मी भजकां हृदयीं । वेधें लावूनि प्रेमप्रवाहीं । विषय सर्वही विसरवी ॥ २१ ॥ तरी त्यां भजकांमाजि प्रस्तुत । सर्व प्रकारें तुम्हीच येथ ॥ कैशा म्हणाल तरी वृत्तांत । कथी अनंत श्लोकार्थें ॥ २२ ॥

एवं मदर्थोज्झितलोकवेदस्वानां हि वो मय्यनुवृत्तयेऽबलाः ।
मया परोक्षं भजता तिरोहितं माऽसूयितुं माऽर्हथ तत्प्रियं प्रियाः ॥ २१ ॥

पूर्वोक्त बोलिले जे भजक । तेंवि भजकारणें सम्यक । तुम्हींच सांडिला लौकिक । प्रवृत्ति-विवेकपरित्यागें ॥ २३ ॥ अस्ताव्यस्त वस्त्राभरणें । सर्वविस्मृतकर्माचरणें । युक्तायुक्त विचारणें । सांडूनि वना पातलां ॥ २४ ॥ यास्तव लौकिकाचा त्याग । तुम्हांपासूनि घडला सांग । वेद म्हणजे

---

**पाठभेद** :— * गुरुत्वें ( मुं. ) † कार्यहाणी ( मुं. ) § शक्ति ( मुं. ) ‡ संमती ( उ. ) ¶ सुचोनि ( मुं. ) ‖ श्रीकृष्ण बोलिला ( मुं. ). ↓ नैना ( उ. ) T जै ( मुं. )

१ प्रवेशती. २ आळ, आरोप. ३ पासून, वाढवून. ४ वियोगरूपी भोंवऱ्यांत. ५ विषयांकडील मनाचा कल.

स्वधर्ममार्ग । मदर्थ तोही त्यागिला ॥ २२५ ॥ सासुश्वशुरपतिसेवनें । अतिथिअभ्यागतपूजनें । नित्यनैमित्तीं सादर होणें । व्रतोद्यापनें त्यागिलीं ॥ २६ ॥ अपत्यांच्या लालनासी । स्वपोष्यांच्या पोषणासी । वेदप्रणीत* स्वधर्मासी । त्यागूनि मजपाशीं पातलां ॥ २७ ॥ स्वकीयाप्त ज्ञाति गोत्र । सकळ सुहृद इष्ट मित्र । त्यांचें भंगूनि स्नेहसूत्र । आलां सत्वर मजपाशीं ॥ २८ ॥ लौकिक स्वधर्म आणि स्वजन । मजकारणें त्यागिलें पूर्ण । ऐसिया तुम्ही मदेकशरण† । त्या तुमचें कल्याण म्यां कीजे ॥ २९ ॥ ग्रंथि देऊनि वोढी घेणें । विशेष दृढता होय तेणें । तैसेंचि म्यांही अदर्शनें । तुम्हां निजध्यानें वेधिलें ॥ २३० ॥ तुम्हांसि देऊनि निजात्मरति । प्रेमा दृढाविला म्यां चित्तीं । विरहवर्धनें गुप्तस्थिति । सप्रेम उक्ति परिसिल्या§ ॥ ३१ ॥ गुप्त होऊनि भजलों तुम्हां । तेणें म्यां वाढविला सुदृढ प्रेमा । दोषदृष्टि पाहणें आम्हां । हें अनुचित तुम्हां अबळा हो ॥ ३२ ॥ म्यां जें गुप्त होऊनि वनीं । ध्यान वोपिलें तुमच्या मनीं । हेंचि प्रिय केलें जाणोनि । मज लागूनि न दूषावें‡ ॥ ३३ ॥ इतुका तदुक्तिपरिहार[३]¶ । बोलूनि अंतरीं कमळावर । निष्कापट्यें करुणापर । चमत्कारूनि बोलतसे ॥ ३४ ॥ शरदुत्पलाली[४] फुल्लारा । उषसि शशिस्रावि जलधारा । सांडिती तेंवि नयनद्वारा । आले श्रीधरा प्रेमाश्रु ॥२३५॥ थरथरां कांपे अंगयष्टि । श्वास न सांठवेचि‖ पोटीं । उकसाबुकसीं सद्गदकंठीं । शब्द वोठीं न फुटती ॥ ३६ ॥ रोमांच आले थरथरोनी । पुलकस्वेदाची गवसणी । स्वभक्तप्रेमें चक्रपाणि । बांधोनि ऋणीं वश केला ॥ ३७ ॥ गोपींसि म्हणे सांडोनि श्वास । करूं न शके परिहारास । ब्रह्मायुपर्यंत[५] होतां दास । आनृण्यास[६] असमर्थ ॥ ३८ ॥

न पारयेऽहं निरवद्यसंयुजां स्वसाधुकृत्यं विबुधायुषाऽपि वः ॥
या माऽभजन्दुर्जरगेहशृंखलाः संवृश्च्य तद्वः प्रतियातु साधुना ॥ २२ ॥

तुमचा संयोग निर्दूषण । अनुच्छिष्टचि आत्मार्पण । तुम्हीं केलें मजलागुन । जन्मापासून गोपी हो ॥ ३९ ॥ बाळपणींच खेळतां मातें । तुम्हीं अर्पिलीं आपुलीं चित्तें । क्षणभंगुरा भवसुखातें । सकाम आस्थे नातळलां ॥ २४० ॥ मदर्थ विसरलां मातापिता । मदर्थ त्यजिलें सुहृदां आप्तां । मदर्थ त्यजूनि भगिनीभ्राता । मदेकचित्ता हों सरलां ॥ ४१ ॥ मदर्थ त्यजिले सासुश्वशुर । मदर्थ त्यजिले भावे देवर । मदर्थ त्यजिले ज्ञातिगोत्र । मजशीं स्वतन्त्र अनुसरलां ॥ ४२ ॥ मदर्थ विसरला अन्नपान । मदर्थ विसरलां भूषण वसन । मदर्थ विसरलां↓ श्रवण पठनᵀ । मदर्थ सम्मान विसरलां ॥ ४३ ॥ मदर्थ त्यजिलें निरीक्षण । मदर्थ त्यजिलें गन्धग्रहण । मदर्थ त्यजिलें निन्दास्तवन । केलें मदर्पण सर्वस्व ॥ ४४ ॥ मदर्थ त्यजिला काम क्रोध । मदर्थ त्यजिला प्रपंचबोध । मदर्थ त्यजिला द्वेष विरोध । मत्सरदुर्मददम्भादि[७] ॥ २४५ ॥ मदर्थ त्यजिला लोभ मोह । ममता-

**पाठभेद :—** * वेदप्रतीत ( मुं. ) † मदैक्यशरण ( मुं. ) § युक्ति परिसिला ( मुं. ) ‡ दोषावे ( मुं. ) ¶ परिहर ( मुं. ) ‖ समावेचि ( उ. ). ↓ त्यजिलें ( उ. ) ᵀ पठण ( मुं. ).

१ आगंतुक. २ दासादिकांच्या. ३ त्यांच्या बोलण्याचा निर्णय. ४ शरदतूंतील कमलपंक्ति. ५ ब्रह्मदेवाच्या आयुष्यापर्यंत. ६ ऋणांतून मुक्त होण्यास. ७ ढोंग.

तृष्णाशोकसमूह । वृत्ति क्षेत्र देह गेह । भवप्रवाह विसरलां ॥ ४६ ॥§ अहंता ममता द्विकं[1]कणीं । रागद्वेषकीलें[2]कमिळणीं । निगडं[3]शृंखळा रजोगुणीं । घातली निर्मूनि नरामरां[4] ॥ ४७ ॥ अहंदेहत्वें ठाके उभा । पदार्थममता चढे क्षोभा । देहगेहवृत्तिलाभा । रागद्वेषें खळखळित ॥ ४८ ॥ तापत्रयाचें लागतां उष्ण । बेडी तापतां पोळती* चरण । तेणें तळमळिती सम्पूर्ण । परी बेडी खंडून न संडवे ॥ ४९ ॥ कुटुम्बाचिन्ता मागें वोढी । लौकिकलज्जा पुढें आडी । ऐसी उभयत्र सांकडी । द्विधा चरफडी चालतां ॥२५०॥ ऐसी देहगेहात्मबेडी । पडोनि असुरसुरनरकोडी । बळेंचि पडिल्या बांदवेंडी । मोहसांकडी माजिवड्या ॥ ५१ ॥ तुम्ही अनन्यभावें करूनी । मातें भजतां अभेद-भजनीं । खंडूं न शकती जीतें कोण्ही । ते बेडी खंडूनि सांडिली ॥ ५२ ॥ आदिब्रह्म्याचे प्रथम-दिनीं । प्रथम घटिकेचि पासूनी । चरणीं पडली परंतु कोण्हीं । नाहीं खंडूनि टाकिली ॥ ५३ ॥ कल्पानुकल्प गेले फार । परी जीर्ण नोहेचि अणुमात्र । नित्य नूतन जे दृढतर । तुम्ही ते सत्वर छेदिली ॥ ५४ ॥ मदेकशरण† सप्रेम खड्ग । घेऊनि दृढतर सानुराग । देहगेहात्मशृंखळाभंग । तुम्हीं सवेग पैं केला ॥२५५॥ त्रैवर्गिक तोडिती कडी । संन्यास सवातें लडबडी । नाना अभ्यासें चरफडी । चालतां अडी स्वपदातें ॥ ५६ ॥ गेहशृंखळा दुर्जर ऐसी । तुम्हीं मद्भजनप्रेमेंशीं । निःशेष छेदूनि टाकिली कैसी । गगनें जैसी वातोर्मि[6] ॥५७॥ यालागीं मदर्थ तुमचें जिणें । मदेक-‡ शरणा जीवें प्राणें । तुम्हांसि काय म्यां उत्तीर्ण होणें । कवण्या गुणें कोठवरी ॥ ५८ ॥ अमळ अनवद्य[7] संगम तुमचा । किती म्हणोनि वर्णूं वाचा । यालागिं तुमचे उत्तीर्णतेचा । प्रताप टांचा[8] मज आंगीं ॥ ५९ ॥ ब्रह्मा सकळविबुधां शिरीं । त्या ब्रह्म्याचे आयुष्यवरी । म्यां श्रमतांही प्रत्युपकारी । नोहे निर्धारीं कृतकृत्य ॥ २६० ॥ मातें भजती बहुत भक्त । तितुक्यां पाशीं माझें चित्त । तुम्ही सप्रेम मदेकनिरत । यालागिं अजित जिंकलों मी ॥ ६१ ॥ मी बहुतांचा प्रेमपोसणा । तुम्ही अव्यभिचार मदेकशरणा¶ । यालागिं असमर्थ उत्तीर्णा । विकिलों ऋणामाजि तुम्हां ॥ ६२ ॥ यालागिं तुमाचिया उपकारा । उत्तीर्ण व्हावयालागिं मी अपुरा । आतां तुम्हीच मजहुनि थोरा । म्हणवूनि करा आनृण्य ॥ ६३ ॥ आपणाहूनि↓ बहुता गुणें । तुम्हांसि स्तवितां थोरपणें । इतुकेंचि माझें उत्तीर्ण होणें । जें सर्वस्व उणें स्वीकेलें ॥ ६४ ॥ तुम्ही आपुल्या सुशीलपणें । इतुकेन मातें अनृणी करणें । येऱ्हवीं म्यां काय तुम्हांसि देणें । अनन्यपणें जिंणिलों मी ॥२६५॥ ऐसा अनन्य-भावें हरि । स्ववश केला सर्वांपरी । पुन्हां नाडील गर्वलहरी । म्हणोनि नारी भयचकिता ॥ ६६ ॥ गर्वें निधान हातींचें गेलें । दैवें पुढतीं हाता आलें । अगर्वप्रयत्नपूर्वक भलें । म्हणती रक्षिलें पाहिजे ॥ ६७ ॥ शुक म्हणे गा इरा[10]रमणा । व्रजवनितांच्या अनन्यभजना । उत्तीर्ण व्हावया त्रैलोक्यराणा । रासनर्त्तना मांडील ॥ ६८ ॥ पुढिले अध्यायीं ते कथा । सावध ऐकें कौरवनाथा ।

---

**पाठभेद :—** § ओवी क्र. ४५ व ४६ यांचा क्रम उमरखेड प्रतींत उलटा आहे. *पोळे ( उ. ) † मदैक्यशरणा ( मुं. ). ‡ मदैक्यशरणा ( मुं. ) ¶ मदैक्यशरणा ( मुं. ) ↓ आपण होउनि ( मुं. ).

१ दोन कड्यांनीं. २ प्रीति व द्वेष ह्या दोन खिळ्यांनीं जोडलेली. ३ बेडी. ४ मनुष्यांस व देवांस. ५ अधीनता. ६ वाऱ्याची लाट. ७. दोषरहित, स्तुत्य. ८ उणा. ९ जिंकिला गेलों. १० हे भूमिपते.

जिच्या श्रवणें कलिमलव्यथा । आकल्पदुरितांसह नाशे ॥ ६९ ॥ इतुकें श्रीमद्भागवतीं । अठरा सहस्र संहितागणिती† । दशमस्कंधीं परीक्षिति । परिसे निश्चिती शुकमुखें ॥२७०॥ तो हा अध्याय बत्तिसावा । हृदयीं धरूनि भक्तिभावा । पढतां पावे कैवल्यठेवा । भव आघवा वोसंरे ॥ ७१ ॥ श्रीएकनाथ क्षीराब्धि अमळ । चिदानंद चित्कल्लोळ । स्वानन्दसुखाचें अगाध जळ । प्रभा सोज्वळ गोविंद ॥ ७२ ॥ क्षीराब्धिशायी गोपीरमण । लोकत्रयाचें कल्याण । केवळ दयार्णव स्वपदशरण । रक्षी संपूर्ण कारुण्यें ॥ ७३ ॥ श्रोतयां विनवी दयार्णव । भक्तऋणिया वासुदेव । सांडूनिया साधनाची हांव । धरा सद्भाव पदभजनीं ॥ २७४ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां गोपीविरहाभिभूतरुदितश्रीकृष्णदर्शनहर्षावाप्तिकथनं नाम द्वात्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३२ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु । ॥ श्लोक ॥ २२ ॥ टीका ओव्या ॥ २७४ ॥ एवं संख्या ॥ २९६ ॥ ( बत्तिसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १५८९२ ).

बत्तिसावा अध्याय समाप्त.

पाठभेद :— † संहितागणति ( मुं. ).

१ कल्पपर्यंत झालेलें पातक. २ दूर जाई.

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय ३३ वा

श्रीकृष्णपरमात्मने नमः। विवर्त्तविमुख विलासचतुरा। विरक्ता विदुषा विरहातुरा। स्वानुरागें क्रीडापरा। नमो गुरुवरा गोविंदा ॥ १ ॥ वास्तव नसतां आभासे। मिथ्यात्वींही जैसें तैसें। यथापूर्व गोचर दिसे। विवर्त्त ऐसें त्या नाम ॥ २ ॥ तो हा विवर्त्त भवभ्रम ॥ भूतां गुणांचा संभ्रम। संस्कारजनित कामकर्म। रूप नाम अविद्यक ॥ ३ ॥ वस्तु वस्तुत्वें अविकार। अध्यारोप विवर्त्तमात्र। जीवा भ्रमवी भवसागर। जेंवि रविकरजेल *हरिणा ॥ ४ ॥ मृगां धांवतां रानोमाळें। असाचार तैं कैचें मिळे। हृदय फुटोनि सुकले गळे। क्लेश आगळे मरणान्त ॥ ५ ॥ तेंवि सच्चित्सुख वस्तु† स्वमेव। तेथें भ्रामक अविद्या माव। अवघा विवर्त्त भवार्णव। विषयार्थ जीव आळुंके ॥ ६ ॥ असाचार विषयसुख। न फवोनि प्राणी पावती दुःख। बहळसुकृतें ‖भवीं विमुख। धुंडिती चित्सुख मुमुक्षु ॥ ७ ॥ ऐसें विरक्त कैवल्यकाम। तद्विलासार्थ तूं सकाम। परम चतुर कल्पद्रुम। स्वजनाभिराम सद्गुरो ॥ ८ ॥ त्रितापतप्तां निववावया। निरसूनि भेदभ्रमाची माया। आत्मच्छंदें रासप्रिया। नर्त्तविसी त्यां रतिरसिकां ॥ ९ ॥ भवविमुखा त्या व्रजांगना। त्यांची जाणोनि हृद्वेदना। श्रमपरिहारें ऋणोत्तीर्णा। रासनर्तना आरंभी§ ॥ १० ॥ योगोत्पलाकरभास्कर‡। विदुष विरक्त वैष्णप्रवर। स्वात्मनिरत↓ निर्विकार। बोधी शुकेंद्र भूपातें ॥ ११ ॥ ऐकें कौरवकुलमंडना। ये अध्यायीं श्रमापहरणा। रासक्रीडा कैवल्यराणा। स्मरमोहना आरंभी ॥ १२ ॥ गोपीमंडळीमध्यें हरि। रासरासिक नर्त्तन करी। वनीं विजनीं गोपकुमरी। कोणे प्रकारीं रमविल्या ॥ १३ ॥ तो हा रसाळ रासोत्सव। परिसावया महानुभाव। सद्गुरुवरदे दयार्णव। आज्ञापिती वक्तृत्वीं ॥ १४ ॥ समर्थ

---

**पाठभेदः—** * हरणा (मुं.). † हा शब्द उमरखेड प्रतींत नाहीं. ‖ भव (मुं.). § आरंभ (उ.). ‡ गोपोत्पलाकरभास्कर (मुं.). ↓ स्वात्मरत (उ.).

१ मिथ्याभासाला पराङ्मुख. २ सूर्यांच्या प्रखर किरणांनीं भासणारें जल, मृगजल. ३ बुभुक्षित होईल.

**आज्ञा वंदूनि शिरीं। जैशी वदली शुकवैखरी। भाषाव्याख्यान त्या प्रकारीं। सादर चतुरीं परिसिजे ॥ १५ ॥**

इत्थं भगवतो गोप्यः श्रुत्वा वाचः सुपेशलाः। जहुर्विरहजं तापं तदंगोपचिताशिषः ॥ १ ॥

**नृपातें म्हणे बादरायणि। ऐकोनि गोपी ही भगवद्वाणी। विरहसंताप टाकूनी। हृदयभुवनीं तोषल्या ॥ १६ ॥ इत्थं म्हणिजे पूर्वाध्यायीं। जें बोलिला क्षीराब्धिशायी। लाघव घेऊनि आपुलें ठायीं। वनिताहृदयीं तोषद ॥ १७ ॥ तुमच्या सप्रेमभक्तिऋणा। समर्थ नोहें मी उत्तीर्णा। आतां तुम्हीचि उदारगुणा। कीजे मोक्षणा आनृण्यें ॥ १८ ॥ तुमच्या ऋणें मी बांधला। आज्ञाधारक मी अंकिला। तुमचा सर्वस्वें विकिला। विशेष बोला न बोलवे ॥ १९ ॥ ऐसिया मधुरा सुपेशलां। ऐकोनि भगवंताचिया बोला। विरहदुःखें संताप झाला। तो टाकिला गोपींहीं ॥ २० ॥ श्रीरंगाच्या अंगस्पर्शें। निवालीं गोपींचीं मानसें। चंद्रें कुमुदकानन जैसें। टाकी संताप दिवसाचा ॥ २१ ॥ कुरुकिरीटविराजरत्ना। अंग या कोमळ आमंत्रणा। संबोधूनि योगिराणा। रासक्रीडना निरूपी ॥ २२ ॥ अंकिला विकिला तुमचा ऋणी। ऐसी जे कां भगवद्वाणी। सत्यत्व दावी तिये लागुनी। स्वयें नाचोनि तच्छंदें ॥ २३ ॥**

तत्राऽरभत गोविंदो रासक्रीडामनुव्रतैः। स्त्रीरत्नैरन्वितः प्रीतैरन्योन्याबद्धबाहुभिः ॥ २ ॥

**गोविंद जो कां ब्रह्मांडपति। तये *यमुनापुलिनप्रांतीं। रासक्रीडा परम प्रीति। आरंभिता जाहला ॥ २४ ॥ रास शब्दें म्हणाल काय। कुशल नर्त्तकींचा समुदाय। तिहींसहित जो विलास होय। नृत्यविशेष तो रास ॥ २५ ॥ रासमंडित जे कां क्रीडा। ते बोलिजे रासक्रीडा। गोपी-प्रेमाच्या कैवाडा[३]। आदरी रोकडा श्रीकृष्ण ॥ २६ ॥ ह्रदिनीं[४] विकासितकुमुदोत्पलीं। मधुरशब्दें गुंजती अळि। जलाश्रितविहंगांची मंडळी। सुखसुकाळीं कुंजती ॥ २७ ॥ वनीं कुसुमित वल्लि तरु। शब्दित चंचरीकांचा भारु। तेणें मुखरित जलकांतारु। सुमनोहरु शोभतसे ॥ २८ ॥ सिंहावलोकें शृंगार-रचना। पूर्वोक्त चतुरां केली सूचना। यावरी रासमंडळग्रथना। परिसा व्याख्याना श्लोकोक्त ॥ २९ ॥ काष्ठपुत्रिका सूत्रतंत्रा। जऱ्ही दिसती त्या नर्त्तनपरा। तऱ्ही नव्हती त्या स्वतंत्रा। तेंवि सुंदरा अनुवृत्ता ॥ ३० ॥ जेंवि कां हरळ[६] वैरागरें[७]। वेधितां प्रभेच्या अत्यादरें। तैं ते होती अनर्घ हिरे। तेंवि यदुवीरें व्रजललना ॥ ३१ ॥ घुरुटा रानटा आभीरवनिता। कृष्णसांनिध्यें सप्रेमभरिता। शोभती सुरांगनांच्या माथां। ललनाललामा हरिवेधें ॥ ३२ ॥ तिहीं स्त्रीरत्नीं अन्वित। प्रीतिपूर्वक रमाकांत। परस्परें बाहुग्रथित। रासक्रीडा आरंभी ॥ ३३ ॥**

**पाठभेद** ।— * पुलिनाप्रांति (मुं.)

१ लहानपणा, कमीपणा. २ चतुरपणाचा. ३ आवडीला. ४ सरोवरांत. ५ लांकडी बाहुली. ६ खडे. ७ जवाहिऱ्या. ८ स्त्रीरत्ने.

रासोत्सवः संप्रवृत्तो गोपीमंडलमंडितः । योगेश्वरेण कृष्णेन तासां मध्ये द्वयोर्द्वयोः ॥ ३ ॥
प्रविष्टेन गृहितानां कंठे स्वनिकटं स्त्रियः । यं मन्येरन्नभस्तावद्विमानशतसंकुलम् ॥
दिवौकसां सदाराणामौत्सुक्यनिभृतात्मनाम् ॥ ४ ॥

रासोत्सवाचें साहित्य । अभिनय म्हणिजे कौतुकयुक्त । रसिकनम्रता सुरशिक्षित । हावभाव अपांगीं ॥ ३४ ॥ चौं अक्षरीं क्रियापद । दिढा श्लोका सहित विशद । मंडळरूपें गोपीवृंद । सह गोविंद वेंठला ॥ ३५ ॥ उभयपार्श्वीं गोपीयुगळ । तडिद्भासुरें गौर अमळ । मध्यें मिरवे मेघसुनीळ । कुचकरतळसंस्पर्शी ॥ ३६ ॥ दक्षिणभागीं वल्लवप्रमदा । कृष्ण तिचिया दक्षिणखांदा । स्वबाहु ठेवूनि वदनारविंदा । पाववी मोदा संस्पर्शें ॥ ३७ ॥ वामभागींची वामनयना । वामबाहूच्या करूनि ग्रथना । वामउरोजसंस्पर्शना । सह आनना प्रोत्साही ॥ ३८ ॥ तैशाच गोपी उभयभागीं । बाहुयुगळें श्रीशार्ङ्गी । आकळूनियां स्निग्धापांगीं । रासप्रसंगीं मोदती ॥ ३९ ॥ दोहीं गोपीं माजि हरि । कृष्णयुगळीं एकी सुंदरी । रासमंडळ ऐसियापरी । रची मुरारि सप्रेमें ॥ ४० ॥ व्रजवासिनी अनेक गोपी । कृष्ण एकला लावण्यरूपी । गोपीयुगळें स्वप्रतापीं । केंवि आटोपी पृथक्त्वें ॥ ४१ ॥ गोपी पृथक्त्वें नाचती । तितुक्या कैंच्या श्रीकृष्णमूर्ति । ऐसी शंका न कीजे श्रोतीं । तो योगपति जगदात्मा ॥ ४२ ॥ योगेश्वरेणैं ऐसा हेतु । देऊनि वदला व्याससुतु । जे योगमाया अंगीकृत । अवतारचरित विस्तारी ॥ ४३ ॥ दों दों गोपींत एकैक कृष्ण । दों दों कृष्णीं प्रमदारत्न । ऐसें रचूनि रासकंकण । करी नर्त्तन स्वच्छंदें ॥ ४४ ॥ दों दों गोपींत एकैक हरि । दोहींचियाही स्कंधांवरी । बाहु घालूनि उरोज धरी । स्पर्शे अधरीं हनुगल्लीं ॥ ४५ ॥ चटुल चाटु चमत्कारीं । ऐशा मोहिता व्रजसुंदरी । जे ते मानी मज मुरारि । सप्रेमभरीं आळंगी ॥ ४६ ॥ मज एकीतें फावला कृष्ण । कृष्णकंठीं मी संलग्न । माझेंचि भाग्य त्रिजगीं गहन । ऐशा संपूर्ण भाविती ॥ ४७ ॥ दोहीं भागीं दोघी जणी । परी त्या नेणती अंतःकरणीं । आपणा वांचूनि चक्रपाणि । अन्य कामिनी कवळी हें ॥ ४८ ॥ कृष्णमौळींचे चूडामणि । गोपीमौळाभरणरत्नीं । देदीप्यमान ललामश्रेणी । रासकंकणीं प्रकाशे ॥ ४९ ॥ ललनाललाटीं कुंकुमांक । कृष्णनिडळीं केशरतिलक । नीलकुंतल कुसुमस्तवक । *राजीराजित रासोत्थ ॥ ५० ॥ कृष्णकुंडलें मकराकृति । गोपीश्रवणीं भूषापंक्ति । गंडमंडित मिथा दीप्ति । वलयपंक्ति रासांगीं ॥ ५१ ॥ गोपीकटाक्षस्निग्धानंग । श्रीकृष्णाचे कृपापांग । नयनपंक्तीं रासरंग । वलय सांग सुघटित ॥ ५२ ॥ तरळ भ्रूलतांचें वलय । मध्यें गोंदिलीं पाचप्राय । कृष्णभ्रूमध्य ज्योतिर्मय । चंदनबिंदु इंदुत्वें ॥ ५३ ॥ सरळनासिकांचिया श्रेणी । तरळ तळपती मौक्तिकमणि । दशनदीप्तींचीं चांदिणीं । स्मितभाषणीं फांकती ॥ ५४ ॥ तांबूलरंगें रंगले अधर । शोभे वलय तें विद्रुमाकार । दानोदकाचे पुलक प्रचुर । वदनशीतकर शोभविती ॥ ५५ ॥ इंद्रनीळांची वर्तुळ श्रेणी । माजि एकैक स्वर्णमणि । चारु चंचल रासांगणीं ।

**पाठभेद :**— * बाजी ( मुं. ).

१ वेष्टिला गेला. २ बिजलीप्रमाणें तेजस्वी. ३ योगविद्या ज्याच्या स्वाधीन अशा कृष्णानें.

हनु कपोलें नर्तती ॥ ५६ ॥ कंठाभरणें संलग्न कंठीं । जडित निष्कमणींची दाटी । अंसवेष्टित बाहुमिठी । भूषणकोटि† झळकती त्या ॥ ५७ ॥ नववनितांचे कुच उन्नत । मध्यें वैडूर्यमणिमंडित । श्रीनिकेतन कौस्तुभयुक्त । श्रीवत्स भासुर हरिहृदयीं ॥ ५८ ॥ मणिबंधें मणि‡गणवलयान्वित । कंबुकंकणीं श्रीकृष्णहस्त । करमुद्रिका रत्नजडित । नर्त्तनतालें तरळती¶ ॥ ५९ ॥ कुचपट्टिका सोत्तरीयें । रविशशिविद्युत्प्रभामयें । पल्लव चंचळ चपलान्यायें । सजळजलदीं झळकती ॥ ६० ॥ हरिपरिधानी पीतवसनें । दिव्यांशुकें वधूपरिधानें । जडितमेखळा विचित्ररत्नें । संमिश्रकिरणें प्रकाशती ॥ ६१ ॥ जानुश्रेणी मंडळाकार । रासप्रसंगीं नर्त्तनपर । गुल्फप्रदेशीं मणिमंजीर । वांकी नूपुर पदकटकें ॥ ६२ ॥ दशांगुलियें पदभूषणें । भूमि उज्वळिती§ तद्गतरत्नें । पदविन्यासें नूपुरस्वनें । संगीतमानें उतरती ॥ ६३ ॥ ऐसिया रासोत्सवमंडळीं । जे ते मानी बल्लवबाळी । प्रियतम आकळला वनमाळी । प्रेमागळी मी यातें ॥ ६४ ॥ मजचि कवळूनि नाचे हरि । कृष्णप्रेमा मजचिवरी । ऐशा समस्ता व्रजसुंदरी । पृथगाकारीं मानिती ॥ ६५ ॥ यमुनापुलिनीं रासोत्सव । ऐसा रचितां श्रीकेशव । अतिऔत्सुक्यें गगनीं देव । कृष्णलाघवें वेधिले ॥ ६६ ॥ रसिकरासोत्सवाचे क्षणीं । गगनीं दाटल्या विमानश्रेणी । सभार्यकां सुरांच्या मनीं । मनसिजग्लानि हरिवेधें ॥ ६७ ॥ हरि-क्रीडनें व्याप्तमनें । ऐशीं सदार सुरविमानें । शतसहस्रप्रयुतमानें । संकीर्ण तेणें नभोवलय ॥ ६८ ॥ रासरसिकोत्सवनर्त्तन । सकळसुरवर अनुलक्षून । तदनुकूल यथोपकरण । सद्य घेऊन पातले ॥६९॥

ततो दुंदुभयो नेदुर्निपेतुः पुष्पवृष्टयः । जगुर्गंधर्वपतयः सस्त्रीकास्तद्यशोऽमलम् ॥ ५ ॥

त्यानंतरें निर्जरगणीं । हर्षें दुंदुभि ठोकिल्या गगनीं । चैत्रनंदनोद्भवां सुमनीं । रासरंगणीं वर्षती ॥ ७० ॥ श्रीकृष्णाचीं यशें अमळ । स्त्रियांसहित गंधर्वपाळ । संगीतस्वरजाति सुताळ । गाती केवळ उत्कर्षें ॥ ७१ ॥ तेथ मृदंग अचेतन । म्हणती मृत्युलोकीं जन्मोन । नेणती गोपींची प्रेमखुण । धिकूतान्[१] धिकूतान् धिक्कार ॥ ७२ ॥ धिकिटि धिमिकिटि थोंगि थोंगि । इत्यादि ध्वनि ज्या मृदंगीं । याज्ञिकां धिक्कारिती स्वर्गीं । कृष्णवियोगीं धिग्धिक्तान् ॥ ७३ ॥ धित्लान्धित्लान् ऐसिया ध्वनि । उपासकां उपहासुनी । म्हणती ठकलां भेदभजनीं । व्रजकामिनींसम न नचां ॥ ७४ ॥ अतद्व्यावृत्ति तन्न तन्न । सराग विपंचीमाजि स्वन । ताल प्रकटी श्रुतिव्याख्यान । अतन्निरसनव्यतिरेकें* ॥ ७५ ॥ तत्तत्तालें तत्त्वावबोध । रासनर्त्तनीं अन्वय शुद्ध । श्रुति प्रतिपादिती प्रसिद्ध । नाट्य करपद-विन्यासीं ॥ ७६ ॥ दुंदुभिघोषें जारकर्म । त्रिजगद्विख्यातकर्ता परम । तो एक श्रीकृष्ण पुरुषोत्तम । येर अधम दंडाहे ॥ ७७ ॥ रुदत ललना लागती पाठीं । विवश हुडकिती वनसंकटीं । विलाप करिती वाळवंटीं । परि स्मरकाठी ज्या न बधी ॥ ७८ ॥ कंदर्प दर्परहित झाला । निर्जित लज्जित

---

**पाठभेद :**— † कंठी ( मुं. ). ‡ मय ( मुं. ). ¶ तळपति ( मुं. ). § उजळति ( उ. ). * असन्निरसन–( उ. ).

१ मनगट. २ पायांचे घोटे. ३ लक्ष, दशलक्ष या प्रमाणानें. ४ त्यांचा धिक्कार असो. ५ तत् ईश्वर त्याची व्यावृत्ति वगळणें.

जठरा आला । तो एक श्रीकृष्ण दादुला[1] । अद्भुत लीला विस्तारी ॥ ७९ ॥ शिवासि झालें लिंगपतन । चंद्र झाला सलांछन । अहल्यादोषें संक्रंदन । सहस्रनयन भगांकी ॥ ८० ॥ वालेखिल्यांची[2] जननकुटी । बैसली ब्रह्मयाचे ललाटीं । सामान्य सुर नर कोट्यानकोटि । स्मरें संकटीं लोळविले ॥ ८१ ॥ ऐसा सदंडच स्मरलांछनीं । सुरनरमुनीश्वरांच्या श्रेणी । दुंदुभिघोषें चक्रपाणि । स्मर जिंकोनि नाचतसे ॥ ८२ ॥ रडत ललना लागतां पाठीं । परी ज्या न लगे मन्मथकाठी । यास्तव मारुति शुक धूर्जटि । वंदिती मुकुटीं कृष्णातें ॥ ८३ ॥ गोपीसुकृतप्रादुर्भाव । कीं हा मन्मथविजयोत्सव । जारकर्में श्रीकेशव । स्वरतानुभव त्रिजगा दे ॥ ८४ ॥ दुंदुभिपणवानकनिःस्वनीं । नभा गाजविती निर्जरश्रेणी । संतत वर्षती दिव्यप्रसूनीं¶ । तो सुगंध धरणी न समाये ॥ ८५ ॥ सस्त्रीक गंधर्वांचे पति । संगीततानमानाच्या रीति । हरियश बहळ अमळ गाती । वनिता धरिती करताळा ॥ ८६ ॥ विमानश्रेणिसंकुलनभीं । निर्जरीं त्राहाटितां दुंदुभि । तदनुलक्षें भूगोळगर्भीं । तुमुलध्वनि कोंदला ॥ ८७ ॥

वलयानां नूपुराणां किंकिणीनां च योषिताम् । स प्रियाणामभूच्छब्दस्तुमुलो रासमंडले ॥ ६ ॥

तुमुलशब्द किमुद्भूत[3] । तो वाखाणी या श्लोकांत । वक्ता चतुर व्याससुत । तें समस्त पर्येसा ॥ ८८ ॥ पदविन्यास नर्त्तनपर । तेणें गर्जती नूपुर । वाकी वाळे पदमंजीर । झणत्कार कटकाचा ॥ ८९ ॥ अणवट पोल्हारे विरोदिया । सुभट जोडवीं विचित्र झिणिया । रासरंगणीं नर्त्तनक्रिया । झणत्कारें माजविती* ॥ ९० ॥ विचित्र वसनें विविधाकार । अधोक्षजाचें पीतांबर । क्षुद्रघंटिकाकिंकिणीगजर । मेखलामंडित ऊठती ॥ ९१ ॥ करविक्षेप तरळती बहळ । क्वणित वलयध्वनि मंजुळ । हस्तमुद्रिका सुतेजाळ । तेजःपुंज तळपती ॥ ९२ ॥ सुमनरत्नहार† कंठीं । डोलती नृत्याच्या परिपाटीं । चंचल कुंडलें भूषादाटी । कुंतळनिकटीं तरळती ॥ ९३ ॥ वलयनूपुरें किंकिणीगजर । सिंजित[4] सर्वही अलंकार । मानिनींसहित मुरलीधर । नर्त्तनपर जे ठायीं ॥ ९४ ॥ तये रासमंडळस्थानीं । एवं उठिला तुमुल ध्वनि । सुरीं दुंदुभि त्राहाटिल्या गगनीं । धरा दणदणी श्रीचरणें ॥ ९५ ॥ तेणें दणाणी पाताळभुवन । तुमुल म्हणिजे ध्वनिसंकीर्ण । रासमंडळीं श्रीभगवान । नाचतां त्रिभुवन कोंदलें ॥ ९६ ॥ एकात्मत्वें अनेकसृष्टि । दावूनि लपवी मायेपोटीं । गौर गोपींची भवंती घरटी । माजि जगजेठी तो नाचे ॥ ९७ ॥

तत्रातिशुशुभे ताभिर्भगवान्देवकीसुतः । मध्ये मणीनां हैमानां महामरकतो यथा ॥ ७ ॥

तेथ अत्यंत शोभायमान । वनितावेष्टित श्रीभगवान । सभाग्य सुरवरांचे नयन§ । देवकीनंदन

---

पाठभेद :— ¶ प्रसुमनि ( मुं. ) * गाजविती ( उ. ). † हुमनसुरत्नहार ( उ. ). § नैन ( उ. ).

१ समर्थ. २ हे साठ हजार ऋषि ब्रह्मदेवापासून झाले. ३ कशापासून उत्पन्न झाला ? ४ शब्द करणारे.

निरखिती जे ॥ ९८ ॥ एकैक महामरकतमणि । मध्यें एकैक सुवर्णवर्णी । ऐशी रासमंडळश्रेणी । विचित्रभूषणीं पूर्वोक्त ॥ ९९ ॥ सजलजलदचक्रीं चपला । कीं कांचननीळमणींची माळा । कीं मधुकरमंडित हेमकमळा‡ । शोभे अमळा स्रंज जेंवि ॥ १०० ॥ कीं लाल कलिंदजेचें नीळ । तैशा श्रीकृष्णमूर्ति सुनीळ । गौर गोपी गंगाजल । मिश्र कल्लोल प्रयागीं ॥ १ ॥ माजि आरक्त रत्नद्युति । कुंकुमतिलक सरस्वती । प्रत्यक्ष त्रिवेणी रासाकृति । शृंगाररसें तुंबळिली ॥ २ ॥ तेथ विलोल-लोचन मीन । कुंडलें मकरस्थानापन्न । गोपीकुचतुंगां कवळून । करी अवगाहन रतिरंग ॥ ३ ॥ कीं कृष्ण तमाल त्रिदशतरु । तरुणी कांचनलतिकाकारु । कीं कृष्णकस्तूरीमाजि केसरु । ललना रुचिर लावण्यें ॥ ४ ॥ एवं महामरकतमणि । शोभे जैसा स्वर्णभुवनीं† । तैसा वेष्टित बल्लवतरुणीं । चक्रपाणि शोभाढ्य ॥ १०५ ॥ गोपिवेष्टित शोभला हरि । ते हे निरूपिली कुसरी । आतां कैशा व्रजसुंदरी । कृष्णामाझारीं विराजती ॥ ६ ॥

पादन्यासैर्भुजविधुतिभिः सस्मितैर्भ्रूविलासैर्भज्यन्मध्यैश्चलकुचपटैः कुंडलैर्गंडलोलैः ।
स्विद्यन्मुख्यः कबररशनाग्रंथयः कृष्णवध्वो गायंत्यस्तं तडित इव ता मेघचक्रे विरेजुः ॥ ८ ॥

कृष्णमूर्ति त्या नवघनचक्र । सुनीळबहळपटळप्रचुर । गोपी चंचच्चपलाकार । चमत्कारें चमकती ॥ ७ ॥ त्यांची चांचल्यचमत्कृति । पादन्यासें पद थरकती । हस्तविक्षेप संगीतरीति । भुजा तळपती साभरणा ॥ ८ ॥ सप्तस्वरीं तानमानें । कृष्णगुणांचीं संकीर्तनें । सत्रप अपांगविमोक्षणें । भ्रूविक्षेप सविलास ॥ ९ ॥ कुंतळ तरळती‖ भ्रमराकृति । श्रवणीं मौळीं भूषणदीप्ति । निडळपट्टिका* रुचिरद्युति । झळकताती तारुण्यें ॥ ११० ॥ विलोल कुंडलें गंडदेशीं । प्रातिबिंबतीं रविप्रभेशीं । कृष्णश्रवणीं मकराऐसीं । मिथा प्रभेशीं सांघट्य ॥ ११ ॥ कुंकुमरेखामंडितभाळें । पुलकप्रचुर वदनकमळें । अमूल्य मणिमयमुक्ताफळें । स्मितभासुमेळें डोलती ॥ १२ ॥ मौळग्रथित कुसुमश्रेणि । वसनपल्लवीं अनर्घमणि । हेमांबराच्या प्रभाकिरणीं । दिवसरजनी नुमसविती ॥ १३ ॥ विलोल डोलती हार कंठीं । विचित्र रंगीं कंचुक्या तगटी । चंचल कुचकलशांची थाटी⊤ । वरी कुचपटी छादित ॥ १४ ॥ उत्तरीय वसनें ते कुचपट । परिधानांबरीं कृतपरवंट । पल्लव सरळ तरळती नीट । लखलखाट भूभागीं§ ॥ ११५ ॥ मध्य सुमध्यमा लवविती कैसे । रासरंगणीं नर्त्तनमिसें । करपदतालें गीतां सरिसे । विविध प्रासप्रभेदीं ॥ १६ ॥ ऐशा नाचती कृष्णवधू । स्वेदें द्रवती मुखशरदिंदु । कांचिवेणिका ग्रंथीं निबद्ध । नृत्यें अबद्ध हों सरल्या ॥ १७ ॥ नर्त्तनश्रमें कुरळगांठी । सुटतां सुमनें न थरती↓ मुकुटीं । तालें स्रवती भूतळवटीं । सुमनें सवृष्टि संमिश्र ॥ १८ ॥ रशनाग्रथनें वसना

---

**पाठभेद** :— ‡ –कळा ( मुं. ) † –भूषणीं ( मुं. ). ‖ तळपति ( उ. ). * नीळ– ( मुं. ), निडळपाटिका ( उ. ). ⊤ टाटी ( मुं. ). § शुभांगी ( मुं. ). ↓ धरती ( उ. ).

१ पाच नामक रत्न. २ माळ. ३ यमुनेचें. ४ चंचळ विजेसारख्या. ५ अलंकारांसह. ६ सलज्ज. ७ मिश्रण. ८ ज्यावर पुष्कळ रोमांच उठले तीं. ९ हास्यकांतीच्या मिश्रणानें. १० न जाणवती. ११ सुंदर कटिभाग ज्यांचे त्या.

दार्ढ्य । नीवीबंधनें पल्लवाढ्य । तच्छैथिल्यें पावे मौढ्य । जेंवि आषाढ्य घनपटळ ॥ १९ ॥ कृष्ण-गुणांच्या गायनझुळका । मंदमारुताकृति त्या देखा । तेथ गर्जना क्वणितप्रमुखा॥ । वलयनूपुरीं उपमिजे ॥ १२० ॥ वदनकमळींचे प्रस्वेदकण । तेंचि तुषाराभिवर्षण । सुगौर गोपी तडिद्वर्ण । कृष्णमेघांगीं विराजती ॥ २१ ॥

उच्चैर्जगुर्नृत्यमाना रक्तकंठ्यो रतिप्रियाः । कृष्णाभिमर्शमुदिता यद्गीतेनेदमावृतम् ॥ ९ ॥

कृष्णें सहित नाचतां गोपी । सप्तस्वरांच्या आलापीं । घोरमंद्रता रूपीं । करिती उच्चतर गायनें ॥ २२ ॥ यंत्रीं वोढिले स्वर्णतार । तैसें कंठीं सप्तस्वर । उच्चावच प्रभेदवर§ । रक्तकंठ्या आळविती ॥ २३ ॥ नाना रागीं रंगले कंठ । गुर्जर गौड माळव पाठ । केदार कांबोज करनाट । सारंग सोरट कल्याण ॥ २४ ॥ भूपाळ भैरव मालकौशिक । मारुशंकराभरणप्रमुख । वसंतमधुमाधवी-दीपक । अहेरी तुंडी रामकालि ॥ १२५ ॥ कृष्णकीर्त्तनीं बल्लवबाळा । रागरागिणी गाती सकळा । मूर्च्छनाप्रभेद सकळ कळा । नर्त्तन काळानुरूप ॥ २६ ॥ रतिलालसा विविधागानीं । मुदिता माधवालिंगनीं । मुखकुचअवयवसंस्पर्शनीं । परमानंदें परिपूर्णा ॥ २७ ॥ अखिल चराचर ज्यांच्या गानें । व्याप्त विस्तृतगुणकीर्त्तनें । त्या कृष्णाच्या सम नर्त्तनें । प्रमुदित मनें गोपींचीं ॥ २८ ॥

काचित्सह मुकुन्देन स्वरजातीरमिश्रिताः उन्निन्ये पूजिता तेन प्रीयता साधु साध्विति ।
तदेव ध्रुवमुन्निन्ये तस्यै मानं च बह्वदात् ॥ १० ॥

त्यांमाजि कोण्ही एकी वनिता । कृष्णगानें संमिश्रिता । विविधापरी आलाप करितां । स्वयें त्या गीता आलापी ॥ २९ ॥ षड्ज ऋषभ आणि गांधार । मध्यम पंचम धैवत स्वर । निषादादि आलाप चतुर । उच्चउच्चतर आलापी ॥ १३० ॥ पूर्वीं कृष्णेंशीं संमिश्र । पुन्हा पृथक्त्वें अमिश्र । कृष्णासमान रागोद्धार । आळवी सुंदर स्वरजाति ॥ ३१ ॥ कृष्ण आळवी जैं ध्रुवपद । तत्तुल्य गोपी आळवी विशद । तीसी सम्मानी मुकुंद । प्रियसंवादें भली म्हणे ॥ ३२ ॥ साधु साधु धन्य धन्य । इत्यादि गौरवें दे बहुमान । तीतें प्रियतम जनार्दन । आपणावीण नान्यत्र ॥ ३३ ॥

काचिद्रासपरिश्रांता पार्श्वस्थस्य गदाभृतः । जग्राह बाहुना स्कंधं श्लथद्वलयमल्लिका ॥ ११ ॥

एवं नृत्यविशेषें कोण्ही । कृष्णें सम्मानिल्या तरुणी । कोण्ही विशिष्ट मधुरगानीं* । कृष्णसम्मानीं संतुष्टा ॥ ३४ ॥ कोण्ही संगीततालमानें । कृष्णें गौरविल्या सम्मानें । हावभाव करचालनें । साधुवचनें तोषविल्या ॥ १३५ ॥ त्या तोषाची पृथक् रीती । कुरुकुळचूडारत्नाप्रति । वशिष्ठान्वय-गोत्रसंतति । बादरायणि निरूपी ॥ ३६ ॥ कोण्ही एक आभीरललना । रासमंडळीं कृतनर्त्तना ।

पाठभेदः—॥ –प्रणीत ( मुं. ). § –पर ( मुं. व उ. ). * सामगानी ( मुं. ).
१ निरगांठ. २ वसिष्ठकुलोत्पन्न.

परिश्रांता श्रमापहरणा । मधुसूदना सह नृत्यें ॥ ३७ ॥ आपला बाहु कृष्णस्कंधीं । निकट असतां पार्श्वसंधि । टेका घेऊनि श्रम निषेधी । परमानंदीं निमग्न† ॥ ३८ ॥ रासश्रमभरें कंकणें । ढिलावलीं तीं करनर्त्तनें । मौळमल्लिका कचग्रथनें । मोकळीं झालीं सुटोनी ॥ ३९ ॥ कृष्ण एक मजचि पाशीं । मीचि प्रियतम श्रीकृष्णासी । ऐसें मानूनि निजमानसीं । स्वानंदासी ते पावे ॥ १४० ॥

तत्रैकांऽसगतं बाहुं कृष्णस्योत्पलसौरभम् । चंदनालिप्तमाघ्राय हृष्टरोमा चुचुंब ह ॥ १२ ॥

एकी बल्लवी श्रमहरणार्थ[1] । श्रीकृष्णबाहु निजांसगत[2] । प्रफुल्लोत्पलसुगंधभरित । चंदनचर्चित चुंबितसे ॥ ४१ ॥ परमाह्लादें रोमांचित । बाहु हुंगे सप्रेममुदित । कृष्णश्लेषें[3] आनंदभरित । प्रिय मानित हरि आपणां ॥ ४२ ॥

कस्याश्चिन्नाट्यविक्षिप्तकुंडलत्विषमंडितम् । गंडं गंडे संदधत्या अदात्तांबूलचर्वितम् ॥ १३ ॥

नाचतां कुंडलें हालती जैसीं । कोण्ही एकीच्या गंडप्रदेशीं । तद्भामंडित[4] स्वगंडेशीं । योजी प्रेमेंशीं हरिगंड[5] ॥ ४३ ॥ कुंडलप्रभा गालावरी । तरळ तळपे परस्परीं । तत्संयोगें अंगीकारी । हरिमुखचर्वित[6] तांबूल ॥ ४४ ॥ वदन घालूनि हरिवदनांत । तांबूल स्वीकरी तच्चर्वित । तेणें लाभें आनंदभरित । फिकें मानित कैवल्य ॥ १४५ ॥ तया तांबूललाभें म्हणे । प्रियतम मानिलें मजाचि कृष्णें । माझिये अवाप्तसुखाचे तुलने । तुळितां ठेंगणे विधिहरही ॥ ४६ ॥

नृत्यंती गायंती काचित्कूजन्नूपुरमेखला । पार्श्वस्थाऽच्युतहस्ताब्जं श्रांताऽधात्स्तनयोः शिवम् ॥ १४ ॥

तव आणिखी कोण्ही ललना । नृत्यगायनीं परम निपुणा । तालबद्धपदभूषणां । किंकिणी-रशना*ध्वनियुक्ता ॥ ४७ ॥ गीतनृत्यभूषणगजरीं । तोषोनि सम्मानी श्रीहरि । कृष्णहस्ताब्ज स्वकुचांवरी । धरी सुंदरी शंतम तें ॥ ४८ ॥ तेणें म्हणे मजसारिखी । कृष्णासि प्रियतम नाहीं सखी । ऐसिया बोधें परमसुखी । सादर निरखी हरिवक्त्रा ॥ ४९ ॥

गोप्योलब्ध्वाऽच्युतं कांतं श्रिय एकांतवल्लभम् । गृहीतकंठ्यस्तद्दोर्भ्यां गायंत्यस्तं विजह्रिरे ॥ १५ ॥

ऐशा समस्त आणिक महिला । रासविलासीं नर्त्तनकुशला । कृष्णसम्मानें सुखसोहळा । लीलाविभ्रमें भोगिती ॥ १५० ॥ कमलारतिरंगएकांत । तो प्रियतम जोडला कांत । तेणें लाभें गोपी समस्त । आनंदभरित हृत्कमळीं ॥ ५१ ॥ दोहीं बाहीं त्याचे कंठीं । कामसंभ्रमें सुदृढ मिठी । घालूनि तच्चरिते वाक्पुटीं । स्वरपरिपाठीं आळविती ॥ ५२ ॥ म्हणती रतिरंगलालस धीर । कृष्ण

---

**पाठभेद** :—† संमग्न ( उ. ). * रसना ( मुं. )

१ दूर करी. २ आपल्या खांद्यावरील. ३ कृष्णाच्या आलिंगनानें. ४ त्याच्या प्रभेनें शोभायमान. ५ हरीचा गाल. ६ चावलेला.

कंदर्पकेलिचतुर। योगिमानसकुवलयभ्रमर। मन्मथसुंदर मुरहंता ॥ ५३ ॥ ऐशा श्रीकृष्णयशगायनीं। रासतांडवमंडितध्वनि। वलयनूपुरकटिकिंकिणी। गजरें कृष्णीं क्रीडती त्या ॥ ५४ ॥ ऐसें गोपींसह नर्त्तन। रासरंगीं श्रीभगवान। गायक वादक गंधर्वगण। सिद्धचारणशिक्षार्थ ॥ १५५ ॥ तेथ उत्कट शृंगाररस। देखोनि तयाचें मानस। स्त्रियांसहित मोह विशेष। पावले असतां ते काळीं ॥ ५६ ॥ वाद्यगीतवर्जितव्यंग। रासरंगाचा होईल भंग। म्हणोनि स्वसत्ता श्रीरंग। प्रकटी अमोघ ऐश्वर्य ॥ ५७ ॥ विराम पावतां गंधर्वपति। अन्य वाद्यादि संपत्ति। कैशा निर्मी श्रीयदुपति। तें परीक्षिती शुक सांगे ॥ ५८ ॥

कर्णोत्पलालकविटंककपोलघर्मवक्त्रश्रियो वलयनूपुरघोषवाद्यैः ॥
गोप्यः समं भगवता ननृतुः स्वकेशस्रस्तस्रजो भ्रमरगायकरासगोष्ठ्याम् ॥ १६ ॥

भगवंतेंशीं सह गोपिका। नाचत्या झाल्या प्रेमोत्सुका। नर्त्तनश्रमें कुरुनायका। मुखमयंका[3] घर्मांबु ॥ ५९ ॥ परवे बाळ्या कर्णसुमनें। बुगड्या भोंवऱ्या जडितरत्नें। ताटंकादि श्रवणाभरणें। वदनलक्ष्मी शोभविती ॥ १६० ॥ श्रवणनयनकपोलस्पर्शी। कुंतळ[4] रुळती उभयप्रदेशीं। श्रमाक्त शोभा श्रीमुखासी। सालंकृता सस्वेद ॥ ६१ ॥ करकंकणें किंकिणी कांची। वांकीनूपुरपदकटकांची। ध्वनिसाम्यता वादित्रांची। रासमंडळीं वैशिष्ट्यें ॥ ६२ ॥ तये रासरुभेच्या ठायीं। गूढ गंधर्व भ्रमरदेहीं। सप्तस्वरांची नवाई। गुंजारवें आळविती ॥ ६३ ॥ मौलग्रथितें विविधें सुमनें। पुष्पमाळा पुष्पभूषणें। गळोनि पडती जैसीं घनें। वृष्टि कीजे सुमनांची ॥ ६४ ॥ नृत्यगीतगायनें हरिख। पावोनि डोलतां सत्यलोक। तौर्यत्रिका[5] त्याग विशेष। लब्ध अनेक कुसुमांचा ॥ १६५ ॥ तेथ शंका करिती चतुर। जे नृत्यापाशीं कैंचे भ्रमर। सुगंधलोभें* सुकृत सधर। होते तत्पर ते तेथें ॥ ६६ ॥ ऐसिया गोपी कृष्णप्रेमें। रासमंडळीं कृष्णकामें। विह्वळ देखोनि पुरुषोत्तमें। आत्मारामें रमविल्या ॥ ६७ ॥ जैसे ज्यांचे मनोरथ। जैशा नानाविभ्रमयुक्त। तैसतैसा मन्मथतात। रमता झाला तच्छंदें ॥ ६८ ॥

एवं परिष्वंगकराभिमर्शस्निग्धेक्षणोद्दामविलासहासैः।
रेमे रमेशो व्रजसुंदरीभिर्यथाऽर्भकः स्वप्रतिबिंबविभ्रमः ॥ १७ ॥

गोपी नेणती चातुर्यकळा। घुरटा रानटा बल्लवअबळा। त्यांमाजि नवजलद सांवळा। प्रकटी लीला स्वसत्ता ॥ ६९ ॥ कोकिलकंठ्या सप्तस्वरीं। सुधा लाजवी स्वरमाधुरी। गीतमूर्च्छनाप्रभेद-कुसरी। प्रकाशी हरि ऐश्वर्यें ॥ १७० ॥ लावण्यकुशल विलासकळा। सौरभ्यचातुर्यभूषा सकळा। स्वसत्ता निर्मूनि घनसांवळा। करी व्रजअबळा संगाईं ॥ ७१ ॥ जेंवि जाह्नवीवोघोदक। आपणा

---

पाठभेद :— * सुगंधलोपें ( उ. ).

१ रतिविलासामध्यें निपुण. २ योग्याचें मानस हेंच कमळ त्यावरील भ्रमर. ३ मुखचंद्राला. ४ केस. ५ वाद्यांची.

मीनले जे बोध अनेक । त्यांमाजि भरूनि पूर्णत्व देख । करी सम्यक प्रावृटीं ॥ ७२ ॥ तेंवि अचिंत्यगुणपरिपूर्णहरि । तिहीं डवरिल्या व्रजसुंदरी । क्रीडार्थ प्रतिबिंबाचिये परी । मन्मथसमरीं सज्जिल्या ॥ ७३ ॥ एवं रासविलासनर्त्तनरीति । ज्या ज्या कथिल्या विभ्रमयुक्ति । चुंबनालिंगन अपांगपातीं । करकुचप्रांतीं संस्पृष्ट ॥ ७४ ॥ नर्मोक्तिभाषणें स्निग्धेक्षणें । बाहुकपोलहनुस्पर्शनें । उद्दाम विनोद हास्यवदनें । कामोद्दीपनें प्रकटिलीं ॥ १७५ ॥ जेंवि समर्थ स्वसामग्री । देऊनि अकिंचनाच्या घरीं । भोगाविष्ट सर्वोपचारीं । तेंवि श्रीहरि वनितांसी ॥ ७६ ॥ बिंब हांसतां प्रतिबिंब हासे । करपदचांचल्य बिंबासरिसें । तैसा रमला आत्मविलासें । व्रजवनितांशीं जगदात्मा ॥ ७७ ॥ रासमंडळीं ऐसी लीला । करितां कंदर्पबाणें विकळा । जाल्या कैशा त्या व्रजबाळा । कुरुभूपाळा तें ऐक ॥ ७८ ॥

तदंगसंगप्रमुदाकुलेंद्रियाः केशान्दुकूलं कुचपट्टिकां वा ।
नांजः प्रतिव्योढुमलं व्रजस्त्रियो विस्रस्तमालाभरणाः कुरूद्वह ॥ १८ ॥

कृष्णांगसंगसंस्पर्शनें । प्रकृष्टमुदिता मन्मथबाणें । विकळ झालीं सकळ करणें । वसनाभरणें न सांवरिती ॥ ७९ ॥ शिथिलसपुष्पकेशग्रथनें । विमुक्तग्रंथि विगलित वसनें । उत्तरीयें कुचाच्छादनें । रुळतां चरणें तुडविती ॥ १८० ॥ मुक्ताप्रवाळवैदूर्यमणि । करमुद्रिका विविधाभरणीं । श्रवणकंठाशिरोभूषणीं । गळतां कामिनी नुमजती ॥ ८१ ॥ अमोघसुगंधसुमनमाळा । बाहुमस्तकीं आणि गळां । आपाद रुळतां* व्रजवेल्हाळा । नेणती विकळा कंदर्पें ॥ ८२ ॥ कबरांबरें वसनाभरणें । गळतां सावरूं न शकती करणें । ऐशा गोपी मन्मथबाणें । रासक्रीडनें मोहिता ॥ ८३ ॥ केवळ गोपीच पावल्या मोह । ऐसा न धरिजे संदेह । गगनीं सुरस्त्रियांचा समूह । कृष्णक्रीडनें मोहिला ॥ ८४ ॥

कृष्णविक्रीडितं वीक्ष्य मुमुहुः खेचरस्त्रियः । कामार्दिताः शशांकश्च स गणो विस्मितोऽभवत् ॥ १९ ॥

कृष्णक्रीडानिरीक्षणें । वेधलीं देवांगनांचीं मनें । नेणती विगलित वस्त्राभरणें । मन्मथबाणें विद्धांगा ॥ १८५ ॥ वल्लभ असतां निकटवर्ती । खेचरांगना विगतस्मृति । विवश करणांची प्रवृत्ति । पाहतां जगतीं हरिक्रीडा ॥ ८६ ॥ आपुले वंशीं वंशधर । रसिक रासक्रीडाचतुर । देखूनि भुलला रजनीकर । सऋक्षखेचरवलयेंशीं ॥ ८७ ॥ ईषन्मात्र शशिमंडळ । गगनीं न होतां चंचल । स्तब्ध झाली नक्षत्रमाळ । नवग्रह निश्चळ ते काळीं ॥ ८८ ॥ चंद्र न वचतां अस्तमाना । उदय न करवे चंडकिरणा । ऐसियास्तव रात्रिमाना । नेणीव द्रुहिणा शिवशक्रां ॥ ८९ ॥ ब्राह्मषण्मासांची रजनी । कृष्णें केली रासनर्त्तनीं । व्रजस्त्रियांचे प्रीतीकरूनी । साच ते वाणी या हेतु ॥ १९० ॥ रासक्रीडेच्या अवसरीं । निश्चळ राहिले ग्रह अंबरीं । तेणें कुंठित भास्करभंवरी । बृहच्छर्वरी षाण्मासी† ॥ ९१ ॥

---

पाठभेद :— * गळतां ( उ. ). † षण्माशी ( मुं. ).
१ अप्रतिबंध, शृंगारातिशयानें युक्त. २ देवांगना. ३ अवयवांची. ४ सहा महिन्यांची दीर्घ रात्र.

ब्राह्मषण्मासांची राती । रासमंडळीं कमलापति । करूनि प्रेमळा गोपयुवति । निजात्मरति रंगविल्या ॥ ९२ ॥ आतां तेंचि रतिरहस्य । जैसें गोपींचें मानस । तैसतैसा आदिपुरुष । अर्पी संतोष तें ऐका ॥ ९३ ॥

कृत्वा तावंतमात्मानं यावतीर्व्रजयोषितः । रेमे स भगवांस्ताभिरात्मारामोऽपि लीलया ॥ २० ॥

कात्यायनीव्रताचरणीं । प्रार्थिली पृथक्त्वें भवानी । नंदनंदन पति दे म्हणोनि । पुरश्चरणीं स्तुतिनमनें ॥ ९४ ॥ त्या व्रताची सांगतासिद्धि । झाली म्हणोनि कृपानिधि । येऊनि चीरापहरणविधि । लीलाविनोदीं गौरविल्या ॥ १९५ ॥ तेव्हां त्यांचें अभ्यंतर । जाणोनि वदला वरदोत्तर । तें येथ करावया साचार । पृथकाकार नटें धरिले ॥ ९६ ॥ जितुक्या होत्या बल्लवयुवति । तितुक्या पृथक् कृष्णमूर्त्ति । होऊनि रमला त्यांचिये प्रीती । निजात्मरतिरसभोक्ता ॥ ९७ ॥ तया सुरतामाजि पूर्ण । प्रकटी आपुलें कृपाळुपण । तें निरूपी व्यासनंदन । परिसे सर्वज्ञ कुरुवर्य ॥ ९८ ॥

तासामतिविहारेण श्रांतानां वदनानि सः । प्रामृजत्करुणः प्रेम्णा शंतमेनात्मपाणिना ॥ २१ ॥

अत्यंतरतिरंगसंगरीं । परिश्रांता व्रजसुंदरी । प्रस्वेदकणिका मुखकह्लारीं । सर्व शरीरीं उद्भवल्या ॥ ९९ ॥ चुंबनालिंगनें रहितवसनें । वर्ष्मस्पर्शें[2] कुचपीडनें । मन्मथसदनसंघट्टनें । गोपीवदनें घर्माक्तें ॥ २०० ॥* देखोनि प्रपन्नपारिजात[3] । प्रेमळ वत्सळ करुणाभरित । सुखकर करतळें परिमार्जित । सुरतस्वेद गोपींचा ॥ १ ॥* जो पद्मकर विधीचे माथां । शंतम ठेवी अनुग्रहीतां । तेणें हस्तें मन्मथजनिता । वनितावदनें परिमार्जी ॥ २ ॥ कमलासुरतीं ज्या करतळें । घर्म पुसूनि तोषवी कमळें । तेणें हस्तें वदनकमळें । व्रजललनांचीं परिमार्जी ॥ ३ ॥ तो कृष्णाचा शंतम कर । स्पर्शतां गोपीहृत्फुल्लार । होऊनि परमानंदनिर्भर । हर्षे श्रीधरयश गाती ॥ ४ ॥

गोप्यः स्फुरत्पुरटकुंडलकुंतलत्विङ्गण्डश्रिया सुधितहासनिरीक्षणेन ।
मानं दधत्य ऋषभस्य जगुः कृतानि पुण्यानि तत्कररुहस्पर्शप्रमोदाः ॥ २२ ॥

चंचच्चामीकरकुंडलें । भ्रमरभासुर कुंतळ काळे । उभयप्रभान्वितकपोलें । मुकुराकार द्युतिमंतें ॥ २०५ ॥ विशेष रत्नजडित लेणीं । मिश्रित प्रभा तेणें करूनी । अमृतकार फांके वदनीं । स्निग्धेक्षणीं स्मितसहिता ॥ ६ ॥ ऋषभ म्हणिजे परमश्रेष्ठ । आपुला पति जो श्रीकृष्णनाथ । त्यासी सुरतीं सम्मानित । गोपी यथोचित सुचरितीं ॥ ७ ॥ गाढालिंगनीं कटिसंघटीं । अधरपानीं संलग्नकंठीं । स्निग्धापांगीं करसंस्पृष्टि§ । व्रजगोरटी हरि याजिती ॥ ८ ॥ ऐसिया सुरतानंदकाळीं ।

---

पाठभेद :— * क्र. २०० व २०१ या दोन ओव्या मुंगी प्रतींत नाहींत. § ०संपुटि ( मुं. ).
१ सोंगे. २ शरीरस्पर्श. ३ शरण आहे पारिजात ज्याला तो.

व्रजसुंदरी कीर्तनशाली । सप्रेमभरिता वदनकमळीं । गाती सुताळीं हरिचरितें ॥ ९ ॥ हरिकरनखक्षतें कुचतटीं । होतां प्रमोदभरिता पोटीं । तों तों गाती यश वाक्पुटीं । सुकृतकोटिफळलाभें ॥ २१० ॥ स्थळक्रीडा करूनि ऐसी । गोपीरतिघर्मपरिहारासी । करावया जळक्रीडेसी । करी तिहींशीं तत्प्रेमें ॥ ११ ॥

ताभिर्युतः श्रममपोहितुमंगसंघृष्टस्त्रजः सकुचकुंकुमरंजितायाः ।
गंधर्वपालिभिरनुद्रुत आविशद्वाः श्रांतो गजीभिरिभराडिव भिन्नसेतुः ॥ २३ ॥

गोपींच्या कुचकुंकुमरंगें । माळा संघृष्ट* रतिप्रसंगें । तिये कृष्णमाळेच्या अनुरागें । भृंग सवेगें अनुयायी ॥ १२ ॥ गंधर्वप† जे† गंधर्वपति । तद्वत गायका अळींची पंक्ति । तत्समवेत यमुनेप्रति स्वयें यदुपति प्रवेशे ॥ १३ ॥ करिणीगणेशीं जेंवि करींद्र । कंदर्पदर्पें भेदूनि वप्र[1] । मन्मथलीलें । डहुळी नीर । तैसा श्रीधर वधूसंगें ॥ १४ ॥ ज्ञानप्रबोधकवेदार्क । शासनरूप शास्त्रविवेक । सूत्रतत्पद्धतिसूचक । स्मृतिस्मारक धर्मपथा ॥ २१५ ॥ इत्यादि लोकवेदमर्यादा । तो धर्मसेतु चालिजे सर्वदा । तरीच पाविजे कैवल्यपदा । करितां भेदा अधःपतन ॥ १६ ॥ सर्वीं सर्वत्र हा धर्मसेतु । चालिजे ऐसा नेम संततु । कृष्ण केवळ कर्मातीतु । आद्य अनंत परमात्मा ॥ १७ ॥ यालागिं नोहे विधिकिंकर । भक्तभावनाप्रेमानुसार । स्वच्छंदजारक्रीडापर । तो यदुवीर भिन्नसेतु ॥ १८ ॥ ज्यासि कर्मफळाचा भोग । त्यासी अनुल्लंघ्य सेतुमार्ग । जेथ निजात्मरतिप्रसंग । सेतुभंग तो न गणी ॥ १९ ॥ कृष्ण तों पूर्णकाम निर्विकार । स्वात्माराम अपरतंत्र । स्वभक्तच्छंदें लीलापर । जगदुद्धार गुणकर्में ॥ २२० ॥ ते कृष्णाची जलक्रीडा । ऐकें भूपा श्रवणसुघडा । जीच्या श्रवणें स्नानंद उघडा । अखिल ब्रह्मांडामाजि भरे ॥ २१ ॥

सोऽम्भस्यलं युवतिभिः परिषिच्यमानः प्रेम्णेक्षितः प्रहसतीभिरितस्ततोऽङ्ग ।
वैमानिकैः कुसुमवर्षिभिरीड्यमानो रेमे स्वयं स्वरतिरत्रगजेंद्रलीलः ॥ २४ ॥

यमुनेमाजि युवतिवलय । वेष्टित प्रविष्ट यशोदातनय । त्यावरी गोपींचा समुदाय । शिंपी तोय सभोंवता ॥ २२ ॥ जिकडे जिकडे विहरे हरी । भंवत्या तैशाच व्रजसुंदरी । जळें शिंपिती चपलकरीं । विविधाकारीं सविलास ॥ २३ ॥ स्निग्ध सप्रेम रुचिरेक्षणें । क्रीडाविनोद हास्यवदनें‡ । चटुलनर्मोक्ति प्रियभाषणें । गोपी जीवनें शिंपिती ॥ २४ ॥ बादरायणि विशाळबुद्धि । कोमळामंत्रणें सुखसंवादी । अंगशब्दें नृपातें बोधी । सप्रेमाविधि तोषोनी ॥ २२५ ॥ विमानयानीं निर्जरगणीं । दिव्य सुमनांचिया श्रेणी । कृष्णावरी अभिवर्षोनी । नानास्तवनीं गुण गाती ॥ २६ ॥ ऐसा अमरीं संस्तूयमान[2] । अनंताचिंत्यगुणपरिपूर्ण । निष्कामनिजात्मरतिसंपन्न । बल्लवीगण तो रमवी ॥ २७ ॥

पाठभेदः— * संघट्ट ( मुं. ). † गंधर्वपदे ( मुं. ). ‡ हास्यवचनें ( उ. ).

१ बंधारा, नदीतीर. २ स्तुति केला जाणारा.

निजजनांचे लीलेकरून । ज्याचें अवतारचरित्र पूर्ण । तो स्वच्छंदें जळक्रीडन । करी वधूजनतोषार्थ ॥ २८ ॥ गोपीउडुगणीं कृष्णचंद्र । कीं गोपीकरिणींमाजि गजेंद्र । कंदर्पदर्पदलनपर । करी यदुवीर जलक्रीडा ॥ २९ ॥ ईभेंद्र बहुतां करिणींमाजी । तैसाच व्रजवनितासमाजीं । कृष्ण क्रीडतां विमानराजी । कुसुमीं कंजीं वर्षती ॥ २३० ॥ सावळें कृष्णाचें शरीर । सुनीळ कालिंदीचें नीर । कस्तूरी नीलोत्पलांचे हार । जेंवि अंबर घनपटळीं ॥ ३१ ॥ त्यांमाजि जैशा विद्युल्लता । तैशा चमकती गोपवनिता । कनकाभरणीं सालंकृता । स्मरोन्नता रतिरंगीं ॥ ३२ ॥ गोपीउरोज श्रीकृष्ण करीं । मर्दितां शोभती कवणेपरी । जेंवि कनकारविंदें भ्रमरीं । यमुनेमाझारीं विराजती ॥ ३३ ॥ ऐसी कथिली स्थळजळकेळी । तदुपरी उपवनीं वनमाळी । क्रीडता झाला वधूमंडळीं । क्रीडाशाली तें ऐका ॥ ३४ ॥

ततश्च कृष्णोपवने जलस्थलप्रसूनगन्धानिलजुष्टदिक्तटे ।
चचार भृंगप्रमदागणावृतो यथामदच्युद्द्विरदः करेणुभिः ॥ २५ ॥

यमुनाजळीं विकसितकमळीं । सुगन्धासक्त होते अळी । वृक्षवल्ली कुसुमें स्थळीं । भ्रमरावळीमण्डित ॥ २३५ ॥ तयां कुसुमांवरूनि अनिळ । मन्द सुगन्ध सुशीतळ । झुळुका येतां दिग्मण्डळ । व्याप्त सकळ सौरभ्यें ॥ ३६ ॥ तये यमुनेच्या उपवनीं । अळिउळ आणि अंगनागणीं । वेष्टित विहरे पंकजपाणि । निर्जरसुमनीं सुपूजित ॥ ३७ ॥ मदांबुमंडित गंडस्थळीं । आसवासक्त भ्रमरावळि । करिणीवेष्टित कंदर्पकेली । करी वनमाळी करी[3] जैसा ॥ ३८ ॥ ऐसा पुलिनीं जीवनीं उपवनीं । त्रिविध क्रीडा पंकजपाणि । क्रीडला तें बादरायणि । उपसंहरूनि निरूपी ॥ ३९ ॥

एवं शशांकांशुविराजिता निशाः स सत्यकामोऽनुरताबलागणः ।
सिषेव आत्मन्यवरुद्धसौरतः सर्वाः शरत्काव्यकथारसाश्रयाः ॥ २६ ॥

एवं पूर्वोक्तप्रकारीं । सर्वा शरत्काळींच्या रात्री । सत्यसंकल्प गिरिवरधारी । व्रजसुंदरींसह सेवी ॥ २४० ॥ ज्याचा संकल्प अव्याहत । ब्रह्मांडकोटि निमेषा आंत । विस्तारूनि जेथींच्या तेथ । करी गुप्त ऐश्वर्यें ॥ ४१ ॥ स्वपदानुरक्ता जाणोनि ललना । तो हा श्रीकृष्ण त्रैलोक्यराणा । फेडावया वरदऋणा । रासक्रीडना अनुसरला ॥ ४२ ॥ निजानुरक्ता गोपीगणा- । माजि मधुकरनिभ यदुराणा । करी समस्त दोषा[4]सेवना । शरत्कां[5]लीना शृंगारें ॥ ४३ ॥ दोषाकरक[6]भारांजित दोषा । शरत्काव्यकथारसा । आश्रयभूता ज्या अशेषा । तितुक्या परेशा प्रियरूपा ॥ ४४ ॥ शरत्काळाचें वर्णन । कथारूपें काव्यग्रथन । करिती कविवर विचक्षण । नवरससंपन्न सुखकारी ॥ २४५ ॥ आश्रय तया काव्यरसा । त्या ज्या शरत्काळींच्या निशा । अनुरक्तगोपीगणविलासा । करूनि कृष्णें

१ गजेंद्र. २ मकरंद पिण्यांत मग्न झालेली. ३ हत्ती. ४ दोषा=रात्र. ५ शरत्काळाच्या. ६ चंद्रकिरणांनीं शोभायमान इंद्रियें.

सेविल्या ॥ ४६ ॥ गोपीगणेंशीं विलास कृष्णें । कामजयार्थ मुख्य करणें । स्वधर्मभंगें व्यभिचारणें । हें बोलणें अघटित ॥ ४७ ॥ तरी कां क्रीडला गोपीगणीं । ऐसी शंका मानिती कोण्ही । तिहीं श्लोकींच्या तृतीय चरणीं । मूळव्याख्यानीं पहावें ॥ ४८ ॥ श्लोकींचा तृतीय चरणः ‘ सिषेव आत्मन्यवरुद्धसौरतः ’ ।– आत्मनि म्हणिजे आपुले ठायीं । रमण सुष्ठुत्वें सर्वदाही । स्खलितविषयेंद्रियप्रवाहीं । नोहे कदाही विक्षेपें ॥ ४९ ॥ शबलमायेच्या आवरणें । आत्मविस्मृति तमोगुणें । मलिनसत्त्वें विक्षेपणें । विषयीं करणें तैं भ्रमती ॥ २५० ॥ ऐसा त्रिगुणीं निबद्ध जीव । तो सत्य मानी विषयभाव । तेथ रमणार्थ धरी हांव । लंघूनि सींव धर्माची ॥ ५१ ॥ श्रीकृष्ण केवळ परब्रह्म । त्यासी न बाधी अविद्याभ्रम । अजिंक जिंकावया काम । गोपीसंगम नटनाट्य ॥ ५२ ॥ जो न वचेचि समरमही । तयासी कोण्ही न म्हणती विजयी । अलोट शस्त्रास्त्रांच्या घायीं । शौर्यें तो तैं वाखाणे ॥ ५३ ॥ तैसी शत्रूची आंगवण । बुद्धि प्रताप होय जों क्षीण । तोंवरी धैर्यें करी सहन । भयभंजन भगवंत ॥ ५४ ॥ देह असता भूतात्मक । तरी तो धरिता शत्रुधाक । सर्वात्मका शत्रुषट्क । म्हणतां विवेक पांगुळे ॥ २५५ ॥ पूर्णानुभवें क्षमाशीळ । तेथ शत्रूचें न वचे बळ । ये अवतारीं श्रीगोपाळ । दावी केवळ वर्तूनी ॥५६॥ पूतनेचें दुर्जर क्ष्वेडें[2] । प्राशी हळाहळ जैसा मृडें[3] । धैर्यभंगें करी तडफड । मरणा वरपड[4] ते जाली ॥ ५७ ॥ तृणावर्त्तें गगना नेला । त्यासि तैसाचि अनुकूळ झाला । गुरुतर नुचलतां तो मेला । परी कृष्णें न केला प्रतिकार ॥ ५८ ॥ शकटभंजन पद्चालनें । परी आपण न चळे तया भेणें । यमलार्जुनांतें उन्मळणें । परी प्रपोतविघ्नें न डंडळी ॥ ५९ ॥ बकें गिळितां तो कंठीं पोळे । परी आपण तया भेणें न पळे । वत्सासुराचे कपटलीले । न कीजे गोपाळें प्रतियत्न ॥ २६० ॥ अघासुरें वत्सें वत्सप । गिळूनि केले प्रेतरूप । जाणोनि तयाचा कपटाटोप । शंकाकल्प हरि न धरी ॥ ६१ ॥ तयाच्या मनोरथाचि सरिसा । करितां तद्वदनीं प्रवेशा । गिळितां अडकला त्याचिया घसां । पावला नाशा अघ तेणें ॥ ६२ ॥* ब्राह्मी माया विस्तारून । वत्स वत्सपां लपवी द्रुहिण । वयस्य वांसुरें होऊनि आपण । लज्जायमान तो केला ॥ ६३ ॥ कालियसर्पें शतैकतोंडें । डंखितां शरीरीं विषोर्मि न चढे । सर्वांग कर्षिलें घालूनि वेढे । तरी न कोंडे धृति ज्याची ॥ ६४ ॥ कालियफणांवरी नर्त्तन । तेणेंचि सर्पदर्पापहरण । वणवा गिळूनि साहिला पूर्ण । परी न करी प्रशमन जलवर्षें ॥ २६५ ॥ इंद्र वर्षतां शिलाधारीं । गोकुळावरी धरिला गिरि । निश्चळ राहूनि सप्त रात्री । सहस्रनेत्री लाजविला† ॥ ६६ ॥ वरुणें स्वलोका नेला नंद । पातला सोडवणें मुकुंद । तेणें पूजूनि आनंदकंद । परमानंद पावला ॥ ६७ ॥ त्रिजग जिंकूनि स्वप्रतापें । वरिली विजयश्री कंदर्पें । तो सांडविला येथ दर्पें । पूतनागरपें रतिसमरीं ॥ ६८ ॥ कांता एकांतकांतारीं । शरच्छशिभांकित शर्वरी । सुगंधसुमनीं सप्तस्वरीं । जिंके समरीं स्मर त्रिजगा ॥ ६९ ॥ नग्नावयवा नागरी ललना । नवयौवना नलिनेक्षणा । नागेंद्रगामिनी

पाठभेद :— * ओवी क्र. ६२ उमरखेड प्रतींत नाहीं. † लासविला ( उ. ).

१ इंद्रिये. २ विष. ३ शंकर. ४ अधीन. ५ पतनभयानें. ६ चलन न पावे. ७ दगडांच्या वृष्टीनें. ८ पूतनेचें विष पिणाऱ्यानें. ९ शरदृतूंतील चंद्रकांतीनें युक्त.

नाट्यनिपुणा । नमिती चरणां नम्रत्वें ॥ २७० ॥ चाटु चाटुल चातुर्यखाणी । चंपकगोरा चंद्रानननी । चपळा चमकती सजळघनीं । चारुभाषणी चार्वंगी ॥ ७१ ॥ ऐसियांचिये कटाक्षबाणीं । न पडे मन्मथसमरांगणीं । ऐसा ऐकिला नाहींच* कोण्ही । कृष्णा वांचूनि त्रिकाळीं ॥ ७२ ॥ मित्र परीक्षिजे व्यसन पडतां । धनक्षयीं साध्वी कांता । दुर्भिक्षकाळीं निवडे दाता । कळे निर्ममता सुतनिधनीं ॥ ७३ ॥ शूर निवडे समरांगणीं । सुवर्ण निवडे पावकवदनीं । हिरा निवडे मारितां घनीं । निवडे ज्ञानी निर्मोहें ॥ ७४ ॥ कांता एकांतीं अनुकूल । प्रार्थनापूर्वक घडल्या मेळ । निवडे ब्रह्मचर्यादिकांचें शील । हृदय अमल अविकृत ॥ २७५ ॥ शौर्यवल्गना बैसोनि सदनीं । औदार्यकथन ब्रह्मारण्यीं । ब्रह्मचर्यादि सभास्थानीं । कथिजे जनीं सर्वत्र ॥ ७६ ॥ ते तंव वृथाचि विकत्थना[1] । म्हणोनि श्रीकृष्ण त्रैलोक्यराणा । मन्मथसमरीं अजिंक जाणा । विरहिणीगणा वश नोहे ॥ ७७ ॥ प्रियतम-गोपींहीं प्रार्थिला । न वचे कंदर्पें भुलविला । रासमंडळीं नाचविला । परी तो दादुला स्मरविजयी ॥ ७८ ॥ स्मरण कीर्त्तन संक्रीडन । सादर ईक्षण गुह्य प्रश्न । संकल्प उद्योग लिंगमेलन । अष्टांगमैथुन या नांव ॥ ७९ ॥ तरुणतरुणींशीं एकत्र । घडतां एकांतीं वसति मात्र । मन्मथबाणें भंगे गात्र । ऐसें चरित्र मदनाचें ॥ २८० ॥ तेथ लिंगसंघट्टयोगें । गोपी भोगितां सप्रेमरंगें । ज्याचें ब्रह्मचर्य न भंगे । न वचे अनंगें जिंकिला ॥ ८१ ॥ चरमधातु[2] म्हणिजे शुक्र । न द्रवे रमतां वनिताचक्र । नवनीत न लभे माथितां तक्र । तैसा अवक्र आत्मरत ॥ ८२ ॥ आत्मसुरत ज्यासी फावे । तो कां विषया रमों धावे । ध्वान्तांन्तकें[3] रोहिणीमावे† । प्राशनहावें धरिजे कैं ॥ ८३ ॥ तस्मात् कंदर्पक्रीडासमरीं । कृष्ण आजिंक निर्विकारी । तयासि म्हणती जे व्यभिचारी । ते संसारीं भवरुग्ण[4] ॥ ८४ ॥ कृष्ण म्हणती व्यभिचारला । त्यांचा परमार्थ वृथा गेला । यथार्थ बोध नाहींच झाला । म्हणोनि विषयाला प्रतिपादिती ॥ २८५ ॥ कृष्णविरहें स्मरचि जर्जर । कृष्णा न बधी मन्मथशर । म्हणोनि संकल्प करी मार । कृष्णकुमार व्हावया ॥ ८६ ॥ कृष्णात्मजतालाभें प्रसिद्ध । रूपचातुर्यसद्गुणवृंद । कृष्णा-तुल्य लाहेन विशद । ऐसा सादर स्मर हृदयीं ॥ ८७ ॥ आदिनारायणावतारीं । वसंत मन्मथ सह अप्सरीं । तपोभंगार्थ साही वैरी । मघवा[5] प्रेरी आश्रमा ॥ ८८ ॥ तें जाणोनि सर्वात्मक । नोहे सक्रोध ना कामुक । स्वऐश्वर्यें केलीं मशक । शक्रप्रमुख सम्मानें ॥ ८९ ॥ स्वसुखशांति न भंगतां । तपोनिष्ठा नुल्लंघितां । संतोषवूनि अभ्यागतां । अमरनाथा लाजविलें ॥ २९० ॥ तोचि हा येथ श्रीमुरारि । रासरसिक क्रीडाकुसरी । मन्मथ जिंकावया समरीं । वधू श्रृंगारी ऐश्वर्यें ॥ ९१ ॥ पांचँ-भौतिक[6] कर्दमगोळे । कृष्णें स्वमायायोगबळें । शृंगारूनि वधूंचे पाळे । केले स्वलीले अनुकूल ॥ ९२ ॥ अचेत काष्ठाची वॅल्लकी[7] । स्वकौशल्यें तौर्यत्रिकीं । कीजे अनुकूल तांडवविखीं । तेंवि वनौकी[8] व्रजनाथें ॥ ९३ ॥ अचिंत्यानंतैश्वर्यखाणी । कामजयार्थ चक्रपाणि । सबाह्य सज्जिला लावण्यगुणीं । व्रजकामिनीस्मररंगीं ॥ ९४ ॥ एरवीं विपरीत वस्त्राभरणा । तनु नेणती नग्नानग्ना । कृष्णवेधें

---

पाठभेद :— * नाहीं ( उ. ). † रोहिणीनावे ( उ. ).

१ बडबड. २ शेवटीं उत्पन्न होणारा. ३ चंद्रानें. ४ संसाररोगानें ग्रस्त. ५ इंद्र. ६ पंचभूतात्मक. ७ वीणा. ८ अरण्यवासिनी.

धांविल्या ललना। पूर्वीं कथना या केलें ॥ २९५ ॥ ब्राह्म षाण्मासिका रजनी। शरत्काळींच्या अवघ्या करूनी। योगियां भयद ज्या कामिनी। तन्मैथुनीं अस्खलित ॥ ९६ ॥ ललनालावण्यरसिकराशि। कृष्णें वेधिलें सुरवरांसि। गोपिकावेषें कैलासवासी। रासक्रीडेसी पातला ॥ ९७ ॥ तंव एकैक* गोपी एकैक कृष्ण। ऐसें रचिलें रासकंकण। शंभूसि नवजोडे सन्निधान। मग चरणांमधूनि रिघे चक्रीं ॥ ९८ ॥ गोपीवेष देखोनि हर। कृष्ण म्हणे हो गोपीश्वर। किमर्थ केला स्त्रीशृंगार। ऐकोनि शंकर लाजिला ॥ ९९ ॥ अद्यापि पहा वृंदावनीं। गोपीश्वर शूळपाणि। शृंगारयुक्तवनिताभरणीं। रासस्थानीं जग वंदी ॥ ३०० ॥ मथुरामाहात्म्यीं हें आख्यान। यात्राप्रसंगें देखती जन। ऐसें कृष्णाचें विंदान। त्रिजगत्संपूर्ण वेधिलें ॥ १ ॥ निजगुणैश्वर्य वनिताआंगीं। सबाह्य लेववूनि रतिरंगीं। गोपी तोषवूनि तितुकें वेगीं। पुन्हां निजांगीं सांठविलें ॥ २ ॥ राजस गोपी अधरींचे रंग। चुंबनमिसें हरी श्रीरंग। सबाष्प तामस† अंजनवोघ। हरी सवेग करस्पर्शें ॥ ३ ॥ बुक्का चंदन पुष्पमाळा। सत्त्वसंपत्ति ज्या बहळा। गोपी आळंगितां गोपाळा। सुरतीं सकळा त्या हरिल्या ॥ ४ ॥ कंचुकीमिसें चिज्जडग्रंथि। नीवीमोक्षणें नित्यमुक्ति। सुरतानंदें पूर्णस्थिति। सायुज्यप्राप्ति गोपीतें ॥ ३०५ ॥ कृष्णा कंठीं घालुनि हात। रतान्तीं गोपी स्वानंदभरित। पूर्णासमान‡ निजात्मरत। गोपी संतत स्वानंदें ॥ ६ ॥ ऐसा रासरसोल्लास। शुकें कथितां कुरुवर्यास। तया मानसीं शंकालेश। म्हणोनि प्रश्नास आदरीं ॥ ७ ॥

राजोवाच :— संस्थापनाय धर्मस्य प्रशमायेतरस्य च। अवतीर्णो हि भगवानंशेन जगदीश्वरः ॥ २७ ॥

राजा म्हणे गा अरणीतनया। व्यासात्मजा योगिवर्या। माझी शंका परिसोनियां। निरसावया समर्थ तूं ॥ ८ ॥ धर्मसंस्थापने कारणें। श्रीकृष्णाचें अवतार धरणें। अंशें म्हणिजे संकर्षणें। सहित येणें इहलोका ॥ ९ ॥ हीति§ निश्चयें तोचि अर्थ। दोहीं नामीं विरोधस्थ। संक्षेप सूचिला तो यथार्थ। श्रोते समर्थ परिसोत ॥ ३१० ॥ अचिंत्यैश्वर्यसंपन्न। अघटितघटनापटुतरपूर्ण। मायानियंता श्रीभगवान। तो हा श्रीकृष्ण जगदात्मा ॥ ११ ॥ आणि जगाचा कल्याणकर। म्हणोनि बोलिजे जगदीश्वर। तो केवीं हा अनाचार। आचरे जाररतिलास्य ॥ १२ ॥

स कथं धर्मसेतूनां वक्ता कर्ताऽभिरक्षिता। प्रतीपमाचरद्ब्रह्मन्परदाराभिमर्शनम् ॥ २८ ॥
आप्तकामो यदुपतिः कृतवान्वै जुगुप्सितम्। किमभिप्राय एतन्नः संशयं छिंधि सुव्रत ॥ २९ ॥

जगदीश्वरत्वें जगत्पिता। वेदवाक्यें स्वधर्मवक्ता। विशेष धर्मसंस्थापिता। अधर्मच्छेत्ता श्रीकृष्ण ॥ १३ ॥ धर्मसेतु जे सनातन। त्यांचें करावया रक्षण। युगीं युगीं अवतरोन। अधर्मप्रशमन करीतसे ॥ १४ ॥ अधर्म म्हणसी कोण काय। तरी स्वधर्माची लंघूनि सोय। पाखंडमार्ग

पाठभेद :— * यकैक ( उ. ). † तापस ( मुं. ). ‡ पूर्णासन्मान ( उ. ). § तिही ( मुं. ).
१ शंकर. २ कौशल्य.

वेदबाह्य । जे अन्याय विषयार्थ ॥ ३१५ ॥ देहबुद्धि तदाभिमान । धरूनि प्रवर्त्तविती जे दुर्जन । त्यांचें करूनियां प्रशमन । रक्षी सज्जन स्वधर्मी ॥ १६ ॥ धर्मासी प्रतिकूळ म्हणिजे प्रतीप । कां आचरला मन्मथबाप । रासरसिक क्रीडाकल्प । जो अनल्प अधर्म ॥ १७ ॥ केवळ अधर्मचि नोहे जाण । जैसें बडिशौक्त* मांसभक्षण । तें एकासी करी दूषण । हें संपूर्ण जग व्यापी ॥ १८ ॥ परदाराभिमर्शन । महा साहस दीर्घप्रयत्न । हेंचि करूनि प्रमाण । विधिलंघन जन करिती ॥ १९ ॥ माता बाळां रक्षण करी । विष देऊनि जैं ते† मारी । कीं तस्करभीता नृप कैवारी । जेंवि तोचि हरी सर्वस्वें ॥ ३२० ॥ धर्मरक्षक चक्रपाणि । प्रवर्त्तला अधर्माचरणीं । ऐसी प्रतीप केली करणी । काय म्हणोनि मज सांगा ॥ २१ ॥ मायानियंता श्रीभगवान । प्रथम बोलिलों करितां प्रश्न । त्यासी गोपी मन्मथेंविण । अशक्य कोण तोषवितां ॥ २२ ॥ ब्राह्मषण्मास केली राती । त्यासि गोपींची कामप्रवृत्ति । परतवावया नव्हती शक्ति । जे अधर्मसुरतीं प्रवर्त्तला ॥ २३ ॥ म्हणसी कृष्ण अवाप्तकाम । अभेद सर्वग आत्माराम । तेथ परापरत्वें भेदभ्रम । कैंचा अधर्म व्यभिचार ॥ २४ ॥ तरी हें मीही साच मानीं । परी हें घडे पूर्णपणीं । येथ धर्मसंस्थापनीं । अधर्मकरणी अश्लाघ्य ॥ ३२५ ॥ जरी श्रीकृष्ण निजात्मरत । तरी कां ऐसें जुगुप्सित[३] । आविधि गोपींचें जारचरित । महा अयुक्त आचरला ॥ २६ ॥ कामें कलुषी अंतःकरण । न होतां किमर्थ दुष्टाचरण । कांहीं अभिप्राय लक्षून । असेल श्रीकृष्ण आचरला ॥ २७ ॥ परंतु इतुकें दिसे प्रकट । जैसें आचरती श्रेष्ठ । तेंचि प्रमाण करिती स्पष्ट । येर कनिष्ठ आचरतां ॥ २८ ॥ कृष्ण धर्मसंस्थापक । तो जें आचरला कौतुक । तैसें आचरती निःशंक । समस्त लोक प्रामाण्यें ॥ २९ ॥ त्या जनांची अवस्था काय । कीं कृष्णाचा जो अभिप्राय । आम्हां प्राकृतां जो दुर्ज्ञेय । तो निःसंशय कथावा ॥ ३३० ॥ सत्यवादी सुदृढव्रत । म्हणोनि संबोधी भो सुव्रत । कृष्णाभिप्राय वद यथार्थ । जे तूं अयथार्थ नातळसी‡ ॥ ३१ ॥ हे ऐकोनि नृपाची वाणी । संतोषोनि बादरायणि । म्हणे राया कल्याणखाणी । लोकपाळणीं प्रवर्त्तसी ॥ ३२ ॥ लोक[४]संग्रहाचि कारणें । राया तुझें हें प्रश्न करणें । येऱ्हवीं जाणसी अंतःकरणें । कृष्णाचरणें अलौकिकें ॥ ३३ ॥

श्रीशुक उवाचः— धर्मव्यतिक्रमो दृष्ट ईश्वराणां च साहसम् ।
तेजीयसां न दोषाय वह्नेः सर्वभुजो यथा ॥ ३० ॥

कृष्णहृदयींचा अभिप्राय । राया ऐकें निःसंशय । लोकरक्षण कामविजय । कलिमलभयप्रशमन ॥ ३४ ॥ युगीं युगीं हरिअवतार । घेऊनि प्रवृत्ति युगानुसार । दावूनि करी जगदुद्धार । सत्य साचार निष्कर्म ॥ ३३५ ॥ कृतीं आदिनारायण । सत्यशौचसदयपूर्ण । क्षात्रधर्मपरायण ।

**पाठभेदः**— * बिडिशाक्त ( उ. ). † तेचि ( उ. ). ‡ प्रवर्तसी ( उ. ).

१ मासे पकडण्याच्या गळाला चिकटलेलें. २ धर्मविरुद्ध. ३ निंद्य. ४ लोकांची स्वधर्माचे ठायीं प्रवृत्ति होण्याकरितां जें धर्माचरण तें.

स्वयें निर्घृण लोकभयें ॥ ३६ ॥ कलिप्रारंभीं द्वापरान्तीं । कृष्ण अवतरला जगत्पति । दोहीं युगांची विडंबस्थिति । दावी आद्यन्तीं विचरोनी ॥ ३७ ॥ द्वापरींचें* विडंबनकर्म । अर्ध यथार्थ अर्ध कृत्रिम । नंदयशोदागोपीप्रेम । पूर्णकाम संपादी ॥ ३८ ॥ परी तो यथार्थ वस्तुमहिमा । सारिखा गमे जर्‍ही कृत्रिमा । तर्‍ही पाववी कैवल्यधामा । वियोगप्रेमा वोपूनी ॥ ३९ ॥ येर्‍हवीं कार्यापुरता स्नेह । दावूनि मित्रत्वा करी रोहें । अंतीं वियोगदुःखें दाह । होतां पहा हो न शिणेचि ॥ ३४० ॥ आतां कळीचें विडंबन । जारचौर्यानृतभाषण । समरंगणीं पलायन । गूढवर्त्तन कापट्यें ॥ ४१ ॥ सर्वत्र कळिकाळीं हे क्रिया । करूनि जाती निरयालया । कृष्ण तयांसि उद्धरावया । प्रतीपचर्या आचरला ॥ ४२ ॥ गोरस चोरूनि भक्षिला कृष्णें । ते बाळचर्येच्या श्रवणें पठनें । स्वर्णस्तेयादि महादूषणें । जळोनि जाति तत्काळ ॥ ४३ ॥ श्रीकृष्णाचे रासक्रीडे । श्रवणें ऐकतां पढतां तोंडें । मातृगमनादि पातक झडे । मां कैंचा त्या पुढें व्यभिचार ॥ ४४ ॥ ब्राह्मणविडंबें कितवाचरणें । मागधादिकां निर्दाळणें । कालयवनासमरीं पळणें । यांच्या पठनें अघशांति ॥ ३४५ ॥ एवं कळिकाळग्रस्तां जनां । तारावया विषयाचरणा† । कृष्ण करी त्या श्रवणा पठना । अघमोक्षणा पावती ॥ ४६ ॥ पाहोनि कृष्णाचें आचरण । येर जें आचरती सामान्य । तें त्यांलागीं अधःपतन । हें निमित्त देशी कृष्णातें ॥ ४७ ॥ तरी येथींचा ऐसा अर्थ । राया अवधारीं यथार्थ । ईश्वराचरणाचा जो पंथ । तो दे अनर्थ अनीश्वरां ॥ ४८ ॥ कृष्ण परब्रह्म साचार । जो ईश्वरांचा ईश्वर । मायानियंता जगदाधार । अगाध अपार ऐश्वर्यें ॥ ४९ ॥ असो कृष्णाचें आचरण । परी सामान्य जे जे तपोधन । ज्यांची क्रिया असाधारण । केवीं सामान्य आचरती ॥ ३५० ॥ इंद्रें ब्रह्मघ्न वधिला वृत्र । घटजें सागर केला मूत्र । वशिष्ठाचे शतेक पुत्र । विश्वामित्र संहरवी ॥ ५१ ॥ ब्रह्मयाचें कन्यागमन । शंकराचें विषभक्षण । दत्तात्रेयाचें उन्मत्तपण । इतर कोण करूं शके ॥ ५२ ॥ वायु न म्हणे अगम्यागमन । कीं सर्वभक्षक हुताशन । कीं गंगेचें निर्मळपण । समळानिर्मळ‖ न विचारी ॥ ५३ ॥ इतर सामान्य मूढपणें । त्यांचीं‡ देखोनि उत्पथाचरणें । आचरों म्हणतां मुकती प्राणें । नाशती पुण्यें संग्रहिलीं ॥ ५४ ॥

नैतत्समाचरेज्जातु मनसाऽपि ह्यनीश्वरः । विनश्यत्याचरन्मौढ्याद्यथाऽरुद्रोऽब्धिजं विषम् ॥ ३१ ॥

यालागिं जो अनीश्वर । देहाभिमानी कर्मतंत्र । तेणें ईश्वराचें चरित्र । कदापि अणुमात्र नाचरिजे ॥ ३५५ ॥ ईश्वराचरिताचा संकल्प । मनेंकरूनि न कीजे अल्प । ईश्वराज्ञेचा क्रियाकल्प । निर्विकल्प आचरिजे ॥ ५६ ॥ म्हणाल मनुष्यवेशें कृष्णें । जीं जीं केलीं क्रियाचरणें । तीं तीं मानवां स्पृहायमाणें । तरी हें झणें मानाल ॥ ५७ ॥ केवळ पूतना राक्षसी । कृष्णें घोटिली विषा-

**पाठभेद :** — * द्वापारींचें ( मुं. ) † विषमाचरणा ( उ. ). ‖ समळ मळीन ( उ. ) ‡ याचि ( उ. ).

१ निर्दय. २ वृद्धि. ३ नरकस्थानास. ४ विरुद्धाचरण. ५ सोन्याची चोरी. ६ कपटाचरणें. ७ अगस्ति ऋषीनें ८ इच्छिलीं जाणारीं.

सरिसी । येरां मानवां न जिरे माशी । हें मानसीं नुमजावें ॥ ५८ ॥ कृष्णें शकट मोडिला पायें । येरां त्रिमासिका[1] केंवि हें होये । तृणावर्ताचें न धरी भय । प्राणप्रळय त्या केला ॥ ५९ ॥ कृष्णें मृत्तिका भक्षूनि पोटीं । दाविल्या अनंतब्रह्मांडकोटी । इतरांसमान केंवि हे गोठी । वृथा चावटी समतेची ॥ ३६० ॥ मुंगळ्याभेणें* इतरां त्रास । कृष्णें मर्दिलें अघासुरास । कृष्णें नाथिलें कालियास । पोरें जंतांस कांपती ॥ ६१ ॥ वत्सें वत्सप कृष्ण झाला । लाजोनि ब्रह्मा शरण आला । चुकलें वत्स सांपडावयाला । येर देवाला नवसिती ॥ ६२ ॥ कृष्णें दावानळ प्राशिला । येरा उष्ण ग्रास नवचे गिळिला । कृष्णें इंद्र अव्हेरिला । येरां दूतांला नाक्रमवे ॥ ६३ ॥ कृष्णें उचलिला गोवर्धन । येरां भाराभरी नुचले तृण । कृष्णें वरुणलोका जाऊन । नंद आणून तोषविला ॥ ६४ ॥ कृष्ण प्रतापमार्तंड । येरां न उठे हागती रांड† । त्या कृष्णाचा पडिपाड[2] । कराया तोंड कोण्हाचें ॥ ३६५ ॥ कृष्ण निर्जरीं अभिषेकिला । ऐसा मानवी कोण दादुला । कृष्ण गोपींशीं क्रीडिन्नला । परी नाहीं भुलविला कंदर्पें ॥ ६६ ॥ वेणुरवें भुलविल्या नारी । विवश धांवती भ्रमितापरी । कृष्ण बोधी त्या स्वधर्माचारीं । परी नोहे अंतरीं सकाम ॥ ६७ ॥ निष्कामभजनें अभेदें गोपी । स्वरत रमवी विश्वव्यापी । परंतु गोपींहीं कंदर्पकल्पीं । नवचे कदापि भुलविला ॥ ६८ ॥ रासक्रीडेच्या प्रसंगीं । अनंतमूर्ति वधूगण संगीं । रमला निःसंग शार्ङ्गी । परी न मोडे भोगीं ब्रह्मचर्य ॥ ६९ ॥ रडत विरहिणी लागती पाठी । परी ज्या न भेदी मन्मथकाठी । त्या कृष्णाची समतागोठी । मानवकोटी केंवि करी ॥ ७० ॥ तस्मात् ईश्वराचें जें आचरण । आचिंत्यैश्वर्यें अगाध पूर्ण । तें आचरावया अनीश्वरजन । सहसा प्रमाण न मवावें‡ ॥ ७१ ॥

ईश्वराणां वचः सत्यं तथैवाऽचरितं क्वचित् । तेषां यत्स्ववचोयुक्तं बुद्धिमांस्तत्समाचरेत् ॥ ३२ ॥

ईश्वराचें वाक्याचि सत्य । त्यांतही वर्णाश्रमें नियमित । तेंचि आचरावें निश्चित । सहसा तत्कृत नाचरिजे ॥ ७२ ॥ क्वचित् आचारही प्रमाण । मनुष्यनाट्यें अवतरोन । केलें धर्मसंस्थापन । तें तें लक्षून करावा ॥ ७३ ॥ एकपत्नीदृढव्रत । सत्यशौचस्वधर्मनिरत । सदय क्षमस्वी पितृभक्त । हें रामचरित प्रमाण ॥ ७४ ॥ श्रीरामाचें ईश्वराचरण । म्हणाल कोणतें अप्रमाण । तरी सीतेसि पावकीं करविलें स्नान । केंवि हें सामान्य करूं शके ॥ ३७५ ॥ लपोनि वाळीचा घेतला प्राण । कीं समुद्रशोषणा काढिला बाण । जानकी त्यागिली निष्पाप↓ कळोन । ईश्वर म्हणोन त्या शोभे ॥ ७६ ॥ बिभीषणासि अभिषेचन । समराआधीं केलें पूर्ण । श्रीराम ईश्वराचि म्हणोन । इतरीं प्रमाण हें न कीजे ॥ ७७ ॥ आम्ही कौरवां जिंकूं रणीं । कीं ते जिंकिती आम्हांलागुनी । न कळे ईश्वराची हे करणी । अर्जुनवाणी प्रमाण हे ॥ ७८ ॥ एवं वर्णाश्रमासि जो अनुकूल । तोचि ईश्वराचारही प्रांजळ । येर जो अगाध ऐश्वर्यबहळ । तो मनुजीं केवळ नाचरिजे ॥ ७९ ॥ यास्तव ईश्वरीं जें

पाठभेद :— * मनुष्याभेणें ( मुं. ). † रागति ( उ. ). ‡ म्हणावे ( उ. ). ↓ निःपाप ( उ. ).

१ तीन महिन्यांच्या मुलांस. २ बरोबरी.

आज्ञापिलें। तितुकेंचि मानवीं आचरतां भलें। येर त्याचें कारितां केलें। नाशे जोडलें कल्याण ॥ ३८० ॥ बुद्धिमंत तोचि नर। जो ईश्वराज्ञेसीं तत्पर। होऊनि करी सदाचार। साधी इहपर[1] अपवर्ग[2] ॥ ८१ ॥ जरी तूं शंका करिसी राया। कीं ईश्वराही उत्पथचर्या[3]। महा साहसें करूनियां। जग संशया भेटविजे ॥ ८२ ॥ तिहीं सन्मार्गाचि आचरोन। न कीजे त्रिजगाचें कल्याण। उत्पथें जोडिती सुकृत कोण। सन्मार्गलंघन किमर्थ ॥ ८३ ॥ तूं हे शंका धरिसी पोटीं। तरी यदर्थीं ऐकें गोठी†। ईश्वर पुरुषाचे राहटीं। न येती भेटी शुभाशुभें ॥ ८४ ॥

कुशलाचरितेनैषामिह स्वार्थो न विद्यते। विपर्ययेण वाऽनर्थो निरहंकारिणां प्रभो ॥ ३३ ॥

तरी जे ब्रह्मात्मबोधें पूर्ण। जेथ न संभवती त्रिगुण। त्यांचा देहचि मिथ्या जाण। देहाभिमान मग कोणां ॥ ३८५ ॥ देहातीत निरहंकार। जीवन्मुक्त निर्विकार। ते नोहती विधिकिंकर। पूर्णावतार ऐश्वर्यें ॥ ८६ ॥ त्यांसी विधिप्रणीत कर्म कुशल। ईहामूत्रार्थ नोहे सफळ। अथवा उत्पथाचारें जें कां विकळ। तें अमंगळ हों न शके ॥ ८७ ॥ प्रभुसमर्था नृपोत्तमा। प्रतापें कळिकाळ-दमनक्षमा। स्वसामर्थ्यें पाळिसी क्ष्मा[4]। दुष्टां अधर्मां दंडूनी ॥ ८८ ॥ त्यांमाजि जे जीवन्मुक्त। निर्विकल्प समाधिस्थ। ईश्वरावतार मूर्तिमंत। कर्मातीत जाणसी कीं ॥ ८९ ॥ त्यांसि कैंचें पापपुण्य। स्वर्ग नरक जन्म मरण। प्रारब्धमात्र होय क्षीण। पुढें क्रियमाण हों न शके ॥ ३९० ॥ एका अहंकाराच्या लयें। प्रपंचाचें निर्मूळ होये। विचरताती ब्रह्मान्वयें। त्यां कें काय शुभाशुभ ॥ ९१ ॥ ऐसिया प्राप्तदशेच्या पुरुषां। शुभाशुभाचा न गोवी फांसा। मा श्रीकृष्णा पूर्णपरेशा। उत्पथ ऐसा कोण वदे ॥ ९२ ॥

किमुताखिलसत्त्वानां तिर्यङ्मर्त्यदिवौकसाम्। ईशितुश्चेशितव्यानां कुशलाकुशलान्वयः ॥ ३४ ॥

साधनक्रमें[5] झाले सिद्ध। जीवन्मुक्त जे कां प्रसिद्ध। त्यांसि कुशल अथवा अकुशल विरुद्ध। न लवी बाध आचरणा ॥ ९३ ॥ मां सकळसत्त्वांचा नियंता। तिर्यङ्मर्त्यां आणि स्वर्गस्थां। ईश्वरत्वें ईशन कर्ता। त्या कृष्णनाथा शुभाशुभ ॥ ९४ ॥ कुशलाकुशलानुप्रवृत्ति। ब्रह्मादिस्थावरनियम-स्थिति। वर्तावितां जो त्या श्रीपाति। किमुत§ वदती शुभाशुभें ॥ ३९५ ॥ ज्या सूर्याच्या प्रकाशबळें। कर्मतिमिरा न गणिती डोळे। मां तो सूर्यचि त्या न कळे। मानिजे आगळें किमुत[6] हें ॥ ९६ ॥

यत्पादपंकजपरागनिषेवतृप्ता। योगप्रभावविधुताखिलकर्मबंधाः ॥
स्वैरं चरंति मुनयोऽपि न नह्यमाना–। स्तस्येच्छयात्तवपुषः कुत एव बंधः ॥ ३५ ॥

---

**पाठभेद :**— † गोष्टी ( उ. ). § किमुदित ( उ. ).

१ हा लोक व परलोक. २ मोक्ष. ३ अमार्गाचरण. ४ पृथ्वी. ५ नित्यानित्यविवेक, विरक्ति, शमदमादि षट्कसंपत्ति मुमुक्षुता या साधनचतुष्टयेंकरून. ६ कोणती.

ज्या कृष्णाची पादाब्जधूळि । नितरां म्हणिजे सर्वकाळीं । सप्रेम धरूनि राहिले मौळीं । हृदयकमळीं संतुष्ट ॥ ९७ ॥ पद्मपराग सेविती भ्रमर । अन्यत्र विषयीं अनादर । तैसे पदाब्जसेवनपर । इहामुत्रपरित्यागें ॥ ९८ ॥ सप्रेम पदाब्जसेवननिरत । होऊनि झाले नित्य तृप्त । त्यांसि न बधी* कर्म उत्पथ । नोहे समर्थ बाधावया† ॥ ९९ ॥ सप्रेमभक्तिध्यानयोगें । अभेद इहामुत्रादिविरागें । चित्सुखावाप्ति चैतन्यगंगे । क्षाळिले अवघे कर्मबंध ॥ ४०० ॥ अथवा मुनिही मननशील । नित्यानित्यविवेककुशल[1] । क्षाळूनि दृश्यांचा विटाळ । निवडले केवळ चिद्रूपें ॥ १ ॥ ऐसे अनेक हरिपदनिरत । चिदात्मबोधें नित्यतृप्त । स्वैराचरणीं पथउत्पथ । त्या न बधीत‡ ज्या वेधें ॥ २ ॥ अग्निसान्निध्यें तापलें पाणी । त्यामाजि पचल्या बीजश्रेणी । सुटल्या बीजत्वापासुनी । कीं सुटला अग्नि हा नवलाव ॥ ३ ॥ पिशाच पळती मारुतिस्मरणें । तो मारुति निर्भय पिशाचभेणें । ऐसें काय लागे म्हणणें । मा शंका करणें तें काय ॥ ४ ॥ कृष्णांघ्रिवेधें मातले मुनि । ते निर्मुक्त उत्पथाचरणीं । मा त्या कृष्णातें स्वैर करणी । न बधी म्हणोनि प्रशंसिजे ॥ ४०५ ॥ स्वेच्छेकरूनि मानवी तनु । धरूनि वर्त्ते स्वभक्ताधीन । त्या न बधी§ कर्मबंधन । हें प्रशंसन केतुलें ॥ ६ ॥ परदाराभिमर्शनभय । तुझा निरसला हा संशय । किंवा कांहीं उरला होय । कैसा काय तो सांगें ॥ ७ ॥ ईश्वरानीश्वरभेदें प्रांजळ । कथिलें तें तुज न कळे सकळ । तरी ज्या विवेकें बोधिती बाळ । तें सोपें केवळ अवधारीं ॥ ८ ॥ जेंवि वेगळें घटभरी जळ । उघडें झांकलें समळ अमळ । शुद्धाशुद्ध हा विटाळ । शास्त्रकुशळ बोलती ॥ ९ ॥ ते मर्यादा अगाधह्रदीं । नियमिली न वचे शास्त्रकोविदीं । करिती क्षालनमज्जनादि । वसती सर्पादि जलचरें ॥ ४१० ॥ तेथ उघडेपणाचें गरळभय । कीं स्पर्शास्पर्श रक्षिला जाय । तेंवि सामान्या नेम जो आहे । तो न राहे महत्त्वीं ॥ ११ ॥ कृष्ण ईश्वरांचा ईश्वर । सामान्य जीव अनीश्वर । त्या कृष्णाचा स्वैराचार । केंवि पामर करूं शकती ॥ १२ ॥ एवं परदाराभिमर्शनकर्त्ता म्हणतां अलिप्त कृष्ण । आतां अभेदनिजात्मरमण । तें प्रतिपादन अवधारीं ॥ १३ ॥

गोपीनां तत्पतीनां च सर्वेषामेव देहिनाम् । योऽन्तश्चरति सोऽध्यक्षः क्रीडनेनेह देहभाक् ॥ ३६ ॥

गोपी म्हणिजे बल्लवयुवति । जे जे बल्लव त्यांचे पति । उभयतांचा अंतर्वर्ती‖ । सर्वदंपती श्रीकृष्ण ॥ १४ ॥ लक्षचौऱ्यांशी योनिभेद । एवं दंपती कृष्ण अभेद । रमता रमविता परमानंद । परदारवाद तैं कोणा ॥ ४१५ ॥ वत्सें वत्सपात्मक जाला । गोगोपींचे स्तन प्याला । तो जगदात्मा कृष्ण दादुला । व्यभिचारिला केंवि घडे ॥ १६ ॥ स्वचैतन्यें निर्विकारी । बुद्ध्यादि साक्षी सर्वांतरीं । लीलानाट्यें देहधारी । नोहे निर्धारीं भूतमय ॥ १७ ॥ पाञ्चभौतिक धान्यरस । पितृदेहीं तो वीर्यविशेष । मैथुनमार्गें करी प्रवेश । जननीजठरीं ऋतुकाळीं ॥ १८ ॥ तेथ पचोनि

पाठभेद :--* न बाधी ( मुं. ). † बांधावया ( उ. ). ‡ न बाधित ( मुं. व उ. ). § त्यासी न बाधी ( मुं. ). ‖ अंतरवृत्ति ( मुं. ).

१ आत्मा नित्य, इतर अनित्य--अशा विचारांत निपुण.

मास नव । पाञ्चभौतिकदेहा प्रभाव । श्रीकृष्ण अयोनिसंभव । तो केंवि जीवसम गणिजे ॥ १९ ॥ आमुच्या तुमच्या देहयष्टि । निबद्ध कर्माचे राहटीं । तैसा नोहे कृष्ण जगजेठी । जो सर्वांघटीं एकात्मा ॥ ४२० ॥ कृष्ण पूर्णत्वें परमात्मा । तरी का अनुकरे देहधर्मा । ऐसें म्हणसी नृपोत्तमा । तरी या वर्मा अवधारीं ॥ २१ ॥

अनुग्रहाय भूतानां मानुषं देहमास्थितः । भजते तादृशीः क्रीडा याः श्रुत्वा तत्परो भवेत् ॥ ३७ ॥

स्वसंतुष्ट अवाप्तकाम । तरी किमर्थ जुगुप्सित[1] कर्म । परदाराभिमर्शन अधर्म । कां यदूत्तम आचरला ॥ २२ ॥ राया ऐसा तुझा प्रश्न । ऐक तयाचें निरूपण । भूतानुग्रहार्थ श्रीभगवान । मानुषी* तनु अवलंबी ॥ २३ ॥ तेथ स्वपादभजनोन्मुख । होऊनि अनुसरती सात्त्विक । ते उद्धरतीच निष्टंक । हें तों सम्यक कळलें कीं ॥ २४ ॥ परंतु रजतमाक्त जन । विशेष कलिकाळदोषें मलिन । त्यांसि न रुचे हरिपदभजन । विषयसेवन न टकवे ॥ ४२५ ॥ ऐसियां विषयसक्तांप्रति । होआवया† निज-गुणश्रवणीं रति । त्यांसि प्रियतम जे रसवृत्ति । ते श्रीपति आचरला ॥ २६ ॥ रासक्रीडा शृंगाररसिका । श्रवणीं आकर्षी कामुकां । मानस वेधतां हरिगुणसुखा । विषयआवांकां[2] हारपे ॥ २७ ॥ लागतां हरिगुणसुखाची गोडी । मानस नोहे भवबराडी । इहामुत्रार्थ भोगपरवडी । वमूनि सांडी§ सवासना[3] ॥ २८ ॥ हरिगुणश्रवणीं रंगतां मन । सहज मावळे विषयभान । भवभ्रमाचें अस्तमान । हें अगाध महिमान श्रवणाचें ॥ २९ ॥ बडिशलोभें[4]‡ गिळितां गळ । मासया पुढती न भेटे जळ । तैंवि शृंगारार्थ हरिगुणशील । होतां तत्काळ भ्रम निरसे ॥ ४३० ॥ एवं प्रेमा उपजे विषयीजनां । लंपट होती गुणकीर्त्तना । इतुकेन निरसे भवयातना । ऐसी करुणा विवरूनी ॥ ३१ ॥ विषयीजनांसि मनोऽनुकूल । रासक्रीडा करी गोपाळ । नोहे विषयासक्त केवळ । परम दयाळ परमात्मा ॥ ३२ ॥ विषयासक्त जे बहिर्मुख । तेही करावया श्रवणोन्मुख । शृंगाररासरहस्यप्रमुख । दावी अनेक रसलीला ॥ ३३ ॥ हें देखोनि इतरजन । भ्रष्टती स्वयें आचरोन । ऐसा तुझा जो संशय पूर्ण । ऐकें विवरण तयाचें ॥ ३४ ॥

नासूयन्खलु कृष्णाय मोहितास्तस्य मायया । मन्यमानाः स्वपार्श्वस्थान्स्वान्स्वान्दारान्व्रजौकसः ॥ ३८ ॥

कलिग्रस्त भिन्नाचार । स्वैर उत्पथ आगमाभिचार[5]‖ । धरूनि कृष्णाचा आधार । अनेक-प्रकार जल्पती ॥ ४३५ ॥ तरी कृष्णा ऐसें ऐश्वर्य आंगीं । आणिका कोणा असे त्रिजगीं । ऐश्वर्यें-वीण उत्पथमार्गीं । विधी उल्लंघी कैं कोण ॥ ३६ ॥ येथेंचि पहा पां प्रस्तुतीं । ब्राह्म षण्मास करूनि राती । कृष्णीं रमतां गोपयुवति । बल्लवांप्रति अविषाद¶ ॥ ३७ ॥ बल्लवां वाटे आपुली युवति ।

**पाठभेद :**— * मानवी ( मुं. ). † व्हावया ( मुं. ). § झाडी ( मुं. ). ‡ बिडिश- ( मुं. ) ‖ आगमाचार ( उ. ). ¶ अविदित ( मुं. ).

१ निंद्य. २ अवसान. ३ वासनांसहित. ४ मत्स्यवेधन. ५ शास्त्रनाश करणारे जारणमारणादि योग.

आपणांशींच भोगी रति । ऐसेच समस्त गोप मानिती । अवघी राती वधूक्रीडा ॥ ३८ ॥ ज्याची त्याचे कंठीं हस्त । घालूनि कामिनी सेजे स्वस्थ । असतां कृष्णातें किमर्थ । कोण प्राकृत दूषिती ॥ ३९ ॥ एवं बल्लवीं समस्तीं । आपणांपाशीं आपुल्या युवति । जाणूनि असूया न करिती । कृष्णीं वर्त्तती अनीर्ष्य ॥ ४४० ॥ तस्मात् ऐश्वर्यसिद्धि ऐसी । नसतां येरां प्राकृतांशीं । समता कृष्णाचे क्रीडेशीं । इच्छितां नरकासी भोगिती ॥ ४१ ॥ पाहोनि कृष्णाचें आचरण । करूं म्हणती प्राकृत जन । ते पापाचे प्रवर्त्तक*जाण । नरक दारुण भोगिती ॥ ४२ ॥ मन न वचतां विषयाकडे । कृष्णक्रीडा ज्या आवडे । सप्रेम श्रवणीं जडतां झडे । मातृगमनादि† पातकें ॥ ४३ ॥ कृष्णक्रीडा करितां श्रवण । न इच्छावें विषयाचरण । साधकीं धरूनि हे निजखूण । कृष्णीं निमग्न मन कीजे ॥ ४४ ॥ असो ऐसी रासक्रीडा । गोपिकांचिया सप्रेम भिडा । क्रीडतां मन्मथ केला वेडा । तो पवाडा हा कथिला ॥ ४४५ ॥

ब्रह्मरात्र उपावृत्ते वासुदेवानुमोदिताः । अनिच्छन्त्यो ययुर्गोप्यः स्वगृहान्भगवत्प्रियाः ॥ ३९ ॥

जाणोनि गोपींची प्रेमासक्ति । कृष्णें विशाळ केली राती । त्यांसि वोपोनि निजात्मरति । पुन्हा प्रवृत्ति जागविली ॥ ४६ ॥ प्रवर्तलें ब्राह्ममुहूर्त[1] । प्रतीचीचुंबित[2] रजनीकांत । प्राची सराग अरुणवंत । मंद मारुत फरकला ॥ ४७ ॥ तुहिनाद्रिवत्[3]‡ शीतळ झुळका । त्वगिंद्रियासि झगटती देखा । तांबूलस्वाद बदनीं फिका । तनु अंशुका प्रिय करिती ॥ ४८ ॥ श्रीकृष्णाचे इच्छामात्रें । स्थावरजंगमें कृष्णतंत्रें । प्रबोध पावतां गोपीवक्त्रें । पंकजनेत्रें विलोकिलीं ॥ ४९ ॥ मग त्यां म्हणे रमारमण । सत्वर सदना करा गमन । परमरहस्य हें रक्षून । कीजे वर्त्तन संसारीं ॥४५०॥ अंतरीं असोनि निजात्मरत । बाह्यप्रवृत्ति कर्मासक्त । नाशों नेदितां परमार्थ । जनहितार्थ वर्त्तावें ॥५१॥ अंतरीं बोध बहिर्जडता । अंतरीं निर्मुक्त बहिर्बद्धता । अंतरीं निःसंग बहिर्भोक्तृता । संगासक्तता दावावी ॥ ५२ ॥ येणें मत्संग सिद्धि जाय । लोकापवादाचें निरसे भय । कोण्ही नाचरती अन्याय । यथात्मन्याय प्रवृत्ति ॥ ५३ ॥ सर्वांतरीं निवास ज्याचा । त्या वासुदेवें गोपी स्ववाचा । अनुमोदितां तदाज्ञेचा । न करवे साचा अतिक्रम ॥ ५४ ॥ कृष्णवियोग न साहवे । आज्ञा लंघूनि न राहवे । यास्तव सदना लागलें§ जावें । प्रेमगौरवें प्रियांहीं ॥ ४५५ ॥ ऐशा कृष्णाच्या प्रियतमा । सदना गेल्या ब्रल्लववामा । इये कथेचा श्रवणमहिमा । नृपोत्तमा शुक सांगे ॥ ५६ ॥

विक्रीडितं व्रजवधूभिरिदं च विष्णोः । श्रद्धान्वितोऽनुशृणुयादथ वर्णयेद्यः ॥
भक्तिं परां भगवति प्रतिलभ्य कामम् । हृद्रोगमाश्वपहिनोत्यचिरेण धीरः ॥ ४० ॥

रासक्रीडा परमोत्तम । करूनि अजिंक जिंकिला काम । ज्यातें कथेचा श्रवणीं प्रेम ।

---

पाठभेद :— * पर्वत ( मुं. व उ. ). † मात्रागमनादि ( उ. ). ‡ स्तुहिनाद्रिवत ( मुं. ). § लागे ( मुं. ).
१ पहाटच्या चार घटिका रात्रीचा वेळ. २ पश्चिमेस भिडलेला. ३ हिमालय पर्वतासारखा.

स्मरसंभ्रम त्या न बधी ॥ ५७ ॥ उमजावया एकात्मभाव । विष्णुनामाचा अभिमाव । व्यापक सर्वग[1] श्रीमाधव । क्रीडा अपूर्व जे त्याची ॥ ५८ ॥ अभेद एकात्मभाव क्रीडा । कामजयार्थ विडंबहोडा । गोपवधूंशीं सप्रेमचाडा । क्रीडला उघडा जगदात्मा ॥ ५९ ॥ तें हें श्रीकृष्णाचें चरित । जे परिसती सप्रेमभरित । वसंतीं ग्रीष्मीं जेंवि तृषार्त । जलपानार्थ सादर ॥ ४६० ॥ कां कामिनीविरहभरें । प्रेष्ठ अभीष्ट सरळांतरें* । सादर होऊनियां आचरे । कीं बुभुक्षु मोहरे अन्नार्थ ॥ ६१ ॥ ऐसिया श्रद्धा श्रद्धावंत । हे कृष्णक्रीडा श्रवण करित । किंवा सप्रेम वर्णित । तो जिंकित कंदर्पा ॥ ६२ ॥ काम अजिंक भुवनत्रया । परी तो आकळूं न शके तया । जेणें कृष्णाची रासचर्या । केली हृदयामाजिवडी ॥ ६३ ॥ कृष्णक्रीडा हृदयीं थारे । तंव तंव बुद्धि विवेकें भरे । सांडूनि भ्रमाचें काविरें[3] । स्वात्मविचारें परितोषे ॥ ६४ ॥ प्रथम क्रीडा पडतां श्रवणीं । विषयवासना अंतःकरणीं । उठती आणि तदाचरणीं । प्रवर्त्तन आवडे ॥ ४६५ ॥ रजतमात्मका ऐसें घडे । तिहीं विवरितां पुढें पुढें । बुद्धि भरतां विचारें दृढें । कल्पना उडे विषयांची ॥ ६६ ॥ कृष्णीं प्रेमा जडोनि ठाये । इहामुत्रार्थ मिथ्या होय । विषयस्मृतीसि कैंचा ठाय । विसरोनि† जाय प्रवृत्ति ॥ ६७ ॥ कृष्णप्रेमाची गवसणी । पडतां कृष्णचि अंतःकरणीं । ठसावतां सर्वा करणीं । होय भंगाणी रिपुषट्का ॥ ६८ ॥ परा म्हणिजे अभेदभक्ति । रासक्रीडा§ चिदात्मरति । फावों लागतां रजतमवृत्ति । झडोनि जाती अतिशीघ्र ॥ ६९ ॥ जों जों भक्तिप्रेमा चढे । तैसतैसा विकल्प झडे । व्यवसितबुद्धीच्या[4] उजिवडें । आतुडे रोकडें कैवल्य ॥ ४७० ॥ धीर[6] म्हणिजे व्यवसितमति । तोचि करी हृद्रोगशांति । कामत्यागें निजविश्रांति । पावे निश्चिति त्वरितचि ॥ ७१ ॥ सत्त्वसंपन्ना कष्ट न लगती । त्यासि पूर्वींच भवविरक्ति । रासश्रवणें सप्रेमभक्ति । चित्सुखावाप्ति अनायासें ॥ ७२ ॥ रासक्रीडाशृंगाररस- । श्रवणीं अधिकार समस्तांस । सधीर होऊनि कलिकल्मष । रिपुषट्कांस निर्दाळिती ॥ ७३ ॥ ऐसा महिमा रासश्रवणीं । भूपा कथूनि बादरायणि । दशमस्कंधींची एकादशिनी । तृतीय येथूनि संपविली ॥ ७४ ॥ पुढें चौतिसावा अध्याय । नृपा कथील व्यासतनय । अंबिकावनीं गोपसमुदाय । मीनला होय यात्रार्थ ॥ ४७५ ॥ तेथ अजगरें नंदाप्रति । अकस्मात गिळितां राती । कृष्णें त्यासी सायुज्यमुक्ति । देऊनि व्रजपति सोडविला ॥ ७६ ॥ तया कथामृतपानाप्रति । एकाग्र बैसला परीक्षिति । सुकृतसंपन्नीं तेचि पंक्ती । कैवल्यतृप्ति लाहिजे ॥ ७७ ॥ अक्षयसदन प्रतिष्ठानीं । श्रीएकनाथ कैवल्यदानी । शमदमादिसत्त्वसंपन्नीं । जो सुरगणीं आर्चिला ॥ ७८ ॥ तयाचें पादप्रक्षालन । करूनि गौतमी झाली धन्य । चिदानंदें कळवळून । पात्र भरून चालिली ॥ ७९ ॥ मग तो सदय-स्वानंदबोध । गोविंदवरदकृपागांग । सेवितां पिपीलिकामार्ग । लाधला सांग दयार्णवा ॥ ४८० ॥ तें हें श्रीमद्भागवत । अठरा सहस्र श्लोक गणित । परमहंसाचा सुखएकांत । स्कंध त्यांत दशम हा ॥ ८१ ॥ रासक्रीडापंचाध्यायी । समाप्त झाली इये ठायीं । कन्दर्पविजयाची नवायी । श्रवणें

**पाठभेदः**— * सालंकारे ( मुं. ). † विरोनि ( उ. ). § रासविडंबेची ( उ. ).

१ सर्वगामी. २ आवेगानें धांवे. ३ वेड. ४ निश्चयात्मक विचारशक्तीच्या. ५ हातीं लागे. ६ कोणत्याहि कारणानें ज्याच्या चित्तास विकार होत नाहीं तो.

पठनें त्रिजगातें ॥ ८२ ॥ दयार्णवाची इतुकी विनती । आत्मस्थिति हे गाती पठती । त्यांसि आतुडे एकान्तभक्ति । होय निवृत्ति रिपुषट्का ॥ ४८३ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां रासक्रीडावर्णनं नाम त्रयस्त्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३३ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक ४० ॥ टीका ओव्या ४८३ ॥ एवं संख्या ॥ ५२३ ॥ ( तेहतिसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १६३७५ ).

तेहतिसावा अध्याय समाप्त.

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय ३४ वा

श्रीगोविंदपरब्रह्मणे नमः। भवसुखरसिकां विरामकरणा। स्वरतिप्रद तूं स्वपादशरणा। श्रीगोविंद त्रिजगोद्धरणा। भवसंहरणा भगवंता ॥ १॥ पावे उद्भव संभव। अकार मात्रा आविर्भव। जागृतिगोचरदृश्यभाव। भव हें नाम भ्रमजनित ॥ २॥ तेथ भ्रमकर विषयाभास। रसिक रुचिकर तत्स्पर्शांश। श्रोत्रादिकां इंद्रियांस। चित्प्रकाश वश येणें ॥ ३॥ विवरूनि मुळींचें निजात्मरूप। अधिष्ठूनि मनःसंकल्प। विपरीतज्ञ सविक्षेप। करी साक्षेप भवभोगा ॥ ४॥ भवभोगाची रसालता। विभवें वाढवी विशाळता। इहामुष्मिका भवावर्त्ता-। माजि न निघतां परिभ्रमे ॥ ५॥ निघावयाची सेचि न करी। अधिकाधिक हव्यास धरी। रसाळ रसिक भवसुखलहरी। मानूनिं भंवरी प्रिय भावी ॥ ६॥ मैंद मानूनि प्रियतम सखा। आप्त भावूनि पारिखा। आडवी वरपडिया मरणोन्मुखा। वांचवी देखा निग्रहणें ॥७॥ पाठी लागे बलात्कारें। भैंदा सहित धरूनि निकरें। फांसे दावूनि बोधितां खरें। विटे अंतरें तत्संगा ॥ ८॥ तेंवि रसाळ विषयाभास। इहामुष्मिकरूपीं क्लेश। कवळूनि करी आयुष्यनाश। तो चिदाभास गुरु बोधी ॥ ९॥ तीव्र व्रतांच्या पाउलीं। अविद्या अडवी फलाशाभुली। चालवूनियां फांसे घाली॥ मैंदावळी रिपुषट्क ॥ १०॥ सपाश मैंद आणूनि बोधा। बळेंचि करूनि प्रवृत्तिरोधा। कृपेनें चुकवी वाटंवधा[2]। काढी निषेधामाजूनि ॥ ११॥ ऐसा भवरस-विरामकर। स्वबोध रुचवी अमृतोद्गार। स्वपादशरणां वज्रपंजर। भेद भयंकर निरसूनी ॥ १२॥ स्वसंविद्बोध[3]श्रीमंता। गोविंद तो तूं वेदवेत्ता। गोमय त्रिजगा परित्राता। अचिंत्यानंतैश्वर्यें ॥ १३॥ तव पदप्रणतिवैभवलेश। वाहतीं त्रिजगीं सभाग्य दास। त्यांमाजि कनिष्ठ मी निःशेष। कृपेनें विशेष तोषवुनी ॥ १४॥ भागवतींच्या दशमस्कंधा। बोधवावया अबळां मुग्धां। भाषाव्याख्यान-प्रबोधा। कथिला धंदा आज्ञेनें ॥ १५॥ समर्थाज्ञानुशासनें। एकादशिनीत्रयव्याख्यानें। श्रीपदपीठीं

१ आठवण, इच्छा. २ वाटमारी करणारास. ३ आत्मज्ञानबोधानें संपन्न.

वाङ्मयेंसुमनें । यथामतीनें अर्पिलीं ॥ १६ ॥ आतां चतुर्थ एकादशिनी । क्रमें उपायिली व्याख्यानीं । तदर्थ सेवेसि हे विनवणी । श्रीपद वंदुनी कीजतसे ॥ १७ ॥ परम दुर्बोध जेथींचा अर्थ । प्रज्ञा शंकी व्याख्यानार्थ । कृपापांगें स्वसामर्थ्यें । आज्ञा समर्थ स्वामीची ॥ १८ ॥ श्वफलकासि यमुना-स्नान । करितां विश्वरूपदर्शन । देता झाला श्रीभगवान । तैं अगाध स्तवन तो करी ॥ १९ ॥ तियें अक्रूरस्तवविवरणीं । धिषणारमण[3] नुमली वाणी । म्हणोनि श्रीचरणीं विनवणी । वारंवार कीजतसे ॥ २० ॥ हें ऐकोनि नाभीकार[4] । देती उचलूनि अभयकर । म्हणती स्तनपाचा प्रकार । शंकेसी थार नसतांही ॥ २१ ॥ पालनीं तत्पर असतां जननी । स्तनपा स्तन्यार्थ वृथाचि ग्लानि । तैसी सशंका हे विनवणी । तुज लागूनि स्फुरतसे ॥ २२ ॥ आम्ही वसवूं* तुझिया हृदया । बोलवूं तें तें बोलावया । त्वां का शंका करणें वांया । अक्षय अभया जाणोनि ॥ २३ ॥ हें ऐकोनि मौनें† नमन । करूनि आदरिलें व्याख्यान । तेथ श्रोतीं सावधान । अनुक्रमणिका परिसावी ॥ २४ ॥ यात्रार्थ अंबिकावनीं बल्लव । अजगरें गिळितां नंदराव । त्यासि सोडवि वासुदेव । हा प्रथमाध्याव चौतिसावा ॥ २५ ॥ पंचतिसाव्या माजि गोपिका । परस्परें युग्मश्लोका । वर्णिती कृष्णाच्या कौतुका । वियोगदुःखा निरसावया ॥ २६ ॥ छत्तिसीं वधिलें अरिष्टासी । तंव इकडे नारद कंसापाशीं । कथितां रामकृष्ण व्रजनिवासी । तो केशी अक्रूरासी§ पाठवी ॥ २७ ॥ कृष्णें केलें केशिहनन । तंव नारद पातला मथुरेहून । तेणें केलें भावें‡ स्तवन । व्योमनिबर्हण[5] सदतिसावा ॥ २८ ॥ कृष्णध्यानें एकनिष्ठ । अक्रूर गोकुळीं प्रविष्ट । रामकृष्णीं तो पूजिला प्रकट । सुखसंतोष अडतिसावा ॥ २९ ॥ रामकृष्ण जातां मथुरे । विविध गोपींचीं स्निग्धांतरें‖ एकुण-चाळिसीं देखिला अक्रूरें । विष्णुलोक यमुनेंत ॥ ३० ॥ चाळिसाव्यामाजि अक्रूर । जाणूनि कृष्ण हा ईश्वरेश्वर । सगुण निर्गुण द्विप्रकार । स्तवी साचार नमूनियां ॥ ३१ ॥ एकेताळिसामाजि हरि । मथुराप्रवेशीं रजका[6] मारी । तंतुवाय[7] सुदामा नामधारी । वर दे हरि त्या तोषें ॥ ३२ ॥ बेताळिसाव्या अध्यायांत । कुब्जा केली लावण्ययुक्त । धनुष्यभंगरक्षकघात । कंस सचिंत तच्छ्रवणें ॥ ३३ ॥ त्रेताळिसावा कुवलयापीड[8] । मर्दूनि रंगीं शिखंडकचूड । चाणूरेंशीं सम अपाड । बोले कैवाड मधुरोक्ति ॥ ३४ ॥ चव्वेताळिसाव्या अध्यायीं । समल्ल कंसा वधिलें पाहीं । कंसस्त्रिया शेषशायी । बोधूनि पितरां भेटला ॥ ३५ ॥ एवं चतुर्थ एकादशिनी । विदित इत्यादि निरूपणीं । श्रोतीं सावध¶ होइजे श्रवणीं । हे विनवणी सेवेसी ॥ ३६ ॥

श्रीशुक उवाच :— एकदा देवयात्रायां गोपाला जातकौतुकाः ।
अनोभिरनडुद्युक्तैः प्रययुस्तेंऽबिकावनम् ॥ १ ॥

पाठभेद :— * वसवूनि ( उ.). † हा शब्द उ. प्रतींत नाहीं. § असुराशी ( मुं.). ‡ भावि ( उ.). ‖ स्निग्धोत्तरें ( उ.). ¶ सादर ( उ. )

१ शब्दरूप पुष्पें. २ प्राप्त झाली. ३ ब्रह्मदेव. ४ अभयदान. ५ व्योमनामक दैत्याचा नाश. ६ परीट. ७ कोळी. ८ हा एक प्रचंड हत्ती होता.

रासक्रीडा संपल्यावरी । कोणे एके शुभावसरीं । नंदादि गोप सहपरिवारीं । देवयात्रार्थ निघाले ॥३७॥ उत्साहयुक्त विभव तवकें । गाडे शृंगारिले कवतुकें । गोपाळ आभरणें अंशुकें । लेवूनि वृषभ जुंपिती† ॥ ३८ ॥ समृद्धि घालूनि§ गाडियावरी । गोप निघाले आनंदगजरीं । पातले अंबिकाकांतारीं । राम मुरारी समवेत ॥ ३९ ॥ जयजयकार नामस्मरणें । वाद्यें वाजती जलदस्वनें । अंबिकावनीं निर्मळस्थानें । धरूनि अवघे उतरले ॥ ४० ॥

तत्र स्नात्वा सरस्वत्यां देवं पशुपतिं विभुम् । आनर्चुरर्हणैर्भक्त्या देवीं च नृपतेऽबिकाम् ॥ २ ॥

शौचाचार सारूनि आधीं । स्नानें सारिलीं यथोक्तविधि । तीर्थविधानें नेलीं सिद्धि । सरस्वतीच्या जीवनें ॥ ४१ ॥ सकळ देवतांमाजि जो विभु[1] । तो समस्तीं पूजिला शंभु । पूजाद्रव्येंशीं समारंभु । रुद्राभिषेकपुरस्सर ॥ ४२ ॥ तैशीच पूजिली अंबिका । जे कां मृडानी जगदंबिका । फलां पुष्पां दिव्यांशुकां । रत्नां माणिकां अर्पूनी ॥ ४३ ॥ भक्तिपूर्वक लागती चरणीं । पुष्पांजळि समर्पूनी । प्रदक्षिणा नानास्तवनीं । भवभवानी तोषविली ॥ ४४ ॥ त्यावरी ब्राह्मणाकारणें । बल्लव देती अनेक दानें । फळकामना न धरूनि मनें । शिवप्रीत्यर्थ म्हणोनियां ॥ ४५ ॥

गावो हिरण्यं वासांसि मधु मध्वन्नमादृताः । ब्राह्मणेभ्यो ददुः सर्वे देवो नः प्रीयतामिति ॥ ३ ॥

सवत्सा सदुग्धा सगुणा । सालंकृता सौम्या तरुणा । स्वर्चिता[2] धेनु सदक्षिणा । सुब्राह्मणां समर्पिल्या ॥ ४६ ॥ मुख्य दानाचें लक्षण । मिथा नामगोत्रकीर्त्तन । स्वसत्तेचें निवर्त्तन । उत्पादन परिसितां ॥ ४७ ॥ इत्यादि त्यागपुरस्सर । केलीं गोदानें अपार । द्रव्यदक्षिणा यथोक्त पात्र । विधिसुमंत्र सुशोभित ॥ ४८ ॥ ग्रहतुष्ट्यर्थ अष्टलोह[3] । अष्टविध वस्त्रसमूह । शिवप्रीत्यर्थ जे जे अर्ह । विधिपूर्वक दश दानें ॥ ४९ ॥ धेनुहिरण्यवस्त्रदानें । तिलाज्यमधुभूमिधान्यें । विविधरत्नें मधुर अन्नें । विप्रांकारणें अर्पिलीं ॥ ५० ॥ सवेग ऐसीं दानें समस्त । सर्वीं सारूनि श्रद्धावंत । नामस्मरणें । आनंदभरित । राहिले व्रतस्थ ते दिवशीं ॥ ५१ ॥

ऊषुः सरस्वतीतीरे जलं प्राश्य धृतव्रताः । रजनीं तां महाभागा नंदसुनंदकादयः ॥ ४ ॥

नंद सुनंद आणि उपनंद । वृषभानादि बल्लववृंद । प्राशूनि सरस्वतीकबंध[4] । तटीं सानंद निशी क्रमिती ॥ ५२ ॥ महाभाग हें संबोधन । पुण्यश्लोकांचें पुण्याख्यान । राजा परिसें सावधान । जाणोनि सज्ञान शुक बोधी ॥ ५३ ॥

कश्चिन्महानहिस्तस्मिन्विपिनेऽतिबुभुक्षितः । यदृच्छयाऽगतो नंदं शयानमुरगोऽग्रसीत् ॥ ५ ॥

---

**पाठभेद :—** † जुंपिलीं ( उ. ). § गाडुनि ( उ. ).

१ सर्वव्यापक ईश्वर. २ सुपूजित. ३ अष्टधातु. ४ सरस्वतीचें उदक.

तंव ते रात्रीं अंबिकावनीं । नंद निद्रिस्त विश्रांतिशयनीं । अजगरजाति महाफणी । होता बहुदिनीं बुभुक्षित ॥ ५४ ॥ जनसमुदाय प्रजागरें । सांचलें जाले त्या चेईरे । यदृच्छेकरूनियां संचारें । ग्रासिता झाला नंदातें ॥ ५५ ॥

स चुक्रोशाहिना ग्रस्तः कृष्ण कृष्ण महानयम् । सर्पो मां ग्रसते तात प्रपन्नं परिमोचय ॥ ६ ॥

नंद असतां सुखनिद्रिस्त । सर्पें ग्रसिला* नाभिपर्यंत । जागृत झाला अकस्मात । आक्रोश करित महाभयें ॥ ५६ ॥ लागतां अजगराचें गरळ । तनुसामर्थ्य झालें शिथिल । तेणें भयें उताविळ । स्मरे गोपाळ आकांतीं ॥ ५७ ॥ धांव धांव बापा कृष्णा । मी वरपडलों सर्पवदना । महासर्प हा क्षणक्षणां । करी ग्रसना कालवत् ॥ ५८ ॥ कृष्णा आपुला शरणागत । सोडवीं कृपेनें अंकित । प्राण न वचतां धांवें त्वरित । ऐसा भयभीत आक्रंदे ॥ ५९ ॥

तस्य चाक्रंदितं श्रुत्वा गोपालाः सहसोत्थिताः । ग्रस्तं च दृष्ट्वा संभ्रांताः सर्पं विव्यधुरुल्मुकैः ॥ ७ ॥

ऐसा नंदाचा आर्त शब्द । समस्तीं ऐकोनि आक्रंद । सवेग धांविला बल्लववृंद । करावया वध सर्पाचा ॥ ६० ॥ अकस्मात उठिले सर्व । ग्रस्त देखोनि पशुपराव । मारिती सर्पावरी घाव । जळत उल्मुकें घेऊनी ॥ ६१ ॥ संभ्रांत म्हणिजे उताविळ । घाबिरे झाले बल्लव सकळ । म्हणती अजगरें व्रजपाळ । गिळिला केवळ काळरूपें ॥ ६२ ॥

अलातैर्दह्यमानोऽपि नामुंचत्तमुरंगमः । तमस्पृशत्पदाऽभ्येत्य भगवान्सात्वतां पतिः ॥ ८ ॥

ऐसें म्हणोनि जळत भिर्ती । घेऊनि सर्पा पोळविती । जाळितां ताडितां बहुतां हस्तीं । नंदाप्रति अहि नुगळी ॥ ६३ ॥ ऐकोनि नंदाचें आर्त्तवचन । षड्गुणैश्वर्यसंपन्न । तो पातला श्रीभगवान । करुणापूर्ण भक्तपति ॥ ६४ ॥ सवेग येऊनि गोपीनाथें । चरण स्पर्शितां अजगरातें । महदाश्चर्य वर्त्तलें तेथें । सांगे नृपातें शुकमुनि ॥ ६५ ॥

स वै भगवतः श्रीमत्पादस्पर्शहताशुभः । भेजे सर्पवपुर्हित्वा रूपं विद्याधरार्चितम् ॥ ९ ॥

भगवंताचा श्रीमच्चरण । त्रिपथगेचें जन्मस्थान । सकळ मंगळां एकायतन । जो अघशमन संस्पर्शें ॥ ६६ ॥ तया चरणाच्या संस्पर्शमात्रें । निष्पाप‡ झालीं सर्व गात्रें । सर्पशरीर क्षणार्धमात्रें । त्यागूनि पवित्र तनु भजला ॥ ६७ ॥ विमानारूढ विद्याधरीं । पूजिला जैसा शक्र अमरीं । तयातें श्रीकृष्ण पृच्छा करी । मुग्धापरी नरनाट्यें† ॥ ६८ ॥

**पाठभेद :—** * ग्रासिला ( मुं. व उ. ). ‡ निःपाप ( उ. ). † नटनाट्यें ( मुं. ).

१ चाहुलीनें. २ जागृति. ३ प्रविष्ट झालां. ४ पेटलेलीं लांकडें. ५ न सोडी. ६ भागीरथीचें. ७ एकमेव स्थान.

तमपृच्छद्धृषीकेशः प्रणतं समुपस्थितम् । दीप्यमानेन वपुषा पुरुषं हेममालिनम् ॥ १० ॥

अचिंत्यैश्वर्यमहिमा आपुला । जाणाया§ बल्लवां सकळां । पृच्छा करी घनसांवळा । प्राकृतां अबळां सारिखी ॥ ६९ ॥ जो कां अखिलब्रह्मांडाधीश । विष्णुविरिंचिहरप्रजेश । सकळां‡ पाळक‡ यां‡ हृषीकेश । तो जगदीश श्रीकृष्ण ॥ ७० ॥ सांडूनियां सर्पतनु । दिव्यपुरुष देदीप्यमान‖ । निघाला त्यातें तो भगवान । पुसता झाला वृत्तांत ॥ ७१ ॥ देदीप्यमान कैसा पुरुष । मुकुट कुंडलें माळा सुवास¶ । साळंकृत सुंदर वेश । वंदी कृष्णास अतिविनयें ॥ ७२ ॥ कृष्णापुढें नम्रमूर्धिन । बद्धांजलिमंडितपाणि । उभा ठाकला त्यालागुनी । कोण म्हणोनि पुसे हरि ॥ ७३ ॥

को भवान्परया लक्ष्म्या रोचतेऽद्भुतदर्शनः । कथं जुगुप्सितामेतां गतिं वा प्रापितोऽवशः ॥ ११ ॥

परालक्ष्मी जे उत्कृष्टशोभा । तयेकरूनि उजळिसी नभा । स्वतेजें झांकूनि मार्तंडबिंबा[1] । कोण तूं उभा रोचिष्मान्[2] ॥ ७४ ॥ ऐसें अद्भुत तव दर्शन । आणि हें कुत्सितकर्म कोण । जेणें सर्पयोनि परमहीन । पावविलासी विधितन्त्र ॥ ७५ ॥ होऊनि कुत्सित कर्माधीन । अधोगतीचें कारण कोण । ऐसें ऐकोनि भगवद्वचन । करी निरूपण तो सर्प ॥ ७६ ॥

सर्प उवाच :— अहं विद्याधरः कश्चित्सुदर्शन इति श्रुतः । श्रिया स्वरूपसम्पत्त्या विमानेनाचरन्दिशः ॥ १२ ॥

सर्प म्हणे श्रीपुरुषोत्तमा । विद्याधर मी सुदर्शननामा । कोण्ही एक प्रसिद्धकर्मा । त्रिजगीं गरिमा विख्यात ॥ ७७ ॥ रूपलावण्यश्रीसम्पन्न । सर्व समृद्धि ऐश्वर्य पूर्ण । स्वेच्छा विमानीं बैसोन गगन । दिग्मंडळीं संचरतां ॥ ७८ ॥

ऋषीन्विरूपानंगिरसः प्राहसं रूपदर्पितः । तैरिमां प्रापितो योनिं प्रलब्धैः स्वेन पाप्मना ॥ १३ ॥

फिरतां बैसोनि विमानीं । देखिले तपस्वी आंगिरसमुनि । अतिकर्कश[3] अनुष्ठानीं । शरीरें वाळोनि कृश झालीं ॥ ७९ ॥ जटा पिंगट वळल्या केशीं । कांति धूसर बुभुक्षु ऐसी । आपुल्या लावण्यमदगर्वेशीं । म्यां तयांसि उपहासिलें ॥ ८० ॥ ऊर्ध्वरेते[4] तपस्वी थोर । ऐसा न करूनि विचार । भीड न धरूनि वारंवार । उच्च उच्चतर हांसिलों ॥ ८१ ॥ उपहासव्यंग्योक्तिहेलनें । ऐकोनि मुनिवर क्षोभले मनें । माझिया ऐशा पापाचरणें । शापवचन बोलिले ॥ ८२ ॥ मुखें गोड मागें दुष्ट । ते नर वृश्चिकाहूनि कनिष्ठ । करिती सम्मुखचि फुंपाट । ते पापिष्ठ सर्वरूपीं* ॥ ८३ ॥ न साहोनि परमहिमान । भुंकती ते केवळ श्वान । गर्वें न करिती अभ्युत्थान । ते रासभसमान†

**पाठभेद :—** § जाणावया ( मुं. व उ. ). ‡ यां हृषीकां ( उ. ). ‖ दैदिप्यमान ( मुं. व उ. ). ¶ विशेष ( मुं. ). वास ( उ. ). * सर्परूपी ( मुं. व उ. ) † रासभासमान ( मुं. ).

१ सूर्यमंडळास. २ तेजस्वी. ३ कठोर. ४ आमरण ब्रह्मचर्यानें राहणारे.

धश्चोट ॥ ८४ ॥ देखोनि भल्यांची प्रतिष्ठा । वांकुल्या दावूनि करिती चेष्टा । भल्यावरी आरोप करिती खोटा । ते मर्कटसमयोनि ॥ ८५ ॥ भीड सांडोनि म्यां उपहासिलें । यास्तव अजगर होणें पडिलें । माझें पातक मज कळलें§ । नीचयोनिप्रदानें ॥ ८६ ॥ यालागि भल्यांचा अतिक्रम । गर्वें करिती दुष्ट अधम । ते ते भोगिती अंधतम[1] । दुष्टयोनि पावोनि ॥ ८७ ॥ परंतु माझा भाग्योदय । म्हणोनि मुनींचा समुदाय । परम कारुण्यें मातृप्राय । शापमोक्षणीं कळवळिला ॥ ८८ ॥

शापो मेऽनुग्रहायैव कृतस्तैः करुणात्मभिः । यदहं लोकगुरुणा पदास्पृष्टो हताशुभः ॥ १४ ॥

ऋषिसमर्थीं दिधला शाप । मज तो अनुग्रहकारणरूप । जैंवि अवचट करीरें[2]विटप । फळला कल्पद्रुमरूपें ॥ ८९ ॥ केवळ करुणेचे सागर । शांतिक्षमेचे गिरिवर । आंगिरसमुनि परम उदार । केला उद्धार शापुनी ॥ ९० ॥ ज्यांच्या शापकृपादृष्टि । विश्वगुरूची चरणस्पृष्टि । मी लाधलों दिव्यांगयष्टि । कल्मषसृष्टि[3] भंगोनी ॥ ९१ ॥ ज्याच्या शापास्तव हे प्राप्ति । त्रिजगद्गुरूची दर्शनावाप्ति । लाहोनि झाली अघनिवृत्ति । आतां श्रीपति अवधारीं ॥ ९२ ॥

तं त्वाऽहं भवभीतानां प्रपन्नानां भयापहम् । आपृच्छे शापनिर्मुक्तः पादस्पर्शादमीवहन् ॥ १५ ॥

जन्ममरणादिदुःखप्रचुर । तो हा दुस्तर भवसागर । जेथ बुडाले चराचर । लहान थोर तळमळिती ॥ ९३ ॥ ऐशा प्राणियां भवभयभीतां । तव श्रीचरणीं शरणागतां । भवविरक्तां तव पदनिरतां । भवभयहर्त्ता तूं त्यांचें ॥ ९४ ॥ तरी ऐकें गा एनसंशमना[4] । दुःखदुर्योनिनाशना । आम्हांसि अपुल्या जावया भुवना । देईं अनुज्ञा कृपेनें ॥ ९५ ॥ तुझिया पादस्पर्शें स्वामी । शापनिर्मुक्त झालों पैं मी । श्रीमूर्ति राहो हृदयपद्मीं । पुन्हा हे ऊर्मी मज न बाधो ॥ ९६ ॥

प्रपन्नोऽस्मि महायोगिन्महापुरुष सत्पते । अनुजानीहि मां देव सर्वलोकेश्वरेश्वर ॥ १६ ॥

महायोगी महापुरुष । सज्जनपति लोकेश्वरेश । इत्यादि संबोधनीं तोष । संबोधूनियां करितसे ॥ ९७ ॥ भूतभविष्यवर्तमानीं । त्रिकालज्ञ तूं योगाग्रणी । काळत्रयीं जे दुष्टकरणी । तन्निरसनीं प्रपन्न[5] मी ॥ ९८ ॥ प्रकृतिपुर्यांमाजि जे सुप्त । त्यांहि माजि तूं असुप्त गुप्त । प्रकृतिनियंता प्रकृत्यातीत । तो तूं भगवंत महापुरुष ॥ ९९ ॥ प्रकृतिपुरीं शयन ज्याचें । पुरुष ऐसें नाम त्याचें । आदिकारण तूं प्रकृतीचें । महापुरुष या हेतु ॥ १०० ॥ तो तूं स्वामी महापुरुष । आम्ही तुझेचि अंश विशेष । आम्हां बाधिजे जें कलुष । तें तो दोष तुजलागीं ॥ १ ॥ म्हणसी अनेक प्रतिमंडळें । उपाधियोगें चंचळें समळें । मुख्यमंडळातें नातळे । तेंवि प्रकृतिमळें आलिप्त मी ॥ २ ॥ तरी मुख्यमंडळ जेंवि आलिप्त । तैसें‖ प्रतिमंडळही लेपातीत । बिंबलें असतां उपाधि-

**पाठभेद**:— § फळलें ( मुं. व उ. ). ‖ तैसेंचि ( उ. ).

१ हीनगति. २ बाभळीचें झाड. ३ पापयोनि. ४ पाप निवारण करणाऱ्या. ५ शरण आलेला.

आंत । असे निर्मुक्त निःसंग ॥ ३ ॥ उपाधि अनात्मत्वें जड । अज्ञानप्रचुर गाढमूढ । तीमाजि तुझाचि प्रकाशवाड । समळ निर्मळ अवगामितां ॥ ४ ॥ परंतु ज्ञानाच्या वैपरीत्यें । अंगीकारूनि तादात्म्यातें । तद्गतमालिन्यचांचल्यातें । घे निजमाथां अभिमानें ॥ १०५ ॥ महापुरुष या संबोधनें । त्या निर्जाशा मजकारणें । शको नेदी विपरीतज्ञानें । प्रकृत्याभिमानें हें प्रार्थीं ॥ ६ ॥ आतां सत्पते हें संबोधन । सदसद्ग्रंथीचें भेदन । करूनि असज्जडनिरसन । सन्मात्र चैतन्यें निवडलें ॥ ७ ॥ तयांसि पुढती असन्मळ । स्पर्शों नेदिसी तूं गोपाळ । करूनि आत्मत्वें सांभाळ । प्रणतपाळ-संज्ञेनें ॥ ८ ॥ म्हणसी लोकलोकांतरीं । ईश्वर असती पृथगाकारीं । ते ते तेथ तेथ अधिकारी । मानवशरीरी मी पशुप ॥ ९ ॥ तरी तूं लोकेश्वरांचा ईश । पूर्णैश्वर्यें परेश । तुझा मजवरी कृपालेश । होतां लोकेश न दंडिती ॥ ११० ॥ अनन्यसप्रेमभावें भरित । मज तूं जाणें स्वपादप्रणत । करूनि कृपेनें सनाथ । मोडीं विभक्तपण माझें ॥ ११ ॥

ब्रह्मदंडाद्विमुक्तोऽहं सद्यस्तेऽच्युत दर्शनात् । यन्नाम गृह्णन्नखिलान् श्रोतॄनात्मानमेव च ॥
सद्यः पुनाति किं भूयस्तस्य स्पृष्टः पदा हि ते ॥ १७ ॥

ऐकें अच्युता जगत्पति । सद्यचि झाली मज प्रतीति । ब्रह्मदंडाची निर्मुक्ति । दर्शनावाप्ती-स्तव तुझिये ॥ १२ ॥ ब्रह्मशाप परम क्रूर । तेणें पावलों योनि घोर । तुझिया दर्शनास्तव सत्वर । झालों साचार निर्मुक्त ॥ १३ ॥ केला भगांकित सुरपति । त्रिजगीं भ्रमविला पशुपति । ऐशी ब्रह्मदंडाची शक्ति । राकापति सलांछन ॥ १४ ॥ यदर्थीं आश्चर्य न लगे करणें । ज्याच्या अच्युत नामस्मरणें । अखिल भवाब्धि निस्तरणें । श्रवणें पठनें अघशांति ॥ ११५ ॥ ज्याचें नाम स्मरतां भक्ती । स्मरतां पावे अघनिवृत्ति । पावन करी आपणाप्रति । श्रोते तत्पंक्ति पावन ॥ १६ ॥ ऐसा ज्याचा स्मरणमहिमा । त्या तुझिया श्रीपुरुषोत्तमा । संस्पर्शतां पादपद्मा । कां पां पाप्मा[3] न भंगे ॥ १७ ॥ चरणस्पर्शें ब्रह्मदंड । खंडूनि ऐश्वर्यें ब्रह्मांड । धवळी ऐसा पदमार्तंड । वसो अखंड ममहृदयीं ॥ १८ ॥

इत्यनुज्ञाप्य दाशार्हं परिक्रम्याभिवंद्य च । सुदर्शनो दिवं यातः कृच्छ्रान्नंदश्च मोचितः ॥ १८ ॥

ऐसा प्रार्थूनि वृष्णिप्रवर । आज्ञा लाहोनि विद्याधर । करूनि प्रदक्षिणा नमस्कार । पावला स्वपुर सुदर्शन ॥ १९ ॥ मग सर्पप्रेतमुखांतून । नंद काढिला बळें वोढून । निश्चेष्ट पडिला विसंज्ञ । कृपेनें स्पर्शोन हरि जीववी ॥ १२० ॥ कृच्छ्रात् म्हणिजे संकटांतून । केलें नंदाचें मोक्षण । विद्याधराचें उद्धरण । देखोनि ऐकोनि गोपगणीं ॥ २१ ॥

निशाम्य कृष्णस्य तदात्मवैभवं व्रजौकसो विस्मितचेतसस्ततः ।
समाप्य तस्मिन्नियमं पुनर्व्रजं नृपाऽययुस्तत्कथयन्त आदृताः ॥ १९ ॥

---

१ चंद्र. २ कलंकयुक्त. ३ पाप.

अचिंत्यैश्वर्यात्मक वैभव । ऐकोनियां बल्लव सर्व । अगाध कृष्णाचें लाघव । विस्मितचित्तें प्रशंसिती ॥ २२ ॥ ऐसी संपलिया रजनी । द्वितीय दिवशीं अंबिकावनीं । यात्राविधान संपादुनी । पुन्हा व्रजभुवनीं प्रवेशती ॥ २३ ॥ व्रजीं जाऊनि प्रवेशती* । कृष्णमहिमा हा वर्णिती । विद्याधराची शापानिर्मुक्ति । नृपा तुजप्रति जे कथिली ॥ २४ ॥ पूर्वी विद्याधर उन्मत्त । न गणूनियां ऋषि समर्थ । उपहासितां शापोपहत । कृष्णें तो तेथ उद्धरिला ॥ १२५ ॥ तैसाचि धनदा¹चा सेवक । उन्मत्त शंखचूड गुह्यक । भंगूनि तयाचा मस्तक । हरी यदुनायक मौळमणि² ॥ २६ ॥ ऐका† तयाचें आख्यान । श्रोतीं परिसिजे सावधान । दयार्णव करील भाषाकथन । येथ सुदर्शन उद्धरला ॥ २७ ॥ शुक म्हणे गा कुरुमंडना । भगवद्गुणगणमणिभूषणा । स्वेच्छा क्रीडतां रामकृष्णा । बल्लवललनां समवेत ॥ २८ ॥

कदाचिदथ गोविंदो रामश्चाद्भुतविक्रमः । विजह्रतुर्वने रात्र्यां मध्यगौ व्रजयोषिताम् ॥ २० ॥

अंबिकायात्रा संपल्यावरी । कोण्ही एके शुभवासरीं । गोव्रजकामिनींसह कांतारीं । राममुरारी क्रीडती ॥ २९ ॥ शरच्छशांकभासुररजनीं–³ । माजि माधव सहमानिनी । मन्मथमोदक कुसुमितवनीं । अद्भुतविक्रमीं विहरती ॥ १३० ॥ ब्रह्मांडश्रेणी वाहती माथां । कीं अनंत अजस्र एकात्मता । अखिल भुवनीं अमोघ सत्ता । ऐसे अद्भुत‖ विक्रमी ॥ ३१ ॥ गोव्रज म्हणिजे गौळवाडा । तेथील गोपिका लावण्यसुघडा । तयांमध्यें करिती क्रीडा । सुखसुरवाडा⁴ प्रकटुनी ॥ ३२ ॥ कैसे सालंकृत सुवेष । कैसा स्निग्ध क्रीडाविशेष । तो तूं परिसें सावकाश । म्हणे नृपास योगींद्र ॥ ३३ ॥

उपगीयमानौ ललितं स्त्रीजनैर्बद्धसौहृदैः । स्वलंकृतानुलिप्तांगौ स्रग्विणौ विरजोंऽबरौ ॥ २१ ॥

नील पीत विविध† वास । विरज‡ म्हणिजे स्वप्रकाश । मणि कुंडलें मौळि केश । मयूरपक्षे धृतकुसुमें ॥ ३४ ॥ कटकें अंगदें रत्नमुद्रिका । हार मेखळा क्षुद्रघंटिका । पदनूपुरें अंदु वांक्या । पदकें सहित सालंकृत ॥ १३५ ॥ जवादी कर्पूर केशर । कस्तूरिका कृष्णागर । कुंकुमाक्षता मलयज-सार । चर्चिती दोघे शोभाढ्य§ ॥ ३६ ॥ वसनें भूषणें शोभायमानें । तदनुकूल अनुलेपनें । गोपी सप्रेमें स्नेहबंधनें । गुणकीर्तनें तोषविती ॥ ३७ ॥ गांधर्ववेदोक्त प्रभेदकुसरी । ललितगायनीं गोपी चतुरी । गुणगणगमकीं उच्चस्वरीं । राममुरारी रंजविती ॥ ३८ ॥

निशामुखं मानयंतावुदितोडुपतारकम् । मल्लिकागंधमत्तालिजुष्टं कुमुदवायुना ॥ २२ ॥

निशामुख जो संध्याकाळ । करिती सानंदें धवल बहळ । ज्यांमाजि उदित तारकामेळ ।

---

**पाठभेद :—** * सर्वाप्रति ( उ. ). † येथूनि ( उ. ). ‖ अद्भुतता ( उ. ). † द्विविध ( मुं. व उ. ). ‡ विरह ( मुं. ). § शोभाढ्ये ( मुं. ).

१ कुबेराचा. २ मस्तकावरील रत्न. ३ शरदांतील चंद्रानें शोभायमान झालेल्या रात्री. ४ सुखाचा सुकाळ.

शशिमंडळसमवेत ॥ ३९ ॥ मल्लिकाशब्दें सुमनयाति । तद्रसपानें भ्रमरपंक्ति । उन्मत्त गुंजारवें गाती। तच्छोभाढ्य निशामुख ॥ १४० ॥ कुमुदकाननीं शशिदर्शनीं । फुल्लारमाना कल्हारश्रेणी । तद्वत मारुत सौरभ्यखाणी । प्रसरीत घ्राणीं निशामुखीं ॥ ४१ ॥

जगतुः सर्वभूतानां मनः श्रवणमंगलम् । तौ कल्पयन्तौ युगपत्स्वरमण्डलमूर्च्छितम् ॥ २३ ॥

खेचर भूचर जलचर वनचर । भूतमात्र चराचर । श्रवणमानसांप्रति रुचिर । होती सादर तद्वेधें ॥ ४२ ॥ प्रियतम आणि मंगळप्रद । निरसी अमंगळ अध्यस्त खेद । ऐसे अगाध गांधर्वभेद । राममुकुंद आलापिती ॥ ४३ ॥ युगपत् म्हणिजे एकेचि समयीं । स्वरमंडळें मूर्च्छना पाहीं । अनिबद्ध अद्‌भुत कळा कांहीं । सवनोद्धारण* गिरडिया ॥ ४४ ॥ निबद्ध म्हणिजे श्रुतिसंग्रथित । कारिका सामसूत्रसंगीत । एक समयींच कळा बहुत । अनिबद्ध अद्‌भुत कौशल्य ॥ १४५ ॥ निश्वसितोद्भव ज्याच्या श्रुति । सत्यसंकल्पें अखिलोत्पत्ति । त्रिजगीं अशक्य आणिकांप्रति । युगपत् गाती अद्‌भुत ते ॥ ४६ ॥ स्वरमंडल मूर्च्छनायुक्त । मानसमोदक श्रवणामृत । सुरस सुललित मंगलवंत । राग अनंत आळविती ॥ ४७ ॥ ऐसी अद्‌भुत गायनकळा । प्रकटूनि सूचिती कवण्या फळा । तें तूं ऐकें नरशार्दूला[3] । कौरवपाळा परीक्षिति ॥ ४८ ॥ स्वभक्ताचें मानसहरण । स्वरत करावें निजांघ्रिशरण । ऐसें कृष्णाचें अंतःकरण । गोपीमोहनविडंबें ॥ ४९ ॥

गोप्यस्तद्गीतमाकर्ण्य मूर्च्छिता नाविदन्नृप । स्रंसद्दुकूलमात्मानं स्रस्तकेशस्रजं ततः ॥ २४ ॥

गोपी ऐकोनि अद्भुत गान । तत्काळ विसरल्या शरीरभान । गायनीं विरोनि गेलें मन । झाल्या उन्मन स्वानंदीं ॥ १५० ॥ कृष्णस्वरूपीं मानसें लीना । तनु नेणती नग्नानग्ना । सावरूं न शकती विगलित वसना । मा माळासुमनां कोण स्मरे ॥ ५१ ॥ सुटूनि केश मोकळे रुळती । ग्रथित सुमनें स्रवती क्षितीं । सुमनमाळा गळतां युवति । सहसा नेणती स्वरनिरता ॥ ५२ ॥ ऐसिये हरिक्रीडेमाझारीं । एक गुह्यक मोक्षाधिकारी । भय पावूनि§ व्रजसुंदरी । केल्या सत्वरी घाबिऱ्या ॥ ५३ ॥

एवं विक्रीडतोः स्वैरं गायतोः संप्रमत्तवत् ॥ शंखचूड इति ख्यातो धनदानुचरोऽभ्यगात् ॥ २५ ॥

तो तूं गुह्यक म्हणसी कोण । ऐकें राया सावधान । जो धनदाचा अनुचरगण । ज्या अभिधान शंखचूड ॥ ५४ ॥ यथेष्ट स्वेच्छा राममुरारी । क्रीडतां व्रजयुवतींमाझारीं । मधुर गाती सप्तस्वरीं । सर्वज्ञ परी प्रमत्तवत् ॥ १५५ ॥ शंखचूडनामा तेथ । येता झाला अकस्मात । रामकृष्ण ज्याचे नाथ । तया त्रासित वधूनिचयां[4] ॥ ५६ ॥ कृष्ण आणि संकर्षण । प्रत्यक्ष करितां निरीक्षण । बळात्कारें बल्लवीगण । भयें त्रासोनि आक्रोशवी ॥ ५७ ॥

---

**पाठभेद :—** * स्ववनोद्धार ( उ. ). § दाउनि ( मुं. )

१ कल्पित. २ निःश्वासापासून उत्पन्न झालेल्या. ३ पुरुषव्याघ्रा. ४ गोपीसमूहाला.

तयोर्निरीक्षितो राजंस्तन्नाथं प्रमदाजनम् ॥ क्रोशंतं कालयामास दिश्युदीच्यामशंकितः ॥ २६ ॥

**रामकृष्णांची न धरूनि शंका । निजमरणाचा न मनी धोका । गीतमोहिता व्रजबायका । कृष्णासम्मुखा संत्रासी ॥ ५८ ॥ त्याच्या भयें त्रासल्या युवति । दीर्घस्वरें आक्रंदती । बळेंचि उत्तरदिशेप्रति । पिटी दुर्मति शंखचूड ॥ ५९ ॥**

क्रोशंतं रामकृष्णेति विलोक्य स्वपरिग्रहम् । यथा गा दस्युना ग्रस्ता भ्रातरावन्वधावताम् ॥ २७ ॥

**धांव धांव गा संकर्षणा । महाबलिष्ठा प्रलंबमथना । वधूगण आक्रोश करितां करुणा । रामकृष्णा जाकळी ॥ १६० ॥ रामकृष्णा धांवें पावें । ऐशा बल्लवी घेती नांवें । जैसी धेनु दीर्घ रावें । व्याघ्रें धरितां आक्रंदे ॥ ६१ ॥ अवंचक सर्वस्वें मत्पर । जाणोनि केला अंगीकार । तो स्वपरि[1]ग्रह गोपीनिकर । पाहोनि श्रीधर कोपला ॥ ६२ ॥ परिसोनि त्यांचें आक्रंदित । आणि शंखचूडाचें दुष्टाचरित । रामकृष्ण बंधु त्वरित । धांवते जाले त्यामागें ॥ ६३ ॥***

मा भैष्टेत्यभयारावौ शालहस्तौ तरस्विनौ । आसेदतुस्तं तरसा त्वरितं गुह्यकाधमम् ॥ २८ ॥

**नाभी नाभी प्रमदागणा । अभय देती समस्तां ललनां । ताल उपडूनि दीर्घस्वना । गर्जूनि दोघे धांवती ॥ ६४ ॥ गुह्यकांमाजि अधम मूढ । मर्तुकाम[2] जो शंखचूड । त्यातें वधावया वेगाड[3] । धांवती सदृढ प्रतापें ॥ १६५ ॥**

स वीक्ष्य तावनुप्राप्तौ कालमृत्यू इवोद्विजन् । विसृज्य स्त्रीजनं मूढः प्राद्रवज्जीवितेच्छया ॥ २९ ॥

**रामकृष्ण लागले पाठीं । जेंवि काळमृत्यूशीं पडली गांठी । देखोनि गुह्यक भयभीत पोटीं । मानी संकटीं आतुडलों[4] ॥ ६६ ॥ भयें सांडोनि स्त्रीसमुदाय । पळतां वेगडीं[5] वळती पाय । लक्षूनि जीवितरक्षणोपाय । पळता होय तेथूनी ॥ ६७ ॥ स्मृति हारपोनि जाला मूढ । यास्तव व्योमगति झाली गूढ । भूतळीं पडतां शंखचूड । दिसे उजेड शिरोरत्नें ॥ ६८ ॥ गुह्यकापासूनि स्त्रीसमुदाय । सोडवूनियां यादवराय । रक्षण ठेवूनि रोहिणीतनय । धांवता होय त्यामागें ॥ ६९ ॥**

तमन्वधावद्गोविंदो यत्र यत्र स धावति । जिहीर्षुस्तच्छिरोरत्नं तस्थौ रक्षन्स्त्रियो बलः ॥ ३० ॥

**पाठभेद** :— * ६३ वी ओवी मुंगी प्रतींत नाहीं.

१ आपल्या स्त्रिया. २ मरणाची इच्छा ज्यास तो. ३ त्वरेनें. ४ पडलों. ५ वेगानें.

स्त्रीरक्षणीं[T] बळभद्र बळी। सुदृढ राहिला विक्रमशाली। शंखचूडाचा सरत्नमौळि। धांवे वनमाळी हरणार्थ ॥ १७० ॥ जीवितरक्षणाचिये चाडे। गुह्यक धांवे जिकडे जिकडे[†]। शिरोरत्नार्थ तिकडे तिकडे। कृष्ण वावडें साटोपें ॥ ७१ ॥ घ्यावया हेममृगाचा प्राण। जैसा धांवे राघवबाण। तैसा गुह्यकामागें कृष्ण। धांवे निर्वाण[१] द्यावया ॥ ७२ ॥

अविदूर इवाभ्येत्य शिरस्तस्य दुरात्मनः। जहार मुष्टिनैवांग सहचूडामणिं विभुः ॥ ३१ ॥

अंग म्हणिजे कोमलवचनें। कौरवभूपा मुनिवर म्हणे। दुरात्मयाचा मस्तक कृष्णें। चूडारत्नें सह हरिला ॥ ७३ ॥ अविदूर म्हणिजे दुरी ना जवळी। पाठीं धांवोनि श्रीवनमाळी। मुष्टी कवळूनि सरत्नमौळि। तोडूनि तत्काळीं घेतला ॥ ७४ ॥ जैसें कोमळ तुंबिनीफळ[२]। मुष्टी कवळूनि तोडी कृषीवळ। तैसें सरत्न गुह्यकमौळ। धावूनि कृष्णें तोडिलें ॥ १७५ ॥ सरत्नमौळ कृष्णाहातीं। गुह्यककबंध[३] पडलें क्षितीं। शंखचूडा उत्तमगति। वोपी श्रीपति कृपेनें ॥ ७६ ॥ कृष्णहस्तें पावला निधन। यालागिं चुकलें जन्ममरण। अक्षय* करूनि* सायुज्यसदन[४]। वित्तपगण[५] उद्धरला ॥ ७७ ॥

शंखचूडं निहत्यैवं मणिमादाय भास्वरम्। अग्रजायाददत्प्रीत्या पश्यन्तीनां च योषिताम् ॥ ३२ ॥

एवं वधूनि गुह्यकातें। त्याचे मौळी जें रत्न होतें। प्रभे लोपवी भास्करातें। तें स्वहस्तें हरि हरी ॥ ७८ ॥ गोपी सकंपा गुह्यकभयें। तयांतें रत्न दावूनि स्वयें। अग्रजाहातीं वोपिता होय। तो अभिप्राय अवधारा ॥ ७९ ॥ शंखचूड येऊनि पुढती। त्रासील सकाम क्रूरवृत्ति। गोपी हृदयीं हे शंका वाहती। तिची निवृत्ति करावया ॥ १८० ॥ शंखचूडाचा मौळमणि। तिहीं पाहतां आपुले नयनीं ॥ गुह्यकभयाची कणकणी। हृदयांहूनि निरसली ॥ ८१ ॥ रक्षूनि अग्रजाची मर्यादा। मणिअर्पणें स्नेहवादा। वर्धवितां तो परमानंदा। पावोनि मुकुंदा आलिंगी ॥ ८२ ॥ तिये आलिंगन-मेळीं। त्रिजग सच्चित्सुखकल्लोळीं। विबुध विमानीं पिटिती टाळी। पुष्पें मोकळीं वर्षती ॥ ८३ ॥ ऐसिया रासरसिका रजनी। व्रतस्था कात्यायनीपूजनीं। याचिल्या यमुनानिमज्जनीं। हरितोषणीं गोपींहीं ॥ ८४ ॥ त्या गोपींच्या वरदऋणा। फेडावया त्रैलोक्यराणा। जैसजैसी त्यांची कामना। त्या त्या खुणा अनुसरे पैं ॥ १८५ ॥ सुदर्शना स्वर्गावाप्ति। शंखचूडातें सायुज्यमुक्ति। गोपी पावल्या स्वानंदतृप्ति। रामश्रीपति संतुष्ट ॥ ८६ ॥ पुढें परम रसाळ कथा। मानिनी मानसीं मनसिजव्यथा। पावोनि हरिगुण वदती मिथा। ते कुरुनाथा अवधारीं ॥ ८७ ॥ श्रीएकनाथ भक्तपाति।

पाठभेद :— T स्त्रियारक्षणीं (मुं. व उ.). † तिकडे (मुं.). * अक्षय वरूनि (उ.).

१ मरण, मुक्ति. २ भोपळीचें फळ. ३ गुह्यकाचें धड. ४ ईश्वररूपीं मिळून जाणें. ५ कुबेरगण.

चिदानंदाख्य वेणुगीतीं । स्वानंदरूपा गोपयुवति । गोविंदवेधें वेधल्या ॥ ८८ ॥ त्या गोपींचा समरसभाव । हर्षें कोंदला दयार्णव । श्रवणें मननें सुस्नात सर्व । हें पर्व अपूर्व श्रोतयां ॥ ८९ ॥ तें हें श्रीमद्भागवत । अष्टादश सहस्र गणित । परमहंसीं रमिजे जेथ । स्कंध विख्यात दशम हा ॥ १९० ॥ श्रीशुकपरीक्षितिसंवाद। उत्तररासक्रीडाभेद। सुदर्शनशंखचूडाख्यान विशद । अध्याय प्रसिद्ध चौतिसावा ॥ १९१ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायामंबिकावनयात्रा-सुदर्शनविद्याधरशंखचूडगुह्यकधनदानुचरोभयोद्धरणं नाम चतुस्त्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३४ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक ॥ ३२ ॥ टीका ओव्या ॥ १९१ ॥ एवं संख्या ॥ २२३ ॥ ( चौतिसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १६५६६ ).

चौतिसावा अध्याय समाप्त.

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय ३५ वा

श्रीगोपालकृष्णाय नमः । गवर्ण तो गजानन । अकार तो श्रीभगवान । उकार तो उमारमण । एवमादि मिळूनि गोकार ॥ १ ॥ गकार* म्हणिजे धिषणापति[1] । जे कां रजोगुणाची व्यक्ति । मातृकामात्रीं[2] ज्याची वसती । तो अकार निश्चितीं वासुदेव ॥ २ ॥ उकार केवळ उमारमण । हें बीजनिघंटीं प्रशंसन । जाणती मंत्रविद्याभिज्ञ । एवं प्रणवपूर्ण गोकार ॥ ३ ॥ प्रणव आदिबीजा नाम । एकाक्षर नादब्रह्म । जेथूनि स्वरवर्णाचा जन्म । निगमोद्गम तद्योगें ॥ ४ ॥ तेथूनि आगमस्मृतिपुराणें । सूत्रें पद्धति विहिताचरणें । तव नामाच्या प्रथमवर्णें । केलें शाहणें ब्रह्मांड ॥ ५ ॥ तया प्रणवाचा आभिज्ञ । सन्मात्र तूं सच्चित्सुखघन । विंदंतीति[3] वेत्ता म्हणोन । वदे व्याकरण गोविंद ॥ ६ ॥ तव वेत्तृत्वें विण प्रणव । प्रसवे† चौऱ्यांशी लक्ष जीव । जंव न पवती ते तुझा ठाव । तंव ते भवभ्रमग्रस्त ॥ ७ ॥ यालागिं प्रणवप्रसवतिया । प्रणतपाळा प्रणयप्रिया । अगुणा आद्या सद्गुणनिलया । वेदवेत्तया विदुंधा[4] ॥ ८ ॥ प्रणवरूपा प्रणवात्मका । प्रणवरहस्यप्रकाशका । प्रणवाभिज्ञाखिलबोधका । नमो देशिका[5] गोविंदा ॥ ९ ॥ करूनि तव पदप्रणाति मात्र । तव कृपेचें झालों पात्र । यालागिं संवित्प्रचुरगात्र । करूनि चरित्र वदविसी ॥ १० ॥ इंधन अधिष्ठितां अनळें । जऱ्हीं तें इंधनाकृतिही कळे । परंतु न धरे तद्विटाळें । निवडे केवळ अनळत्वें ॥ ११ ॥ तेंवि भूतां गुणांचा समुदाव । तेथ प्रकटोनि स्वसद्भाव । देहभावाचें पुसूनि नांव । केला ठाव स्वबोधा ॥ १२ ॥ दशमस्कंधाचें व्याख्यान । भाषाबद्ध निरूपण । प्रेमळ भक्त जे अव्युत्पन्न । त्यांतें श्रवण करावया ॥ १३ ॥ निरूपीं म्हणोनि स्पर्शिलें करीं । ते श्रीआज्ञा वंदूनि शिरीं । दयार्णवाची

**पाठभेद :—** * मकार (मुं.). † प्रवेश (उ.).

१ ब्रह्मा. २ प्रत्येक वर्णांत. ३ जाणतो. ४ हे ज्ञात्या. ५ हे गुरो.

वैखरी । दशमावरी प्रवर्त्तली ॥ १४ ॥ तेथ रासक्रीडान्त पहिले । चौतीस अध्याय वाखाणिले । स्वेच्छा गोपींहीं भोगिलें । रतिसौभाग्य कृष्णेंशीं ॥ १५ ॥ परंतु गोपींची जीवदशा । साक्षी होऊनि तत्सुखावेशा । वरपडलिया पावती अंशा । यास्तव परेशा कींव आली ॥ १६ ॥ मग उदया आणूनि वियोगरावि । सत्रप ईषणात्रैय[1] जागवी । समेम वेधें विरह* लावी । पुढती गोवी विधिविहितीं ॥ १७ ॥ परी तो हरि विरहाचा आंगीं । साक्षित्व जीवदशा जों भंगी† । तोंवरी वर्त्तती भवविरागी । सानुरागी श्रीकृष्णीं ॥ १८ ॥ तेंचि सानुरागलक्षण । कृष्णभुक्तरात्रि स्मरोन । वियोगदुःखाचें दिनमान । क्रमी वधूगण गुणकथनें ॥ १९ ॥ स्वागतादि छंदें द्वादशयुगळीं । मिथा‡ गोपींची मंडळी । संवादली तें नृपाजवळी । कथनशाली शुक सांगे ॥ २० ॥

श्रीशुक उवाच :— गोप्यः कृष्णे वनं याते तमनुद्रुतचेतसः । कृष्णलीलाः प्रगायंत्यो निन्युर्दुःखेन वासरान् ॥ १ ॥

कृष्ण गेला असतां वना । सानुरागा तद्गतमना । करिती तल्लीलागायना । बल्लवललना विरहिणी ॥ २१ ॥ विरहदुःखाचे वासर । युगाहूनही भासती थोर । करिती तद्दुःखा परिहार । लीला सादर वर्णूनी ॥ २२ ॥

गोप्य ऊचुः :— वामबाहुकृतवामकपोलो वल्गितभ्रुरधरार्पितवेणुम् ।
कोमलांगुलिभिराश्रितमार्गं गोप्य ईरयति यत्र मुकुंदः ॥ २ ॥

गोपी गोपींतें म्हणे वो सखिये । श्रीकृष्ण जेव्हां वेणु वाहे । तेव्हां अद्भुत कौतुक काय । वर्त्तलें होय तें ऐका ॥ २३ ॥ वेणु वाजवी जनार्दन । तें कृष्णाचें कमनीय[2] ध्यान । ठाणमाण गुणलावण्य । मनें कवळूनि वर्णिती ॥ २४ ॥ शक्रोपलमय[3]सुनीलकांति । वदनीं राकावदनद्युति§ । नयन नीरजपत्राकृति । कोमलमूर्ति कंदर्पी ॥ २५ ॥ वामबाहुमूळीं संलग्न । वामकपोल करूनि पूर्ण । कुंचित अधरीं वेणुधमन । भ्रूचालन सविलास ॥ २६ ॥ दक्षिणभागीं उभय करीं । कोमलांगुलीं उभय‖ रंध्रीं । गायनमार्गें सप्तस्वरीं । जेव्हां मुरारि वाजवी ॥ २७ ॥

व्योमयानवनिताः सह सिद्धैर्विस्मितास्तदुपधार्य सलज्जाः ।
काममार्गणसमर्पितचित्ताः कश्मलं ययुरपस्मृतनीव्यः ॥ ३ ॥

तेव्हां निर्जर सिद्ध विमानयानीं । कृष्णलीला पाहतां नयनीं । सिद्धवनिता अंकासनीं । होत्या कवळूनि स्वपतींसी ॥ २८ ॥ स्वपतींचिया अंकासनीं । वेणूवादन ऐकोनि श्रवणीं । विस्मित होतांचि अंतःकरणीं । काममार्गणीं[4] भेदल्या ॥ २९ ॥ स्मरशरघातें व्याकुळ मनें । स्मरणधर्मा मुकल्या तेणें । मोह पावल्या तेंचि चिह्नें । कीं नेणती वसनें गळालीं ॥ ३० ॥ परमसत्रपा सिद्धांगना । परि

---

पाठभेद :— * विषय ( मुं. ). † अभंगी ( मुं ). ‡ मिथ्या ( मुं ). § राकारमण– ( मुं. व उ. ). ‖ वेणू ( मुं. व उ. ).
१ धर्मार्थकामाची आस्था. २ सुंदर. ३ इंद्रनीलमण्याप्रमाणें नीलवर्ण कांति. ४ मदनशरांनीं.

परिसोनि वेणुक्कणना । काममार्गणें मोहितमना । विगलितवसना न स्मरती ॥ ३१ ॥ स्वकांतांकीं निर्जर कांता । परिसोनि कृष्णवेणुक्वणिता । स्मरमार्गणें मोहितचित्ता । मा आम्ही तद्भुक्ता विरहिणी ॥ ३२ ॥ कृष्णविलासें क्रमिल्या रजनी । त्यांचा विसर न पडे मनीं । आतां तद्विरहें विरहिणी । केंवि साजणी दिन कंठूं ॥ ३३ ॥ हें ऐकोनि अपरा* युवति । कृष्णवेणूची अद्भुत शक्ति । पश्वादि मृगें मोहितें होतीं । म्हणती सखियातें तें ऐका ॥ ३४ ॥

हंत चित्रमबलाः शृणुतेदं हारहास उरसि स्थिरविद्युत् ।
नंदसूनुरयमार्त्तजनानां नर्मदो यर्हि कूजितवेणुः ॥ ४ ॥

अवो हा नंदाचा नंदन । जेव्हां करी वेणुवादन । ज्याचेनि दुःखाविष्ट जन । कौतुकापन्न होतसे ॥ ३५ ॥ वेणु योजूनि अधरपुटीं । वामांग वक्षोर्ध्व हनुवटीं । टेकूनि तिर्यक् तरळदृष्टि । चंचळ भ्रुकुटी सविभ्रमा ॥ ३६ ॥ तंव ते वदनेंदूची कांति । आणि हृदयींची हारद्युति । ऐक्यभावें पुंजाळती । हास्यदीप्तिसमसाम्यें ॥ ३७ ॥ मुक्ताफळादि रत्नहार । कीं सुपुष्पीं कुंद-मंदार । लावण्यलक्ष्मी चपळाकार । मुखभामिश्र स्थिर उरसि ॥ ३८ ॥ श्रीधरप्रणीत अर्थविशेष । हारासारिखें शोभे हास्य । कीं हारावरी स्मितप्रकाश । तो हारहास[१] श्रीकृष्ण ॥ ३९ ॥ ऐसा नंदसूनु गोविंद । आर्त्तजनां आनंदकंद । वेणुवादनें विनोदप्रद । होय विशद जे काळीं ॥ ४० ॥ म्हणाल दुःखार्त्त ते कोण† । जे भवदुःखार्णवीं निमग्न । क्षुधातृषादि जरामरण । संचितरुग्ण[२] सर्वदा ॥ ४१ ॥ ऐसियातें हीं वेणुक्वणनें । दुःख विसरवी विनोददानें । आनंदप्रचुर त्यांचीं मनें । प्रसन्ननयनें ते पाहती ॥ ४२ ॥ तिये काळीं पश्वादि मृगें । चित्सुखावाप्ति लाहतीं आंगें । त्यांचे देहीं उमटतीं लिंगें । तियेंही प्रसंगें अवधारा ॥ ४३ ॥

वृंदशो व्रजवृषा मृगगावो वेणुवाद्यहृतचेतस आरात् ।
दंतदष्टकवला धृतकर्णा निद्रिता लिखितचित्रमिवाऽसन् ॥ ५ ॥

केवळ ज्ञानविहीन पशु । ज्यांचा नंदव्रजीं‡ निवासु । धेनु वृषभ मृगें अशेष । ते पावती तोष वेणुरवें ॥ ४४ ॥ जोडतां विशेष निम्नभाग । जलही सांडी पुढील वोघ । कीं मिष्टान्नलाभें मानूनि उबग । करिती त्याग कदन्ना§ ॥ ४५ ॥ तस्करा जोडतां यथेष्ट कनक । घेतल्या धातु टाकी। आणिक । तेंवि चित्सुखलाभें मृगादिक । होती विमुख निजविषया ॥ ४६ ॥ वृषभ धेनु चित्रापरी - विविधमृगयाति कांतारीं । ठायीं ठायीं पृथगाकारीं । समाधिशेजारीं सुखसुप्त ॥ ४७ ॥ गोवृषमृगादिकांचे वृंद । जेथ जे जे होते विशद । श्रवणीं पडतां वेणुनाद । जाले स्तब्ध ते तैसे ॥ ४८ ॥ म्हणाल स्तब्धता कोण्या गुणें । तरी वेणुवादनें त्यांचीं मनें । हरूनि केलीं प्रत्यक्[३]प्रवणें । तें स्मित-

**पाठभेद :—** * इतरा ( उ. ). † कवण ( मुं. ). ‡ वृंदव्राजि ( मुं. ) § कदान्न ( मुं. )

१ हाराप्रमाणें शुभ्रवर्ण हास्य ज्याचें तो. २ पूर्वसंचित हाच रोग त्यानें ग्रस्त. ३ आत्मस्वरूपाभिमुख.

लक्षणें अवधारा ॥ ४९ ॥ अनाहत वेणूच्या वादनें ।† वेधितां उपवनें‡ दहनें जीवनें । तिष्ठती चेष्टाविहीनें ।‖ सहितत्रिभुवनें उपरमिजे ॥ ५० ॥ वेणुवाद्यें स्मृतीचें हरण । करितां मृगपशूंचे पृथक् गण । लिखितचित्रासमान¶ । वेणुक्कणनें⊤ पैं⊤ करितां⊤ ॥ ५१ ॥ कृष्णापासूनि होते दूर । तिर्यक् तमोयोनि प्रचुर । वर्जितवर्णाश्रमाचार । ते झाले स्थिर ध्वनिवेधें ॥ ५२ ॥ तेणें थकली विषयवृत्ति↓ । कवळ चर्वितां उभयदंतीं । हालों विसरल्या दंतपंक्ति । नेत्रपातीं उन्मळित ॥ ५३ ॥ शृंगें स्पर्शिलीं पुच्छाग्रीं । उत्तंभित कर्णहारी । योनिपरत्वें तनुसामग्री । तत्तत्प्रकारीं ताटस्थ्य ॥ ५४ ॥ भुलल्या अज्ञान तिर्यग्योनि । मां आम्ही तों तद्भुक्ता विरहिणी । कृष्णें अनुभविल्या त्या रजनी । केंवि साजणी न स्मरों ॥ ५५ ॥ हें ऐकोनि अपरा गोपी । म्हणती श्रीकृष्णाचे रूपीं । सचेतांची तों गोष्टी सोपी । परी सरिता आपीं स्मरमूर्च्छा ॥ ५६ ॥ कैसें कृष्णाचें तें रूप । देखोनि सरितांतें कंदर्प । व्यापिता झाला तो संक्षेप । नृपातें अल्प मुनि जल्पे ॥ ५७ ॥

बर्हिणस्तबकधातुपलाशैर्बद्धमल्लपरिबर्हविडंबः ।
कर्हिचित्सबल आलि स गोपैर्गाः समाह्वयति यत्र मुकुंदः ॥ ६ ॥

आलि ऐसें संबोधन । अवो साजणी हें आश्चर्य गहन । जेव्हां मल्लविडंबन । करी श्रीकृष्ण अनुकरूनी ॥ ५८ ॥ बर्हिबर्हांचा किरीट । करकौशल्यें रचिला नीट । शक्रकार्मुकद्युति[१] निघोट[२] । प्रभा उद्भट श्रीमुकुटीं ॥ ५९ ॥ श्वेत पीत नील कर्बुर । गैरिकादि धातु विचित्र । विविधाकृति रंजित गात्र । मल्लापरि कटिपरिबद्ध[३]* ॥ ६० ॥ प्रफुल्लार कह्लारपंक्ति । विविधोत्पलांचिया जाति । कोमलपल्लवमंडित व्यक्ति । मल्लाकृति नटनाढ्यें ॥ ६१ ॥ सहित गोप संकर्षण । सुधासदृश वेणुक्कणन । करूनि पाचारी धेनुगण । जेव्हां श्रीकृष्ण सखिया हो ॥ ६२ ॥

तर्हि भग्नगतयः सरितो वै तत्पदांबुजरजोऽनिलनीतम् ।
स्पृहयतीर्वयमिवाबहुपुण्याः प्रेमवेपितभुजाः स्तिमितापः ॥ ७ ॥

तेव्हा तदुत्थमधुरध्वनि । मिश्रितपवना आलिंगुनी । गतिराहित्य सरिज्जीवनीं[४] । पदरज मनीं वांछिती ॥ ६३ ॥ परंतु सरिता आम्हुचेचि परि । अल्प सुकृतसंग्रह पदरीं । तेणें पदरजःप्रेम अंतरीं । परी धणीवरी न लाहती§ ॥ ६४ ॥ पदरजःप्रेमवेधेंचि स्तिमिता । तरंगभुजा प्रस्फुरिता । केवळ आलिंगनार्थ उदिता । तद्रसप्राप्ता समदुःखा ॥ ६५ ॥ समदुःखिता कवणे परी । स्तिमितबाष्पा व्रजनारी । भुजा स्फुरती आणि अंतरीं । वृत्तितादात्म्यें ताटस्थ्य ॥ ६६ ॥ वनविहारयोगें स्पर्शा । क्वचिल्लब्धसुखोत्कर्षा । स्मरोनि झुरती आम्हांचि सरिशा । मां आम्ही त्या निशा कें विसरों ॥ ६७ ॥

---

**पाठभेद :—** † नादगर्भित होऊनि गगनें । ( उ. ) ‡ पवनें ( उ. ). ‖ उ. प्रतीत हा चरण नाही. ¶ चित्रासमसमान ( मुं. व उ. ). ⊤ चेष्टाविहीन तिष्ठति ( मुं. व उ. ). ↓ –प्रवृत्ति ( उ. ). * –प्रतिबद्ध ( मुं. ). § हालती ( उ. ).

१ अखंड. २ इंद्रधनुष्याची शोभा. ३ मल्लांप्रमाणें कंबरबस्ता बांधिला ज्यानें तो. ४ नद्यांच्या उदकांत.

तंव अपरा म्हणती सरिता चरां । कृष्ण वेणुक्कणनावसरा । वेधी द्रुमवल्लीस्थावरां । त्या प्रकारा परिसा गे ॥ ६८ ॥

अनुचरैः समनुवर्णितवीर्य आदिपूरुष इवाचलभूतिः ।
वनचरो गिरितटेषु चरंतीर्वेणुनाऽह्वयति गाः स यदा हि ॥ ८ ॥

आदिपुरुष जो परमेश्वर । तोचि हा श्रीकृष्ण साचार । नेणोनि मुग्धा उपमापर । श्रीअनुकार कल्पिती ॥ ६९ ॥ सुरवर परमेश्वरानुयायी । बल्लवरूपीं तेथ ये ठायीं । कृष्णप्रताप वर्णिती पाहीं । पन्नगशायी समसाम्य ॥ ७० ॥ आदिपुरुषीं अचल भूंति । येर चंचल सर्वत्र वसति । कृष्णीं निश्चल देखोनि युवति । श्री उपमिति ईशेंशीं ॥ ७१ ॥ निश्चळ लक्ष्मी म्हणाल कैसी । वनवासीही श्रीकृष्णासी । सुरवर अनुचर गोपवेशीं । ऐश्वर्यासी वर्णिती ॥ ७२ ॥ आदिपुरुषाच्या श्वासानिळें । निगमगानें त्रिजग चळे । तद्वद्वेणुवादनलीले । गोगोपाळें मोहरती ॥ ७३ ॥ रसाळवेणुगायनध्वनी- । माजि धेनु निजाभिधानीं । संबोधितां चक्रपाणि । नवल ते क्षणीं होतसे ॥ ७४ ॥

वनलतास्तरव आत्मनि विष्णुं व्यंजयंत्य इव पुष्पफलाढ्याः ।
प्रणतभारविटपा मधुधाराः प्रेमहृष्टतनवः ससृजुः स्म ॥ ९ ॥

निगमवाक्यार्थाच्या श्रवणीं । निश्चल तरुसम मुनिजनध्यानीं । सुकृतसाफल्यें संकल्प सुमनीं । अमोघ लगडोनि लवले जे ॥ ७५ ॥ तैशाच पतिव्रता ज्या साध्वी । कांतसेवनव्रतलाघवी । तरुवरवेष्टित वल्ली जेंवि । पुष्पीं पल्लवीं सफळिता ॥ ७६ ॥ सफळसुकृतभारें नम्रा । त्या ज्या शाखा प्रणतभारा । निजात्मकारणकृतविचारा । बाह्योपचारा सूचिती ॥ ७७ ॥ आत्मव्यापक जो श्रीविष्णु । सर्व भूतीं जो भ्राजिष्णुं । वास्तव अभेदप्रेमा गहन । प्रणत होऊनि जाणविती ॥ ७८ ॥ सिंधु बिंदुत्वें निवडुनी । गगनीं चढोनि पडला धरणी । परि प्रेमा अगाध निजात्ममिळणीं । सम्मुख धांवोनि जेंवि सुचवी ॥ ७९ ॥ किंवा पृथ्वीचे परमाणु । वायुयोगें चढल्या गगन । तथापि अभेद-प्रेमा गहन । कथिती भजोन मिळणीतें ॥ ८० ॥ त्याचि मुनिवरपतिव्रता । येथ जालिया पादपलता । नेणोनि मुग्धा गोपवनिता । सादृश्यता उपमिती ॥ ८१ ॥ विष्णु व्यापक आपुले हृदयीं । तो हा गोविंद शेषशायी । अभेदसप्रेमभावें मही । वर्षती पाहीं मधुधारा ॥ ८२ ॥ चंद्रदर्शनें चंद्रकांति । वास्तव वेधें पाझर द्रवती । वेणुवादनें वृक्षयाति । तैशा स्रवती सखिया हो ॥ ८३ ॥ त्या कृष्णाच्या अधरपानें । रंगलीं असतां आमुचीं मनें । वियोगदुःखाचीं वदनें । कवण्या गुणें विसरती ॥ ८४ ॥ तंव आणिका गोपी म्हणती । कृष्णवेणूची वेधकशक्ति । सरसीं सारसहंसयाति । उपरम पावती परिसोनी ॥ ८५ ॥

१ चलनशील. २ ऐश्वर्य. ३ श्वासरूप वायूनें. ४ प्रकाशमान. ५ वृक्षलता. ६ सरोवरांत.

दर्शनीयतिलको वनमालादिव्यगंधतुलसीमधुमत्तैः ।
अलिकुलैरलघुगीतमभीष्टमाद्रियन्यर्हि संधितवेणुः ॥ १० ॥

लावण्यश्रीचें सौभाग्य मुख्य । तो ललाटीं केशरतिलक । वरी अक्षता जेंवि अर्क । बिंबे माणिक्यप्रभेंत ॥ ८६ ॥ तेंवि लावण्य मदनाहुनी । जें मिरविती त्रिभुवनीं । त्या दर्शनीं यांचाही अग्रणी । तिलकस्थानीं श्रीकृष्ण ॥ ८७ ॥ ऐसा लावण्यचूडामणि । विशेष विलसे दिव्याभरणीं । तुलसीगंधार्थ भ्रमरगणीं । वनमाळेसीं वेष्टिला ॥ ८८ ॥ येथ श्रोते शंका करिती । सामान्य सौरभ्य तुलसीप्रति । सांप्रत भ्रमर न वेधती । ग्रंथीं ख्याति किमर्थ ॥ ८९ ॥ तरी ये शंकेची निवृत्ति । श्रीकृष्ण अवतरला जैं क्षिती । तैं सुरस्त्रियादि दिव्य भूतीं । ऐश्वर्यें शक्ति प्रकाशिल्या ॥ ९० ॥ निर्जर जिंकिले यातुधानीं[1] । त्या राक्षसां समरांगणीं । कपि मर्दिती ऐसी करणीं । ऐश्वर्यें करूनि प्रभूच्या ॥ ९१ ॥ पूर्वीं अथवा इये काळीं । साधारण तो गोळांगुळीं[2] । पारिजात तुळसी तेंवि परिमळीं । वनजें[3] आगळीं ऐश्वर्यें ॥ ९२ ॥ म्हणोनि वनमाळामिश्रतुळसी । सेवूनि तद्गत दिव्य गंधासी । मातले मधुकर हरिगुणांसी । उच्चस्वरेंसीं आळविती ॥ ९३ ॥ श्रीकृष्णासी तोषकर । अनुलक्षूनि मुरलीस्वर । गाती आनंदें मधुकर । वेणु श्रीधर जैं वाहे ॥ ९४ ॥

सरसि सारसहंसविहंगाश्चारुगीतहृतचेतस एत्य ।
हरिमुपासत ते यतचित्ता हंत मीलितदृशो धृतमौनाः ॥ ११ ॥

तें ऐकोनि वेणुगान । सारसहंसादि पक्षिगण । चारुगायनें अंतःकरण । तन्मय होऊन उपरमती ॥ ९५ ॥ विष्णुसान्निध्यें जे सत्त्वस्थिती । पासूनि दूरतमो याति । अंडजयोनीमाजि[4] वसती । ते उपरमती तेथूनी ॥ ९६ ॥ मुरलीरवें हतमानस । सांडूनि संसारसरोवरवास । होऊनि विरक्त परमहंस । कृष्णसहवास आश्रयिती* ॥ ९७ ॥ ऐसे हरिमुरलीच्या स्वरें । पक्षी सांडिती सरोवरें । कृष्णा भजती अत्यादरें । निकट निर्धारें प्रवेशती ॥ ९८ ॥ विषादें म्हणती विहंग धन्य । तत्सान्निध्यें सुखसंपन्न । आमुचें दुर्भाग्य परम गहन† । कीं वियोगें करून जाचतसों ॥ ९९ ॥ हरिसुरताचा न पडे विसर । विरह तावी अभ्यंतर । युगसम गमतसे वासर । न सरे सत्वर हा सखिये ॥ १०० ॥ अपराध म्हणती मुरलीस्वन । परिसोनि वेधें पक्षिगण । भ्रमर करिती अनुगायन । नवल कोण पैं याचें ॥ १ ॥ याहूनि अद्‌भुत नवलपरी । कृष्ण मुरलीक्कणनें करी । ते हे परिसोनि वो सुंदरी । विश्वांतरीं सुखदा जे ॥ २ ॥

सहबलः स्रगवतंसविलासः सानुषु क्षितिभृतो व्रजदेव्यः ।
हर्षयन्यर्हि वेणुरवेण जातहर्ष उपरंभति विश्वम् ॥ १२ ॥

---

पाठभेदः—* वांछिती ( मुं. ). † वन्य ( उ. ).
१ राक्षसांनी. २ वानरांनीं. ३ वनांत उत्पन्न झालेलीं. ४ पक्षी.

व्रजदेवी या संबोधनें। गोपिकांतें ऐका म्हणे। मुकुटकुंडलें दिव्याभरणें। सालंकरणें बलकृष्णें[1] ॥ ३ ॥ मुक्ताफळांचे हार कंठीं। दिव्य मणींच्या दीप्ति मुकुटीं। श्रवणीं अवतंसाची दाटी। नटांगयष्टि सविलास ॥ ४ ॥ ऐसा ललितलावण्यवेश। अधिष्ठूनि गिरितटदेश। त्रिजग ओपितसे संतोष। परमोल्लास पावोनी ॥ १०५ ॥ ऐशिया आनंदाचे भरीं। जेव्हां वेणु अधरीं धरी। वेणुरवें त्या आनंदलहरी। विश्वांतरीं पूरितसे ॥ ६ ॥ जैं त्या वेणुस्वनें गगन। पूर्ण परमानंदें करून। ते काळींचें अद्भुतचिह्न। ऐका संपूर्ण सखिया हो ॥ ७ ॥

महदतिक्रमणशंकितचेता मंदमंदमनुगर्जति मेघः।
सुहृदमभ्यवर्षत्सुमनोभिश्छायया च विदधत्प्रतपत्रम् ॥ १३ ॥

महान् अखिलानंदप्रद। जाणोनि साशंक अंबुद[2]। नातिक्रमवेच गोविंद। समर्याद सेवेसी ॥ ८ ॥ कृष्णचरणांचिये आवडी। मेघ मर्यादा वाहे गाढी। कृष्णापुढें न करी वाढी। न गडगडी उच्चस्वरें ॥ ९ ॥ कृष्णमुरलीचिया नादा। अनुलक्षूनि करी शब्दा। मुरजादिका[3] वाद्यभेदा। गायनीं ध्रुवपदा पडिपाडें ॥ ११० ॥ आपुला आत्मसखा श्रीहरि। सबाह्य आत्मत्वें सम सरी। लक्षूनि सुमनवृष्टि करी। सुधातुषारीं सुखकंद ॥ ११ ॥ सबाह्य आत्मसाम्यता कैसी। तरी कृष्ण जीवन या त्रिजगासी। मेघही जीवनें आर्ति नासी। विश्रांतीसी अर्पुनि ॥ १२ ॥ कृष्ण समत्वें सर्वांतरीं। मेघही विषम भावा न धरी। समान वर्षे सर्वांवरी। दयादाक्षिण्यें उभयत्र ॥ १३ ॥ श्यामकांति समसमान। विद्युल्लता पीतवसन। स्वभक्तचातकां पोषण। क्षोभें कल्याणप्रद दोघे ॥ १४ ॥ ऐसा लक्षूनि सुहृद्भाव। करी सुमनांचा वर्षाव। कीं मेघा आडूनि वर्षती देव। त्याचेंचि नांव पुष्पघन ॥ ११५ ॥ सुमनासमान अंबुकण। श्रमहरणार्थ* अभिवर्षोन। कडतर ताविती भास्करकिरण। करी म्हणोन आतपत्र[4] ॥ १६ ॥ आतपापासूनि[5] करी त्राण। म्हणोनि आतपत्र हें अभिधान। मेघ स्वच्छाये करून। करी वारण आतपाचें ॥ १७ ॥ ऐसा अफाट जो अंबुद। तोही ऐकोनि वेणुनाद। सेवी आत्मत्वें† मुकुंद। आम्हां दुःखद तद्विरह ॥ १८ ॥ मेघादि अनावर कृष्णानुरक्त। तेथ वधूगण तत्संगभुक्त। वियोगदुःखें अतिसंतप्त। दिन समस्त आहळतसों ॥ १९ ॥ तंव त्या व्रजांगना प्रौढा। जाऊनि वदती यशोदे पुढां। वेणुनादें लाविलें वेडा। ब्रह्मादिमूढां सारिखें ॥ १२० ॥ जारक्रीडा यशोदेपासीं। आम्हीं प्रकट बोलिजे कैसी। हें नाठवेचि गोपिकांसीं। मानसें पिशीं हरिविरहें ॥ २१ ॥ जेंवि कनकबीजभक्षण[6]। करितां विसरवी देहभान। गुह्यार्थही करी जल्पन। तेंवि वधूगण हरिविरहें ॥ २२ ॥

विविधगोपचरणेषु विदग्धो वेणुवाद्य उरुधा निजशिक्षाः।
तव सुतः सति यदाऽधरबिंबे दत्तवेणुरनयत्स्वरजातीः ॥ १४ ॥

**पाठभेदः—** * समसमान ( मुं. ). † स्वात्मत्वें ( उ. ).

१ बलराम व कृष्ण यांनी. २ मेघ. ३ मृदंग इ०. ४ छत्र. ५ उन्हापासून. ६ धोतऱ्याचें बी खाणें.

म्हणती यशोदे सुंदरी। गोवळक्रीडा नानापरी। स्वकौशल्यें प्रकट करी। तो हा मुरारि तव तनय ॥ २३ ॥ विविधा परींचें गोवळाचरण। तद्विषयीं हा परम निपुण। क्रीडाकौतुकें मनांतून। प्रकटी नूतन अलौकिकें ॥ २४ ॥ तैसीच वेणुवादनविषयीं। त्याची चतुरता कथिजे कायी। कोण्हापाशीं शिकला नाहीं* । आपुले हृदयींहुनी प्रकटी ॥ १२५ ॥ घेऊनि अचेत वेणुकांड[१]। करी नादमय ब्रह्मांड। स्वरजातीचे भेद उदंड। सवनविभागें विस्तारीं ॥ २६ ॥† मन्द्रमध्यमतार-भेद। प्रथममध्यमोत्तम विशद। सवनविभाग ऐसे त्रिविध। मूर्च्छना विविध तद्गर्भीं ॥ २७ ॥ षड्ज ऋषभ आणि गांधार। मध्यम पंचम धैवत स्वर। आलापी उच्चउच्चतर। निषादादिक सातही§ ॥ २८ ॥ स्वरजातिसवनविभाग। भेदें उत्पन्न करी राग। तेथ त्रिजग सानुराग। विषयीं विराग पावोनि ॥ २९ ॥ तुझा तनय हा बिंबाधरीं। जेव्हां ठकार वेणु धरी। आरोहअवरोहजातिस्वरीं। ब्रह्मांड करी नादमय ॥ १३० ॥

सवनशस्तदुपधार्य सुरेशाः शक्रशर्वपरमेष्ठिपुरोगाः।
कवय आनतकंधरचित्ताः कश्मलं ययुरनिश्चिततत्त्वाः ॥ १५ ॥

कीचककांडांचें मात्र मिष। नादब्रह्मामृत जें सुरस। श्रवणीं पडतां मुनिवर त्रिदश। विधि-हर‡ सुरेश वेधती ॥ ३१ ॥ बाह्यविषयांचिया प्रवृत्ति। सांडोनि एकाग्र होती वृत्ति। मनोमस्तकें नम्र होतीं। आत्मास्थिती सुखलाभें ॥ ३२ ॥ परम कोविद सनकादिक। तेही होती श्रवणोन्मुख। तद्रसपानें सच्चित्सुख-। लाभें विमुख तनुधर्मीं ॥ ३३ ॥ आम्हीं कोण कोणे ठायीं। कोण अवस्था कोणे समयीं। ऐसी स्मृतीच न धरे देहीं। मोहप्रवाहीं मज्जती[२] ॥ ३४ ॥ सच्चित्सुखात्मक-प्रत्यय। तेथ मोह तो कैसा काय। तरी येथींचा अभिप्राय। निःसंशय अवधारा ॥ १३५ ॥ भूत भविष्य वर्तमान। कालत्रयात्मक सर्वज्ञ‖। विधिहरेंद्रमुनिवर पूर्ण⊤। तद्विहीन ते जाले ॥ ३६ ॥ वेणुश्रवणें थकल्या वृत्ति। पदाभिमानाची विस्मृति। वेणुध्वनीची अगाध शक्ति। विवशस्थिति सुखलाभ ॥ ३७ ॥ कृष्णमुरली मोही तत्त्वता। विधिहरेंद्रमुनि समस्तां। आम्ही तत्पदप्रेमासक्ता। केंवि मोहिता न हों पां ॥ ३८ ॥

निजपदाब्जदलैर्ध्वजवज्रनीरजांकुशविचित्रललामैः।
व्रजभुवः शमयन्खुरतोदं वर्ष्मधुर्यगतिरीडितवेणुः ॥ १६ ॥

तया मोहासि कारण। यशोदे तुझा हा नंदन। ऐकें तयाचें लक्षण। मोहकचिह्न

पाठभेदः— * बाई (मुं.). † ओवी क्र. १२६ उ. प्रतींत नाहीं. § सप्तही (उ.). ‡ विविध [redacted] (मुं.) ‖ संपूर्ण (मुं.). ⊤ सर्वज्ञ (मुं.).

१ वेळूच्या कांड्याचें. २ पराधीनता.

**वर्णिती ॥ ३९ ॥ श्रीपदकमलदलामल । जेथ सुचिह्नें रत्नमेळ । ध्वजवज्रांकुशाब्ज सकळ । गंगादि सोज्वळ ऊर्ध्वरेखा ॥ १४० ॥ ऐसिया पदीं फिरतां विपिन । करी पृथ्वीचें वेदनाशमन । खुरक्षतें[1] जें बहुकालीन । तें संपूर्ण विसरवी ॥ ४१ ॥ खुरक्षताच्या विषम तिडका । खुरतोद त्यां म्हणिजे देखा । स्वपदस्पर्शें व्रजजनसखा । निरसी फिरतां भूपृष्ठीं ॥ ४२ ॥ अश्वक्रान्ता रथक्रान्ता । गजपदातिनृपक्रान्ता[2] । एवं बोलिजे विष्णुक्रान्ता । भूपति तत्त्वता हरिअंश ॥ ४३ ॥ तया§ नृपातें करितां समरां । कठोर झगटतां गजरथखुरां । व्यथा न मनी वसुंधरा । जेंवी सुरतीं सुंदरा नखक्षतीं ॥ ४४ ॥ त्रिजग मोजितां त्रिविक्रमें । कीं हिरण्याक्ष वधितां पराक्रमें । तिखट वराहखुर-संक्रमें । भू सप्रेमें आह्लादे ॥ १४५ ॥ हरि चारितां वनीं गोधनां । गोखुरीं भू न पवे वेदना । परमाह्लादें प्रफुल्लमना । समाधाना पावतसे ॥ ४६ ॥ कित्येक म्हणती धेनुखुर । पृथ्वीलागीं वेदनाकर । हें व्याख्यान अविवेकपर । नातिचतुर निरूपिती ॥ ४७ ॥ तरी ते खुरवेदना कवण । परिसा आतां सावधान । ब्रह्मचापाशीं करी रुदन । पृथिवी जाऊन ज्या दुःखें ॥ ४८ ॥ अविधि दस्यु तस्कर जार । अधर्म करी उत्पथाचार । करितां अन्यायें संचार । ते वज्रप्रहार भू मानी ॥ ४९ ॥ विश्वासघातिया दुर्जना । परस्त्रीपरद्रव्यापहरणा । निरपराधसाधुच्छलना । करिती विचरणा जें दुष्ट ॥ १५० ॥ वेतन* भक्षूनि जन्मवरी । स्वामी सांडूनि पळती समरीं । सयान[3] त्यांच्या तिखटां खुरीं । दुःखी धरित्री बहुसाल ॥ ५१ ॥ सांडूनियां स्वभर्तारां । जाया जाऊनि भजती जारां । लागतां त्यांचिया पदप्रहारां । धरा थरथरां कांपतसे ॥ ५२ ॥ शिष्यामुखें गुरूची निंदा । सादर ऐकती त्यांचिया पदां । लागतां भूमि पावे खेदा । कांपे गदगदां तद्योगें ॥ ५३ ॥ पितृद्रोही मातृद्रोही । सुरापानी स्वर्णस्तेयी[4] । यांच्या स्पर्शें दुखवे मही । वज्रघायीं ना तैसी ॥ ५४ ॥ वेदनिंदक वेदद्रोही । ब्रह्मघ्न कृतघ्न आततायी[5] । मातृगामी कन्याविक्रयी । त्यांच्या पायीं भू दुखवे ॥ १५५ ॥ वेदबाह्यपाषंडीं† रत† । यथेष्टाचरणमार्ग मुक्त । वर्णसंकर विषयासक्त । वामी[6] कामी कौलिक ॥ ५६ ॥ आयतन आगार नगरसीमा । भंगिती लंघिती शपथनियमा । वृत्त्युच्छेदकांच्या विक्रमा । लागतां श्रमा भू मानी ॥ ५७ ॥ ऐसे धरेचे खुरतोद । शमवी स्पर्शोनि सुमंगल पद । जे पदीं सामुद्रललामवृन्द । तिहीं मुकुंद विचरतां ॥ ५८ ॥ तनुगौरवें धुरंधर । वर्ष्मधुर्य तो कुंजर[7] । एवं जगतीं संचार । करीं श्रीधर वेणु वाहत ॥ ५९ ॥ तें कृष्णाचें गजगतिगमन । विचित्र वेणूचें वादन । सविलास अपांगवीक्षण । वेधी तनुमन तें ऐका ॥ १६० ॥**

व्रजति तेन वयं सविलासवीक्षणार्पितमनोभववेगाः ।
कुजगतिं गमिता न विदामः कश्मलेन कबरं वसनं वा ॥ १७ ॥

**वेणुवादनें श्रवणद्वारा । वेधूनि आकर्षी अंतरा । सविलास वीक्षणें वेधीं नेत्रां । बुद्धि-**

**पाठभेद** :— § तरी ( उ. ). * व्यतन ( उ. ). † –पाषंडनिरत ( उ. )

१ खुरांनीं होणारीं क्षतें. २ राजानें व्यापलेली. ३ वाहनासह. ४ सोने चोरणारा. ५ वधाविषयीं उद्युक्त. ६ शाक्त. ७ हत्ती.

विचारा विसरवी ॥ ६१ ॥ देखोनि वेणुवादनपर । श्रवणें नयनें होतां सादर । इतुक्या निमित्त मन्मथज्वर । उपजे तीव्र सर्वांगीं ॥ ६२ ॥ ऐसिया आम्ही स्मरजर्जरा । विस्मृता प्रवृत्तिव्यापारा । नेणों गळाल्या वस्त्रां कंबरां । वृक्षाकारा ताटस्थ्यें ॥ ६३ ॥ नेणों फिटोनि गेलीं वसनें । केश सुटोनि गळालीं सुमनें । न स्मरतीच शरीरें नग्नें । वेणुगायनें भुललिया ॥ ६४ ॥ आमुचें नवल काय साजणी । आम्हीच ऐशा हरिणी वनीं । भुलोनि कृष्णाच्या वेणुगायनीं । प्रवृत्तिभानीं विमुक्ता ॥ १६५ ॥

मणिधरः क्वचिदागणयन्गामालया दयितगंधतुलस्याः ।
प्रणयिनोऽनुचरस्य कदांऽसे प्रक्षिपन्भुजमगायत यत्र ॥ १८ ॥

ऐकें यशोदे सुंदरी । तुझा तनय श्रीमुरारि । अमूल्यमणिमाला ग्रथित धरी । धेनुगणनार्थ निजकंठीं ॥ ६६ ॥ क्वचित् म्हणिजे कोणे समयीं । वर्णविभागें निवडी गायी । गणना करिती एके ठायीं । ग्रथितमणिस्रज घेउनी ॥ ६७ ॥ अथवा बंधु रामकृष्ण । धेनु वळिती विभागून । तें पाडोवाडीं करिती गणन । ग्रथित मणिगण घेउनी ॥ ६८ ॥ अथवा चालतां धेनुहारी । धेनु चिंतूनि एकी पांढरी । एकीबेकी क्रीडेवारी । मणिमयहारीं उमाणिती ॥ ६९ ॥ अथवा प्रसूता पारठिया । दोहनकाळीं निवडावया । घेऊनि ग्रथिता मणिमया वलया । करी कान्हैया परिगणना ॥ १७० ॥ एवं गोगणनाव्यापार । तदर्थ ग्रथित मणिगणहार । कंठीं मिरवी मुरलीधर । तुझा कुमर यशोदे ॥ ७१ ॥ तो मणिहार उत्तम । आणि प्रियतम तुळसीदाम । बहु सुगंधाढ्य जें कां परम । मेघश्याम तद्युक्त ॥ ७२ ॥ सवंगडी अनुचर प्रियतम बहु । त्यांचे स्कंधीं घालूनि बाहु । वेणु वाजवी मुहुर्मुहु । जे जे ठायीं जे समयीं ॥ ७३ ॥

क्वणितवेणुरववंचितचित्ताः कृष्णमन्वसत कृष्णगृहिण्यः ।
गुणगणार्णमनुगत्य हरिण्यो गोपिका इव विमुक्तगृहाशाः ॥ १९ ॥

तैं तो वेणुक्वणितध्वनि । मानसा वेधीं पडतां श्रवणीं । तेणें अपहृतचित्ता हरिणी । येती धांवोनि हरिमागें ॥ ७४ ॥ वल्लभा कृष्णसार मृगां-। सहित तत्पत्न्या सानुरागा । फिरती कृष्णा-मागोमागां । पुन्हा तत्संगा न त्यजिती ॥ १७५ ॥ गृहाशा जे फिरवी मागें । मुक्त जाली तत्प्रसंगें । म्हणोनि कृष्णा मागोमागें । फिरती कुरंगें अनुरक्तें ॥ ७६ ॥ जैशा गोपिका मुरलीरवें । वंचित-चित्ता घेती धांवे । पुन्हा गृहाशा नाठवे । कीं सुटलें दावें भवपाश ॥ ७७ ॥ कृष्णगृहिणी गोपवनिता । हरिसुख भोगूनि वियोगतप्ता । यालागीं भवपाशनिवृत्ता । ज्या सानुरक्ता श्रीकृष्णीं ॥ ७८ ॥ ऐसें कौतुक एकी वदती । तंव आणिका यशोदेप्रति । कृष्णलीला अनुवर्णिती । ते भूपती शुक सांगे ॥ ७९ ॥ मध्याह्नपर्यंत वृंदावनीं । क्रीडा करूनि चक्रपाणि । धेनु आणी परतोनि । यमुनापुलिनीं

१ संसारकृत्यें. २ केशरचना. ३ गणना करिती. ४ कृष्ण. ५ वारंवार.

जीवनार्थ ॥ १८० ॥ ते समर्यांची ललितलीला । कृष्णसौभाग्यकलाकुशला । वदती यशोदेप्रति व्रजबाळा । कुरुनृपाळा तें ऐक ॥ ८१ ॥

कुंददामकृतकौतुकवेशो गोपगोधनवृतो यमुनायाम् ।
नंदसूनुरनघे तव वत्सो नर्मदः प्रणयिनां विजहार ॥ २० ॥

अवो निष्पापे यशोदे सती । तुझा तनय हा श्रीपति । यशोदानंदनही म्हणती । अपरा वदती नंदात्मज ॥ ८२ ॥ तो हा गोपी भुलवावया । विचित्रवेशें नटवी काया । कुंदमाळा घालोनियां । धातुमया कृततिलकां ॥ ८३ ॥ गोपीनयनांसि सुखकर* । करूनि विचित्र अलंकार । वेश मिरवी अतिसुंदर । मोहनपर† त्रिजगातें ॥ ८४ ॥‖ ठाकत ठमकत आणि मुरडत । गोपगोधनीं परिवेष्टित । यमुनापुलिनीं क्रीडा करित । संतोषवीत‡ जगत्रया ॥ १८५ ॥ वेणुनादें वेधी देवां । खेचरां भूचरां जलचरा जीवां । स्थावरां वनचरां सर्वां । भुलवी जेव्हां तनुनाळें ॥ ८६ ॥

मंदवायुरुपवात्यनुकूलं मानयन्मलयजस्पर्शेन ।
बंदिनस्तमुपदेवगणा ये वाद्यगीतबलिभिः परिवव्रुः ॥ २१ ॥

मलयज म्हणिजे मलयागर । तदुत्थें[1] शीतळ सुगंध समीर[2] । कृष्णासि भजे सम्मानपर । व्यजनाकार मृदुस्पर्शें ॥ ८७ ॥ अथवा मलयजदक्षिणपवन । कीं मलयज कृष्णाचें विलेपन । त्याच्या संस्पर्शें सम्मान↓ । ओपी समीरण सर्वत्र ॥ ८८ ॥ जेवीं बंदिजनांच्या पंक्ति । स्तवनीं तोषविती भूपती । तेवीं कृष्णाचीं यशें गाती । विशाळमति सिद्धगण ॥ ८९ ॥ गंधर्व किन्नर चारण सिद्ध । वाद्यगीत सुतालबद्ध । वटिका प्रास पद प्रबंध । वर्णिती शुद्ध हरिचरितें ॥ १९० ॥ ऐसे अनेक निर्जरगण ।§ सेवकत्वें करिती सेवन । तत्संगाचें अनुस्मरण । करी तनुमन संतप्त ॥ ९१ ॥ ऐशा वदती यशोदेप्रति । तंव अष्टांश उरला गभस्ती[3] । समीप कृष्ण आला म्हणती । अनुवादती तद्योगें ॥ ९२ ॥ त्या कृष्णाचें सदयपण । पथीं व्रजाप्रति आगमन । अनुगस्तवन[4] वेणुक्कणन । आनंदोन वधू कथिती ॥ ९३ ॥ धेनु स्मरोनि वत्सें शब्द । करिती पावोनि परमानंद । तेव्हां संतुष्ट गोपीवृंद । वर्णी मुकुंद तें ऐका ॥ ९४ ॥ जैसीं दोहनोन्मुख वासुरें । चळवळ करितीं उत्साहभरें । कीं दोहनकाळीं प्रेमादरें । होती तत्परें विडालें ॥ १९५ ॥ तैसीं गोपींचीं अंतरें । कृष्णागमनीं स्नेहसुभरें । होऊनि ठाती कृष्णाकारें । वाग्व्यापारें ते वदती ॥ ९६ ॥

---

**पाठभेद :** — * उत्सहकर ( उ. ). † मोहनकर ( उ. ). ‖ ओवी क्र. ८३ व ८४ यांचा क्रम उ. प्रतींत उलट आहे. ‡ संतोषित ( उ. ). ↓ सन्मान ( उ. ). § करिति कृष्णाचें पूजन । वर्षति दिव्य प्रसून घन । तो तव नंदन यशोदे ॥ १९१ ॥ गंधवाहादि गंधर्वगण ।.........( मुं. व उ. ).

१ तेथें म्हणजे मलयपर्वतावर उत्पन्न झालेला. २ वायु. ३ सूर्य. ४ सेवकांनीं केलेली स्तुति.

वत्सलो व्रजगवां यदगध्रो वंद्यमानचरणः पथिवृद्धैः ।
कृत्स्नगोधनमुपोह्य दिनांते गीतवेणुरनुगेडितकीर्तिः ॥ २२ ॥

गोपी म्हणती अवो बाई । कृष्णवात्सल्य सांगों काई । व्रजीं वत्सें जियें बांधिलीं गेहीं । स्मरे त्यांतेंही हृत्कमळीं ॥ ९७ ॥ व्रजवासी जे निजरत जन । विषयीं विमुख तद्गोगण । त्यांसि करावया उपबृंहण । वत्सल पूर्ण हितकर्ता ॥ ९८ ॥ वेदाज्ञेच्या सुदृढ दोरें । कर्मखुंटा जीं बांधिलीं ढोरें । तच्छ्रमहरणार्थ श्रीधरें । करुणाभरें द्रवोनी ॥ ९९ ॥ पूर्ण परामर्ष केला सजणी । यालागिं परतोनि अस्तमानीं । आमुची जाणूनि हृदयग्लानि । चक्रपाणी येतसे ॥ २०० ॥ स्मरसंतप्त गोपीजन । मरतां मद्विरहें आहळोन । ऐसिये करुणे कळवळून । जाणा श्रीकृष्ण परतला ॥ १ ॥ कृष्णहृदय गे सदय कैसें । प्रेमळांचें या परम पिसें । तोषतयांच्या संतोषें । द्रवे मानसें तद्दुःखें ॥ २ ॥ काळिय मथूनि कृष्ण आला । भेटोनि व्रजजन सुखी केला । तैं रात्रीं जळता वणवा प्याला । स्वजन रक्षिला कारुण्यें ॥ ३ ॥ यज्ञार्थ करवी पशूंचें हनन । तेणें पावे तोष गहन । मग याज्ञिकां होय प्रसन्न । ऐसा निर्घृण जो मघवा॑ ॥ ४ ॥ कृष्ण केवळ पशुरक्षक । मघवा जाणोनि पशुहिंसक । कृष्णें वर्जिला त्याचा मख । स्मरोनि दुःख तो क्षोभे ॥ २०५ ॥ प्रळयमेघ शिळाधारीं । पडतां कृपाळु श्रीहरि । गोकुळावरी धरिला गिरि । सप्तरात्रीं निजहस्तें ॥ ६ ॥ क्षणें जाचती स्वकीय जन । म्हणोनि धरी जो गोवर्धन । तो येतसे जाणोनि शीण । गोपीगोगणतोषार्थ ॥ ७ ॥ सदय अगध्रे॑ श्रीहरि । परतला स्वजनार्थ झडकरी । परंतु मार्गीं नमस्कारीं । वृद्धीं सुरवरीं गोविला ॥ ८ ॥ शिवविरिंचिशक्रादिक । वृद्ध मुनिवर नारदप्रमुख । मार्गीं नमनाचें करिती अटक । चालों निष्टंक न लाहे ॥ ९ ॥ म्हणाल गोविला नमस्कारीं । तैं गोधनें कोण सांवरी । तरी जो त्रिजगातें मोहरी । स्वयें मोहरी वाजवुनी ॥ २१० ॥ जाणोनि दिवसाचें अवसान । गोधनाचा समूह पूर्ण । मुरलीरवें गोळा करून । मग व्रजभुवन प्रवेशे ॥ ११ ॥ तो हा प्रवेशकाळींचा गजर । वेणुगायन मनोहर । कीर्ति वर्णिती अनुचर । छंदें सुस्वरें हरिचरितें ॥ १२ ॥ लहानें बालक* जेंवि राहणीं । बसविती मुद्रा लावुनी । मग तीं देहभाना विसरोनी । वदती काहणी भूतभावी ॥ १३ ॥ तैशा विसरोनि देहस्मृति । गोपवनिता यशोदेप्रति । देवकीजठरींचा चंद्र श्रीपति । म्हणोनि वदती बरळत्वें ॥ १४ ॥ कीं देवकीजठरोद्भव शशी । तो बलराम गोपवेशी । म्हणोनि वदती यशोदेपासी । उत्साहेंसी व्रजललना ॥ २१५ ॥

उत्सवं श्रमरुचाऽपि दृशीनामुन्नयन्खुररजश्छुरितस्रक् ।
दित्सयैति सुहृदाशिष एष देवकीजठरभूरुडुराजः ॥ २३ ॥

देवकीजठरींचा निशारमण । तो हा सकृष्ण§ संकर्षण । श्रमार्त्त कांतिही करून । करिती

**पाठभेद :—** * बाळें ( उ. ). § श्रीकृष्ण ( मुं. )

१ वृद्धि. २ इंद्र. ३ अग म्हणजे पर्वत जो गोवर्धन त्याला धरणारा. ४ चंद्र. ५ कृष्णासाहित. ६ श्रमयुक्त

कारुण्यें कटाक्षें ॥ १६ ॥ गोपींसहित स्निग्ध जन । त्यांचे उत्साहवंत नयन । श्रमित कांतिहीं करून । तोषवी नयन पहात्यांचे ॥ १७ ॥ गोरजधूसर सकुंतला । हास्ययुक्ता वदनकमला । धूसर कंठींच्या वनमाला । घनसांवळा शोभवी ॥ १८ ॥ आम्हां सुहृदां जो प्रियतमा । करित कृपेची पूर्णिमा । मोहरे चकोरां चंद्रमा । तेवीं परमात्मा येतसे ॥ १९ ॥ मनोरथ करावया आमुचे पूर्ण । संतप्त जाणोनि विरहिणीगण । येतसे श्रीकृष्ण सर्वज्ञ । श्रमापहरण करावया ॥ २२० ॥ तंव अतिसमीप आलिया कृष्णा । संभ्रमें उताविळया वदती आना । श्रीकृष्णाच्या सुंदर ध्याना । सदयचिह्नांसमवेत ॥ २१ ॥

मदविघूर्णितलोचन ईषन्मानदः स्वसुहृदां वनमाली । बदरपांडुवदनो मृदुगंडं मंडयन्कनककुंडललक्ष्म्या ॥ २४ ॥

ईषत्तारुण्याची छाया । तया मिरवी कैशोरवया[1] । मदघूर्णितां[2] लोचनाचिया । प्रांतांमाजी उमटली ॥ २२ ॥ जैसें अल्पपक्व बोर । तैसें वदनपंकज गोर । हो कां संकर्षण श्रीधर । बदरपांडुर[3] लावण्यें ॥ २३ ॥ म्हणाल सुनील कृष्णवदन । बदरपांडुर हे उपमा गौण । सरुक्मणिकुंडलभा[4] पूर्ण । गंडमंडन शशितुल्य ॥ २४ ॥ पाच ठेवितां शुभ्रवस्त्रीं । हिरवी प्रभा भासे नेत्रीं । तेवीं रत्नकुंडल-लक्ष्मी वक्त्रीं । बदरपांडुर प्रकाशे ॥ २२५ ॥ ईषत्पक्व तें लाहतां बोर । हिरवें टळटळित उद्दाम रुचिर । तैसे कुंडलप्रभाभासुर । बदरपांडुर मृदुगंड ॥ २६ ॥ ऐसें मिरवी वदनारविंद । जो स्वसुहृदां लागीं मानद । वनमाळाधर श्रीमुकुंद । आनंदकंद यदुवर्य ॥ २७ ॥

यदुपतिर्द्विरदराजविहारो यामिनीपतिरिवैष दिनांते ।
मुदितवक्त्र उपयाति दुरंतं मोचयन्व्रजगवां दिनतापम् ॥ २५ ॥

यशोदेपासीं गोपवनिता । यदुपति म्हणती कृष्णनाथा । तेथ संकर्षणप्रमुखता । देवकी-सुतादि वाक्यार्थी ॥ २८ ॥ अथवा गर्गवाक्यावरून । पूर्वी वसुदेवसुत श्रीकृष्ण । यास्तव यदुपति म्हणून । कथिती वधूगण यशोदे ॥ २९ ॥ कीं व्रजवनिता या सुरांगना । जाणती मूळींच्या विधिवरदाना । यास्तव यदुपति म्हणती कृष्णा । संकल्पसंज्ञा जाणोनी ॥ २३० ॥ गजेंद्रलीला-लक्षण जें जें । तो द्विरदराजविहार[5] म्हणिजे । तैसें क्रीडिजे यदुराजें । व्रजीं सांजे* प्रवेशतां ॥ ३१ ॥ पूर्णिमेचा यामिनीपति । चकोरकुमुदादिकांची आर्ति । भंगोनि जेंवि दे‡ विश्रांति‡ । स्वयें दिनांतीं† प्रकटूनी ॥† ३२ ॥ तेवीं गोगोपींची§ आर्ति । दुरंत[6] भाविली तिहीं जे चित्तीं । करित होतसातां तद्विमुक्ति । ये यदुपति शशिवदन ॥ ३३ ॥ पैल समीप आला हरि । वदनचंद्रींच्या अमृतधारीं । अपांगमोक्षणें त्रिताप हरी । स्वानंदलहरी दे आम्हां ॥ ३४ ॥ कृष्णवियोगविरहें दुःख । युगासमान

---

पाठभेद :— * साजे ( उ. ). ‡ दिनपति ( मुं. ). † दिवसांतीं त्या दावी ( मुं. ). § गोपींची ( मुं. ).

१ बाल्यस्थितीला. २ मदाच्या योगानें धुंद. ३ बोराप्रमाणें पांढरा वर्ण ज्याचा. ४ सुवर्णयुक्त रत्नकुंडलांची कांति. ५ गजराजलीला. ६ नाशरहित.

वाटे निमेख। दुरंत म्हणणें यास्तव देख। कीं जो निष्टंक अनंत ॥ २३५ ॥ एके श्रीकृष्णप्राप्तीविण। करितां कोटिसाधनीं शीण। नोहे दुःखाब्धिलंघन। यास्तव गहन दुरंत ॥ ३६ ॥ ऐसा दुःखाब्धि दुरत्यय। निरसी कृपाळु देवकीतनय। करूनि स्वमुखचंद्रोदय। वधूसमुदाय तोषविती ॥ ३७ ॥ श्रीशुक व्यासाचा औरस। सावध करूनि कुरुनरेश। गोपिकांचा प्रेमोत्कर्ष। उपसंहरी तें ऐका ॥ ३८ ॥

श्रीशुक उवाच :— एवं व्रजस्त्रियो राजन्कृष्णलीलानुगायतीः।
रेमिरेऽहःसु तच्चित्तास्तन्मनस्का महोदयाः ॥ २६ ॥

शुक म्हणे गा नृपोत्तमा। गोपिकांचा भाग्यमहिमा। वर्णूं न शके शतपथ ब्रह्मा। भुजंगमा¹-समवेत ॥ ३९ ॥ कृष्णीं जडावया प्रेम। मुनिवर करिती साधनश्रम। परि तें विधिहरां दुर्गम। कीं रजतमव्याप्तत्वें ॥ २४० ॥ विशुद्धसत्त्वात्मक गोपिका। म्हणोनि कृष्णीं प्रेमा निका। कृष्णवियोगें तन्मनस्का। बाह्यविवेका विसरल्या ॥ ४१ ॥ कृष्णरूप अंतःकरण। कीं स्तिमितत्वें भोगिती कृष्ण। कृष्णमयचि ज्यांचें मन। करिती ध्यान संकल्पें ॥ ४२ ॥ कृष्णनिश्चयें व्यवसितबुद्धि। म्हणोनि निरसल्या§ भवोपाधि। कृष्णानुसंधानात्मकसिद्धि। जे कृष्णीं समाधि नित्यत्वें ॥ ४३ ॥ कृष्णीं रमला अहंभाव। विरहकातरा तोचि ठाव। जारप्रेमाचें लाघव। कृष्णीं सर्व समविषम ॥ ४४ ॥ हांसणें रुसणें उदास होणें। उपकृति कारुण्य स्नेह स्मरणें। स्वानुभूतरति चिंतणें। हें जारलक्षणें कृष्णेंसीं ॥ २४५ ॥ एवं कृष्णीं अहंकार। ज्यांचा सर्वस्वें कृष्णपर। सर्वेंद्रियांचे व्यापार। कृष्णाकार सर्वदा ॥ ४६ ॥ कृष्ण व्यभिचारी अव्यभिचारा। कीं सर्वस्वें कृष्णपरा। कृष्णावेगळा न घेती वारा। येरां पामरां कुणपांचा² ॥ ४७ ॥ कृष्ण चैतन्य सर्वगत। कृष्णावेगळें अवघें प्रेत। यालागीं गोपिका कृष्णीं निरत। झाल्या विरत गुणभूतां³ ॥ ४८ ॥ विरहदुःखादि माजि गोपी। ऐशा सप्रेम कृष्णरूपीं। कृष्णगुणांच्या कीर्तनजल्पीं। भवविकल्पीं विमुक्ता ॥ ४९ ॥ केवढें आश्चर्य कौरवराजा। हरिवियोगीं बल्लवभाजा। गुणकीर्तनें गरुडध्वजा। भजल्या ओजा दुःखार्ता ॥ २५० ॥ म्हणोनि यांचा भाग्योदय। अमरेंद्राहोनि वरिष्ठ होय। विधिहर ज्याचे न लाहती पाय। तो अनपायें⁴ ज्यां साध्य ॥ ५१ ॥ ऐशा हरिविरहें वेल्हाळा। रजनीभुक्ता बल्लवबाळा। भोगिती दिवसाही घननीळा। तद्गुणलीला वर्णूनियां ॥ ५२ ॥ एवं रासरसामृत गोड। गोपिकांचा सुखसुरवाड⁵। भंगितां दुष्ट शंखचूड। केला दुखंड श्रीकृष्णें ॥ ५३ ॥ मग गोपींचा हर्षोत्कृष्ट।

पाठभेद :— § विसरल्या ( मुं. ).

१ शेषासहित. २ प्रेतांचा. ३ त्रिगुणात्मक वस्तूचे ठायीं. ४ अनायासेकरून. ५ सुखाचा सुकाळ.

असाध्य मानूनि करितां अरिष्ट । कृष्णें भंगिला तो अरिष्ट । अध्याय प्रगट यावरी तो ॥ ५४ ॥ तें हें श्रीमद्भागवत । अठरा सहस्र व्यासकृत । परमहंसप्रिय वेदांत । सुनिश्चित भक्तितत्त्वें ॥ २५५ ॥ त्यामाजिल स्कंध दशम । श्रीकृष्णाचें जन्मकर्म । शुकपरीक्षितिसंवाद परम । अध्याय उत्तम* पंचतिसावा ॥ ५६ ॥ एका जनार्दनान्वयप्रवर । गोविंदसद्गुरूचा किंकर । कृष्णदयार्णव श्रवणीं सादर । मागे अवसर श्रोतयां ॥ २५७ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्त्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां युग्मगीत-कथनं नाम पंचत्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३५ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक २६ ॥ टीका ओव्या २५७ । एवं संख्या ॥ २८३ ॥ ( पस्तिसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १६६३२ ).

पस्तिसावा अध्याय समाप्त.

पाठभेद :— * परम ( उ. ).

कृष्णदयार्णवकृत

# ह रि व र दा

## अध्याय ३६ वा

श्रीकृष्णसच्चिदानंदाय नमः । वेधी पदाब्जसाधकभ्रमरां । श्रीमुखमयंकध्यातृचकोरां[1] । प्रबोधसुधाघनमुमुक्षुनिकरां । चातकां मोरां नाचवी ॥ १ ॥ शमदमादि साधनकोटी । साधितां वैराग्यहातवटी । सायुज्यपदाचियेही मुकुटीं । श्रीपादप्रेमा जोडिला ॥ २ ॥ तेचि साधक श्रीपादकमळा । वांचूनि नेच्छिती सुकृतफळा । येरां प्राकृतां दुर्बळां । प्रेमजिव्हाळा दुर्लभ ॥ ३ ॥ भ्रमरा पद्मेशीं साजणें । कीं सलिलाविण मीना न जिणें । तेंवि पदाब्जसेवनेंविण । विभवें आनें दुःखद ॥ ४ ॥ हा निसर्ग* प्रेमप्रद । तें स्वामीचें पादारविंद । जें वांछितां सुरवरवृंद । सुकृतमंद[2] न लाहती ॥ ५ ॥ ध्यानयोगें मनःसंकल्प । जिहीं अर्पिले कोटिकल्प । तेचि चकोर निर्विकल्प । वदनोडुप[3] प्राशिती ॥ ६ ॥ येरां द्विजां[4] वायसादिकां । अनोळखीच मुखमयंका । मा ते कोठूनि तत्पीयूखा । सेवनसुखा वेधती ॥ ७ ॥ यालागिं अनेकजन्मवरी । ध्यानयोगाची सामग्री । जिहीं साधूनि घेतली पदरीं । ते तव वक्त्रीं वेधती ॥ ८ ॥ स्वप्नभ्रमाचा विक्षेप । मोडूनि सुषुप्ति करी लोप । तो मार्तंड गगनदीप । जागृदवस्थाबोधक† ॥ ९ ॥ परि तो अबोधाचि बोध । प्रवृत्ति बोधूनि करी बद्ध । केवळ विषयासक्ती विरुद्ध । तेचि प्रसिद्ध प्रकाशी ॥ १० ॥ जागृतिबोधें समस्त प्राणी । प्रवर्तती विषयाचरणीं । तेणें पडती भवभ्रमणीं । गर्भजांचणीमाजिवडे ॥ ११ ॥ देखूनि क्षुधेची जांचणी । रसना रसाच्या गवेषणीं । पडोनि भ्रमे संसारवनीं । नानायत्नीं रसलोभें ॥ १२ ॥ मग ते रसप्राप्तीसाठीं । ज्ञानवयाची सोडूनि गांठीं । बुद्धि धांवडी बारा वाटीं । महादुर्घटीं श्रम पावे ॥ १३ ॥ क्षणैक होतां जठरपूर्ति । तंव घ्राण अपेक्षी उत्तम द्दती । नेत्र लावण्यरूपा

---

पाठभेद :— * नैसर्ग ( उ. ). † जाग्रदावस्था ( उ. ).

१ मुखचंद्राचें ध्यान करणाऱ्या चकोरांना. २ ज्यांचें पुण्य कमी ते. ३ मुखचंद्र. ४ पक्ष्यांना.

स्फुरती । त्वगिच्छारति मृदुस्पर्शी ॥ १४ ॥ गायनास्तव स्फुरती श्रवण । अभीष्टवैभव वांछी मन । जागृतिबोधें हें भवभान । जन्ममरणप्रद होय ॥ १५ ॥ म्हणाल वदनें शास्त्रपठन । नयनें अक्षर-परिज्ञान । श्रवणें श्रुत्यर्थावधारण । कां भवतरण न करी हो* ॥ १६ ॥ तरी शास्त्रें पढोनि लोकांपुढें । खोलेती दीनत्वें बापुडे । ज्ञान विकिती जठरचाडे । कैंवि निवाडे ते तरती ॥ १७ ॥ अपसव्यादि पिशाचलिपी । अनेक विद्या अक्षरजल्पीं । नीचसेवनें महत्त्व कल्पी । तो निष्पापी कैं होय ॥ १८ ॥ करूनि श्रुत्यर्थावधारणा । जठरार्थ वाखाणी पुराणा । अनेक देश कटकें नाना । जठरतर्पणा लागिं श्रमे ॥ १९ ॥ एवं बोध जो प्रवृत्तिपर । तयाचि नाम भव दुस्तर । प्रकर्षेंकरूनि आत्मविचार । प्रबोधक चतुर यास्तव तूं ॥ २० ॥ विषयनिष्ठा सोडवावया । अदृष्ट फळ बोधिसी तयां । देहात्म-बुद्धि नेसी लया । आणूनि उदया जीवदशा ॥ २१ ॥ मग ते जीवात्मबुद्धीकरून । इहामुत्रार्थ भोगभान । साच मानूनि कर्माचरण । फलाशा धरून विचंबिती ॥ २२ ॥ ऐसिया जीवात्म-बुद्धिमंतां । वास्तव बोधूनि चिदात्मकता । त्रिविध बंधमोक्षकर्त्ता । तूं तत्त्वता† चित्सूर्य ॥ २३ ॥ यालागिं वास्तव प्रबोधन । कर्त्ता तो तूं प्रबोधघन । शुद्धाधिकारी चातकगण । स्वमुखें गर्जोन तोषविसी ॥ २४ ॥ गोशब्दें जे तव चित्किरण । जिहीं प्रबोधिसी सज्जन । यालागिं गोविंद हें अभिधान । गोवित्तृत्वें तुज शोभे ॥ २५ ॥ जैसा गोमंतं अंशुमाळी । स्वतेजें प्रकट असतां जवळी । नेणती विमुखें कां आंधळीं । तेंवि हृत्कमळीं तुज नेणो ॥ २६ ॥ प्रबोधामृतें ऐसिया जडा । मज मुरडूनि आपणाकडा । दाविलें सच्चित्सुखउजिवडा । नेत्रीं उघडा नांदोनी ॥ २७ ॥ पुन्हा स्वगुण वर्णवा-वया । स्वसत्ता अधिष्ठूनि मम हृदया । भाषाव्याख्यान विवरावया । दशमस्कंधीं नियोजिलें§ ॥ २८ ॥ तेथ श्रीमत्सत्तायोगें । पंचतीस अध्याय संपले मागें । पुढें यथानुक्रमप्रसंगें । छत्तिसावा आदरिला ॥ २९ ॥ तेथ पंचतिसाव्या अध्यायांतीं । कृष्णलीला वर्णितां युवति । सायंकाळीं व्रजाप्रति । येतां श्रीपति हरिखेल्या ॥ ३० ॥ व्रजासन्निध श्रीभगवान । सहित वयस्य संकर्षण । वेणुवादनें संगीतगान । येतां गोगणपुरस्कृत ॥ ३१ ॥ सुरवर वर्षती दिव्यसुमनीं । दुंदुभींचे विजयध्वनि । गंधर्व गाती तानमानीं । मंगलस्वनीं हरिचरितें ॥ ३२ ॥ अप्सरा नर्त्तकी नृत्य करिती । गोपाळ आनंदें नाचती । हर्षें पाहों धांविल्या युवति । न साहे दुर्मति अरिष्ट ॥ ३३ ॥ ऐसा आनंदभरित हरि । देखोनि प्रवेशतां व्रजपुरीं । आरिष्टासुर आरिष्ट करी । तें यावरी अवधारा ॥ ३४ ॥ शुक म्हणे गा परमपवित्रा । कुरुनरेंद्र गौरवगात्रा । विचित्रवीर्याच्या प्रपौत्रपुत्रा । परिसें सत्पात्रा परीक्षिति ॥ ३५ ॥

श्रीशुक उवाच :— अथ तर्ह्यागतो गोष्ठमरिष्टो वृषभासुरः । महीं महाककुत्कायः कंपयन्खुरविक्षताम् ॥ १ ॥

सुरवर व्रजपुर सचराचर । कृष्णागमनें तोषनिर्भर । जाले असतां त्यानंतर । देखोनि असुर क्षोभला ॥ ३६ ॥ वृषभासुर तो अरिष्टनामा । लोकत्रयाच्या मंगलधामा । क्षोभला देखोनि

---

पाठभेद :— * हे ( उ. ). † सर्वथा ( उ. ). § निरोपिलें ( उ. ).

१ स्पष्ट करिती. २ श्रम करितात. ३ सूर्य.

पुरुषोत्तमा । दुष्ट दुरात्मा दुर्वीर्य ॥ ३७ ॥ म्लेच्छ विप्रांची मंडळी । कीं धर्माचरणा न साहे कळी । तैसा देखोनि श्रीवनमाळी । अरिष्ट ते काळीं क्षोभला ॥ ३८ ॥ याच्या क्षोभाचें लक्षण । देहाकृति प्रताप गहन । साडेतीं श्लोकीं विवरण । व्यासनंदन निरूपी ॥ ३९ ॥ व्रजासन्मुख येतां हरि । पृष्ठीं घालूनियां व्रजपुरी । अरिष्ट धांवे कृष्णावरी । खुरीं धरित्री विदारित ॥ ४० ॥ महान म्हणिजे विशाळ काय । स्थूळ वोसंडे[1] पर्वतप्राय । खुरक्षतांचे वोपूनि घाय । धरा कंपायमान करी ॥ ४१ ॥

रंभमाणः खरतरं पदा च विलिखन्महीम् । उद्यम्य पुच्छं वप्राणि विषाणाग्रेण चोद्धरन् ॥ २ ॥

भयानक रंभमाणें[2] । म्हणिजे वृषभशब्दें गर्जना करणें । मदोन्मत्त डरक्या देणें । त्रासती जेणें सिंह व्याघ्र ॥ ४२ ॥ चरणघातें धरा उकरी । ते भू मानी वज्रापरी । शृंगीं उलथोनि टाकी गिरि । प्रळय व्रजपुरीं मांडिला ॥ ४३ ॥ वोसंडपर्यंत वाहूनि पुच्छ । थडके दिग्गज मानी तुच्छ । विषाणाग्रीं उच्च उच्च । पर्वत उलथोनि टाकीतसे ॥ ४४ ॥ ग्राम दुर्गें यमुनादरडी । शृंगें रोवूनि मस्तकें खरडी । भयें जनाची पडली भरडी । वळती वेंगडी करचरणां ॥ ४५ ॥

किंचित्किंचिच्छकृन्मुंचन्मूत्रयंस्तब्धलोचनः । यस्य निर्ह्रादितेनांग निष्ठुरेण गवां नृणाम् ॥
पतंत्यकालतो गर्भाः स्रवंति स्म भयेन वै ॥ ३ ॥

उन्मत्तवृषभचेष्टा कुटिळ । किंचित् किंचित् टाकी मळ । मळासरिसें मूत्रजळ । वारंवार विसर्जी ॥ ४६ ॥ मदघूर्णित नेत्रपातीं । स्तब्ध म्हणिजे न हालती । सरोख पाहतां मूर्छित होती । मनुष्ययाति पशवादि ॥ ४७ ॥ ज्याची गर्जना[3] ऐकोनि कानीं । गाई आणि व्रजकामिनी । गर्भ टाकिती पैं दचकोनी । प्राणहानि कितियेकां ॥ ४८ ॥ कितियेकींचे गर्भपात । गर्भस्रावही जाले बहुत । पात स्राव या दोहीं आंत । भेद काय तो अवधारा ॥ ४९ ॥ चतुर्थमासवरी गर्भ पडती । स्राव बोलिजे तया प्रति । पंचमीं षष्ठीं पात म्हणती । सप्तादि प्रसूति म्हणावी ॥ ५० ॥ पूर्ण न भरतां गर्भमान । ऐकोनि अरिष्टासुरनर्दनें[3] । गोअंगनांचें गर्भपतन । होय दचकोनि अकाळीं ॥५१॥ शेळ्या मेंढ्या गाई महिषी । अश्विनी[4] आणि स्त्रिया मानुषी । गर्भ टाकिती भयासरिसी । दाही दिशीं आक्रांत ॥ ५२ ॥

निर्विशंति घना यस्य ककुद्यचलशंकया । तं तीक्ष्णशृंगमुद्वीक्ष्य गोप्या गोपाश्च तत्रसुः ॥ ४ ॥

त्याचे* वोसंडप्रांतीं घन । रिघती पर्वतभावनेकरून । तीक्ष्णशृंगाग्रें देखोन । गोपगोपीगण†

पाठभेदः— * ज्याचे ( उ. ). † गोपगोपीजन ( उ. ).
१ कोळें, वशिंड. २ डुरकणें. ३ –गर्जना. ४ घोडी.

त्रासले ॥ ५३ ॥ उग्र भयंकर शृंगाग्रासी । देखोनि कांपती व्रजनिवासी । गोधनें बुजालीं गोकुळासी । सोडूनि चौपासीं विखुरलीं ॥ ५४ ॥

पशवो दुद्रुवुर्भीता राजन्संत्यज्य गोकुलम् । कृष्ण कृष्णेति ते सर्वे गोविंदं शरणं ययुः ॥ ५ ॥

अद्भुत नृपाचिये कर्णीं । विस्मयें सांगे बादरायणि । धेनु सांडूनि वत्सें तान्हीं । भरल्या रानीं संत्रासें ॥ ५५ ॥ धेनु महिष्यादि* वासुरें । व्रजीं होतीं जीं लघुतरें । त्यांतें सांडूनि बुजालीं ढोरें । भरलीं कांतारें प्राणभयें ॥ ५६ ॥ तस्मात् आपणाहूनि प्रिय । नाहीं ऐसा अभिप्राय । नृपा बोधूनि व्यासतनय । कथान्वय निरूपी ॥ ५७ ॥ ऐसा देखोनि दुष्ट अरिष्ट । सर्वीं मानूनि परम अरिष्ट । म्हणती कृष्णा निरसीं कष्ट । भयें उद्भट[१] त्रासलों ॥ ५८ ॥ कृष्ण कृष्णेति कृष्णेति । म्हणोनि येती काकुळती । श्रीगोविंदा गोकुळपति । शरण तुजप्रति रिघालों ॥ ५९ ॥ तूंचि संकटीं संरक्षिता । तूंचि आमुचा प्राणदाता । तूंचि भयाचा उपहर्ता† । दुष्टनिहंता दैत्यारि ॥ ६० ॥ मेघ वर्षतां शिळाधारीं । तुवां गोवर्धन धरिला करीं । व्रज रक्षिलें सप्तरात्रीं । तूं कैवारी आमुचा ॥ ६१ ॥ वरुणापासूनि आणिला नंद । अजगरें गिळितां प्राणप्रद । व्रजजनाचा जीवनकंद । तो तूं मुकुंद भयहर्ता ॥ ६२ ॥ ऐसें आपुलालिया वाणी । कृष्ण स्मरती समस्त प्राणी । हें जाणोनि अभयदानी । निगमयोनि[३] प्रवर्त्तला ॥ ६३ ॥

भगवानपि तद्वीक्ष्य गोकुलं भयविद्रुतम् । मा भैष्टेति गिराश्वास्य वृषासुरमुपाह्वयत् ॥ ६ ॥

ऐसे व्रजजन कृष्णा शरण । देखोनि कृष्णें ही संत्रस्तजन । गोकुळ भयभीत जाणून । अभय देवोन आश्वासी ॥ ६४ ॥ पळतां देखोन गोकुळासी । भिऊं नका हो म्हणे त्यांसी । मी असतां हृषीकेशी । कृतांतासी त्रासीन ॥ ६५ ॥ अरिष्टा उदेलें परमारिष्ट । म्हणोन प्रवेशला हा गोष्ठ । निमेषामाजी करीन पिष्ट । भोगील कष्ट कृतकर्में ॥ ६६ ॥ ऐसे व्रजजन आश्वासोन । अरिष्टा सम्मुख§ श्रीभगवान । करिता झाला आवाहन[४] । गिरा गर्जोन सांटोपें[५] ॥ ६७ ॥

गोपालैः पशुभिर्मंद त्रासितैः किमसत्तम । बलदर्पहाऽहं दुष्टानां त्वद्विधानां दुरात्मनाम् ॥ ७ ॥

दुष्टांमाजी परम श्रेष्ठा । मूर्खा मंदमति अरिष्टा । गाईगोपांसीं कुचेष्टा । वृथा पुष्टा कां करिसी ॥ ६८ ॥ गाई गोपां संत्रासूनी । कोण पुरुषार्थ इच्छिला मनीं । तुजसारिख्या दुष्टदमनीं । चक्रपाणि मी सिद्ध ॥ ६९ ॥ दुष्टबळाचा निहंर्ता[६] । दुर्जनाचा दर्पहंर्ता[७] । दुरात्मयाची दुष्ट अहंता । मी संहर्ता श्रीकृष्ण ॥ ७० ॥ मज नेणोनि गोपगाई । त्रासितां लज्जा न वाटे कांहीं । पुरुषार्थ वाहसी आपुले

---

**पाठभेद :—** * म्हैषादि ( उ. ). † उपसंहर्ता ( उ. ). § सन्मुख ( उ. ).

१ भयानें. २ अतिशय. ३ वेदांचें उत्पत्तिस्थान. ४ आव्हान. ५ आवेशानें. ६ नाश करणारा. ७ गर्वनाशक.

ठायीं । तरी सत्वर येई सामोरा ॥ ७१ ॥ मी दुष्टांचा दमनकर्ता । तूं वाहसी दुष्ट अहंता । मजसी गांठी पडली आतां । कोण रक्षिता तुजलागीं ॥ ७२ ॥

इत्यास्फोट्याच्युतोऽरिष्टं तलशब्देन कोपयन् । सख्युरंसे भुजाभोगं प्रसार्यावस्थितो हरिः ॥ ८ ॥

ऐसें बोलोनि कैटभारि[1] । डावा बाहु उजव्या करीं । ठोकूनि आवेश प्रदीप्त करी । दुष्टा-अंतरीं तलशब्दें[2] ॥ ७३ ॥ तलशब्द तो बाहुध्वनि । तेणें करूनि अरिष्टमनीं । क्षोभ उपजवी जगद्योनि[3] । समरांगणीं साटोपें ॥ ७४ ॥ सलंब बाहु भुजगापरी । संवगडियाच्या स्कंधावरी । पसरूनि उभा निर्भय हरि । दुराचारिहननार्थ ॥ ७५ ॥ स्वयें अच्युत जो अविनाश । करावया अरिष्टनाश । उभा राहिला सावकाश । त्रिजगा तोष यश गातां ॥ ७६ ॥

सोऽप्येवं कोपितोऽरिष्टः खुरेणावनिमुल्लिखन् । उद्यत्पुच्छभ्रमन्मेघः क्रुद्धः कृष्णमुपाद्रवत् ॥ ९ ॥

ऐसा क्षोभवितां अरिष्ट । तोही जात्या दैत्य दुष्ट । बळें क्षोभोनि उद्भट । झाला नीट समरंगीं ॥ ७७ ॥ खुरें उकरी अवनीतळ । पुच्छें विध्वंसी घनमंडळ । कृष्णावरी धांविला प्रबळ । यंत्रगोळ[4] पैं जैसा ॥ ७८ ॥ क्रोधें क्षुब्ध जैसा भुजंग । कीं अनावर मार्गणवेग[5] । तैसा धांविला अतिसवेग । कमलारंग लक्षूनी ॥ ७९ ॥

अग्रन्यस्तविषाणाग्रः स्तब्धासृग्लोचनोऽच्युतम् । कटाक्षिप्याद्रवत्तूर्णमिंद्रमुक्तोऽशनिर्यथा ॥ १० ॥

तीक्ष्ण शृंगाग्रें पैं दोन्ही । पुढें धरूनि शस्त्रस्थानीं । आरक्त लोचनें ज्वलित वह्नि । स्तब्ध पक्ष्मणी[6] न हालती ॥ ८० ॥ क्रूर कटाक्षें वक्रदृष्टी । श्रीकृष्णाची अंगयष्टि । लक्षूनि धांवे दुष्ट हट्टी । अरिष्ट कपटी कुटिलात्मा[7] ॥ ८१ ॥ इंद्रें प्रेरिला जैसा अशनि[8] । वृत्रासुरावरी प्रज्वळोनी । कडकडाटें धांवे गगनीं । तैसा कृष्णीं संघटला ॥ ८२ ॥ केवळ क्रोधाब्धि अरिष्ट । क्षोभें लोटला अतिउद्भट । अगस्तितुल्य कंबुकंठ । उठिला घोंट भरावया ॥ ८३ ॥

गृहीत्वा शृंगयोस्तं वा अष्टादश पदानि सः । प्रत्यपोवाह भगवान्गजः प्रतिगजं यथा ॥ ११ ॥

वज्रकल्लोळ जैसा तुटे । तैसी मुसांडी आंगीं झगटे । यावा[9] सांवरूनि वैकुंठें । शृंगें बळकटें धरूनियां ॥ ८४ ॥ अरिष्ट झाडितां न सुटे वेगें । बळें लोटितां मेघरंगें[10] । अठरा पांड सारिला मागें । नागें[11] प्रतिनागें ज्यापरी ॥ ८५ ॥ अरिष्टातें क्षेपितां[12] हरि । उलथोनि पडिला पृथ्वीवरी । अठरा पांडपर्यंत दुरी । पुन्हा सांवरी तो आपणा ॥ ८६ ॥

---

१ कैटभदैत्याचा शत्रु. २ छड्ड ठोकण्यानें. ३ जगाचें उत्पत्तिस्थान. ४ तोफेचा गोळा. ५ बाणाचा जोर. ६ पापण्या. ७ दुष्ट बुद्धीचा. ८ वज्र. ९ वेग. १० कृष्णानें. ११ हत्ती. १२ लोटितां.

सोऽपविद्धो भगवता पुनरुत्थाय सत्वरः । आपतत्स्विन्नसर्वांगो निःश्वसन्क्रोधमूर्छितः ॥ १२ ॥

कृष्णें अरिष्ट निक्षेपितां । उलथोनि पडिला पृथ्वीवरुता । पुन्हा धरूनि क्रूर अहंता । जाला उठता सवेग ॥ ८७ ॥ आंगीं क्रोधाग्नि प्रज्वळला । श्वासासरिसा निघती ज्वाला । घामें सर्वांगीं डवडविला । सुस्नात झाला निर्वाणीं ॥ ८८ ॥ ऐसा सक्रोध कृष्णावरी । अरिष्ट पडला वज्रापरी । पडतां कृष्णें तो शृंगाग्रीं । धरूनि करीं मुरडिला ॥ ८९ ॥

तमापतंतं स निगृह्य शृंगयोः पदा समाक्रम्य निपात्य भूतले ।
निष्पीडयामास यथाऽर्द्रमंबरं कृत्वा विषाणेन जघान सोऽपतत् ॥ १३ ॥

शृंगें रगडोनि दोहीं करीं । लात मारिली कुक्षीवरी । उलथूनि पाडिला धरित्री । चरण-प्रहारीं दडपिला ॥ ९० ॥ दीर्घवस्त्र धुवोनि नारी । पायें दडपोनि पिळिती करीं । कृष्णें अरिष्ट तैसिया परी । पिळिला भूवरी दडपोनि ॥ ९१ ॥ रगडूनि पायें दडपिला मही । शृंगें पिळिलीं हातें दोहीं । उपटोनि हाता आलीं तेही । मग तद्घायीं[1] ताडिला ॥ ९२ ॥ निष्ठुर लागतां शृंगप्रहार । विकळ पडला अरिष्टासुर । यावरी प्राणप्रयाणपर । अन्य व्यापार विसरला ॥ ९३ ॥

असृग्वमन्मूत्रशकृत्समुत्सृजन्क्षिपंश्च पादाननवस्थितेक्षणः ।
जगाम कृच्छ्रं निर्ऋतेरथ क्षयं पुष्पैः किरंतो हरिमीडिरे सुराः ॥ १४ ॥

कंठ वाजतसे घडघडां । अशुद्ध[2] वमितसे भडभडां । पाय खोडितसे खडखडां । झाडी तडफडां सर्वांग ॥ ९४ ॥ तनुवैकल्यें[3] मूत्रलोंढे । गांडीवाटे पडती लेंडें । नेत्र फिरवी वांकडे वेंडे । पसरी जाभाडें क्षणक्षणा ॥९५॥ देहममता सहसा न सुटे । अहंता धरूनि देहीं वेठे[4] । यास्तव कष्ट होती मोठे । युगान्त वाटे तनुत्यागीं ॥ ९६ ॥ येक येके रोमरंध्रीं । वृश्चिकवेदना सहस्रवरी । तथापि अहंममता धरी । हांव पसरी वांचावया ॥ ९७ ॥ जितुकी ज्याची अहंता प्रबळ । तितुका दुःखद अंतकाळ । म्हणोनि अरिष्ट क्लेशबहळ । भोगी व्याकुळ प्राणांतीं ॥ ९८ ॥ विवेकसंपन्न निरहंकृति । अंतीं कृष्णस्मरण करिती । ते पावती सायुज्यमुक्ति । पुन्हा संसृति त्यां नाहीं ॥९९॥ त्या कृष्णाच्या हातें मरण । अरिष्ट पावला असतां जाण । परंतु प्रबळ देहाभिमान । न पवे निर्वाण यास्तव तो ॥ १०० ॥ देहांतूनि प्राण निघतां । अरिष्टें भोगिली क्रूर व्यथा । वारंवार देहाहंता । जाची तत्त्वता जीवातें ॥ १ ॥ जीवमात्र चैतन्यघन । परंतु अध्यस्त[5] देहाभिमान । तेणें भ्रमती प्राणिगण । जन्ममरणभवचक्रीं ॥ २ ॥ यास्तव कृष्णहस्तें हनन । जालें असतां क्लेश गहन । भोगूनि पावला मृत्युस्थान । हें व्याख्यान शुकें केलें ॥ ३ ॥ देहाहंता जंव जंव सुटे । तंव तंव क्लेशसमुद्र आटे । निःशेष आत्मत्वें जैं निवटे । तैं तो वेठे पूर्णत्वें ॥ ४ ॥ जेथ ज्ञानाचा अंकुर । तोचि नररूपें

१ त्या शृंगप्रहारांनीं. २ रक्त. ३ शरीराच्या दुर्बळतेमुळें. ४ वेष्टिला जातो. ५ भ्रमानें कल्पिलेला.

ईश्वर । ज्ञानविहीन पशु पामर । तो प्रत्यक्ष असुर वृषभात्मा ॥ १०५ ॥ कृच्छ्रं[1] जगाम ऐसें पद । तें हें वाखाणिलें विशद । यानंतरें तो दुर्मद । मृत्युपद* पावला ॥ ६ ॥ कृष्णहस्तें पावोनि मरण । आणि अरिष्टा मृत्युसदन । ऐसिये शंकेचें खंडन । हें व्याख्यान परिसतां ॥ ७ ॥ ऐसा अरिष्टासुराचा वध । केला श्रीकृष्णें† प्रसिद्ध । देखोनि किन्नर गंधर्व सिद्ध । समस्त विबुध[2] हरिखेले ॥ ८ ॥ जयजयकार दुंदुभिगजरीं । पुष्पवृष्टि करिती शिरीं । कीर्ति गाती सप्तस्वरीं । आणि अप्सरी नाचती ॥ ९ ॥ भारापैनयनें[3] धरादेवी । परमानंदें हृदयीं भावी । अरिष्टनाशें सर्वत्र सर्वी । सदयार्णवीं निमज्जिजे ॥ ११० ॥ संपलें अरिष्टासुराख्यान । येथूनि कंसासुरानुसंधान । गोविंदसद्गुरुवरदें वदन । दयार्णवाचें वदेल ॥ ११ ॥

एवं ककुद्मिनं हत्वा स्तूयमानः स्वजातिभिः । विवेश गोष्ठं सबलो गोपीनां नयनोत्सवः ॥ १५ ॥

ऐसिया प्रकारीं वृषभासुर । मर्दूनि यशस्वी श्रीधर । संकर्षणेंसी गोपभार । धेनुपुरःसर पातला ॥ १२ ॥ गोपीनयनां उत्सवरूप । संवगडे वर्णिती नवप्रताप । प्राचीन कीर्ति गाती पशुप । आल्हाद अमूप व्रजभुवनीं ॥ १३ ॥ ऐसा मर्दूनि अरिष्ट बळी । व्रजीं प्रवेशला वनमाळी । आनंद अमरांचे मंडळीं । दैत्यां काजळी उदेली ॥ १४ ॥ व्रजीं स्वच्छंदें मुकुंद । क्रीडत असतां आनंदकंद । कंसा भेटोनि नारद । करी अनुवादें[4] तो ऐका ॥ ११५ ॥

अरिष्टे निहते दैत्ये कृष्णेनाद्भुतकर्मणा । कंसायाथाऽह भगवान्नारदो देवदर्शनः ॥ १६ ॥

अद्भुतकर्म प्रकटूनि सृष्टि । कृष्णें मारिला अरिष्ट गोष्ठीं । यानंतरें नारद गोष्टी । सांगे श्रुतिपुटीं[5] कंसाचे ॥ १६ ॥ जिवलग विश्वासवंत चार[6] । परम सूक्ष्म समाचार । सांगे शत्रुकृत विचार । तैंवि मुनिवर कंसातें ॥ १७ ॥ पूर्वी ऐकोनि गगनवाणी । कंस प्रवर्त्तला देवकीहननीं । वसुदेवें तैं गर्भार्पणीं । भाष[7] देऊनि थांबविला ॥ १८ ॥ प्रथम गर्भ कीर्तिमंत । अर्पितां कंस करुणावंत । झाला देखोनि ब्रह्मसुतें[8] । सांगता वृत्तांत कंसातें ॥ १९ ॥ तैं मारिलें गर्भषट्क । वसुदेवदेवकीसि करूनि अटक । विध्वंसूनि यादवकटक । पिता निष्टंक निग्रहिला[9] ॥ १२० ॥ सप्तमगर्भपाताची बोली । अष्टम कन्या गगना गेली । कंसप्रज्ञा कुंठित झाली । काजळी धरिली मरणाची ॥ २१ ॥ पूतनादि प्रेरिले दूत । निष्फळ यत्न ते समस्त । यावरी कंस अंतरांत । होता विस्मित अनुपायें[10] ॥ २२ ॥ गगनवाणीची वृथा गोष्टी । कन्या जन्मली देवकीपोटीं । तेही गगनीं झाली पैठी[11] । भ्रामक चावटी जल्पोनी ॥ २३ ॥ शत्रु आहे अन्यस्थळीं । म्हणोनि प्रेरिले दैत्यबळी । तितुक्यांची ही झाली होळी । कोणे काळीं नुदैजे ॥ २४ ॥ एवं वृथाचि हें अवघें । होणार होवोनि

---

**पाठभेद :—** * मृत्युचें पद ( उ. ). † कृष्णें ( उ. ).

१ कष्टानें मृत्यु पावला. २ देव. ३ भार दूर झाल्यामुळें. ४ भाषण. ५ कानांत. ६ हेर, गुप्त बातमीदार. ७ वचन. ८ नारद. ९ कैद केला. १० निरुपायामुळें. ११ स्थिर.

गेलें मार्गे । साच असता तरी प्रसंगें । लौगवेगें तो येता ॥ १२५ ॥ ऐसें मानूनि कंसासुर । करूनि निश्चिंत अभ्यंतर । मृत्युचिंतेचा पडला विसर । यास्तव मुनिवर पुन्हा आला ॥ २६ ॥ दिव्य देवर्षि ब्राह्मण । यास्तव म्हणिजे देवदर्शन । भूत भविष्य वर्तमान । देवदर्शनाविदितत्वें ॥ २७ ॥ अथवा ब्रह्मादिसभास्थानीं । वृत्तांत देखिला ऐकिला कानीं । यालागीं देवदर्शनमुनि । शुक वाखाणी यथार्थ ॥ २८ ॥ त्या नारदें कंसापासी । येऊनि बोधिलें वृत्तांतासी । चिंता कंसाचे मानसीं । स्मरण देऊनि जागविली ॥ २९ ॥ काय कैसें दिधलें स्मरण । तें ऐकावें सावधान । जेणें क्षोभोनि कंसमन । करी प्रयत्न हरिहनना ॥ १३० ॥

यशोदायाः सुतां कन्यां देवक्याः कृष्णमेव च । रामं च रोहिणीपुत्रं वसुदेवेन बिभ्यता ।
न्यस्तौस्वमित्रे नंदे वै याभ्यां ते पुरुषा हताः ॥ १७ ॥

पूर्वीं नारदें वृत्तांत । सांगूनि आपुला कल्याणार्थ । वांछिला येऊनि परमगुप्त । यास्तव आप्त कंस मानी ॥ ३१ ॥ येतां देखोनि नारदासी । सम्मानूनि पूजिलें त्यासी । मग बैसोनि येकांतावासीं । मुनिवाक्यासी अवधारी ॥ ३२ ॥ नारद म्हणे गा भोजेंद्रा । आझूनि कायसा निदसुरा । सांगोनि गेलों त्या विचारा । कां प्रतिकारा न केलें ॥ ३३ ॥ कंसें कथिलें सविस्तर । स्वामी यत्न केला फार । परंतु अद्यापि गोचर । शत्रु साचार नाडळे ॥ ३४ ॥ देवकीसप्तमगर्भपात । आठवी कन्या झाली अद्भुत । मारितां गेली गगना आंत । मज चिंतेंत घालुनी ॥ १३५ ॥ अन्यस्थळीं आहे शत्रु । ऐसा बोलिली गूढमंत्रु । तदर्थ प्रेरिले महावीर । परी कोठें साचार नुमटे तो ॥ ३६ ॥ हें ऐकोनि नारदमुनि । वृत्तांत सांगे कंसाकानीं । कंस आप्तोक्ति मानूनी । सादर होऊनि अवधारी ॥ ३७ ॥ नारद म्हणे कंसराया । देवकीची जे म्हणसी तनया । ते यशोदा नंदजाया । तिचे जठरीं जन्मली ॥ ३८ ॥ देवकीचा अष्टम सुत । वसुदेवें तो नेऊनि गुप्त । यशोदेपाशीं ठेवूनि त्वरित । कन्या येथ आणिली ॥ ३९ ॥ ते त्वां वधितां गगना गेली । शत्रुवार्ता गूढ कथिली । ध्वनितार्थतत्वें तुज नुमजली । ते म्यां बोलिली प्रसिद्ध ॥ १४० ॥ सातवा म्हणसी गर्भपात । अवघाचि मृषा तो वृत्तांत । नंदसदनीं रोहिणीसुत । ठेविला गुप्त वसुदेवें ॥ ४१ ॥ पूर्वीं मारिले गर्भ साही । तैसेचि वधिसी दे दोघेही । यालागीं ठेवी नंदगेहीं । भेणें कोणहाही न कळतां ॥ ४२ ॥ नंद मानूनी परम मित्र । तेथें ठेविले देवकीपुत्र । दिवसेंदिवस प्रौढगात्र । झाले विचित्र प्रतापी ॥ ४३ ॥ तुवां जितुके प्रेरिले पुरुष । त्यां दोघांहीं तावकं नाश । केला ऐसिया वृत्तांतास । तुज निःशेष न सांगती ॥ ४४ ॥ इतुकें प्रकट कथिल्यावरी । आतां आपुलें स्वहित करीं । ऐकतां कंसाचे अंतरीं । क्रोधलहरी प्रज्वळली ॥ १४५ ॥

निशम्य तद्भोजपतिः कोपात्प्रचलितेंद्रियः । निशातमसिमादत्त वसुदेवजिघांसया ॥ १८ ॥

---

१ अति त्वरेनें. २ साक्षात् देवाप्रमाणे ज्ञान ज्याचें तो. ३ प्रमाणभूत. ४ निद्रिस्त. ५ गूढार्थ. ६ त्यांचा.

ऐकोनि मुनिवराची वाणी । भोजेंद्र दुर्मति अविचारखाणी । क्रोध ओसंडे सर्वा करणीं । अविहित करणी आदरिली ॥ ४६ ॥ खड्ग घेऊनि तीक्ष्णीकृतें । वसुदेवाचिया वधार्थे । धांवतां नारदें धरिला हात । बोधिला वृत्तांत तो ऐका ॥ ४७ ॥

निवारितो नारदेन तत्सुतौ मृत्युमात्मनः । ज्ञात्वा लोहमयैः पाशैर्बबंध सह भार्यया ॥ १९ ॥

नारद म्हणे रे भोजपति । ऐसी आहे राजनीति । कार्यसाधक तो पुरुषार्थी । कार्यघाती तो मूर्ख ॥ ४८ ॥ दोघे वसुदेवाचे कुमर । व्रजीं वाढती प्रबळतर । तुझ्या वधास्तव अवतार । धरूनि सुरवर पातले ॥ ४९ ॥ ते न करितां हस्तगत । वसुदेवाचा करिसी घात । त्यांसि वृत्तांत झालिया विदित । तेथूनि त्वरित निघती ते ॥ १५० ॥ कारागृहींचीं बाळकें नेलीं । तुज तीं नाहीं विदित झालीं । आतां व्रजामाजी मोकळीं । कोण आकळी तयांतें ॥ ५१ ॥ वसुदेवदेवकीचिया मरणीं । निर्मम निष्ठुर होती दोन्ही । मग प्रवर्त्तती तुझिये हननीं । नानायत्नीं प्रतापें ॥ ५२ ॥ यालागिं सांवरूनियां क्रोध । त्या दोहींचा योजीं वध । तंववरी वसुदेवा निरोध । निगडबंध करीं राया ॥ ५३ ॥ ऐसा नारदें कंसासुर । वारिला बोधूनि नीतिविचार । मग तो म्हणे वसुदेवकुमर । मृत्यु साचार हे माझे ॥ ५४ ॥ वसुदेवसुतापासूनि मृत्यु । आपणा कथिला दैवप्रणीत । हें जाणोनि कंस धूर्त । काय करिता जाहला ॥ १५५ ॥ वसुदेव धरूनि देवकीसहित । निगडबंधनीं निग्रहीकृत । कारागारीं रक्षणयुक्त । रोधिता झाला प्रयत्नें ॥ ५६ ॥ नारदाचिये आज्ञेवरून । रक्षिले वसुदेवाचे प्राण । कारागारीं संस्थापून । मानिलें वचन मुनीचें ॥ ५७ ॥ यानंतरें नारदमुनि । आज्ञा कंसाची घेऊनी । कृष्णदर्शनालागुनी । आनंदोनि निघाला ॥ ५८ ॥ ते पुढारीं सांगों कथा । प्रस्तुत ऐका कंसचरिता । रामकृष्णांचिया घाता । उपाय योजिता पैं झाला ॥ ५९ ॥

प्रतियाते तु देवर्षौ कंस आभाष्य केशिनम् । प्रेषयामास हन्येतां भवता रामकेशवौ ॥ २० ॥

आज्ञा घेऊनि नारद गेला । कंसें केशी पाचारिला । वृत्तांत तयासि निरूपिला । नारदें कथिला जैसा तो ॥ १६० ॥ केशीसि म्हणे कंसासुर । तुजविण जिवलग नाहीं अपर । तुवां प्रवेशोनि व्रजपुर । वसुदेवकुमर मारावे ॥ ६१ ॥ रामकृष्ण नामें दोन्ही । माझे शत्रु नंदसदनीं । गुप्त वाढती त्यांच्या हननीं । प्राणदानी मज होईं ॥ ६२ ॥ जंव पेटला नाहीं अनळ । तंव विझविजे वोतूनि जळ । रामकेशव माझे काळ । तूं तत्काळ वधीं तैसे ॥ ६३ ॥ कांटा काढी जो पायींचा । उपकार फेडूं न शकवे त्याचा । मां भंग केलिया मच्छत्रूचा । तात साचा तो तूं कीं ॥ ६४ ॥ एक तो वीर्यें उत्पन्न करी । दुजा उपनयनें संस्कारी । तिसरा विद्याप्रबोध करी । क्षुधा निवारी तो चौथा ॥ १६५ ॥ पांचवा भयापासूनि त्राता । आड निघूनि प्राण रक्षिता । रामकृष्णांच्या केलिया

---

१ इंद्रियांत. २ परजलेलें, पाणी दिलेलें. ३ बेड्या घालून कैद करणें.

घाता । तो तूं तत्त्वता मम जनक ॥ ६६ ॥ ऐसा उपकार माझिये शिरीं । केलिया तुझी हे धरित्री । मी होईन आज्ञाधारी । ऐशा प्रकारीं गौरविला ॥ ६७ ॥ देऊनि स्वहस्तें तांबूल । वधावया केशवबाळ । व्रजा धाडिला केशी खळ । पुन्हा कुटिल काय करी ॥ ६८ ॥

ततो मुष्टिकचाणूरशलतोशलकादिकान् । अमात्यान्हस्तिपांश्चैव समाहूयाऽह भोजराट् ॥ २१ ॥

केशी धाडूनि व्रजापति । मागें कंसें विवरूनि चित्तीं । रामकृष्णांच्या घाताप्रति । अभिनव युक्ति आदरिली ॥ ६९ ॥ मुष्टिक चाणूर शल तोशल । महाप्रतापी प्रचंड मल्ल । आणि अमात्य बुद्धिकुशल । हस्तिपौळ प्राणसखा ॥ १७० ॥ पाचारूनि ऐसियां चतुरां । करूनि एकांतीं बैसकारा । भोजेंद्र सांगे गुह्य विचारा । कुरुनरेंद्रा तो ऐकें ॥ ७१ ॥

भो भो निशम्यतामेतद्वीरचाणूरमुष्टिकौ । नंदव्रजे किलाऽऽसाते सुतावानकदुंदुभेः ॥ २२ ॥

अमात्यां अंबष्ठां आणि मल्लां । मुष्टिकचाणूरशलतोशलां । कंस संबोधी बुद्धिकुशलां । कितवां खळां कुटिळांतें ॥ ७२ ॥ अहो ऐकिलें कीं अपूर्व । केवढा कपटी हा वसुदेव । येणें दावूनि स्नेहभाव । केलें लाघव तें ऐका ॥ ७३ ॥ सप्तम देवकीगर्भ च्यवला । ऐसा शब्द रूढ केला । रोहिणीपुत्र वाखाणिला । गोकुळा नेला कैवाडें ॥ ७४ ॥ अष्टम गर्भाचिये वेळे । दोघें असतां बंदिशाळे । कैसें कैवाड केलें कुटिळें । कोणा न कळे तें वर्म ॥ १७५ ॥ पुत्र झाला देवकीउदरीं । कन्या जन्मली नंदाघरीं । दोघी प्रसूत एके रात्रीं । कोणे प्रकारीं या कळलें* ॥ ७६ ॥ यशोदे समर्पूनि निजकुमर । कन्या आणिली अतिसत्वर । सर्वां अलक्ष रचिला मंत्र । न कळे विचित्र हें कैसें ॥ ७७ ॥ द्वारपाळ दृढविश्वासी । सावध होतीं द्वारापासीं । आणि भंवते नगरवासी । होता यमुनेसि महापूर ॥ ७८ ॥ न कळे दुष्टाचें अंतर । संवचोराचा स्नेहविचार । माझा करावया संहार व्रजीं कुमर लपविले ॥ ७९ ॥ आनकदुंदुभीचे ते सुत । नंदव्रजीं वाढती गुप्त । गवेषणार्थ प्रेरिले भृत्य । तिहीं ते समस्त मारिले ॥ १८० ॥ कर्मरेखा बळिष्ठ माझी । म्हणोनि नारद आला आजी । शत्रु वाढती नंदव्रजीं । हे गोष्टी सहजीं उमजविली ॥ ८१ ॥ वसुदेवाचा करितां घात । नारदें धरिला माझा हात । सांगितला नीतिवृत्तांत । न मारीं तत्सुत न वधितां ॥ ८२ ॥ मग वसुदेवाचा निग्रह केला । नंदव्रजा केशी गेला । पुढें मंत्र जाईल रचिला । तो तुम्हीं परिसिला पाहिजे ॥ ८३ ॥

रामकृष्णौ ततो मह्यं मृत्युः किल निदर्शितः । भवद्भ्यामिह संप्राप्तौ हन्येतां मल्ललीलया ॥ २३ ॥

रामकृष्ण जे वसुदेवसुत । मज कारणें तेथूनि मृत्यु । अलोट विचार दैवकृत । कथिला निश्चित मुनीनें ॥ ८४ ॥ तरी ते येथें आलिया वरी । तुम्हीं वधावे माझे वैरी । मल्ललीलेची दावूनि

पाठभेद :— * नकळे ( उ. ).
१ माहूत. २ बैठक. ३ धूर्तांना. ४ कपटानें. ५ शोधार्थ. ६ बंधन.

परी । जनामाझारीं क्रीडार्थ ॥ १८५ ॥ हें जरी मानेल तुमच्या मना । तरी मल्लरंगाची कीजे रचना । कलाकौशल्य युक्ति नाना । सावधाना अवधारा ॥ ८६ ॥

मंचाः क्रियंतां विविधा मल्लरंगपरिश्रिताः । पौरा जानपदाः सर्वे पश्यंतु स्वैरसंयुगम् ॥ २४ ॥

कुशल शिल्पिक पाचारूनी । मल्लरंगाचिये स्थानीं । सभा कीजे विविधारत्नीं । स्तंभवितानीं[1] अलंकृत ॥ ८७ ॥ मुख्य स्थानीं भैद्रपीठ[2] । रत्नरौक्ममंचक[3] श्रेष्ठ । वीरअंगलग सुभँट[4] । तिहीं निकट असावें ॥ ८८ ॥ त्याहूनि अवरे अमात्यमंचा । भंवता पॆरिधि[5] यूथपतींचा । यथाधिकारें नागरिकांचा । बैसो जनांचा समुदाय ॥ ८९ ॥ ऊर्ध्वमाडिया जालंधरें । तेथ बैसिजे अंतःपुरें । नागरी स्त्रिया सह लेंकुरें । पृष्ठीं अंतरें प्रजांचिया ॥ १९० ॥ एवं समस्त लहान थोर । आणूनि आनंदें निर्भर । मल्लरंग कौतुकाकार । सर्वीं सादर पहावा ॥ ९१ ॥ मल्लयुद्धें क्रीडापरें । पाहोत नरनारी-लेंकुरें । आपुलाल्या यथाधिकारें । मंचांतरें बैसोनी ॥ ९२ ॥ ऐसी अमात्यां करूनि आज्ञा कंस हस्तिपा[6] करी सूचना । तें तूं ऐकें मात्सीरमणा । अभिमन्युनंदना परीक्षिति ॥ ९३ ॥

महामात्र त्वया भद्र रंगद्वार्युपनीयताम् । द्विपः कुवलयापीडो जहि तेन ममाऽहितौ ॥ २५ ॥

कंस म्हणे गा अंबष्ठा[7] । हस्तिपांमाजि परम श्रेष्ठा । मल्लरंगाचिया दारवंठा । करीं पैठा महागज ॥ ९४ ॥ कुवलयापीड नाम हस्ती । मदोन्मत्त जो भद्रजाति[8] । ज्याचे तुलने ऐरावती । गौण भासे यवमानें[9] ॥ १९५ ॥ तो नेऊनि रंगद्वारीं । क्षोभवूनियां उभा करी । रामकृष्ण येतां वैरी । दोघे मारीं रगडोनी ॥ ९६ ॥ रामकृष्ण वसुदेवकुमर । केवळ विष्णूचे अवतार । माझे शत्रु परम क्रूर । मर्दीं कुंजर प्रेरूनी ॥ ९७ ॥ पूर्वीं कालनेमी दैत्य । तो मी हिरण्यकशिपुसुत । माझा विष्णूनें केला घात । मग जन्मलों येथ भोजकुळीं ॥ ९८ ॥ यामुनपर्वतीं माझिये मातें । कपटें भोगिलें द्रमल* दैत्यें । हें रहस्य कथिलें तूंतें । येर सर्वांतें अप्रगट ॥ ९९ ॥ हरिवंशीं हा सविस्तर । कंसें स्वमुखें जन्मविचार । केला अंबष्ठा गोचर । अध्याय अवग्रपर्यंत ॥ २०० ॥ रामकृष्ण द्वारा आंत । येतां द्वाःस्थीं[10] द्वारें पिहितें[11] । करितां कोठें न लाहती पंथ । कीजे निःपात गजयोगें ॥ १ ॥ इतुका हस्तिपा कथिला मंत्र । पुन्हा अमात्यांप्रति विचार । सांगे उत्साहरचनापर । ऐकें सविस्तर तो राया ॥ २ ॥

आरभ्यतां धनुर्यागश्चतुर्दश्यां यथाविधि । विशसंतु पशून्मेध्यान्भूतराजाय मीढुषे ॥ २६ ॥

महापर्व चतुर्दशी । पुसोनि विप्रां सर्वज्ञांसी । आरंभिजे धनुर्यागासी । उपचारेंसी

पाठभेद :— * द्रमल्य ( उ. ).

१ खांबा-छतांनीं. २ सिंहासन. ३ रत्नखचित सोन्याचे पलंग. ४ वीर. ५ मंडल. ६ माहुताला. ७ माहुता. ८ उत्तम जातीचा. ९ जवसासारखा. १० द्वारपालांनीं. ११ बंद केलेलीं.

विध्युक्त ॥ ३ ॥ अभीष्टदेवताराधन । तयें कारणें तुष्टीकरण । पवित्रा पशूतें समर्पण । कीजे संपूर्ण सस्निग्ध ॥ ४ ॥ इत्यादिकार्यांची योजना । आज्ञापिली ते धरूनि सूचना । पत्रारूढ[1] करूनि आज्ञा । द्रव्यें नाना आणवावीं ॥ २०५ ॥ शृंगारिजे यागभुवन । विचित्रवितानीं सतोरण । गायक नर्त्तक बंदिजन । मुरजप्रवीण[2] आणवावे ॥ ६ ॥ फळें पुष्पें नानारस । इक्षु कदली विचित्रवास । पल्लव समिधा दूर्वा कुश । आणिजे द्विजांस पुसूनियां ॥ ७ ॥

इत्याज्ञाप्यार्थतंत्रज्ञश्चाहूय यदुपुंगवम् । गृहीत्वा पाणिना पाणिं ततोऽक्रूरमुवाच ह ॥ २७ ॥

रामकृष्णांचिया वधार्थ । व्रजा प्रेरिला केशी आप्त । दुसरा मंत्र रचिला गुप्त । मल्लरंगणीं रिपुहनना ॥ ८ ॥ तृतीय मंत्र अंबष्ठासी । आज्ञापिलें दृढविश्वासीं । शत्रु वधावे देहलीपासीं[3] । कुंजरासी क्षोभवुनी ॥ ९ ॥ रामकृष्ण मथुरापुरीं । आणवावयाचे विचारीं । धनुर्यागाची सामग्री । रचनाकुसरी निरोपिली ॥ २१० ॥ यज्ञाचिये उपचारसिद्धि । गांवोगांवीं विशालबुद्धि । दूत धाडोनि सर्वसमृद्धि । यथाविधि आणविल्या ॥ ११ ॥ पृथक् पृथक् इत्यादि आज्ञा । मल्ल अंबष्ठ मंत्रियां प्राज्ञां । करूनि हृदयीं विवंचना । कंस विवरी तें ऐका ॥ १२ ॥ कार्य साधे ज्या* उपायें । स्फुरद्रूप तो उपाय होय । तया पुरुषा नामधेय । अर्थतंत्रज्ञ हें बोलिजे ॥ १३ ॥ यालागिं कंस बुद्धिमंत । जाणोनि कार्याचा सिद्धांत । आणवावया वसुदेवसुत । अक्रूर चित्तांत योजिला ॥ १४ ॥ यादवांमाजि बुद्धिश्रेष्ठ । अक्रूर साधुत्वें वरिष्ठ । पाचारूनि तो स्नेहाळ इष्ट । आपणा निकट बैसविला ॥ २१५ ॥ सम्मानूनि तो स्तोत्रपाठीं । आनंदविला हृदयसंपुटीं । धरूनि सप्रेमें मनगटीं । रहस्यगोठी आदरिली ॥ १६ ॥

भो भो दानपते मह्यं क्रियतां मैत्रमादृतः । नान्यस्त्वत्तो हिततमो विद्यते भोजवृष्णिषु ॥ २८ ॥

क्रयविक्रय वाणिज्यधर्मीं । मार्गीं अथवा ग्रामोग्रामीं । अंश घेवोनि रक्षिजे नियमीं । तो वृत्तिस्वामी दानपति ॥ १७ ॥ श्वफल्कपूर्वजपरंपरा । वृत्त्यधिकार हा अक्रूरा । दानपति† या नामादरा । जाणोनि कंस संबोधी ॥ १८ ॥ आदरपुरस्सर द्विरुक्ति । म्हणे भो भो दानपति । मित्रत्वाची स्नेहाळ प्रीति । आजि मम हितीं त्वां कीजे ॥ १९ ॥ मजकारणें तुजसारिखा । परम सादर हिततम[4] सखा । भोजवृष्णींसह अंधकां । माजि निका असेना ॥ २२० ॥

अतस्त्वामाश्रितः सौम्य कार्यगौरवसाधनम् । यथेंद्रो विष्णुमाश्रित्य स्वार्थमध्यगमाद्विभुः ॥ २९ ॥

चतुर सुहृद आणि सज्जन । यालागिं सौम्य हें संबोधन । तुझिया आश्रयास्तव जाण ।

पाठभेद :— * तो ( उ. ). † दानवपति ( उ. ).

१ कागदावर लिहिलेली. २ मृदंगवादनांत कुशल. ३ उंबरठा. ४ अत्यंत हितकारक.

कार्य गहन साधीन मी ॥ २१ ॥ म्हणसी भोजेंद्र तूं समर्थ । माझा आश्रय तुज किमर्थ । तरी पर्येसीं सदृष्टांत । मम कार्यार्थ प्रियतमा ॥ २२ ॥ इंद्र विभुत्वें अमरपति । विष्णुआश्रयें स्वार्थावाप्ति । लाहे तैसा मी निश्चितीं । दानपति तवाश्रयें ॥ २३ ॥ धनुष्याश्रयें चाले शर । कीं अग्निप्रसंगें प्रबळयंत्र । कीं शौचाचारावांचूनि मंत्र । नव्हती स्वतंत्र स्फुरद्रूप ॥ २४ ॥ यालागीं तवाश्रयें करूनी । माझिया प्राणांतें गवसणी । होईल ऐसें अभिवांछूनी । तुजलागूनि विनवीतसें ॥ २२५ ॥ हें ऐकोनि दानपति । अक्रूर म्हणे कंसाप्रति । आम्हां अवंचक सेवकांप्रति । निजकार्यार्थीं आज्ञापीं ॥ २६ ॥ आम्ही आप्त किंकरजन । विशेष करावें नलगे स्तवन । आज्ञापिलें कार्य पूर्ण । जालें जाणोन तोषिजे ॥ २७ ॥ हें ऐकोनि कंसासुर । स्वमुखें आज्ञापी अक्रूर । सांगोनि कार्यार्थविचार । वृष्णिकुमरहननाचा ॥ २८ ॥

गच्छ नंदव्रजं तत्र सुतावानकदुंदुभेः । आसाते ताविहानेन रथेनाऽनय मा चिरम् ॥ ३० ॥

ऐकें अक्रूरा वृत्तांत । नंदव्रजा जाय त्वरित । तेथ दोघे वसुदेवसुत । परम गुप्त असती ॥ २९ ॥ कपट करूनियां वसुदेवें । नंदव्रजीं ते रक्षिले जीवें । अद्यापि मज हें नव्हतें ठावें । नारदें देवें गुज कथिलें ॥ २३० ॥ शोधार्थ म्यां धाडिले दूत । तितुकियांचाही करूनि घात । नंदव्रजीं वसुदेवसुत । वाढती गुप्त मम शत्रु ॥ ३१ ॥ यालागिं ते वसुदेवसुत । येथें आणावे तुवां त्वरित । पवनवेगीं माझा रथ । नेऊनि कार्यार्थ हा साधीं ॥ ३२ ॥ इतुकी किमर्थ करणें त्वरा । ऐसें कांहीं कल्पिसी चतुरा । तरी माझिया कृतविचारा । परिसें अक्रूरा प्रबुद्धा ॥ ३३ ॥ म्यां ऐकोनि नारदवाणी । आनकदुंदुभीचिये हननीं । प्रवर्त्ततां माझिये कर्णीं । नीति सांगोनि मुनि गेला ॥ ३४ ॥ मग म्यां वसुदेव देवकी दोन्ही । धरूनि घातलीं दृढबंधनीं । हें कुमरांचे न पडे कानीं । तंव जाऊनि आणावे ॥ २३५ ॥ म्हणसी लेंकुरें अपराधरहितें । काय म्हणोनि आणिजे येथें । हे द्विविधशंकापरिहारार्थें । ऐकें निश्चित मम वाक्य ॥ ३६ ॥

निसृष्टः किल मे मृत्युर्देवैर्वैकुंठसंश्रयैः । तावानय समं गोपैर्नंदाद्यैः साभ्युपायनैः ॥ ३१ ॥

मातें जाणोनि कालनेमी । समरीं असमर्थ पराक्रमी । म्हणोनि माझिये मृत्यूच्या[३] कामीं । वांछाकामीं सुरवर ॥ ३७ ॥ ऐसिया सकाम सुरवरगणा । आश्रय मुख्य वैकुंठराणा । तिहीं तयातें भाकूनि करुणा । माझिया मरणा प्रार्थिलें ॥ ३८ ॥ एवं विधि हर सुरवर सकळीं । रामकृष्ण दोघे बळी । मृत्यु केवळ माझिये मुळीं । कुठाररूप निर्मिले ॥ ३९ ॥ मजही केवळ मृत्युरूप । कळल्या कैसी लागेल झोंप । मुनीनें कथिली सूचना अल्प । मग म्यां साक्षेप मांडिला ॥ २४० ॥ तरी जाऊनि व्रजपुरा । येथें आणावें वसुदेवकुमरां । नंदप्रमुख पशुपनिकरां[४] बहुसंभारा समवेत ॥ ४१ ॥ उपायनें पूजोपचार । विशेष वार्षिक करभार । रामकृष्णेंसीं नंदप्रवर । थोर थोर व्रजवासी ॥ ४२ ॥

१ विश्वास्. २ केलेल्या विचारास. ३ मृत्यूचे कामीं. ४ गवळ्यांच्या समूहास.

येथें आणावे झडकरी । येवढी माझी विनति करीं । ते तां येथें आणिल्यावरी । कृत्य अवधारीं मम मनिंचें ॥ ४३ ॥

घातयिष्य इहानीतौ कालकल्पेन हस्तिना । यदि मुक्तौ ततो मल्लैर्घातये वैद्युतोपमैः ॥ ३२ ॥

कुवलयापीड नामा हस्ती । स्थापूनियां देहलीप्रांतीं । कुंजर प्रेरूनि शत्रूप्रति । गुप्तस्थिति निर्दळीन ॥ ४४ ॥ मदोन्मत्त कुंजर वाटे । येतां मारिलें अवचटें । ऐसा लौकिकीं शब्द उमटे । सहजचि तुटे मम शल्य ॥ २४५ ॥ म्हणसी कुंजरा नाटोपती । तरी सामान्य नोहे हस्ती । प्रळय-काळाची आकृति । दिग्गज लपती या भेणें ॥ ४६ ॥ ऐशिया कुंजरापासूनि जिणें । सर्वथा न घडे कोटिगुणें । तथापि मुक्त जाले प्राणें । तरी आणिका यत्नें वधीन ॥ ४७ ॥ कोणता यत्न पुसशील । तरी वज्रप्राय माझे मल्ल । थडकोनि विद्युल्लते तुल्य । वधिती तत्काळ शत्रूतें ॥ ४८ ॥ देवनिर्मित माझे शत्रु । मुख्य मारिल्या वसुदेवकुमर । पुढील कार्यार्थविचार । तो सविस्तर अवधारीं ॥ ४९ ॥

तयोर्निहतयोस्तप्तान्वसुदेवपुरोगमान् । तद्बंधून्निहनिष्यामि वृष्णिभोजदशार्हकान् ॥ ३३ ॥

रामकृष्ण विष्णुव्यक्ति[1] । वृष्णिभोजादि सुरवरपंक्ति । यास्तव मानूनि आपुले पति । हे मद्घातीं सापेक्ष[2] ॥ २५० ॥ रामकृष्णांच्या वधाअंतीं । वसुदेवप्रमुख पक्षपाती । सहित बंधु सुहृद ज्ञाति । करीन शांति सर्वांची ॥ ५१ ॥ भोजदाशार्हवृष्णिकुळें । यांचीं खणोनि सांडीन मूळें । मजहूनि वरिष्ठ आगळे । उरों नेदीं यदुवंशीं ॥ ५२ ॥ जरी तूं म्हणसी वरिष्ठ पितर । ऐक त्याचाही विचार । अक्रूरा तूंतें गुह्य मंत्र । कथितां साचार हृदयींचा ॥ ५३ ॥

उग्रसेनं च पितरं स्थविष्ठं राज्यकामुकम् । तद्भ्रातरं देवकं च ये चान्ये विद्विषो मम ॥ ३४ ॥

माझा पिता उग्रसेन । स्थविर[3] वृद्ध शक्तिहीन । तथापि वांछी माझें मरण । भद्रासन-भोगार्थ[4] ॥ ५४ ॥ वसुदेवादि अमरपक्षीं । मिळोनि माझें मरण लक्षी । राज्यसिंहासन अपेक्षी । क्ष्वेडॅ[5] कुक्षिगत जैसें ॥ २५५ ॥ आणि त्याचा देवक भ्राता । देवकीप्रमुख अवघ्या सुता । नांदावया सौभाग्ययुक्ता । क्षेम जामाता अभिवांछी ॥ ५६ ॥ आनकदुंदुभीचिया[6] मरणें । वैधव्य पावती कन्यारत्नें । म्हणोनि रक्षी नानायत्नें । माझ्या निधनें[7] तोषेच्छु[8] ॥ ५७ ॥ मुख्य करूनि पिता खुलता । जे जे मद्द्वेष्टे तत्त्वता । मी तयांच्या करीन घाता । सुहृदां आप्तां समवेत ॥ ५८ ॥

ततश्चैषा मही मित्र भवित्री नष्टकंटका । जरासंधो मम गुरुर्द्विविदो दयितः सखा ॥ ३५ ॥

त्यानंतरें हे अक्रूरा । नष्टकंटक[9] वसुंधरा । जाली ऐसें जाण चतुरा । सपत्नें[10] दुसरा मग

१ विष्णूचे अवतार. २ तत्पर. ३ वृद्ध. ४ राज्यभोगासाठीं. ५ विष. ६ वसुदेवाच्या. ७ मरणानें. ८ संतोष इच्छिणारा. ९ निष्कंटक, शत्रुरहित. १० शत्रु.

नाहीं ॥५९॥ पिता चुलता सुहृद्गण । मारिल्या म्हणसी निर्बळपण । तरी माझे आप्त जैसे प्राण । ते कोण कोण अवधारीं ॥ २६० ॥ माझा श्वशुर जरासंध । प्रतापसमुद्र जो अगाध । गुरुत्वें जनका तुल्य प्रसिद्ध । आणि द्विविद प्राणसखा ॥ ६१ ॥ द्विविद जात्या वानर खरा । जिवलग आप्तत्वें सोयरा । तैसाचि शंबरासुर दुसरा । जेंवि वारा अनळातें ॥ ६२ ॥

शंबरो नरको बाणो मय्येव कृतसौहृदाः । तैरहं सुरपक्षीयान् हत्वा भोक्ष्ये महीं नृपान् ॥ ३६ ॥

महाप्रतापी शंबरासुर । असाध्य दुर्गसमरीं क्रूर । ज्याच्या भेणें कांपती अमर । जिवलग फार माझा तो ॥ ६३ ॥ बाणासुर तो शंकरवरदी । निर्जरांचा हाडदंदी[1] । हिरण्यकशिपूपासूनि मांदी । दैत्यकुळाची ज्या पक्षीं ॥ ६४ ॥ ऐसे त्रिजगतांत वरिष्ठ । परंतु माझे परम इष्ट । माझ्या ठायींच सौहार्द श्रेष्ठ । त्यांहीं स्पष्ट केलेंसे ॥ २६५ ॥ यापुढें दाशार्ह भोज वृष्णि । अथवा सुरवर होतु[2] कां कोण्ही । मेषव्याघ्रां समरांगणीं । तैसे मरणीं आतुडती[3] ॥ ६६ ॥ इत्यादि जे जे दैत्यश्रेष्ठ । तेहींकरूनि मी बळिष्ठ । सुरपक्षीय नृप फळकट[4] । भरीन घोंट तयांचा ॥ ६७ ॥ मुख्य करूनि यादवकुळ । अमरपक्षींचे भूमिपाळ । करीन तयांचें निर्मूळ । मग मी भूतळ भोगीन ॥ ६८ ॥ समृद्धिमंत आणि असपत्न[5] । सार्वभौमीय[6] भद्रासन । मी भोगीन ऐश्वर्यपूर्ण । ध्रुवासमान चिरकाळ ॥ ६९ ॥ ऐसिया उपायासि मूळ । साधक अक्रूरा तूं आप्त कुशल । नाममात्र मी भूपाळ । येर ऐश्वर्य सकळ तुझेंचि हें ॥ २७० ॥ महत्त्व देऊनि माझे आंगीं । तूं प्राधान्य भूतळ भोगीं । रहस्यगोष्ठी[7] हे आवघी । कथिली तुजलागीं शपथेसी ॥ ७१ ॥

एतज्ज्ञात्वाऽनय क्षिप्रं रामकृष्णाविहार्भकौ । धनुर्मखनिरीक्ष्यार्थं द्रष्टुं यदुपुरश्रियम् ॥ ३७ ॥

ऐसा जाणोनि सर्व मंत्र । स्वार्थ मदर्थ परमार्थ मैत्र । वसुदेवाचे दोन्ही पुत्र । जावोनि सत्वर आणावे ॥ ७२ ॥ कोण निमित्त करावें म्हणसी । तरी ऐकावें इयेविशीं[8] । धनुर्यागनिरीक्षणासी । अर्भकांसी सांगावें ॥ ७३ ॥ आणि यदुपुरीची शोभा । अवलोकनार्थ प्रलोभा । दावूनि रामा पद्मनाभा । युक्ति सुलभा प्रलोभीं ॥ ७४ ॥ राजाज्ञेच्या शासनें करून । नंदेंसहित बल्लवगण । उपायनेंसी पुरस्करून । सावधान आणावे ॥ २७५ ॥ तयांसवें द्वयार्भक । पहावया धनुर्मख । मथुरापुर श्रीकौतुक । निरीक्षणार्थ येवविजे ॥ ७६ ॥ एवंविधि आणितां देख । कोमळबुद्धि ते अर्भक । येती पहावया कौतुक । कांहीं वितर्क न करितां ॥ ७७ ॥ कंसाज्ञा हे परिसोन । अक्रूर विवेकी सर्वज्ञ । रक्षूनि प्रभूचें समाधान । बोले वचन तें ऐका ॥ ७८ ॥

अक्रूर उवाच :— राजन्मनीषितं सध्र्यक् तव स्वावद्यमार्जनम् ।
सिद्ध्यसिद्ध्योः समं कुर्याद्दैवं हि फलसाधनम् ॥ ३८ ॥

१ हाडवैरी. २ असोत. ३ प्राप्त होती. ४ तुच्छ. ५ शत्रुरहित. ६ सार्वभौमत्वाचें. ७ मसलत. ८ अशा रीतीनें.

अक्रूर म्हणे भोजपति । जे तां निजमनीं विवरिली युक्ति । मृत्यु चुकवावयाचे अर्थी । उत्तम निश्चितीं यत्न हा ॥ ७९ ॥ राजनीतीचे मंत्रविचार । वक्तयां माजी तूं परम चतुर । तुझिये प्रज्ञेचा परपार । नेणती साचार कवि गुरुही ॥ २८० ॥ मान देऊनि नृपाचे प्रज्ञे । भविष्यानुरूप दावी सूचने । कीं हांव इच्छिली जैसी मनें । ते दैवावीण न फळे कीं ॥ ८१ ॥ यास्तव राया हा निर्वाहो । योजिल्या ऐसें सिद्धि जावो । अथवा विपरीत होऊनि ठावो । परि समता वावो न करावी ॥ ८२ ॥ फळभावना दैवानुसार । हा जाणोनि मुख्य विचार । समत्वें वर्तती परमधीर । सुखें होणार होतसे ॥ ८३ ॥

मनोरथान्करोत्युच्चैर्जनो दैवहतानपि । युज्यते हर्षशोकाभ्यां तथाप्याज्ञां करोमि ते ॥ ३९ ॥

नीतिशास्त्रीं अनुशासन । पुरुषें न सांडिजे सहसा यत्न । दैवानुसार फळें जाण । परि पुरुषाधीन फळ नाहीं ॥ ८४ ॥ होणार जें जैसें बलिष्ठ । तैसाचि प्रयत्न सुचे स्पष्ट । फांसयांतून दिसे वाट । जैं मरण निकट पक्षियातें ॥ २८५ ॥ निर्दैवा धनकटाह येतां पुढें । तैं त्या अंधत्व आवडे । त्या धनासि अडखळूनि पडे । लंघूनि उघडे नेत्र करी ॥ ८६ ॥ आणिकही प्रयत्न राया । मूषक प्रवर्त्तला व्यवसाया । सर्पपेटिका फोडूनियां । अभीष्टचारिया वांछिलें ॥ ८७ ॥ तोचि प्रयत्न सर्पा फळला । क्षुधार्त मूषका भक्षूनि धाला । तेणेंचि मार्गें बाहीर गेला । निर्मुक्त झाला दैवबळें ॥ ८८ ॥ यालागिं त्रिजगीं प्राणिमात्र । मनोरथ करिती थोर थोर । परी ते फळती दैवानुसार । अनिष्टमिश्रइष्टफळीं ॥ ८९ ॥ दैवप्रणीत तत्फळलाभें । सुखदुःखभोगांच्या संक्षोभें । हर्षशोकादि सबळ कोंभे* । आणिती क्षोभें† संसृति ॥ २९० ॥ रावणें जे जे प्रयत्न केले । ते ते विपरीतफळीं फळले । सेतुबंधादि सफल जाले । यत्न अवघे कपींचे ॥ ९१ ॥ एवं प्रयत्न सव्यभिचार । न करवे फळाचा निर्धार । तथापि मी तव आज्ञाधर । करीन साचार तवाज्ञा ॥ ९२ ॥ ऐसें ऐकूनि अक्रूरवचन । होणार बलिष्ठते करून । कांहीं न करीच अनुमान । कृतप्रयत्न निरूपिला ॥ ९३ ॥

श्रीशुक उवाच :— एवमादिश्य चाक्रूरं मंत्रिणश्च विसृज्य सः ।
प्रविवेश गृहं कंसस्तथाऽक्रूरः स्वमालयम् ॥ ४० ॥

ऐसी आज्ञा अक्रूरातें । करूनि पाठविला व्रजातें । रंगरचना मंत्रियांतें । आज्ञापूनि पाठविलें ॥ ९४ ॥ कंसआज्ञा वंदूनि शिरीं । अक्रूर प्रवेशला स्वमंदिरीं । मंत्री बोलविलियावरी । गृहामाझारीं नृप गेला ॥ २९५ ॥ शुक म्हणे गा कुरुपुंगवा । अध्याय संपला छत्तिसावा । येथील अभिप्राय आघवा । तुजला बरवा कळला कीं ॥ ९६ ॥ प्रथम अरिष्टासुराचा वध । नारदकंसांचा

---

**पाठभेद :—** * क्षोभें ( उ. ). † शोभे ( उ. ).

१ त्वां. २ अंत. ३ व्यर्थ. ४ फलसिद्धि. ५ द्रव्याची कढई. ६ उंदीर. ७ सापाचा पेटारा. ८ अनुकूल भक्ष्य. ९ संसार. १० वानरांचे. ११ अनिश्चितफलदायक.

ंवाद । मारावया राममुकुंद । मंत्र विशद कंसकृत ॥ ९७ ॥ अक्रूराचें नीतिवचन । आणि कंसाचें आज्ञापन । अध्यायांत निरूपण । इतुकें श्रवण झालें कीं ॥ ९८ ॥ यावरी अध्याय सदतिसावा । आरंभिजेल तो पर्येसावा । ज्यामाजि मृत्यु केशिदानवा । श्रीकेशवाचेनि हस्तें ॥ ९९ ॥ आणि नारदकृष्णदर्शन । समासें[1] अवतारचरित्रकथन । तैसेंचि व्योमासुराचें हनन । सावध होऊनि परिस पुढें ॥ ३०० ॥ गौतमच्चिया उत्तरतटीं । श्रीएकनाथभद्रपीठीं । चिदानंदें सज्जनदाटी । बैसली सृष्टि स्वानंदें ॥ १ ॥ तेही गोविंदाज्ञेवरून । दशमस्कंधाचें व्याख्यान । महाराष्ट्रदेशभाषाग्रथन । टीका अभिधान हरिवरदा ॥ २ ॥ तेथ दयार्णवाची वाणी । विद्वज्जनीं मानस्थानीं । अंगीकारिली ते उर्मीणी । श्रोतृश्रवणीं हरिलीला ॥ ३ ॥ मान मानलें सज्जनांसी । म्हणोनि अगणित हरिगुणराशि । उमाणविती[2] त्या निजमानसीं । श्रवणें नेऊन सांठवणें ॥ ४ ॥ नारदव्यासशुक-[3]प्रमाण । पाहोनि निबद्ध केलें मान । श्रोतीं न करावा अनमान । हरिगुणश्रवणसंग्रहणीं ॥ ३०५ ॥ एवं श्रीमद्भागवत । अष्टादशसहस्रगणित । परमहंसीं रमिजे येथ । लीलामृत कृष्णाचें ॥ ६ ॥ त्यामाजि हा स्कंध दशम । वक्ता श्रीशुक केवळ ब्रह्म । श्रोता परीक्षिति नृपसत्तम । अध्याय उत्तम छत्तिसावा ॥ ७ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां अरिष्टासुरवध-नारदकंससंवाद-केश्यक्रूरनीतिवचनाज्ञापनं नाम षट्त्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक ४० ॥ टीका ओव्या ३०७ ॥ एवं संख्या ३४७ ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ ( छत्तिसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १६९३९ ).




१ संक्षेपानें. २ स्पष्ट करी. ३ नारद, व्यास, शुक ह्यांच्या ग्रंथांचा आधार.

कृष्णदयार्णवकृत

# हरिवरदा

## अध्याय ३७ वा

श्रीकृष्णजगद्गुरुवे नमः । नमो मौननिरत[1]तरणि । अनुलोम[2]विलोम द्विधा पठनीं । अन्वय-व्यतिरेक प्रबोधुनी । सायुज्यदानी गुरुराया ॥ १ ॥ नमो या वाक्यार्थाची शक्ति । यथार्थ बाणली जयाप्रति । हरिहरब्रह्मादि त्या सेविती । धरूनि व्यक्ति अजस्र ॥ २ ॥ नमोवाक्याची वदतां महिमा । मौनमुद्रा निखिल निगमा । विस्तार लिहितां न पुरे क्षमा । हें जाणे रमावर हरही ॥ ३ ॥ नम्य एकचि श्रीगुरुनाथ । नमन तद्गौरवा प्रकटित । तेंचि शक्तिरूप विख्यात । विभवें प्रसवत तत्सत्ता ॥ ४ ॥ जेंवि लोहाग्ररहित शूळ । धनुष्यें विण शर निष्फळ । तेंवि नमनेंविण नम्य प्रांजळ । नये केवळ उपयोगा ॥ ५ ॥ प्रातिपदिक मात्र नांव । विभक्तियोगें लिंगसंभव । तेथ नमनें भक्तिगौरव । प्रकट होय अगाध ॥ ६ ॥ नमनें त्याग बोलिजे योगीं[*] । सत्तावारणदानप्रसंगीं । आत्मनिवेदन प्रणतां लागीं । नमनमात्रें संपादे ॥ ७ ॥ नमोमात्रें क्रोध मरे । नमोमात्रें काम पुरे । नमोमात्रें स्नेह भरे । अभेदबोधें सर्वत्र ॥ ८ ॥ नमनें अनेकापराधक्षमा । नमनें क्षालन त्रिगुणकर्मा । नमन प्रापक कैवल्यधामा । नमन प्रेमा शोभवी ॥ ९ ॥ नमनें दुष्ट होती इष्ट । नमनें निष्पाप[†] पापिष्ट । नमनें देवता अभीष्ट । नमनें संतुष्ट सर्वात्मा ॥ १० ॥ नमनें गुरुशिष्यांचा प्रेमा । प्रकृतिपुरुषा नमनें महिमा । नृपामात्यगौरवगरिमा । नमनधर्मामाजिवडी ॥ ११ ॥ नमनें स्वामिसेवकभाव । नमन मिरवी भक्तदेव । नमन शक्तीचें लाघव । लाहे गौरव अनायासें ॥ १२ ॥ अच्युत नारायण अनंत । इत्यादि नामें सामर्थ्यवंत । नमःपूर्वक चतुर्थ्यंत । जपतां सफळित संकल्प ॥ १३ ॥

---

पाठभेद :— * यागीं ( उ. ). † निःपाप ( उ. ).

१ मौन म्हणजे वेदगुह्य. तेथें निरत म्हणजे नम्र झाले त्यांचा प्रकाशक. २ उलट-मुलट क्रम.

अग्नि[1]जाया कवच अस्त्र । म्हणाल इत्यादि पल्लवीं मंत्र । तरी नमनपर्याय हे सर्वत्र । वषट्कार-द्विठांदि[2] ॥ १४ ॥ मध्यभागीं असतां राव । अग्र पश्चात उभय पार्श्वे । विभागें सैनिक वाहती नांव । परी ते सर्व नृपगोप्ते ॥ १५ ॥ नमन म्हणाल किमात्मैक[3] । तें सेव्यसेवकभावसूचक । तेथ अक्षरांचा विवेक । भाषा अनेक पालटती ॥ १६ ॥ विविध गुणकार्यानुरूप । योनिभेदेंही अमूप । नमस्काराचे अनुकल्प । ते हे अल्पजल्पना ॥ १७ ॥ नमन संभवे शपथस्थानीं । नमन प्रतिज्ञाप्रशंसनीं । नमन उपेक्षानिषेधनीं । नमन शासनीं स्मारक ॥ १८ ॥ नमन न संभवे जे ठायीं । तें अंधतम अज्ञान पाहीं । गाढमूढपाषाणदेहीं । नम्यनमनराहित्यें ॥ १९ ॥ नम्य येकचि श्रीगुरुनाथ । ऐसा बोलोनियां परमार्थ । पुन्हा प्रतिपादिले किमर्थ । नम्यनमक अनेकधा ॥ २० ॥ परस्परें करिती नमन । तैं नम्यनमक अवघेचि जन । तरी ये शंकेचें निरसन । सावधान अवधारा ॥ २१ ॥ भूप असतां कुंजरावरी । गजप[4] हडपी[5] चामरधारी । कुंजरेंसी तैं नमस्कारी । अमात्यादि जन अवघा ॥ २२ ॥ ते जन नमिती लक्षूनि भूपा । न ते किंकरा गजां गजपां । हयरथशिबिकानौकारूपा । यानीं महिपातें नमन ॥ २३ ॥ तैसा सर्वांचिये शिरीं । दक्षिणामूर्ति[6] सहस्रारीं[7] । सद्गुरुनाथ साम्राज्य करी । जनव्यवहारीं त्या नमन ॥ २४ ॥ जन वंदिती परस्परीं । तेथ सद्गुरु दोघां शिरीं । कोण कोणा नमस्कारी । म्हणाल हें जरी उमजेना ॥ २५ ॥ तरी भद्रासनीं असतां राव । मुद्रेमाजि स्थापूनि नांव । लहान थोर नियोग सर्व । मुद्रापत्रें प्रवर्तवी ॥ २६ ॥ तेथ राजा असे सर्वांशिरीं । परी लाघव गौरव यथाधिकारीं । नियोगीं नमिती परस्परीं । तेंवि व्यवहारीं श्रुतिशिक्षा ॥ २७ ॥ एवं नमन सद्गुरुनाथा । येर प्राकृत प्रकृतिगाथा* । प्रवर्तन जें व्यवहारार्था । ते तव सत्ता सर्वत्र ॥ २८ ॥ मौन संज्ञा निगमगुह्य । तव पद सर्व गुह्यां आश्रय । तेथ निरत जो प्रणतानिचय । तूं चित्सूर्य बोधक त्यां ॥ २९ ॥ सूर्य नवग्रहांचा पति । उदयें प्रकाशी† जागृति । बोधी तन्मातृकप्रवृत्ति । जेणें संसृति सर्वत्र ॥ ३० ॥ सद्गुरु गृहपाशविमोचक‡ । त्रिविधावस्थाग्रासक । आत्मरूपप्रकाशक । सायुज्य-दायक भवहंता ॥ ३१ ॥ पित्याचा पुत्र पुत्राचा पिता । म्हणतां अनुलोमविलोमता । व्यतिरेकान्वयें सद्गुरु भजतां । एकवाक्यता घडे तैसी ॥ ३२ ॥ काकाचा जामात जामाताचा काका । म्हणतां एकवाक्यते चुका । तेंवि प्राकृतां भज्यभजकां । अन्वयव्यतिरेकां अनोळखी ॥ ३३ ॥ तस्मात उपक्रमोपसंहार । सद्गुरुभजकां चित्सुखसार । सर्वीं सर्वत्र नमस्कार । तो साचार गुरुचरणीं ॥ ३४ ॥ यास्तव गणेश शारदा गुरुवर । कुळदेवता श्रोते चतुर । साधुसज्जन मुनीश्वर । पृथगाकार न नमीं मी ॥ ३५ ॥ मुखीं घालितां अन्नजीवन । सर्व अवयवां आप्यायन[8] । तेंवि वंदितां सद्गुरु-चरण । तोषे त्रिभुवन आत्मत्वें ॥ ३६ ॥ तेणें तोष पसायदानें[9] । सद्गुरुनाथें दिधलें सूचने । जें आरब्धग्रंथनिरूपणें । तोषवी मनें श्रोत्यांचीं ॥ ३७ ॥ आज्ञा लाहोनि दयार्णव । म्हणे ये अध्यायीं वासुदेव । वधील केशिव्योमदानव । आणि परिसेल स्तव नारदाचा ॥ ३८ ॥ कंसें धाडिला केशी

पाठभेद :— * प्रवृत्तिगाथा ( उ. ). † प्रकाशे ( उ. ). ‡ ग्रहपाश– ( उ. ).

१ अग्नीची स्त्री स्वाहा. २ स्वाहाकार. ३ कोणत्या स्वरूपाचें. ४ माहूत. ५ राजाला विडा देणारा. ६ शंकर. ७ सहस्रपत्रकमलामध्यें. ८ तृप्ति, पुष्टि. ९ प्रसाददानानें.

व्रजा । तेणें हरीसी कवणें वोजा । युद्ध केलें आणि मुनिराजा । अधोक्षजा स्तवी कैसा ॥ ३९ ॥ कैसा वधिला व्योमासुर । इतुके कथेचा विस्तार । श्रवणीं होऊनि सादर । अध्याय समग्र परिसावा ॥ ४० ॥

श्रीशुक उवाच :—केशी तु कंसप्रहितः खुरैर्महीं महाहयो निर्जरयन्मनोजवः ।
सटावधूताभ्रविमानसंकुलं कुर्वन्नभो हेषितभीषिताखिलः ॥ १ ॥

शुक म्हणे गा उत्तरात्मजा । अधोक्षजाच्या हननकाजा । कंसें केशी धाडिला व्रजा । कवणें वोजा तो गेला ॥ ४१ ॥ आधींच केशी महाक्रूर । विशेष प्रेरिता कंसासुर । अश्वरूपी भयंकर । व्रजीं सत्वर प्रवेशला ॥ ४२ ॥ मनाहुनी चपळगति । पुढिलां खुरीं टांफेरी* क्षिती । तेणें जर्जर झाली माती । चळीं कांपती व्रजवासी ॥ ४३ ॥ आयाल थरकती ग्रीवेवरी । उर्पायीं येतां नभामाझारीं । विमानें गुप्त अभ्रांतरीं । त्या दे भंवरी प्रळयाची ॥ ४४ ॥ मत्तकुंजर डहुळी पाणी । करी कमलांतें भंगाणी । तैसीं विमानें नभांगणीं । सटांकरूनि विध्वंसी ॥ ४५ ॥ अश्वजातीचा हेषितशब्द । प्रलयमेघतुल्य भयद । तेणें मनुजादिसुरवरवृंद† । प्राणिकदंब त्रासला ॥ ४६ ॥ तो भयंकर म्हणाल कैसा । ऐका तयाचा आकृतिठसा । पाहतां सुरवर पावती त्रासा । हेषितघोषा जग जाचे‡ ॥ ४७ ॥

विशालनेत्रो विकटास्यकोटरो बृहद्गलो नीलमहांबुदोपमः ।
दुराशयः कंसहितं चिकीर्षुर्व्रज सनंदस्य जगाम कंपयन् ॥ २ ॥

प्रळयाग्नीचा लखलखाट । तैसे विशाल नेत्रवाट । मुख कोटरासारिखें विकट । गिरिदरकुट ज्यापरी ॥ ४८ ॥ स्थूळ विशाळ कंठगळा । सजलजलदासारिखा निळा । कुटिलबुद्धि कपटें भरला । जय कंसाला अभिवांछी ॥ ४९ ॥ ऐसा येऊनि नंदव्रजा । कंपायमान केल्या प्रजा । त्यातें देखोनि अधोक्षजा । आवेश पैजा उथलला ॥ ५० ॥

तं त्रासयंतं भगवान्स्वगोकुलं तद्धेषितैर्वालविघूर्णितांबुदम् ।
आत्मानमाजौ मृगयंतमग्रणीरुपाह्वयत्स व्यनदन्मृगेंद्रवत् ॥ ३ ॥

आपुले गोगोपगोपी सकळ । एवमादि जें गोकुळ । दैत्यत्रासें अतिव्याकुळ । देखोनि घननीळ कळवळिला ॥ ५१ ॥ आणि खेंकाळे भयंकर । तेणें विमानीं त्रासले सुर । पुच्छकेशांचा फडत्कार । तेणें जलदाभ्र भंगिलें ॥ ५२ ॥ आणि संग्रामार्थ मातें । हुडकी क्षोभवूनि व्रजातें । कंसशत्रु मी माझेनि घातें । हा कंसातें जय वांछी ॥ ५३ ॥ ऐसें विवरूनि अंतःकरणीं । दैत्यनिहंता

पाठभेद :— * टांपरी ( उ. ). † –सुरवृंद ( मुं. ). ‡ ज्याचे ( उ. ).

१ टापा मारी. २ पुढील पाय उभारून मागील पायांवर उभें राहणें. ३ आयाळीच्या जटा. ४ खिंकाळणें. ५ वृक्षाच्या ढोलीसारखें. ६ पर्वताची लहानशी गुहा.

चक्रपाणि । सरसावोनि समरांगणीं । वीराग्रणी पुढारला ॥ ५४ ॥ दैत्या बाहे आपणाकडे । म्हणे व्यर्थ कां इकडे तिकडे । फिरसी पसरूनि चाभाडें । मरण रोकडे पावसी ॥ ५५ ॥ ऐसें म्हणोनि ठाकला पुढां । बाहु ठोकोनि आला गाढा । तंव केशी दैत्य महाबळिपाडा । कैसा सिंहाडा गर्जिन्नला ॥ ५६ ॥

स तं निशम्याभिमुखो मुखेन खं पिबन्निवाभ्यद्रवदत्यमर्षणः ।
जघान पद्भ्यामरविंदलोचनं दुरासदश्चंडजवो दुरत्ययः ॥ ४ ॥

ऐकोनि वीरवृत्तीचा शब्द । दैत्यें केला सिंहनाद । पुढें लक्षूनि मुकुंद । आतिसक्रोध धाविन्नला ॥ ५७ ॥ जैसा गगनचि गिळील तोंडें । ऐशीं विकराळ चाभाडें । पसरूनि लोटला कृष्णापुढें । कान पाडूनि डसावया ॥ ५८ ॥ तंव श्रीकृष्णाचें अभंग ठाणें । निर्भय देखोनि शंकला मनें । मग तो दुष्ट विमुखवदनें[1] । वद्ळा हाणे हरिहृदयीं ॥ ५९ ॥ आजिपर्यंत कोठें कोणी । पराभविलाचि नाहीं रणीं । यास्तव दुरासद[3] म्हणोनि । बादरायणि अनुवादे ॥ ६० ॥ दुरत्यय म्हणिजे ज्याचे कवे- । पासूनि कोणी न सुटे जीवें । मारुताहूनि[4] प्रचंड धांवे । म्हणोनि नागवे सुरासुरां ॥ ६१ ॥ कृष्ण कोमळ अरविंदाक्ष । मदनमूर्ति सुकुमारवेश* । त्याचा लक्षूनि हृदयदेश । लत्ता कुलिशसम[6] ताडी ॥ ६२ ॥

तद्वंचयित्वा तमधोक्षजो रुषा प्रगृह्य दोर्भ्यां परिविध्य पादयोः ।
सावज्ञमुत्सृज्य धनुःशतांतरे यथोरगं तार्क्ष्यसुतो व्यवस्थितः ॥ ५ ॥

कृष्णहृदया मागिलां पायीं । लत्ताप्रहार करितां पाहीं । तेणें चुकवूनि ते लवलाहीं । दैत्य दोहीं पदीं धरिला ॥ ६३ ॥ हृदयावरी ताडितां वद्ळा । कृष्णें तैशाच धरिल्या चपळा । गरगर भवंडी घनसांवळा । लीलाकमला सारिखा ॥ ६४ ॥ बळें सक्रोध टाकितां गगनीं । शतधनुष्यें[7] लंघूनि अवनि । दैत्य पडला जैसा अशनि । कीं अचल भंगोनि कोसळला ॥ ६५ ॥ गरुड सर्पातें झुगारी । तैसा दैत्य टाकूनि दुरी । अभंग कृष्ण राहिला समरीं । प्रतीक्षा करी युद्धार्थ ॥ ६६ ॥

स लब्धसंज्ञः पुनरुत्थितो रुषा व्यादाय केशी तरसाऽपतद्धरिम् ।
सोऽप्यस्य वक्त्रे भुजमुत्तरं स्मयन्प्रवेशयामास यथोरगं बिले ॥ ६ ॥

दैत्य आदळला पृथ्वीवरी । तेणें मूर्च्छा दाटली शरीरीं । ते सांवरूनियां झडकरी । कृष्णावरी धांविन्नला ॥ ६७ ॥ कृष्ण गिळावया सक्रोध हटें । विकराळ पसरूनि मुखवटें । सवेग

पाठभेद :— * कुमारवेश ( उ. ).
१ तोंड फिरवून. २ दुगाण्या. ३ अजिंक्य. ४ वायूहून. ५ न सांपडे. ६ वज्रतुल्य. ७ चारशे हात.

धांविला कडकडाटें । कृष्णा निकटें संघटला ॥ ६८ ॥ प्रथम वदळा केल्या विफळ । तेणें हृदयीं दुःख बहळ । कृष्णावरी पडला खळ । परि तो अढळ न ढळेचि ॥ ६९ ॥ पसरलें देखोनि दैत्यवदन । वामबाहु मधुसूदन । वदनीं घाली हास्य करून । उरँग लीनें जेंवि बिळीं ॥ ७० ॥ निर्भय सर्प रिघे बिळीं । दैत्यमुखीं तेंवि वनमाळी । वामबाहु घालूनि समूळीं । वदनकमळीं हासतसे ॥ ७१ ॥ मुखीं सांपडतां हरिहस्त । दैत्यें तोष मानिला बहुत । डसों जातां दशनैंपात । झाला त्वरित तें ऐका ॥ ७२ ॥

दंता निपेतुर्भगवद्भुजस्पृशस्ते केशिनस्तप्तमयः स्पृशो यथा ।
बाहुश्च तद्देहगतो महात्मनो यथामयः संववृधे उपेक्षितः ॥ ७ ॥

कक्षेपर्यंत बाहु वदनीं । घालूनि निर्भय चक्रपाणि । केशी डसतां कडकडोनी । दंत उन्मळोनि गळाले ॥ ७३ ॥ तप्तलोह सिंदूरवर्णी । तैसा बाहु स्पर्शितां दशनीं । दंत पडले उन्मळोनी । दैत्या नयनीं दुःखाश्रु ॥ ७४ ॥ कीं तप्तलोह जैसें पोळे । तिखटा दशनीं तैसा बळें । डसों गेला तंव मोकळे । दशन जाले दैत्याचे ॥ ७५ ॥ वज्रापरीस बाहु निबर । बळेंचि क्रोधें रगडी असुर । तेणें दशन जाले चूर । नेत्रीं पाझर सूटले ॥ ७६ ॥ आत्मशब्दें बोलिजे देही । महात्मा जो हरिविग्रही । त्या कृष्णाचा दैत्यें बाही । ग्रासितां पहा हो वाढला ॥ ७७ ॥ वायु प्राशूनि फुगे नाग । कीं द्रव्यविशेषें स्फुँलिंग । कीं तें त्रिविक्रमाचें आंग । वाढे त्रिजग मोजावया ॥ ७८ ॥ किंवा जलोदरनामा रोग । जठरीं उद्भवला सवेग । वाटे उपेक्षिलिया मग । यमलोकमार्ग दाखवी ॥ ७९ ॥ तैसा दैत्याचिये शरीरीं । कृष्णबाहु वाढला भारी । पुढें कैसी वर्त्तली परी । ते अवधारीं कुरुवर्या ॥ ८० ॥

समेधमानेन स कृष्णबाहुना निरुद्धवायुश्चरणांश्च विक्षिपन् ।
प्रस्विन्नगात्रः परिवृत्तलोचनः पपात लेंडं विसृजान्क्षितौ व्यसुः ॥ ८ ॥

कृष्णबाहु वाढला कंठीं । तेणें खुंटली प्राणराहटी । वायुँरोधें भरला पोटीं । दुःखें आपटी चरणांतें ॥ ८१ ॥ सर्वांगासी आला घाम । विकळ झाला तनुविक्रम । नेत्र वटारिले विषम । प्राणोत्क्रम वोढला ॥ ८२ ॥ बाहुचर्वणीं न चले शक्ति । पलायनाची खुंटली गति । विकळ झाल्या इंद्रियवृत्ति । देहस्मृति मावळली ॥ ८३ ॥ मूर्च्छेना दाटली गाढमूढ । पोटीं वायु कोंडला वाँड । झाला ऊर्ध्व मार्ग अवघड । मग फोडिलें कवाड पांयूचें* ॥ ८४ ॥ जैसा अदँत्त कवडा जोडी । गांडीवाटे प्राण सोडी । केशिदैत्यातें परवडी । झाली रोकडी प्राणांतीं ॥ ८५ ॥ गांडीवाटे सांडितां लेंडा । सरिसा निघाला प्राणलोंढा । शरीर उघडलें तडतडां । झाला उघडा हरिबाहु ॥ ८६ ॥

---

पाठभेद :— * वायूचें ( उ. ).

१ सर्प. २ लपलेला. ३ दांत पडणे. ४ अग्निकणिका. ५ वामनाचें. ६ वायु कोंडणें. ७ अतिशय. ८ गुदाचें. ९ कृपण, चिक्कू.

तद्देहतः कर्कटिकाफलोपमाद्व्यसोरपाकृष्य भुजं महाभुजः ।
अविस्मितोऽयत्नहतारिरुत्स्मयैः प्रसूनवर्षैर्दिविषद्भिरीडितः ॥ ९ ॥

पक्क कांकडी साद्यंत उकले । तैसीं तनूचीं भासतीं शकलें । कृष्णें बाहूतें काढिलें । प्रेत पडलें भूपृष्ठीं ॥ ८७ ॥ सुरनरासुरां जो अद्भुत । तो मारिला केशी दैत्य । परंतु विस्मयें नोहे दृप्त¹ । गर्वरहितजगदात्मा ॥ ८८ ॥ कृष्णमाया अघटित घटी । निमिषें निवटी ब्रह्मांडकोटी । तेथ कायसी भिंगुरटी । दुष्ट कपटी हयरूपी ॥ ८९ ॥ महाभुज या पदाचा अर्थ । कृष्णप्रताप अत्यद्भुत यत्न न करितां मारिला दैत्य । गर्वा न शिवत अविस्मयें ॥ ९० ॥ बुद्धिबळीं कां सारिपाटीं । सारी³ मारितां गर्व उठी । परी कृष्ण प्रतापी जगजेठी । अगर्व सृष्टीं अक्षोभ ॥ ९१ ॥ हें देखोनि सुरसमुदाय । विमानीं मानूनि परमाश्चर्य । परम उत्कट करिती विस्मय । कुसुमनिचैय⁴ वर्षती ॥ ९२ ॥ मग ते श्रीकृष्णाचीं यशें । निर्जैर⁵ वर्णिती संतोषें । उत्साह करिती दुंदुभिघोषें । प्रेमोत्कर्षें नाचती ॥ ९३ ॥ परस्परें देव वदती । अचाट केशिदैत्याची शक्ति । कृष्णें मारिला कवणें रीतीं । हा विस्मय चित्तीं बहु वाटे ॥ ९४ ॥ कांहीं परजिलें² नाहीं शस्त्र । कांहीं न करितां प्रतिकार । अयत्नें मारिला दुष्ट असुर । ज्याचा आधार कंसातें ॥ ९५ ॥ फळोदयातें सूचक प्रसून । कीं सूर्योदया जाणवी अरुण । तैसें कंसासुरा असन्मरण । केशिमरणें बोधिलें* ॥ ९६ ॥ येथूनि झाला दृढनिश्चय । दैत्यां राक्षसां दानवां क्षय । आम्हां निर्जरां ऊर्जित विजय† । कल्याण अभय त्रिजगातें ॥ ९७ ॥ भार उतरला मानूनि मनीं । आनंदभरित झाली अवनी । कृष्णपवाडे गाती गगनीं । देव विमानीं उत्साहें ॥ ९८ ॥ ऐसा झाला केशिवध । श्रोतीं होऊनि पुढें सावध । कृष्णा भेटेल मुनि नारद । तो संवाद परिसावा ॥ ९९ ॥ कृष्णदयार्णव प्रार्थना ऐसी । श्रवणीं बैसतां सप्रेमेंसी । चिंता न कीजे कोणेविषीं । सर्व हृषीकेशी संपादी ॥ १०० ॥ ऐसा प्रभाते वधिला केशी । त्यानंतरें श्रीहृषीकेशी । पुरस्करूनि गोधनासी । गेला वनासि सहगोप ॥ १ ॥ शुक म्हणे गा नृपोत्तमा । नारद देवर्षि महात्मा । वनीं भेटला पुरुषोत्तमा । ते कथेची गरिमा अवधारीं ॥ २ ॥

देवर्षिरुपसंगम्य भागवतप्रवरो नृप । कृष्णमक्लिष्टकर्माणं रहस्येतदभाषत ॥ १० ॥

म्हणसी आधीं कंसापाशीं । सांगोनियां त्र्यक्षरीसी । मग कां भेटला कृष्णासी । हे शंका मानसीं न धरावी ॥ ३ ॥ कंसाचिये अंतकाळीं । ध्यानरूपें श्रीवनमाळी । बिंबवावया हृदयकमळीं । गोष्टी त्याजवळी चावळला ॥ ४ ॥ अतींद्रियद्रष्टा⁶ महामुनि । भूतभविष्यवर्त्तमानीं । कंसाधिकार विचारूनी । स्वहितकथनीं प्रवर्तला ॥ १०५ ॥ कंस आसुरीप्रकृतिमंत । त्यासि अनोळख भक्तिपंथ । यालागिं विरोधभजनासक्त । मुनि तदुचित त्या बोधी ॥ ६ ॥ प्रह्लादाचा जो अग्रज । तो हा कंस नामा भोज । त्यासि कथिला अधोक्षज । सांगोनि गुज विश्वासें ॥ ७ ॥ आसन्नमरण जालिया

पाठभेद :— * प्रबोधिलें (उ). † उदय (मुं.).
१ गर्विष्ठ. २ रचिल्ये. ३ सोंगटी. ४ पुष्पसमुदाय. ५ देव. ६ इंद्रियांस अगम्य अशा वस्तु पाहणारा.

प्राप्त । विवेकनिष्ठ जिवलग आप्त । जेंवि कथिती प्रायश्चित्त । तेंवि गुह्यार्थ हा वदला ॥ ८ ॥ हें ऐकोनि कंसचित्त । कृष्णीं जडलें विरोधार्थ । तेणेंचि तयाचा परमार्थ । मुख्य पुरुषार्थ लक्षिला ॥ ९ ॥ एवं भागवतप्रवरमुनि । नमनीं त्र्यक्षरी लांछनी । सर्वसुहृदस्वहितकथनीं । कळवळूनि प्रवर्तला ॥ ११० ॥ वर्मे कथूनियां कंसासी । मग कां आला कृष्णापासीं । ऐशी शंका कांहीं धरिसी । तरी येविषीं अवधारीं ॥ ११ ॥ क्लिष्ट म्हणिजे निंद्य कर्म । जो नातळे पुरुषोत्तम । त्या कृष्णातें मुनिसत्तम । गुह्य सप्रेम हें वदला ॥ १२ ॥

कृष्ण कृष्णाप्रमेयात्मन्योगेश जगदीश्वर । वासुदेवाखिलावास सात्वतां प्रवर प्रभो ॥ ११ ॥

कृष्ण कृष्ण द्विरुक्तिनामें । आदरपुरस्सर सप्रेमें । संबोधिलें मुनिसत्तमें । तें नृपोत्तमें परिसावें ॥ १३ ॥ नवां संबोधनीं अर्थ । सूचिला संशयनिवृत्त्यर्थ । ऐकोनि येथींचा गुह्यार्थ । शंका किमर्थ राहील ॥ १४ ॥ कृष्ण सर्वज्ञ ईश्वर । जाणे सर्वांचें अंतर । नारदाचा प्रेमादर । सत्य साचार त्या विदित ॥ ११५ ॥ किमर्थ बोधिलें कंसातें । हेंही विदित सर्वज्ञातें । म्हणोनि संशयरहितचित्तें । मुनि कृष्णातें भेटला ॥ १६ ॥ कृष्णरूपा कालात्मका । तुज मृत्यूचा कायसा धोका । किमर्थ वयसेचा आवांका । दावूनि लोकां चाळविसी ॥ १७ ॥ अप्रमेयात्मा[1] तूं ईश्वर । तुझा अमोघ मंत्रविचार । केंवि जाणती ते पामर । कंसासुरप्रमुख जे ॥ १८ ॥ अथवा आत्मा म्हणिजे देह । तो हा तुझा अप्रमेय । वृथा कंसादिकांचें भय । हा अभिप्राय सूचिला ॥ १९ ॥ परिच्छिन्न[2] असतां जरी । तरी हा जन्मता देवकीउदरीं । स्वेच्छा लीलाविग्रहधारी । स्वेच्छा आदरी तैं मरण ॥ १२० ॥ कंसासि कथिलें गुह्य सर्व । तेणें रचिला मंत्र वाव । तरी तूं योगीश्वरांचा राव । अचिंत्य अभिप्राव पैं तुझा ॥ २१ ॥ कंस प्रतापी वाटेल चित्ता । तरी तूं त्रिजगाचा नियंता । जगदीश्वर या संबोधनार्था । माजि तत्त्वता हें सूचिलें ॥ २२ ॥ कंसें करावया स्वरक्षण । बळिष्ठ ठेविले म्हणसी गण । त्यांमाजि तुझें वसतिस्थान । वासुदेव पूर्ण सर्वग तूं ॥ २३ ॥ सर्वाश्रय तूं अखिलावास । सात्वतप्रवर[3] स्वभक्तईश । सर्वशक्तीचा परेश । प्रभुत्वें जगदीश प्रभुवर तूं ॥ २४ ॥ म्हणविसी नंदाचा बाळक । हें मायावी नाट्यकौतुक । वास्तव स्वरूप निष्कलंक । सर्वात्मक तूं आत्मा ॥ १२५ ॥

त्वमात्मा सर्वभूतानामेको ज्योतिरिवैधसाम् । गूढो गुहाशयः साक्षी महापुरुष ईश्वरः ॥ १२ ॥

सर्वभूतांचा अंतरात्मा । तो तूं एकचि पुरुषोत्तमा । नोहसी परिच्छिन्न जीवात्मा । तुजमाजि व्योमादिक अवघें ॥ २६ ॥ व्यापक म्हणसी कवणेपरी । जैसा पावक काष्ठांतरीं । ज्योतिरूपें वसती करी । काष्ठविकारीं अलिप्त ॥ २७ ॥ भूतीं असोनि भूतांप्रति । दृश्यरूपें न येसी व्यक्ती । यालागीं गूढ म्हणोनि श्रुति । वाखाणिती तुजलागीं ॥ २८ ॥ गूढत्वासि चारी हेतु ।

---

१ अमर्याद म्ह. देशकालभेदरूपमर्यादारहित आत्मा ज्याचा तो. २ समर्याद. ३ यदुश्रेष्ठ.

ऐकें तेथींचा वृत्तांतु । गुहाशेय साक्षी महापुरुष तूं । ईश्वर नियंता सर्वांचा ॥ २९ ॥ मनोबुद्ध्यादि जे आशय । त्या गुहांमाजि तूं गुहाशयें । तज्जन्यकल्पनाकृतनिश्चय । त्यां तूं अप्रमेय अगम्य ॥ १३० ॥ यालागिं म्हणिजे तुज साक्षी । कीं साक्षी अदृश्य सर्वां पक्षीं । म्हणोनि महापुरुष तूं हृषीकेशी । जो परिच्छिन्नमतीशीं दुर्ज्ञेय ॥ ३१ ॥ एवं सर्व प्रकारें अविज्ञेय । तैं ममास्तिक्या प्रमाण काय । म्हणसी तरी तूं प्रतीतिमय । अज अव्यय ईश्वर तूं ॥ ३२ ॥ गौणभूतात्मक चराचर । जीव अज्ञान कर्मतंत्र । त्यांतें नियामक फळभोगपर । तो तूं ईश्वर नियन्ता ॥ ३३ ॥ अशुभफलदें कर्में करिती । अशुभफळभोगा नेच्छिती । त्यां तो भोग शासनरीति । ईशनेंशक्ति भोगविसी ॥ ३४ ॥ जगच्छत्रु जगन्मित्र । एक सभाग्य एक दरिद्र । एक मूर्ख एक चतुर । कर्मानुसार तूं करिसी ॥ १३५ ॥ नेघें म्हणतां घेवविसी । करीना* म्हणतां तें करविसी । न भोगूं म्हणतां भोगविसी । कृतकर्मासि ऐश्वर्यें ॥ ३६ ॥ म्हणसी ईश्वरें ज्यां नियमिलें । तें चराचर नियम्य कोठूनि आलें । कोणापासूनि दुसरें जालें । तें परिसिलें पाहिजे ॥ ३७ ॥

आत्मनाऽत्माश्रयः पूर्वं मायया ससृजे गुणान् । तैरिदं सत्यसंकल्पः सृजस्यत्स्यवसीश्वरः ॥ १३ ॥

तरी हें तुजवेगळें नाहीं । तूं एकचि दोहीं ठायीं । नियंता नियम्य नियमन पाहीं । माया-प्रवाहीं रूढविसी ॥ ३८ ॥ अन्यसाधनांचा आश्रय । नापेक्षिसी तूं आत्माश्रय । मृगजळ करूनि अकर्त्ता सूर्य । तेंवि अव्यय स्वतंत्र तूं ॥ ३९ ॥ स्वसत्तायोगबळें माया । पूर्वीं अधिष्ठूनि गुणत्रया । प्रवर्त्तविसी त्रिविधकार्या । सृष्टिप्रळयस्थित्यादिकां ॥ १४० ॥ गुण सृंजूनि गुणद्वारा । सृजन पालन आणि संहारा । एवं तूंचि कर्त्ता खरा । भेदविकारा न शिवोनी ॥ ४१ ॥ म्हणसी सृष्ट्यादि त्रिविध क्रिया । षट्कारकें साधती यया । तरी कारकतंत्र म्हणावया । योग्य झालों सहजाचि ॥ ४२ ॥ तरी तूं ईश्वर सत्यसंकल्प । तुज अन्य साधनांचा खटाटोप । न पडे कीं तूं उभयरूप । सप्रताप सर्वात्मा ॥ ४३ ॥ सबाह्य एकात्मता तुझी । तेथ अंतर्बाह्य गोष्टी दुजी । कवण करील भेदबाजी । क्रीडसी सहजीं सहजत्वें ॥ ४४ ॥ जागृति फेडूनि विश्वाभिमान । सुषुप्ति लेवूनि देखे स्वप्न । तेथ कारकें कैंचीं कोण । कारकाधीन विचारीं ॥ १४५ ॥ एवं विश्वविश्वसाक्षी । तूंचि अभेदभेद† उभयपक्षीं । क्रीडसी हें जाणिजे दक्षीं । पूर्णनिरपेक्षीं विरक्तीं ॥ ४६ ॥ निर्मूनि अवघा जगडंबर । संस्थापूनि स्वधर्मसूत्र । लीला क्रीडसी स्वतंत्र । भेद विचित्र भासोनी ॥ ४७ ॥ धर्मसंस्थापने होतां भंग । तैं तूं अवतरसी श्रीरंग । मर्दूनि अधर्मी अनेग । धर्मप्रसंग स्थापिसी ॥ ४८ ॥ प्रस्तुत येथ कंसादिक । असुर धर्मोच्छेदक । अवतरलासि तूं यदुनायक । धर्मसंस्थापक तन्नाशें ॥ ४९ ॥

स त्वं भूधरभूतानां दैत्यप्रमथरक्षसाम् । अवतीर्णो विनाशाय सेतूनां रक्षणाय च ॥ १४ ॥

---

**पाठभेद :—** * न करी ( उ. ). † अभेद ( उ. ).

१ मन, बुद्धि इ. जे आशय ( स्थानें ) ह्याच गुहा त्यांत राहणारा. २ नियमन करणारी शक्ति. ३ निर्मून. ४ कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान व अधिकरण. ५ भेदाचा भोंभाट करणारा. ६ जगाचा पसारा.

भूधर म्हणिजे पृथ्वीपति । असुरभूपति दैत्यजाति । अधर्मरूपी पापमूर्त्ति । राक्षसव्यक्ति नररूपी ॥ १५० ॥ त्यांच्या संहारा कारणें । धर्मसेतुसंस्थापनें । तुझें यदुकुळीं अवतार धरणें । साधुरक्षणें अघनाशें ॥ ५१ ॥ आजिपर्यंत बालचरितें । बहुत मारिले अधर्मकर्त्ते । पुढां मारिसी ते संकेतें । कथिजेतील प्रसंगें ॥ ५२ ॥

दिष्ट्या ते निहतो दैत्यो लीलयाऽयं हयाकृतिः । यस्य हेषित संत्रस्तास्त्यजन्त्यनिमिषा दिवम् ॥ १५ ॥

लीलेकरूनि दैवयोगें । केशिनामा दैत्य आंगें । तुवां मारिला प्रसंगें । ज्याचेनि स्वर्गें उद्विग्न ॥ ५३ ॥ महाकपटी अश्वाकृति । ज्याच्या हेषणें त्रिजगती । सुर नर भूचर संत्रासती । देवही पळती स्वर्गौनी ॥ ५४ ॥ न हालती नेत्रपातीं । यास्तव अनिमेष ऐसें म्हणती । त्या स्वर्गस्थां हृदयीं खंती । जो दुर्मति आठवतां ॥ १५५ ॥ तो आजि देवें मारिला केशी । येथूनि प्रारम्भ दैत्यवधासी । अनुक्रमें जे संहारिसी । ते तूं पर्येसीं श्रीकृष्णा ॥ ५६ ॥

चाणूरं मुष्टिकं चैव मल्लानन्यांश्च हस्तिनम् । कंसं च निहतं द्रक्ष्ये परश्वोऽहनि ते विभो ॥ १६ ॥

परश्वोऽहनि म्हणिजे परवां । मथुरा प्रवेशसी माधवा । चाणूरादि मल्लां सर्वां । मुष्टिकप्रमुखां मारिसी ॥ ५७ ॥ अतींद्रियद्रष्टा नारदमुनि । तयाची प्रसिद्ध सिद्धवाणी । ज्ञानप्रकाशें अवलोकुनी । कृष्णालागूनि विज्ञापी ॥ ५८ ॥ माझें संपतां वृत्तांतकथन । सद्यचि होईल अक्रूरागमन । त्याचें ऐकोनि विज्ञापन । मथुरानिवेशन प्रभाते ॥ ५९ ॥ उद्यां अपरौह्णीं मथुरानगर । सहित अग्रज वयस्यनिकर । प्रवेशोनि पाहसी समग्र । लक्ष्मी विचित्र यदुपुरीची ॥ १६० ॥ रजक वधूनियां प्रारंभीं । धनुष्य भंगूनि समारंभीं । कंसबळेंसीं काळक्षोभी । धनुष्यरक्षक वधसील ॥ ६१ ॥ ऐसी संपल्या उद्यांची रात्री । परवां पाहीन आपुले नेत्रीं । तुवां मारिला जाईल स्वकरीं । कुवलयापीड महागज ॥ ६२ ॥ पुढें रिघोनि रंगागार । समल्लमुष्टिकादि चाणूर । तुवां मर्दिला कंसासुर । हें तव चरित्र पाहीन ॥ ६३ ॥ इतुकें पाहीन रोकडें । यावरी मारिसी जे जे पुढें । ते ते वीर प्रतापी गाढे । ऐकें निवाडें जाणवितों ॥ ६४ ॥

तस्यानु शंखयवनमुराणां नरकस्य च । पारिजातस्य हरणमिंद्रस्य च पराभवम् ॥ १७ ॥

कंसमर्दनापासून । अनुक्रमेंचि चरित्र जाण । भद्रासनीं उग्रसेन । पितृसांत्वन व्रतदीक्षा ॥ १६५ ॥ पुढें सांदीपनीपासीं । गुरूपसादेंन विद्याभ्यासीं । गुरुपत्नीनें दक्षणेसी । मृतपुत्रासि याचितां ॥ ६६ ॥ तदर्थ प्रवेशे सिंधूदरीं । पांचजन्य जो सागरवैरि । मर्दूनि वागविसी वामकरीं । मत्स्यावतारीं जेंवि दुजा ॥ ६७ ॥ त्यानंतरें कंसदारा । दुःखें जाऊन जनकघरा* । पिता मागधँ स्मरवूनि वैरा ।

पाठभेद :— * कंसघरा ( उ. ).

१ खिंकाळणे. २ लगेच. ३ दिवसाचा शेवटचा भाग. ४ कृष्णाचा गुरु. ५ गुरुगृहीं वास. ६ समुद्रामध्यें. ७ जरासंध.

बळात्कारें क्षोभवितां ॥ ६८ ॥ कंससूड मागतां रणीं । मागधपक्षीय दैत्यश्रेणी । मर्दितां अनुक्रमें करूनी । कालयवन मारिसी ॥ ६९ ॥ त्यानंतरें रुक्मिणीहरणीं । संहरिसी वीरश्रेणी । हें व्याख्यान वक्ष्यमाणीं । व्यत्यास कोण्ही न मनावा ॥ १७० ॥ सत्यभामारुक्मिणी कलह । सत्यभामासांत्वनस्नेह । दावितां अमरांचा समूह । कथील विग्रह भौमाचा ॥ ७१ ॥ तत्प्रसंगें मुरमर्दन । आणि नरकासुराचें हनन । पारिजातद्रुमापहरण । गर्व भंगून शक्राचा ॥ ७२ ॥

उद्वाहं वीरकन्यानां वीर्यशुल्कादिलक्षणम् । नृगस्य मोक्षणं पापाद्द्वारकायां जगत्पते ॥ १८ ॥

स्वप्रतापमात्र मोल । करूनि ललनारत्नें अमोल । जिंकिसी तत्प्रसंगें खळ । प्रबळदळेंसी निर्दळिसी ॥ ७३ ॥ रुक्मिणीप्रमुख नायिका अष्ट । कृतनियमेंसी जिंकिसी स्पष्ट । सोळा सहस्र येकवाट । येके घटिकेंत वरिसील ॥ ७४ ॥ स्यमंतकमणिगवेषण । जांबवंताचें संतोषण । करिसी गर्व परिहरून । देशी दर्शन रामरूपें ॥ १७५ ॥ नृगासि द्विजशापें करून । अंधकूपीं चिरकाळ पतन । त्याचें करिसील उद्धरण । द्वारकाभुवन वसवूनी ॥ ७६ ॥

स्यमंतकस्य च मणेरादानं सह भार्यया । मृतपुत्रप्रदानं च ब्राह्मणस्य स्वधामतः ॥ १९ ॥

सत्यभामेची ऐकोनि ग्लानि । सुधन्व्याची प्राणहानि । करूनि घेसी स्यमंतकमणी । हेंही नयनीं देखेन ॥ ७७ ॥ पुढें ब्राह्मणाचे मृतपुत्र । प्रतिज्ञापूर्वक पंडुपुत्र । आणितां भंगेल प्रतिज्ञासूत्र । तैं तूं चरित्र करसील ॥ ७८ ॥ सवें घेऊनियां अर्जुन । महाकाळपुरा जाऊन । ब्राह्मणाचे मृतनंदन । देसी आणून कौतुकें ॥ ७९ ॥

पौंड्रकस्य वधं पश्चात्काशिपुर्याश्च दीपनम् । दंतवक्त्रस्य निधनं चैद्यस्य च महाक्रतौ ॥ २० ॥

पौंड्रकनामें कारुषराव । कृष्णायुधें कृत्रिम सर्व । धरूनि म्हणवी वासुदेव । द्वेषें दानव समसाम्य ॥ १८० ॥ दूत धाडूनि तो दुर्मति । पाचारील युद्धाप्रति । काशीमाजी त्या स्वरूपमुक्ति । देसी स्वहस्तीं निवटूनी ॥ ८१ ॥ काशीपति पौंड्रकमित्र चक्रें छेदिसी तयाचें वक्त्र । सूडाकारणें तत्पुत्र । यजील अभिचारविधि[2] रुद्रा ॥ ८२ ॥ रुद्रदत्त कृत्या क्रूर । यज्ञीं प्रकटेल महाघोर । तीतें प्रेरूनि द्वारकापुर । जाळितां प्रतिकार तूं करिसी ॥ ८३ ॥ धगधगीत सुदर्शन । देखोनि कृत्या पलायमान । प्रेरकेंसी ऋत्विग्गण । भस्म जाळून करील ॥ ८४ ॥ तत्प्रसंगें काशीपुरी । अवदान[3] होईल वैश्वानरीं[4] । राजसूयमहाध्वरीं । प्रार्थील तूंतें युधिष्ठिर ॥ १८५ ॥ तत्प्रसंगें मागधहनन[5] । भीमहस्तें करविसी जाण । अग्रपूजेचें प्रकरण । चैद्यहनन[6] ते ठायीं ॥ ८६ ॥ अनुक्रमेंचि दंतवक्त्र । मनुष्यरूपी केवळ असुर । तुजसी करूनि क्रूर समर । समरसेल तुजमाजी ॥ ८७ ॥ या वेगळे अनेक वीर । पृथ्वी ज्यांचा मानी भार । त्यांचा करिसील संहार । पांडुकुमर क्षोभवूनी ॥ ८८ ॥

१ उलट क्रम. २ जारणमारणादि योगानें. ३ आहुति. ४ अग्नीमध्यें. ५ जरासंधाचा नाश. ६ शिशुपालवध.

★

यानि चान्यानि वीर्याणि द्वारकामावसन्भवान् । कर्ता द्रक्ष्याम्यहं तानि गेयानि कविभिर्भुवि ॥२१॥

ऐशा अनेक असुरसेना । मर्दूनि धर्मसंस्थापना । करिसी साधुसंरक्षणा । तें गोचर नयना होईल ॥ ८९ ॥ नांदतां द्वारकेमाझारीं । अनेक वीर्यें करिसी हरि । तें मी पाहीन आपुल्या नेत्रीं । गातीं भूचक्रीं कविवर जें ॥ १९० ॥

अथ ते कालरूपस्य क्षपयिष्णोरमुष्य वै । अक्षौहिणीनां निधनं द्रक्ष्याम्यर्जुनसारथेः ॥ २२ ॥

ऐसा भविष्य[1]संकेतार्थ । बोलोनियां ऋषिसमर्थ । पुन्हा सूची जो गूढार्थ । तो हा श्लोकार्थ पर्येसा ॥ ९१ ॥ ऐसें करितां भूभारहरण । तूं जो कालरूपी भगवान । रथीं करूनियां अर्जुन । सारथि होऊन विचरसी ॥ ९२ ॥ तेव्हां तुझिया पक्षपाता । अक्षौहिणींचा समूह पुरता । तावकी शक्ति लाहूनि सरता । निर्दळी दैत्यां समरीं जो ॥ ९३ ॥ त्या अक्षौहिणींचें ही निधन । शेवटीं मी अवलोकीन । ऐसें मुनीचें गूढ वचन । श्रीधरव्याख्यान तें ऐका ॥ ९४ ॥ भूभाररूपा अक्षौहिणी । अथवा विश्वाच्या म्हणोनी । बोलिजती त्या समरांगणीं । मरतां पाहीन मुनि म्हणे ॥ १९५ ॥ येथवरी जे नारद स्तवनीं । चरित्रभाग भविष्यकथनीं । पदानुक्रम ये व्याख्यानीं । नाहीं म्हणोनि न दूषिजे ॥ ९६ ॥ ऐसा संकेत जाणवून । यावरी करी वास्तव स्तवन । कीं तूं विशुद्धविज्ञानघन । ममता अभिमान* नातळेसी ॥ ९७ ॥ एवं करूनि विज्ञापन । वास्तव स्तवनें आनंदवून । मुनि भगवंता अभिवंदन । करी संपूर्ण दो श्लोकीं ॥ ९८ ॥

विशुद्धविज्ञानघनं स्वसंस्थया समाप्तसर्वार्थममोघवांछितम् ।
स्वतेजसा नित्यनिवृत्तमायागुणप्रवाहं भगवंतमीमहि ॥ २३ ॥

त्या भगवंता तुजप्रति । आम्ही शरण भेदनिवृत्ति । करूनि स्वयंभ आत्मस्थिति । विनय-विनति मुनि वदला ॥ ९९ ॥ तें भगवत्स्वरूप किं[3]लक्षण । केवळ विशुद्ध विज्ञानघन । जेथ अस्पृष्ट सत्त्वादि त्रिगुण । अपरिच्छिन्न अगाध ॥ २०० ॥ शोधनें निरसूनि गुणादि मळ । तें शुद्धिपूर्वक बोलिजे अमळ । विशुद्धविज्ञानघन केवळ । नित्य निर्मळ जें रूप ॥ १ ॥ खता झाडूनि उजळिजे अरिसा । सूर्य न गणिजे कीं त्यासरिसा । तोही गोचर ज्या प्रकाशा । त्या डोळसा जो प्रकटी ॥ २ ॥ ज्ञेयज्ञातृत्वविहीन । केवळ विशुद्धज्ञानघन । यालागिं स्वसंस्थितीकरून । अभीष्टार्थ संप्राप्त ॥ ३ ॥ स्वसामर्थ्यें स्वप्रताप । स्वऐश्वर्यें स्वस्थ भूप । ते स्वसंस्था आनंदरूप । येर तो जल्प क्षुब्धत्वें ॥ ४ ॥ सम्यक्स्वरूपस्थितिच जे कां । निरतिशयानंद देखा । तया पूर्णत्वें करूनि असिकां । अर्[4]थसमूह अवाप्त ज्या ॥ २०५ ॥ एवं अवाप्तपूर्णकाम । तें हें कथिलें कैवल्यधाम । आतां

पाठभेदः— * अज्ञान (मुं.).
१ तुझी. २ स्पर्श न करिशी. ३ कोणत्या प्रकारचें. ४ सर्व.

सत्यसंकल्पात्मक जें ब्रह्म । ईश्वरनाम अभिव्यक्त ॥ ६ ॥ अमोघ¹वांछितार्थ ज्याचा । तो सत्यसंकल्पी ईश्वर साचा । ऐसें निरूपितां शंकेचा । संभव झाला श्रोतयां ॥ ७ ॥ वांछा असे जये ठायीं । आणि संसृतीचा स्पर्श नाहीं । हेंचि अघटित म्हणाल कांहीं । तरी येविषयीं अवधारा ॥ ८ ॥ स्वतेजसा नित्य निवृत्त² । मायागुणप्रवाह जेथ । संसृतिसंभव कैंचा तेथ । मुनि समर्थ वदलासे ॥ ९ ॥ स्वतेजसा म्हणिजे काय । चिच्छक्ति जे प्रज्ञामय । तयेकरूनि निरसला होय । मायागुणमयप्रवाह ॥ २१० ॥ मायागुणमयप्रवाह कैसा । प्रश्न स्फुरेल जरी मानसा । तरी नावेक सावध बैसा । साद्यंत परिसा संसार ॥ ११ ॥ प्रथम स्फुरण प्रणवांकुर । अव्यक्तमाया ते साचार । केवळ अज्ञानतमःप्रचुर । रुद्र संहाराभिमानी ॥ १२ ॥ तयामाजी विवळे³ सत्त्व । विपरीतज्ञान तें महत्तत्त्व । विष्णु अभिमानी ज्ञातृत्व । पालनपटुत्व प्रकाशी ॥ १३ ॥ त्यामाजी रजोगुणीं विराट । क्रियासमवेत सृजननिष्ठ । सृजनाभिमान जाला प्रकट । ब्रह्मांडघट साकार ॥ १४ ॥ तमोगुणीं अव्यक्त भूतें । सत्त्वगुणीं ज्ञानवंतें । रजोगुणीं दृश्यें मूर्त्तें । विषयस्वार्थें कालवलीं ॥ २१५ ॥ तत्कर्दमें भौतिक सृष्टि । जीवचैतन्या प्रकट राहटी । लक्षचौऱ्यांसीं भगसंकटीं । न चुके घरटी परिभ्रमतां॥१६॥ मरणें उपजणें व्यवहारणें । सुखदुःखांचें भरलें भाणें । सुर नर तिर्यक् होणें जाणें । सदा जाचणें न सुटतां ॥ १७ ॥ शत्रुषट्क अभ्यंतरीं । विश्वासूनि मैंदापरी । आर्तुंडविती⁴ षड्विकारीं । त्रितापजोहारीं⁵ कोंडोनी ॥१८॥ अंधतमिस्र आणि मोक्ष । द्विधा अज्ञानज्ञानपक्ष । आत्मा उभयत्र अपरोक्ष । तो अलक्ष त्या न कळे ॥ १९ ॥ इहामुष्मिक तिर्यग्योनि । तमिस्रमोक्ष ताटस्थ्यकथनीं । जीव पडिले परिभ्रमणीं । निबद्ध गुणीं फळभोगें ॥ २२० ॥ तो हा मायागुणप्रवाह । चिच्छक्तिप्रकाशें जेथ वाव । संसृतीसि तेथें ठाव । म्हणणें माव अवघी हे ॥ २१ ॥ तमात्मक सत्त्वीं विपरीत ज्ञान । मिश्रप्रकाशें मंदनयन । रज्जूवरी सर्पभान । अध्यारोपण तेंवि भवा ॥ २२ ॥ प्रज्ञानतेजाच्या उजिवडें । अध्यारोप कोणीकडे । तेथ संसृति भाविती वेडे । मूर्ख बापुडे भवभ्रांत ॥ २३ ॥ एवं ऐसिया भगवद्रूपा । शरण जाणोनि कीजे कृपा । येथ शंका करिसी बापा । तें संक्षेपामाजि वदतों ॥ २४ ॥ भूतभविष्यवर्तमान । नारदा तूं त्रिकालज्ञ । मायागुणप्रवाहशून्य । मजलागून केंवि वदसी ॥ २२५ ॥ ईश्वर मज जरी मानिसी साच । तरी विश्व अवघेंचि मत्प्रपंच । किंवा म्हणसी यदुपतीच । तरी हें अवघेंचि यदुचक्र ॥ २६ ॥ इतुका प्रपंच माझिये गांठीं । अगुणप्रवाह कैशिये गोठी । म्हणसी तरी तें तूं जगजेठी । ऐके वाक्पुटीं* निरोपितों ॥ २७ ॥

त्वामीश्वरं स्वाश्रयमात्ममायया विनिर्मिताशेषविशेषकल्पनम् ।
क्रीडार्थमद्यात्तमनुष्यविग्रहं नतोऽस्मि धुर्यं यदुवृष्णिसात्वताम् ॥ २४ ॥

भो भो यदुकुळधुरंधरा । पूर्ण ऐश्वर्यें ईश्वरा । तूंतें नमितों वृष्णिप्रवरा । सात्वतनिकरा

---

**पाठभेद:**— * वाक्पटीं ( उ. ).

१ ज्याच्या इच्छा कधीं विफल होत नाहींत तो. २ दूर केलेला. ३ स्पष्ट होतें. ४ मिळविती. ५ तापत्रयरूप अग्नीमध्यें.

प्रभुवर तूं ॥ २८ ॥ ईशितव्यें आपुल्या ठायीं । ईशनशक्तीच्या प्रवाहीं । स्ववश करिसी तूं सर्वही । तूं कोण्हाही वश नव्हसी ॥ २९ ॥ यास्तव मायावशवर्तिनी । सत्ता योगबळें स्वीकरूनी । अशेष विशेष तियेकरूनी । स्वक्रीडार्थ प्रवर्त्तक ॥ २३० ॥ तें हें अवघेंचि भवभ्रमचक्र । स्निग्ध मोहक मादक मधुर । परी तें तुज नोहे भ्रमकर । तूं परतर परमात्मा ॥ ३१ ॥ अव्यक्तादि गुणप्रवाह । महदहंकार भूतसमूह । इहीं न करवे तुज निग्रह । लीलाविग्रहनाटक तूं ॥३२॥ दुर्गमदुर्गीं भद्रासन । पूर्ण ऐश्वर्यें नृप संपन्न । तेथ निबद्ध दस्युंगण[1] । त्यां तें स्थान अनुल्लंघ्य ॥ ३३ ॥ कर्मपाशीं निबद्ध झाले । भवभ्रमचक्रीं नियंत्रिले । ते न वचती मुक्त केले । तुजवेगळे कल्पांतीं ॥ ३४ ॥ तेचि चक्रीं तूं चक्रवर्ती । परी न पडसी चक्रावर्तीं । ऐशी तुझी अगाध कीर्ति । चक्रभ्रांतिप्रभंजक ॥ २३५ ॥ तो तूं काळकळनारूप[2] । सात्वतवृष्णियदुकुळभूप । मनुष्यविग्रही भाससी पशुप । क्रीडाकलाप कलुषघ्न[3] ॥ ३६ ॥ अगाध तुझी हे कल्पना । निवटावया खळ दुर्जना । धर्मसेतुसंस्थापना । साधुरक्षणा करावया ॥ ३७ ॥ पांडवादि स्वपक्षीं देव । नंदप्रमुख हे बल्लव । सात्वत वृष्णि मधु यादव । घेऊन स्वमेव यदुचक्र ॥ ३८ ॥ मृत्युलोकीं अवतरलासी । त्रिजग ग्रथूनि कल्पनापाशीं । नित्य निर्लेप क्रीडा करिसी । पूर्णत्वेंसी साद्यन्तीं ॥ ३९ ॥ एवं यादवादि स्वपक्षस्वजन । षट्पंचकोटि अभिवर्धन । कार्यान्तीं त्यां उपसंहरण । करिता पूर्ण निर्मम तूं ॥ २४० ॥ ऐसा अहंताममतारहित । सात्वतवृष्णियदुकुळनाथ । त्या तूंतें मी शरणागत । अभिवंदित साष्टांग ॥ ४१ ॥ रायासि म्हणे व्यासनंदन । साद्यन्तभावीं लीलाचरण । सूचनारूप केलें स्तवन । तें हें कथन तुज केलें ॥ ४२ ॥

श्रीशुक उवाच :— एवं यदुपतिं कृष्णं भागवतप्रवरो मुनिः ।
प्रणिपत्याभ्यनुज्ञातो ययौ तद्दर्शनोत्सवः ॥ २५ ॥

भगवद्भक्तां जो अग्रणी । भागवतप्रवर नारदमुनि । तेणें ऐशा प्रकारें स्तवूनी । नमिता झाला कृष्णातें ॥ ४३ ॥ यदुकुळचक्रचूडामणि । तो वंदूनि चक्रपाणि । दर्शनोत्साह मानूनि मुनि । आज्ञा घेऊनि निघाला ॥ ४४ ॥ कृष्णमूर्ति हृदयीं ध्यात । कृष्णकीर्ति वदनीं गात । कृष्णप्रेमें आनंदभरित । गेला विधिसुतें[4] स्वच्छंदें ॥ २४५ ॥ ऐसा नारदें केला स्तव । तो श्रोतयां कथिला सर्व । पुढें निरूपी दयार्णव । व्योमदानववधलीला ॥ ४६ ॥

भगवानपि गोविंदो हत्वा केशिनमावहे । पशूनपालयत्पालैः प्रीतिर्व्रजसुखावहः ॥ २६ ॥

प्रभातें केला केशिवध । वना गेला मुकुंद । तेथें भेटला मुनि नारद । त्याचा स्तुतिवाद जो कथिला ॥ ४७ ॥ षड्गुणैश्वर्यसंपन्न । तो गोविंद श्रीभगवान । गोपां हातीं पशुगोपन । प्रीतीकरून जो करवी ॥ ४८ ॥ व्रजसुखावह ऐसा हरि । तेणें भावी मुनिवैखरी । ऐकोनि स्वीकेली अंतरीं । सूचना अवतारकार्याची ॥ ४९ ॥ वनीं क्रीडतां तदनंतर । वधिला कपटी व्योमासुर ।

१ शत्रुसमूह. २ काळाची आकर्षण शक्ति तद्रूप. ३ पापनाशक. ४ ब्रह्मपुत्र नारद.

नवां श्लोकीं तो विस्तार । व्यासकुमर वाखाणी ॥ २५० ॥ परी हे कथा मागील खरी । प्रलंबहनन केल्यावरी । व्योमासुरातें कृष्ण मारी । ये अवसरीं निरूपिली ॥ ५१ ॥ वेषधारी केशिदैत्य । त्याची कथितां कपटमात । प्रसंगें कपटी व्योमदैत्य । वधिला तो येथ निरूपिला ॥ ५२ ॥ शंखचूडवधापूर्वीं । व्योमवध वर्णिती कवि । असो हे पाठभेदाची पदवी । प्रस्तुत सर्वीं परिसिजे ॥ ५३ ॥

एकदा ते पशून्पालाश्चारयंतोऽद्रिसानुषु । चक्रुर्निलायनक्रीडाश्चोरपालापदेशतः ॥ २७ ॥

हो कां कोण्हे एके काळीं । गोप पशूंतें सहवनमाळी । चारितां पर्वताचिये मौळीं । क्रीडा सकळीं मांडिली ॥ ५४ ॥ ऐका क्रीडेचा प्रकार । एक जाले मेषाकार । एक अर्भक झाले चोर । क्रीडा विचित्र पिहितांक्ष[1] ॥ २५५ ॥

तत्रासन्कतिचिच्चोराः पालाश्च कतिचिन्नृप । मेषायिताश्च तत्रैके विजह्रुरकुतोभयाः ॥ २८ ॥

चोर झाले पांच सात । मेष झाले अर्भक बहुत । मेषरक्षक बल्लवसुत । जाले तेथ कितियेक ॥ ५६ ॥ ऐसा रचूनि क्रीडाकल्प । क्रीडतें झाले निर्भयरूप । देखोनि व्योम कपटी गोप । झाला विकल्प कल्पूनी ॥ ५७ ॥

मयपुत्रो महामायो व्योमो गोपालवेषधृक् । मेषायितानपोवाह प्रायश्चोरायितो बहून् ॥ २९ ॥

कपटी मयासुराचा कुमर । व्योमनामा महाअसुर । गोपाकृति धरूनि चार* । क्रीडापर त्यां मार्जा ॥ ५८ ॥ मेष स्ववाडां कोंडून । मेषपाळ झांकूनि नयन । निजती कांबळ्या पांघरोन । तों चोर येऊन मेष हरिती ॥ ५९ ॥ तंव ते श्वान करिती टाहो । चेइरां[2] मेषपांचा समुदावो । मेंढरें दशदिशां लागलीं पाहों । करिती हाहू चहूंकडे ॥ २६० ॥ तेथें मेंढराकृति जीं पोरें । तीं भोभौंती[3] मेषस्वरें । धावोनि मेषप धारिती त्वरें । चोर घाबिरें पळताती ॥ ६१ ॥ पुनः पुनः दिवस रजनीं । ऐसेंचि क्रीडती कल्पूनी । व्योमासुर तये स्थानीं । चोर होऊनि पातला ॥ ६२ ॥ लटकीं लावूनि नेत्रपातीं । मेषपाळ निद्रा करिती । दैत्यें घालूनि तमांची[4] बुंथी[5] । केले सुषुप्तिवर्रपडे[6] ॥ ६३ ॥ मग जे चोररूपी गोप । त्यां माजी आपणही तद्रूप । मिळोनि नेले मेषकळप । गिरिसमीप गह्वरीं[7] ॥ ६४ ॥

गिरिदर्यां विनिक्षिप्य नीतं नीतं महासुरः । शिलया पिदधे द्वारं चतुःपंचावशेषिताः ॥ ३० ॥

सचोरकळप जो जो नेला । गुहागर्भीं तो सांठविला । शेवटीं शिला लावूनि आला ।

पाठभेदः— * चोर ( उ. ).

१ डोळे झाकलेले. २ जागृत. ३ ओरडती. ४ अज्ञानाची. ५ आवरण. ६ गाढ निद्रेंत शिरलेले. ७ गुहेंत.

**अवशिष्टांला न्यावया ॥ २६५ ॥ चार पांच मेषपाळ। उरले होते जे गोपाळ । तेही घेऊनि चालिला कुटिळ । मनीं घननीळ विंवंची ॥ ६६ ॥**

तस्य तत्कर्म विज्ञाय कृष्णः शरणदः सताम् । गोपान्नयंतं जग्राह वृकं हरिरिवौजसा ॥ ३१ ॥

**कृष्णपरमात्मा सर्वज्ञ । जाणोनि दैत्याचें विंदा[१]न । भक्तांसि ज्याचें अभयदान । तो भगवान कळवळिला ॥ ६७ ॥ अवशिष्ट गोप नेतां व्योम । देखोनि क्षोभला पुरुषोत्तम । जैसा आयुष्य खुंटतां यम । दावी निजधाम तत्काळ ॥ ६८ ॥ कीं सिंहाचीं पिलीं तान्हीं । लांडगा धरूनि नेतां ग्लानि । सिंह धरी त्या क[२]वे घालुनी । जेंवि क्षोभोनि प्रतापें ॥ ६९ ॥ तेंवि कृष्णें व्योमासुर । धरिला प्रतापें सत्वर । पुढें वर्तला प्रकार । ऐका साचार चतुर हो ॥ २७० ॥**

स निजं रूपमास्थाय गिरींद्रसदृशं बली । इच्छन्विमोक्तुमात्मानं नाशक्नोद्ग्रहणातुरः ॥ ३२ ॥

**कृष्णें दैत्य धरितां निकरें । हरपोनि गेलें कपटवारें । मूळींचें रूप धरिलें खरें । जें गिरींद्रें समसाम्य ॥ ७१ ॥ पर्वतप्राय महाबळी । घेतां कृष्णें सम फ[३]ळी । मिठी न करवेचि मोकळी । दैत्य ते काळीं घाबिरला ॥ ७२ ॥ भगवंताच्या ग्रहणें करून । झाला आतुर विकळ[४]प्राण । कोण्या प्रकारें वेधी त्या कृष्ण । तें तूं श्रवण करीं राया ॥ ७३ ॥**

तं निगृह्याच्युतो दोर्भ्यां पातयित्वा महीतले । पश्यतां दिवि देवानां पशुमारममारयत् ॥ ३३ ॥

**मग अच्युतें दोहीं बाहीं । दैत्य निग्रहें पाडूनि मही । सोमींच्या[५] बस्तां[६]सारिखें पाहीं । प्राण लवलाहीं घेतले ॥ ७४ ॥ विमानीं पाहत असतां देव । आणि भूतळीं स्थिरचर सर्व । मारूनि श्वासनिरोधें दानव । कृष्णें लाघव दाखविलें ॥ २७५ ॥**

गुहापिधानं निर्भिद्य गोपान्निःसार्य कृच्छ्रतः । स्तूयमानः सुरैर्गोपैः प्रविवेश स्वगोकुलम् ॥ ३४ ॥

**मग गुहामुखीं जे दाटली* शिळा । कृष्णें पायें लोटोनि हेळा† । संकटापासूनि पशुपमेळा । कृष्णें अ[७]वलीळा काढिला ॥ ७६ ॥ कोंडोनि मरतां गुहापोटीं । प्राण पातले होते कंठीं । कृष्णें काढूनि उठाउठीं । अमृतदृष्टीं वांचविले ॥ ७७ ॥ दीप विझतां घालूनि तेल । स्थापिला निर्वात लक्षूनि स्थळ । तैसा कृष्णें गोवळमेळ । मर्दूनि खळ वांचविला ॥ ७८ ॥ ऐसीं कृष्णाचीं अमळ यशें । वर्तमानें भूतभविष्यें । सुरवर विमानीं गाती तोषें । स्तविती उल्हासें मुनिवर्य ॥ ७९ ॥ सुरवर स्तविती विमानयानीं । कुसुमें वर्षती कृष्णमूर्ध्नि । गोप नाचती कृष्णकीर्त्तनीं । व्रजीं स्वभुवनीं**

---

**पाठभेदः—** * घातली ( मुं. ). † होळा ( उ. ).

१ कपटकृत्य. २ मिटी ३ झोंबी, युद्ध. ४ शक्तिरहित. ५ सोमयज्ञांतील. ६ बोकडाप्रमाणें. ७ सहज.

प्रवेशतां ॥ २८० ॥ कृष्णें व्योमासुराचा वध । वनीं करूनि एवंविध । फेडूनि गोपांचा निर्बंध[1] । व्रजीं मुकुंद प्रवेशला ॥ ८१ ॥ सदतिसाव्या अध्यायांत । इतुका निरूपिला वृत्तांत । पुढिल्या अध्यायामाजि त्वरित । कृष्णा सात्वत[2] भेटेल ॥ ८२ ॥ अक्रुराचें तें भक्तिप्रेम । परिसावया गुह्य परम । दत्तावधानें[3] कैवल्यकाम । श्रोते सत्तम परिसतु ॥ ८३ ॥ कैवल्यदायक हा वाग्यज्ञ । श्रीमदेकनाथ यजमान । भेदपशूचें करूनि हनन । संस्कृत करूनि अभेदें ॥ ८४ ॥ सच्चिदानंदाचें भरूनि पात्र । पूर्णस्वानंदें पढूनि मंत्र । गोविंदाज्ञावषट्कार । तोषवी अध्वर दयार्णव ॥ २८५ ॥ श्रोतयांचे श्रवणकुंडीं । इहीं वाक्यांहूनी उदंडी । अविद्याकामकर्मांची[4] झाडी । केली ब्रह्मांडीं मखसिद्धि[5] ॥ ८६ ॥ तें हें श्रीमद्भागवत । दशमस्कंध श्रीकृष्णचरित । जेथें मारिला केशिदैत्य । तो अध्याय समाप्त सदतिसावा ॥ ८७ ॥ इतुकी दयार्णवकृत प्रार्थना । भोगप्रारब्धयोगें जाणा । प्रयत्नें साधिजे भगवद्भजना । हे खूण मना माजि धरिजे ॥ २८८ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणेऽष्टादशसाहस्र्यां पारमहंस्यां संहितायां दशमस्कंधे श्रीशुकपरीक्षित्संवादे हरिवरदाटीकायां दयार्णवानुचरविरचितायां केशिवध–नारदस्तव–व्योमासुरवधो नाम सप्तत्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक ३४ ॥ टीका ओव्या २८८ ॥ एवं संख्या ३२२ ॥ ( सदतिसावा अध्याय मिळून ओवीसंख्या १७३७३ ).

सदतिसावा अध्याय समाप्त.

१ प्रतिबंध. २ अक्रूर. ३ लक्ष देऊन. ४ अज्ञानेंकरून केलेल्या काम्य कर्मांची. ५ यज्ञसिद्धि.

# तृतीय खंडावरील कांहीं अभिप्राय



★ " तिसरा खंड पूर्वीच्या दोन खंडांहून अधिक सरस आहे. किंबहुना असेंच म्हणावें लागेल कीं, शुक्लपक्षांत प्रत्येक तिथीला चंद्राची कला ज्याप्रमाणें वाढतच जाते, त्याप्रमाणें कृष्णदयार्णवांच्या काव्याची सरसता अध्यायागणिक वाढतच जाते. या खंडांत दशमस्कंधांतील १६ पासून २८ अखेर तेरा अध्यायांवरील टीका, मूळ संस्कृत श्लोकांसह, भारदस्त मराठींत ओवी छंदांत आली आहे .... यांतील वर्णन अति रसाळ आणि चित्ताकर्षक झालें आहे .... उपमादृष्टान्तरूपकादि अलंकार समुचित व हृदयंगम आहेत .... कृष्णदयार्णव म्हणजे विश्वकोश आहे. त्यांस वेदान्त, योगशास्त्र, संगीत, नाट्य, कुलधर्म, कुलाचार या सर्वांची परिभाषा अवगत आहे. मुलांमुलींचे खेळ, पूजाप्रकार, पक्वान्नें, पशुपक्ष्यांचीं नांवें, गृहस्थाश्रमांतील विविध व्यवसाय, इत्यादि व्यावहारिक गोष्टींचें त्यांस यथार्थ ज्ञान असल्याचें दिसून येतें. मराठी भाषेंतील उच्च प्रतीच्या काव्याचा नमुना म्हणून 'हरिवरदा' टीका अभ्यसनीय आहे."




— ज. स. करंदीकर
'केसरी', पुणें.

★ " तुम्ही एकदा या दयार्णवांत उतरलांत म्हणजे मग त्यांची छातीवर हात ठेवून ग्वाही आहे कीं, 'प्रमेयछाये सुशीतळे । श्रवणसोहळे प्रेमळा ॥' अडीअडचणींना दाद न देतां आपली अभ्यासाची बैठक कशी खंबीर आणि अखंड ठेवावी, याचें जिवंत उदाहरण कृष्णदयार्णवांनीं अभ्यासकांना नेहमींसाठीं घालून दिलें आहे .... सर्व माहिती अद्ययावत् पाहिजे आणि ती तशी देतांना कृष्णदयार्णवांनीं कुचराई केलेली नाहीं. संगीत व नृत्य यांची माहिती देणारे दयार्णव व्याकरणाच्या फडांतहि तितकेच ठाकेठोक आहेत. .... कृष्णदयार्णवांची प्रतिभा ही नुसती बहुप्रसवाच नसून तिच्यांत स्थळ, काळ आणि व्यक्तींचें यथार्थ चित्रण करण्याचीहि भरपूर क्षमता आहे."

— न. शो. पोहनेरकर
'सकाळ', पुणें.

★ " 'हरिवदा' हा ग्रंथ माझा आवडता ग्रंथ आहे. चातुर्मास्यांत लोकांनीं हा प्रासादिक ग्रंथ लावावा, असें मी आग्रहानें सांगत असतों."

— श्री धुंडामहाराज

★ " प्रस्तुत खंडांत अध्याय १६ ते २८ आले असून, कालियानिर्याणापासून गोवर्धनोद्धारणापर्यंतचा कथाभाग वर्णिला आहे. कवीची प्रासादिक भाषा, वर्णन करण्याची रसाळ पद्धति, शब्दभांडार, वाक्संप्रदायांचें सूक्ष्म विवरण इत्यादि विशेष गुणांची ओळख वाचकांस होते."

— चिं. ग. कर्वे
'प्रसाद', पुणें.